श्रीश्रीगोद्रुमचन्द्राय नमः

# जैवधर्म

## [ जिवाचा धर्म ]

श्रीश्रील ठाकूर भक्तिविनोद-विरचित

अनुवाद आणि संपादक
नित्यलीला प्रविष्ट ॐ विष्णुपाद परमहंसस्वामी

**श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज**

यांचे अनुगृहीत

**त्रिदण्डिस्वामी**
**श्रीश्रीमद्भक्ति वेदान्त नारायण गोस्वामी महाराज**



**प्रकाशक**–त्रिदण्डिस्वामी भक्तिवेदान्त दण्डी महाराज

**प्रथम मराठी आवृत्ती**–श्रीचैतन्याब्द ५२९

## प्राप्तिस्थान

(१) श्री रंगनाथ गौडीय मठ, हेसरकट्टा, बंगलोर. पिन: ५६००८८. दूरवाणी: (०८०)२८४६६७६०, ९३७९४४७८९५, ७८२९३७८३८६. ईमेल: vishnudaivata@gmail.com
(२) श्री. भरत खैरे, १३३३ रविवार पेठ, तालुका: वाई, जिल्हा: सातारा, महाराष्ट्र. पिन: ४१२८०३. दूरवाणी: ९८८१४६९७५९.
(३) श्री. मुकुन्द दास (श्री. राजनन्दन शिंदे) सातारा. प्लॉट क्रमांक १३, हरि-कृपा, विश्वास वन सोसायटी, गोडोली, विलासपूर, पोस्ट: एम. आय.डी.सी. सातारा. पिन: ४००५१४.दूरवाणी:९८८१२५२५८१. ईमेल: rajanandanonline@gmail.com
(४) श्री. अमलकृष्ण दास (श्री. अशोक विलास गायकवाड), द्वारा: गायकवाड मंडप कॉंट्रॅक्टर, मोहन नगर, चिंचवड, पुणे, महाराष्ट्र. पिन: ४११०१९. दूरवाणी: ८८५६८७०४४०.
(५) श्री. अमलकृष्ण दास (श्री. अमोल बनकर), १०५ न्यू कस्तूरी अपार्टमेंट्स, पांचाळ नगर, निल्लीमोरे, नालासोपारा (पश्चिम), तालुका: वसई, जिल्हा: पालघर. पिन: ४०१२०३. दूरवाणी: ८६०५६३५५६६. ईमेल: bankaramol2012@gmail.com
(६) श्री अमलकृष्ण दास, फ्लॅट (श्री अमरनाथ सिंग), फ्लॅट १०१, लक्ष्मी एन्क्लेव बिल्डींग, शहाजी राजे रोड, विलेपार्ले, मुंबई. पिन: ४०००५७ दूरवाणी: ९९६७५१४२५७.
(७) श्रीमती शुभदा विनय धांडे, 'मधुदीप', मॅग्नम हाऊसिंग सोसायटी, प्लॉट नंबर १८२, सावरकर नगर, एन-५, सिडको (दक्षिण), औरंगाबाद. पिन: ४३१००३. दूरवाणी: ९०२८५२५४६१.
(८) श्रीराधामाधव गौडीय मठ, रो हाऊस, प्लॉट नं १८६-ए, सेक्टर १९-सी, जिमी टॉवरजवळ, कोपर खैरणे, नवी मुंबई. पिन: ४००७०९. दूरवाणी: ०९००४००३०७७, ०९९२०१४०९९७.
(९) श्रीबालाजी गौडीय मठ, श्रीगजानन-श्रीश्रीराधामदनमोहन मंदिर, सत्यनारायण पूरम् सर्कल, तिरुपती. पिन: ५१७५०१ (आंध्रप्रदेश) दूरवाणी: ८०१९४३६६८ ईमेल: selams9@yahoo.com
(१०) श्री गौरनारायण गौडीय मठ, आर.एच. कॉलनी-३, तालुका: सिन्धनूर, जिल्हा: रायचूर. पिन:५८४१४३ (कर्नाटक). दूरवाणी: ७६७६३०८९२५. ९०१९२६५२९६

**वेबसाईट:** http://www.purebhakti.com,
http://www.sreeranganthgaudiya.org

**मुद्रक :** रॅक्मो प्रेस प्रायव्हेट लिमिटेड, सी-५९, ओखला इंडस्ट्रीयल एरिया, फेज-१, नवी दिल्ली.
पिन: ११००२०. दूरवाणी: ०११२६८१०४२४, ९८११०५७५८२.
ईमेल: rakmopress06@gmail.com

मुखपृष्ठावरील श्रीपंचतत्त्व व आतील रंगचित्रे श्रीमती श्यामराणी दासी यांची आहेत.

# विषय-अनुक्रमणिका

* * *

# प्रस्तावना

पृथ्वीतलावर अनेक प्रकारचे धर्म-संप्रदाय प्रचलित आहेत. त्यापैकी अधिकांश संप्रदायातच तत्तद्धर्म-प्रचाराच्या उद्देशाने विविध प्रकारच्या प्रणालींचे अवलंबन करून विभिन्न भाषांतून अनेकानेक ग्रंथ लिपीबद्ध केलेले आहेत. ज्या प्रकारे लौकिक शिक्षणात कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम असा भेद अथवा लहान-मोठा, श्रेष्ठ-कनिष्ठ आदी विविध प्रकारचे तारतम्य भाव स्वतःसिद्ध आहेत, त्याचप्रकारे विभिन्न धर्म-संप्रदायांच्या धर्मविषयक शिकवणुकींमध्ये देखील विभिन्न प्रकारचे तारतम्य सर्ववादीसंमत आणि स्वतःसिद्ध आहेत. यापैकी श्रीचैतन्य महाप्रभूंची प्रेम-धर्मासंबंधीची शिकवणूक सर्वच दृष्टीने सर्वोत्तम आहे–यास विश्वातील समस्त निरपेक्ष मनिषीवृंद एक-स्वराने निश्चितच स्वीकारतील. सर्वोत्तम आदर्श आणि शिक्षणाने प्रेरित होण्याची आकांक्षा प्रत्येकातच दिसून येते. त्या लोकांची ही शुभेच्छा कशी काय सफल होईल–याचा विचार करूनच परममुक्त पुरुष तथा धर्म जगतातील प्रधान आदर्श, शिक्षित कुलचूडामणी श्रील ठाकूर भक्तिविनोदांनी विभिन्न भाषांतून अनेकानेक धर्म-ग्रंथाची निर्मिती केली आहे. या ग्रंथांमध्ये श्रीचैतन्य महाप्रभूंच्या शिकवणींचेच (उपदेशांचेच) अतिशय सरळ-सहज भाषेत सांगोपांग वर्णन उपलब्ध होत असते. लेखकाच्या संपूर्ण ग्रंथराशीत या 'जैवधर्म' ग्रंथालाच विभिन्न देशीय धार्मिक मनीषींनी सर्वोत्तम मानले आहे.

विश्वात वेद सर्वांत प्राचीनतम ग्रंथ आहेत. तदनुगत उपनिषदसमूह आणि श्रीवेदव्यासांद्वारे प्रकटित वेदान्तसूत्र, महाभारत आणि श्रीमद्भागवत आदी आदर्श ग्रंथ आहेत. पुढे पुढे तर याच आदर्शाने प्रेरित होऊन भारतवर्षात अनेक प्रकरण-ग्रंथ लिहिले गेले, ज्यांचा ठिकठिकाणी खूप प्रसार आणि आदर करण्यात येतो. या प्रकरण-ग्रंथामध्ये तारतम्य, वैशिष्ट्ये आणि भेद आदींविषयी तर सोडाच, परस्पर सामंजस्यरहित विभिन्न प्रकारचे मतभेद आणि काल्पनिक विचारधारा देखील दिसतात. फलस्वरूप धर्म-जगतात नाना प्रकारचे उद्रेक आणि उपद्रव होत आले आहेत. अशा बिकट परिस्थितीत स्वयं-भगवंताने परतत्त्व रूपात जीवमात्राच्या उद्धाराकरिता सप्ततीर्थांत प्रधान मायातीर्थ–मायापूर (श्रीधाम नवद्वीप) येथे आविर्भूत होऊन आपल्या प्रिय पार्षदांद्वारे (नित्य सेवकांद्वारे) संपूर्ण शास्त्रांचे यथार्थ तात्पर्यमूल

सार संकलन करवून जवळजवळ ४००-४५० वर्षे पूर्वी सगळ्यांच्या हृदयात दिव्यज्ञान-मूला भक्तीचा उन्मेष करविला होता. त्यातील तीन-चार ग्रंथ सोडले तर अधिकांश ग्रंथच संस्कृत भाषेत लिपीबद्ध आहेत. श्रीचैतन्य महाप्रभूंचे पार्षदोत्तम श्रीश्रीरूप-सनातनांचे प्रियतम अभिन्न-विग्रह श्रील जीवगोस्वामींनी समस्त शास्त्रांचे सार-संकलन करून देवभाषेत 'षट्संदर्भ' आदी ग्रंथांची रचना केली आहे, आणि त्या माध्यमातून स्वयं-भगवंताच्या जीवोद्धार-लीलेच्या निगूढतम इच्छेला व्यक्त केले आहे. काही लोक शास्त्रांचे यथार्थ तात्पर्य अनुधावन करू न शकल्याने या ग्रंथ समूहातील आंशिक वा कलामात्र, इतकेच काय तर छाया किंवा विरुद्ध भावांनाच ग्रहण करण्यास बाध्य झालेले आहेत. श्रीजीव गोस्वामींच्या लेखणीतून प्रसूत शिकवण हीच श्रीमन् महाप्रभूंची एकांतिक शिकवण आहे; वेद-उपनिषद, महाभारत आणि श्रीमद्भागवताची शिकवणूक आहे. याच शिकवणुकीच्या सर्वथा निर्दोष आणि पूर्णतम भावांचे अवलंबन करून हा 'जैवधर्म' ग्रंथ अत्यंत आश्चर्यकारक रूपाने ग्रथित झाला आहे. खाली 'जैवधर्म'-नामकरणाच्या तात्पर्याची विवेचना केली गेली आहे, ज्यावरून वाचकगण या ग्रंथाची उपादेयता (स्वीकार्यता) आणि गुरुत्व (वंदनीयता) सहजपणे अनुधावित करू शकतील.

ग्रंथकाराने या ग्रंथाचे नामकरण केले आहे–'जैवधर्म'. धर्माच्या संबंधित आपल्यापैकी प्रत्येकाने काहीना काहीतरी धारणा बनवली असते. म्हणूनच इथे स्थानाच्या अभावामुळे या विषयावर जास्त काही सांगणे मी अनावश्यक समजतो. संस्कृत भाषेत 'जीव' शब्दात 'ष्ण' प्रत्यय लावून 'जैव' शब्द निष्पन्न झाला आहे. याचा अर्थ आहे–'जिवाचा' अथवा 'जीव-संबंधीय'. म्हणूनच 'जैवधर्म' म्हटल्यानंतर 'जीवमात्राचा (प्रत्येक जिवाचा) धर्म' किंवा 'जीव-संबंधीय' धर्माचा बोध होतो. येथे जीव कुणाला म्हटले गेले आहे?–या प्रश्नाचे उत्तर स्वयं ग्रंथकाराने विस्तृत विवेचनपूर्वक प्रदान केले आहे. थोडक्यात मी एक दोन गोष्टी येथे निवेदन करणे आवश्यक समजतो.

'जीव' शब्द सुचवतो की ज्याला जीवन आहे, तोच जीव आहे अर्थात प्रत्येक प्राणी हा जीवच आहे. म्हणून ग्रंथकाराने जैवधर्मातून प्रत्येक जिवाच्या म्हणजेच प्रत्येक प्राण्याच्या धर्माला लक्ष्य केले आहे. श्रीकृष्णचैतन्य महाप्रभूंनी आपले एकांतिक अनुगत निजजन श्रीरूप-सनातन आणि जीव आदी सहा गोस्वामींच्या द्वारे प्रत्येक प्राण्यासाठी म्हणजेच प्रत्येक जिवासाठी कोणता धर्म ग्रहणीय आहे आणि

पालनीय आहे–या विषयावर शिकवण दिली आहे. त्यानंतर जवळजवळ ४०० वर्षांनंतर श्रीगौर-जन्मस्थान श्रीधाम मायापूर जवळच या ग्रंथाचे लेखक सप्तम गोस्वामी श्रील ठाकूर भक्तिविनोदांनी आविर्भूत होवून, जिवांच्याप्रती दयार्द्र-चित्त होवून बंगाली भाषेत 'जैवधर्मा'ची रचना केली आहे.

भगवंताच्या इच्छेने भगवंताचे निजजन श्रीकृष्णदास कविराज गोस्वामींनी श्रीचैतन्यचरितामृत ग्रंथात भगवान श्रीगौरचंद्रांच्या शिकवणुकीचे सार खालील ओळीत व्यक्त केले आहे–

**जीवेर स्वरूप हय कृष्णेर नित्यदास।**
**कृष्णेर तटस्था शक्ति भेदा-भेद प्रकाश॥**

(चै. च. म. २०/१०८)

ग्रंथकाराने गौडीय वैष्णवांच्या संपूर्ण शिकवणुकीचे बीजमंत्र-स्वरूप उपरोक्त मंत्राच्या आधारावरच 'जैवधर्मा'ची रचना केली आहे. म्हणूनच हा ग्रंथ जाती, वर्ण, आश्रम, आणि देश-काल-पात्र आदी भेदांच्या पलीकडील मानवमात्रासाठीच नाही, परंतु मनुष्येतर कुलोद्भुत (कुलोत्पन्न) प्रस्तर (खडक), पशू, पक्षी, कीटक, पतंग, जलचर तसेच स्थावर आणि जंगम योनी प्राप्त प्राणीमात्रांसाठी देखील ग्रहणीय आहे. मनुष्येतर प्राण्यांमध्ये जैवधर्म ग्रहण करणाऱ्या जीवांमध्ये उदाहरण-स्वरूप अहल्या (पाषाणी), यमलार्जुन (वृक्ष), सप्तताल (वृक्ष), नृगराज (सरडा), भरत (मृग), सुरभी (गाय), गजेंद्र (हत्ती), जांबुवंत (अस्वल), अंगद-सुग्रीव (वानर) आदींची नावे उल्लेखनीय आहेत. जगद्गुरू ब्रह्मांनी स्वयं-भगवान श्रीकृष्णाकडे तृण-गुल्म (गवत व झाडझुडूप), पशू, पक्षी आदी कुठल्याही योनीत जन्म देऊन तदीय (त्यांच्या) चरणकमलांच्या सेवेची याचना केली आहे–

**तदस्तु मे नाथ स भूरिभागो भवेऽत्र वान्यत्र तु वा तिरश्चाम।**
**येनाहमेकोऽपि भवज्जनाना भूत्वा निषेवे तव पादपल्लवम्॥**

(श्रीमद्भा. १०/१४/३०)

भक्तराज प्रल्हाद महाराजांनी तर आणखी स्पष्ट रूपात पशू आदी सहस्र योनींमध्ये जन्म ग्रहण करूनही भगवद्दास्य रूप (भगवंताच्या दास रूपातील) जैवधर्माच्या प्राप्तीची लालसा व्यक्त केली आहे.

**नाथ योनि सहस्त्रेषु येषु येषु व्रजाम्यहम्।**
**तेषु तेष्वचला भक्तिरच्युतास्तु सदा त्वयि॥**

आणि स्वयं ग्रंथकाराने देखील स्वरचित 'शरणागती' ग्रंथात अशीच प्रार्थना केली आहे–

**कीट जन्म हउ यथा तुया दास।**
**बहिर्मुख ब्रह्मजन्मे नाहि आश॥**

म्हणूनच 'जैवधर्मा'ची शिकवणूक प्राणिमात्रांकरिता आदरणीय आणि ग्रहणीय आहे. या शिकवणुकीस सर्वांतःकरणाने स्वीकारल्याने प्राणिमात्र अतिसहज रितीने मायामोहाच्या कठोर बेड्यांच्या घोर यंत्रणेतून, तुच्छ-अलीक (खोट्या) आनंदाच्या मृग-मरिचिकेतून (मृगजळातून) नित्य मुक्ती प्राप्त करून भगवत्-सेवानंदात निमग्न होऊन पराशांती आणि परानंदास प्राप्त करण्यास समर्थ होतो.

पूर्व-प्रदर्शित उपदेशाच्या श्रेष्ठ-कनिष्ठ तारतम्याप्रमाणेच धर्मतत्त्वातही श्रेष्ठ-कनिष्ठ आदींचे तारतम्य स्वीकृत आहे. उन्नत शिकवणुकीचा आदर्श उन्नत अधिकारीच ग्रहण करू शकतो. तात्पर्य हे की समस्त प्रकारच्या प्राण्यांमध्ये मनुष्य सर्वश्रेष्ठ आहे. मनुष्येतर प्राणी पण अनेक प्रकारचे आहेत. प्राणी अथवा जीव म्हटल्याने चेतन पदार्थाचाच बोध होतो. येथे अचेतन किंवा जड पदार्थांचा विषय आलोच्य (विचारयोग्य) नाही. चेतन वस्तूच्या स्वाभाविक वृत्तीस किंवा क्रियेसच धर्म म्हणतात. हा धर्म वास्तवात चेतन वस्तूची वृत्ती किंवा त्याच्या स्वरूपगत स्वभावासच लक्ष्य करतो. धर्माची वाणी म्हटल्याने चेतन वस्तूच्या वाणीचाच बोध होतो. या ग्रंथाच्या सोळाव्या अध्यायात चेतन वस्तूच्या तारतम्यमूलक क्रम-विकासाचे विज्ञान-संगत (विज्ञान-संबद्ध) सूक्ष्म-विवेचन आहे. चेतन अर्थात मायाबद्ध जिवांच्या पाच अवस्था असतात–(१) आच्छादित (झाकल्या गेलेले) चेतन; (२) संकुचित (मर्यादा असलेले) चेतन; (३) मुकुलित (कळीप्रमाणे विकास होण्याची वाट पहाणारे) चेतन; (४) विकसित (विकास साधण्याची इच्छा आणि शक्ती असलेले) चेतन आणि (५) पूर्ण विकसित चेतन. अशा चेतन वस्तूच जीव किंवा प्राणी म्हणविले जातात. जिवांच्या या पाच श्रेणी पुनः स्थावर (स्थिर, अचल) आणि जंगम (अस्थिर, चल) भेदांनी दोन भागांत विभक्त आहेत. यातील वृक्ष, लता, गुल्म, आणि प्रस्तर आदी स्थावर प्राण्यांना आच्छादित चेतन म्हणतात. या आच्छादित चेतनव्यतिरिक्त

अन्य चार प्रकारच्या चेतनसमूहांना जंगम (चालणारे) प्राणी म्हणतात. पशू, पक्षी, कीटक, पतंग त्याचप्रमाणे जलचर प्राणिसमूह संकुचित चेतन आहेत. आच्छादित आणि संकुचित या दोन श्रेणींमध्ये मनुष्येतर कुलोत्पन्न जीव असतात. मुकुलित, विकसित आणि पूर्ण विकसित चेतन–या तीनही श्रेणींमध्ये मनुष्य शरीराचे जीवसमूह येतात. म्हणूनच या तीन श्रेणींमध्ये अवस्थित (असलेले, वसणारे) चेतन, आकाराच्या दृष्टीने मानव असूनही चेतनतेच्या क्रम-विकासाच्या दृष्टीने यांच्यात तारतम्य आहे. याच तारतम्य विचारास ध्यानात ठेवून त्यांत कनिष्ठ, मध्यम, आणि उत्तमाचा विचार होतो. तरीदेखील वृक्ष, लता, गुल्म, पशुपक्षी आणि मनुष्य–हे सर्व जीवच आहेत आणि या सर्वांचाच एकमात्र धर्म भगवदुपासनाच आहे. परंतु या सर्वांत मनुष्य सर्वश्रेष्ठ प्राणी आहे आणि भगवदुपासना रूप जैवधर्म त्याचाच विशेष धर्म आहे.

ज्ञान किंवा बोधाच्या आच्छादनाच्या तारतम्यानुसार (तर-तम भाव, कमी-अधिक प्रमाणानुसार) चेतन वृत्तीचे तारतम्य ठरत असते. मानवच या सर्वप्रकारच्या प्राण्यांमध्ये श्रेष्ठ आहे–या विषयी थोडीही शंका नाही. हे श्रेष्ठत्व कुठे आणि का आहे–यावर विचार करणे अत्यंत आवश्यक आहे. वृक्ष, लता, कीटक, पतंग, पशू-पक्षी आणि जलचर प्राण्यांपेक्षा आकार-विकार, बल-वीर्य, सौंदर्य आणि रूप-लावण्य आदींच्या दृष्टीने मनुष्यच सर्वश्रेष्ठ आहे–असे ठामपणे सांगता येत नाही. परंतु मनोवृत्ती आणि बौद्धिक विकास अथवा चैतन्य-वृत्तीच्या अधिक विकासाच्या दृष्टीनेच मानव अन्यान्य प्राण्यांपेक्षा सर्वतोभावेन श्रेष्ठ आहे म्हणूनच 'जैवधर्म' या ग्रंथात याच श्रेष्ठ धर्माचे विवेचन केले गेले आहे. साधारणतः जीवमात्राचा धर्म असूनही यास मानव-जातीचाच धर्म समजावयास हवे. कारण श्रेष्ठ धर्मावर श्रेष्ठ जिवाचाच विशेष अधिकार असतो.

येथे असा प्रश्न निर्माण होऊ शकतो की ग्रंथाचे नाव 'जैवधर्म' न ठेवता 'मानवधर्म' किंवा 'मनुष्यमात्राचा धर्म' असेच का नाही ठेवले गेले? संशोधन केल्यानंतर याचे कारण असे ज्ञात होते की धर्ममात्रात मनुष्याची वृत्ती होत असते. मनुष्येतर प्राण्यांमध्ये धर्म नसतो–हाच सामान्य नियम आहे. वृक्ष, लता, प्रस्तर, कृमी, कीटक, मत्स्य, कासव, पशुपक्षी आणि साप इत्यादी जीव म्हणूनच संबोधले जात असले तरीही त्यांच्यात मोक्ष किंवा भगवदुपासना सूचक धर्मवृत्ती परिलक्षित होत नाही (दिसत नाही).

बऱ्याचशा दार्शनिकांचे (तत्त्वज्ञांचे, तत्त्वबोधकांचे) हे मत आहे की ज्या प्राण्यांमध्ये केवळमात्र पशुत्व अर्थात मूर्खता आणि निष्ठुरता (animality) अस्तित्वात असते, तेच पशू असतात. या पशु-श्रेणीच्या बऱ्याचशा जीवांमध्ये जी जन्मगत स्वाभाविक किंवा सहज ज्ञानवृत्ती (intuition) परिलक्षित होते, ती काही अंशी मानववृत्तीचा आभासमात्र असते; वास्तविक ती मानववृत्ती नाही. या पशुत्वासोबत (animality) ज्ञान अथवा विवेक-बुद्धी (rationality) युक्त झाल्यावरच ते मानवी गुणधर्म ठरतात आणि ज्यांच्यात ही मानवता आहे, त्यांना मानव किंवा मनुष्य म्हटले जाते. पाश्चात्य दार्शनिक (तत्त्वज्ञानी) देखील म्हणतात– Men are rational beings. आपल्या आर्य ऋषींनी उक्त पशुवृत्तीद्वारे (animality) संक्षेपतः आहार, निद्रा, भय आणि मैथुन–या चार वृत्तींना लक्षित केले आहे (दर्शविले आहे). या पशुवृत्तीला अतिक्रमण करून धर्मवृत्तीने (rationality) युक्त झाल्यावरच मनुष्यत्व प्रमाणित होते. परंतु येथे हे विशेषत्वाने लक्षात घेणे योग्य आहे की पाश्चात्य दर्शनात rationality चा अर्थ अती संकुचित आहे आणि आपल्या आर्य दर्शनात 'धर्म' शब्द् अत्यंत व्यापक आहे, जो पाश्चात्य दर्शनाच्या rationality स आपल्या एकांशात अंतर्भूत करून त्याहूनही अधिक उन्नत ईशोपासनावृत्तीलाही धारण करू शकतो. हा धर्मच मनुष्यत्वाचा यथार्थ परिचायक (परिचय करवून देणारा गुण किंवा घटक) आहे. धर्महीन प्राण्यांना 'पशू'ची संज्ञा दिली गेली आहे. शास्त्र सांगतात–

**आहार निद्रा भय मैथुनञ्च सामान्यमेतत् पशुभिर्नराणाम्।**
**धर्मो हि तेषां अधिको विशेषो धर्मेण हीना पशुभिः समाना॥**

तात्पर्य असे की आहार, निद्रा, भय आणि मैथुनरूप इंद्रिय-तर्पणादी प्रत्येक प्राणी अथवा जिवाची स्वाभाविक वृत्ती आहेत. मनुष्य आणि मनुष्येतर अशा सर्व प्रकारच्या जीवांमध्येच या वृत्ती समान रूपाने परिलक्षित होतात (दिसतात) याबद्दल दुमत नाही. परंतु मनुष्यास मनुष्य तेव्हाच म्हटले जाईल जेव्हा त्यात धर्मवृत्ती आढळून येईल. **"धर्मो हि तेषां अधिको विशेषो"** अर्थात पशू आदींपेक्षा मनुष्यात धर्मच विशेष किंवा अधिकच असतो. ज्याच्यात धर्माचा नितांत अभाव असतो, त्याला मनुष्य म्हणता येत नाही. **"धर्मेण हीना पशुभिः समाना।"**–धर्महीन व्यक्ती पशु-सदृश असते. म्हणूनच आपल्या देशात धर्महीन मनुष्यास नरपशू म्हटले गेले आहे.

अस्तु (असो), हे विशेष रूपाने विचारणीय आहे की आजकाल लोक धर्मांचा परित्याग करून केवळ आहार-विहार आदी विषय-भोगांमध्ये प्रमत्त राहतात, त्यांची ही वृत्ती–पशुवृत्ती अथवा मनुष्येतर वृत्ती आहेत. कलीच्या प्रभावामुळे आजकाल मनुष्य निम्नगामी होऊन क्रमशः पशुत्वाकडे अग्रेसर होत आहे. म्हणून ग्रंथकाराने सर्वांच्याच हितकामनेने ग्रंथाचे नाव 'जैवधर्म' ठेवून शास्त्र-मर्यादांना संपूर्ण रूपाने अक्षुण्ण (अखंडित) ठेवले आहे. मनुष्यातच ईश्वर-उपासनारूप धर्म परिलक्षित होतो; पशुपक्षी आदी मनुष्येतर प्राण्यांमध्ये नाही. म्हणूनच मनुष्य सर्वोच्च प्राणी आहे आणि तोच सर्वोच्च शिकवणुकीचा (उपदेशाचा) अथवा धर्मांचा विशेष अधिकारी आहे. जैवधर्म त्यांच्याकरिताच पठनीय (अभ्यासनीय) आहे.

श्रीचैतन्य महाप्रभूंची विशेषता ही आहे की त्यांनी सर्वात निम्न (हीन) व्यक्तीवर देखील कृपा करून आपल्या उच्चतम शिकवणुकीत अधिकार प्रदान केला आहे. असे दुसऱ्या कुठल्याही अवतारात दिले गेलेले नाही. म्हणूनच शास्त्रकारांनी श्रीमन् महाप्रभूंचे अत्यंत मार्मिक शब्दात स्तवन केले आहे–

**अनर्पितचरीं चिरात् करुणयावत्तीर्णः कलौ**<br>**समर्पयितुमुन्नतोज्ज्वलरसां स्वभक्तिश्रियम्।**<br>**हरिः पुरटसुन्दरद्युति कदम्बसन्दीपितः**<br>**सदा हृदय-कन्दरे स्फुरतु वः शचीनन्दनः॥**

(विदग्धमाधव १/२)

अर्थात जो सर्वोत्कृष्ट उज्ज्वलरस जगतास कधीही दान केला गेला नाही ज्यायोगे जीवमात्र अत्यंत सहज आणि सरलतेने माया-मोहाच्या बंधनातून सदाकरिता मुक्त होऊन कृष्णप्रेम प्राप्त करून धन्य होऊ शकतील, त्या स्वभक्तीच्या संपत्तीचे दान करण्याकरिता करुणावशतः सुवर्णकांतीद्वारा देदीप्यमान स्वयं-भगवान श्रीशचीनन्दन गौरहरी कलिकाळात अवतीर्ण झाले आहेत. लेखकाने देखील श्रीमन् महाप्रभूंच्या उपरोक्त (वर उल्लेखिलेल्या) वैशिष्ट्याचे सर्वतोभावेन रक्षण केले आहे.

"वैष्णवधर्मात मनुष्यमात्राचा अधिकार आहे"–ग्रंथकाराने 'जैवधर्मा'च्या अकराव्या अध्यायातील मौलवी साहेब आणि वैष्णवांच्या परस्पर विचार-विनिमय (विचारांच्या आदानप्रदान) प्रसंगात या सिद्धांताचे युक्तिसंगत विचार आणि दृढ शास्त्रीय प्रमाणांद्वारे प्रतिपादन केले आहे. उर्दू, फारशी आणि इंग्रजी आदी कुठल्याही

भाषेत बोलणारी व्यक्ती वैष्णव असू शकते. केवळमात्र संस्कृतभाषीच वैष्णव बनू शकतात–असे नाही; उलटपक्षी असे आढळून येते की हिंदी, बंगाली, ओरिया, आसामी, तामिळ, तेलगू इत्यादी भाषा बोलणाऱ्या अनेक व्यक्तींनी प्रचुर प्रतिष्ठासंपन्न वैष्णव-पदवी प्राप्त केली आहे. म्हणूनच मुसलमान, ख्रिस्ती, बौद्ध आणि जैन आदी जातींचे लोक वैष्णव होण्यास अधिकारी आहेत. भाषेच्या वैषम्यतेमुळे वैष्णवतेचे वैषम्य होत नाही. (भाषांच्या भेदामुळे वैष्णव-भावात भेद निर्माण होत नाही.)

भाषा-विद्वेषींच्या विचारांची उपेक्षा करीत श्रीलभक्तिविनोद ठाकुरांनी भाषांच्या माध्यमातून श्रीमन् महाप्रभूंच्या अप्राकृत भावमयी शिकवणुकीवर प्रकाश टाकला आहे. अप्राकृत दैव-संस्कृत-भाषा तथा तदनुगत बंगाली भाषेव्यतिरिक्त ओरिया, हिंदी, उर्दू आणि इंग्रजी आदी विभिन्न भाषांतून त्यांच्याद्वारे रचित जवळजवळ १०० ग्रंथ आहेत. त्यांतील काही विशेष ग्रंथांची नावे त्यांच्या रचनेच्या काळासोबत खाली दिली जात आहेत–

**(क) संस्कृत**–(१) वेदान्ताधिकरण–बंगाब्द १२७९[(१)], (२) दत्तकौस्तुभम् १२८१, (३) दत्तवंशमाला १२८३, (४) बौद्धविजय काव्यम् १२८५, (५) श्रीकृष्णसंहिता १२८७, (६) 'सन्मोदन भाष्य' (शिक्षाष्टकाचे) १२९३, (७) दशोपनिषद्-चूर्णिका १२९३, (८) भावावली (श्लोक आणि भाष्य) १२९३, (९) 'श्रीचैतन्यचरणामृत'-भाष्य (श्रीचैतन्योपनिषदाचे) १२९४, (१०) श्रीमदाम्नाय सूत्रम् १२९७, (११) तत्वविवेकः किंवा श्रीसच्चिदानंदानुभूतिः १३००, (१२) तत्वसूत्रम् १३०१, (१३) 'वेदार्क-दीधिति' व्याख्या (ईशोपनिषदाची) १३०१, (१४) श्रीगौरांग-स्मरणमंगल-स्त्रोत्रम्–१३०३, (१५) श्रीसनातनगोस्वामींच्या 'श्रीभगवद्धामामृतम्' ग्रंथाचे भाष्य १३०५, (१६) श्रीभागवतार्कमरीचिमाला १३०८, (१७) श्रीभजनरहस्यम् १३०९, (१८) स्वनियम-द्वादशकम् १३०४, (१९) ब्रह्मसूत्र किंवा वेदान्त-दर्शनाचे भाष्य, (२०) शिक्षा-दशमूलम् इत्यादी.

**(ख) बंगाली (गद्य)**–(१) गर्भस्तोत्र-व्याख्या किंवा सम्बन्ध-तत्त्व-चन्द्रिका बंगाब्द १२७७, (२) श्रीसज्जनतोषिणी (मासिक पत्रिका, १म्-१७ खण्ड) आरम्भ

(१) ग्रंथकाराने आपल्या ग्रंथांच्या रचनाकाळात 'बंगाब्द' शब्दाचा प्रयोग केला आहे. जो विक्रमी संवत ६५० वर्षे पूर्वी प्रचलित झाला होता. अर्थात बंगाब्दात ६५० ची बेरीज केल्यास (मिळवल्यास) ते विक्रमी संवत होईल.

१२८८, (३) 'रसिकरञ्जन भाषाभाष्य' (गीतेच्या श्रीविश्वनाथ चक्रवर्तीटीकेसहित) १२९३, (४) श्रीचैतन्यशिक्षामृत १२९३, (५) प्रेम-प्रदीप (पारमार्थिक कादंबरी) १२९३, (६) 'श्रीविष्णुसहस्रनामा'चा बंगाली अनुवाद (बलदेवभाष्य) १२९३, (७) वैष्णवसिद्धान्तमाला १२९५, (८) सिद्धान्त-दर्पणानुवाद १२९७, (९) 'विद्वद्‌रञ्जन' भाषा-भाष्य (श्रीगीतेच्या श्रीबलदेव-भाष्यासहित) १२९८, (१०) श्रीहरिनाम, श्रीनाम, श्रीनाम-तत्त्व, श्रीनाम-महिमा, श्रीनाम-प्रचार (वैष्णव-सिद्धान्तमालेच्या गुच्छासहित) १२९९, (११) श्रीमन् महाप्रभूंची शिकवण १२९९, (१२) तत्त्वमुक्तावली किंवा मायावादशतदूषणी १३०१, (१३) 'अमृतप्रवाह-भाष्य' (श्रीचैतन्यचरितामृताचे) १३०२, (१४) श्रीरामानुज-उपदेश १३०३, (१५) जैवधर्म १३०३, (१६) 'प्रकाशिनी' वृत्ती सहित ब्रह्मसंहितेचा बंगाली अनुवाद १३०४, (१७) 'श्रीकृष्णकर्णामृतम्' ग्रंथाची व्याख्या १३०५, (१८) 'पीयूषवर्षिणी' वृत्ती (श्रीउपदेशामृतम्‌ची) १३०५, (१९) श्रीनरहरी ठाकुरकृत 'श्रीभजनामृतम्'–ग्रंथाचे भाष्य १३०६, (२०) 'श्रीसंकल्पकल्पद्रुमः' ग्रंथाचा बंगाली अनुवाद १३०८ इत्यादी.

(ग) **बंगाली (पद्य)–**(१) हरिकथा-बंगाब्द १२५७, (२) शुंभ-निशुंभ-युद्ध १२५८, (३) विजन ग्राम १२७०, (४) संन्यासी १२७०, (५) कल्याण-कल्पतरू १२८८, (६) मनःशिक्षा १२९३, (७) श्रीकृष्णविजय १२९४, (८) श्रीनवद्वीपधाम-माहात्म्य १२९७, (९) शरणागती १३००, (१०) शोकशातन १३००, (११) श्रीनवद्वीपभावतरंग १३०६, (१२) श्रीहरिनाम-चिन्तामणी १३०७, (१३) गीतावली, (१४) गीतमाला, (१५) श्रीप्रेमविवर्त्त (संपादन) १३१३ इत्यादी.

(घ) उर्दू–वालिदे रेजिष्ट्री–इ. स. १८६६

(ङ) इंग्रजी–(1) Period (1st&2nd volume) 1857-1858, (2) Maṭhas of Orissa 1860, (3) Our wants 1863, (4) Speech on Gautama 1866, (5) Speech of Bhāgavatam 1869, (6) Reflection 1871, (7) Ṭhākura Haridāsa 1871, (8) Temple of Jagannātha 1871, (9) Monasteries of Purī 1871, (10) Review (Personality of Godhead) 1883, (11) Śrī Caitanya Mahāprabhu, His life and Precepts 1996, (12) A Beacon Light etc.

उपरोक्त ग्रंथ-सूची पाहिल्यानंतर असे अनुमान सहज लावता येऊ शकते की ग्रंथकार विभिन्न भाषांचे पारदर्शी सुपंडित होते. येथे लेखकाच्या जीवनाच्या एका वैशिष्ट्यावर प्रकाश टाकणे आवश्यक समजतो. ते पाश्चात्य शिक्षणाचे धुरंधर विद्वान असूनही पाश्चात्य प्रभावापासून सर्वथा मुक्त होते. पाश्चात्य शिक्षण-जाणकारांचे असे म्हणणे आहे–"Do not follow me but follow my words" अर्थात "मी जसे करतो त्याचे अनुकरण करू नका तर मी जे सांगतो त्याचे अनुकरण करा." परंतु श्रील भक्तिविनोद ठाकुरांचे जीवन चरित्र या कथनाचे खंडन आहे. त्यांनी स्वलिखित विविध ग्रंथांमध्ये ज्या उपदेशांचा उल्लेख केला आहे, त्यातील प्रत्येक उपदेशाचे आचरण त्यांनी स्वतः आपल्या जीवनात करून दाखविले आहे. म्हणूनच त्यांच्या उपदेशांना आणि भजन रीतीला 'भक्तिविनोद धारा' म्हटले आहे. त्यांच्या ग्रंथांमध्ये एकही गोष्ट अशी नाही, की ज्याचे त्यांनी स्वतः पालन केले नाही. म्हणूनच त्यांची लेखणी आणि जीवनचरित्र–कार्य आणि उपदेश एकच आहेत.

ज्या महापुरुषाचे असे महान वैशिष्ट्य आहे, वाचकांना त्यांचा परिचय जाणून घेण्याविषयीचे कुतूहल असणे स्वाभाविक आहे. विशेषतः आधुनिक वाचकांना कुठलाही विषय अवगत होण्यासाठी त्याच्या लेखकासंबंधी अपरिचित राहिल्यास त्याच्याद्वारे लिहिलेल्या विषयांप्रती श्रद्धा निर्माण होत नाही. म्हणूनच लेखकासंबंधी दोन-एक गोष्टी संक्षिप्त स्वरूपात निवेदन करीत आहे.

अतिमर्त्य महापुरुषांसंबंधी पुनरावलोकन करताना साधारण मनुष्यांच्या जन्म, मृत्यू आणि स्थितीकाळाप्रमाणे विचार करणे चुकीचे ठरेल, कारण महापुरुषगण जन्म आणि मृत्यूच्या पलीकडे असतात ते नित्यकाळ विद्यमान असूनही जगात त्यांचे अविर्भाव (प्राकट्य) आणि तिरोभाव (अप्राकट्य) हेच केवळ मात्र लक्ष्य केले जातात. श्रील भक्तिविनोद ठाकुरांनी १८ चैत्र, १२४५ बंगाब्द (इ. स. २ सप्टेंबर १८३८) रविवारी पश्चिम बंगालच्या नदिया जिल्ह्यात श्रीगौराविर्भाव-स्थळ श्रीधाममायापूर निकट 'वीरनगर' नामक गावी अती उच्चकुळात जन्म घेऊन गौडीयगगनास प्रकाशयुक्त (प्रकाशित) केले होते आणि ९ आषाढ १३२१ बंगाब्दात (इ. स. २३ जून १९१४) कलकत्ता महानगरात तिरोहित (अप्रकट) होऊन श्रीगौडीय वैष्णवांचे परमाराध्य श्रीश्रीगान्धर्विका-गिरिधारीच्या मध्यान्ह-लीलेत प्रवेश केला.

या ७६ वर्षांच्या अल्पकाळात त्यांनी स्वतः चारही आश्रमांचे पालन करून जगाला शिकवणूक दिली आहे. सर्वप्रथम त्यांनी ब्रह्मचर्याचे पालन करून बहुमुखी उच्च शिक्षण प्राप्त केले. त्यानंतर गार्हस्थ्य जीवनात सदुपायाने अर्थार्जन करून कुटुंबाचे भरण-पोषण करण्याचा जो आदर्श घालून दिला, तो प्रत्येक गृहस्थाकरिता अनुसरणीय आहे. त्याचवेळेस त्यांनी इंग्रज राजवटीमध्ये शासन आणि विचार विभागाच्या एका विशिष्ट उच्च पदस्थ कर्मचाऱ्याच्या (गॅझेटेड ऑफिसर) रूपात राहून संपूर्ण भारतभर भ्रमण केले. इतकेच काय तर जे प्रदेशसमूह उच्छृंखल (Unregulated Provinces, अनियंत्रित किंवा अशासित प्रदेश) म्हणून कुख्यात होते, तेथेसुद्धा या महापुरुषाने आपल्या प्रौढ सुविचारांनी तथा शासन-सुकौशल्याने शांती आणि सुश्रृंखलेची स्थापना केली. त्यांनी गृहस्थ जीवनात देखील आपल्या धार्मिक आदर्शांनी तत्कालीन सर्वच लोकांना आश्चर्यचकित केले होते. अशा प्रकारे गुरुदायित्वपूर्व कार्यांमध्ये नियुक्त (अतिशय जबाबदारीच्या पदांवर कार्यरत) राहूनसुद्धा अनेकानेक भाषांमध्ये अनेक ग्रंथांची रचना केली. त्यांच्याद्वारे रचित ग्रंथांच्या सूचीमध्ये आम्ही त्या-त्या ग्रंथांच्या रचनाकाळाचा देखील उल्लेख केला आहे. या सूचीचा विचार केल्यानंतर वाचकगण त्यांच्या आश्चर्यजनक सृजन-शक्तीचा अंदाज लावू शकतील. तत्पश्चात राजकीय शासन-विभागातून सेवा निवृत्त होऊन वानप्रस्थ आश्रय ग्रहण करून त्यांनी नवद्वीपाच्या नऊ द्वीपांच्या (बेटांच्या) अंतर्गत कीर्त्तनाख्या गोद्रुमद्वीपामध्ये सुरभिकुंजाची स्थापना केली तथा तेथेच बराच काळापर्यंत भजन केले. तत्पश्चात संन्यास ग्रहण करून त्याच्याच जवळ स्वानंद-सुखद कुंजात राहून त्यांनी ज्याप्रमाणे श्रीचैतन्यमहाप्रभूंनी जसे स्वतः आणि आपल्या अनुगत सहा गोस्वामींद्वारा श्रीकृष्णाचे जन्मस्थळ आणि अन्यान्य लीलास्थळांना प्रकाशित केले होते, अगदी त्याचप्रमाणे श्रीचैतन्यदेवांच्या जन्मस्थळास आणि अन्यान्य गौरलीला-स्थळांना प्रकाशित केले होते. जर हे महापुरुष जगात आविर्भूत झाले नसते तर श्रीगौरांग महाप्रभूंची लीलास्थळे आणि त्यांचे उपदेश या विश्वातून विलुप्त झाले असते. म्हणून समग्र गौडीय वैष्णव जगत यांचे चिरऋणी आहे आणि पुढेही राहील. हेच कारण आहे की समग्र वैष्णव जगतात त्यांना 'सप्तम' गोस्वामींचा अत्युच्च सन्मान प्रदान केला गेला आहे.

या महापुरुषाने आपल्या जीवनाच्या उच्च आदर्शांद्वारे ज्याप्रकारे लोकशिक्षणाचा प्रचार-प्रसार केला आहे, त्याचप्रकारे भिन्न-भिन्न भाषांतून ग्रंथादी

प्रणयन (निर्माण) करून भरपूर शिक्षण दिले आहे. याव्यतिरिक्त त्यांनी केलेल्या आणखी एका दानाच्या वैशिष्ट्याचा उल्लेख केला नाही तर मादृश जिवाची घोर अकृज्ञताच दिसून येईल. श्रील ठाकूर भक्तिविनोद यांनी समग्र विश्वात श्रीचैतन्यमहाप्रभूंद्वारे प्रकटित धर्म-प्रचारकांचे मूळ सेनापती म्हणून ज्या महापुरुषास या जगतीतलावर आविर्भूत केले आहे, ते मदीय **गुरुपादपद्म जगद्गुरू ॐ विष्णुपाद परमहंसकुल-चूडामणी अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिसिद्धान्त सरस्वती गोस्वामी ठाकुरांच्या** रूपात समग्र विश्वात सुपरिचित आहेत. या महापुरुषास जगात आविर्भूत करविणे–श्रीमद्भक्तिविनोद ठाकुरांची एक अतुलनीय अभिनव कीर्ती आहे. साधु-वैष्णव समाज त्यांना संक्षेपात **'श्रील प्रभुपाद'** असे संबोधून गौरव ज्ञापन (प्रकट) करतात. मी देखील भविष्यात–यापुढे उपरोक्त परममुक्त महापुरुषाच्या नावाच्या स्थळी **'श्रील प्रभुपाद'** असाच उल्लेख करीन.

श्रील प्रभुपादांनी श्रील भक्तिविनोद ठाकुरांच्या पुत्राच्या रूपात वा अन्वय रूपात, एवढेच काय तर पारंपर्य रूपात आविर्भूत होऊन समग्र विश्वात श्रीमन् महाप्रभू श्रीचैतन्यदेवद्वारा आचरित आणि प्रचारित श्रीमाध्व गौडीय वैष्णवधर्माची अत्युज्ज्वल पताका फडकवून धर्मराज्याचे उदंड कल्याण आणि उन्नति-साधन केले आहे. अमेरिका, इंग्लंड, जर्मनी, फ्रांस, स्वीडन, स्वित्झर्लंड आणि ब्रह्मदेश (म्यानमार) आदी सुदूर पश्चिमी आणि पूर्वी देशसमूह देखील या महापुरुषाच्या कृपेपासून वंचित राहिलेले नाहीत. सारे भारतवर्ष आणि भारताबाहेरील साऱ्या विश्वात चौसष्ट प्रचारकेंद्र–गौडीय मठ स्थापन करून श्रीचैतन्यवाणीचा प्रचार केला होता. याबरोबरच त्यांनी श्रीलभक्तिविनोद ठाकुरांच्या समस्त ग्रंथांचा प्रचार करून अखिल जगात अतुलनीय कीर्ती प्रस्थापित केली आहे. काळाच्या प्रभावामुळे अर्थात कलीच्या प्रबलतेमुळे गौडीय वैष्णव धर्मात नाना प्रकारचे असदाचार-कदाचार, असिद्धांत-कुसिद्धांत आदींचा प्रवेश होऊ घातल्यामुळे तेरा अपसंप्रदाय निर्माण झाले होते. हे तेरा अपसंप्रदाय आहेत–

**आउल बाउल कर्त्ताभजा नेडा दर्वेश साईं।**
**सहजिया सखीभेकी स्मार्त जाति गोसाईं॥**
**अतिवाड़ी चूडाधारी गौराङ्गनागरी।**
**तोता कहे ए तेरह संङ्ग नाहि करि॥**

श्रील प्रभुपादद्वारा श्रील भक्तिविनोद ठाकुरांच्या ग्रंथांचा प्रकाश आणि प्रचार झाल्याने पूर्वोक्त असंप्रदायांच्या अपचेष्टांचा प्रचुर मात्रेत ऱ्हास झाला आहे. तरीदेखील खेदजनक बाब अशी की इतके असूनही कलीच्या प्रभावामुळे आहार-विहार आणि 'बाँचा पाडा' अर्थात जीवनविमा (life insurance) हाच काही-काही धर्म-संप्रदायांच्या प्रचाराचा विषय होऊन गेलाय. वास्तविक हे सगळे पशूवृत्तीचेच नामांतर किंवा पाशविक अनुशीलनाचा प्रसारमात्र आहे. आम्ही हे आधीच नमूद केले आहे.

'जैवधर्मा'त पूर्वोक्त तथाकथित कलि-प्रचोदितधर्म–धर्म नाही, धर्माचे स्वरूप काय असते, त्याचा आपल्याशी संबंध काय आहे, धर्माचे पालन केल्याने काय-काय लाभ होतात तथा धर्माचे यथार्थ तात्पर्य काय आहे–आदी सगळ्या विषयांचे अत्यंत सांगोपांग विवेचन प्रस्तुत केले आहे. जवळजवळ ६०० पृष्ठांच्या या छोट्याशा ग्रंथाचा पाठ केल्याने संपूर्ण शास्त्रांचे तात्पर्य अत्यंत संक्षिप्त स्वरूपात जाणले जाऊ शकते. यात प्रश्नोत्तर स्वरूपात विश्वाच्या समस्त धर्मांचे तुलनामूलक परीक्षण केलेले आहे. एका वाक्यातच सांगायचे तर या छोट्याशा ग्रंथात घागरीत सागर असल्याप्रमाणे संपूर्ण भारतीय शास्त्रांचे सार अंतर्भूत आहे. म्हणूनच असे म्हणणे अत्युक्ती ठरणार नाही की कोणत्याही धर्मजीवनात या ग्रंथाचे पठण न केल्याने धर्म-तत्त्वज्ञानाचा त्यात अवश्य अभावच राहील.

या ग्रंथात कोणकोणत्या महत्त्वपूर्ण विषयांचे विवेचन झाले आहे, या विषयी जाणून घेण्याकरिता वाचकवर्गास या ग्रंथाची अनुक्रमणिका पहाण्याची विनंती करत आहे. ग्रंथकाराने शास्त्र-मर्यादांना अखंडित राखत संबंध-अभिधेय-प्रयोजनात्मक-तत्त्वास तीन खंडात प्रकाशित केले आहे. काही अनभिज्ञ लेखकांनी (१) संबंध, (२) अभिधेय आणि (३) प्रयोजन–अशा क्रमाचे उल्लंघन करून सर्वप्रथमच (३) 'प्रयोजन' तत्त्वाचे परीक्षण करून मग (१) 'संबंध', (२) 'अभिधेय'–तत्त्वांचे वर्णन केले आहे, जे वेद, उपनिषद, पुराण, महाभारत आणि विशेषकरून प्रमाण शिरोमणी श्रीमद्भागवत आदींच्या सिद्धांतांच्या सर्वथा प्रतिकूल आहे.

प्रथम खंडात नित्य आणि नैमित्तिक धर्मांचे विश्लेषण आहे, दुसऱ्या खंडात संबंध-अभिधेय-प्रयोजन-तत्त्वांचे दृढ शास्त्रीय प्रमाणांच्या आधारे सांगोपांग वर्णन केलेले आहे तथा तिसऱ्या खंडात रस-विचाराचे मार्मिक विवेचन केलेले आहे. श्रील

प्रभुपादांच्या विचारधारेनुसार जोपर्यंत कुठल्या उन्नत अधिकाराची प्राप्ती होत नाही, तोपर्यंत 'रसविचारा'त प्रवेश करणे उचित नाही. जर कुणी अनधिकारी साधक 'रसविचारा'त प्रवेश करण्याचा अनधिकारी प्रयत्न करेल तर ते त्याच्या हितापेक्षा अहितच अधिक साधेल. श्रील प्रभुपादांनी 'भाई सहजिया', 'प्राकृतरस-शत-दूषणी' तथा अन्योन्य अनेक प्रबंधांमधून हे सगळे सुस्पष्ट रितीने व्यक्त केले आहे. म्हणूनच याविषयी सतर्क राहण्याची आवश्यकता आहे.

मूळ 'जैवधर्म' ग्रंथ बंगाली भाषेत रचलेला आहे. तरीसुद्धा यात शास्त्रीय प्रमाण आदी सम्वलित संस्कृत भाषेचा प्रचुर प्रयोग केलेला आहे. या ग्रंथाची व्यापक लोकप्रियता यामुळेच लक्षात येते की अल्पावधीतच बंगाली भाषेत या ग्रंथाच्या दहा-बारा मोठमोठ्या आवृत्ती प्रकाशित झाल्या आहेत. हिंदी भाषेत अनुवादित जैवधर्माची प्रस्तुत आवृत्ती–श्रीगौडीय वेदान्त समितीद्वारे अभिनव आकारात प्रकाशित जैवधर्माच्या अभिनव आवृत्तीच्या पद्धतीचे अनुसरण करून मुद्रित झालेली आहे. हिंदी पारमार्थिक मासिक–'**श्रीभागवत पत्रिके'चे सुयोग्य संपादक–त्रिदण्डिस्वामी श्रीश्रीमद्भक्ति वेदान्त नारायण महाराजांनी** मोठ्या परिश्रमांनी या ग्रंथाचा हिंदीत अनुवाद करून उक्त पत्रिकेत पहिल्या वर्षापासून सहाव्या वर्षापर्यंत प्रकाशित केला आहे. आता अनेक श्रद्धाळू व्यक्तींच्या वारंवार विनंतीमुळे हिंदी भाषिक धार्मिक जनतेच्या कल्याणार्थ याच खंडांना पुस्तकाकारात प्रकाशित केले गेले. प्रसंगवश मी हे सांगण्यास बाध्य होत आहे की या ग्रंथाचे अनुवादक महोदय हिंदी भाषिक आहेत, बंगाली त्यांची मातृभाषा नाही, तरीदेखील त्यांनी या ग्रंथाचे अनुशीलन (निरंतर अभ्यास) करण्यासाठी बंगाली भाषेचे अध्ययन केले आणि त्यात विशेष अभिज्ञता (ज्ञान) प्राप्त करून कठोर परिश्रम आणि कष्ट स्वीकार करून या ग्रंथाचा हिंदी अनुवाद केला. मला हार्दिक प्रसन्नता होत आहे की या मूळ-ग्रंथातील कठीण दार्शनिक आणि रसविचाराचेच अतिगहन तथा परमोन्नत सूक्ष्म भावांचे यथायोग्य रक्षण केले गेले आहे. **हिंदी जगत या महान कार्याकरिता त्यांचे सदैव कृतज्ञ राहील. विशेषतः श्रील प्रभुपाद आणि श्रील भक्तिविनोद ठाकूर त्यांच्या या अक्लांत (अथक) सेवा कार्याकरिता निश्चितच त्यांच्यावर प्रचुर कृपा करतील.**

आणखीही काही भगवद्भक्तांच्या या ग्रंथाच्या मुद्रण आणि प्रकाशन कार्यातील सहाय्यतेचा आणि सहानुभूतीचा उल्लेख झाला नाही तर माझ्या कर्तव्याची हानीच होईल. यात त्रिदण्डिस्वामी श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त भिक्षू महाराज (नुकतेच ज्यांचे

परलोकगमन झाले आहे), प्रिय कुंजबिहारी ब्रह्मचारी, प्रिय श्रीकृष्णस्वामी दास ब्रह्मचारी, प्रिय शेषशायी ब्रह्मचारी, प्रिय ओमप्रकाश ब्रजवासी 'साहित्यरत्न' आणि पंडित बागरोदी श्रीकृष्णचन्द्र शास्त्री, काव्यतीर्थ यांची नावे विशेष उल्लेखनीय आहेत.

सर्वोपरि माझे वक्तव्य असे आहे की उक्त भक्तजनांचा गौरवपात्र असल्यामुळेच या ग्रंथाच्या संपादनाकरिता माझे नाव स्वीकारले आहे. वास्तविक या ग्रंथाचे अनुवादक आणि प्रकाशक उक्त त्रिदण्डिस्वामी श्रीश्रीभक्तिवेदान्त नारायण महाराज यांनीच संपादनाचे सारे काम सांभाळल्याने ते माझ्या आशीर्वादास विशेष पात्र आहेत.

मला पूर्ण विश्वास वाटतो की एतद्देशीय श्रद्धाळू जनांपासून ते विद्वान मंडळींपर्यंत सगळेच या ग्रंथाचे पठण करून श्रीचैतन्यमहाप्रभूंद्वारे आचरित आणि प्रचारित संबंधाभिधेयप्रयोजन-तत्त्वासंबधीचे ज्ञान प्राप्त करून श्रीश्रीराधाकृष्ण आणि श्रीचैतन्यमहाप्रभूंच्या प्रेमधर्मात अधिकार प्राप्त करू शकतील.

अंततः हे निवेदन आहे की या ग्रंथाचे मुद्रणकार्य अत्यंत शीघ्रतेने झाल्या कारणाने मुद्रण संबंधी काही त्रुटी राहून गेल्या आहेत. परंतु त्या अत्यंत साधारण कोटीच्या (श्रेणीच्या) असल्यामुळे शुद्धी-पत्र दिले नाही. वाचकवर्ग या ग्रंथाचे पठण करून आम्हांस प्रचुर आशीर्वाद प्रदान करतील–हीच प्रार्थना आहे. अलमतिविस्तरेण.

श्रील प्रभुपाद-किंकर त्रिदण्डिभिक्षू
**श्रीभक्तिप्रज्ञान केशव**

**श्रीकेशवजी गौडीय मठ**
पो. मथुरा (उत्तर प्रदेश)
संवत २०२३

# निवेदन

जगद्गुरू ॐ विष्णुपाद श्रील सच्चिदानन्द भक्तिविनोद ठाकुरांद्वारे बंगाली भाषेत लिखित मूळ 'जैवधर्मा'ची तृतीय आवृत्ती प्रकाशित होत आहे. प्रबुद्ध वाचकवृंद काही दिवसांपासून या ग्रंथाचा अभाव विशेष करून अनुभवित होते. या ग्रंथाच्या पुनः प्रकाशनाने हा अभाव दूर झाला आहे. यापूर्वी या ग्रंथाच्या प्रथम आणि द्वितीय आवृत्ती श्रीकेशवजी गौडीय मठ, मथुरेहून त्रिदण्डिस्वामी श्रीमद्भक्तिवेदान्त नारायण महाराज यांच्याद्वारे प्रकाशित झाल्या आहेत.

या बहुप्रचारित ग्रंथाविषयी नवीन काही परिचय देणे आवश्यक नाही, कारण हा ग्रंथ समस्त रूपानुग गौडीय वैष्णवांद्वारे विशेष समादृत (आदरणीय) आहे. गद्य साहित्यामध्ये कथोपकथन (संवाद) शैलीतील या ग्रंथाचे योगदान अतुलनीय आहे. यातील भावगांभीर्य, भाषेचे लालित्य (सौंदर्य), विचार-प्रवाह आणि सर्वोपरि निगूढ दार्शनिक तत्त्वसिद्धांतांनी या ग्रंथास प्राकृत साहित्य लेखकांच्या रचनांपेक्षा संपूर्ण वेगळ्या आणि वैशिष्ट्यपूर्ण श्रेणीत स्थापित केले आहे. आप्राकृत साहित्य रचण्याऱ्या लेखकांचे सम्राट श्रीसच्चिदानन्द भक्तिविनोद ठाकुरांनी या ग्रंथाची रचना करून अप्राकृत साहित्य-जगतात वैकुंठीय-कौस्तुभमणीचा अविष्कार केला आहे–यात तिळमात्र शंका नाही.

आलोच्य (चिंतनीय) मूळग्रंथ बंगाली भाषेत लिखित असूनही याचा हिंदी, इंग्रजी, तामिळ, तेलुगू, ओरिया आदी विविध भाषांमध्ये अनुवाद झालेला आहे; तथा विश्वातील सर्वच देशांतून याचा प्रचुर प्रचार झाला आहे. अतिमर्त्य (दिव्य) महापुरुषांची लेखणी भाषा-विवादापासून सर्वथा वरती उठून अनंत विश्वाच्या कल्याणाच्या कामनेकरिता सतत प्रयत्नशील असते. उदार-नैतिक साधु-संत कुठल्याही भाषेप्रती विद्वेषाची भावना ठेवत नाहीत आणि स्वार्थान्वेषींप्रमाणे प्रादेशिकतेलाही प्रश्रय (आदर, सन्मान) देत नाहीत. श्रीलभक्तिविनोद ठाकुरांनी विभिन्न भाषांतून रचना केल्या आहेत. यामुळे त्यांच्या उदार-नैतिक मनोवृत्तीचाच परिचय होतो. **"जेई भजे सेई बड, अभक्त हीन छार। कृष्ण भजने नाहि जाति कुलादि विचार॥"**–अर्थात जे भजन करतात तेच श्रेष्ठ आहेत. कृष्णभजनात जाति-कुळादीचा कुठलाही विचार नसतो. या सिद्धांत वाणीनुसार सर्व भाषा-भाषिक, जाती, समाज

आणि देशांच्या लोकांना वैष्णव किंवा भक्त होण्याचा अधिकार आहे–हे सर्वच सनातन शास्त्रांमध्ये सर्वतोभावेन स्वीकृत आहे. म्हणून प्राकृत भाषा, प्रादेशिकता, जाती-कुलादी विचाराद्वारे वैष्णवता अथवा भक्तभावाचे पार्थक्य (भक्तभावाची विभागणी) होत नाही.

हा ग्रंथ मानवमात्रांकरिता विशेष हृदयग्राही आणि उपयोगी आहे. यातील भाव अत्यंत गंभीर आणि भाषा खूपच सरळ आणि आकर्षक आहे. 'जैवधर्मा'च्या विचारधारेस अनुसरूनच 'श्रीचैतन्य-शिक्षामृत' आणि 'श्रीमन् महाप्रभूंची शिकवण' आदी बरेचसे ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. विभिन्न भाषांतून या ग्रंथाचे झालेले अनुवाद हेच याच्या लोकप्रियतेचे यथेष्ट प्रमाण आहे.

जैवधर्म ग्रंथात वर्णित 'धर्म' साधारण लोकांच्या प्राकृत धारणेपासून सर्वथा भिन्न आहे. देह आणि मनाचा प्राकृत धर्म कदापि आत्मधर्माच्या स्थानी प्रतिष्ठित होऊ शकत नाही. आत्मधर्म वा सनातन धर्माचेच दुसरे नाव जैवधर्म आहे. श्रील भक्तिविनोद ठाकुरांनी जीवमात्रास (प्रत्येक जिवास) हेच समजावण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांनी कुकर्मी, कुज्ञानी, आणि कुयोगींचे अधर्म, छलधर्म (कपटधर्म), विधर्म यांच्यासोबत तुलना-मूलक आलोचनेद्वारे (परीक्षणाद्वारे) सनातन धर्माची वैशिष्ट्ये स्थापित केली आहेत. त्यांनी वेद-वेदान्त, उपनिषद, गीता, भागवतादी शास्त्रांची निगूढ रहस्ये आणि गौडीय-गोस्वामी-गुरुवर्गाचे गुरु-गंभीर दार्शनिक तत्त्व सिद्धांतांना ज्या प्रकारे अत्यंत सहज-सरळ, प्रांजल भाषेत प्रकाशित केले आहे, त्यामुळे त्यांचे अतिमर्त्य चरित्र (व्यक्तित्व) आणि नित्य सिद्धत्वाचा पूर्णपणे परिचय प्राप्त होतो.

या ग्रंथात चाळीस अध्याय आहेत. संपूर्ण ग्रंथ तीन भागांमध्ये विभागला आहे–नित्य आणि नैमित्तिक धर्ममूलक पहिला खण्ड, संबंध-अभिधेय-प्रयोजनमूलक दुसरा खण्ड आणि रसविचारमूलक तिसरा खण्ड. प्रथम खंडात वर्णाश्रमधर्माचे विवेचन आहे. दुसऱ्या खंडात दशमूल-शिक्षणाचे विस्तृत रूपाने वर्णन आहे, जो वैष्णव-सिद्धांत मालेचा मध्यमणी स्वरूप आहे. तिसऱ्या खंडात अप्राकृत भाव-विभावित परम रसिकांचा विषय–रसविचार आहे.

पहिला खण्ड वर्णाश्रमधर्ममूलक आहे. दुसरा खण्ड श्रीभक्तिरसामृतसिन्धू, षट्सन्दर्भ आणि श्रीचैतन्यचरितामृत ग्रंथाचे सार-संकलन आणि अखिल शास्त्रांचे

निर्यास-स्वरूप आहे. सर्व शास्त्रांमध्ये संबंध-अभिधेय आणि प्रयोजनात्मक तत्त्वविचार यांचीच प्रतिष्ठा आहे. श्रील भक्तिविनोद ठाकुरांनी जैवधर्मात कर्म, ज्ञान, योगादी क्लिष्ट साधनांच्या तुच्छतेस प्रदर्शित केले आहे आणि प्रसंग क्रमाने निर्विशेष, केवलाद्वैत ब्रह्मवाद (मायावाद) यांचे खंडन ज्याप्रकारे केले आहे, त्यामुळे विशुद्ध दार्शनिक (दर्शन-विषयक) जगत त्यांना चिरदिन कृतज्ञतापूर्वक स्मरण करीत राहील. त्यांनी श्रद्धा आणि भक्तिविना कर्म-ज्ञानादी सर्व साधनांना निष्फळ प्रमाणित केले आहे. त्याचबरोबर नामब्रह्माच्या आराधनेसच शास्त्रीय-युक्ती आणि प्रमाणांद्वारे सर्वश्रेष्ठ भजनांगाच्या रूपात स्थापित केले आहे.

श्रीभक्तिविनोद ठाकुरांनी भक्तिसाधकांच्या कल्याणाकरिता दशमूल शिक्षणाच्या अभिनव-पद्धतीचा अविष्कार केला आहे आणि म्हणून 'शिक्षा दशमूलम्' नावाच्या ग्रंथाची रचना देखील केली आहे. श्रीलचक्रवर्ती चरणांनी श्रीचैतन्यमहाप्रभूंच्या शिकवणुकीचे सार **"आराध्यो भगवान्"** श्लोकात लिपीबद्ध केलेले आहे. गौडीय वेदान्ताचार्य श्रीबलदेव विद्याभूषण प्रभूंनी मध्वसंप्रदायासोबत श्रीगौडीय-वैष्णव संप्रदायाच्या विचारांची समानता प्रदर्शित करण्याकरिता 'प्रमेय रत्नावली'त 'श्रीमध्वप्राह' श्लोकाची अवतारणा केली आहे. अशाप्रकारे श्रीभक्तिविनोद ठाकुरांनी उपर्युक्त दोन्ही प्रसिद्ध श्लोकगत सिद्धांतांचे सामंजस्य करीत दशमूलाच्या रचनेद्वारे गौडीय वैष्णव सिद्धांतांचे मंथन करण्याचा प्रयत्न केला आहे. पुनः **"आम्नायः प्राह तत्त्वम्"** एकाच श्लोकात 'दशमूलनिर्यास' संग्रहपूर्वक सुधी-सज्जनांमध्ये (विद्वान सत्पुरुषांमध्ये) वितरण केले आहे. अशाप्रकारे संबंध-अभिधेय-प्रयोजनात्मक हा ग्रंथ श्रीचैतन्यमहाप्रभूंच्या उपदेशांचे सार आणि श्रीगौडीय-वैष्णवांकरिता कंठहार स्वरूप आहे. रसविचारमूलक तिसऱ्या खंडासोबत संपूर्ण जैवधर्म ग्रंथाची हिंदी आवृत्ती प्रथम प्रकाशित झालेली आहे. यद्यपि श्रीगौडीय वेदान्त समितीद्वारे बंगाली भाषेमध्ये याच्या कतिपय (अनेक) आवृत्तींमध्ये केवळ प्रथम आणि द्वितीय खण्ड मुद्रित झालेले आहेत. संप्रती (सध्या) रसविचारमूलक तृतीय खण्ड बंगाक्षरात प्रकाशित झाल्यावर पृथक् (निराळ्या) स्वरूपात तथा एकत्रदेखील अधिकारी वाचकांमध्ये वितरित झाला आहे. परमाराध्य श्रील गुरुदेवांनी उपरोक्त ग्रंथाची प्रथम प्रस्तावना लिहिली आहे– श्रील प्रभुपादांच्या विचारधारेनुसार भजनात थोडा उन्नत अधिकार प्राप्त झाल्याशिवाय रसविचारात प्रवेश करणे योग्य नाही. श्रील प्रभुपादांनी 'भाई सहजिया', 'प्राकृतरस-शतदूषणी' आणि अन्यान्य अनेक प्रबंधांतून यास सुंदर रूपात व्यक्त केले आहे.

तरीदेखील आजपर्यंत अनधिकारी व्यक्तींच्या हातात रसविचार एकत्रित असा हा जैवधर्म ग्रंथ दिला जात आहे. हे श्रील प्रभुपादांच्या विचारधारेस अनुकूल नाही. रसविचारमूलक तृतीय खंडास आम्ही अनधिकारी साधारण लोकांच्या हाती अर्पण करू इच्छित नाही.

उपर्युक्त निषेधाज्ञेच्या स्वपक्षात आणि विपक्षात अनेकानेक युक्तींची अवतारणा केली जाऊ शकते. यापूर्वी श्रीकेशवजी गौडीय मठ, मथुरेहून त्रिदण्डिस्वामी भक्तिवेदान्त नारायण महाराज यांच्याद्वारा संपूर्ण ग्रंथच प्रकाशित झालेला आहे. परंतु त्यांनी आपल्या प्रकाशकीय वक्तव्यात याविषयी कुठलेही मत व्यक्त केलेले नाही. असे असू शकते की त्यांनी आपल्या परमाराध्यदेवांचा इंगित (अंतस्थ उद्देश) आणि निर्देश प्राप्त करूनच असे केले असावे. मी व्यक्तिशः श्रील गुरुपादपद्मांच्या निषेधात्मक उद्देश्य आणि तात्पर्यांबाबत वाचक वर्गास एक-दोन युक्तींद्वारे काही सांगू इच्छितो.

परमाराध्य श्रीश्रील गुरुपादपद्मांनी आपल्या श्रीगुरुदेव श्रीश्रील सरस्वती प्रभुपादांच्या विचारधारेनुसार साधन-भजनाविषयी अधिकार निर्णयावर अधिक जोर दिला आहे. साधन-भजनात जोपर्यंत उन्नत अधिकार प्राप्त होत नाही तोपर्यंत रसविचारात प्रवेश करणे कुठल्याही साधकाकरिता अनुचित आहे. शास्त्रांचा असाच निर्देश आहे. सर्व शास्त्र संबंध, अभिधेय, प्रयोजनात्मक आणि विधी-निषेधमूलक आहेत. साधू, गुरू आणि वैष्णवाचार्यगण शास्त्रीय विधी-निषेधांचे यथोचित पालन करीत शास्त्रांच्या यथार्थ मर्यादा स्थापन करतात. ते आपल्या दिव्य जीवनचरित्राद्वारे भजन क्षेत्रात यथार्थ रूपाने मार्गदर्शन करीत असतात. साधकजन त्यांचे मार्ग अनुसरण करून कृतार्थ होतात. **"ततोदुःसंगमुत्सृज्य सत्सुसज्जेत बुद्धिमान "** हाच भागवतीय नियम आणि निषेध आहे. पुनः **"स्मर्तव्यो भगवान् विष्णु विस्मर्तव्यो नजानुचित्"**–यालादेखील अन्वय आणि व्यतिरेक रूपात मूलविधी आणि मूलनिषेध म्हटले गेले आहे. भक्तीच्या प्रतिकूल असणारे विषय व्यर्ज आहेत आणि भक्तीच्या अनुकूल असणारे विषय सर्वतोभावेन ग्राह्य आहेत. षडंग शरणागतीमध्ये हेच प्रतिपादित केलेले आहे.

श्रीगुरुपादपद्म अनधिकारी व्यक्तींच्या हातात रसविचारयुक्त तृतीय खण्ड देऊ इच्छित नव्हते. अनधिकार रस-चर्चा करणाऱ्यांना ते 'उन्मार्ग-गामी' आणि

इचडेपाका (कच्चा नीरस सुकलेला फणस) 'प्राकृत सहजिया' म्हणत असत. या लोकांना उन्नतोज्ज्वल माधुर्यरसाच्या भजनात अधिकार नाही आहे. हे लोक रूपानुगभजन प्रणाली वा चिंतन-धारेपासून भ्रष्ट (भटकले) आहेत. त्यांची सतत्त्वानभिज्ञता उच्छृंखलतेचाच परिचायक आहे. श्रीचैतन्य महाप्रभूंच्या शिकवणूकीचा प्रचार करणे म्हणजेच कीर्तन होय–या मर्माची त्यांना जाणीव नसते.

साधन-भजनात ज्याप्रमाणे अधिकाराचा विचार स्वीकृत आहे, भक्ति-शास्त्रादी परीक्षणातही देखील अधिकारी-अनधिकारी असा विचार निर्दिष्ट आहे. कृष्णद्वैपायन वेदव्यासांनी श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधातील रासपंचाध्यायीच्या प्रारंभी आणि शेवटी त्याचे अनुशीलन करणाऱ्या अधिकारी-अनधिकारींचा विचार केला आहे. **"विक्रीडितं व्रजवधुभिः"** आदी श्लोकांमध्ये अधिकारी आणि **"नैतत् समाचरेज्जातु"** आदी श्लोकांमध्ये अनधिकाऱ्याचा निर्देश दिलेला आहे. अनधिकाऱ्याकरिता निषेधाज्ञा असूनही यथार्थ अधिकाऱ्याच्या अधिकार, क्षमता आणि सामर्थ्याची गोष्ट शास्त्रांत सर्वत्रच स्वीकृत आहे. श्रील गुरुपादपद्मांच्या युक्तीत यथार्थ अधिकारी व्यक्तीच्या अधिकाराला थोडेदेखील खर्व (कुंठित) केलेले नाही. साधन भजनात उन्नत अधिकार प्राप्त करणारे साधारण विधी-निषेधांचे अतिक्रमण करून अप्राकृत रसमार्गात प्रवेश करतात तथा क्रमशः प्रेम-भक्ती प्राप्त करून धन्यातिधन्य होतात. म्हणूनच अधिकारी साधकजन अप्राकृत मधुररस विचारमूलक विभागाचे अनुशीलन करून प्रीती प्राप्त करोत, हेच श्रील गुरुपादपद्मांच्या उक्तीचे तात्पर्य समजले जावे.

या ग्रंथाच्या मुद्रण कार्यातील अत्यंत शीघ्रतेमुळे काही त्रुटी राहून गेल्याची संभावना आहे. समंजस वाचकवृन्दाद्वारा त्यांचे संशोधनपूर्वक पठण झाल्यास मी आनंदित होईन. अलमतिविस्तरेण

**श्रीगौडीय वेदान्त समिती**
श्रीश्रीगुरुपादपद्मांची ९२वी अविर्भाव तिथीपूजावासर,
सोमवार, २९ माघ, १२ फेब्रुवारी, १९९०

श्रीगुरू-वैष्णव दासानुदास त्रिदण्डिभिक्षू
**श्रीभक्तिवेदान्त वामन**

# प्रकाशकीय वक्तव्य

आज जैवधर्माची तृतीय हिंदी आवृत्ती वाचकांसमोर प्रस्तुत करतांना मला अपार हर्ष होत आहे. या ग्रंथाच्या प्रकाशनामुळे माझी चिरकाळाची अभिलाषा पूर्ण होत आहे. राष्ट्रभाषा हिंदीत या ग्रंथाचा अभाव मला खूपच खटकत होता.

मूळ 'जैवधर्म' बंगाली भाषेत आहे. बंगाली भाषिक प्रत्येक वैष्णवाच्या गळ्याचा हा हार आहे. याचे लेखक आहेत–वर्तमान वैष्णव जगात स्वयं-भगवान श्रीचैतन्यमहाप्रभूंद्वारे प्रकटित विशुद्ध भक्ति-भागीरथीच्या पवित्र धारेस पुनः प्रबल वेगाने प्रवाहित करणारे, विभिन्न भाषांतून भक्तिसंबंधी शेकडो ग्रंथ रचणारे, श्रीचैतन्य महाप्रभूंचे पार्षदप्रवर, सप्तम गोस्वामी श्रील भक्तिविनोद ठाकूर. या 'जैवधर्म' ग्रंथाने दार्शनिक आणि धार्मिक जगतात युगांतर उपस्थित केले आहे (युगबदल घडवला आहे).

श्रीब्रह्म-मध्व-गौडीय संप्रदायाचे वर्तमान संरक्षक, श्रीश्रीभक्तिविनोद-गौरकिशोर-सरस्वतींचे मनोभीष्टपूरक, श्रीचैतन्य महाप्रभूंच्या परंपरेत दशम आचार्यकेसरी, श्रीगौडीय वेदान्त समिती आणि त्यांच्या अधीनस्थ भारतव्यापी शाखा-गौडीय मठांचे संस्थापक आणि नियामक आचार्यवर, मदीय परमाराध्यतम श्रीश्रीगुरुपादपद्म ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्री श्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराजांच्या अहैतुकी असीम अनुकंपा, प्रेरणा आणि साक्षात आदेशामुळेच मी सर्वविषयांत अयोग्य आणि असमर्थ असूनही या कठीण दार्शनिक आणि गूढ उपासना-तत्त्वाने परिपूर्ण ग्रंथाचा अनुवाद करू शकलो.

या अनुवादात मी मूळ ग्रंथाच्या उच्चतम दार्शनिक आणि रसविचाराच्या अती गहन सूक्ष्मतम भावांचे यथासाध्य रक्षण करण्याचा प्रयत्न केला आहे; त्याचबरोबर त्यांना सहज-सरल आणि सुबोध रूपात व्यक्त करण्याचा भरपूर प्रयास केला आहे. या विषयात किती सफल ठरलो आहे, याविषयी तर वाचकगणच सांगू शकतील. असो, या सगळ्यांचे श्रेय श्रीश्रीगुरुपादपद्मांचेच आहे.

सर्वप्रथम हा अनुवाद 'श्रीभागवत पत्रिका' या मासिकात प्रथम वर्षापासून सहाव्या वर्षापर्यंत क्रमशः प्रकाशित करण्यात आला. श्रद्धाळू वाचकांनी याला खूपच पसंत केले तथा त्यांस वेगळ्या ग्रंथाकारात प्रकाशित करण्याकरिता मला वारंवार

विनंती केली. फलस्वरूप संपूर्ण हिंदीभाषी श्रद्धाळू जनतेच्या कल्याणार्थ तथा शुद्ध भक्तांच्या आनंद विधानार्थ अल्प काळातच द्वितीय आवृत्ती समाप्त झाल्यावर वाचकांची गहन रुची आणि मागणी पूर्ण करण्याकरिता ही तृतीय आवृत्ती वाचकांसमक्ष प्रस्तुत केली गेली.

यद्यपि मदीय परमाराध्यतम श्रीश्रीआचार्य देवांनी आपल्या संपादकीय–'प्रस्तावने'त ग्रंथ आणि ग्रंथकाराची वैशिष्ट्ये आणि परिचय आदी सर्व महत्त्वपूर्ण विषयांवर सविस्तरपणे प्रकाश टाकला आहे, तथापि मला देखील या विषयी दोन शब्द लिहिण्याचा मोह अनावर होत आहे. मी वाचकांना ग्रंथ वाचण्यापूर्वी पूर्व 'प्रस्तावने'स मनोनिवेशपूर्वक वाचण्याची विनंती करतो. त्याद्वारा वाचकांना परमार्थ-तत्त्वात प्रवेश करण्याकरिता एक सुंदर दिशा प्राप्त होऊ शकेल– असा माझा दृढ विश्वास आहे.

'जैवधर्म' म्हणजेच जिवासंबंधीचा धर्म किंवा जिवाचा धर्म असा बोध होतो. बाह्यदृष्टीने विभिन्न देशांतील भिन्न जातींच्या आणि विभिन्न वर्गांच्या मनुष्यांचा, पशू-पक्षांचा, कीटक-पतंगांचा तथा दुसऱ्या विभिन्न प्राण्यांचा धर्म भिन्न-भिन्न दृष्टिगोचर होऊनही अखिल ब्रह्मांडातील निखिल जीव-समूहांचा नित्य आणि सनातन-धर्म एकच आहे. जैवधर्म ग्रंथात याच सार्वत्रिक, सार्वकालिक तथा सार्वजनिक नित्य-धर्म–'जैवधर्माचे' हृदयग्राही सांगोपांग वर्णन आहे. यात वेद, वेदान्त, उपनिषद, श्रीमद्भागवत आदी पुराण, ब्रह्मसूत्र, महाभारत, इतिहास, पंचरात्र, षट्सन्दर्भ, श्रीचैतन्यचरितामृत, भक्तिरसामृतसिन्धू आणि उज्ज्वलनीलमणी आदी सद्ग्रथांच्या अतिशय गंभीर आणि गहन विषयांचे सार सरस, सरल कथोपकथन शैलीत घागरीत सागराप्रमाणे भरलेले आहे.

या ग्रंथात संबंध, अभिधेय आणि प्रयोजनरूपात ग्रथित भगवत्तत्त्व, जीवतत्त्व, शक्तितत्त्व, जिवाची बद्ध आणि मुक्त दशा, कर्म, ज्ञान आणि भक्तीचे स्वरूप व तुलनात्मक विचार, वैधी-रागानुगा भक्तीचे सिद्धांतपूर्ण सरस विचार-वैशिष्ट्य तथा श्रीनाम-भजनाची सर्वश्रेष्ठता आदी विषयांचे अपूर्व मार्मिक विवेचन आहे.

यद्यपि श्रीगौडीय वेदान्त समितीद्वारा प्रकाशित जैवधर्म ग्रंथाच्या बंगाली आवृत्ती आधी स्वयं ग्रंथकार, श्रीश्रीमद्भक्तिसिद्धांत सरस्वती 'प्रभुपाद' तथा त्यांच्या परंपरागत परवर्ती गौडीय वैष्णवाचार्यांद्वारा प्रकाशित सर्व आवृत्तींमध्ये रस-विचार

सहित संपूर्ण ग्रंथच प्रकाशित झाले आहेत. परंतु अस्मदीय परमाराध्यतम श्रील गुरुपादपद्म यांनी काही विशेष परिस्थितींमध्येच या ग्रंथाचे नित्य-नैमित्तिक धर्म विचारमूलक प्रथम खण्ड तथा संबंध-अभिधेय-प्रयोजनात्मक द्वितीय खण्ड यांना एकत्रितपणे प्रकाशित केले होते; रसविचारमूलक तृतीय खंडास प्रकाशित केले नव्हते. परंतु परवर्तीकाळात श्रीकेशवजी गौडीय मठ, मथुरेची हिंदी आवृत्ती प्रकाशित होतांना श्रील गुरुपादपद्मांनी संपूर्ण ग्रंथाचे संपादन केले. त्यांनी उक्त आवृत्तीच्या स्वलिखित प्रस्तावनेत अतिशय स्पष्टपणे रसविचार सहित तृतीय खंडाच्या संबंधात वाचकांना अधिकारी-अनधिकारी याविषयी विचार करून सतर्क राहून अनुशीलन करण्याचा आदेश केला आहे. म्हणूनच मला द्वितीय आवृत्तीत संपूर्ण ग्रंथाचे एकत्रित प्रकाशन झाल्यावर स्पष्टीकरण प्रस्तुत करण्याची कोणतीही आवश्यकता भासली नाही.

श्रीचैतन्यचरितामृताची रचना करतांना रसविचाराचा प्रसंग उपस्थित झाल्यावर श्रीकृष्णदास कविराज गोस्वामींच्या हृदयात देखील ही शंका उत्पन्न झाली होती की रसविचारास यात सम्मिलित करावे अथवा नये; कारण ते वाचून अनधिकारी व्यक्तींचे अहित होऊ नये; परंतु तत्क्षणीच त्यांनी रसविचार प्रदान करण्याचा निश्चय केला–

**ये सब सिद्धान्त गूढ कहिते न जुयाय।**
**ना कहिले, केह इहार अन्त नाहि पाय॥**

**अतएव कहि किछु करिया निगूढ।**
**बुझिबे रसिक भक्त ना बूझिबे मूढ॥**

**ए सब सिद्धान्त हय आम्रेर पल्लव।**
**भक्तगण–कोकिलेर सर्वदा वल्लभ।।**

**अभक्त उष्टेर इथे ना हय प्रवेश।**
**तबे चित्ते हय मोर आनन्द विशेष॥**

(चै.च.आ. ४/२३१-२३५)

अर्थात सर्वसाधारण जनांजवळ निगूढ व्रजरसाचा प्रकाश करणे सर्वदा अनुचित आहे; परंतु याचा सर्वथा प्रकाश न केल्याने हा रहस्यपूर्ण विषय सर्वथा लुप्त

होण्याची संभावना आहे. निंब आणि आंब्याची झाडे एकाच बागेत लावली तरी कावळे मात्र बरोबर निंबाच्या झाडावर बसून निंबोण्यांचा आस्वाद घेतात; आणि रसिक कोकिळा मात्र आंब्याच्या वृक्षावर बसून मधुर आम्रपल्लव आणि मधुर मंजिरींचाच (आंबे मोहोराचा) आस्वादन करते. म्हणून रसविचार देणेच योग्य आहे.

हिंदी जगतात आत्तापर्यंत वैष्णव-धर्माच्या परमोच्च दार्शनिक सिद्धांतांचा आणि सर्वोत्कृष्ट उपासना पद्धतीचा तुलनात्मक बोध करविणाऱ्या अशा अपूर्व सुंदर आणि सर्वांगपूर्ण ग्रंथाचा अभावच होता. 'जैवधर्म' हिंदी जगातील या अभावाची पूर्तता करून दार्शनिक आणि धार्मिक जगतात विशेषतः वैष्णव जगात युगांतर उपस्थित करेल, यात शंकाच नाही.

प्रस्तुत आवृत्तीची प्रतिलिपी (नक्कल) प्रस्तुत करणे, प्रूफ संशोधन आदी विविध सेवा कार्यासाठी श्रीओमप्रकाश व्रजवासी, स्नेहास्पद श्रीमान शुभानन्द ब्रह्मचारी, श्रीमान प्रेमानन्द ब्रह्मचारी, श्रीमान नवीनकृष्ण ब्रह्मचारी, श्रीमान सुधन्व ब्रह्मचारी, श्रीमान कृष्णचन्द्र ब्रह्मचारी, श्रीमान अनंग मोहन ब्रह्मचारी, श्रीमान शुभकृष्ण ब्रह्मचारी आणि याच्या पूर्ण आर्थिक सेवेसाठी श्रीमान कृष्ण गोविन्द ब्रह्मचारी आदींचे प्रयत्न विशेष स्तुत्य आणि उल्लेखयोग्य आहेत. श्रीश्रीगुरुगौरांग-गान्धर्विका-गिरिधारी या सर्वांवर प्रचुर कृपा आशीर्वादाचा वर्षाव करोत—ही त्यांच्या श्रीचरणी प्रार्थना आहे.

या ग्रंथात जर कोणती चूक दृष्टिगोचर झाल्यास पारमार्थिक वाचकगण निजगुणांनी क्षमा करतील आणि संशोधन करून ग्रंथाचे सार ग्रहण करून उपकृत करतील.

**श्रीकेशवजी गौडीय मठ**
पो. मथुरा (उत्तर प्रदेश)
संवत २०४६

श्रीश्रीगुरु-वैष्णव-कृपालेश प्रार्थी त्रिदण्डिभिक्षु
**श्रीभक्तिवेदान्त नारायण**

# पाचव्या आवृत्तीचे संपादकीय वक्तव्य

श्रीश्रीगुरु-गौरांग आणि श्रीश्रीराधाविनोदविहारींच्या असीम कृपेने हिंदी जैवधर्माची पाचवी आवृत्ती वाचकांसमक्ष प्रस्तुत करताना अपार हर्ष होत आहे. अल्प वेळेतच या ग्रंथाची चौथी आवृत्ती संपणे, हे याच्या अत्यंत लोकप्रियतेचे प्रमाण आहे. विशेषतः विश्वातील सर्व प्रमुख भाषांमध्ये याचे रूपांतर होत आहे आणि सर्वत्र प्रचार होत आहे, हेपण याच्या लोकप्रियतेचे प्रमाण आहे. चतुर्थ आवृत्तीतील चुका सुधारून, कम्प्युटर द्वारा कंपोजिंग करून ही नवी आवृत्ती आकर्षक व सुंदर रूपात छापली जात आहे. आशा आहे हा ग्रंथ दर्शन आणि भजन राज्यात आलेल्या अभिनव अभावाची पूर्ती करून वाचकांचे कल्याण करेल.

प्रस्तुत आवृत्तीचे प्रुफ संशोधन आदी विविध सेवा कार्यांसाठी श्रीमद्भक्तिवेदान्त माधव महाराज, श्रीमान उत्तम कृष्ण ब्रह्मचारी, पुत्री कृष्णवल्लभा दासी आणि पुत्री शान्ती दासी आदींचे सेवा प्रयत्न अत्यंत प्रशंसनीय आहेत. श्रीश्रीगुरु-गौरांग-गान्धर्विका-गिरिधारी या सर्वांवर प्रचुर कृपा आशीर्वाद वर्षण करोत–हीच त्यांच्या श्रीचरणी प्रार्थना आहे.

या ग्रंथात जर कोणती चूक दृष्टिगोचर झाल्यास पारमार्थिक वाचकगण निजगुणांनी क्षमा करतील आणि संशोधन करून ग्रंथाचा सार ग्रहण करून उपकृत करतील. अलमतिविस्तरेण.

श्रीललिता सप्तमी — श्रीश्रीगुरु-वैष्णव-कृपालेश प्रार्थी त्रिदण्डिभिक्षू
श्रीचैतन्याब्द ५२२ — **श्रीभक्तिवेदान्त नारायण**
७ सप्टेंबर, २००८

# पहिल्या मराठी आवृत्तीचे संपादकीय वक्तव्य

श्रीश्रीगुरु-गौरांग आणि श्रीश्रीराधाविनोदविहारींच्या असीम कृपेने जैवधर्माची पहिली मराठी आवृत्ती वाचकांसमक्ष प्रस्तुत करताना अपार हर्ष होत आहे.

प्रस्तुत आवृत्तीचा अनुवाद, प्रुफ संशोधन, सॉफ्वेअर, रंगचित्रे, छायाचित्रे आदी विविध सेवा कार्यांसाठी श्रीमद्भक्तिवेदान्त विष्णुदैवत महाराज, श्रीमती श्यामराणी दासी, श्रीमती अनिता दासी, श्रीमती यशोदा दासी (माया बनकर करकेरा), श्रीमती केतकी जोशी, श्रीमती अपर्णा सिन्हा, श्रीमती शुभदा धांडे, श्रीमान अतुल गोयल, श्रीमान जगदीप दांगी, श्रीमान अच्युत कृष्ण प्रभू, श्रीमान भगवतिकान्त प्रभू, श्रीमान वेंकटरमण, श्रीमान सुकुमार प्रभू, श्रीमान नारायण बाबा, भक्तिवेदान्त बुक ट्रस्ट आदींचे सेवा प्रयत्न अत्यंत प्रशंसनीय आहेत. श्रीश्रीगुरु-गौरांग-गान्धर्विका-गिरिधारी या सर्वांवर प्रचुर कृपा आशीर्वाद वर्षण करोत–हीच त्यांच्या श्रीचरणी प्रार्थना आहे.

श्रीमान शुकदेव दास, श्रीमान अमलकृष्ण दास, श्रीमती विचित्री दासी, श्रीमान वासुदेव दास (सी. ए.), श्रीमती राधाप्रिया दासी, श्रीमान कृष्णकांत प्रभू, श्रीमती अनुराधा दासी आदी भक्तांनी यांनी ग्रंथ प्रकाशनासाठी आर्थिक सहयोग दिला आहे. या सर्व भक्तांची सेवा व विशेष प्रयत्न स्तुत्य आणि विशेष उल्लेख योग्य आहेत.

या ग्रंथात जर कोणती चूक दृष्टिगोचर झाली तर पारमार्थिक वाचकगण निजगुणांनी क्षमा करतील आणि संशोधन करून ग्रंथाचे सार ग्रहण करून उपकृत करतील. अलमतिविस्तरेण.

श्रीश्री जगन्नाथ देवांची रथयात्रा. श्रील स्वरूप दामोदर आणि श्रीशिवानन्द यांचा तिरोभाव. १८ जुलै, २०१५

श्रीश्रीगुरु-वैष्णव-कृपालेश प्रार्थी
त्रिदण्डिभिक्षू
**श्रीभक्तिवेदान्त दण्डी**

# सांकेतिक चिन्हांची अनुक्रमणिका

**अ.**–अध्याय

**अनु.**–अनुच्छेद

**ईश.**–ईशोपनिषद्

**उ. नी.**–उज्ज्वलनीलमणी

**ऐत. उ.**–ऐतरेयोपनिषद्

**कठ. उ.**–कठोपनिषद्

**के. उ.**–केनोपनिषद्

**गीता**–श्रीमद्भगवद्गीता

**गीतोपनिषद्**–श्रीमद्भगवद्गीता

**चै. च. अ.**–श्रीचैतन्यचरितामृत अंत्यलीला

**चै. च. आ.**–श्रीचैतन्यचरितामृत आदिलीला

**चै. च. म.**–श्रीचैतन्यचरितामृत मध्यलीला

**चै. भा. आ.**–श्रीचैतन्यभागवत आदिखण्ड

**छा. उ.**–छांदोग्योपनिषद्

**तै.**–तैत्तिरीयोपनिषद्

**तै. आ.**–तैत्तिरीयोपनिषद् आनन्दवल्ली

**तै. ब्र.**–तैत्तिरीय ब्रह्मानन्दवल्ली

**तै. भृगु.**–तैत्तिरीय भृगवल्ली

**द. वि.**–दक्षिण विभाग

**दशमूल**–दशमूल शिक्षा

**ना. पं.**–नारदपंचरात्र

**बृ. उ.**–बृहदारण्यकोपनिषद्

**बृ. पु.**–बृहन्नारदीयपुराण

**ब्र. सं.**–ब्रह्मसंहिता

**भ. र. सि.**–भक्तिरसामृतसिन्धू

**भी. प.**–भीष्म पर्व

**म.**–मन्त्र

**मा. उ.**–माण्डूक्योपनिषद्

**मु. उ.**–मुण्डकोपनिषद्

**यजु.**–यजुर्वेद

**वि. पु.**–विष्णुपुराण

**श्रीमद्भा.**–श्रीमद्भागवत

**श्वे. उ.**–श्वेताश्वतरोपनिषद्

**ह. भ. वि.**–हरिभक्तिविलास



ॐ विष्णुपाद श्रील सच्चिदानन्द भक्तिविनोद ठाकूर



ॐ विष्णुपाद परमहंस श्रील गौरकिशोर दास बाबाजी महाराज



ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिसिद्धान्त सरस्वती ठाकूर 'प्रभुपाद '



ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिप्रज्ञान केशव गोस्वामी महाराज

# श्री गुरुपरंपरा



ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त
स्वामी महाराज



ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त
वामन गोस्वामी महाराज



ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त
त्रिविक्रम गोस्वामी महाराज



ॐ विष्णुपाद अष्टोत्तरशत श्रीश्रीमद्भक्तिवेदान्त
नारायण गोस्वामी महाराज

**श्री गुरुपरंपरा**



श्रील रघुनाथदास बाबाजी
ब्रजनाथ आणि विजयकुमार यांना
दशमूलाची शिकवण देताना



श्रील गोपालगुरू गोस्वामी
ब्रजनाथ आणि विजयकुमार यांना
रस तत्त्वाची शिकवण देताना

श्री गोद्रुमचन्द्राय नमः

# जैवधर्म

## नित्य आणि नैमित्तिक धर्ममूलक प्रथम खण्ड

## पहिला अध्याय (जिवाचा नित्य आणि नैमित्तिक धर्म)

या पृथ्वीवर जम्बूद्वीप श्रेष्ठ आहे. जम्बूद्वीपातही भारतवर्ष प्रधान आहे. भारतात गौडभूमी सर्वोत्तम आहे. गौडभूमीत श्रीनवद्वीप मंडळ परम उत्कृष्ट आहे. याच श्रीनवद्वीप मंडळातील एका स्थानी भागीरथीच्या किनारी श्रीगोद्रुम नामक रमणीय जनपद् नित्य विराजमान आहे. प्राचीनकाळी श्रीगोद्रुमच्या उपवनात अनेक भजनानंदी पुरुष ठिकठिकाणी निवास करीत असत. कधी काळी तेथेच श्रीसुरभीने आपल्या लता-मंडपात भगवान श्रीगौरचन्द्रांची आराधना केली होती. तिथूनच काही अंतरावर प्रद्युम्न कुंज नामक एक भजन कुटी होती. तेथे सघन लतांमध्ये झाकलेली एक कुटी होती, त्यात श्रीप्रेमदास परमहंस नामक बाबाजी रहात असत. ते श्रीभगवत्-पार्षद् प्रवर प्रद्युम्न ब्रह्मचारींचे शिक्षा-शिष्य होते. बाबाजी निरंतर भजनानंदात मस्त होऊन आपला वेळ व्यतीत करीत असत.

श्रीप्रेमदास बाबाजी सर्व शास्त्रांचे पंडित असूनही नन्दग्रामापासून अभिन्न तत्त्व जाणून श्रीगोद्रुम वनात एकांत मनाने तेथे आश्रयास होते. नित्य दोन लाख हरिनाम जपणे, सर्व वैष्णवांच्या उद्देशाने शत-शत दंडवत तथा गोपांच्या घरी जाऊन माधुकरी (भिक्षा) मागून जीवन-निर्वाह करणे, हाच त्यांच्या जीवनाचा नियम झाला होता. या सगळ्यांतून त्यांना जेव्हा-जेव्हा वेळ मिळे, कुठल्याही ग्राम्यकथांमध्ये (वायफळ-व्यर्थ गप्पांमध्ये) वेळ न दवडता ते भगवत्पार्षद्-प्रधान श्रीजगदानन्दांच्या 'प्रेम-विवर्त' ग्रंथाचे पठण करीत असत. वाचता-वाचता त्यांच्या डोळ्यांत अश्रू दाटून येत असत. अशा वेळेस निकटस्थ कुंजवासीगण भक्तिभावाने त्यांचे प्रवचन ऐकत असत. का नाही ऐकणार? प्रेम-विवर्त ग्रंथ समस्त रसतत्त्वांनी परिपूर्ण आहे. त्यातही

बाबाजींच्या अमृत वर्षविणाऱ्या स्वर-लहरींनी ते आप्लावित होऊन जात (बुडून जात) आणि त्यांची विषय-विष ज्वाला शांत होत असे.

एकदा तृतीय-प्रहराची वेळ होती. बाबाजी महाशयांनी नाम-जपाची संख्या पूर्ण केली होती आणि ते श्रीमाधवी-मालती लता-मंडपात बसून 'प्रेम-विवर्ता'चे पठण करीत असतांनाच भावसमुद्रात निमग्न झाले होते. त्याचवेळेस एका संन्याशाने येऊन त्यांच्या चरणी दंडवत-प्रणाम केला आणि बराचवेळ ते तसेच पडून राहिले. बाबाजी महाशय पहिले भावानंदात मस्त होते, परंतु थोड्या वेळाने जेव्हा त्यांना बाह्य-स्फूर्ती झाली, तेव्हा त्यांनी साष्टांग स्थितीत पडलेल्या संन्यासी महात्म्यास पाहिले. स्वतःस तृणाहूनही अधिक दीनहीन जाणून त्यांनी संन्याशासमोर पडून, "हा चैतन्य! हा नित्यानन्द! या अधमावर कृपा करा" असे म्हणत रुदन सुरू केले. क्रमशः संन्याशाने त्यांना म्हटले–"प्रभू, मी अत्यंत दीनहीन आहे, आपण माझी विडंबना (उपहास) का करीत आहात?"

त्यानंतर संन्यासी बाबाजींच्या चरणांची धूळ मस्तकी धारण करून त्यांच्यासमोर बसले. बाबाजी महाशयांनीसुद्धा त्यांनी बसण्याकरिता केळ्याचे वल्कलासन दिले आणि एकीकडे बसून प्रेमाने गद्‌गद स्वरात म्हणाले–प्रभो! ही दीन व्यक्ती आपली कशा प्रकारे सेवा करण्यास योग्य आहे?

आपला कमंडलू ठेवीत हात जोडत संन्यासी म्हणाले–प्रभो! मी अत्यंत भाग्यहीन आहे. सांख्य, पातंजल, न्याय, वैशेषिक, उत्तर-मीमांसा, पूर्व-मीमांसा आदी वेदान्त शास्त्रांचे, काशी आदी नाना पुण्यतीर्थांत मी व्यवस्थित अध्ययन केलेय तथा शास्त्र-तात्पर्य-वितर्क यांत माझा बराचसा वेळ घालवलाय. जवळजवळ बारा वर्षांपूर्वी मी श्रीसच्चिदानन्द सरस्वती पादांकडे दण्ड (संन्यास) पण ग्रहण केला. संन्यास ग्रहण करून सर्व तीर्थांचे भ्रमण करतांना मी भारतातील सर्वत्र शंकर-मतानुयायी संन्यासांचा संगदेखील केला. कुटीचक, बहुदक, हंस–या तीन अवस्थांचे अतिक्रमण करून काही दिवस परमहंस पद देखील मी प्राप्त केले होते.

मौनावलंबनपूर्वक वाराणसी क्षेत्रात **'अहं ब्रह्मास्मि'** [१]; **'प्रज्ञानं ब्रह्म'** [२] **'तत्त्वमसि'** [३] आदी श्रीशंकराचार्य कथित महावाक्यांचा आश्रयसुद्धा मी घेतला. परंतु जशा प्रकारचे सुख आणि आत्मिक संतोष मिळायला हवा होता, तसा काही मिळाला नाही.

एके दिवशी कोणी वैष्णव साधू उच्च स्वरात हरिलीला गान करीत-करीत माझ्या समोरून गेले. मी डोळे उघडून पाहिले तर ते अश्रूंनी न्हाऊन निघालेले होते. त्यांचे सगळे शरीर रोमांचित होत होते. गद्‍गदस्वरात ते 'श्रीकृष्णचैतन्य प्रभू नित्यानन्द" नामाचे कीर्तन करीत होते. नृत्य करता करता त्यांचे चरण स्खलित होत होते आणि ते पृथ्वीवर पडत होते. त्यांना पाहून, त्यांचे कीर्तन ऐकून माझ्या हृदयात एक अनिर्वचनीय भाव उत्पन्न झाला, जो मी आपल्यासमोर वर्णन करण्यास असमर्थ आहे. भावोदय तर अवश्य झाला तथापि आपल्या परमहंस पदाची मर्यादा राखण्याकरिता मी त्यांच्याशी काहीच वार्तालाप करू शकलो नाही. हा धिक्कार असो, धिक्कार असो माझ्या पद-मर्यादेचा! धिक्कार असो माझ्या भाग्याचा! सांगता येत नाही, पण न जाणो का त्या दिवसापासून माझे चित्त श्रीकृष्णचैतन्यांच्या चरणी आकृष्ट झाले आहे. काही वेळानंतर मी व्याकूळ होऊन त्या वैष्णव साधूस खूप शोधले, पण ते कुठेच दिसले नाही. मी पाहिले, त्यांच्या दर्शनाने आणि मुखनिःसृत नाम-श्रवणाने जो विमल आनंद प्राप्त झाला, त्याचा अनुभव मला यापूर्वी कधीच झाला नव्हता. खूप दिवस विचार करून मी निश्चय केला की वैष्णवांच्या चरणांचा आश्रय घेणेच माझ्याकरिता श्रेयस्कर आहे. मी काशी सोडून श्रीधामवृन्दावनात गेलो. तेथे मी अनेक वैष्णवांना पाहिले, जे श्रीरूप, सनातन तथा जीव गोस्वामींचे नाव घेत घेत विलाप करीत असतात. ते राधाकृष्णांच्या लीलांचे स्मरण करतात आणि नवद्वीपाचे नाम घेऊन प्रेमाने पृथ्वीवर लोळण घेतात. हे सगळे पाहून-ऐकून मलादेखील नवद्वीपधाम दर्शनाची लालसा झाली. तेव्हा श्रीव्रजधामाची चौऱ्याऐंशी कोसाची परिक्रमा करीत मी काही दिवसांपूर्वीच श्रीमायापुरात आलो आहे. मायापूर नगरीत आपला महिमा ऐकून आज मी आपल्या चरणांचा आश्रय घेतला आहे. आपण या

---

(१) मी ब्रह्म आहे. (बृहदारण्यकोपनिषद् १/४/१०)

(२) प्रज्ञान ब्रह्म आहे. (ऐतरेयोपनिषद् २/४)

(३) तू देखील तेच आहेस. (छान्दोग्योपनिषद् ६/२५/३)

दासास आपला कृपा-पात्र समजून कृतार्थ करावे.

परमहंस बाबाजी महाशय दातांनी गवत पकडून रडतरडत म्हणाले– संन्यासी ठाकूर, मी एक अत्यंत अपदार्थ आहे. उदर पूर्ती, निद्रा आणि व्यर्थ वार्तालापात माझे जीवन व्यर्थ गेले. हे अवश्य आहे की मी श्रीकृष्णचैतन्यांच्या लीला-स्थळी राहून दिवस अतिवाहित (व्यतीत) करीत आहे, परंतु कृष्णप्रेम काय वस्तू आहे, यास आस्वादनाद्वारा मी अजूनही समजू शकलो नाही. आपण धन्य आहात. कारण क्षणभर का होईना वैष्णवाचे दर्शन करून आपण प्रेमाचे आस्वादन तर केले आहे. आपण कृष्णचैतन्यदेवांचे कृपा-पात्र आहात. या अधमास प्रेम-आस्वादनाच्या समयी कधी-कधी अवश्य स्मरण करीत जा म्हणजे मी कृतार्थ होऊ शकेल.

असे म्हणता-म्हणता बाबाजींनी संन्याशास मिठी मारली आणि त्यांना अश्रूंनी चिंब भिजवून टाकले. संन्यासी महाराजांनी वैष्णवाच्या अंगाचा स्पर्श प्राप्त करून हृदयात एका अभूतपूर्व भावोदयाचा अनुभव केला. ते देखील रडतरडत नृत्य करू लागले. नृत्य करत ते गाऊ लागले–

**(जय) श्रीकृष्णचैतन्य श्रीप्रभु नित्यानन्द।**
**(जय) प्रेमदास गुरु जय भजन आनन्द॥**

खूप वेळेपर्यंत नृत्य-कीर्तन केल्यानंतर स्थिर होत दोघांनी परस्पर खूप गप्पा मारल्या. प्रेमदास बाबाजींनी विनीत भावाने म्हटले–महात्मन्! आपण या प्रद्युम्न कुंजात काही दिवस वास्तव्य करून मला पवित्र करा.

संन्यासी म्हणाले–मी, आपल्या चरणी हे शरीर समर्पित केले आहे. काही दिवसाचीच गोष्ट काय करता, आपण देह त्यागेपर्यंत आपली सेवा करीत रहावे, अशी माझी आकांक्षा आहे.

संन्यासी ठाकूर सर्व शास्त्रांचे पंडित होते. गुरुकुलात राहूनच गुरूचा उपदेश ग्रहण करायचा असतो, ही गोष्ट त्यांना चांगलीच माहिती होती. म्हणूनच ते आनंदाने त्याच कुंजात राहू लागले.

काही दिवसानंतर परमहंस बाबाजी संन्यासी महोदयास म्हणाले–महात्मन्, श्रीप्रद्युम्न ब्रह्मचारींनी माझ्यावर कृपा करून मला श्रीचरणी स्थान दिले आहे. ते आजकाल श्रीनवद्वीप मंडळातील एका प्रांतात श्रीदेवपल्ली ग्रामी श्रीश्रीनृसिंहदेवांची उपासना करण्यात मग्न आहेत. चला आजच माधुकरी संपल्यावर त्यांच्या चरणांचे दर्शन करून घेऊया.

संन्यासी ठाकूर म्हणाले–जी आज्ञा असेल, त्याचे मी पालन करीन.

दोन वाजल्यानंतर ते दोघे श्रीअलकनन्दा पार करून श्रीदेवपल्लीत उपस्थित झाले. सूर्यटीला (टेकडी) पार करून श्रीनृसिंहदेवांच्या मंदिरात त्यांनी भगवत्-पार्षद श्रीप्रद्युम्न ब्रह्मचारींच्या चरणांचे दर्शन घेतले.

दुरूनच परमहंस बाबाजींनी पृथ्वीवर पडून श्रीगुरुदेवांस साष्टांग दंडवत-प्रणाम केला. ब्रह्मचारींनी भक्त-वात्सल्याने आर्द्र होऊन श्रीमंदिराच्या बाहेर येऊन परमहंस बाबाजींना दोन्ही हातांनी उठवून प्रेमालिंगन देऊन क्षेमकुशल विचारले. बराचवेळ इष्ट-गोष्टी झाल्यानंतर परमहंस बाबाजींनी त्यांना संन्यासी ठाकुरांचा परिचय दिला.

ब्रह्मचारी सादर म्हणाले–वत्सा! तू यथायोग्य गुरू प्राप्त केला आहेस. प्रेमदासाकडून 'प्रेम-विवर्त' ग्रंथातील उपदेश ग्रहण कर.

**किवा विप्र, किवा न्यासी, शूद्र केने नय।**
**जेई कृष्ण-तत्त्ववेत्ता सेई गुरु हय॥**

(चै.च.म. ८/१२७)

संन्यासी ठाकुरांनीसुद्धा विनीत भावाने परमगुरूंच्या पादपद्मी साष्टांग दंडवत-प्रणाम करून म्हटले–प्रभो, आपण श्रीचैतन्यदेवांचे पार्षद आहात. आपल्या केवळ कृपा-कटाक्षानेच माझ्यासारखे शेकडो अभिमानी-संन्यासी पवित्र होऊ शकतील. आपण कृपा करा.

संन्यासी ठाकुरांनी भक्तसमुदायातील परस्पर व्यवहार यापूर्वी शिकला नव्हता. गुरू आणि परमगुरू यांच्यात परस्पर जो व्यवहार पाहिला, त्यासच सदाचार

मानून आपल्या गुरूंच्याप्रती निष्कपट रूपाने त्या दिवसापासून तसाच व्यवहार करू लागले. संध्याकाळी आरती-दर्शन करून दोघेही पुन्हा श्रीगोद्रुमी परतले.

काही दिवस असेच तेथे राहिल्यानंतर संन्यासींनी परमहंस बाबाजींकडे तत्त्व-जिज्ञासा करण्याची इच्छा केली. त्या वेळेस वेषाव्यतिरिक्त आणखी सगळ्याच गोष्टी त्यांनी वैष्णवांप्रमाणे ग्रहण केलेल्या होत्या. शम-दम आदी गुणांनी संपन्न होऊन संपूर्णपणे ब्रह्मनिष्ठा तर त्यांनी यापूर्वीच प्राप्त केली होती. या वेळेस त्या निष्ठेच्याही वरची परब्रह्माची चित्-लीला-निष्ठा देखील उत्पन्न झाली. त्याबरोबरच दीन भावसुद्धा प्रबल झाला.

एके दिवशी अरुणोदयाच्या समयी परमहंस बाबाजी पवित्र होऊन तुळशी माळेवर हरिनामाचा संख्यापूर्वक जप करीत-करीत माधवी-मंडपात बसले होते. कुंज-भंग-लीलेची स्फूर्ती झाल्यामुळे त्यांच्या नेत्रांतून निरंतर प्रेमाश्रूंची धारा प्रवाहित होत होती. आपल्या सिद्ध भावाने परिभावित होऊन तत्कालोचित सेवेत निमग्न होऊन ते आपल्या स्थूल देहाची स्मृती विसरू लागले. संन्यासी त्यांच्या भावांनी मुग्ध होऊन त्यांच्या निकटच बसून राहिले आणि त्यांचे सात्त्विक भाव न्याहाळू लागले.

बघता-बघता परमहंस बाबाजी बोलू लागले—सखी! या कक्खटीस (श्रीमती राधिकेच्या वानरीचे नाव) शीघ्र गप्प कर; नाही तर माझ्या राधा-गोविन्दाची सुख निद्रा चाळवल्याने सखी ललितेस दुःख होऊन ती माझी भर्त्सना करेल. अग बघ! अनंगमंजरी याकरिता इंगित करीत आहे. तू रमणमंजरी आहेस, तुझी हीच तर निर्दिष्ट सेवा आहे. तू यात यत्नवती हो.

असे म्हणता-म्हणता परमहंस बाबाजी अचेतन झाले. संन्यासी महाराज आपला सिद्ध देह आणि सिद्ध परिचय जाणून त्याच वेळेपासून त्या सेवेत नियुक्त झाले. क्रमशः प्रातःकाल झाला. पूर्व दिशेस उषा आपले सौंदर्य पसरवू लागली. पक्षी चतुर्दिक कलरव (चारी दिशांना किलबिल) करू लागले, मृदू-मंद समीर (वारा) वाहू लागला. बालसूर्याच्या रक्तिम आभेने उद्भासित प्रद्युम्न कुंजाच्या माधवी-मंडपाची त्या वेळेस जी अपूर्व शोभा झाली, त्याचे वर्णन करता येणे शक्य नाही.

परमहंस बाबाजी महाराज कर्दळीच्या वल्कलासनावर बसले आहेत. हळू-हळू आता त्यांना बाह्य स्फूर्ती होते आहे. ह्याबरोबरच नाम-माला जपत आहे.

ह्याच वेळेस संन्यासी बाबाजींच्या चरणी साष्टांग दंडवत प्रणाम करून, त्यांच्याजवळ विनीत भावाने आसनस्थ होऊन हात जोडीत म्हणाले–प्रभो! हा दीनजन एक प्रश्न विचारू इच्छितो आहे. उत्तर प्रदान करून हृदयास संतुष्ट करा. ब्रह्मज्ञानाच्या अग्नीने दग्ध हृदयात व्रजरसाचा संचार करून त्यास शीतल करावे.

बाबाजी म्हणाले–आपण योग्य-पात्र आहात. आपण जो प्रश्न कराल त्याचे मी यथाशक्ती उत्तर देईन.

संन्यासी म्हणाले–प्रभो! मी खूप दिवसांपासून धर्माची प्रतिष्ठा ऐकून 'धर्म' काय आहे? या प्रश्नाचे उत्तर अनेकांकडे अनेक वेळा मागितले आहे. परंतु दुःखाचा विषय हाच आहे की या प्रश्नाच्या उत्तरात या लोकांनी मला जे काही सांगितले ते सगळे परस्पर विरोधी भासले. म्हणून आपण कृपा करून मला सांगा–जिवाचा धर्म काय आहे? आणि भिन्न-भिन्न उपदेशक भिन्न-भिन्न उपदेशांना 'धर्म' का म्हणतात? धर्म जर एकच आहे, तर सगळे पंडितगण त्याच एका अद्वितीय धर्माचे अनुशीलन का नाही करीत?

श्रीकृष्णचैतन्यप्रभूंच्या श्रीचरणकमळांचे ध्यान करीत परमहंस बाबाजी बोलू लागले–हे सौभाग्यवान! मी स्वतःच्या ज्ञानानुसार धर्माचे तत्त्व सांगतो. ज्या वस्तूचा, जो नित्य स्वभाव आहे, तोच त्याचा नित्य धर्म आहे. वस्तूच्या गठनाबरोबर स्वभावाचा देखील उदय होतो. कृष्णाच्या इच्छेने जेव्हा एखादी वस्तू गठित होते, तेव्हा त्या गठनाचा नित्य सहचररूप एक स्वभावसुद्धा असतो. तोच स्वभाव त्या वस्तूचा नित्य धर्म आहे. तत्पश्चात कुठल्या घटनावश अथवा अन्य वस्तूच्या संसर्गाने जेव्हा त्या वस्तूत काही विकार होतो, तेव्हा तिचा स्वभावदेखील विकृत वा परिवर्तीत होतो. परिवर्तीत स्वभाव काही दिवसांनी दृढ झाल्यावर नित्य स्वभावाप्रमाणेच त्या वस्तूचा सोबती होऊन जातो. हा परिवर्तीत स्वभाव वास्तविक पाहता, स्वभाव नाही. याला 'निसर्ग' म्हणतात. निसर्ग स्वभावाच्या स्थानी बसून स्वतःस स्वभाव म्हणवून आपला परिचय देत असतो. जसे पाणी एक वस्तू आहे. तरलता त्या वस्तूचा स्वभाव आहे. घटनावशतः जेव्हा हे पाणी गोठून हिम (बर्फ) बनते, तेव्हा काठिन्य त्याचा निसर्ग बनून स्वभावाप्रमाणे कार्य करतो वास्तविक निसर्ग (बदललेला स्वभाव) नित्य नाही, नैमित्तिक आहे, कारण तो कुठल्यातरी निमित्तामुळे (कारणवशतः) उदित होतो; आणि निमित्त दूर झाल्याबरोबर तो स्वतःदेखील दूर होतो. परंतु स्वभाव नित्य

आहे. विकृत झाल्यावरही तो वस्तूत अनुस्यूत (जुळून) असतो. काल आणि घटनाक्रमाने स्वभाव अवश्य आपला परिचय देऊ शकतो.

वस्तूचा स्वभाव हाच वस्तूचा नित्य-धर्म आहे. आणि वस्तूचा निसर्ग हाच त्या वस्तूचा नैमित्तिक धर्म आहे. ज्यांना वस्तूचे ज्ञान आहे, ते नित्य आणि नैमित्तिक-धर्माच्या प्रभेदास जाणू शकतात, आणि ज्यांना वस्तूचे ज्ञान नाही ते निसर्गालाच स्वभाव समजतात तथा नैमित्तिक-धर्मासच नित्य-धर्म समजून बसतात.

संन्यासी ठाकुरांनी विचारले–'वस्तू' कशास म्हणतात आणि 'स्वभाव' शब्दाचा अर्थ काय?

परमहंस म्हणाले–'वस्'–धातूत संज्ञा अर्थाने 'तु' प्रत्यय लावल्याने 'वस्तू' शब्द बनतो. म्हणूनच ज्याचे अस्तित्व वा प्रतीती आहे, तीच 'वस्तू' होय. वस्तू दोन प्रकारच्या असतात–वास्तव आणि अवास्तव. वास्तव वस्तू परमार्थ-भूत असते. अवास्तव वस्तू द्रव्यगुणादीकरूप असते. वास्तव वस्तूचे अस्तित्व अथवा सत्ता आहे. अवास्तव वस्तूचे अस्तित्व केवळ प्रतीत होते. प्रतीती काही ठिकाणी सत्य असते तर काही ठिकाणी केवळ भानमात्र असते. श्रीमद्भागवताच्या प्रथम स्कंधातील द्वितीय श्लोकात **"वेद्यं वास्तवमत्र वस्तू शिवदं"**[४] ची जी अवतारणा आहे, त्यात 'वास्तव वस्तू' एकमात्र परमार्थ आहे, असा निर्णय केला गेला आहे. भगवान एकमात्र वास्तव वस्तू आहे. जीव त्या 'वस्तू'चा पृथक अंश आहे आणि माया त्या वस्तूची शक्ती आहे. म्हणूनच 'वस्तू' शब्द भगवान, जीव आणि माया ही तीन तत्त्वे दर्शवितो (अभिहित करतो). या तिघांच्या परस्पर संबंध-ज्ञानास शुद्धज्ञान म्हटले जाते. या तत्त्वांच्या बहुविध प्रतीती आहेत. त्या सगळ्यांची अवास्तव वस्तूंमध्ये गणना होते. वैशेषिकांचे द्रव्य आणि गुणांची संख्या केवळ अवास्तव वस्तूचे परीक्षण मात्र आहे. वास्तव वस्तूचा जो विशेष गुण आहे, तोच तिचा स्वभाव आहे. जीव एक वास्तव वस्तू आहे. जिवाचा जो नित्य, विशेष गुण आहे तोच त्याचा स्वभाव आहे. संन्यासी महाराज म्हणाले–प्रभो! याविषयी मी आणखी सविस्तरपणे जाणू इच्छितो.

---

(४) परम सुखद परमार्थ संबंधीय वास्तव वस्तूच जाणण्यायोग्य आहे.

बाबाजी म्हणाले–श्रीनित्यानन्द प्रभूंचे कृपापात्र कृष्णदास कविराज गोस्वामींनी मला एक स्वहस्तलिखित ग्रंथ दाखवला आहे. त्या ग्रंथांचे नाव 'श्रीचैतन्यचरितामृत' आहे. त्यात श्रीमहाप्रभूंचा याविषयी एक उपदेश आहे–

**जीवेर स्वरूप हय कृष्णेर नित्यदास।**
**कृष्णेर तटस्था शक्ति भेदाभेद–प्रकाश॥**

**कृष्ण भूलि सेई जीव अनादि–बहिर्मुख।**
**अतएव माया तारे देय संसार–दुःख॥**

(चै. च. म. २०/२०८, ११७)

अर्थात जिवाचे स्वरूप कृष्णाचा नित्यदास आहे. तो कृष्णाची तटस्थाशक्ती आहे तथा त्यांचा भेदाभेद-प्रकाश आहे. जेव्हा कृष्णास विसरून जीव अनादी बहिर्मुख होतो, तेव्हा माया त्याला संसाररूपी दुःख देते.

कृष्ण-परिपूर्ण चित्-वस्तू आहे. तुलनास्थळी अनेक लोक त्यांस चित्-जगताचा एकमात्र सूर्य म्हणतात. जीव त्यांचा किरणकणमात्र आहे. जीव अनेक आहेत. "जीव कृष्णाचा अंश आहे"–असे म्हटल्याने दगडाचा एक तुकडा जसे पर्वताचा अंश आहे, तसे समजू नये कारण अनंत अंशरूप जीव कृष्णापासून निपजला असला तरीही, त्यामुळे कृष्णाच्या कुठल्याही अंशाचा क्षय होत नाही. याच कारणास्तव वेद अग्नीच्या स्फुल्लिंगाबरोबर जिवाचे एकांशात सादृश्य सांगतात. वस्तुतः या विषयात तुलनेला स्थानच नाही. महाग्नीची ठिणगी म्हणा, वाटलतर सूर्याचा किरण-परमाणू अथवा मणि-प्रसूत सुवर्ण–कुठलीही तुलना सर्वांग सुंदर होत नाही. परंतु या सर्व तुलनांच्या जडीय भावांशांचा परित्याग केल्याने सहज हृदयात जीवतत्त्वाची स्फूर्ती होते. कृष्ण–बृहत्-चित्-वस्तू आहेत आणि जीव–त्यांची अणू चित्-वस्तू आहे. चित्-धर्मात दोघांचेही ऐक्य आहे, परंतु पूर्णत्व आणि अपूर्णत्वाच्या भेदाने दोघांचेही स्वभाव-भेद अवश्य सिद्ध होतात. कृष्ण जिवाचे नित्य प्रभू आहेत, जीव कृष्णाचा नित्यदास आहे–यालाच स्वाभाविक म्हणावे लागेल. कृष्ण आकर्षक आहेत, जीव आकृष्ट आहे, कृष्ण ईश्वर आहे, जीव ईशितव्य (ईश्वराच्या अधीन) आहे, कृष्ण द्रष्टा आहे, जीव दृष्ट आहे, कृष्ण पूर्ण आहे, जीव दीन आणि क्षुद्र आहे, कृष्ण सर्वशक्तिमान आहे आणि जीव निःशक्तिक (शक्तिहीन) आहे. म्हणूनच कृष्णाचे नित्य आनुगत्य अथवा दास्यच जिवाचा नित्य स्वभाव किंवा धर्म आहे. कृष्ण अनंत

शक्तिसंपन्न आहेत, म्हणूनच चित्-जगतास प्रकाशित करताना त्यांच्या पूर्ण शक्तीचा जसा परिचय येतो तसेच जीवसृष्टीच्या विषयी त्यांच्या एका तटस्थाशक्तीचा परिचय मिळतो. अपूर्ण जगाच्या संघटनात एक विशेष शक्ती कार्यरत असते. त्या शक्तीस तटस्था असे म्हणतात. तटस्थाशक्तीची क्रिया ही आहे की ती चित्-वस्तू आणि अचित्-वस्तू–या दोहोंमध्ये एका अशा वस्तूची निर्मिती करते जी चित्-जगत आणि अचित्-जगत या दोहोंसोबत संबंध ठेवण्यास योग्य असते. शुद्ध चित्-वस्तू अचित्-वस्तूच्या विपरीत असते, म्हणूनच स्वभावतः अचित्-वस्तूबरोबर तिचा काहीच संबंध नसतो. जीव चित्कण अवश्य आहे; परंतु एका ऐशीशक्ती (ईश्वरीय शक्ती) द्वारा तो अचित्-संबंधाच्या उपयोगी येत असतो. त्या ईश्वरीय शक्तीचे नाव तटस्था आहे. नदीचे पाणी आणि भूमी या दोघांच्यामध्ये एक तट असतो. ज्यास तट म्हणतो ती भूमीसुद्धा आहे आणि पाणीसुद्धा अर्थात उभयस्थ आहे. उक्त ऐशीशक्ती तटावर स्थित राहून भूधर्म आणि जलधर्म–दोघांनाही एका सत्तेत धारण करते. जिवाचा धर्म चित् असतो, तरीदेखील त्याचे गठनच अशा रितीने झालेले असते की तो जडधर्माच्या वश होण्यायोग्य असतो. म्हणूनच जीव शुद्ध चित्-जगताप्रमाणे जड संबंधांच्या पलीकडे नसतो. चित्-धर्मामुळे तो जडवस्तू सुद्धा नसतो. म्हणून जड आणि चित्–या दोन्ही तत्त्वांपासून वेगळे असल्याकारणाने जिवासदेखील एक तत्त्व मानले गेले आहे. म्हणूनच ईश्वर आणि जिवात नित्य भेद स्वीकार करणे कर्तव्य आहे. ईश्वर मायेचा अधीश्वर आहे अर्थात माया त्याचे वशीभूत तत्त्व आहे, जीव मायावश्य आहे, अर्थात कुठल्या विशेष अवस्थेत तो मायेच्या अधीन होऊ शकतो. म्हणूनच भगवान, जीव आणि माया–ही तिन्ही तत्त्वे पारमार्थिक सत्य आणि नित्य आहेत. यात '**नित्योनित्यानाम्**'[५] (कठ. उ. २/२/१३) या वेद वचनाद्वारा भगवान तिन्ही तत्त्वांचे मूळ नित्य तत्त्व आहे.

जीव स्वभावतः कृष्णाचा नित्यदास आहे आणि त्यांच्या तटस्थाशक्तीचा परिचय आहे. असा विचार केल्याने हा सिद्धांत होतो की जिवाचा भगवत्-तत्त्वाशी युगपत् भेद आणि अभेद आहे, म्हणूनच तो भेदाभेद-प्रकाश आहे. जीव मायावश्य आहे, परंतु भगवंत मायेचे नियंता आहेत, या ठिकाणी जीव आणि भगवंतात नित्य भेद आहे. जीव स्वरूपतः चित्-वस्तू आहे. भगवंत देखील स्वरूपतः चित्-वस्तू

(५) जो नित्य वा वास्तव वस्तुसमुहातही परम नित्य आहे आणि जो नित्य चेतन-समूहामध्ये मुख्यचेतन आहे.

आहेत आणि जीव भगवंताचा शक्ति-विशेष आहे. यामुळेच या अंशात या दोघांमध्ये नित्य अभेद आहे. नित्य भेद आणि नित्य अभेद जर युगपत् असतील, तर नित्य भेदाचा परिचयच प्रबळ असतो. कृष्णाचे दास्यत्व (सेवावृत्ती) हाच जिवाचा नित्य धर्म आहे. त्याला विसरून जीव मायेच्या वशीभूत होतो. म्हणून तेव्हापासून जीव कृष्णापासून बहिर्मुख होऊन जातो. कारण मायिक जगात येतानाच ही बहिर्मुखता परिलक्षित होते, म्हणून मायिक जगातील कालांतर्गत जिवाच्या पतनाचा इतिहास नाही. म्हणून अनादी 'बहिर्मुख' शब्द उपयोगात आणला जातो. बहिर्मुखता आणि मायेत प्रवेश करण्याच्या वेळेपासूनच जिवाचा नित्यधर्म विकृत झाला आहे. म्हणूनच मायेच्या संगामुळे जिवाचा निसर्ग उदित झाल्यावर नैमित्तिक धर्मास प्रकाशित होण्याचा अवसर प्राप्त झाला आहे. नित्यधर्म भिन्न-भिन्न अवस्थांत एक, अखंड आणि निर्दोष आहे; नैमित्तिक धर्म भिन्न-भिन्न आकारांनी भिन्न-भिन्न लोकांद्वारा भिन्न-भिन्न रूपांत प्रचारित होत असतो.

परमहंस बाबाजी इथपर्यंत बोलून गप्प झाले आणि हरिनामाचा जप करू लागले.

संन्यासी ठाकुरांनी अशा प्रकारे तत्त्वमय गोष्टी ऐकून दंडवत प्रणाम करीत म्हटले–प्रभो! मी आज या सर्व बाबींवर विचार करीन. जे काही प्रश्न मनात उदित होतील त्यांना उद्या तुमच्या श्रीचरणी निवेदन करीन.

**॥ पहिला अध्याय समाप्त ॥**



## दुसरा अध्याय (जिवाचा नित्यधर्म शुद्ध आणि सनातन आहे)

दुसऱ्या दिवशी प्रातःकाळी प्रेमदास बाबाजी आपल्या व्रजभावात निमग्न होते, म्हणून संन्यासी महाशयांना त्यांना काहीही विचारण्याचा सुसंधी मिळाली नाही. मग दुपारी 'माधुकरी' करून झाल्यावर दोघेही श्रीमाधवीमालती मंडपात बसले. तेव्हा स्वतःच परमहंस बाबाजींनी कृपा करीत म्हटले–हे भक्त-प्रवर! आपण धर्माविषयीची मीमांसा ऐकून त्याबद्दल काय विचार केला? आणि कुठल्या निर्णयाप्रत पोहोचले?

हे ऐकून संन्यासींनी परमानंदाने प्रश्न केला–प्रभो! जीव जर अणू पदार्थ आहे, मग त्याचा धर्म पूर्ण आणि शुद्ध कसा काय असू शकतो? जिवाच्या गठनासोबत जर त्याच्या धर्माचे पण गठन होते, तर धर्म सनातन कसा काय असू शकतो?

हे दोन्ही प्रश्न ऐकून श्रीशचीनन्दनांच्या चरणांचे ध्यान करीत परमहंस बाबाजी हसतच म्हणाले–महाशय! जीव अणू पदार्थ आहे, परंतु त्याचा धर्म पूर्ण आणि सनातन आहे. अणुत्व केवळ वस्तूचा परिचय आहे. बृहत्-वस्तू एकमात्र परब्रह्म श्रीकृष्णचन्द्र आहे. जीवसमूह त्यांचे अनंत परमाणू आहेत. अखंड अग्नीतून ज्याप्रकारे ठिणग्या निघतात, तसेच अखंड चैतन्यस्वरूप कृष्णातून हे जीव सुद्धा निघतात. अग्नीतून निघालेली एक-एक ठिणगी जसे पूर्ण अग्नी-शक्तीस धारण करते, तसेच प्रत्येक जीव देखील चैतन्याच्या पूर्ण-धर्माची विकास भूमी होण्यास समर्थ आहे. एक ठिणगी जशी जळण्याची सामग्री प्राप्त करून क्रमशः महान अग्निचा परिचय देऊन जगतास जाळून टाकण्यास समर्थ असते, तसेच एक जीवही प्रेमाचा प्रकृत (खरा) विषय श्रीकृष्णचन्द्रास प्राप्त करून प्रेमाचा महापूर आणण्यास समर्थ असतो. जोपर्यंत आपल्या धर्माच्या यथार्थ विषयास तो स्पर्श करीत नाही, तोपर्यंत त्या पूर्ण धर्माचा सहज विकास दर्शविण्यात अणुचैतन्य-स्वरूप जीव असमर्थ होऊन प्रकाश प्राप्त करतो. वास्तविक विषयाच्या संयोगानेच धर्माचा परिचय मिळतो.

"जिवाचा नित्यधर्म काय आहे?" याचे नीटपणे अनुसंधान करा. प्रेमच जिवाचा नित्यधर्म आहे. जीव अजड अर्थात जडाच्या अतीत वस्तू आहे. चैतन्यच याचे गठन आहे. प्रेमच याचा धर्म आहे. कृष्णाचे दास्य हेच विमल प्रेम आहे. म्हणून कृष्णदासरूप प्रेमच जिवाचा स्वरूप धर्म आहे.

जिवाच्या दोन अवस्था आहेत–शुद्धावस्था आणि बद्धावस्था. शुद्ध अवस्थेत जीव केवळ चिन्मय आहे. त्या समयी त्याचा जडाशी काहीच संबंध रहात नाही. शुद्ध अवस्थेत देखील जीव अणू पदार्थ आहे. त्याच अणुत्वामुळे जिवाला अवस्थांतर प्राप्त होण्याची संभावना असते. बृहत्-चैतन्यस्वरूप कृष्णाचे स्वभावतः अवस्थांतर नाही. ते वस्तुतः बृहत्, पूर्ण शुद्ध आणि सनातन आहेत; जीव वस्तुतः अणू, खण्ड, अशुद्ध होण्यायोग्य आणि अर्वाचीन आहे; परंतु धर्मतः बृहत्, अखंड, शुद्ध आणि सनातन आहे. जीव जोपर्यंत शुद्ध आहे, तोपर्यंत त्याच्या स्वधर्माचा विमल परिचय मिळतो. जीव जेव्हा मायेच्या संबंधाने अशुद्ध होतो तेव्हा स्वधर्मात विकार झाल्याने तो अविशुद्ध, अनाश्रित आणि सुख-दुःखाने पीडित असतो. कृष्णाप्रती असलेल्या दास्यभावाची विस्मृती होताच जिवाची संसार-दशा उपस्थित होते.

जोपर्यंत जीव शुद्ध असतो, तोपर्यंत त्यास स्वधर्माचा अभिमान असतो. तो स्वतःस कृष्णाचा दास समजून अभिमान करतो. परंतु मायेच्या संबंधाने अशुद्ध होताच हा अभिमान संकुचित होत भिन्न-भिन्न आकार धारण करतो. मायेच्या संबंधामुळे जिवाचे शुद्धस्वरूप लिंगदेह आणि स्थूलदेहाने आवृत होते. तेव्हा लिंगशरीराचा एक वेगळाच अभिमान उदित होतो. तोच अभिमान नंतर स्थूलदेहाच्या अभिमानात मिळून एका तृतीय अभिमानाचे रूप धारण करतो. शुद्ध शरीरात जीव केवळ कृष्णाचा दास आहे. लिंग शरीरात जीव स्वतःस स्वकर्म फळाचा भोक्ता समजू लागतो. त्यावेळेस कृष्ण-दास्याचा अभिमान लिंगदेहाच्या अभिमानाने झाकला जातो. मग स्थूल देह प्राप्त करून–"मी ब्राह्मण आहे, मी राजा आहे, मी गरीब आहे, मी दुःखी आहे, मी रोग-शोकाद्वारे अभिभूत आहे, मी स्त्री आहे, मी अमक्याचा स्वामी आहे"–अशा प्रकारे निरनिराळ्या स्थूलाभिमानासोबत तो आपला परिचय देऊ लागतो.

अशा प्रकारे मिथ्या अभिमानयुक्त होऊन जिवाचा स्वधर्म विकृत होतो. विशुद्ध प्रेमच जिवाचा स्वधर्म आहे. सुख-दुःख, राग-द्वेष आदींच्या रूपात हेच प्रेम विकृत भावासहित लिंगशरीरात उदित होते. भोजन, पान आणि जडसंग सुखरूप हे विकार अधिकतर घनीभूत होऊन स्थूल शरीरात दिसून येतात. आता पहा, जिवाचा नित्यधर्म केवळ शुद्ध अवस्थेतच प्रकाशमान होतो. बद्ध अवस्थेत ज्या धर्माचा उदय होतो, तो नैमित्तिक आहे. नित्यधर्म स्वभावानेच पूर्ण शुद्ध आणि सनातन आहे. नैमित्तिक धर्माची पुन्हा केव्हातरी विस्तारपूर्वक व्याख्या करीन.

श्रीमद्भागवत शास्त्रात जो विशुद्ध वैष्णवधर्म परिलक्षित होतो, तोच नित्यधर्म आहे. जगात जितक्या प्रकारच्या धर्मांचा प्रचार आहे, त्या सर्व धर्मांचे तीन भागांत विभक्तीकरण केले जाऊ शकते–नित्यधर्म, नैमित्तिकधर्म आणि अनित्यधर्म. ज्या धर्मात ईश्वराचे परीक्षण नाही आणि आत्म्याचे नित्यत्व नाही, ते सर्व अनित्य धर्म आहेत. ज्या धर्मांमध्ये ईश्वर आणि आत्म्याचे नित्यत्व स्वीकारले गेले आहे, परंतु केवळ अनित्य उपायाद्वारे ईश्वराच्या कृपेचा लाभ घेण्याचा प्रयत्न केला जातो, ते सगळे नैमित्तिक धर्म आहेत. ज्यांत विमल प्रेमाद्वारे कृष्णदास्य प्राप्त करण्याचा प्रयत्न केला जातो, ते नित्यधर्म आहेत. नित्यधर्म देश, जाती तथा भाषेच्या भेदाने वेगवेगळ्या नावांनी परिचित असूनही तो एक आणि परम उपादेय आहे. भारतात जो वैष्णवधर्म प्रचलित आहे, तोच नित्यधर्माचा आदर्श आहे. मग आपले हृदयनाथ भगवान श्रीशचीनन्दन यांनी अखिल जगतास ज्या धर्माची शिकवण दिली आहे, तीच वैष्णवधर्माची विमल अवस्था असल्याकारणाने प्रेमानंदी महापुरुषगण त्यालाच स्वीकारतात आणि त्याचाच आश्रय घेतात.

येथेच संन्यासींनी हात जोडून म्हटले–प्रभो! मी श्रीशचीनन्दनाद्वारा प्रकाशित विमल वैष्णव धर्माचा सर्व-उत्कर्ष सर्वदा पहातोय. शंकराचार्यांद्वारा प्रकाशित अद्वैतमताच्या हेयतेचा (त्याज्य असण्याचा) अनुभव अवश्य करतोय, परंतु माझ्या मनात एक विचार येतोय जो आपल्या श्रीचरणी निवेदित केल्याशिवाय रहावत नाही. मी त्यास आपल्यापासून लपवू इच्छित नाही. प्रश्न असा आहे की प्रभू श्रीचैतन्यांनी जी घनीभूत प्रेमाची महाभाव-अवस्था दाखवली आहे, ती अद्वैतसिद्धीपेक्षा वेगळी अवस्था आहे काय?

श्रीशंकराचार्यांचे नाव ऐकून परमहंस बाबाजींनी त्यांना दंडवत प्रणाम केला आणि म्हणाले–महाशय "शङ्करः शङ्करः साक्षात्" हे वचन सदा स्मरणात ठेवा. शंकर वैष्णवांचे गुरू आहेत. म्हणूनच महाप्रभूंनी त्यांना आचार्य संबोधून त्यांचा उल्लेख केला. शंकर स्वयं पूर्ण वैष्णव आहेत. ज्यावेळी ते भारतात प्रगट झाले, त्यावेळी त्यांच्यासारख्या गुणावताराची समाजात खूप आवश्यकता होती. भारतात वेद-शास्त्राचे परीक्षण आणि वर्णाश्रमधर्माचा क्रियाकलाप बौद्धांच्या शून्यवादाच्या कचाट्यात पडून शून्यप्रायः झाले होते. शून्यवाद नितांत निरीश्वर आहे. त्याच्यात जीवात्म्याचे तत्त्व काही प्रमाणात स्वीकृत झाले असले तरी तो धर्म बिलकूल अनित्य आहे. त्या काळात ब्राह्मणगण प्रायः बौद्धधर्म स्वीकारून वैदिक धर्माचा परित्याग

करीत होते. तेव्हा असाधारण शक्तिशाली शंकरावतार श्रीशंकराचार्यांनी उदित होवून वेद-शास्त्राच्या सन्मानाची स्थापना केली. शून्यवादाला ब्रह्मवादात परिणत केले. हे काम असाधारण होते. भारतवर्ष या महान कार्याबद्दल श्रीशंकराचार्यांचे नेहमी ऋणी राहील. सर्व कार्यांचा जगात दोन प्रकारचा विचार होतो. काही कार्य तात्कालिक असतात तर काही कार्य सार्वकालिक. शंकराचार्यांचे हे काम त्या काळासाठी (तात्कालिक) होते. त्याद्वारे अनेक चांगल्या फळांचा उदय झाला. शंकराचार्यांनी जो पाया घातला त्याच पायावर श्रीरामानुजाचार्य आदी आचार्यांनी विशुद्ध वैष्णवधर्माचा महाल उभा केला. म्हणून शंकरावतार वैष्णवधर्माचे परमबंधू आणि एक प्राग्-उदित आचार्य आहेत.

शंकराचार्यांनी जो विचार-मार्ग दाखविला त्या संपत्तीचा वैष्णवगण आज अनायास उपभोग घेत आहेत. जड आणि बद्ध जिवासाठी संबंधज्ञानाचे मोठेच प्रयोजन आहे. या जड-जगात स्थूल आणि लिंग देहापासून चित्-वस्तू पृथक आणि अतिरिक्त आहे. या सिद्धांतावर श्रीशंकर आणि वैष्णव दोघे विश्वास ठेवतात. जिवाच्या अस्तित्वाबद्दल दोघांमध्ये कोणतेच अंतर (मतभेद) नाही. जड-जगाच्या संबंध-त्यागाचे नाव मुक्ती आहे, ह्या गोष्टीचा दोघांनी स्वीकार केला आहे. मुक्ति-लाभ होईपर्यंत श्रीशंकर आणि वैष्णव आचार्यांमध्ये अनेक प्रकारचे मतैक्य आहे. हरिभजनाने चित्तशुद्धी आणि मुक्ती-लाभ होतो–ही पण शंकराचार्यांची शिकवण आहे. फक्त एका विषयावर शंकर चुपचाप आहेत की मुक्ती मिळाल्यानंतर जिवाची कोणती अपूर्व गती होते. शंकर ही गोष्ट चांगल्या प्रकारे जाणतात की हरिभजनाद्वारे जिवाला मुक्तीच्या मार्गात चांगल्या प्रकारे नेल्यावर जीव क्रमशः भजन-सुखात आबद्ध होऊन शुद्ध भक्त होईल. याच कारणाने शंकराने केवळ मार्ग दाखविला आणि अधिक काही वैष्णवधर्माचे रहस्य उघड केले नाही. त्यांचे ग्रंथ ज्यांनी लक्षपूर्वक वाचले आहेत, ते शंकराचे गूढ भाव समजू शकतात. जे लोक केवळ त्यांच्या वरवरच्या अंशांना घेऊन त्याच्याच परिभ्रमणात आपला वेळ घालवितात, तेच वैष्णव धर्मापासून दूर राहतात.

एक प्रकारे विचार केल्यास अद्वैतसिद्धी आणि प्रेम एक सारखेच प्रतीत होतात. अद्वैतसिद्धीचा जो संकुचित अर्थ केला जातो त्याने अद्वैतसिद्धी आणि प्रेम यांच्यात भिन्नता उत्पन्न झाली आहे. प्रेम काय पदार्थ आहे–यावर विचार करा. एक चित्-पदार्थ अन्य चित्-पदार्थाप्रती ज्या धर्माद्वारे स्वभावतः आकृष्ट होतो, त्याचेच

नाव 'प्रेम' आहे. दोन चित् पदार्थांच्या पृथक अवस्थानाविना प्रेम-सिद्ध होत नाही; समस्त चित्-पदार्थ ज्या धर्माद्वारे परम चित्-पदार्थरूप कृष्णचन्द्राकडे नित्य आकृष्ट होतात त्याचे नाव आहे–'कृष्ण प्रेम'. कृष्णचन्द्राचे नित्य पृथक अवस्थान आणि जीवसमूहाचे त्यांच्याप्रती जे अनुगतभावासहित नित्य पृथक अवस्थान आहे, ते प्रेमतत्त्वात नित्य-सिद्ध तत्त्व आहे. आस्वादक, आस्वाद्य आणि आस्वादन या तिन्ही भावांची पृथक (भिन्न) स्थिती सत्य आहे. जर प्रेमाचे आस्वादक आणि आस्वाद्य एकच असतील तर प्रेम नित्य-सिद्ध असू शकत नाही. जर अचित् संबंधशून्य चित्-पदार्थांच्या शुद्ध अवस्थेस अद्वैतसिद्धी म्हटले गेले तर प्रेम आणि अद्वैतसिद्धी एक समानच प्रतीत होतात. परंतु आधुनिक शंकर-मतावलंबी पंडितगण चित्-धर्मांच्या अद्वैत-सिद्धीने संतुष्ट न होता चित्-वस्तूच्या एकता साधनेच्या यत्नाद्वारे वेदोदित अद्वय तत्त्वसिद्धीचा प्रचार न करता त्याच्या विकाराचा प्रचार करतात. त्यामुळे प्रेमाच्या नित्यत्वाची हानी झाल्याने वैष्णवांनी त्या सिद्धांतास अगदीच अवैदिक सिद्धांत ठरवले. शंकराचार्यांनी केवळ चित्-तत्त्वाच्या विशुद्ध अवस्थांना अद्वैतावस्था म्हटले आहे, परंतु त्यांचे अर्वाचीन शिष्य गुरूंच्या गूढभावांना न समजून क्रमशः त्यांना अपदस्थ (अपमानित) करीत आहेत. विशुद्ध प्रेमाच्या सर्व अवस्थांना मायिक म्हणून ते मायावाद नामक एका सर्वाधम मताचा जगात प्रचार करतात. मायावादी लोक आधी तर एका शिवाय आणखी अधिक चित्-वस्तूचे असणे स्वीकार करीत नाहीत. ते हे सुद्धा स्वीकारत नाहीत की चित्-वस्तूत प्रेमधर्म आहे. ते म्हणतात की ब्रह्म जोपर्यंत एकावस्थेस प्राप्त आहे, तोपर्यंत ते मायेच्या अतीत आहे. जेव्हा ते कुठले स्वरूप ग्रहण करते तथा जीवरूपाने नाना तऱ्हेच्या आकारांना प्राप्त करते, तेव्हा ते मायाग्रस्त होते. म्हणून ते भगवंताच्या नित्यशुद्ध चिद्घन विग्रहास मायिक मानतात. या कारणानेच ते प्रेम आणि प्रेम-विकारास मायिक मानून अद्वैतज्ञानास निर्मायिक (मायेच्या पलीकडले) मानून त्याची स्थापना करतात. त्यांच्या भ्रांत मताची ही अद्वैतसिद्धी आणि प्रेम कधी एक पदार्थ होऊ शकत नाही.

परंतु भगवान श्रीचैतन्यदेवांनी ज्या प्रेमाचे आस्वादन करण्याकरिता उपदेश दिला आहे आणि आपल्या लीलाचरित्राद्वारे ज्याची शिकवण जगतास दिली आहे, ते मायेपासून संपूर्ण अतीत आहे–विशुद्ध अद्वैतसिद्धीचे चरम (शेवटचे, अंत्य) फळ आहे. महाभाव त्याच प्रेमाचा विकार विशेष आहे. त्यात कृष्ण प्रेमानन्द अत्यंत प्रबळ असतो. सुतरां (आधिक्याने) संवेदक (जाणणाऱ्याचे) आणि संवेद्याचे (जाणून

घेण्यास योग्य अशा विषयाचे) वेगळेपण आणि निगूढ संबंध एका वेगळ्या अवस्थेत पोचवितात. तुच्छ मायावाद या प्रेमाच्या कुठल्याच अवस्थेत काहीच कार्य करीत नाही.

संन्यासी ठाकूर आदरपूर्वक म्हणाले–प्रभो! हे माझ्या हृदयात पक्क बसलेय की मायावाद अतिशय अकिंचित्कर (निरुपयोगी) आहे, त्या संबंधी मला जो संशय होता तो देखील आपल्या कृपेने आज दूर झाला. माझ्या या मायावादी संन्यासी वेशास त्यागण्याची माझी खूप इच्छा होत आहे.

बाबाजी म्हणाले–महात्मन्! मी वेषावर कसल्याही प्रकारचा राग-द्वेष ठेवण्याचा उपदेश देत नाही. अंतःकरणाचा धर्म निर्मळ झाल्यानंतर वेष सहजच निर्मळ होऊन जातो. जेथे बाह्यवेषाचा विशेष आदर आहे, तेथे आंतरिक धर्मावर विशेष लक्ष दिले जात नाही. माझ्या समजुतीप्रमाणे प्रथम अंतःशुद्धी करून जेव्हा साधूंच्या बाह्य आचरणात अनुराग होतो, तेव्हा बाह्य वेष आदी निर्दोष होतात. आपण आपल्या हृदयास संपूर्णपणे श्रीकृष्णचैतन्यांच्या अनुगत करा, त्या नंतर ज्या बाह्य संबंधात रुची असेल, त्याचे आचरण करा. श्रीमन् महाप्रभूंच्या उपदेशांचे सर्वदा स्मरण ठेवा–

**मर्कट वैराग्य ना कर लोक देखाइया।**
**यथायोग्य विषय भुञ्ज अनासक्त हञा॥**

**अंतरे निष्ठा कर, बाह्ये लोक-व्यवहार।**
**अचिराते कृष्ण तोमाय करिबेन उद्धार॥**

(चै. च. म. १६/२३८-३९)

अर्थात बाहेरून लोकांना दाखवण्याकरता, मर्कट वैराग्य (माकडासारखे केवळ दिखाऊ वैराग्य) करू नका, परंतु मनाच्या वासनांना त्यागून आवश्यकतेनुसार विषयांचा भोग करावा. आत भगवन्निष्ठा बाळगून बाहेरून लौकिक कर्मांचे आचरण करावे. यामुळे श्रीकृष्ण तुम्हांस अतिशीघ्र संसारातून मुक्त करतील.

संन्यासी ठाकुरांनी या विषयीचा भाव समजून नंतर वेष परिवर्तनाचा मुद्दा काढला नाही. हात जोडून ते म्हणाले–प्रभो! मी जेव्हा आपल्या चरणांचा शिष्य होऊन आपल्या चरणांचा आश्रय घेतला तेव्हा आपण जो उपदेश कराल, तो उपदेश

कोणताही तर्क न करता मी शिरोधार्य मानेन. आपला उपदेश श्रवण करून मी हे समजलोय की विमल कृष्णप्रेमच एकमात्र वैष्णवधर्म आहे. हाच जिवाचा नित्यधर्म आहे. तोच धर्म पूर्ण, शुद्ध आणि सहज आहे. नाना देशांत, नाना प्रकारचे जे धर्म प्रचलित आहेत, त्या धर्मांविषयी मी काय भावना बाळगू?

बाबाजी म्हणाले–महात्मन्, धर्म एकच आहे, दोन किंवा अनेक नाही. जीवमात्राचा एकच धर्म आहे. त्याच धर्माचे नाव आहे वैष्णवधर्म. भाषाभेद, देशभेद आणि जातीभेदाने धर्म-भेद होऊ शकत नाही. लोक जैवधर्मास विविध नावांनी संबोधतात; परंतु वेगळा धर्म निर्माण करू शकत नाहीत. परम-वस्तूत अणू-वस्तूचे जे निर्मल चिन्मय-प्रेम आहे, त्यास जैवधर्म अथवा जीव संबंधीय धर्म म्हणतात. जीवसमूह नाना प्रकृतींनी युक्त आहे, म्हणूनच जैवधर्म देखील काही प्राकृत आकारांद्वारे विकृत रूपात पाहिला जातो. यामुळेच जैवधर्माच्या शुद्धावस्थेस वैष्णवधर्माच्या नावाने अभिहित केलेले आहे. अन्यान्य धर्मांमध्ये ज्या परिमाणात वैष्णवधर्म आहे, त्याच परिमाणात ते धर्म शुद्ध आहेत.

काही दिवसांपूर्वी मी श्रीव्रजधामात भगवत्पार्षद श्रीसनातन गोस्वामींच्या श्रीचरणीं एक प्रश्न केला होता. मुस्लीम धर्मात जो 'इश्क' शब्द आहे, त्याचा अर्थ निर्मळ प्रेम आहे की आणखी काही–हाच माझा प्रश्न होता. गोस्वामी सर्व शास्त्रांत पंडित आहेत, विशेषकरून अरबी-फारशीत तर त्यांच्या पांडित्याची सीमाच नाही. श्रीरूप गोस्वामी, श्रीजीव गोस्वामी आदी अनेक महामहोपाध्याय त्या सभेत उपस्थित होते. श्रीसनातन गोस्वामींनी माझ्या प्रश्नाचे उत्तर अशाप्रकारे दिले–

हो, 'इश्क' शब्दाचा अर्थ प्रेमच आहे. मुसलमान उपासकगण ईश्वर भजनाच्या विषयीसुद्धा 'इश्क' शब्दाचा व्यवहार करतात; परंतु प्रायः 'इश्क' शब्दाने मायिक प्रेमच लक्षित होते. लैला-मजनूचा इतिहास आणि कवीवर (श्रेष्ठ कवी) हाफिजांच्या इश्काचे वर्णन बघितल्यास हे प्रतीत होते की यवनाचार्यगण शुद्ध चित्-वस्तू काय आहे, याची उपलब्धी करू शकले नाहीत; स्थूलदेहाच्या प्रेमास आणि कुठे-कुठे लिंगदेहाच्या प्रेमासच त्यांनी 'इश्क' म्हटले आहे.

विशुद्ध चित्-वस्तूस वेगळे करून कृष्णाप्रती जे विमलप्रेम असते, त्याचा त्यांनी अनुभव केला नाही. तसे प्रेम मी यवन आचार्यांच्या कुठल्याही ग्रंथात पाहिले नाही. ते केवळ वैष्णव ग्रंथांतच पहावयास मिळते. यवनाचार्यांचा 'रूह' शब्द म्हणजे

जीव आहे–असेसुद्धा प्रतीत होत नाही. उलटपक्षी बद्ध जिवासच ते 'रूह' म्हणतात, असे कळते. अन्य कुठल्याही धर्मात मी विमल कृष्णप्रेमाचा उपदेश पाहिला नाही. वैष्णव धर्मात साधारणतः कृष्णप्रेमाचा उल्लेख आहे. श्रीमद्भागवतात 'प्रोज्झित कैतवधर्म' रूप श्रीकृष्णप्रेम विशद रूपाने वर्णित झाले आहे. परंतु माझा असा विश्वास आहे की श्रीकृष्णचैतन्यांच्या आधी कुणीदेखील विमल कृष्णप्रेम-धर्माची शिकवण दिली नाही. माझ्या बोलण्यावर जर तुमची श्रद्धा असेल तर हा सिद्धांत जरूर ग्रहण करा. मी हा उपदेश ऐकून गोस्वामींना वारंवार दंडवत प्रणाम केला.

संन्यासी ठाकुरांनीसुद्धा बाबाजींच्या मुखातून हे ऐकून त्या वेळी दंडवत-प्रणाम केला.

परमहंस बाबाजी म्हणाले–हे भक्तश्रेष्ठ! आता आपल्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर देतो; एकाग्रचित्ताने ऐका. जीवसृष्टी आणि जिवाची जडण-घडण हे शब्द मायिक संबंधांत उपयोगात आणले जातात. जडीय वाक्य काही-काही जडीय भावांचे आश्रय घेऊन कार्य करतात. भूत, भविष्य आणि वर्तमान या तिन्ही अवस्थांमध्ये जो काळ विभक्त आहे, तो मायागत जडीय काळ आहे. चित्-जगात जो काळ आहे, तो सर्वदा वर्तमान आहे. त्यात भूत भविष्यरूप विभागगत व्यवधान वा अंतर नसते. जीव आणि कृष्ण त्याच काळात विराजमान असतात. म्हणूनच जीव नित्य आणि सनातन आहे. या जड-जगात आबद्ध झाल्यानंतर जिवाची सृष्टी, गठन, पतन हे सगळे धर्म मायिक काळाच्या अंतर्गत जिवात आरोपित झाले आहेत, जीव अणूपदार्थ असूनही चिन्मय आणि सनातन आहे. जड-जगात येण्याआधीच त्याचे गठन होते. चित्-जगात भूत-भविष्यरूप अवस्था न राहिल्यास त्या काळात जे काही होते, ते सर्व नित्य वर्तमान आहे. जीव आणि जिवाचा धर्म वास्तविक नित्य-वर्तमान आणि सनातन आहे. ही गोष्ट मी अवश्य सांगितली आहे, परंतु आपण जेवढा शुद्ध-चित् जगताचा भाव प्राप्त केलेला आहे, तेवढीच या कथनाच्या यथार्थ अर्थाची उपलब्धी आपणास होईल. मी आपणास आभासमात्र दिला आहे, आपण चित्-समाधीद्वारे याच्या अर्थांचा अनुभव करून घ्या. जडजात युक्ती आणि तर्काद्वारे या सगळ्या गोष्टी आपल्या लक्षात येणार नाहीत. जड बंधनातून अनुभवशक्तीला जितके ढिले करता येईल, तितकाच जडातीत चित् जगताचा अनुभव उदित होईल. प्रथम आपण शुद्ध स्वरूपाचा अनुभव आणि शुद्ध चिन्मय कृष्णनामाचे अनुशीलन केले तरच जैवधर्म प्रबल रूपात उदित होईल. अष्टांगयोग वा ब्रह्मज्ञानाने चित्-अनुभव विशुद्ध होत नाही. साक्षात कृष्णाचे

अनुशीलनच नित्यसिद्ध धर्मांचा उदय करण्यास समर्थ आहे. आपण निरंतर उत्साहाने हरिनाम कीर्तन करा. हरिनामाचे अनुशीलनच एकमात्र चिदनुशीलन आहे. काही दिवस हरिनाम करता-करता त्या नामात अपूर्व अनुराग उदित होईल. भक्तीचे जितक्या प्रकारचे अंग आहेत, त्यात श्रीहरिनामाचे अनुशीलनच प्रधान आणि शीघ्र फलदायी आहे. यामुळेच श्रीकृष्णदासांच्या उपादेय ग्रंथात श्रीमहाप्रभूंचा उपदेश आहे–

**भजनेर मध्ये श्रेष्ठ नवविधा भक्ति।**
**कृष्णप्रेम कृष्ण दिते धरे महाशक्ति॥**
**तार मध्ये सर्वश्रेष्ठ नाम-संकीर्तन।**
**निरपराधे नाम कैले पाय प्रेमधन॥**

(चै. च. म. ४/७०-७१)

अर्थात सर्व भजनांमध्ये नवविधा भक्ती श्रेष्ठ आहे जी कृष्णप्रेम आणि कृष्णाला देण्याची महाशक्ती राखून असते. त्यात (नवधा भक्तीत) नाम संकीर्तन सर्वश्रेष्ठ आहे, निरपराध होऊन कृष्ण नामसंकीर्तन केल्याने प्रेमधनाची प्राप्ती होते.

महात्मन्! जर आपण ही जिज्ञासा कराल की वैष्णव कोणास म्हणावे, तर याच्या उत्तरादाखल मी इतकेच म्हणेन की जो अपराधांना त्यागून भावासहित कृष्णनाम करतो, तोच खरा वैष्णव. वैष्णव तीन प्रकारचे असतात–कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम. जे अधूनमधून कृष्णनाम घेतात, ते कनिष्ठ वैष्णव आहेत. जे निरंतर कृष्ण नाम घेतात, ते मध्यम वैष्णव आहेत आणि ज्यांना पाहताक्षणीच मुखातून आपोआप हरिनाम निघते, ते उत्तम वैष्णव आहेत. महाप्रभूंच्या शिक्षेनुसार अन्य कुठल्याही लक्षणाने वैष्णवाचा निर्णय करू नये.

संन्यासी ठाकूर बाबाजींच्या शिक्षामृतामध्ये निमग्न होऊन–**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे। हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥** हे नामगान करत नृत्य करू लागले. त्या दिवशी त्यांची हरिनामात रुची उत्पन्न झाली. गुरूच्या श्रीचरणकमळी साष्टांग प्रणाम करीत त्यांनी म्हटले–प्रभो! दीनबंधो! या दीनावर कृपा करावी.

**॥ दुसरा अध्याय समाप्त ॥**

# तिसरा अध्याय (नैमित्तिक धर्म असंपूर्ण, तुच्छ, मिश्र आणि अचिरस्थायी आहे )

एकदा एक प्रहर रात्र सरल्यानंतर संन्यासी महाराज हरिनाम गान करता करता करता श्रीगोद्रुमाच्या उपवनात एकांतात उंच जागी बसून उत्तरेकडे पाहू लागले. त्यावेळेस पूर्णचंद्राचा उदय झाला होता. श्रीनवद्वीप मंडळाची शोभा अपूर्व दिसत होती. थोड्याच अंतरावरील मायापूर दृष्टिगोचर होऊ लागले.

संन्यासी महाराज म्हणाले–अहा! मी तर हे एक विचित्र आनंदमय धाम पहातो आहे. मोठमोठ्या रत्नमयी इमारती, मंदिर आणि तोरणसमूह आपल्या किरणावलींनी जान्हवीकुलास (गंगातटास) उज्ज्वल करीत होते. अनेक स्थानी हरिनाम-संकीर्तनाचा ध्वनी तुमुल होऊन गगन मंडळास भेदून जात होता. नारदांसमान कितीतरी शेकडो भक्त वीणा वादन करीत नामगान करता करता नृत्य करू लागले होते. एकीकडे श्वेतशरीर देवदेव महादेव हातात डमरू घेऊन "हा विश्वंभर दया करा" म्हणत तांडव नृत्य करीत-करीत धरतीवर लोळण घेत होते. दुसरीकडे चतुर्मुख ब्रह्मा वेदवादी ऋषींच्या सभेत बसून–

**महानप्रभुर्वै पुरुषः सत्वस्यैषः प्रवर्त्तकः।**
**सुनिर्मलामिमां प्राप्तिमीशानो ज्योतिरव्ययः॥**[१]

(श्वे. उ. ३/१२)

–हा वेदमंत्र पठण करत त्याची निर्मळ व्याख्या करीत आहेत. कुठे-कुठे इंद्रादी देवगण "जय प्रभू गौरचन्द्र, जय नित्यानन्द" म्हणत उड्या मारीत आहेत. पक्षिवृंद फांद्यांवर बसून "गौर निताई" नामाचा घोष करीत आहेत. भ्रमर गौर-नामरस पानात मत्त होऊन पुष्पोद्यानात चतुर्दिक गुंजन करत आहेत. प्रकृतिदेवी गौररसाने उन्मत्त होऊन सर्वत्र आपली छटा (आभा) पसरवीत आहे. अहा! दिवसा जेव्हा मी मायापुरचे दर्शन करतो तेव्हा हे सगळे काही दिसतच नाही. आणि आज हे काय पहातो आहे! मग पुन्हा श्री गुरुदेवांना स्मरण करीत बोलू लागले–प्रभो! आज

(१) हा पुरुष निश्चितच महान प्रभू अर्थात महाप्रभू आहे. तेच अंतःकरण अर्थात बुद्धी-प्रवृत्तीचे प्रवर्तक आहेत. त्यांच्या कृपेनेच सुनिर्मल शांती प्राप्त होते. ते ज्योतिस्वरूप अर्थात कनक-कांतीयुक्त आणि अव्यय (ऱ्हास-वृद्धिशून्य) प्रेममय आहेत.

मी समजलो की आपण कृपा करून मला अप्राकृत मायापुरचे दर्शन घडवले. आजपासून मी देखील श्रीगौरचन्द्रांचा निजजन म्हणून आपला परिचय देईन. मी पहातोय की या अप्राकृत नवद्वीपात सगळ्यांनी तुळशीच्या माळा, तिलक आणि नामांकित उत्तरीय धारण केलेले आहे. मी सुद्धा असेच करीन.

असे म्हणता-म्हणता संन्यासी महाराजांची एक प्रकारची अचेतन अवस्था झाली होती. थोड्या वेळातच त्यांना परत बाह्य-ज्ञान झाले. ज्ञान तर झाले, परंतु ते अपूर्व चिन्मय दृश्य परत नयनगोचर होऊ शकले नाही (डोळ्यांसमोर येऊ शकले नाही).

तद्नंतर संन्यासी महाराज रडतरडत म्हणाले–मी खूपच सौभाग्यशाली आहे; कारण श्रीगुरूची कृपा लाभल्यावर क्षणभर श्रीनवद्वीपधामाचे दर्शन तर झाले.

दुसऱ्या दिवशी संन्यासी महाराज आपला एकदंड पाण्यात विसर्जन करून गळ्यात त्रिकंठी तुळशीची माळ आणि ललाटावर ऊर्ध्वपुंड्र धारण करीत “हरी हरी” म्हणत नृत्य करू लागले. गोद्रुमवासी वैष्णवगण त्यांचा अपूर्व नूतन वेष आणि भाव पाहून त्यांना धन्य-धन्य म्हणत दंडवत प्रणाम करू लागले.

संन्यासी महाराजांनी या वेळेस काहीसे लज्जित होत म्हटले–अहो, मी वैष्णवांचा कृपापात्र होण्याकरता हा वेष धारण केला आहे, परंतु येथे आणखी एक बाधा निर्माण झालीय. मी गुरुदेवांच्या मुखातून वारंवार असे ऐकले आहे की–

**तृणादपि सुनीचेन तरोरपि सहिष्णुना।**
**अमानिना मानदेन कीर्तनीयः सदा हरिः॥** [२]

(चै. च. अ. २०/२१)

ज्यांना मी आपला गुरू मानतो, आता तेच वैष्णवगण मला प्रणाम करीत आहेत. माझी गती काय होईल? अशा प्रकारे मनातल्या मनात विचार करता-करता ते परमहंस बाबाजींकडे गेले आणि त्यांना साष्टांग दंडवत प्रणाम करून नतमस्तक होऊन उभे राहिले.

---

(२) तृणापेक्षाही सुनीच आणि वृक्षापेक्षाही सहनशील होऊन स्वतः अभिमान शून्य होऊन, दुसऱ्यांना सन्मान देत सर्वदा हरि-कीर्तन करायला हवे.

बाबाजी माधवी मंडपात बसून हरिनाम करीत होते. त्यांनी संन्यासी महाराजांचा संपूर्ण वेष-परिवर्तन आणि नामाप्रती भावोदय पाहून प्रेमाश्रूंनी त्यांना अभिषिक्त करीत मिठी मारली आणि म्हटले–वैष्णवदास! आज तुमच्या मंगलमय शरीराचा स्पर्श करून मी कृतार्थ झालो.

असे म्हटल्याबरोबर संन्यासी महाराजांचे पूर्व नाम दूर झाले. आता ते वैष्णवदास या नावाने परिचित झाले. संन्यासींना आजपासून एक अपूर्व जीवन प्राप्त झाले. मायावादी संन्यासाचा वेष, संन्यासाश्रमाचे अहंकारपूर्ण नाम आणि स्वतःस थोर समजण्याचा अभिमान–सर्व काही दूर झाले.

तिसऱ्या प्रहरी श्रीप्रद्युम्नकुंजात श्रीगोद्रुम आणि श्रीमध्वदीपाचे अनेक वैष्णव परमहंस-बाबाजींचे दर्शन घेण्याकरता आले होते. ते परमहंस बाबाजींना चारही बाजूंनी घेरून बसले होते. सगळेजण तुळशीच्या माळेवर हरिनामाचा जप करीत होते. कुणी-कुणी "हा गौरांग नित्यानन्द!" कुणी-कुणी "हा सीतानाथ!" आणि कुणी कुणी "जय शचीनन्दन!" इत्यादी म्हणत अश्रूंनी चिंब भिजत होते. सगळेच परस्पर इष्टगोष्टी करीत होते. याच वेळेस वैष्णवदास श्रीवृन्दादेवीची परिक्रमा करून वैष्णवांच्या चरणधुळीत लोळण घेऊ लागले.

कुणी-कुणी महात्मा आपापसांत कुजबुजू लागले–हेच ना ते संन्यासी महाराज आहेत? आज यांची कशी अद्भुत मूर्ती झाली आहे.

वैष्णवांसमोर पृथ्वीवर लोळण घेतांना वैष्णवदास म्हणत होते–आज मी वैष्णवांची चरणधूळ प्राप्त करून धन्य झालो. श्रीगुरुदेवांच्या कृपेने मी हे व्यवस्थित जाणू शकलो की वैष्णवपदधूळीविना जिवाची अन्य गती नाही. वैष्णव पायधूळ, वैष्णवोदक आणि वैष्णव अधरसुधा–या तिन्ही वस्तू भवरोगाचे औषध आणि भवरोग्याकरिता उत्तम पथ्य आहे. यामुळे केवळ भवरोगच दूर होत नाही, तर ज्यांचा भवरोग दूर झालाय अशा पुरुषांना यापासून परम भोगाचीही प्राप्ती होते. हे वैष्णवगण! असे समजू नका की मी माझ्या पांडित्याच्या अहंकाराचे प्रदर्शन करीत आहे. आजकाल माझे हृदय सर्वच अहंकारांतून मुक्त झाले आहे. ब्राह्मण-कुळात जन्म झाला होता, सर्व शास्त्रांचे अध्ययन केले होते आणि चतुर्थाश्रमात प्रवेशही झाला होता. त्यावेळेस माझ्या अहंकारास सीमा नव्हती. परंतु जेव्हापासून मी वैष्णवतत्त्वाकडे आकृष्ट झालोय, तेव्हापासून माझ्या हृदयात एक दीनतेचे बीज रोपित

झाले आहे. आपणा सर्वांच्या कृपेने मी क्रमशः जन्म-अहंकार, विद्यामद आणि आश्रमगौरवास दूर सारले आहे. या क्षणी मला असे वाटते आहे की मी एक निराश्रित क्षुद्र जीव आहे. वैष्णव-चरणाश्रयाविना माझी अन्य कुठलीच गती नाही. ब्राह्मणत्व, विद्या आणि संन्यास, हे माझे अधःपतन करीत होते. मी सरल भावाने आपण लोकांच्या चरणी सर्व गोष्टी निवेदित केल्या आहेत. आपण आपल्या दासाचे जे काही करायचे, ते करावे.

वैष्णवदासाची ही दीनतापूर्वक वचने ऐकून त्यांपैकी अनेक जण म्हणाले–हे भागवत-प्रवर (भक्त-श्रेष्ठ)! आपल्यासारख्या वैष्णवाचा चरणरेणू प्राप्त करण्यास आम्ही लालायित आहोत. कृपापूर्वक आम्हाला आपली पायधूळ देऊन कृतार्थ करा. आपण परमहंस बाबाजींचे कृपापात्र आहात, आम्हालादेखील आपला संगी (मित्र) बनवून पवित्र करा. आपल्यासारख्या भक्तांच्या संगानेच तर भक्ती प्राप्त होऊ शकते. शास्त्रांचे कथन आहे–

**भक्तिस्तु भगवद्भक्तसङ्गेन परिजायते।**
**सत्संङ्गः प्राप्यते पुंभिः सुकृतैः पूर्व संचितैः॥**

(बृहन्नारदीयपुराण ४/३३)

अर्थात, भगवद्भक्तांच्या संग प्रभावाने भक्तिवृत्तीचा उदय होतो. जीव आपल्या पूर्व-पूर्व जन्मांच्या संचित सुकृत्याच्या फळामुळेच विशुद्ध भक्तांचा संग मिळवू शकतात.

आमची खूप भक्तिपोषक सुकृती होती, यामुळेच आम्ही आपला सत्संग मिळविला आहे. आता आम्ही आपल्या सत्सगांने हरिभक्ती लाभ करण्याची आशा करतो.

वैष्णवांची परस्पर दीनता आणि प्रणिपात समाप्त झाल्यावर त्या भक्त गोष्ठीत (सभेत) वैष्णवदास एकीकडे बसून परिवाराची शोभा वाढवू लागले, त्यांच्या हातात हरिनामाची माळ शोभायमान होत होती.

त्या सभेत (चर्चासत्रात) त्या दिवशी एक भाग्यवान पुरुष बसले होते. त्यांनी लहानपणापासूनच अरबी-फारशी भाषेचा अभ्यास करून बऱ्याचशा मुसलमान

राजांच्या व्यवहाराचे अनुकरण केल्याने त्यांना देशात एक प्रतिष्ठित व्यक्ती समजले जात होते. निवास शान्तिपूर येथे होता. ब्राह्मण जाती आणि त्यातही कुलीन. मोठी जमीनदारी होती. लोकांमध्ये दलबंदी (गटबाजी) घडवून आणण्याच्या कामात मोठे निपुण होते. खूप दिवसापर्यंत त्या पदांचा उपभोग घेतल्यानंतरही त्यातून त्यांना काहीच सुख मिळाले नाही. अंततः त्यांनी हरिनाम-संकीर्तनास आरंभ केला.

बाल्यकाळातच त्यांनी दिल्लीच्या मोठमोठ्या उस्तादांकडून राग-रागिणींचे शिक्षण घेतले होते. त्या शिक्षणाच्या बळावरच ते हरिनाम-संकीर्तनातही पुढारी ठरले होते. यद्यपि वैष्णवजन त्यांच्या उस्तादी सुरांना पसंद करीत नव्हते, तथापि संकीर्तनात ते थोडी-थोडी गायकी दाखवून आपला मोठेपणा प्रकट करीत-करीत प्रशंसेच्या अभिलाषेने इतरांच्या तोंडाकडे बघत असत. काही दिवसापर्यंत असे करता-करता त्यांना नाम-संकीर्तनात काही सुख मिळू लागले. त्यानंतर त्यांनी श्रीनवद्वीपात वैष्णवांनिकट गानकीर्तनात सम्मिलित होण्यासाठी श्रीगोद्रुमात येऊन एका वैष्णवाश्रमात मुक्काम ठोकला. एकदा एका वैष्णवासोबत ते प्रद्युम्नकुंजाच्या मालती-माधवी मंडपात बसले होते. वैष्णवांचा परस्पर व्यवहार, दैन्य प्रकाश आणि वैष्णवदासांचे बोलणे ऐकून, त्यांच्या मनात अनेक शंका उपस्थित झाल्या. ते बोलण्यात निपुण होते, म्हणून साहसपूर्वक त्यांनी वैष्णव-सभेत जिज्ञासा केली. त्यांचा प्रश्न अशा प्रकारे होता–

मनुस्मृती आदी धर्मशास्त्रांत ब्राह्मणवर्णास सर्वोत्तम वर्ण म्हटले गेले आहे. त्यानुसार ब्राह्मणांसाठी संध्या, वंदना आदी नित्य कर्म आहेत. जर ही कार्ये नित्य आहेत तर वैष्णवांचे व्यवहार त्यांच्या विरुद्ध का असतात?

वैष्णवांना तर्क-वितर्क केलेले आवडत नाहीत. एखादा तार्किक ब्राह्मण जर हा प्रश्न करत असेल तर कलहाच्या भयाने काही उत्तर दिले नसते. परंतु समागत (आलेल्या) प्रश्नकर्त्यास हरिनाम-गान करणारा जाणून त्या सगळ्यांनी म्हटले– श्रीयुत परमहंस बाबाजी महाशय जर या प्रश्नाचे उत्तर देतील तर आम्हाला आनंद होईल.

परमहंस बाबाजींनी वैष्णवांचा आदेश ऐकून दंडवत-प्रणाम (साष्टांग-नमस्कार) करून म्हटले–महोदयगण, जर आपणा सर्वांची इच्छा असेल तर भक्त-

प्रवर श्रीवैष्णवदासांनी उक्त प्रश्नाचे सम्यक (योग्य) उत्तर द्यावे. सर्वांनी त्याचे अनुमोदन केले.

वैष्णवदास श्रीगुरुदेवांचे म्हणणे ऐकून स्वतःस धन्य समजून नम्रतापूर्वक म्हणाले–मी अत्यंत अधम आणि अकिंचन (निर्धन) आहे. अशा महत् (मोठ्या) विद्वत्सभेत मी काही बोलणे तसे नितांत अनुचित आहे, तरीदेखील गुरुदेवांची आज्ञा सर्वदा शिरोधार्य आहे. मी गुरुदेवांच्या मुखारविंदातून निघालेल्या ज्या तत्त्वोपदेशरूप मधाचे पान केले आहे, त्यास स्मरण करून यथाशक्ती बोलतो. असे म्हणत वैष्णवदासांनी परमहंस बाबाजींची पायधूळ आपल्या संपूर्ण शरीरास लावून बोलणे आरंभ केले–

जे साक्षात परमानंदमय भगवंत आहेत, ब्रह्म ज्यांची अंगकांती आहे आणि परमात्मा ज्यांचा अंश आहे, समस्त प्रकाश आणि विलासाचे आधारस्वरूप ते श्रीकृष्णचैतन्यदेवच आमच्या बुद्धिवृत्तीत प्रेरणा करोत. मनुस्मृती आदी धर्मशास्त्र वेदशास्त्रांच्या अनुगत विधी-निषेध-निर्णायक शास्त्र असल्याकारणाने त्यांचा जगात सर्वत्र आदर आहे. मानव प्रकृती दोन प्रकारची असते–(१) वैधी आणि (२) रागानुगा. जोपर्यंत मानवाची बुद्धी मायेच्या अधीन असते तोपर्यंत मनुष्य प्रकृती अवश्यच वैधी रहाते. मायेच्या बंधनातून मनुष्याची बुद्धी मुक्त झाल्यावर पुन्हा वैधी प्रवृत्ती रहात नाही–त्यात रागानुगा प्रकृती प्रगट होते. रागानुगा प्रकृती हीच जिवाची शुद्ध प्रकृती–स्वभावसिद्ध, चिन्मय आणि जडमुक्त आहे. श्रीकृष्णाच्या इच्छेने शुद्ध चिन्मय जिवाचा जड संबंध दूर होतो, परंतु जोपर्यंत कृष्णाची इच्छा होत नाही, तोपर्यंत जड संबंध केवळ क्षयोन्मुख असतो. त्या क्षयोन्मुख अवस्थेत मानवबुद्धी स्वरूपतः जडमुक्त नसते, अर्थात त्यावेळीदेखील वस्तुतः जडमुक्त नसते. वस्तुतः जडमुक्त झाल्यावर शुद्ध जिवाची रागात्मिका वृत्ती स्वरूपतः आणि वस्तुतः उदित होते. व्रजवासींची प्रकृतीच रागात्मिका प्रकृती आहे. क्षयोन्मुख अवस्थेत त्याच प्रकृतीच्या अनुगत झाल्याने जीव रागानुग होऊ लागतो. जिवाकरिता ही अवस्था फारच उपादेय (उत्तम) असते. जोपर्यंत ही अवस्था उपस्थित होत नाही, तोपर्यंत मानव-बुद्धीचा अनुराग मायिक वस्तूंतच रहातो. निसर्गामुळे (मायेमुळे परिवर्तीत स्वभावाने) मूढ जीव मायिक विषयांच्या अनुरागासच आपला स्वाभाविक अनुराग समजण्याची चूक करतो. चिद्विषयाचा स्वाभाविक विशुद्ध अनुराग त्यावेळी सुद्धा नसतो. मायिक विषयात, "मी आणि माझा" हे दोन अभिमान प्रगाढ रूपात कार्य करतात. "हा देह

माझा आहे आणि देहच मी आहे" या बुद्धीद्वारे या जडदेहास सुखदायक व्यक्ती आणि वस्तूच्या प्रती प्रीती आणि सुखबाधक व्यक्ती आणि वस्तुप्रती द्वेष सहजच होत असतो. या राग-द्वेषाच्या वशीभूत होऊन मूढ जीव दुसऱ्याच्याप्रती शारीरिक, सामाजिक आणि नैतिक प्रीती वा विद्वेष प्रकट करून त्यास शत्रू-मित्र समजतात– विषयांकरिता विवाद करतात. कनक आणि कामिनीत मिथ्या (खोटी) प्रीती ठेवून सुख-दुःखाच्या अधीन होतात. याचेच नाव 'संसार' आहे. या संसारात आसक्त होऊन जन्म, मरण, कर्मफल, उच्च-नीच अवस्था प्राप्त करून मायाबद्ध जीव भ्रमण करतात. या जीवांना चिदनुराग सहजपणे जाणता येत नाही. चिदनुराग काय वस्तू आहे, याचीदेखील त्यांना उपलब्धी नसते. अहा! चिदनुरागच जिवाचा स्वधर्म आणि नित्य प्रकृती आहे–हे विसरून जडानुरागात विभोर होऊन चित्कण स्वरूप जीव अधोगतीचा भोग करतो. संसारात प्रायः सर्व जीव या दुर्दशेस दुर्दशा समजतच नाहीत.

रागात्मिका प्रकृती प्राप्तीची गोष्ट तर दूरच, मायाबद्ध जीव रागानुगा प्रकृतीपासून सुद्धा अगदी अपरिचित असतात. कधी-कधी साधूंच्या कृपेने जिवांच्या हृदयात रागानुगा प्रकृतीचा उदय होतो. म्हणूनच रागानुगा प्रकृती विरळ आणि दुर्लभ आहे. संसार त्या प्रकृतीपासून वंचित आहे.

परंतु भगवान सर्वज्ञ आणि कृपामय आहेत. त्यांनी पाहिले–मायाबद्ध जीव चित्-प्रवृत्तीपासून वंचित झाला आहे. मग आता त्याचे मंगल कशा प्रकारे होणार? मायामुग्ध जीवांमध्ये कृष्ण-स्मृती उदित होण्याचा उपाय काय असू शकतो? साधुसंग झाल्याने जीव स्वतःस कृष्णदास समजू शकेल. परंतु साधुसंगाकरिता काही निर्दिष्ट नियम नाही. म्हणून ह्याची आशाही कशी बरी केली जाऊ शकते, की तो सर्वांकरता संभव वा सुलभ होईल? म्हणून साधारण लोकांकरिता कुठलाच विधीमार्ग नसल्याने त्यांचे कोणतेच कल्याण होत नाही. भगवंताची अशीच कृपा शास्त्र-दृष्टीने उदित झाली. आर्यहृदयरूपी आकाशात भगवत्-कृपा-प्रसूत शास्त्र-सूर्याने उदित होऊन सर्वसामान्यांकरिता सर्व प्रकारच्या आज्ञा-विधींचा प्रचार केला.

सर्वप्रथम वेद-शास्त्रे निर्माण झाली. वेद-शास्त्रांच्या कुठल्या भागात कर्म, कुठल्या भागात ज्ञान आणि कुठल्या भागात प्रीतिरूपाभक्तीचे उपदेश दिले गेलेत. मायामुग्ध जिवांच्या अनेक अवस्था आहेत. कुणी बिलकूल मूढ, तर कुणी विज्ञ

आहेत आणि कुणी-कुणी बऱ्याच विषयांत विज्ञ असतात. जिवाची जशी बुद्धी असते, शास्त्रांत त्याच्याप्रती तसाच आदेश असतो. याचेच नाव अधिकार आहे. यद्यपि जिवांच्या संख्येनुसार अधिकारही अनंत आहेत, तरीसुद्धा मुख्य-मुख्य लक्षणांनुसार ते तीन भागांत विभक्त आहेत–(१) कर्माधिकार (२) ज्ञानाधिकार आणि (३) प्रेमाधिकार. वेद् शास्त्रांत असेच त्रिविध अधिकार निर्दिष्ट केलेले आहेत. वेदात विधींचे निर्माण करून या तीन अधिकारांच्या कर्तव्याकर्तव्याचा निर्णय केला गेला आहे. यावरून निर्दिष्ट धर्माचे नाव वैध-धर्म आहे. मनुष्य ज्या प्रवृत्तीने परिचालित होऊन त्या धर्मास ग्रहण करतात, त्या प्रवृत्तीचे नाम वैधी-प्रवृत्ती आहे. ज्यात वैधी-प्रवृत्ती नाही, ते नितांत अवैध आहेत, अवैध मनुष्य पाप कर्मांत निरत रहातात. त्यांचे जीवन सदा अवैध कर्मांमध्येच लागलेले असते. असे लोक वेदांपासून बहिर्भूत असतात आणि म्लेच्छ इत्यादी नावांनी संबोधिले जातात. वेद् शास्त्रांनी ज्या त्रिविध अधिकारांचे निर्णय केलेले आहेत; त्यांचेच ऋषींनी संहिता शास्त्रांत विस्तार करून वेदानुगत अन्यान्य शास्त्रांना प्रकाशित केले आहे. मनू आदी पंडितांनी वीस धर्मशास्त्रांत कर्माधिकाराचे वर्णन केले आहे. दार्शनिकांनी तर्क आणि विचार शास्त्रांमध्ये ज्ञानाधिकाराचा विचार केला आहे. पौराणिक आणि विशुद्ध तांत्रिकांनी भक्तितत्त्वाच्या अधिकारगत उपदेशांचे आणि क्रियांचे निर्णय केलेले आहेत. हे सर्व वैदिक आहेत. या शास्त्रांच्या नवीन मीमांसकांनी सर्व शास्त्रांच्या तात्पर्याकडे दृष्टी न ठेवता कुठे-कुठे एखाद्या अंगाची सर्वोत्कृष्टता वर्णित करून कितीतरी लोकांना वितर्क आणि संदेहाच्या खड्ड्यात ढकलून दिले आहे. त्या शास्त्रांच्या अपूर्व मीमांसारूप गीताशास्त्रास पाहिल्याने प्रतीत होते की कर्माचा उद्देश ज्ञात नसल्याने अशा कर्मास पाखंड समजून त्याचा परित्याग करणेच योग्य आहे. मग कर्मयोग आणि ज्ञानयोग भक्तीच्या उद्देशाने नसतील, तर कर्म आणि ज्ञान दोन्हीही पाखंडच भासतात. कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग वास्तविक एकच योग आहेत–हाच वैदिक वैष्णव सिद्धांत आहे.

मायामुग्ध जिवास आधीच कर्माचा आश्रय घ्यावा लागतो. यानंतर कर्मयोग, आणि ज्ञानयोग, अंततः भक्तियोगास ग्रहण करावे लागते. मायामोहित जिवांना जोपर्यंत एखादा सोपान (जिना) दाखविला जात नाही तोपर्यंत ते कुठल्याही प्रकारे उंच भक्ती मंदिर गाठू शकत नाहीत.

कर्माचा आश्रय करणे कोणास म्हणतात? जीवन धारणपूर्वक शरीर आणि मनाने जे काही केले जाते, त्यास कर्म म्हणतात. कर्म दोन प्रकारची असतात–एक

शुभ आणि दुसरे अशुभ. शुभ कर्माद्वारे जिवास शुभ फळ मिळते आणि अशुभ कर्माद्वारे अशुभ फळ. अशुभ कर्मास 'पाप' वा 'विकर्म' म्हणतात. शुभ कर्म न करण्यास 'अकर्म' म्हणतात. हे दोन्हीही वाईट आहेत. शुभ कर्मच उत्तम आहे. शुभ कर्मसुद्धा तीन प्रकारचे असतात–(१) नित्य, (२) नैमित्तिक आणि (३) काम्य. काम्यकर्म सर्वथा स्वार्थाने परिपूर्ण असल्याने तुच्छ आहे. नित्य आणि नैमित्तिक कर्मांचा उपदेश शास्त्रांत दिला गेला आहे. हेयता आणि उपादेयतेच्या विचाराने शास्त्रांमध्ये नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्मांनाच कर्म म्हणतात. अकर्म आणि कुकर्म कर्म म्हणविले गेले नाहीत. अशा प्रकारे जेव्हा काम्यकर्मास सुद्धा तुच्छ समजून त्याग केला जातो, तेव्हा नित्य आणि नैमित्तिक कर्मच, कर्म आहेत. शरीर, मन, समाज आणि परलोकाच्या मंगलजनक कर्मास नित्यकर्म म्हणतात. नित्यकर्म सर्वांकरिताच कर्तव्य कर्म आहेत. जे कर्तव्य कर्म, कुठल्या निमित्ताचा आधार घेऊन नित्यकर्माप्रमाणे केले जातो, त्यास नैमित्तिक कर्म म्हणतात. संध्या, वंदना, पवित्र उपायांद्वारे शरीर आणि समाज रक्षण, सत्य-व्यवहार आणि पालनीयाचे पालन हे सर्व नित्यकर्म आहेत. मृत माता-पित्यांप्रती कर्तव्याचे पालन आदी आणि पाप उपस्थित झाल्यावर प्रायश्चित्त करणे–ही सगळी नैमित्तिक कर्मे आहेत.

ही नित्य आणि नैमित्तिक कर्मे सुचारु रूपात जगात अनुष्ठित व्हावीत, असे विधान करण्याच्या अभिप्रायाने शास्त्रकारांनी मनुष्याचा स्वभाव आणि त्याच्या स्वाभाविक अधिकाराचा विचार करून "वर्णाश्रमाच्या नावाने एक धर्मव्यवस्था करून ठेवली आहे." या व्यवस्थेचा अभिप्राय हा आहे की कर्मांचे अनुष्ठान करण्यायोग्य मनुष्य स्वभावतः चार प्रकारचे असतात–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र. हे लोक ज्या अवस्थांचे अवलंबन करून संसारात अवस्थित असतात, त्या चार प्रकारच्या असतात, त्यांनाच आश्रम असे म्हणतात. गृहस्थ, ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यास–हे चार आश्रम आहेत. ज्यांना कुकर्म आणि अकर्म प्रिय आहेत, ते अंत्यज वर्णाचे आणि विना आश्रमाचे आहेत. वर्ण–स्वभाव, जन्म, क्रिया आणि लक्षणांद्वारे निरुपित होतो. जेथे केवळ जन्माद्वारेच वर्ण निरुपित होतो, तेथे वर्णाश्रमाच्या मूळ तात्पर्याची हानी हेच एकमात्र फळ असते. विवाहित अवस्था, अविवाहित अवस्था आणि स्त्रीसंगाच्या त्यागानंतर येणारी वैराग्य अवस्था, या अवस्थांनुसार आश्रम निर्दिष्ट झाले आहेत. विवाहित अवस्थाच गृहस्थाश्रम होय. अविवाहित अवस्था ब्रह्मचाऱ्याचा आश्रम आहे, स्त्रीसंगापासून विरक्त होण्याची अवस्था वानप्रस्थ आणि

संन्यास आहे. संन्यास हाच सर्वश्रेष्ठ आश्रम आहे आणि ब्राह्मण हाच सर्वश्रेष्ठ वर्ण आहे.

सर्वशास्त्र शिरोमणी श्रीमद्भागवत शास्त्रात (११/१७/१५-२१) असा सिद्धांत आहे–

**वर्णानामाश्रमाणाश्च जन्मभूम्यनुसारिणी।**(३)
**आसन् प्रकृतयो नृणां नीचैर्नीचोत्तमोत्तमाः ॥ १५॥**

**शमोदमस्तपः शौचं संतोषः क्षान्तिरार्ज्जवम्।**
**मद्भक्तिश्च दया सत्यं ब्रह्मप्रकृतयस्त्विमाः ॥ १६ ॥**

**तेजो बलं धृतिः शौर्यं तितिक्षौदार्यमुद्यमः।**(४)
**स्थैर्यं ब्रह्मण्यमैश्वर्यं क्षत्रप्रकृतय स्त्विमाः ॥ १७॥**

**आस्तिक्यं दाननिष्ठा च अदम्भो ब्रह्मसेवनम्।**
**अतुष्टिरर्थोपचयैर्वैश्य-प्रकृतयस्त्विमाः ॥ १८॥**

---

(३) वर्ण आणि आश्रमाच्या जन्मस्थानानुसार मनुष्याची नीच आणि उत्तम प्रकृती उत्पन्न झाली. पाय आणि जांघ खालच्या स्थानी आहेत, त्यातून क्रमशः शूद्र वर्ण आणि गृहस्थाश्रमाच्या उत्पन्न होण्याने शूद्र आणि गृहस्थाची नीच प्रकृती झाली॥ १५॥ शम, दम, तपस्या, शौच, संतोष, क्षमा, सरलता, भगवंताप्रती भक्ती, परदुःख-कातरता, सत्य– ही सगळी ब्राह्मणांची प्रकृती आहे.॥ १६॥

(४) प्रताप, बल, धैर्य, वीरत्व, सहिष्णुता, उदारता, उद्यम (कार्य), स्थैर्य तथा ऐश्वर्य–हे सगळे क्षत्रियांचे स्वभाव आहेत.॥ १७॥ भगवंताप्रती निष्ठा, दाननिष्ठा, ब्राह्मण-सेवा, अर्थोपार्जनाचे प्रयत्न–हे सगळे वैश्याचे स्वभाव आहेत.॥ १८॥ देव, द्विज आणि गाई आदींची अकपट रूपाने सेवा तथा गाई-ब्राह्मण-देवांच्या शुश्रूषेद्वारे उपार्जित धनात संतोष मानणे–हे सगळे शूद्रांचे स्वभाव आहेत॥ १९॥ अपवित्रता, मिथ्या, चोरी, परलोकांत अविश्वास, अनर्थक कलह, काम-क्रोध, असत् विषयांत लोभ–ही सगळी आश्रमभ्रष्ट अंत्यजांची प्रकृती आहे.॥ २०॥ अहिंसा, सत्य, अचौर्य, काम-क्रोध-लोभ-शून्यता, सर्व जीवांचे प्रिय आणि हित करण्याची कृती हे सर्व वर्णांचे धर्म आहेत॥ २१॥

**शुश्रूषणं द्विजगवां देवानाञ्चाप्यमायया॥**
**तत्र लब्धेन संतोषः शुद्रप्रकृतयस्त्विमाः॥१९॥**

**अशौचमनृतंस्तेयं नास्तिक्यं शुष्कविग्रहः।**
**कामः क्रोधश्च तर्षश्च स्वभावोऽन्त्यावसायिनाम्॥२०॥**

**अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता।**
**भूतप्रियहितेहा च धर्मोऽयं सार्ववर्णिकः॥२१॥**

या विद्वान मंडळीत संस्कृत श्लोकांचा अर्थ सगळेच जाणतात, म्हणून मी सर्व श्लोकांचा अनुवाद करीत नाही. मी केवळ इतकेच सांगू इच्छितो की वर्ण तथा आश्रमाची व्यवस्था ही वैध जीवनाचा मूळ आधार आहे. ज्या देशात वर्णाश्रमव्यवस्थेचा जितका अभाव आहे, त्या देशात अधार्मिकतेचे प्राबल्य तितकेच जास्त असते.

आता विचारणीय हे आहे की कर्मासंबंधी ज्या 'नित्य' आणि 'नैमित्तिक' या दोन शब्दांचा वापर केला जातो, तो कशाप्रकारे होतो? शास्त्रांच्या गूढातिगूढ तात्पर्यावर विचारपूर्वक पाहिल्याने कर्मासंबंधी हे दोन्ही शब्द पारमार्थिक भावाने उपयोगात आणले जात नाहीत. केवळ व्यावहारिक अथवा औपचारिक भावानेच वापरले जातात. 'नित्य-धर्म', 'नित्यकर्म', 'नित्य-तत्त्व' इत्यादी शब्द केवळ जिवाच्या विशुद्ध चिन्मय अवस्थेच्या व्यतिरिक्त आणखी कुठल्याही परिस्थितीत उपयोगात आणले जाऊ शकत नाहीत; परंतु कर्मास लक्ष्य बनवून 'नित्य' शब्दाचा जो प्रयोग केला जातो, तो या संसारात नित्य तत्त्वास दुरुन लक्ष्य करण्याकरिता केवळ औपचारिक भावाने कर्मास नित्य म्हटले जाते. कर्म कधीही नित्य होऊ शकत नाही. कर्म, जेव्हा कर्मयोगाद्वारे ज्ञानास लक्ष्य करते, आणि ज्ञान जेव्हा भक्तीस लक्ष्य करते, तेव्हा कर्म आणि ज्ञान औपचारिक भावाने नित्य म्हटले जातात. ब्राह्मणांच्या संध्या-वंदनेला 'नित्यकर्म' म्हटल्याने केवळ हेच समजते की शारीरिक भौतिक क्रियांच्या माध्यमातून भक्तीस जे दुरूनच उद्देश्य करणारे मार्ग आहेत, ते नित्यधर्मास लक्ष्य केल्यामुळे ते नित्य आहेत, ते वस्तुतः नित्य नाहीत, याचे नाव उपचार आहे.

वस्तुतः विचार केल्यावर जिवांकरिता कृष्णप्रेमच एकमात्र नित्यकर्म आहे. याचे तात्त्विक नाम विशुद्ध चिदनुशीलन आहे. या कार्याच्या साधनेकरिता ज्या जड

कार्याचे अवलंबन करावे लागते ते नित्यकर्माचे सहाय्यक असते, म्हणून अशा कर्मांना नित्यकर्म म्हणण्यात काहीच दोष नाही. तात्त्विक रूपाने पाहिले तर त्यांस 'नित्य' न म्हणता 'नैमित्तिक' म्हणणेच उचित ठरेल. कर्मांत जे नित्य-नैमित्तिक विभाग आहेत, ते केवळ व्यावहारिक आहेत–तात्त्विक नाहीत.

वस्तूचा विचार केल्यास शुद्ध-चिदनुशीलनच जिवाचा नित्यधर्म आहे–अन्य जितके धर्म आहेत ते सगळे नैमित्तिक आहेत. वर्णाश्रमधर्म, अष्टांगयोग, सांख्यज्ञान तथा तपस्या–हे सगळे नैमित्तिक धर्म आहेत. जीव जर बद्ध नसता तर या धर्मांची काही आवश्यकताच नव्हती. जीव बद्ध असल्याने मायामुग्ध अवस्था हेच एक निमित्त आहे. त्या निमित्तानेच उपरोक्त धर्मसमूह वर्णाश्रम आदी 'धर्म' झाले आहेत. म्हणूनच तात्त्विक विचाराने हे सगळेच नैमित्तिक धर्म आहेत.

ब्राह्मणाची श्रेष्ठता, संध्या-वंदनादी कर्म आणि त्यांचा कर्मत्याग केल्यावर संन्यास ग्रहण–हे नैमित्तिक धर्म आहेत. हे सगळे कर्म धर्मशास्त्रांमध्ये प्रशस्त आणि अधिकार भेदाने नितांत उपादेय मानले जातात, तथापि नित्यकर्मांसमोर यांचा काहीच सन्मान नाही. यथा (श्रीमद्भा. ७/६/६)–

**विप्राद् द्विषड्गुणयुतादरविन्दनाभ-**
**पादारविन्दविमुखात् श्वपचं वरिष्ठम्।**
**मन्ये तदर्पित-मनो-वचनेहितार्थ-**
**प्राणं पुनाति स कुलं न तु भूरिमानः ॥**(५)

सत्य, दम, तप, अमात्सर्य, तितीक्षा, अनसूया, यज्ञ, दान, धृती, वेद-श्रवण आणि व्रत–हे बारा धर्म ब्राह्मणांचे आहेत. असे द्वादश-गुण-विशिष्ट ब्राह्मण जगतात पूजनीय तर आहेत, परंतु जर या सर्व गुणांनी युक्त होऊन देखील ते कृष्णभक्ती शून्य असतील तर त्या ब्राह्मणांपेक्षा भक्त चांडाळ असूनदेखील तो श्रेष्ठ आहे. तात्पर्य हे

---

(५) माझ्या समजुतीप्रमाणे बारा गुणांनी युक्त ब्राह्मण देखील भगवान पद्मनाभाच्या चरणकमलांपासून विमुख असेल तर त्याच्यापेक्षा चांडाळ कुळात उत्पन्न झालेला तो भक्त श्रेष्ठ आहे, ज्याने आपले मन, वचन, कर्म आणि धन कृष्णाच्या चरणी समर्पित केलेले आहे, कारण तो चांडाळ तर आपल्या कुळासोबत आपले प्राणदेखील पवित्र करून घेतो, परंतु मोठेपणाचा अभिमान ठेवणारा तो ब्राह्मण स्वतःलादेखील पवित्र करू शकत नाही.

आहे की चांडाळाच्या वंशात जन्म लाभून साधुसंगरूप संस्कारांद्वारे ज्या व्यक्ती जिवाच्या नित्य धर्मरूप चिदनुशीलनात लागल्या आहेत, त्या शुद्ध-चिदनुशीलनरूपी नित्य धर्मानुशीलनापासून विरत परंतु नैमित्तिक धर्मांत निरत रहाणाऱ्या ब्राह्मणांपेक्षा देखील श्रेष्ठ आहेत.

जगात दोन प्रकारचे मनुष्य असतात अर्थात उदित-विवेक आणि अनुदित-विवेक. अनुदित-विवेक मनुष्यच संसारात बहुधा आढळतात. उदित-विवेक खूप विरळ आहेत. अनुदित-विवेक मनुष्यांमध्ये ब्राह्मण सर्वात श्रेष्ठ आहे आणि आपापल्या वर्णानुसार संध्या-वंदनादी नित्यकर्म सर्व कर्मांत श्रेष्ठ आहेत. उदित-विवेक मनुष्याचे दुसरे नाव वैष्णव आहे. वैष्णवांचा व्यवहार आणि अनुदित-विवेक मनुष्यांचा व्यवहार अवश्यच निराळा असेल. निराळे असूनही वैष्णवांचे व्यवहार अनुदित-विवेक मनुष्यांच्या शासनाकरिता बनविलेल्या स्मार्तविधानाच्या तात्पर्याच्या विरुद्ध नसतात. शास्त्रांचे तात्पर्य सर्वत्र एकच आहे. अनुदित-विवेक मनुष्य शास्त्राच्या स्थूल वचनांच्या एका अंशात आबद्ध रहाण्याकरिता बाध्य आहेत; उदित विवेक-मनुष्य शास्त्राच्या तात्पर्यास बंधुभावाने ग्रहण करतात. क्रियेत भेद झाल्यावरसुद्धा तात्पर्यात भेद नसतो. अनधिकारीच्या दृष्टीने उदित विवेक पुरुषांचे व्यवहार साधारण व्यवहाराच्या विरुद्ध प्रतीत होतात. परंतु वास्तविक त्यांच्या भिन्न व्यवहाराचे मूळ तात्पर्य एक आहे.

उदित-विवेक मनुष्याच्या दृष्टीने साधारण लोकांकरिता नैमित्तिक धर्म उपदेश योग्य आहे; परंतु नैमित्तिक धर्म वास्तवात असंपूर्ण, त्याज्य, मिश्र आणि अचिरस्थायी आहे.

नैमित्तिक धर्मात साक्षात चिदनुशीलन नाही. चिदनुशीलनाच्या आश्रयात जडानुशीलनास ग्रहण केल्याने तो केवळ चिदनुशीलनरूप उपेयाच्या प्राप्तीचा उपायमात्र असतो. उपाय उपेयास देऊन शांत होऊन जातो. म्हणूनच उपाय कधीही संपूर्ण नसतो–उपेय वस्तूची खंडावस्थामात्र आहे. म्हणूनच नैमित्तिक धर्म कधीच संपूर्ण नाही. उदाहरणादाखल ब्राह्मणांची संध्या-वंदना आदी त्यांच्या अन्यान्य कर्मांप्रमाणेच क्षणिक आणि विधीसाध्य आहेत. सहज प्रवृत्तीने ही सगळी कार्ये होत नाहीत. त्यानंतर बरेच दिवसापर्यंत वैध व्यापारात राहता राहता जेव्हा साधुसंग–संस्कारांद्वारे चिदनुशीलनरूपी हरिनामात रुची होते, तेव्हा कर्माच्या आकारात मग संध्या-वंदनादी रहात नाहीत. हरिनाम संपूर्ण चिदनुशीलन आहे. संध्या-वंदनादी

केवळ उक्त प्रधान कार्यांचे उपायमात्र आहेत. ते कदापि संपूर्ण तत्त्व होऊ शकत नाहीत.

नैमित्तिक धर्म सदुद्देशक असल्याकारणाने आदरणीय असूनही हेयमिश्र आहे. चित्-तत्त्वच उपादेय आहे. जड आणि जडाचा संगच जिवाकरिता तुच्छ आहे. नैमित्तिक धर्मात अधिक जडत्व आहे आणि त्यात अवांतर फळे इतकी अधिक आहेत की जीव त्या सर्व क्षुद्र फळांमध्ये पडून राहूच शकत नाही. जसे ब्राह्मणांकरिता ईश्वर उपासना चांगली गोष्ट आहे, परंतु मी ब्राह्मण आहे आणि अन्य जीव माझ्यापेक्षा हीन आहेत, असा मिथ्या अभिमान, ब्राह्मणाच्या उपासनेस तुच्छ फळ देणारे बनवून टाकतो. अष्टांगयोगादीमध्ये 'विभूती' नामक एक तुच्छ फळ जीवांसाठी अतिशय अमंगलजनक आहे. 'मुक्ती' आणि 'भुक्ती'—या दोन्ही नैमित्तिक धर्मांच्या अनिवार्य सहचरी आहेत. यांच्यापासून वाचलो तरच मूळ उद्देश असणारे चिदनुशीलन संभव होऊ शकते. म्हणूनच नैमित्तिक धर्मात जिवाकरिता हेयतेचा (त्याज्यतेचा) अंशच अधिक आहे.

नैमित्तिक धर्म अचिरस्थायी आहे. जिवाच्या सर्व अवस्थांमध्ये आणि सर्व काळी नैमित्तिक धर्म नसतो. जसे ब्राह्मणाचा ब्राह्मधर्म, क्षत्रियाचा क्षात्रधर्म आदी नैमित्तिक धर्म निमित्त समाप्त होताच दूर होऊन जातात. जसे एखाद्या व्यक्तीने ब्राह्मण जन्मानंतर चांडाळाचा जन्म प्राप्त केला. त्यावेळेस त्याचा ब्राह्मण वर्णाचा नैमित्तिक धर्म मग त्याचा स्वधर्म रहात नाही. 'स्वधर्म' शब्द सुद्धा येथे औपचारिक आहे. प्रत्येक जन्मात जिवाच्या स्वधर्मात परिवर्तन होते परंतु कुठल्याही जन्मात जिवाच्या नित्यधर्मात परिवर्तन होत नाही. नित्यधर्मच वास्तवात जिवाचा स्वधर्म आहे, नैमित्तिक धर्म अचिरस्थायी आहे.

तेव्हा जर विचाराल की वैष्णवधर्म काय आहे? तर त्याला उत्तर असे आहे की वैष्णवधर्मच जिवाचा नित्यधर्म आहे. वैष्णव (जीव) जडमुक्त अवस्थेत विशुद्ध चिदाकारात कृष्णप्रेमाचे अनुशीलन करतात आणि जडबद्ध अवस्थेत उदित-विवेक होऊन जड आणि जड-संबंधी विषयांतून चिदनुशीलनास अनुकूल विषयांना आदरपूर्वक ग्रहण करतात तथा सर्व प्रतिकूल विषयांचे वर्जन करतात. ते शास्त्रीय-विधी-निषेधाच्या अधीन होऊन कुठलेच काम करीत नाहीत. जी विधी जेव्हा हरिभजनाच्या अनुकूल असते, तिचा आदर ते त्याचवेळी करतात आणि जी प्रतिकूल

असते तिचा तत्क्षणी अनादर करतात. निषेधासंबंधीसुद्धा वैष्णवांचा व्यवहार तसाच असतो. वैष्णवच जगताचे बंधू आहेत. वैष्णवच जगात मंगलकारी आहेत. मला जे सांगायचे होते, ते मी आज या वैष्णवसभेत विनीत भावाने विदित केले आहे. आपण माझ्या दोषांना क्षमा करावी.

असे म्हणत जेव्हा वैष्णवदास वैष्णवसभेस साष्टांग-प्रणाम करून एका कोपऱ्यात बसले, त्यावेळी वैष्णवांच्या डोळ्यांतून अश्रुधारा प्रवाहित होऊ लागली. सर्व लोक एकसाथ धन्य-धन्य म्हणू लागले, त्याचबरोबर गोद्रुमच्या कुंजातही 'धन्य-धन्य' असा ध्वनी दुमदुमला.

जिज्ञासू गायक ब्राह्मणाला अनेक विचारणीय स्थळी निगूढ सत्ये दिसली आणि काही-काही ठिकाणी थोड्या-थोड्या शंकादेखील उपस्थित झाल्या. ते काहीही असो–त्यांच्या हृदयात वैष्णवधर्माचे श्रद्धा-बीज काहीसे पुष्ट झाले. ते हात जोडत म्हणाले–महोदयगण! मी वैष्णव तर नाही परंतु हरिनाम ऐकता-ऐकता वैष्णव झालोय खरा! आपण लोकांनी जर माझ्यावर कृपा करून मला थोडा-थोडा उपदेश केलात तर माझे बरेचसे संदेह दूर होतील.

श्रीप्रेमदास परमहंस बाबाजी महाशय कृपापूर्वक म्हणाले–आपण वेळोवेळी श्रीमान वैष्णवदासाचा संग करा. ते शास्त्रांचे मोठे पंडित आहेत. वेदान्त शास्त्राचे गंभीर अध्ययन केल्यानंतर संन्यास ग्रहण करून ते वाराणशीत वास करीत होते; आपले प्राणपती श्रीकृष्णचैतन्य यांनी असीम कृपा प्रकाश करून त्यांना या नवद्वीपात खेचून आणले. या क्षणी ते वैष्णव-तत्त्वाचे पूर्ण पंडित आहेत. हरिनामात त्यांची प्रगाढ निष्ठा निर्माण झाली आहे.

प्रश्नकर्त्याचे नाव श्रीकालिदास लाहिडी होते. त्यांनी बाबाजी महाशयांचे बोलणे ऐकून मनोमन वैष्णवदासांना आपले गुरु मानले. त्यांनी विचार केला की हे ब्राह्मणकुळात जन्मले आहेत आणि संन्यास आश्रमदेखील ग्रहण केलेला आहे. म्हणूनच ब्राह्मणास उपदेश देण्यायोग्य आहेत. या व्यतिरिक्त वैष्णव-तत्त्वात त्यांचे विशेष पांडित्य दिसून येते. त्यांच्याकडून वैष्णवधर्माच्या कितीतरी गोष्टी शिकता येण्याजोग्या आहेत. असा विचार करून लाहिडी महाशयांनी वैष्णवदासांच्या चरणी दंडवत प्रणाम करीत म्हटले–महाशय, आपण माझ्यावर कृपा करा.

वैष्णवदासांनीसुद्धा त्यांना दंडवत-प्रणाम करीत उत्तर दिले–आपली कृपा झाल्यास मीही कृतार्थ होईन.

त्यादिवशी जवळजवळ संध्याकाळ होऊ लागली होती. लोक आपापल्या घरी जाऊ लागले.

लाहिडी महाशयांचे घर गावातल्या एका गुप्त स्थानी होते; ते देखील एका कुंजात. कुंजाच्या मध्यभागी माधवी मंडप आणि तुळशीदेवीचा चबुतरा (ओटा) होता. दोन्ही बाजूंस दोन घरे होती. अंगणाला चितावृक्षाच्या फांद्यांचे कुंपण केलेले होते. बेल, निंब आणि कितीतरी फळा-फुलांचे वृक्ष तेथे शोभायमान होत होते. त्या कुंजाचे अधिकारी माधवदास बाबा होते. बाबाजी पहिले तर निर्मळ संत होते, परंतु संग-दोषामुळे त्यांच्या वैष्णवतेस विशेष कलंक लागला होता. स्त्री-संगाच्या दोषाने दूषित झाल्याने भजनादी कमी झाले होते. अर्थाभावामुळे त्यांचा खर्चसुद्धा भागत नसे. ते अनेक ठिकाणांहून भिक्षा ग्रहण करीत आणि एक घर भाड्याने घेऊन निर्वाह करीत होते. त्याच घरात लाहिडी महाशयांनी मुक्काम केला होता.

आज अर्ध्या रात्री लाहिडी महाशयांची निद्रा भंगली. ते बाबा वैष्णवदासांच्या वक्तृत्वाच्या सारार्थावर मनोमन विचार करू लागले. त्याचवेळी अंगणात कसलासा आवाज झाला. त्यांनी बाहेर निघून पाहिले की बाबा माधवदास एका स्त्रीसोबत अंगणात उभे राहून बोलत होते. त्यांना पाहताच ती स्त्री पळाली. लाहिडी महाशयांसमोर लज्जित होऊन बाबा माधवदास उभे राहिले.

लाहिडी महाशयांनी विचारले–बाबाजी हे प्रकरण तरी काय आहे?

माधवदास बाबाजी सजल नयनांनी म्हणाले–माझे दुर्भाग्य आणि काय सांगू? हाय! मी काय होतो आणि काय झालोय. परमहंस बाबाजी महाराज माझ्यावर किती श्रद्धा ठेवीत असत! आता त्यांच्या जवळ देखील जाण्यास मला लाज वाटते.

लाहिडी महाशय म्हणाले–स्पष्ट शब्दात सांगा म्हणजे मला काही कळेल.

माधवदास सांगू लागले–ज्या स्त्रीस आपण आता पाहिले ती माझी पूर्वाश्रमीची विवाहिता पत्नी होती. मी वेष ग्रहण केल्यानंतर काही दिवसांनी ती श्रीपाट शान्तिपुरात गंगाकिनारी एक कुटी बनवून राहू लागली. अशा प्रकारे बरेच दिवस

गेले. एक दिवस श्रीपाट शान्तिपुरात गंगाकिनारी तिला पाहून मी म्हणालो–"तू घर का सोडलेस?", ती म्हणाली–"संसार आता मला आवडेनासा झालाय. आपल्या चरण सेवेपासून वंचित झाल्यानंतर मी तीर्थवास करीत आहे, भिक्षा-शिकवण करून कसे तरी आपला जीवन-निर्वाह करीत आहे." यावर मी तिच्याशी काहीही न बोलता गोद्रुमी परतलो. ती देखील हळू-हळू गोद्रुमी येऊन एका अहीराच्या घरी राहू लागली. रोज कुठेनाकुठे तिच्याशी भेट घडतच होती. मी तिचा पिच्छा सोडवण्याचा जितकी इच्छा करायचो, ती तितकीच घनिष्ठता वाढवू लागली. आता तिने एक आश्रम बनवलाय. मध्यरात्रीनंतर इथे येऊन माझा सर्वनाश करण्याचा प्रयत्न करीत असते. आता चारीकडे माझी बदनामी पसरते आहे. त्याचबरोबर माझे भजनादीसुद्धा कमी झाले आहे. श्रीकृष्णचैतन्यांच्या दासांमध्ये मी कुलांगार आहे. छोट्या हरिदासास दण्ड मिळाल्यानंतर आता मी देखील एक दंडनीय मनुष्य झालोय. श्रीगोद्रुमातील बाबा लोकांनी कृपा करून मला अजूनही दण्ड दिलेला नाही, पण आता ते माझ्यावर श्रद्धा ठेवत नाहीत.

त्यांचे म्हणणे ऐकून लाहिडी महाशय म्हणाले–बाबा माधवदास, आता आपण सावधान व्हा. असे म्हणत ते आपल्या घरात निघून गेले. बाबाजीसुद्धा आपल्या गादीवर गेले.

रात्री लाहिडी महाशयांना झोपच आली नाही. ते मनोमन विचार करू लागले की माधवदास बाबाजी तर वांताशी[५] होऊन अधःपतनास लागलेत. म्हणून आता माझेसुद्धा येथे राहणे योग्य नाही. कारण जरी संगदोष झाला नाही तरी बदनामी अवश्य होईल. मग शुद्ध वैष्णवगण मला श्रद्धापूर्वक उपदेश करणार नाहीत.

प्रातःकाळीच त्यांनी प्रद्युम्नकुंजात येऊन यथाविधी श्रीवैष्णवदासांना अभिवादन करून त्यांच्या कुंजात रहाण्यासाठी एक स्थान मागितले. वैष्णवदासांनी बाबा परमहंस महाराजांकडून आज्ञा घेऊन कुंजाच्या एक सीमेवर एक कुटीत त्यांना राहण्याची आज्ञा दिली. तेव्हापासून लाहिडी महाशयांनी त्याच कुटीत राहून समीपच कोण्या ब्राह्मणाच्या घरी प्रसाद ग्रहण करण्याची व्यवस्था करून टाकली.

**॥ तिसरा अध्याय समाप्त ॥**

---

(५) जो संन्यासी संन्यास आश्रमाचा परित्याग करून पुन्हा गृहस्थाश्रमात प्रवेश करतो, त्यास वांताशी म्हणतात.

# चौथा अध्याय (नित्यधर्माचे नामांतर वैष्णवधर्म आहे)

लाहिडी महाशय आणि वैष्णवदास यांच्या कुटी शेजारी-शेजारीच होत्या. जवळच काही आंबा आणि फणसांची झाडे होती. चारी बाजूंनी छोटेछोटे सुपारीचे वृक्ष शोभायमान होते. अंगणात एक खूप मोठा गोल चबुतरा (ओटा) होता. ज्यावेळी श्री प्रद्युम्न ब्रह्मचारी त्या कुंजात रहात असत–तो चबुतरा त्या वेळचा होता. खूप दिवसांपासून वैष्णव मंडळी त्यास 'सुरभी चबुतरा' म्हणतात, त्याची परिक्रमा करतात तथा त्यास श्रद्धापूर्वक प्रणामसुद्धा करतात.

संध्याकाळ झाली आहे. वैष्णवदास आपल्या कुटीत पानांच्या आसनावर बसून हरिनाम जप करीत आहे. कृष्णपक्ष आहे; त्यामुळे हळूहळू रात्र अधिकच काळोखी होऊ लागली आहे. लाहिडी महाशयांच्या कुटीत एक छोटासा लुकलुकणारा दिवा जळत आहे. अकस्मात त्यांच्या दरवाज्याजवळ एका सापासारखे काहीतरी दिसले. लाहिडी महाशयांनी त्याचवेळी एक काठी घेऊन त्या सर्पास मारण्याकरिता दिव्याची ज्योत मोठी केली परंतु दिवा घेऊन बाहेर येईपर्यंत सर्प गायब झाला.

लाहिडी महाशय वैष्णवदासांना म्हणाले–आपण जरा सावधान रहा, आपल्या कुटीत एक साप आलाय.

वैष्णवदास म्हणाले–आपण सापाला इतके का घाबरता? या, माझ्या कुटीत निर्भय होऊन बसा.

लाहिडी महाशय त्यांच्या कुटीत शिरून पत्रासनावर जाऊन बसले. परंतु त्यांचे मन अजूनही बरेच चंचल होते. ते म्हणाले–महाशय! या विषयी आमचे शान्तिपूर चांगले आहे. शहरात कुठेही साप, विंचू आदींचे भय नाही. नदिया-प्रांतात सर्वत्रच सापाचे भय असते. खास करून, गोद्रुमसारख्या वन्य भागांमध्ये लोकांचे रहाणे फारच भयप्रद आहे.

वैष्णवदास बाबाजी समजावू लागले–या विषयांनी चित्तास चंचल करणे योग्य नाही. आपण श्रीमद्भागवतातील परीक्षित महाराजांनी कथा अवश्य ऐकली

असेल. त्यांनी सापाचे भय त्यागून स्थिर चित्ताने श्रीशुकदेवांच्या मुखातून हरिकथामृताचे पान करीत परमानंदाचा लाभ घेतला. मनुष्याच्या चित्-देहावर सर्प आघात करू शकत नाही. केवळ भगवत्कथा-विरहरूपी सर्पच त्या देहाकरिता व्याघातजनक (पीडाजनक, विघ्नजनक) आहे. जडशरीर नित्य नाही, एक न एक दिवस त्यास अवश्य त्यागावे लागणार आहे. जडदेहाकरिता केवळ शारीरिक कर्मच विहित (शास्त्रोक्त, योग्य) आहेत. कृष्णाच्या इच्छेने जेव्हा या देहाचे पतन होईल, तेव्हा कुठल्याही प्रयत्नाने त्याची रक्षण करता येणार नाही. जोपर्यंत शरीर नाश होण्याची वेळ उपस्थित होत नाही, तोपर्यंत सापाच्याजवळ झोपल्यानेदेखील तो आपल्याला काहीच करू शकत नाही. म्हणूनच साप आदीचे भय दूर केल्यानंतरच वैष्णवनामाद्वारे परिचय दिला जाऊ शकतो. या भयांनी जर चित्त चंचल राहिले, तर ते श्रीहरीच्या चरणकमलांमध्ये कसे नियुक्त होईल? म्हणूनच सर्पाचे भय आणि भयामुळे सर्पास मारण्याच्या कृतीचा अवश्यमेव परित्याग करणे उचित आहे.

लाहिडी महाशयांनी काही श्रद्धेने म्हटले–आपल्या साधू वचनांनी माझे हृदय निर्भय झाले. आता मी समजलो की हृदयास उन्नत केल्यावरच परमार्थ लाभ केला जाऊ शकतो.पर्वत आणि गुहांमध्ये बरेचसे महात्मा भगवंताचे भजन करतात. ते तेथील जंगली जीव आणि प्राण्यांचे भय करीत नाहीत, परंतु असत्संगाच्या भयानेच वस्त्यांना (गावांना) सोडून वनातील प्राण्यांसोबत निवास करतात.

बाबाजी म्हणाले, “हृदयात भक्तिदेवीचा आविर्भाव झाल्याने हृदय सहजच उन्नत होऊन जाते. जगातील समस्त जीवांचे प्रियपात्र बनल्या जाऊ शकते. संत आणि असंत सर्व जीव वैष्णवांवर प्रेम करतात. म्हणून प्रत्येक मनुष्यास वैष्णव व्हायला हवे.

जगात सर्व जिवांचा प्रियपात्र होता येऊ शकते. संत आणि असंत सर्व जीव वैष्णवांशी प्रीती करतात. म्हणून प्रत्येक मनुष्यास वैष्णव बनायला हवे.

हे बोलणे ऐकताच लाहिडी महाशय म्हणाले–आपण नित्यधर्माप्रती आमची श्रद्धा उत्पन्न केली आहे. मला असे वाटते की नित्यधर्मासोबत वैष्णव धर्माचा काही निकटतम संबंध आहे. परंतु नित्यधर्म आणि वैष्णवधर्म एकच आहेत. यास मी अजूनही समजू शकलो नाही.

वैष्णवदास बाबाजी बोलू लागले–जगात वैष्णवधर्म नावाने दोन धर्म पृथक-पृथक रूपाने चालत आहेत–पहिला शुद्ध-वैष्णवधर्म आणि दुसरा विद्ध-वैष्णवधर्म. शुद्ध वैष्णवधर्म तत्त्वतः एक असूनही रसाच्या दृष्टीने त्याचे चार भेद आहेत–(१) दास्यगत वैष्णवधर्म, (२) सख्यगत वैष्णवधर्म, (३) वात्सल्यगत वैष्णवधर्म आणि (४) मधुरगत वैष्णवधर्म. वास्तवात शुद्ध वैष्णवधर्म एक आणि अद्वितीय आहे आणि याचे नाव नित्यधर्म वा परधर्म आहे. **"यद् विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवति"**[१] (मुण्डकोपनिषद् १/३)–ही श्रृतिवाणी शुद्ध वैष्णवधर्मासच लक्ष्य करते. याचे विस्तृत विवरण आपण क्रमशः जाणून घ्याल.

विद्ध-वैष्णवधर्म दोन प्रकारचे आहेत–कर्मविद्ध वैष्णवधर्म आणि ज्ञानविद्ध वैष्णवधर्म. स्मार्तमतात वैष्णवधर्माच्या जितक्या पद्धती आहेत त्या सगळ्या कर्मविद्ध वैष्णवधर्म आहेत. या वैष्णवधर्मात वैष्णव मंत्राची दीक्षा झाल्यावरदेखील विश्वव्यापी पुरुषरूप विष्णूला कर्मांगरूपात मानले जाते. या मताप्रमाणे विष्णू समस्त देवतांचे नियंता असूनही स्वयं कर्मांग आणि कर्माच्या अधीन आहेत. कर्म विष्णूंच्या इच्छेच्या अधीन नाहीत, परंतु विष्णूच कर्माच्या इच्छेच्या अधीन आहेत. या मतानुसार उपासना, भजन आणि साधन–सर्वच कर्मांग आहेत, कारण कर्मापेक्षा दुसरे कोणतेच तत्त्व उच्च नाही. साधन–सर्वच कर्मांग आहेत. कारण कर्मापेक्षा दुसरे कोणतेच तत्त्व उच्च नाही. प्राचीन मीमांसकांचा वैष्णवधर्म अशा प्रकारे खूप दिवसांपासूनच चालत आलाय. भारतात या मताचे खूपसे लोक आपण वैष्णव असल्याचा अहंकार करतात. ते शुद्ध वैष्णवांस वैष्णव स्वीकार करू इच्छित नाहीत. हे त्यांचे दुर्भाग्य आहे.

भारतात ज्ञान-विद्ध-वैष्णवधर्माचा खूप प्रचार आहे. ज्ञानी संप्रदायाच्या मतानुसार अज्ञेय ब्रह्म-तत्त्वच सर्वोच्च-तत्त्व आहे. यात निर्विशेष-तत्त्वास प्राप्त करण्याकरिता साकार सूर्य, गणेश, शक्ती, शिव आणि विष्णूची उपासना करणे आवश्यक असते. ज्ञान पूर्ण झाल्यावर साकार उपास्य दूर होतात तथा शेवटी निर्विशेष ब्रह्मत्व लाभ होतो. अनेक लोक या मतास स्वीकार करून शुद्ध वैष्णवांचा अनादर करतात. या पंचोपासनेत विष्णूची जी उपासना होते त्यात दीक्षा, पूजा आदी सर्व काही विष्णू विषयक असते. काही-काही ठिकाणी ती उपासना राधाकृष्ण विषयक असूनही, तो शुद्ध वैष्णवधर्म नाही.

---

(१) ज्यांना विशेषरूपाने जाणल्याने सर्व काही जाणले जाते.

अशा प्रकारे विद्ध-वैष्णवधर्मास वेगळे केल्यानंतरही ज्या शुद्ध वैष्णवधर्माचा प्रकाश होतो, तोच यथार्थ वैष्णवधर्म आहे. कलीच्या प्रभावाने अधिकांश लोक शुद्ध वैष्णवधर्मास न समजून विद्ध वैष्णवधर्मासच वैष्णवधर्म समजतात.

श्रीमद्भागवतानुसार मनुष्यात परमार्थाच्या प्रवृत्ती तीन प्रकारच्या आहेत. (१) बाह्य-प्रवृत्ती, (२) परमात्म-प्रवृत्ती आणि (३) भागवत-प्रवृत्ती. बाह्य-प्रवृत्तीद्वारे निर्विशेष ब्रह्मात कुणाकुणाची रुची असते. ते लोक ज्या उपायाचे अवलंबन करून निर्विशेष होण्याची कृती करतात, ती पंचोपासनेच्या नावाने विख्यात आहे.

परमात्म-प्रवृत्तीद्वारा सूक्ष्म परमात्म स्पर्शी योगतत्त्वांमध्येही कुणा-कुणाची रुची असते. ते लोक ज्या उपायाचा अवलंब करून परमात्म समाधीची आशा करतात, त्या क्रिया कर्म-योग तथा अष्टांगयोगाच्या नावाने विख्यात आहेत. या मताचे विष्णूमंत्र, दीक्षा, विष्णूपूजा आणि ध्यान आदी सर्व कर्मांग आहेत, यातच कर्म-विद्ध-वैष्णवधर्माचा उदय होतो.

भागवत-प्रवृत्तीद्वारा शुद्ध सविशेष भगवत्स्वरूपाच्या अनुगत भक्तितत्त्वात सौभाग्यशाली जिवांचीच रुची होते. या लोकांची भगवदाराधना आदी क्रिया कर्म अथवा ज्ञानाचे अंग नाहीत–शुद्ध भक्तीचे अंग आहेत. या मताचा वैष्णवधर्मच शुद्ध वैष्णवधर्म आहे. श्रीमद्भागवताचे कथन आहे-

**वदन्ति तत्तत्वविदस्तत्वं यज् ज्ञानमद्वयं।**
**ब्रह्मेति परमात्मेति भगवानिति शब्द्यते॥**(२)

(श्रीमद्भा. १/२/११)

बघा, ब्रह्म आणि परमात्मा भेदांचे भगवत्-तत्त्व हेच समस्त तत्त्वांत श्रेष्ठ आणि अंतिम आहे. भगवत्-तत्त्व हेच शुद्ध विष्णुतत्त्व आहे. या तत्त्वाचे अनुगत जीवच शुद्ध जीव आहेत आणि त्यांच्या प्रवृत्तीचे नावच 'भक्ती' आहे. हरिभक्तीच शुद्ध वैष्णवधर्म, नित्यधर्म, जैवधर्म, भागवतधर्म, परमार्थ आणि परधर्माच्या नावाने विख्यात आहेत. ब्रह्म-प्रवृत्ती आणि परमात्म-प्रवृत्तीने जितक्या प्रकारचे धर्म उत्पन्न

---

(२) तत्त्वविद् वास्तव वस्तूस 'अद्वयज्ञान' म्हणतात. त्यात अद्वय-ज्ञानतत्व वस्तूस कुणी 'ब्रह्म' कुणी 'परमात्मा' आणि कुणी 'भगवान' या नावाने संबोधित करतात.

झाले आहेत, ते सर्व नैमित्तिक आहेत–नित्य नाहीत. निर्विशेष ब्रह्मानुसंधानात देखील निमित्त आहे, म्हणून ते पण नैमित्तिक आहेत–नित्य नाही. जडविशेष अर्थात जडपदार्थांमध्ये आबद्ध होऊन जे जीव त्या बंधनातून मुक्त होण्याचा प्रयत्न करतात, ते जडबंधनास निमित्त करून निर्विशेषगतीच्या अनुसंधानरूप नैमित्तिक धर्माचा आश्रय ग्रहण करतात. म्हणूनच ब्राह्म-धर्म नित्य नाही. जे जीव समाधी-सुखाच्या कामनेने परमात्म-धर्माचे अवलंबन करतात, ते जडीय सूक्ष्म मुक्तीस निमित्त बनवून नैमित्तिक धर्माचे अवलंबन करतात. म्हणून परमात्म-धर्म सुद्धा नित्य नाही. केवळ विशुद्ध भागवत धर्मच नित्य आहे.

इथपर्यंत ऐकून लाहिडी महाशय म्हणाले–महाशय! कृपा करून मला शुद्ध वैष्णवधर्माचा उपदेश करावा. मी या अधिक वयात आपल्या चरणांचा आश्रय ग्रहण करीत आहे; कृपया आपण मला ग्रहण करा. मी ऐकले आहे की असद्गुरू द्वारा प्रथम शिकवण आणि दीक्षा ग्रहण केल्यानंतर सुद्धा सद्गुरू भेटल्यानंतर पुनः शिक्षित आणि दीक्षित होणे उचित आहे. खूप दिवसांपासून आपल्या सदुपदेशांना ऐकून वैष्णवधर्माप्रती श्रद्धा निर्माण झाली आहे. या वेळी कृपा करून प्रथम वैष्णवधर्माची शिकवण द्या आणि शेवटी दीक्षा देऊन मला पवित्र करा.

बाबाजी काहीसे व्यस्त होत म्हणाले–महाशय! मी यथाशक्ती आपल्यास उपदेश तर देईनच, परंतु मी दीक्षा गुरु होण्यायोग्य मात्र नाही. ते काहीही असो, आता आपण शुद्ध वैष्णवधर्माची शिकवण ग्रहण करावी.

विश्वाचे आदी गुरू श्रीचैतन्य महाप्रभूंनी सांगितले आहे की वैष्णव धर्मात तीन तत्त्व आहेत–(१) संबंध-तत्त्व, (२) अभिधेय-तत्त्व आणि (३) प्रयोजन-तत्त्व. या तिन्ही तत्त्वांना जाणून जे अनुरूप (योग्य) आचरण करतात, तेच शुद्ध वैष्णव वा शुद्ध भक्त आहेत.

संबंध-तत्त्वांतर्गत तीन विषयांचे वेगवेगळे निरूपण केले गेले आहे. जडजगत वा मायिक तत्त्व, जीव अथवा अधीन तत्त्व आणि भगवान वा प्रभू तत्त्व. भगवान एक आणि अद्वितीय आहेत, ते सर्वशक्तिसंपन्न, सर्वाकर्षक, ऐश्वर्य आणि माधुर्याचे एकमात्र निलय (घर) आणि जीव शक्तीचे आश्रय आहेत. माया आणि जीवांचे एकमात्र आश्रय असून देखील ते सुंदर रूपात एक परम स्वतन्त्रस्वरूप आहेत. त्यांच्या अंगांची प्रभा दुसऱ्या निर्विशेष-ब्रह्माच्या रूपात प्रतिभासित होते.

त्यांची ऐशीशक्ती जीव आणि जगाची सृष्टी करून आपल्या अंशांनी परमात्मा रूपात जगात प्रवेश करते. हेच परमात्म अथवा ईश्वर तत्त्व आहे. ऐश्वर्य प्रधान प्रकाशात ते परव्योमात–वैकुण्ठाचे नारायण आहेत आणि तेच आपल्या माधुर्य-प्रकाश वृन्दावनात गोपीजनवल्लभ श्रीकृष्णचन्द्र आहेत. त्यांचे प्रकाश आणि विलास नित्य आणि अनंत आहेत. त्यांच्यासमान कुणीही आणि काहीही नाही, मग त्यांच्यापेक्षा अधिक अर्थात श्रेष्ठ काही असण्याची संभावना कुठे? त्यांच्या पराशक्तीद्वारे त्यांचे समस्त प्रकाश आणि विलास प्रकटित होतात. पराशक्तीचे अनेक विक्रम आहेत; ज्यापैकी जिवांच्या निकट केवळ तीन विक्रम परिचित आहेत. पहिला चित्-विक्रम–ज्याद्वारे त्यांच्या लीलांसंबंधी सर्व काही सिद्ध होते . दुसऱ्याचे नाव जीव-विक्रम वा तटस्थ-विक्रम आहे ज्यामुळे अनंत जिवांचा उदय आणि अवस्थान (अधिवास) होते. आणि तिसऱ्याचे नाव माया-विक्रम आहे–ज्याद्वारे जगातील समस्त मायिक वस्तू, काळ आणि कर्मांची सृष्टी झाली आहे. जिवासोबत भगवंताचा, भगवंताबरोबर जीव आणि जडाचा तथा जडाबरोबर भगवान आणि जिवाचा जो संबंध आहे–त्यास 'संबंध-तत्त्व' म्हटले जाते. संबंध तत्त्वास पूर्णपणे जाणून घेतल्यानंतर 'संबंध-ज्ञान' होते. संबंध-ज्ञान रहित व्यक्ती कुठल्याही प्रकारे शुद्ध वैष्णव बनू शकत नाही.

लाहिडी महाशय म्हणाले–मी वैष्णवांकडून हे ऐकले आहे की वैष्णव केवळ भावुक असतात, त्यांना ज्ञानाची आवश्यकता नसते. ही गोष्ट कुठपर्यंत योग्य आहे? मी आत्तापर्यंत हरिनाम-संकीर्तनात भावांनाच संग्रहित करण्याचा प्रयत्न केला आहे, परंतु ज्ञानाकरिता काहीच प्रयत्न केले नाहीत.

बाबाजी म्हणाले–भावाचा उदय होणे हेच वैष्णवांकरिता श्रेष्ठ फळ आहे; परंतु भाव शुद्ध असावयास हवा. जे लोक अभेद ब्रह्मानुसंधानास परम फळ जाणून साधनकाळात भावाची शिकवण ग्रहण करतात, त्यांचा भाव आणि त्यांचे प्रयत्न शुद्धभाव नसतात–शुद्ध भावाचे अनुकरणमात्र असते. शुद्ध भावाचा एक बिंदू देखील जिवास चरितार्थ करतो. परंतु ज्ञानविद्ध भावुकतेस जिवांकरिता केवळ उत्पातच समजायला हवा. ज्यांच्या हृदयात अभेद ब्रह्मभाव आहे, त्यांचा भक्तिभाव केवळ लोक वंचनामात्र आहे. म्हणूनच शुद्ध भक्तांकरिता 'संबंध-ज्ञान' अत्यंत आवश्यक आहे.

लाहिडी महाशयांनी श्रद्धापूर्वक विचारले–ब्रह्मापेक्षाही काही उच्च-तत्त्व आहे का? भगवंतामुळे जर ब्रह्माची प्रतिष्ठा आहे तर मग ज्ञानी लोक ब्रह्मास सोडून भगवंताचे भजन का नाही करीत?

बाबाजींनी काहीसे हसत उत्तर दिले–ब्रह्मदेव, सनकादी चारही कुमार, शुक, नारद आणि देवदेव महादेव या सर्वांनी अंततः भगवंताच्या चरणी आश्रय घेतला आहे.

लाहिडी महाशयांनी शंका व्यक्त केली–भगवंताचे रूप आहे. मग सीमा-विशिष्ट असूनही ते असीम ब्रह्माचे आश्रय कसे काय असू शकतात?

बाबाजींनी त्यांच्या शंकेचे समाधान करीत उत्तर दिले–जड-जगात आकाश नामक एक वस्तू आहे, ती सुद्धा असीम आहे. अशा दशेत ब्रह्म असीम असल्याने आकाशापेक्षा ब्रह्माचे अधिक माहात्म्य ते काय? भगवान आपल्या अंगकांतिरूप शक्तीद्वारे असीम होऊन देखील एकाच वेळी युगपत् स्वरूपवान सुद्धा आहेत. अशी आणखी कुठली वस्तू पाहिली आहे का? या अद्वितीय स्वभावामुळेच भगवान ब्रह्मतत्त्वापेक्षा कितीतरी पटीने अधिक श्रेष्ठ आहेत. त्यांचे स्वरूप परमाकर्षक तर आहेच परंतु त्यांच्यात सर्वव्यापित्व, सर्वज्ञत्व, सर्वशक्तित्व, परमदयालुता आणि परमानंदसुद्धा पूर्णपणे विराजमान आहे. असे सर्वगुणसंपन्न स्वरूप उत्तम आहे अथवा एक अज्ञात सर्वव्यापी अस्तित्व–ज्यात कुठलाही गुण नाही, कुठलीही शक्ती नाही? वास्तविक ब्रह्म भगवंताचाच निर्विशेष भावमात्र आहे. भगवंतात निर्विशेषत्व आणि सविशेषत्व–दोन्हीही सुंदर रूपात एकाच वेळी अवस्थित आहेत. ब्रह्म त्यांचे एक अंशमात्र आहे. निराकार, निर्विकार, निर्विशेष, अपरिज्ञेय (चिंतनाच्या पलीकडे) आणि अपरिमेय (अमेय) आदी भाव अदूरदर्शी व्यक्तिंना प्रिय असतात. परंतु जे सर्वदर्शी आहेत, ते पूर्ण तत्त्वाच्या अतिरिक्त अन्य कुठेही मन गुंतवत नाहीत. वैष्णव निराकार तत्त्वाप्रती विशेष श्रद्धा ठेवीत नाहीत. कारण ते नित्यप्रेम आणि शुद्धप्रेमाच्या विरोधी आहे. परमेश्वर श्रीकृष्णचन्द्र सविशेष आणि निर्विशेष दोन्हीही तत्त्वांचे आश्रय आहेत; ते परमानंदाचे समुद्र आहेत तथा समस्त शुद्धजीवांचे आकर्षक आहेत.

लाहिडी–श्रीकृष्णाचा जन्म आहे, कर्म आहेत आणि शरीर त्याग आहेत–मग त्यांची श्रीमूर्ती नित्य कशी काय असू शकते?

बाबाजी–श्रीकृष्णमूर्ती सच्चिदानन्द आहे–त्यात जड-संबंधीय जन्म, कर्म आणि देहत्याग नाही.

लाहिडी–मग महाभारतादी ग्रंथांत तसे वर्णन का केले गेले आहे?

बाबाजी–नित्य तत्त्व वाणीच्याही अतीत असल्याने त्याचे वर्णन केले जाऊ शकत नाही. शुद्ध जीव आपल्या चिद्विभागात कृष्णमूर्ती आणि कृष्णलीलांचे दर्शन करतात. वाणीद्वारा व्यक्त झाल्यावर ते तत्त्व जडीय इतिहासाप्रमाणे वर्णित होते. जे लोक महाभारत आदी ग्रंथांचे सार ग्रहण करण्यास समर्थ आहेत, ते कृष्णलीला आदींचा जसा अनुभव करतात, जडबुद्धिवान त्याच वर्णनांचा दुसऱ्या तऱ्हेने अनुभव करतात.

लाहिडी–कृष्णमूर्तीचे ध्यान केल्याने हृदयात देश आणि काळापासून परिच्छिन्न असा एक भाव उदित होतो. त्यास प्राप्त करून श्रीमूर्तीचे ध्यान कसे होऊ शकते?

बाबाजी–ध्यान मनाचे कर्म आहे. मन जोपर्यंत शुद्ध-चिन्मय होत नाही, ध्यान तोपर्यंत चिन्मय होऊच शकत नाही. भक्ति-भावित मन अर्थात भक्तीद्वारे शुद्ध केलेले मन क्रमशः चिन्मय होऊन जाते, ज्या मनाने ध्यान होते ते अवश्य चिन्मय बनते. भजनानंदी वैष्णव लोक जेव्हा कृष्णनाम घेतात, त्यावेळेस जड जगत त्यांचा स्पर्श करू शकत नाही. ते चिन्मय आहेत. चिन्मय जगात राहून कृष्णाच्या दैनंदिन लीलांचे ध्यान करतात तथा अंतरंग सेवा सुखभोग करतात.

लाहिडी–कृपा करून मला चिदनुभव प्रदान करावा.

बाबाजी–समस्त जडीय संदेह आणि कुतर्कांचा परित्याग करून जेव्हा आपण निरंतर नामाचे परीक्षण कराल, तेव्हा शीघ्रच काही दिवसामध्ये चिदनुभव स्वतः (आपोआप) उदित होऊन जाईल. जितके अधिक कुतर्क कराल, मनास तितकेच अधिक जडबंधनात आबद्ध करीत जाल. आणि जितका अधिक नामरसाचा उदय कराल, जडबंधन तितकेच शिथिल होत जाईल आणि हृदयात चित्-जगत प्रकाशित होईल.

लाहिडी–माझी इच्छा आहे की आपण मला कृपा करून समजावून सांगावे की चिदनुभव काय वस्तू आहे?

बाबाजी–'मन' वाणीसोबत त्या तत्त्वास प्राप्त न करून परतून येते. केवळ चिदानंदाच्या अनुशीलनानेच ते प्राप्त होते. आपण वितर्क सोडून काही दिवस नामजप करावा. नामाच्या प्रभावाने आपले सारे संदेह आपोआपच दूर होत होतील; आणि आपण याविषयी कुणासही काहीही विचारू नये.

लाहिडी–मी जाणले आहे की श्रीकृष्णात श्रद्धेची भावना ठेवीत त्यांच्या नामरसाचे पान केल्यानेच पूर्ण परमार्थ लाभ केला जाऊ शकतो. मी संबंध-ज्ञानास नीट समजून घेऊन मग नाम ग्रहण करीन.

बाबाजी–ही सर्वात चांगली गोष्ट आहे. आपण संबंध ज्ञानाचा योग्य प्रकारे अनुभव करा.

लाहिडी–भगवत्-तत्त्व मला समजले आहे. भगवानच एक परमतत्त्व आहेत. ब्रह्म आणि परमात्मा त्यांच्या अधीन आहेत. ते सर्वव्यापी असूनही आपल्या अपूर्व श्रीविग्रहाद्वारे चित्-जगात विराजमान आहेत. ते सर्वशक्तिसमन्वित आणि सच्चिदानन्द-घन पुरुष आहेत. समस्त शक्तींचे अधीश्वर होऊनही ते ल्हादिनीशक्तीच्या संग-सुखात सदा विभोर असतात. आता कृपा करून आपण मला जीवतत्त्वाचा उपदेश करावा.

बाबाजी–श्रीकृष्णाच्या अनंत शक्तींमध्ये 'तटस्थाशक्ती' देखील एक शक्ती आहे. या शक्तीतून एक असे तत्त्व बहिर्गत होते जे चित्-जगत आणि जड-जगत या दोहोंतही विचरण करू शकते. या तत्त्वास जीवतत्व म्हणतात. जिवाची गठण केवळ चित्-परमाणू आहे. क्षुद्र असल्याने तो जगात आबद्ध होण्यायोग्य असतो. परंतु शुद्ध चित्-गठण असल्याने थोडे जरी चित्-बल प्राप्त झाले तरी तो चित्-जगाचा निवासी होऊन परमानंद लाभ करू शकतो. जीव दोन प्रकारचे असतात–बद्ध आणि मुक्त. चित् जगात रहाणारे जीव मुक्त आहेत आणि मायेद्वारे बद्ध होऊन जड-जगात आसक्त जीव बद्ध आहेत. बद्धजीव दोन प्रकारचे आहेत–उदित-विवेक आणि अनुदित-विवेक. ते मनुष्य ज्यांच्याकडून परमार्थासाठी प्रयत्न होत नाही तथा पशू-पक्षी–हे सगळेच अनुदित-विवेक बद्धजीव आहेत. जे मनुष्य वैष्णव पथाचे (मार्गाचे) अवलंबन

करतात, ते उदित-विवेक बद्धजीव आहेत, कारण वैष्णवांव्यतिरिक्त अन्य कुणातही परमार्थाप्रती सच्चे प्रयत्न नसतात. म्हणूनच शास्त्रांमध्ये वैष्णव-सेवा आणि वैष्णव-संगास सर्व कर्मांत श्रेष्ठ मानले गेले आहे. ज्या शास्त्रीय श्रद्धेचे अवलंबन केल्याने उदित-विवेक जीवांमध्ये (वैष्णवांत) कृष्णनामाच्या भजनात रुची उत्पन्न होते, त्यामुळेच त्यांच्यात वैष्णव-सेवा आणि वैष्णव-संगात रुची होते. परंतु अनुदित-विवेक मानव-शास्त्रीय श्रद्धेद्वारे कृष्णनाम ग्रहण करीत नाहीत; केवळ परंपरागत आचारांनुसार कृष्णमूर्तींचे अर्चन करतात. म्हणून या लोकांत वैष्णव-सेवा आणि सत्संगात रुची होत नाही.

लाहिडी–कृष्णतत्त्व आणि जीवतत्व समजलो. आता कृपा करून मायातत्त्व देखील समजावून सांगा.

बाबाजी–माया अचित् व्यापार आहे. ‘माया’ कृष्णाची एक शक्ती आहे. तिचे नाव अपराशक्ती वा बहिरंगाशक्ती देखील आहे. जशी सावली प्रकाशापासून दूर रहाते, त्याचप्रमाणे मायादेखील कृष्ण आणि कृष्णभक्तीपासून दूर रहाते. जड-जगात चौदा भुवने, पृथ्वी, जल, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि जड देहात माया आमित्वरूप (स्वतःस शरीर मानण्याचा) अहंकार निर्माण करते. बद्धजिवाचे स्थूल आणि लिंग (सूक्ष्म) असे दोन्ही देह मायिक आहेत. मुक्त झाल्यावर जिवाचा चित्-देह निर्मळ होऊन जातो. जीव जितका अधिक मायेमध्ये फसतो, तो कृष्णापासून तितकाच बहिर्मुख होत जातो. आणि मायेपासून जितका अलग होतो, तितकाच अधिक तो कृष्णाचे सामुख्य प्राप्त करतो. बद्धजिवांच्या भोगाकरिता कृष्णाच्या इच्छेने मायिक ब्रह्मांडाची सृष्टी होते. मायिक जगात जीवांचे नित्य निवासस्थळ नाही, उलटपक्षी हे जग जिवांकरिता कारागृहमात्र आहे.

लाहिडी–प्रभो! आता माया, जीव आणि कृष्णाच्या नित्य संबंधाविषयी सांगा.

बाबाजी–जीव अणू चित् आहे; आणि कृष्ण पूर्ण चित् आहेत. म्हणून जीव कृष्णाचा नित्यदास आहे. हे मायिक जगत जीवांचे कारागृह आहे. येथे सत्संगाच्या बळावर नामाचे अनुशीलन करता-करता कृष्णकृपेने, तो चित्-जगतात आपल्या सिद्ध चित्-स्वरूपात प्रतिष्ठित होऊन कृष्ण-सेवा-रसाचे पान करतो. हाच तिन्ही तत्त्वांचा परस्पर निगूढ संबंध आहे. याचे ज्ञान न झाल्याने भजन कसे होऊ शकते?

लाहिडी–जर विद्याध्ययनाद्वारे ज्ञान लाभ होतो तर वैष्णव होण्याकरिता पांडित्याची आवश्यकता असते काय?

बाबाजी–वैष्णव होण्याकरिता कुठल्या विद्येचे अथवा कुठल्या भाषेचे शिक्षण घ्यावे लागत नाही. जिवाचा मायाभ्रम दूर करण्याकरिता सद्गुरू सद्वैष्णवांच्या चरणी आश्रय घ्यायला पाहिजे. ते आपल्या वाणी आणि आचरणाद्वारे संबंध-ज्ञानाचा उदय करवितात. याचेच नाव दीक्षा आणि शिकवण आहे.

लाहिडी–दीक्षा आणि शिकवण प्राप्त केल्यानंतर काय करावे लागते?

बाबाजी–सच्चरित्रतेसोबत कृष्णाचे भजन करावे लागते. याचेच नाव 'अभिधेय-तत्त्व' आहे. हे तत्त्व वेदादी समस्त शास्त्रांमध्ये प्रबळ रूपाने अभिहित (कथित) असल्याने श्रीमन्-महाप्रभूंनी याचे नाव 'अभिधेय तत्त्व' असे ठेवले आहे.

अश्रुपूर्ण नयनांनी लाहिडी महाशय म्हणाले–गुरो! मी आपल्या श्री-चरणांचा आश्रय घेत आहे. आपली मधुर उपदेश-वाणी ऐकून मला संबंधज्ञान प्राप्त झाले आहे आणि त्याचबरोबर न जाणे कसे पण आपल्या कृपेने माझे वर्ण, शिकवण आणि विद्या आदींचे संस्कार दूर झालेत. आता कृपा करून मला अभिधेय-तत्त्वाचा उपदेश प्रदान करावा.

बाबाजी–आता कसलीच चिंता नाही. जर आता आपल्यात दीनता आली आहे तर मग समजा की श्रीचैतन्यदेवांनी आपल्यावर अवश्य कृपा केली आहे. जगात फसलेल्या जिवांकरिता साधुसंग हाच एकमात्र उपाय आहे. साधू-गुरू कृपा करून भजनाचा उपदेश देतात. त्याच भजनाच्या बळावर हळू-हळू प्रयोजन लाभ होतो. भगवत्-भजनासच अभिधेय म्हणतात.

लाहिडी–मला सांगा की काय केल्याने भगवंताचे भजन होईल?

बाबाजी–भक्ती म्हणजेच हरिभजन. भक्तीच्या तीन अवस्था आहेत–साधन, भाव आणि प्रेम. प्रथम साधन-भक्ती करता-करता 'भाव' उदित होतो. हाच 'भाव' पूर्ण झाल्यावर ते 'प्रेम' म्हणविले जाते.

लाहिडी–साधने किती प्रकारचे असतात? आणि कशा प्रकारे त्यांचे पालन केले जाऊ शकते?

बाबाजी–'श्रीभक्तिरसामृतसिन्धू' नामक ग्रंथात श्रीरूपगोस्वामींनी या विषयी विस्तारपूर्वक लिहिले आहे. मी संक्षेपात ते सांगतो. साधने नऊ प्रकारची असतात–

**श्रवणं कीर्त्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वन्दनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥**

(श्रीमद्भा.७/५/२३)

श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन–या नऊ प्रकारच्या साधन भक्तीचे वर्णन श्रीमद्भागवतात केलेले आहे. श्रीरूपगोस्वामींनी चौसष्ट प्रकारच्या साधनभक्तीचे सांगोपांग वर्णन केलेले आहे. यातील एक महत्त्वाची गोष्ट अशी की साधन भक्ती दोन प्रकारची असते–वैधी आणि रागानुगा. वैधी साधनभक्ती उपर्युक्त नऊ प्रकारची असते आणि केवळ व्रजवासियांच्या अनुगामी होत त्यांच्याप्रमाणे कृष्णाची मानस-सेवा करण्यास रागानुगा साधनभक्ती म्हटले जाते. जो साधक ज्या प्रकारे भक्तीचा अधिकारी असतो, त्यास त्याच प्रकारचे साधन करायला हवे.

लाहिडी–साधनभक्तीत अधिकाराचा विचार कशाप्रकारे केला जातो?

बाबाजी–गुरुदेव ज्या श्रद्धाळू साधकास शास्त्राच्या विधींच्या अधीन राहाण्याचे अधिकारी समजतील, त्यास सर्वप्रथम वैधी साधनभक्तीची शिकवण देतील. जे रागानुगा भक्तीचे अधिकारी आहेत, त्यांना रागमार्गीय भजनाची शिकवण देतील.

लाहिडी–अधिकार कसा जाणला जाऊ शकतो?

बाबाजी–ज्यांच्या आत्म्यात राग-तत्त्वाची उपलब्धी झालेली नसते, आणि ज्यांना शास्त्रांच्या विधीनुसार उपासनादी करण्याची इच्छा असते, ते वैधीभक्तीचे अधिकारी असतात. हरिभजनात शास्त्रविधींच्या अधीन जे राहू इच्छित नाहीत परंतु त्यांच्या आत्म्यात हरिभजनाकरिता स्वाभाविक अनुराग उदित झाला आहे, ते रागानुगा भजनाचे अधिकारी असतात.

लाहिडी–प्रभो! आपण माझा अधिकार निर्णीत करा, जेणेकरून मी अधिकार तत्त्वास समजू शकेन. वैधी आणि रागानुगा भक्तीचा हा विचार मी अजूनही समजू शकलो नाही.

बाबाजी–आपल्या चित्ताची परीक्षा घेतल्यानंतर आपण आपला अधिकार स्वतःच जाणून घेऊ शकतो. आपल्याला असे वाटते का की शास्त्रानुसार न चालण्याने भजन होऊ शकत नाही?

लाहिडी–मला असे वाटते की शास्त्राद्वारे निर्धारित विधींनुसार साधनभजन केल्यानेच अधिक उपकार होऊ शकतो. परंतु आजकाल माझ्या मनात असेही येते की हरिभजन रसांचा समुद्र आहे, हळू-हळू भजनाच्या बळाने याला प्राप्त करता येऊ शकते.

बाबाजी–आता पहा, आपल्या हृदयात शास्त्राच्या विधींचेच अधिपत्य अधिक आहे. म्हणून आपण वैधीभक्तीचे अवलंबन करा. हळू-हळू राग-तत्त्व हृदयात उदित होईल.

हे ऐकून लाहिडी महाशय सजल नेत्रांनी बाबाजींच्या चरणी पडत म्हणाले– आपण कृपा करून वैधी वा रागानुगा भक्तीचा उपदेश, ज्यात माझा अधिकार असेल– प्रदान करावा. आता मी अनधिकार चर्चा करू इच्छित नाही.

बाबाजींनी त्यांना मिठी मारून बसविले.

लाहिडी–आता मी कशा प्रकारे भजन करावयास हवे, मला स्पष्ट आज्ञा द्या.

बाबाजी–आपण 'हरिनाम' ग्रहण करा. समस्त भजनांपेक्षा श्रीनामभजनच अधिक बलवान आहे. नाम आणि नामीत काहीच भेद नाही. निरपराध होत नाम ग्रहण करा. नामभजनाने नऊ प्रकारचे भजन (नवधाभक्ती) होत जाते. नामाचे उच्चारण केल्याने श्रवण आणि कीर्तन दोन्हीही होतात. नाम जप करता-करता सोबतच भगवंताच्या लीलांचे स्मरण आणि मनाद्वारे पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य तथा आत्मनिवेदन सगळे काही होते.

लाहिडी–माझे चित्त व्याकूळ झाले आहे. प्रभो! कृपा करण्यास उशीर करू नका.

बाबाजी–आपण निरपराध होत निरंतर हेच नाम जपत रहा–

**हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।**
**हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥**

असे म्हणता-म्हणता बाबाजींनी लाहिडी महाशयांच्या हातात एक तुळशीची माळ दिली. लाहिडी महाशय त्या माळेवर उक्त नाम उच्चारण करता-करता रडू लागले आणि म्हणाले–प्रभो! आज मला इतका आनंद झालाय, ज्याचे मी वर्णनच करू शकत नाही.

असे म्हणत-म्हणत ते अत्यानंदाच्या भरात अचेतन होऊन बाबाजींच्या चरणी कोसळले. बाबाजींनी त्यांना सावधानतेने सावरले. खूप वेळानंतर लाहिडी महाशय म्हणाले–आज मी धन्य झालो! असे सुख मला कधीच मिळाले नव्हते.

बाबाजी–आपण धन्य आहात, कारण आपण श्रद्धापूर्वक श्रीहरिनाम ग्रहण केले आहे. आपण मलाही धन्य केलेत.

त्याच दिवसापासून लाहिडी महाशय माळ घेऊन आपल्या कुटीत निर्भय होऊन 'नाम' जप करू लागले. अशा प्रकारे काही दिवस लोटले. लाहिडी महाशय आता आपल्या शरीरावर द्वादश तिलक लावतात. भगवंताला निवेदित केलेल्या वस्तुव्यतिरिक्त कसलेच भोजन करीत नाहीत. प्रतिदिन दोन लाख हरिनाम करतात. शुद्ध वैष्णवांना पहाताच दंडवत-प्रणाम करतात. परमहंस बाबाजींना नित्य दंडवत-प्रणाम केल्यानंतरच दुसरे काम करतात. आपल्या गुरुदेवांची सर्वदा सेवा करतात. व्यर्थच्या गप्पा आणि उस्तादी गाण्यांमध्ये आता त्यांना रुची राहिली नाही. लाहिडी महाशय पहिल्यासारखे लाहिडी महाशय राहिले नाहीत. आता ते वैष्णव बनले आहेत.

एकदा लाहिडींनी वैष्णवदास बाबाजींना साष्टांग दंडवत प्रणाम करून जिज्ञासा केली–प्रभो प्रयोजन-तत्त्व काय आहे.

बाबाजी–कृष्णप्रेमच जिवाचे प्रयोजन तत्त्व आहे. साधन करता-करता भाव उदित होतो. भाव पूर्ण झाल्यावर प्रेम म्हणविले जाते. तोच जिवाचा नित्यधर्म आहे, तेच नित्य धन आहे आणि तेच नित्य प्रयोजन आहे. त्या प्रेमाच्या अभावानेच जीव

नाना प्रकारचे कष्ट भोगतात, जडबंधनात फसतात. प्रेमापेक्षा श्रेष्ठ काहीच नाही. कृष्ण केवळ प्रेमाच्या वशीभूत होतात. प्रेम चिन्मय तत्त्व आहे. आनंद घनीभूत झाल्यावर प्रेम होते.

लाहिडी–(रडत-रडत) मी प्रेम लाभ करण्याच्या योग्यतेचा कधी बनू शकेन काय?

बाबाजी–(लाहिडी महाशयांना मिठी मारत) थोड्याच दिवसांत आपण साधनभक्तीस भावभक्ती बनविले आहे आणि काही दिवसातच कृष्ण आपल्यावर अवश्य कृपा करतील.

हे ऐकून लाहिडी महाशय आनंदाने गद्‌गद होत बाबाजींच्या चरणी लोळण घेत म्हणाले–अहा! गुरुव्यतिरिक्त आणखी कुठलीही वस्तू नाही. हाय! मी इतके दिवस काय करत राहिलो? गुरुदेवांनी स्वयं कृपा करून विषयाच्या विहिरीतून माझा उद्धार केला

**॥ चतुर्थ अध्याय समाप्त ॥**



# पाचवा अध्याय (वैधीभक्ती–नित्यधर्म आहे, नैमित्तिक नाही)

लाहिडी महाशय शान्तिपुरचे निवासी होते. त्यांना दोन पुत्र होते. उच्च शिक्षित होते. एकाचे नाव चन्द्रनाथ आहे, त्यांचे वय पस्तीस वर्ष आहे. ते जमीनदारी आणि घराची सगळी कामे सांभाळतात, चिकित्सा शास्त्राचे पंडित आहेत; धार्मिक गोष्टीत कुठलेही कष्ट घेणे पसंत करीत नाहीत, तरीही ब्राह्मण समाजात त्यांना भरपूर सन्मान आहे. दास-दासी आणि द्वारपाल आदी ठेवून घरचे कामकाज अगदी थाटामाटात करीत असतात. छोट्या पुत्राचे नाव देवीदास आहे. ते न्यायशास्त्र आणि स्मृतिशास्त्राचे अध्ययन करून आपल्या घरासमोरच एक पाठशाळा चालवितात. त्यातच ते दहा-पंधरा विद्यार्थ्यांना शिकवतात, त्यांना विद्यारत्न उपाधी प्राप्त झालेली आहे.

एकदा शान्तिपुरात चर्चा पसरली की कालिदास लाहिडी वेष धारण करून वैष्णव झाले आहेत. घाट, रस्ते, आणि बाजार सर्वत्र हीच एक चर्चा होती. कोणी म्हणाले–"म्हाताऱ्याला साठी बाधलीय, इतके दिवस भला माणूस होता आणि आता वेडा झालाय." कुणी म्हणे–"अच्छा! आता हा आणखी कुठला रोग आहे बुवा? घरात सगळी सुखे हात जोडून उभी आहेत, जातीने ब्राह्मण आहेत, पुत्र-परिवार सगळेच आज्ञेत आहेत, मग अशी माणसे का आणि कोणत्या दुःखामुळे वेष धारण करतात?" कुणी म्हणाले–"धर्म-धर्म ओरडत इथे-तिथे फिरल्याने शेवटी अशीच दुर्गती होणार!" कुणी एका सज्जन व्यक्तीने म्हटले की, "कालिदास लाहिडी महाशय मोठे पुण्यात्मा आहेत. संसारात सर्व काही आहे, मग तरीही अंतिम समयी हरिनामात प्रेम झाले आहे." अशाच तऱ्हेतऱ्हेच्या चर्चा सुरू होत्या. कुणीतरी ह्या गोष्टी ऐकून देवीदास विद्यारत्नांना सगळ्या सांगितल्या–

विद्यारत्न खूपच चिंतातूर होत मोठ्या भावास जाऊन म्हणाले–भाऊ साहेब! वडिलांमुळे तर बरीच नामुश्की निर्माण झालीय. ते स्वास्थ्य चांगले रहावे या बहाण्याने नदियाच्या गोद्रुमात रहात आहेत, परंतु तिथे त्यांचा संग काही चांगला नाही. गावातील चर्चा कानाला नकोश्या वाटतात.

चन्द्रनाथ म्हणाले–भाऊ! माझ्यादेखील कानावर आलंय थोडे-थोडे. आपले घराणे इतके उच्च, परंतु वडिलांची करणी ऐकून आता तोंड दाखवायला जागा राहिली नाही. आपण तर अद्वैत प्रभूच्या वंशाचा अनादर करीत आलोय–आता आपल्याच घरात हे काय चाललंय? चला आत जाऊ, आईबरोबर या संदर्भात चर्चा करून जे योग्य आहे ते करूया.

घराच्या दुसऱ्या माळ्यावर अंगणात चन्द्रनाथ आणि देवीदास भोजन करीत बसले होते. एक विधवा ब्राह्मणी जेवण वाढत होती. गृहिणी माता ठाकुराणी जवळच बसून त्यांना जेवण करवित होती. चन्द्रनाथ म्हणाले–आई! वडिलांविषयी काही ऐकले का?

आई म्हणाली–का? ते ठीक तर आहेत ना? ते तर हरिनामात मत्त होऊन नवद्वीपात वास करीत आहेत ना? तुम्ही त्यांना इथे का घेऊन येत नाही?

देवीदास म्हणाले–आई! पिताजी कुशल आहेत, पण जसे कानावर येतेय त्यावरून आता त्यांचा अधिक भरवसा नाही. उलट त्यांना येथे आणल्यावर आपल्यालाच समाज वाळीत टाकेल असे वाटते!

आई थोडीशी घाबरून म्हणाली–असे झालेय तरी काय त्यांना? त्यादिवशी मोठ्या गोस्वामींच्या सुनेबरोबर गंगातटावर माझे बरेच बोलणे झाले. ती म्हणत होती–"तुमच्या पतीचे अगदी मंगल झाले आहे–त्यांनी वैष्णवांत खूप सन्मान मिळवला आहे."

देवीदास जरा मोठ्यानेच म्हणाले–काय सन्मान मिळवलाय–माझे डोके! या म्हातारपणी घरात बसून आम्हांकडून सेवा ग्रहण करत बसायचे, तर तिकडे नाना जातींच्या कौपीनधारींचे उष्टे खात आपल्या उच्च वंशाला कलंक लावत फिरत आहेत! हाय रे कली! इतके सगळे पाहून-ऐकूनही त्यांची बुद्धी झालीच कशी हे सगळे करायला?

आई म्हणाली–मग त्यांना इथेच बोलावून घ्या ना! इथेच कुठेतरी गुप्तस्थळी ठेवा आणि समजावून सांगून त्यांची मती परत बदलवा.

चन्द्रनाथ म्हणाले–आता याशिवाय आणखी आपण करू तरी काय शकतो? देवी–दोन-चार माणसांना बरोबर घेऊन लपून-छपून गोद्रुमी जाऊया आणि वडिलांना घेऊन येऊया.

देवीदास म्हणाले–आपण सगळे तर जाणताच, वडील मला नास्तिक म्हणून माझा अनादर करीत असतात. मी तेथे गेलो तर ते माझ्याशी बोलायचे सुद्धा नाहीत–याचाच विचार करतोय मी.

शम्भुनाथ देवीदासाचे मामेभाऊ आहे. लाहिडी महाशय त्यांच्यावर खूप प्रेम करतात–त्यांनी लाहिडी महाशयांबरोबर राहून त्यांची बरीच सेवा केली आहे. त्यामुळे मग ठरले की देवीदास आणि शम्भुनाथ मिळून गोद्रुमी जातील. त्याच दिवशी एका नोकरास गोद्रुमास एका ब्राह्मणाच्या घरी यांची राहण्याची व्यवस्था करण्यासाठी पाठविले.

दुसऱ्या दिवशी जेवण करून देवीदास आणि शम्भुनाथ गोद्रुमी पोहोचले. त्यांनी निर्दिष्ट स्थानी पोहोचून पालखीतून उतरल्यानंतर भोयांना परत पाठविले. तेथे एक स्वयंपाकी ब्राह्मण आणि दोन सेवक आधीच उपस्थित होते.

संध्याकाळी दोघांनी श्रीप्रद्युम्नकुंजाची यात्रा केली. तेथे पोहोचताच पाहिले की–श्रीसुरभी चबुतऱ्यावर एका पानांच्या आसनावर पिताजी डोळे बंद करून आसनस्थ होऊन हरिनाम जपत आहेत. त्यांच्या समस्त अंगावर द्वादश-तिलक सुशोभित आहेत. देवीदास आणि शम्भुनाथ यांनी हळूहळू चबुतऱ्यावर चढून त्यांच्या चरणांना प्रणाम केला. लाहिडी महाशयांनी चाहूल लागताच डोळे उघडले आणि त्या दोघांना बघून विस्मित होत विचारले–काय रे शम्भू! इथे कसे काय आलात? सर्व ठीक तर आहे ना?

दोघेही विनम्रतेने म्हणाले–आपल्या आशीर्वादाने सगळेच कुशल मंगल आहे.

लाहिडी महाशयांनी विचारले–तुम्ही भोजन करणार का?

दोघांनी उत्तर दिले–आम्ही इथे जवळच राहाण्याची व्यवस्था केली आहे. त्याविषयी आपण चिंता करू नका.

त्याचवेळी प्रेमदास बाबाजींच्या माधवी-मालती मंडपात एक हरिध्वनी झाला. वैष्णवदास बाबाजी आपल्या कुटीतून बाहेर येत लाहिडी महाशयांना विचारू लागले–परमहंस बाबाजी महाशयांच्या मंडपात हरिध्वनी का झाला?

लाहिडी महाशय आणि वैष्णवदास बाबाजी पुढे सरसावत पाहू लागले. त्यांनी पाहिले की–खूपसे वैष्णव लोक बाबाजींची प्रदक्षिणा करीत आहेत आणि हरिध्वनी देत आहेत. हे सगळेजण तिथे उपस्थित झाले. सगळे लोक परमहंस बाबाजी महाराजांना दंडवत प्रणाम करून चबुतऱ्यावर बसले. देवीदास आणि शम्भुनाथ सुद्धा मंडपात एका कोपऱ्यात हंसांमध्ये कावळ्यांप्रमाणे बसून राहिले.

तेवढ्यात एक वैष्णव बोलू लागले–आम्ही कंटक नगरहून आलो आहोत. श्रीनवद्वीप-मायापूर दर्शन आणि परमहंस बाबाजी महाराजांची चरणधूळ ग्रहण करणे हाच आमचा मुख्य उद्देश आहे.

परमहंस बाबाजी महाराज लज्जित होऊन म्हणाले–मी अत्यंत पामर आहे, मला पवित्र करण्याकरिताच आपले आगमन झाले आहे.

थोड्या वेळातच हे प्रकट झाले की ते सगळेच हरि-गुणगानात प्रवीण आहेत. लगेचच मृदंग आणि करताल (टाळ) मागवले गेले. त्यातील एका म्हाताऱ्या व्यक्तीने प्रार्थनेचे एक मधुर पद गायले. मग ते पद संपताच लाहिडी महाशयांचे एक पददेखील त्यांनी गायले. अत्यंत सरस आणि मधुर पद होते ते. त्याची शेवटी ओळ होती–

**"कालिदास म्हणे माझ्या हृदयात, जागले श्रीराधाश्याम।"**

या पदास सगळे जण एकत्र गाता-गाता उन्मत्त झाले. शेवटी "जागले श्रीराधाश्याम" या अंशाला परत-परत गातांना उदंड नृत्य होऊ लागले. नाचता-नाचता कित्येक भावुक वैष्णव अचेतन होऊन पडले. त्यावेळी एक अपूर्व दृश्य उपस्थित झाले, ते पाहून देवीदास मनोमन विचार करू लागले की पिताजी यावेळी परमार्थात मग्न झाले आहेत, त्यांना अशावेळी घरी परतवून नेणे कठीण आहे. सुमारे अर्ध्या रात्री सभा समाप्त झाली. सगळे लोक परस्पर दंडवत प्रणाम करून आपापल्या घरी परतले. देवीदास आणि शम्भुनाथ वडिलांची आज्ञा घेऊन आपल्या निवासस्थानी परतले.

दुसऱ्या दिवशी भोजनानंतर परत देवी आणि शम्भू, लाहिडी महाशयांच्या कुटीत पोहोचले.

लाहिडी महाशयांना प्रणाम करून देवीदास म्हणाले–बाबा! आपल्याकडे एक प्रार्थना आहे. आता आपण शान्तिपुरातल्या घरीच रहात चला. घरी आपली सेवा करून आम्ही सुखी होऊ. आज्ञा असेल तर, एक निर्जन कुटीदेखील आपल्यासाठी प्रस्तुत केली जाईल.

लाहिडी महाशय उत्तरले–गोष्ट तर ठीक आहे, परंतु मी इथे जसा सर्वदा सत्संगात असतो, तसा शान्तिपुरात राहू शकणार नाही. देवी! तू तर जाणतोच, शान्तिपुरवासी किती निरीश्वर आणि निंदाप्रिय आहेत! तेथे तर भल्या लोकांनी राहणेच कठीण आहे. तेथे अनेक ब्राह्मण आहेत. ही गोष्ट जरी खरी असली तरी विणकरांच्या संसर्गाने त्यांची बुद्धी सुद्धा कुंठित झाली आहे. तलम कपडे, मोठमोठ्या बाता आणि वैष्णव निंदा–ही शान्तिपुरच्या रहिवाश्यांची तीन लक्षणे आहेत. अद्वैत प्रभूंचे वंशज तेथे किती कष्टात आहेत! कुसंगामुळे ते पण जवळपास महाप्रभूंचे विरोधी झाले आहेत. म्हणून तुम्ही प्रयत्नपूर्वक मला या गोद्रुमीच ठेवा. हीच माझी इच्छा आहे.

देवीदास म्हणाले–पिताजी! तुमचे म्हणणे अगदी बरोबर आहे. परंतु आपण कुठल्याही शान्तिपुरवासियांशी कसल्याही प्रकारचा व्यवहार ठेवालच का? निर्जन स्थानी आपल्या धर्माचे आचरण करीत-करीत संध्या-वंदना आदी करीत दिवस व्यतीत करा. ब्राह्मणाचे नित्यकर्मच नित्यधर्म आहे. त्यातच मग्न रहाणे आपल्या सारख्या महात्म्यांचे कर्तव्य आहे.

लाहिडी महाशय काहीसे गंभीर होत म्हणाले–बेटा! आता ते दिवस राहिले नाहीत. कित्येक महिने साधुसंग करून आणि श्रीगुरुदेवांचा उपदेश श्रवण करून माझा विचार आता खूपच बदलला आहेत. तुम्ही ज्याला नित्यधर्म म्हणता, मी त्याला नैमित्तिक धर्म समजतो. हरिभक्तीच जिवाचा एकमात्र नित्यधर्म आहे. संध्या-वंदनादी वास्तवात नैमित्तिक धर्म आहेत.

देवीदास म्हणाले–पिताजी! मी कुठल्याच शास्त्रात असे पाहिले नाही. संध्या-वंदनादी हरिभजन नाही का? जर हरिभजन आहे, तर ते सुद्धा नित्यधर्म

आहेत. संध्या-वंदनादी कार्य आणि श्रवण-कीर्तनादी वैधीभक्ती यांच्यात काही फरक आहे का?

लाहिडी महाशय म्हणाले–बेटा! कर्मकांडातल्या संध्या-वंदनेत आणि वैधीभक्तीत विशेष अंतर आहे. कर्मकांडात संध्या-वंदनादींचे अनुष्ठान मुक्ती प्राप्त करण्याकरिता असते. परंतु हरिभजन श्रवण आणि कीर्तनाला कुठलाच हेतू नसतो. मग श्रवण आणि कीर्तन आदी वैधीभक्तीच्या अंगांची जी फळे पहातो, ती सगळी केवळ बहिर्मुख लोकांची त्यात रुची उत्पन्न करण्यासाठी आहेत. हरिभजनाचे हरिसेवाव्यतिरिक्त कोणतेच फळ नाही. हरिभजनात प्रेम उत्पन्न करणेच वैध अंगांचे मुख्य फळ आहे.

देवीदास म्हणाले–तसे जर असेल तर मग हरिभजनाची गौण फळेही आहेत असे मानायला हवे?

लाहिडी–साधकांची भेदानुरूप गौण फळे असतात. वैष्णवांची साधनभक्ती केवळ सिद्धभक्ती उदय करविण्याकरिता असते. अवैष्णव सुद्धा त्याच अंगाचे पालन करतात, परंतु हे पालन ते दोन उद्देशांनी करतात–भोग आणि मोक्ष. साधन-क्रियेच्या आकारांत काहीच फरक दिसत नाही, परंतु भेद आहे साधकांच्या निष्ठेत. कर्मांगात कृष्ण-पूजेद्वारे चित्त-शोधन आणि मुक्ती अथवा रोग-शांती वा पार्थिव फळ प्राप्त होते. भक्ति-अंग रूपात तीच कृष्ण-पूजा केवळ कृष्णनामात प्रेम उत्पन्न करविते. कर्मींच्या एकादशी व्रताने पापे नष्ट होतात आणि भक्तांच्या एकादशी व्रताने हरिभक्ती वाढते. पाहिलेत, किती जमीन आस्मानाचा फरक आहे ते! कर्मांग आणि भक्ति-अंगात जो सूक्ष्म भेद आहे, तो भगवत्-कृपेनेच जाणला जाऊ शकतो. जितक्या प्रकारची गौण फळे असतात, ती सगळी मिळून दोन भागांत विभक्त केलेली आहेत–भुक्ती आणि मुक्ती.

देवीदास–मग शास्त्रांमध्ये गौण फळांचेच माहात्म्य का वर्णिले आहे?

लाहिडी–जगात दोन प्रकारचे लोक आहेत–उदित-विवेक आणि अनुदित-विवेक. अनुदित विवेक व्यक्ती फळ न पहाता कुठलेही सत्कर्म करीत नाहीत. त्यांच्याकरिताच गौण फळांचे माहात्म्य वर्णन केले आहे. शास्त्राचे हे तात्पर्य नाही की त्यांनी गौण फळांनीच संतुष्ट रहावे. शास्त्रांचे तात्पर्य हे आहे की गौण फळांना पाहून

त्यांच्याकडे आकृष्ट होऊन थोड्याच काळात साधूंच्या कृपेने मुख्य फळांचा परिचय आणि त्यात रुची होऊ शकेल.

देवीदास–स्मार्त रघुनन्दन आदी यांची गणना अनुदित विवेकयुक्त व्यक्तींमध्ये होते का?

लाहिडी–नाही, ते स्वतः मुख्य फळाचा शोध घेतात, केवळ अनुदित-विवेकींकरिता त्यांनी व्यवस्था मात्र करून ठेवली आहे.

देवीदास–काही-काही शास्त्रांमध्ये केवळ गौणफळांचा उल्लेख मिळतो, मुख्य फळांचा त्यात काहीही उल्लेख नसतो–याचे काय कारण आहे?

लाहिडी–मनुष्यांच्या विविध अधिकार भेदाने शास्त्रसुद्धा तीन प्रकारची आहेत–सात्त्विक, राजसिक आणि तामसिक. सत्त्वगुणविशिष्ट मनुष्यांकरिता–सात्त्विक शास्त्रे आहेत, रजोगुणविशिष्ट मनुष्यांकरिता–राजसिक शास्त्रे आहेत तथा तमोगुणविशिष्ट मनुष्यांकरिता–तामसिक शास्त्रे आहेत.

देवीदास–असे जर असेल तर शास्त्राच्या कुठल्या गोष्टीवर विश्वास ठेवायचा आणि कुठल्या उपायांद्वारे निम्न अधिकाऱ्यांना उच्चगती प्राप्त होऊ शकते?

लाहिडी–मनुष्यांच्या अधिकारांत भेदानुरूप त्यांचे स्वभाव आणि श्रद्धा यांतपण भेद असतो. तामसिक मनुष्यांची तामसिक शास्त्रांमध्ये, राजसिक मनुष्यांची राजसिक शास्त्रांमध्ये तथा सात्त्विक मनुष्यांची सात्त्विक शास्त्रांमध्ये स्वाभाविक श्रद्धा असते. श्रद्धेनुसारच त्यांचा विश्वाससुद्धा असतो. श्रद्धेसोबत आपल्या अधिकारासारखे कर्म करता-करता साधुसंगाच्या बळाने उच्च अधिकार निर्माण होतो. उच्च अधिकार निर्माण होताच त्यांचा स्वभाव पुनः उच्च होतो आणि तदनुरूप शास्त्रांत त्यांची श्रद्धा निर्माण होते. शास्त्रकार लोक अभ्रांत पंडित होते. त्यांनी शास्त्रांची रचना अशा प्रकारे केली आहे की आपल्या अधिकार-निष्ठेनेच हळू-हळू उच्च अधिकार स्वयं उत्पन्न होऊन जातो. म्हणून वेगवेगळ्या शास्त्रांमध्ये वेगवेगळ्या अवस्था दिल्या गेल्या आहेत. शास्त्रीय श्रद्धाच समस्त मंगलाचे मूळ आहे. श्रीमद्भगवद्गीता समस्त शास्त्रांचे मीमांसा-शास्त्र आहे. त्यात हा सिद्धांत सुस्पष्ट आहे.

देवीदास–मी लहानपणापासून अनेक शास्त्रांचे अध्ययन केले आहे, परंतु आपल्या कृपेने मला एका अपूर्व तत्त्वाची उपलब्धी झाली आहे.

लाहिडी–श्रीमद्भागवतात (११/८/१०) लिहिले आहे–

**अणुभ्यश्च वृहद्भ्यश्च शास्त्रेभ्यः कुशलो नरः।**
**सर्वतः सारमादद्यात् पुष्पेभ्य इव षट्पदः॥**[१]

बेटा! मी तुला नास्तिक म्हणत होतो. आता मी कुणाचीही निंदा करीत नाही. कारण प्रत्येक व्यक्तीला आपल्या अधिकारानुसार निष्ठा प्राप्त होते. सगळे आपापल्या अधिकारानुसार कार्य करत असतात. वेळ आल्यावर ते हळूहळू उन्नत होतील. तुम्ही तर्कशास्त्र आणि कर्मशास्त्राचे पंडित आहात. म्हणून अधिकारानुसार बोललेल्या गोष्टींकरिता तुझा काहीच दोष नाही.

देवीदास–आत्तापर्यंत माझी अशी धारणा होती की वैष्णव संप्रदायात पंडितच नाहीत. वैष्णव लोक केवळ शास्त्राचा एक अंशमात्र बघून केवळ त्याच गोष्टीचा हट्ट करीत बसतात. आज आपण जे काही सांगितले, त्यामुळे माझी ही धारणा बिलकुल दूर झाली आहे आणि आता मला विश्वास आहे की वैष्णवांत सारग्राही लोकसुद्धा आहेत. काय आपण आजकाल कुणा महात्म्याकडे शास्त्राध्ययन करीत आहात?

लाहिडी–बेटा! आता तू मला कट्टर वैष्णव किंवा जे तुला वाटेल ते म्हण. माझे गुरुदेव या दुसऱ्या झोपडीत भजन करीत आहेत. त्यांनी जे समस्त शास्त्रांचे सार मला सांगितले आहे, तेच मी तुला सांगितले. तू जर त्यांच्या चरणी आश्रय घेऊन काही शिकवण प्राप्त करू इच्छितो आहेस तर भक्तिभावाने त्यांच्याकडे जाऊन जिज्ञासा कर. चल, मी तुझा त्यांच्याशी परिचय करवून देतो. असे म्हणत लाहिडी महाशय देवीदास विद्यारत्नाला श्रीवैष्णवदासांच्या कुटीत घेऊन गेले आणि परिचय करवून देऊन देवीदासांना तिथेच बाबाजींकडे सोडून पुन्हा आपल्या कुटीत परतून हरिनाम करू लागले.

---

(१) ज्या प्रकारे मधमाशी वेगवेगळ्या प्रकारच्या फुलांतून मध संग्रह करते, कल्याण-कामी समर्थ व्यक्ती सुद्धा ठीक त्याचप्रकारे सर्व शास्त्रांचे सार-ग्रहण करतात.

वैष्णवदास–बेटा! तुझे शिक्षण किती झालेय?

देवीदास–न्यायशास्त्राच्या 'मुक्तिपाद' आणि 'सिद्धान्तकुसुमांजली' पर्यंत अभ्यास केला आहे . स्मृतीशास्त्राच्या सर्व ग्रंथांचा अभ्यास केला आहे.

वैष्णवदास–म्हणजे तू शास्त्रांत बरेच परिश्रम घेतले आहेस. त्याच्या फळांचा काही परिचय दे.

देवीदास–"अत्यन्त-दुःख-निवृत्तिरेव मुक्तिः" (सांख्य १/१ आणि ६/५ च्या अवलंबनानुसार) या मुक्तीकरिता सर्वदा प्रयत्नरत रहाणे उचित आहे. मी आपल्या धर्माच्या निष्ठेने याच मुक्तीचा शोध घेत आहे.

वैष्णवदास–हो, मी देखील त्यावेळी याच ग्रंथांना वाचून तुझ्यासारखाच मुक्तीची कामना करीत असे.

देवीदास–मग काय आता आपण मुक्तीची कामना करणे सोडून दिले आहे का?

वैष्णवदास–बेटा! मुक्ती म्हणजे काय, जरा सांग बघू?

देवीदास–न्यायशास्त्रानुसार जीव आणि ब्रह्म तत्त्वात नित्य भेद आहे. म्हणून न्यायमतानुसार–आत्यंतिकी दुःखाची निवृत्ती कशी होऊ शकते–स्पष्ट नाही. वेदान्त मतानुसार अभेद ब्रह्म तत्त्वाच्या अनुसंधानास अर्थात जिवाला ब्रह्मासोबत ऐक्यभाव प्राप्त होण्यास 'मुक्ती' म्हणतात–हेच एक प्रकारे स्पष्ट होते.

वैष्णवदास–बेटा, मी पंधरा वर्षेपर्यंत शंकर संप्रदायाच्या वेदान्त ग्रंथाचा अभ्यास करीत कित्येक वर्षे संन्यासी राहिलो. मुक्तीकरिता खूपसे प्रयत्न केले. शंकरमताच्या चारही महावाक्यांचे अवलंबन करीत खूप दिवस निदिध्यासनसुद्धा करीत राहिलो. नंतर त्या पदास अर्वाचीन समजून त्याचा परित्याग केला.

देवीदास–आपण त्यास अर्वाचीन का समजले?

वैष्णवदास–अनुभवी पुरुष आपली परीक्षा दुसऱ्यांना सहजच समजावू शकत नाहीत. दुसरे त्यांना समजूसुद्धा कसे शकतील?.

देवीदासने पाहिले की वैष्णवदास महापंडित, सरळ आणि महाविज्ञ आहेत. देवीदासांचा वेदान्ताचा अभ्यास नव्हता–ते मनातल्या मनात विचार करू लागले की जर हे कृपा करतील तर माझा वेदान्ताचा अभ्यास होऊ शकेल. असा विचार करून ते म्हणाले–काय मी वेदान्ताचा अभ्यास करण्यायोग्य आहे?

वैष्णवदास–संस्कृत भाषेचा जसा तुझा अधिकार आहे, त्यावरून तुला शिक्षक प्राप्त झाले तर तू अनायासेच वेदान्ताचा अभ्यास करू शकशील.

देवीदास–जर आपण कृपा करून शिकवाल तर मी शिकेन.

वैष्णवदास–एक गोष्ट आहे, मी अकिंचन वैष्णवदास आहे. परमहंस बाबाजींनी मजवर कृपा करून मला हरिनाम जपावयास सांगितले आहे. तेच करीत असतो. वेळ थोडा आहे. खासकरून 'जगद्गुरू' श्रीरूपगोस्वामींनी वैष्णवांना (शंकराचार्यांचे) शारीरिक भाष्य शिकण्यास वा ऐकण्यास मनाई केली आहे–हे जाणून मी 'शंकरभाष्य' वाचतही नाही आणि शिकवतही नाही. तरीसुद्धा जीवलोकाचे आदिगुरू श्रीशचीनन्दन यांनी श्री सार्वभौमांना वेदान्तसूत्राचे जे भाष्य ऐकविले–ते आजसुद्धा अनेक वैष्णवांकडे हस्तलिखित पुस्तकाच्या स्वरूपात वर्तमान आहे. ते जर तुला वाचायची इच्छा असेल तर ते उतरवून घेऊन त्याची प्रत घेऊन जा, मी तुझी मदत करू शकेन. तू कांचनपल्लीचे निवासी श्रीमद् कविकर्णपूर यांच्या घरून उक्त हस्तलिखित पुस्तक मागवू शकतोस.

देवीदास–मी प्रयत्न करीन–आपण वेदान्ताचे महापंडित आहात. आपण मला सरलतापूर्वक खरे-खरे सांगा की वैष्णवभाष्य वाचून वेदान्ताचा यथार्थ अर्थ मी प्राप्त करू शकेन का?

वैष्णवदास–मी शंकरभाष्य वाचले आहे आणि शिकवले देखील आहे. श्रीभाष्य आदी कित्येक भाष्ये वाचली आहेत. परंतु गोपीनाथ आचार्य द्वारा दिलेली महाप्रभूंची सूत्रार्थ व्याख्या–ज्यास गौडीय वैष्णव लोक वाचतात, त्यापेक्षा आणखी काहीच श्रेष्ठ मी पाहिले नाही. भगवत्कृत सूत्रार्थात कोणताही मतवाद नाही. उपनिषदांच्या वचनांनी ज्या सर्व अर्थांचा संग्रह केला जाऊ शकतो, ते सर्व योग्य रितीने या व्याख्येत समाविष्ट आहेत. या सूत्र-व्याख्येस जर कुणी व्यवस्थित ग्रंथन

करेल, तर त्याच्यासमोर अन्य कुठलेही भाष्य विद्वानांच्या सभेत आदर प्राप्त करू शकणार नाही.

हे ऐकून देवीदास विद्यारत्न खूप प्रसन्न झाले आणि श्रद्धापूर्वक वैष्णवदास बाबाजींस प्रणाम करून आपल्या वडिलांच्या कुटीत परतले आणि वैष्णवदास बाबाजींसोबत जो वार्तालाप झाला तो संक्षेपात ऐकवला.

लाहिडी महाशयजींनी प्रसन्न होऊन म्हटले–देवी! तू खूप काही लिहिले-वाचले आहे. परंतु जिवाचे यथार्थ कल्याण कसे होते–आता ते शोधण्याचा प्रयत्न कर.

देवीदास–बाबा! मी एक खूप मोठी आशा घेऊन येथून आपल्याला परत नेण्याकरता आलो आहे. कृपा करून आपण एकदा घरी आल्याने सगळेच कृतार्थ होतील. विशेषतः आई आपल्या दर्शनाकरिता उत्सुक आहे.

लाहिडी–मी वैष्णवचरणी आश्रय ग्रहण केला आहे आणि प्रतिज्ञा केली आहे की भक्ति-विरोधी घरात मी आता कधीच प्रवेश करणार नाही. तुम्ही आधी वैष्णव बना मग मला घरी परत न्या.

देवीदास–बाबा! हे आपण कसे बोलू शकता? आपल्या घरी नित्य भगवंताची सेवा-पूजा होते, आम्ही हरिनामाचा अनादर करीत नाही, अतिथी आणि वैष्णवांचा आदर-सत्कार करतो, तरीसुद्धा आम्ही वैष्णव नाही का?

लाहिडी–यद्यपि वैष्णवांची क्रिया आणि तुमच्या क्रियेत बरेचसे साम्य आहे. दोघांच्याही क्रियेत भेद नाही; तथापि तुम्ही वैष्णव नाहीत.

देवीदास–तेव्हा मग काय केल्याने आम्ही वैष्णव होऊ?

लाहिडी–नैमित्तिक भावांचा परित्याग करून नित्यधर्माचे आचरण केल्यानेच वैष्णव बनले जाऊ शकते.

देवीदास–माझी एक शंका आहे. आपण त्याचे नीट निरसन करण्याची कृपा करावी. माझी शंका अशी आहे की–वैष्णव लोक जे श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवा, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन–या नवधा भक्तीच्या अंगाचे आचरण करतात, त्यात प्रचुर जडमिश्र कर्म आहेत. मग त्यांनासुद्धा नैमित्तिक का नाही

म्हणायचे? याविषयी मला काहीसा पक्षपात दिसतो. श्रीमूर्तीची सेवा, उपवास, जड पदार्थांद्वारे पूजा–हे सगळे तर स्थूल आहे मग हे कशाप्रकारे नित्य असू शकते?

लाहिडी–बेटा! ही गोष्ट समजण्यास मला देखील अनेक दिवस लागले. तू हे सगळे नीट ध्यानात घे. मनुष्य दोन प्रकारचे असतात–(१) ऐहिक–या लोकाशी संबंध ठेवणारे आणि (२) पारमार्थिक–परलोकाशी संबंध ठेवणारे. ऐहिक मनुष्य लौकिक सुख, लौकिक मान आणि लौकिक उन्नतीच्या शोधात असतात. पारमार्थिक मनुष्य तीन प्रकारचे असतात–(१) ईशानुगत, (२) ज्ञाननिष्ठ आणि (३) सिद्धीकामी. सिद्धीकामी–कर्मकांडाच्या फळात आसक्त असतात. हे लोक आपल्या कर्मांद्वारे अलौकिक फळे प्राप्त करू इच्छितात. याग, यज्ञ आणि योग हेच त्या अलौकिक फळास प्राप्त करण्याचे उपाय आहेत. त्यांच्या मते ईश्वरास तर मानले जाते, परंतु तो ईश्वर कर्मांच्या अधीन असतो. वैज्ञानिक याच श्रेणीअंतर्गत मोडतात. ज्ञाननिष्ठ मनुष्य–ज्ञानचर्चेद्वारा आपले ब्रह्मत्व उदय करण्याचा प्रयत्न करतात. ईश्वर कुणी राहो न राहो हे लोक साधनेकरिता एका ईश्वराची कल्पना करतात आणि त्या काल्पनिक ईश्वराची भक्ती करता-करता क्रमशः ज्ञानाचे फळ ब्रह्मत्वाची प्राप्ती करण्याची आशा बाळगतात. ज्ञानाचे फळ प्राप्त झाल्यावर उपायकालीन काल्पनिक ईश्वराची आता काहीच आवश्यकता रहात नाही. त्या लोकांची ईश्वरभक्तीसुद्धा शेवटी ज्ञानरूपात बदलून जाते. या मतात ईश्वर आणि ईश्वरभक्ती, दोहोंना अनित्य मानले जाते. ईशानुगत मनुष्य तृतीय श्रेणीच्या पारमार्थिक मनुष्यांतर्गत येतात. तेच यथार्थतः परमार्थाचा शोध लावतात. त्यांच्या मतानुसार ईश्वर एक आहे. ते अनादी व अनंत आहेत. ते आपल्या शक्तीद्वारे जीव आणि जडाची सृष्टी करतात. जीव त्यांचे नित्य दास आहेत. मुक्तीनंतर सुद्धा ते ईश्वराचे दासच रहातात. नित्यकाळ ईश्वराच्या अनुगत राहणेच जिवाचा नित्यधर्म आहे. जीव स्वबळावर काहीच करू शकत नाही. कर्मांद्वारे जीव कुठलेच नित्य फळ प्राप्त करू शकत नाहीत. ईश्वराची श्रद्धापूर्वक सेवा केल्याने त्यांच्या कृपेने जिवाची सर्वार्थसिद्धी होते. सिद्धी कामी मनुष्य–कर्मकांडी आणि ज्ञाननिष्ठ मनुष्य ज्ञानकांडी असतात. केवळ ईशानुगत मनुष्यच ईश्वरभक्त असतात. ज्ञानकांडी आणि कर्मकांडी स्वतःस पारमार्थिक मानून अहंकार प्रकाश करतात. वास्तविक ते लोक पारमार्थिक नाहीत, ऐहिक आहेत, म्हणून नैमित्तिक आहेत. त्या लोकांची सगळी धर्म-चर्चा नैमित्तिक असते.

शैव, शाक्त, गाणपत्य आणि सौर–हे लोक ज्ञानकांडाच्या अधीन असतात.

हे लोक ज्या श्रवण आणि कीर्तन आदी भक्तीच्या अंगाचे आचरण करतात ते केवळ मुक्ती आणि अंततः अभेद ब्रह्माचा प्राप्तीच्या आशेने केले जाते. ज्यांना श्रवण आणि कीर्तन आदींतून भुक्तीची-मुक्तीची आशा नसते, ते उपर्युक्त मूर्तीमध्ये विष्णुसेवा करतात. भगवंताची श्रीमूर्ती चिन्मय आणि शक्तिसंपन्न असते. उपास्य तत्त्वास जर भगवान मानले नाही, तर ती उपासना एका अनित्य वस्तूची उपासना होते. बेटा! तुमची भगवत्सेवा पारमार्थिक नाही. कारण तुम्ही भगवंताची नित्यमूर्ती स्वीकारीत नाही. म्हणून तुम्ही ईशानुगत नाहीत. आशा करतो की आता तुम्ही नित्य आणि नैमित्तिक–या दोन्ही उपासनांचा फरक समजू शकाल.

देवीदास–हो, जर भगवत् विग्रहांस नित्य मानले नाही आणि श्रीविग्रहांचे अर्चन केले तर त्यामुळे नित्य-वस्तूची आराधना होऊ शकत नाही. अनित्य वस्तूच्या उपासनेने नित्य तत्त्वाची उपासना होत नाही काय?

लाहिडी–असल्यानेसुद्धा तुमच्या उपासनेस नित्यधर्म म्हणता येणार नाही. वैष्णवधर्मांच्या नित्य विग्रहाचे अर्चन आदी हेच नित्यधर्म आहेत.

देवीदास–ज्या श्रीमूर्तींची पूजा केली जाते, ती जर मनुष्याद्वारे बनविली जाते, मग ती नित्यमूर्ती कशी काय असू शकते?

लाहिडी–वैष्णवांद्वारे पूजित मूर्ती तशी मूर्ती नसते. भगवान, ब्रह्म तत्त्वाप्रमाणे निर्विकार नाहीत. ते सच्चिदानंदघन-विग्रह आणि सर्वशक्तिमान आहेत. तोच सच्चिदानंदघन-विग्रह वा श्रीमूर्ती पूजनीय आहे. ती श्रीमूर्ती प्रथम जिवाच्या चित्-विभागात प्रतिभूत होऊन मनात उदित होते. मनाद्वारे निर्मित मूर्तीत भक्तियोगाद्वारे तीच सच्चिदानन्द मूर्ती आविर्भूत होते. भक्त तिचे दर्शन घेऊन हृदयात ज्या चिन्मय मूर्तीचे दर्शन करतात त्याबरोबर या श्रीमूर्तीची एकात्मता साधतात. परंतु ज्ञानी लोक ज्या श्रीमूर्तीची पूजा करतात, ती मूर्ती तशी नसते. या लोकांच्या मते कुण्या भौतिक पदार्थात ब्रह्माची कल्पना केली जाते. या मूर्ती त्या लोकांच्या साधनावस्थेतच उपयोगी असतात. नंतर ते केवळमात्र एका पार्थिव वस्तूशिवाय अन्य काहीच नसते. आता तू या दोन मतांच्या मूर्ती तथा त्यांच्या अर्चनादी फरकांवर विचार कर. गुरुदेवांच्या कृपेने जेव्हा वैष्णव दीक्षा प्राप्त होते, तेव्हा दोन्ही फळांना पाहिल्यानंतर हा भेद यथोचित समजला जाऊ शकतो.

देवीदास–आता मी पाहतो आहे की वैष्णवांत केवळ अंधविश्वासच नाही तर ते अत्यंत सूक्ष्मदर्शी देखील आहेत. श्रीमूर्तीच्या उपासनेत तथा पार्थिव वस्तूत ईश्वराची कल्पना करून त्याची अनित्य पूजा यात खूप फरक आहे. या विषयी काही दिवस विवेचना करीन. पिताजी आज माझी एक खूप मोठी शंका दूर झाली. आता मी जोर देऊन सांगू शकतो की ज्ञानींची उपासना ही केवळ ईश्वरास धोका देण्यासाठी आहे. अच्छा, मी याविषयी आपल्या श्रीचरणी पुनः निवेदन करीन.

असे म्हणून देवी विद्यारत्न आणि शम्भू आपल्या निवासस्थानी परतले.

नंतर संध्याकाळी परतले खरे पण वार्तालाप करण्यास वेळच मिळाला नाही. त्यावेळी सगळेच जण हरिनाम-संकीर्तनात मस्त झाले होते.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी परमहंस बाबाजींच्या मंडपात सगळे लोक बसले होते. देवी विद्यारत्न आणि शम्भू दोघेही लाहिडी महाराजांच्या जवळ बसले होते. त्यावेळीच ब्राह्मण पुष्करिणीचे (एक गाव) एक काजी साहेब उपस्थित झाले. काजी साहेबांना पाहून वैष्णव मंडळी त्यांच्या सन्मानास्तव उभी राहिली. काजीसाहेबसुद्धा अत्यंत आनंदपूर्वक वैष्णवांची अभ्यर्चना करून मंडपात बसले.

परमहंस बाबाजी म्हणाले–आपण धन्य आहात. कारण आपण श्री महाप्रभूंच्या कृपापात्र असणाऱ्या चाँदकाजींचे वंशज आहात, आमच्यावर कृपा करा. काजी साहेब म्हणाले–श्री महाप्रभूंच्या दयेने आम्ही वैष्णवांचे सुद्धा दयापात्र झालो आहोत. गौरांगच आमचे प्राणपती आहेत. त्यांना दंडवत प्रणाम केल्याशिवाय आम्ही काही काम करीतच नाही.

लाहिडी महाशय फारशी भाषेचे चांगले विद्वान आहेत. त्यांनी कुराण शरीफ मधले तीसही सेफर वाचले आहेत. सूफींच्याही अनेक ग्रंथांचे अध्ययन केले आहे. त्यांनी काजी साहेबांना विचारले–तुमच्या मते मुक्ती कशास म्हणतात.

काजी साहेब म्हणाले–आपण ज्यांना ‘जीव’ म्हणता, त्याला आम्ही ‘रुह’ म्हणतो. हा रुह दोन अवस्थांत असतो. अर्थात रुहे मुजर्रदी आणि रुहे तरकीबी. ज्यास आपण चित् म्हणता त्यास आम्ही मुजर्रद म्हणतो. ज्यास आपण अचित् म्हणता त्यास आम्ही जिस्म म्हणतो. मुजर्रद देश आणि कालातीत असतो. जिस्म देश आणि काळाच्या अधीन असतो. तरकीबी रुह अथवा बद्धजीव वासना, मन आणि

मलफुत् अर्थात अज्ञानाने परिपूर्ण असतो. मुजर्रदी रुह या सगळ्यांपेक्षा शुद्ध आणि वेगळा असतो. आलम्-विशाल नावाची जी चिन्मय-भूमी आहे, तेथे मुजर्रदी रुह राहू शकतो. इश्क अर्थात प्रेमास क्रमशः वाढवीत-वाढवीत रुह शुद्ध होऊन जातो. पैगंबर साहेबास खुदा ज्या स्थानी घेऊन जातात तेथे जिस्म नसतो, परंतु तेथे सुद्धा बंदा अर्थात दास आहे आणि ईश्वर अर्थात खुदा प्रभू आहेत. म्हणूनच बंदा आणि खुदाचा संबंध नित्य असतो. शुद्ध भावाने या संबंधाचे असणेच मुक्ती आहे. कुराण तथा सुफींच्या ग्रंथात या सिद्धांतांचे वर्णन केलेले आहे. परंतु सगळेच त्यांना समजू शकत नाहीत. गौरांग प्रभूंनी कृपा करून चाँद् काजी महाशयांना या गोष्टींचा उपदेश दिला होता–तेव्हापासून आम्ही शुद्ध भक्त झालो आहोत.

लाहिडी–कुराणाचे मूळमत काय आहे?

काजी–कुराणात ज्या बिहिस्तचे वर्णन केले आहे, त्यात कुठल्याही प्रकारच्या इबादतीची गोष्ट नाही हे ठीक असले तरी, तेथे जीवनच इबादत आहे. खुदाचे दर्शन करून लोक तेथे मोठ्या सुखात मग्न राहतात. हीच गोष्ट श्रीगौरांगदेवांनी सांगितली.

लाहिडी–कुराणात खुदाची काही मूर्ती मानली गेलीय का?

काजी–कुराणाचे म्हणणे आहे की खुदाची मूर्ती नाही. परंतु श्री गौरांगदेवांनी चाँदकाजींना सांगितले की कुराणात केवळ जिस्मानी मूर्तीस निषेध आहे, शुद्ध मुजर्रदी मूर्तीचा निषेध नाही. त्या प्रेममयी मूर्तीस पैगंबर साहेबांनी आपल्या अधिकारानुरूप पाहिले होते. त्यात अन्यान्य रसांचे भाव लपलेले आहेत.

लाहिडी–या विषयी सुफींचे मत काय आहे?

काजी–ते अनहलक अर्थात 'मीच खुदा आहे' या सिद्धांतास मानतात. तुम्हा लोकांचा अद्वैतवाद आणि मुसलमानांचे 'असोवाफ' मत एकच आहे.

लाहिडी–आपण सुफी आहात का?

काजी–नाही, आम्ही शुद्ध भक्त आहोत. गौरांगच आमचे प्राण आहेत.

अशाप्रकारे बराच वेळ गप्पा होत होत्या. मग काजी साहेब वैष्णवांचा सन्मान करून परत निघून गेले. त्यानंतर हरिसंकीर्तन होऊन सभा संपली.

**॥ पाचवा अध्याय समाप्त ॥**



# सहावा अध्याय (नित्यधर्म तथा जाती आणि वर्ण आदींचा भेद )

देवीदास विद्यारत्न एक अध्यापक होते. खूप दिवसांपासून त्यांची दृढ धारणा झाली होती की ब्राह्मणवर्णच सर्वश्रेष्ठ आहे. ब्राह्मणाव्यतिरिक्त कुणीही परमार्थ लाभ करण्यायोग्य नसते. ब्राह्मणाघरी जन्म घेतल्याशिवाय जिवास मुक्ती मिळत नाही. जन्मापासूनच ब्राह्मणात ब्रह्मत्व निर्माण झालेले असते. त्यादिवशी ते काजी साहेबांसोबत वैष्णवांचे संभाषण ऐकून मनोमन खूप असंतुष्ट झाले आहेत. ते काजी साहेबांच्या तत्त्वपूर्ण विचारांत थोडासुद्धा प्रवेश करू शकले नाहीत. ते मनोमन गोंधळून विचार करू लागले की–"मुसलमान जात पण काय अद्भुत बला (शाप) आहे! त्यांच्या गोष्टी पण अजबच असतात, काहीही समजत नाही. असो, वडील तर अरबी-फारशी शिकलेले आहे. खूप दिवसांपासून धर्म-चर्चा सुद्धा करीत आहेत. परंतु मुसलमानांचा ते इतका आदर का करतात? ज्यांना स्पर्श केल्यानेदेखील स्नान करावे लागते, परमहंस बाबाजी महाराजांनी काय समजून त्यांना मंडपात बसवून त्यांचा आदर सत्कार केला?" त्यांनी त्याच रात्री म्हटले होते की "शम्भू! मी याविषयी गप्प बसू शकत नाही, तर्कांची प्रचंड आग लावून या पाखंडमतास भस्म करून टाकीन. ज्या नवद्वीपात सार्वभौम आणि शिरोमणींसारखे न्यायशास्त्राचे प्रकांड विद्वान झाले, जेथे रघुनाथाने स्मृतिशास्त्राचे मंथन करून 'अष्टाविंशति-तत्त्व' हा ग्रंथ प्रकाशित केला आहे, त्याच नवद्वीपात आज आर्य आणि यवनांचा असा व्यवहार? कदाचित नवद्वीपातील अध्यापकांना याविषयीची बातमीच लागली नसणार." दोन-एक दिवसांतच विद्यारत्न या कामी तन-मन लावून रत झाले.

तिसऱ्या प्रहरीचा समय आहे. आकाश काळ्या-काळ्या ढगांनी झाकोळलेले आहे. या ढगांमुळे आज अजूनही एकदासुद्धा सूर्यकिरणे पृथ्वीचा स्पर्श करू शकली नव्हती. सकाळी दोनचार थेंब पडून गेले होते. देवी आणि शम्भू उपयुक्त वेळ पाहून दहा वाजायच्या आतच खिचडी खाऊन तयार झाले होते. वैष्णवांना माधुकरी मिळायला विलंब झाला. शेवटी प्रसाद सेवन करून सगळेच माधवी-मालती मंडपात एका कोपऱ्याच्या मोठ्या कुटीत बसले आहेत. परमहंस बाबाजी, वैष्णवदास, नृसिंहपल्लीहून आलेले पंडित अनन्तदास, लाहिडी महाशय तथा कुलिया-निवासी यादवदास आपापल्या तुळशी माळांवर परमानंदाने हरिनाम करू

लागले त्याचवेळी विद्यारत्न महाशय, समुद्रगडाचे निवासी चतुर्भुज पदरत्न, काशीचे चिन्तामणी न्यायरत्न, पूर्वस्थळीचे कालिदास वाचस्पती आणि विख्यात पंडित कृष्ण चूडामणी तेथे उपस्थित झाले. वैष्णवांनी मोठ्या आदराने ब्राह्मण पंडितांना आसन देऊन बसविले.

परमहंस बाबाजी म्हणाले–मेघाच्छन्न दिवसाला लोक दुर्दिन म्हणतात, परंतु आमच्याकरिता तर हा सुदिनच झालाय. आज आमची कुटीर धामवासी ब्राह्मण पंडितांच्या चरणधूळीने पवित्र झाली आहे.

वैष्णवगण स्वभावतः स्वतःस तृणाहूनही नीच मानतात. म्हणून त्या सगळ्यांनी 'विप्रचरणेभ्यो नमः' म्हणून प्रमाण केला. ब्राह्मण पंडित लोक स्वतःस श्रेष्ठ मानून त्यांना आशीर्वाद देत खाली बसले. विद्यारत्न त्यांना तर्क करण्याकरिता तयार करून घेऊन आले होते. त्यांनी लाहिडी महाशयांना आपल्यापेक्षा वयाने मोठे समजून प्रणाम केला. लाहिडी महाशय आता तत्त्वज्ञ झाले होते, त्यांनी पंडितांच्या प्रणामाला हातोहात परतवले.

त्या पंडितांमध्ये कृष्ण-चुडामणी सर्वोत्तम वक्ता होते. काशी, मिथिला आदी अनेक स्थानी भ्रमण करून अनेक पंडितांना शास्त्रार्थात पराजित केले होते त्यांचा बुटका बांधा आणि सावळा रंग आहे, चेहऱ्यावर गंभीरता आहे. दोन्ही डोळे ताऱ्यांप्रमाणे चमकत आहेत. त्यांनी वैष्णवांशी बोलण्यास सुरुवात केली.

चुडामणी म्हणाले–आज आम्ही येथे वैष्णवांचे दर्शन करण्यास आलो आहोत. यद्यपि आपल्या समस्त आचारांचे आम्ही समर्थन करीत नाही. तरीही आपली एकांत भक्ती आम्हाला खूप आवडते. भगवान देखील म्हणतात.

**अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥**[१]

(गीता ९/३०)

---

(१) जर कुणी अतिशय दुराचारी सुद्धा अनन्य भावाने माझे निरंतर भजन करतो, तो साधू मानण्यायोग्यच आहे, कारण त्याचा हा व्यवहार सर्वप्रकारे सुंदर असतो.

भगवद्गीतेचे हे वचन आमचे प्रमाण आहे. याच सिद्धांतावर निर्भर राहून आज आम्ही साधु-दर्शन करण्याकरिता आलो आहोत. परंतु आमचा एक आरोप आहे, तो हा की आपण भक्तीच्या बहाण्याने मुसलमानांचा संग का करता? या विषयी आम्ही आपल्यासोबत विचार-विनीमय करू इच्छितो. आपल्यापैकी जे जास्त सुशिक्षित असतील त्यांनी थोडे पुढे यावे.

वैष्णवगण चुडामणींच्या बोलण्याने खूप दुःखित झाले. परमहंस बाबाजींनी विनम्र होत म्हटले–आम्ही तर मूर्ख आहोत, शास्त्रार्थ आम्हाला कुठला येतोय? आमच्या महाजनांनी (महान आचार्यांनी) जसे आचरण केले आहे, आम्ही त्याचेच अनुकरण करीत आहोत. आपण सगळे विद्वान आहात, शास्त्रांचा जो उपदेश असेल–त्यास आम्ही गुपचूप ऐकून घेऊ.

चूडामणी म्हणाले–असे म्हणून कसे चालेल? हिंदू समाजात राहून जर आपण सर्वांनी शास्त्र-विरुद्ध आचार-प्रचार केला तर जगाचा ध्वंसच होईल. शास्त्रविरुद्ध आचार-प्रचार सुद्धा करायचा आणि महाजनांच्या नावाचा डंका वाजवायचा–हे कसले वागणे झाले? महाजन कुणाला म्हणतात? जर महाजनांचे आचरण आणि त्यांचे उपदेश शास्त्रानुकूल आहेत, तरच ते महाजन आहेत, नाही तर ज्याला-त्याला महाजन म्हणून उभा करून "**महाजनो येन गतः सः पन्था**" म्हटल्याने जगाचे कल्याण तरी काय व्हावे?

चुडामणींचे बोलणे वैष्णवांकरिता असहनीय झाले. ते लोक त्या कुटीतून उठले आणि दुसऱ्या कुटीत जाऊन परामर्श करू लागले. शेवटी ठरले की जर महाजनांप्रती दोषारोपण केले जात आहे, तेव्हा सर्व शक्तिंसहित त्यांना उत्तर द्यावे. परमहंस बाबाजी शास्त्रार्थाच्या कटकटीपासून दूर राहतील. पंडित अनन्तदास न्यायशास्त्राचे विद्वान असले तरीही सर्वांनी श्रीवैष्णवदास बाबाजींसच शास्त्रार्थ करण्याचा विनंती केली. त्यांना हे समजायला वेळ लागला नाही की देवीदास विद्यारत्नानेच हा झगडा उपस्थित केला आहे.

लाहिडी महाशयसुद्धा तिथे होते. ते म्हणाले–देवी खूप अभिमानी आहे.

त्यादिवशी काजी साहेबांसोबत आम्हा लोकांचा व्यवहार पाहून त्याला वाईट वाटले असणार. म्हणूनच आज या सर्व ब्राह्मण पंडितांना तो बोलावून घेऊन आला आहे.

वैष्णवदासांनी परमहंस बाबाजींच्या चरणांची धूळ मस्तकी धारण करत म्हटले–वैष्णवांची आज्ञा मला शिरोधार्य आहे. आज मी शिकलेल्या सर्वच विद्या सार्थकी लागतील.

आता आकाश निर्मळ झाले होते. माधवी-मालती मंडपात एक लांब-मोठे आसन अंथरले गेले. एका बाजूला ब्राह्मण पंडित आणि दुसरीकडे वैष्णव लोक बसले. श्रीगोद्रुम आणि मध्यद्वीपातल्या समस्त पंडितांना आणि वैष्णवांना बोलावले गेले. आसपासचे विद्यार्थीसुद्धा सभेत येऊन बसले. सभा आता छोटीशी राहिली नव्हती. जवळजवळ शंभर ब्राह्मण-पंडित एकीकडे आणि प्रायः दोनशे वैष्णव दुसरीकडे बसले होते. वैष्णवांच्या अनुमतीने वैष्णवदास बाबाजी समोर बसले. त्याचवेळेस एक आश्चर्यकारक घटना घडली, जी पाहून वैष्णवलोक आनंदाने एकदा जोरात हरिध्वनी करू लागले. घटना अशी घडली की, वर पसरलेल्या लतांतून मालतीच्या फुलांचा एक गुच्छ वैष्णवदासांच्या डोक्यावर पडला.

वैष्णव म्हणाले–याला श्रीमन् महाप्रभूंचा प्रसाद समजा.

दुसरीकडे बसलेले कृष्णचूडामणी जरा नाक-भुवया उडवत म्हणाले–तसेच समजावे. फुलांचे काम नाही–फळानेच परिचय मिळेल.

गोष्ट पुढे अधिक न वाढवत वैष्णवदास बाबाजी म्हणाले–आज नवद्वीपात वाराणसी सारखी सभा भरली आहे. मोठी आनंदाची गोष्ट आहे. यद्यपि मी बंगवासी आहे, तरीसुद्धा खूप दिवस वाराणसी आदी स्थानी अध्ययन केल्याने तथा सभांमधून वक्तृत्व आदी केल्याने माझा बोली बंगाली भाषेचा अभ्यास काहीसा कमी झालाय. माझी अशी इच्छा आहे की आजच्या सभेतील प्रश्नोत्तरे संस्कृत भाषेतच व्हावीत.

चुडामणींनी शास्त्रांचे खूप अध्ययन केलेले आहे. तरीसुद्धा काही कंठस्थ केलेल्या पाठांव्यतिरिक्त ते धाराप्रवाहित संस्कृत भाषा बोलू शकत नव्हते. त्यांनी वैष्णवदासांच्या प्रस्तावाने काहीसे संकुचित होत म्हटले–का? बंगाल-देशाच्या सभेत

बंगाली भाषाच उपयुक्त आहे. मी पश्चिम देशीच्या पंडितांप्रमाणे संस्कृत बोलू शकत नाही.

त्यावेळी त्यांचे भाव पाहूनच लोक समजले की चुडामणी वैष्णवांसोबत शास्त्रार्थ करण्यास घाबरत आहेत. सर्वांनी एक स्वरात वैष्णवदास बाबाजींस बंगाली भाषेत बोलण्याची विनंती केली. ते तयार झाले.

चुडामणींनी प्रश्न केला–जाती नित्य आहे की नाही? मुसलमान आणि हिंदू या दोन जाती वेगवेगळ्या आहेत की नाही? मुसलमानांच्या संसर्गाने हिंदू पतित होतात की नाही?

वैष्णवदास बाबाजी उत्तरले–न्यायशास्त्रानुसार जाती नित्य आहे. परंतु ही जात मनुष्यांच्या देश-भेदाने उत्पन्न जाती-भेदास लक्ष्य करीत नाही, गो-जाती, बकरी-जाती, मनुष्य-जाती जाती-भेदांचे निरूपण करणेच त्याचे उद्दिष्ट आहे.

चुडामणी म्हणाले–आपण बरोबर बोलताय. परंतु हिंदू आणि मुसलमानात काही जातीभेद आहे की नाही?

वैष्णवदास म्हणाले–हो एकप्रकारचा जातीभेद आहे, परंतु तो नित्य नाही. मनुष्यमात्राची एकच जात आहे. भाषा-भेद, देश-भेद, वेषभूषा-भेद तथा वर्णभेदाने एका मनुष्य-जातीतच अनेक जातींची कल्पनामात्र केलेली आहे.

चुडामणी–जन्माद्वारे कसलाच भेद नाही काय? केवळ वेषभूषा आदींच्या फरकामुळे हिंदू किंवा मुसलमानाचा भेद आहे अथवा त्याच्या जन्माशीसुद्धा काही संबंध आहे.

वैष्णवदास–कर्मानुसार जिवाचा उच्च अथवा निम्न वर्णांत जन्म होतो, वर्ण-भेदानुसार मनुष्यांचा कर्माधिकार वेगवेगळा असतो, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि क्षुद्र–हे चार वर्ण आहेत. बाकी सर्व अंत्यज आहेत.

चुडामणी–मुसलमान अंत्यज आहेत की नाही?

वैष्णवदास–हो, शास्त्रांनुसार ते अंत्यज अर्थात चार वर्णांच्या बाहेर आहेत.

चुडामणी–मग मुसलमान वैष्णव कसे असू शकतात आणि आर्य वैष्णव लोक त्यांचा संग कसा करू शकतात?

वैष्णवदास–ज्यांना शुद्ध भक्ती आहे, तेच वैष्णव आहेत. मनुष्यमात्र वैष्णवधर्माचा अधिकारी आहे. जन्मदोषामुळे मुसलमानांचा वर्णाश्रमधर्मानुसार प्रत्येक वर्णाकरिता निर्दिष्ट कर्मात अधिकार नाही, परंतु भक्तिक्षेत्रात त्यांचा संपूर्ण अधिकार आहे. कर्मकांड, ज्ञानकांड आणि भक्तिकांडाचा जो परस्पर सूक्ष्म भेद आहे, त्यावर जोवर पुंखानुपुंख रूपात (खूप सूक्ष्मपणे) विचार केला जात नाही तोवर हे कदापि म्हटले जाऊ शकत नाही की "आम्ही शास्त्रांचे तात्पर्य जाणले आहे."

चुडामणी–अरे वा! कर्म करता-करता चित्त शुद्ध होते. चित्त शुद्ध झाल्यावर ज्ञानाधिकार उत्पन्न होतो. मग ज्ञानींमध्ये कुणी निर्भेद ब्रह्मज्ञानी असतो आणि कुणी सविशेषवाद स्वीकारीत वैष्णव बनते. अशाप्रकारे क्रमानुसार आधी कर्माधिकार समाप्त केल्याशिवाय वैष्णव बनता येत नाही. अशा अवस्थेत अंत्यज असल्याने मुसलमानांना जिथे कर्मात अधिकार प्राप्त नाही, तिथे भक्तीचा अधिकार कसा काय प्राप्त होऊ शकतो?

वैष्णवदास–अंत्यज मनुष्यांना भक्तीमध्ये पूर्ण अधिकार आहे–याला प्रत्येक शास्त्र स्वीकारते–श्रीमद्भगवद्गीतेत स्वयं भगवान म्हणतात–

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शुद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्॥**

(गीता ९/३२)

अर्थात, हे पार्थ! स्त्री, वैश्य, शूद्र आणि पापयोनीत जन्म ग्रहण करणारे अंत्यज आदी जे कुणी असो जर माझा थोडादेखील आश्रय ग्रहण करतात, तर ते परमगतीस प्राप्त होतात. येथे 'आश्रय' शब्दाचा अर्थ–'भक्ती' आहे. स्कंदपुराणांतर्गत काशीखंडात सुद्धा याचे समर्थन केले गेले आहे–

**ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वः यदिवेतरः।**
**विष्णु भक्तिसमायुक्तो ज्ञेयः सर्वोत्तमोत्तमः॥**[२]

(काशीखण्ड २१/६३)

नारदीय पुराणातही–

**श्वपचोऽपि महीपाल विष्णु-भक्तो द्विजाधिकः।**
**विष्णु भक्ती-विहीनो यो यतिश्च श्वपचाधिकः॥**[३]

चूडामणी–प्रमाण अनेक दिले जाऊ शकतात, परंतु आवश्यकता तर या गोष्टीची आहे की विचारांतून काय ठरते. दुर्जाति-दोष कसा दूर होतो? जन्माद्वारे जो संग-दोष उत्पन्न होतो तो पुन्हा जन्म घेतल्याशिवाय दूर होऊ शकतो का?

वैष्णवदास–दुर्जाति-दोष–प्रारब्धकर्म आहे. तो भगवन्नामाच्या उच्चारणाने दूर होऊ शकतो. त्याचे प्रमाण पहा–

श्रीमद्भागवत (६/१६/४४)–

**यन्नाम सकृत श्रवणात् पुक्कसोऽपि विमुच्यते संसारात्॥**[४]

आणि–

**नातः परं कर्म-निबन्ध-कृन्तनं,**
**मुमुक्षतां तीर्थ-पदानुकीर्त्तनात्।**

---

(२) ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अथवा चारही वर्णांतून बहिर्भूत (वर्ज केलेले) अत्यंजसुद्धा जर विष्णूभक्तीचा आश्रय ग्रहण करतात, तर त्यांनाच सर्वश्रेष्ठ मानायला हवे.

(३) हे राजन! चांडाळसुद्धा जर विष्णुभक्त असेल, तर तो ब्राह्मणापेक्षाही श्रेष्ठ आहे. इतकेच काय तर जो संन्यासी विष्णुभक्तिविहीन असतो, तो चांडाळापेक्षाही अधम असतो.

(४) ज्यांचे नाम केवळ एकदाच ऐकल्याने चांडाळसुद्धा त्याच क्षणी संसार आणि जातिदोषातून मुक्त होतो.

**न यत् पुनः कर्मसु सज्जते मनो,**
**रजस्तमोभ्यां कलिलं ततोऽन्यथा॥**[५]

(श्रीमद्भा. ६/२/४६)

पुन्हा पहा–

**अहो बत श्वपचोऽतो गरीयान्**
**यज्जिव्हाग्रे वर्तते नाम तुभ्यम्।**
**तेपुस्तपस्ते जुहुवुः सस्नुरार्या**
**ब्रह्मानुचूर्नाम गृणन्ति ये ते॥**[६]

चुडामणी–मग भगवन्नाम उच्चारण करणारा चांडाळ यज्ञादी कर्मे का करू शकत नाही?

वैष्णवदास–यज्ञादी कर्मे करण्याकरिता ब्राह्मणाघरी जन्म घ्यावा लागतो. जसे ब्राह्मणाघरी जन्म घेऊन देखील यज्ञोपवित संस्कार होईपर्यंत कुठलाही कर्माधिकार मिळत नाही, तसेच हरिनामाचा आश्रय करून चांडाळ शुद्ध झाला तरीही ब्राह्मणाघरी शौक्र जन्म मिळाल्याखेरीज यज्ञाचा अधिकार होत नाही. परंतु यज्ञापेक्षा अनंत गुण श्रेष्ठ भक्तीच्या अंगांचे आचरण करू शकतो.

---

(५) जे लोक या सांसारिक बंधनातून मुक्त होऊ पाहतात, त्यांच्याकरता आपल्या चरणांच्या स्पर्शाने तीर्थांचेही तीर्थ बनविणाऱ्या भगवन्नामाच्या संकीर्तनाहून श्रेष्ठ असे कुठलेच साधन नाही, ज्यामुळे पापांचा समूळ ध्वंस होऊ शकतो. कारण, भगवंताचा आश्रय घेतल्याने मनुष्याचे मन पुन्हा कर्मांच्या गोंधळांमध्ये पडत नाही. भगवन्नामाव्यतिरिक्त दुसऱ्या कुठल्याही प्रायश्चित्ताचा आश्रय घेतल्याने मन रजोगुण आणि तमोगुण यांनीच ग्रस्त राहते तथा त्यामुळे पापांचा समूळ नाश होत नाही.

(६) अहो! नामग्रहण करणाऱ्या पुरुषांच्या श्रेष्ठतेविषयी आणखी काय सांगू? ज्यांच्या जिव्हेच्या अग्रभागी आपले नाम उच्चारित होते, ते चांडाळकुळात जन्माला येऊनही सर्वश्रेष्ठ आहेत. त्यांची ब्राह्मणता तर पूर्वजन्मातच सिद्ध झालेली असते, कारण जो श्रेष्ठ पुरुष आपले नाम उच्चारण करतो त्याने ब्राह्मणांसारखे तप, हवन, तीर्थस्थान, सदाचार पालन आणि वेदाध्ययन–हे सर्वकाही आधीच केलेले असते.

चुडामणी–वा! चांगला सिद्धांत मांडलात! ज्याला साधारण अधिकार सुद्धा दिलेला नाही, त्याला अत्यंत श्रेष्ठ अधिकार दिले जावेत, याचे स्पष्ट प्रमाण काय?

वैष्णवदास–मनुष्याच्या क्रिया दोन प्रकारच्या असतात–व्यावहारिक आणि पारमार्थिक. पारमार्थिक अधिकार प्राप्त करूनसुद्धा काही-काही व्यावहारिक क्रियांमध्ये अधिकार मिळत नाही. जसे–एखादा मनुष्य जन्माने मुसलमान आहे, परंतु ब्राह्मणवर्णाच्या स्वभाव आणि समस्त गुणांनी तो युक्त आहे. अशा अवस्थेत ती व्यक्ती पारमार्थिक दृष्टीने ब्राह्मण आहे, तरीसुद्धा व्यावहारिक क्रियांचा–जसे ब्राह्मणाच्या कन्येसोबत विवाह आदींचा अधिकार तो मिळवू शकत नाही.

चुडामणी–का नाही करू शकत? असे करण्यात दोष तरी कसला?

वैष्णवदास–लोक-व्यवहाराविरुद्ध काम केल्याने व्यावहारिक दोष लागतो. समाजातील लोक ज्या व्यावहारिक सन्मानाचा गर्व राखतात, अशा कामांत ते आपली स्वीकृती सुद्धा देत नाहीत. म्हणूनच पारमार्थिक अधिकार असूनही व्यवहार चालू शकत नाही.

चुडामणी–आता सांगा, कर्माधिकाराचा हेतू काय आहे आणि भक्ति-अधिकाराचा हेतू काय आहे?

वैष्णवदास–तत्तत्कर्मयोग्य स्वभाव आणि जन्म आदी व्यावहारिक कारणच कर्माधिकाराचे हेतू आहेत. तात्त्विक श्रद्धाच भक्ति-अधिकाराचा हेतू आहे.

चुडामणी–वैदान्तिक शब्दांनी मला दाबण्याचा प्रयत्न करू नका. स्पष्टच सांगा की 'तत्कर्मायोग्य स्वभाव' कशास म्हणतात?

वैष्णवदास–शम, दम, तपस्या, पवित्रता, संतोष, क्षमा, सरलता, ईश्वराची भक्ती, दया आणि सत्य–हे ब्राह्मणवर्णाचे स्वभावविशेष आहेत. तेज, बल, धैर्य, वीरता, सहनशीलता, उदारता, उद्योगशीलता, स्थिरता, ब्रह्मण्यता आणि ऐश्वर्य–हे क्षत्रियवर्णाचे स्वभाव विशेष आहेत. ईश्वर-विश्वास, दानशीलता, निष्ठा, दंभहीनता आणि अर्थ-लोलुपता हे वैश्य वर्णाचे स्वभावविशेष आहेत. ब्राह्मण, गाई आणि देवतांची सेवा, जे मिळेल त्यात समाधान–हे शूद्रवर्णाचे स्वभावविशेष आहेत आणि अशौच, मिथ्या (खोटारडेपणा), चोरी, नास्तिकता, वृथा कलह, काम, क्रोध तथा

तृष्णेच्या वश होणे–हा अंत्यजवर्णाचा स्वभाव आहे. या स्वभावांनुसार वर्णांचे निरूपण करणे हेच शास्त्रांचे उद्देश्य आहे. केवळ जन्माद्वारे वर्णाचा निर्णय करणे–आधुनिक व्यवहारमात्र आहे. या स्वभावांच्या अनुरूपच मनुष्यात क्रिया-प्रवृत्ती आणि कर्मकुशलता उत्पन्न होते अर्थात ज्या मनुष्याचा जसा स्वभाव असतो, त्याची तशाच क्रियांमध्ये प्रवृत्ती आणि कर्मांमध्ये रुची उत्पन्न होते. अशा स्वभावांचे नावच 'तत्तत्कर्मयोग्य स्वभाव' आहे. बऱ्याचशा लोकांचे स्वभाव जन्मानुसार असतात आणि अनेक स्थळांमध्ये संसर्गच स्वभावजनक असतो. जन्म होताच संग आरंभ होतो आणि त्याच संगानुसार स्वभावाची जडणघडण होते. म्हणून जन्मापासूनच स्वभाव परिलक्षित होतो. परंतु जन्माने स्वभावाची उत्पत्ती झाल्यामुळे जन्मासच स्वभावाचे एकमात्र कारण मानणे आणि कर्माधिकाराचा हेतू मानणे चुकीचे आहे. 'हेतू'–अनेक प्रकारचे असतात. म्हणूनच स्वभाव पाहून कर्माधिकाराचा निर्णय करणेच शास्त्रांचे उद्दिष्ट आहे.

चुडामणी–तात्त्विक श्रद्धा कशास म्हणतात?

वैष्णवदास–सरल हृदयात ईश्वराप्रती जो विश्वास होतो आणि त्याकरिता जी स्वाभाविक प्रयत्न उत्पन्न होतात, त्यांना तात्त्विक श्रद्धा म्हणतात. केवळ लौकिक कृती पाहून अशुद्ध हृदयात जी ईश्वरासंबंधी भ्रांत धारणा होते, तथा स्वार्थाकरिता दंभ, प्रतिष्ठा आणि कामना-मूलक ज्या क्रिया होतात, त्यास 'अतात्त्विक श्रद्धा' म्हणतात. काही-काही महाजन तात्त्विक-श्रद्धेस शास्त्रीय श्रद्धासुद्धा म्हणतात. ही तात्त्विक श्रद्धाच भक्ति-अधिकाराचे कारण आहे.

चुडामणी–असे मानले की कुणा व्यक्तीस शास्त्रीय श्रद्धा तर उत्पन्न झाली आहे, परंतु त्याचा स्वभाव उच्च होऊ शकत नाही. अशा अवस्थेत ती व्यक्ती भक्तीची अधिकारी असू शकते का?

वैष्णवदास–स्वभाव कर्माधिकाराचा हेतू आहे, भक्ति-अधिकाराचा नाहीय भक्ति-अधिकाराचा हेतू तर एकमात्र श्रद्धा आहे. श्रीमद्भागवत (११, अ. २०) मध्ये यास स्पष्ट करून सांगितले आहे–

**जातश्रद्धो मत्कथासु निर्विण्णः सर्वकर्मसु।**
**वेद दुःखात्मकान् कामान् परित्यागेऽप्यनीश्वरः॥२७॥**

**ततो भजेत मां प्रीतः श्रद्धालुर्दृढनिश्चयः।**
**जुषमाणश्च तान् कामान् दुःखोदर्कांश्च गर्हयन्॥ २८॥**
**प्रोक्तेन भक्तियोगेन भजतो माऽसकृन्मुनेः।**
**कामा हृदय्या नश्यन्ति सर्वे मयि हृदि स्थिते॥ २९॥**
**भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः।**
**क्षीयन्ते चास्य कर्माणि मयि दृष्टेऽखिलात्मनि॥ ३०॥**
**यत् कर्मभिर्यत्तपसा ज्ञानवैराग्यतश्च यत्।**
**योगेन दानधर्मेण श्रेयोभिरितरैरपि॥ ३२॥**
**सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा।**
**स्वर्गापवर्गं मद्धाम कथञ्चिद् वाञ्छति॥ ३३॥**(७)

सत्संगाच्या प्रभावाने कुण्या मनुष्याची हरिकथेच्या श्रवणात रुची उत्पन्न होते, त्यावेळी त्यास दुसरे कुठलेही काम आवडत नाही. तो दृढ विश्वासाने भगवन्नाम करीत असतो. तो ते भोग आणि भोगवासनांना, ज्यांचा तो आपल्या पूर्व अभ्यासामुळे परित्याग करण्यास समर्थ नसतो, मनोमन वाईट समजून त्यांची निंदा करीत-करीत

---

(७) ज्या साधकास माझ्या कथांमध्ये श्रद्धा उत्पन्न झाली आहे, जर तो सर्व भोग-वासनांना दुःखरूप जाणूनही त्यांचा परित्याग करण्यास असमर्थ आहे, तर त्याने त्या भोगांना खऱ्या अंतःकरणाने दुःखजनक समजून आणि मनोमन त्यांची निंदा करून भोगावयास हवे, परंतु त्याचबरोबर श्रद्धा, दृढनिश्चय आणि प्रीतिपूर्वक माझे भजनही करीत रहायला हवे॥ २७-२८॥

अशा प्रकारे मी विशद केलेल्या भक्तीयोगाद्वारे निरंतर माझे भजन केल्याने मी त्या साधकाच्या हृदयात येऊन बसतो आणि मी विराजमान होताच, त्याच्या हृदयीच्या साऱ्या वासना आपल्या संस्कारांसमवेत नष्ट होऊन जातात॥ २९॥

अशा प्रकारे जेव्हा त्यास माझा सर्वात्मरूपात साक्षात्कार होतो, तेव्हा तर त्याच्या हृदयातली गाठ तुटून जाते आणि त्याचे सारे संशय छिन्न-भिन्न होऊन जातात–आणि कर्म-वासना सर्वथा क्षीण होऊन जातात॥ ३०॥

कर्म आणि तपस्येने, ज्ञान आणि वैराग्याने, योगाभ्यास आणि दानाने तथा निरनिराळ्या व्रतादी कल्याण साधनांनी जे काही अत्यंत कष्टाने प्राप्त होते, ते सर्व माझा भक्त माझ्या भक्तियोगाच्या प्रभावाने अनायासेच प्राप्त करू शकतो॥ ३२॥

यद्यपि माझे भक्त निष्काम असतात, तथापि जर ते स्वर्ग, अपवर्ग अर्थात मोक्ष, माझे परमधाम अथवा अन्य कुठल्याही वस्तूंची कामना करतात, तर ते सर्व त्यांना प्राप्त होते॥ ३३॥

भोगत असतो. हरिकथेच्या श्रवणाने आणि कीर्तनादीने त्याच्या हृदयातील साऱ्या भोगवासना नष्ट होऊन जातात. माझे निरंतर भजन केल्याने मी त्या साधकाच्या हृदयात जाऊन बसतो. मी विराजमान होताच त्याचे सारे दोष नष्ट होऊन जातात आणि कर्म वासना सर्वथा क्षीण होऊन जातात. ही माझी एक नित्य-विधी आहे. म्हणून कर्म, तपस्या, ज्ञान, वैराग्य, योगाभ्यास, दान-धर्म आणि दुसऱ्या कल्याणकारी साधनांनी जे काही प्राप्त होऊ शकते, मग स्वर्ग, मोक्ष, माझे परमधाम अथवा दुसरी कोणती वस्तू असो–ते सर्व काही माझा भक्त माझ्या भक्ति-योगाच्या प्रभावाने अनायासेच प्राप्त करू शकतो. श्रद्धेने उत्पन्न भक्तियोगाचा हाच क्रम-पथ आहे.

चुडामणी–जर मी श्रीमद्भागवतास न मानले तर?

वैष्णवदास–सर्व शास्त्रांचा हाच विचार आहे. भागवत न मानल्याने इतर शास्त्र बाधा निर्माण करतील. खूपशा शास्त्रांना दाखवण्याची आवश्यकताच नाही, 'गीता' सर्वसंमतवादी ग्रंथ आहे, आपण आधी गीतेचेच बघाना! आपण येथे आल्या-आल्या ज्या श्लोकाचे उच्चारण केले, त्यातच समस्त उपदेश भरलेला आहे–

**अपि चेत् सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥**

(गीता ९/३०)

अर्थात, अनन्यभाक् वा माझ्यात अनन्य भावाने श्रद्धायुक्त होऊन जो भगवत्कथा आणि भगवन्नामाच्या श्रवण आणि कीर्तनाने युक्त भगवद्भजनामध्ये मग्न राहतो, अतिशय दुराचारी असल्यामुळे त्याचे आचरण कर्मपद्धतीच्या विरुद्ध असूनही त्यास साधू मानावे लागेल कारण त्याने साधु-मार्गाचे अवलंबन केले आहे. तात्पर्य हे की कर्मकांडात वर्णाश्रमादीचा मार्ग एक प्रकारचा आहे, ज्ञानकांडात ज्ञानवैराग्यादीचा मार्ग दुसऱ्या प्रकारचा आहे आणि सत्संगात हरिकथा तथा हरिनामात श्रद्धेचा मार्ग तिसऱ्या प्रकारचा आहे. हे तीन पथ कधी-कधी एकत्रितपणे कर्मयोग, ज्ञानयोग वा भक्तियोगाच्या नावाने प्रकाशित होतात. कधी-कधी त्यांचे साधन वेगवेगळे सुद्धा असते. पृथक रूपात साधन करणाऱ्या साधकांना कर्मयोगी आणि ज्ञानयोगी म्हटले गेले आहे. यांत भक्तियोगी सर्वश्रेष्ठ आहेत. कारण भक्तियोगाच्या वेगळ्या साधनेत

अर्थात अनन्य भक्तियोगात अनंत कल्याण निहीत आहे. म्हणूनच गीतेच्या प्रथम सहा अध्यायांतर्गत याच सिद्धांताची पुष्टी केली गेली आहे.

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनारात्मना।**
**श्रद्धावानान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः॥**[८]

(गीता ६/४७)

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति।**
**कौन्तेय प्रति जानीहि न मे भक्तः प्रणश्यति॥**
**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्॥**

(गीता ९/३१-३२)

"क्षिप्रं भवति धर्मात्मा"–या श्लोकाचे तात्पर्य खूप चांगल्याप्रकारे समजण्याची आवश्यकता आहे. जे लोक श्रद्धाळू होऊन अनन्यभक्तीचा आश्रय घेतात, त्यांचे स्वभाव आणि चरित्र-दोष शीघ्रच दूर होऊन जातात. जेथे भक्ती असते, धर्म तेथे मागोमाग चालत येतोच. भगवान सर्व धर्मांचे मूळ आहेत. ते भक्तीच्या अगदी सहजपणे अधीन होतात. भगवंत हृदयात विराजमान झाल्याबरोबर जिवास बांधणारी माया तत्काळ दूर होऊन जाते–दुसऱ्या साधनांची आवश्यकताच भासत नाही. भक्त होत नाही तोच धर्म भक्ताच्या हृदयास धर्ममय करून टाकतो. इकडे भोगवासना दूर झाल्याबरोबर शांती येऊन विराजते. म्हणून माझी प्रतिज्ञा आहे की–"माझ्या भक्तांचा कधीही विनाश होत नाही." कर्मी आणि ज्ञानी स्वतंत्र होऊन आपापल्या साधना करता-करता कुसंगात पडू शकतात. परंतु माझा भक्त माझ्या संगाच्या प्रभावाने कुसंगात पडू शकत नाही. म्हणून त्याचे पतनही होऊ शकत नाही. भक्त कुठल्याही पापयोनीत अथवा कुणा ब्राह्मणाघरी जन्म ग्रहण करो, परागती सर्वदा त्याच्या हातात स्थित असते.

चुडामणी–पहा, आमच्या शास्त्रांत जी जन्माद्वारे जाति-निरूपणाची व्यवस्था आहे, तीच चांगली प्रतीत होते. ज्याने ब्राह्मणाघरी जन्म घेतला, त्याची

---

(८) हे अर्जुन! संपूर्ण योग्यांमध्ये सुद्धा जो दृढ श्रद्धेने, मद्गतचित्ताने मलाच निरंतर भजतो, तोच योगी मला परमश्रेष्ठ मान्य आहे.

संध्या-वंदनादी करता-करता ज्ञानप्राप्ती आणि अंततः मुक्तीसुद्धा अवश्य होईल. मला हे कळत नाही की श्रद्धा उत्पन्न होते कशी? गीता आणि भागवतात श्रद्धेद्वारे उत्पन्न भक्तीचा उपदेश आढळतो, परंतु जीव त्या श्रद्धेस कसे प्राप्त करू शकतो–मला स्पष्ट सांगा.

वैष्णवदास–श्रद्धाच जिवांचा नित्य स्वभाव आहे. वर्णाश्रमधर्मांतर्गत जी कर्मांमध्ये निष्ठा पाहिली जाते, ती जिवांच्या शुद्ध अर्थात नित्य-स्वभावाने नाही, तर नैमित्तिक स्वभावाने उत्पन्न होते. छान्दोग्योपनिषद् (७/१९/१) मध्ये सांगितले आहे–

**"यदा वै श्रद्दधाति अथ मनुते नाश्रद्दधन् मनुते, श्रद्दधदेव मनुते, श्रद्धात्वेव विजिज्ञासितव्येति श्रद्धां भगवतो विजिज्ञास इति"** (९)

कुणी-कुणी सिद्धांतविद् श्रद्धा शब्दाचा अर्थ–वेद आणि गुरुवाक्यांवर दृढ विश्वास असणे असा लावतात. अर्थ अयोग्य नाही, परंतु पूर्णतः स्पष्ट नाही. आमच्या संप्रदायात श्रद्धा शब्दाचा अर्थ अशा प्रकारे केला गेला आहे–

**"श्रद्धा त्वन्योपायवर्ज्ं भक्त्युन्मुखी चित्तवृत्तिविशेषः"** (१०)

(आम्नाय सूत्र–५७)

सत्संगात साधूंची वाणी ऐकता-ऐकता जेव्हा साधकाच्या चित्तात हा भाव निर्माण होतो की कर्म, ज्ञान आणि योग आदी साधनांनी जिवाचे नित्य कल्याण होऊ शकत नाही तथा श्रीहरीच्या चरणी अनन्य भावाने शरण गेल्याशिवाय जिवाची कुठलीच गती होत नाही, तेव्हा समजावे की त्या साधकात श्रद्धा उत्पन्न झाली आहे. आता श्रद्धेचे स्वरूप सांगतो–

---

(९) सनत्कुमार म्हणाले–"ज्यावेळेस माणूस श्रद्धा बाळगतो, त्यावेळेस तो मनन करतो, श्रद्धेविना कुणीही मनन करू शकत नाही. परंतु श्रद्धा बाळगणाराच मनन करतो. म्हणून श्रद्धेचीच विशेषरूपाने जिज्ञासा करावी." नारद म्हणाले–"मी त्या श्रद्धेसच विशेषरूपाने जाणण्याची इच्छा करतो."

(१०) कर्म, ज्ञान आणि अन्याभिलाषरहित जिवाच्या त्या विशेष चित्तवृत्तीचे नाव श्रद्धा आहे, जी केवळ भक्तीकडे उन्मुख करते.

**"सा च शरणापत्तिलक्षणा"**

(आम्नाय सूत्र–५८)

अर्थात, शरणागती हेच श्रद्धेचे बाह्य लक्षण आहे. शरणागती काय आहे–

**आनुकूलस्य संकल्पः प्रातिकूल्यस्य वर्जनम्।**
**रक्षिष्यतीति विश्वासो गोप्तृत्वे वरणं तथा।**
**आत्मनिक्षेप-कार्पण्ये षड्विधा शरणागतिः॥**

(हरिभक्तिविलास ११/४७)

अर्थात–अनन्य भक्तिनुकूल आचरण करीन तथा प्रतिकुलाचे वर्जन करीन–अशी प्रतिज्ञा, केवळ भगवंतच माझे रक्षक आहेत, ज्ञान, योगाभ्यास, तपस्यादीने माझे काहीच कल्याण होणार नाही–असा विश्वास, माझ्या स्वतःच्या प्रयत्नांनीही मला लाभ होऊ शकणार नाही, अथवा माझे पोषण मी स्वतः करू शकत नाही, मी भगवंताची यथाशक्ती सेवा करीन, ते आमचे पालन-पोषण करतात–अशी निर्भरता, मी कोण आहे? मी त्यांचा आहे आणि त्यांच्या इच्छेस पूर्ण करणे माझे कर्तव्य आहे–असे आत्मनिवेदन, मी दीनहीन अकिंचन आहे–असा दैन्य-भाव–हे सर्व भाव मिळून अंतःकरणात प्रवेश करून ज्या वृत्तीला प्रकाशित करतात, त्यास 'श्रद्धा' असे म्हणतात. असा श्रद्धाळू जीवच भक्ति-अधिकारी आहे. ही नित्यमुक्त जिवाची प्राथमिक अवस्था आहे. म्हणून हाच जिवांचा नित्य स्वभाव आहे. याच्या अतिरिक्त दुसरे सर्व स्वभाव नैमित्तिक आहेत.

चुडामणी–समजलो. परंतु आपण आत्तापर्यंत हे सांगितले नाही की श्रद्धा कशास म्हणतात. जर सत्कर्मांनी श्रद्धा उदित होते तर मग माझाच पक्ष अधिक बलवान ठरतो. कारण वर्णाश्रमाचे सत्कर्म आणि स्वधर्माचे पालन केल्याशिवाय श्रद्धा उत्पन्न होत नाही. जर मुसलमानांत तसे सत्कर्म नाहीत तर ते भक्तीचे अधिकारी कसे असू शकतात?

वैष्णवदास–श्रद्धा सुकृतीने उत्पन्न होते. बृहन्नारदीयपुराणात म्हटले गेले आहे–

**भक्तिस्तु भगवद्भक्तसंगेन परिजायते।**
**सत्संगः प्राप्यते पुंभिः सुकृतैः पूर्वसंञ्चितैः॥**(११)

सुकृती दोन प्रकारची असते–नित्य आणि अनित्य. ज्या सुकृतीने सत्संग आणि भक्तिलाभ होतो, ती नित्य सुकृती आहे. ज्या सुकृतीने भुक्ती आणि अभेद मुक्ती लाभ होतो, ती नैमित्तिक सुकृती आहे. ज्याचे फळ नित्य असते, ती नित्य सुकृती असते आणि ज्याचे फळ कुठल्या निमित्तावर आश्रित राहते अर्थात अनित्य असते, ती अनित्य सुकृती. सर्व प्रकारच्या मुक्ती स्पष्टपणे निमित्ताश्रयी आहेत, कारण त्या नित्य नाहीत. बरेच लोक मुक्तीला नित्य मानतात, परंतु त्यांचा असा सिद्धांत मुक्तीचे खरे स्वरूप न जाणल्यामुळे असतो. आत्मा शुद्ध, नित्य आणि सनातन आहे. जड वा मायेचा संसर्गच जीवात्म्याच्या बंधनाचे कारण वा निमित्त आहे. त्यास पूर्णपणे छेदन करण्याचे नाम मुक्ती आहे. क्षणभरातच या बंधनाचे मोचन होते. मोचन-कर्म नित्य नाही. मोचन होताच मुक्तीची गोष्ट तेथेच संपते. निमित्ताचा नाशच मुक्ती आहे. म्हणून मुक्ती एक नैमित्तिक भावमात्र आहे. परंतु, भगवंताच्या चरणांप्रती जिवाची जी रती असते ती कधीच स्थगित होत नाही. म्हणूनच तो नित्यधर्म आहे आणि त्याच्या कुठल्याही अंशास वा अंगास शुद्ध-विचाराने नैमित्तिक म्हटले जाऊ शकत नाही. जी भक्ती मुक्ती देऊन तेथेच समाप्त होते, ती नैमित्तिक कर्मांतर्गत एक कर्ममात्रच आहे आणि जी भक्ती मुक्तीच्याही आधी वर्तमान आहे, मुक्तीसोबत वर्तमान आहे, तथा मुक्तीनंतरही वर्तमान राहील–ती भक्ती एक वेगळे नित्य-तत्त्व आहे आणि तोच जिवाचा नित्यधर्म आहे. मुक्ती भक्तीच्या निकटचे एक अवांतर फळमात्र आहे. मुण्डकोपनिषदात सांगितले आहे–

**परीक्ष्य लोकान् कर्म-चितान् ब्राह्मणो निर्वेदमायान्नास्त्यकृतः कृतेन।**
**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्॥**(१२)

कर्म, ज्ञान, योगादी सर्व नैमित्तिक सुकृती आहेत. भक्तसंग आणि भक्ति-क्रियेचा संगच नित्य सुकृत आहे. ज्यांनी जन्मजन्मांतरी नित्य-सुकृत उपार्जन केले

---

(११) भगवद्भक्तांच्या संग-प्रभावाने भक्तिवृत्तीचा प्रकाश होतो. जीव पूर्व-पूर्व जन्मांच्या संचित सुकृतींच्या फलामुळेच विशुद्ध भक्तांचा संग प्राप्त करतात.

आहे त्यांनाच श्रद्धा प्राप्त होते. नैमित्तिक सुकृताची अन्यान्य फळे असतात, परंतु त्यामुळे अनन्य भक्तीत श्रद्धा उत्पन्न होत नाही.

चुडामणी–भक्तसंग आणि भक्ति-क्रिया कशास म्हणतात? स्पष्ट करून सांगा. या दोन्ही कुठल्या सुकृतींचे फळ आहेत? त्या कशा प्राप्त होतात?

वैष्णवदास–शुद्ध भक्तांसोबत कथोपकथन, त्यांची सेवा आणि त्यांच्याकडून कथा ऐकणे–यास 'भक्तसंग' असे म्हणतात. शुद्ध भक्त नगर-संकीर्तनादी भक्ति-क्रियांचे अनुष्ठान करतात. भक्तीच्या अशा क्रियांमध्ये सम्मिलित झाल्याने अथवा स्वयं कोणती भक्ति क्रिया केल्याने 'भक्ति-क्रिया-संग' होतो. शास्त्रांमध्ये हरिमंदिर-मार्जन, तुळशीजवळ प्रदीप-दान, हरिवासर (एकादशी, जन्माष्टमी, रामनवमी इत्यादी) यांचे पालन–यांस भक्तिक्रिया म्हटले जाते. या भक्ति-क्रिया जर शुद्ध श्रद्धेने पाळल्या नाहीत तरीही, त्यांच्यायोगे भक्ति-पोषक सुकृत होते. हे सुकृत बलवान झाल्यावर साधुसंग आणि अनन्य भक्तीत जन्मजन्मांतर पर्यंत श्रद्धा होत राहते. 'वस्तू-शक्ती' नामक एक शक्ती मानायला हवी. भक्तिक्रियेत मात्र भक्तिपोषक शक्ती असते. श्रद्धेने केले गेले तर अगदी उत्तम, अवहेलनेने केले तरीही सुकृत उत्पन्न होते. प्रभास-खंडात लिहिले आहे–

**मधुरमधुरमेतन्मङ्गलं मङ्गलानां,**
**सकल निगमवल्लीसत्फलं चित्स्वरूपम्॥**
**सकृदपि परिगीतं श्रद्धया हेलया वा,**
**भृगुवर नरमात्रं तारयेत् कृष्णनाम॥**[१३]

अशा तऱ्हेने जितक्या प्रकारचे भक्ति-पोषक सुकृत आहेत, ते सर्व नित्य सुकृत आहेत. क्रमशः या सुकृतांच्या बलवान होण्याने अनन्य भक्तीमध्ये श्रद्धा निर्माण होते आणि साधुसंग लाभतो. नैमित्तिक दुष्कृतामुळे कुणा मनुष्याचा जन्म

---

(१२) कर्माद्वारे प्राप्त होणाऱ्या लोकांची परीक्षा करून, अर्थात कर्मफलांस लौकिक आणि अनित्यमात्र उपलब्धी करून (समजून) तथा कर्मातीत नित्यवस्तू भगवान पार्थिव (सकाम) कर्मांनी भेटू शकत नाही–असे मानून ब्राह्मणांस कर्मापासून सर्वदा विरक्त रहावयास हवे आणि त्या भगवत्स्वरूपाचे तत्त्वज्ञान लाभ करण्यासाठी हातात समिधा घेऊन श्रद्धा आणि विनय भावाने तन, मन आणि वचनाने वेदज्ञ आणि भगवत्सेवा-निष्ठ ब्रह्मज्ञ सद्गुरूस शरण जायला हवे.

मुसलमानाच्या घरी होतो, परंतु तरीही नित्य सुकृतामुळे अनन्य भक्तीमध्ये त्याची श्रद्धा होते. यात आश्चर्य काय आहे?

चुडामणी–माझ्या म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की जर भक्ति-पोषक सुकृत नामक कुठली वस्तू आहे तर तीही अन्य कुठल्या प्रकारच्या सुकृताने उत्पन्न होत असावी. अन्य प्रकारचे सुकृत मुसलमानांत नाही–म्हणून मग त्यांच्यात भक्ति-पोषक सुकृताचे असणेही संभव नाही.

वैष्णवदास–असा विश्वास ठेवणे योग्य नाही. नित्य-सुकृत आणि नैमित्तिक-सुकृत परस्पर निरपेक्ष आहेत. दुष्कृतांनी परिपूर्ण असा एक दुराचारी व्याध (शिकारी) शिवरात्रीच्या दिवशी दैवयोगाने उपवास आणि जागरण करून हरिभक्तीचा अधिकारी झाला होता. "वैष्णवानां यथा शंभुः" (श्रीमद्भा.) या वाक्याने महादेव परमपूज्य वैष्णव ठरतात. त्यांच्या व्रताच्या पालनाने हरिभक्ती लाभते.

चुडामणी–म्हणजे तुम्ही सांगू इच्छिता की नित्य-सुकृत घटनाचक्राने घटित होते?

वैष्णवदास–सर्वकाही घटनाचक्राने होत असते. कर्म-मार्गातही असेच होत असते. सर्वप्रथम जिवाने ज्याद्वारे कर्मचक्रात प्रवेश केला, ती आकस्मिक घटनेशिवाय दुसरे काय आहे? यद्यपि मीमांसकांनी कर्मास अनादी म्हटले आहे, तथापि कर्माचे एक मूळ आहे. आणि ते मूळ आहे–भगवत्-विमुखता. अशा प्रकारे नित्य सुकृतसुद्धा एक आकस्मिक घटनाच वाटते. श्वेताश्वतर उपनिषद् म्हणते–

**समाने वृक्षे पुरुषो निमग्नो ह्यनीशया शोचति मुह्यमानः।**
**जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशस्य महिमानमेति वीतशोकः॥**[१४]

---

(१३) हरिनाम सर्व प्रकारच्या मंगलांमध्ये श्रेष्ठ मंगलस्वरूप आहे, मधुराति सुमधूर आहे. ते निखिल श्रुती-लतांचे चिन्मय सुपक्कफल आहे. हे भार्गवश्रेष्ठ, श्रद्धेने असो वा अवहेलनेने, मनुष्य जर स्पष्टपणे एकदा जरी निरपराध होऊन 'कृष्ण' नामाचे उच्चारण करतो, तर ते नाम त्या मनुष्यास त्याच समयी तारते.

(१४) जीव आणि अंतर्यामी परमात्मा–ही दोन्ही तत्त्वे एकाच देहरूप वृक्षावर निवास करतात. ज्यांत जीवतत्त्व मायेद्वारे मोहित होऊन देहात्मबुद्धीच्या वश झाल्याने असमर्थ होऊन शोक करते. जेव्हा

(श्वे. उ.४/७)

श्रीमद्भागवतातदेखील–

**भवापवर्गो भ्रमतो यदाभवेज्जनस्य तर्ह्यच्युतसत्सामागमः।**
**सत्संगमो यर्हि तदैव सद्गतौ परावरेशे त्वयि जायते रतिः॥**[(१५)]

(श्रीमद्भा. १०/५१/५३)

**सतां प्रसङ्गान्मम वीर्यसम्विदो भवन्ति हृत्कर्णरसायनाः कथाः।**
**तज्जोषणादाश्वपवर्गवर्त्मनि श्रद्धा रतिर्भक्तिरनुक्रमिष्यति॥**[(१६)]

(श्रीमद्भा. ३/२५/२५)

चुडामणी–तुमच्या विचाराने हिंदू आणि मुसलमानांत काहीच भेद नाही का?

वैष्णवदास–भेद दोन प्रकारचे असतात–पारमार्थिक आणि व्यावहारिक. हिंदू आणि मुसलमानांत पारमार्थिक भेद नाही, परंतु व्यावहारिक भेद आहे.

चुडामणी–आपण वारंवार वागाडम्बर का उपस्थित करताय? हिंदू आणि मुसलमानात व्यावहारिक भेद कशा प्रकारचा असतो?

वैष्णवदास–सांसारिक व्यवहारास व्यवहार म्हणतात. संसारात मुसलमान अस्पृश्य आहेत, म्हणून व्यावहारिक दृष्टीने अस्पृश्य अर्थात व्यवहारासाठी योग्य

---

सद्गुरूच्या कृपेने जीव अनन्य भक्तांद्वारे सेवित आपल्यापेक्षा भिन्न परमेश्वराचे दर्शन करतो तथा त्यांचा महिमा श्रवण करतो, तेव्हा सर्वथा शोकरहित होऊन जातो.

(१५) आपल्या स्वरूपात नित्य स्थित राहणारे भगवन्! जीव अनादीकाळापासून जन्ममृत्यूरूप संसारचक्रात भटकत राहतो. या चक्रातून सुटण्याची वेळ येते तेव्हा त्यास सत्संग प्राप्त होतो. हे निश्चित आहे की ज्या क्षणी सत्संग प्राप्त होतो, त्याच क्षणी संतांचे आश्रय, चित्-अचिताचे ईश्वर! आपल्यात जिवाची बुद्धी अत्यंत दृढतेने लागते.

(१६) सत्पुरुषांच्या समागमाने माझ्या पराक्रमांचे यथार्थ ज्ञान करविणाऱ्या तथा हृदय आणि कानांना प्रिय वाटणाऱ्या वीर्यवती कथा ऐकायला मिळतात. त्यांचे सेवन केल्याने शीघ्रच अविद्या निवृत्तीच्या पथस्वरूप माझ्यात श्रद्धा, रती आणि प्रेमभक्तीचा क्रमशः विकास होतो.

नाहीत. मुसलमानांचा स्पर्श झालेले पाणी हिंदूच्या व्यवहारयोग्य नाही. दुर्जातित्वामुळे मुसलमानांचे शरीर सुद्धा तुच्छ आहे, म्हणून स्पर्श करण्याजोगे नाही.

चुडामणी–मग पारमार्थिक दृष्टीने हे अभेद कसे काय असू शकतात?

वैष्णवदास–शास्त्रांमध्ये या गोष्टीची स्पष्ट शब्दात घोषणा केली गेली आहे. "भृगुवर नरमात्रं तारयेत् कृष्णनाम"–या वाणीनुसार मुसलमान आदी सर्व मनुष्य परमार्थ-लाभ करण्याकरिता समान आहेत. ज्यांच्यात नित्य सुकृताचा अभाव आहे, ते दोन पायाचे पशूच आहेत, कारण कृष्णनामात त्यांचा विश्वास नसतो. म्हणून मनुष्य जन्म प्राप्त झाल्यावरसुद्धा त्यांच्यात मनुष्यत्वाचा अभाव असतो. महाभारतात म्हटले आहे–

**महाप्रसादे गोविन्दे नामब्रह्मणि वैष्णवे।**
**स्वल्पपुण्यवतां राजन् विश्वासो नैव जायते॥**[१७]

नित्य-सुकृत, जिवास पवित्र करणारे महान पुण्य आहे. नैमित्तिक सुकृत क्षुद्र-पुण्य आहे, याद्वारे चिन्मय विषयात श्रद्धा उत्पन्न होत नाही. महाप्रसाद, कृष्ण, कृष्णनाम आणि वैष्णव–हे चारही या जगात चिन्मय आणि चित्-प्रकाशक आहेत.

चुडामणी हसत म्हणाले–पुन्हा तेच, विचित्र गोष्टी! डाळ, भात किंवा भाजी भले चिन्मय कशा असू शकतात बरे? वैष्णवजन सगळे काही करू शकतात.

वैष्णवदास–आपण वाटल्यास काहीही करा, परंतु वैष्णवांची निंदा करू नका–माझी ही प्रार्थना आहे. कारण विचार-स्थळी विषयावर विचार व्हायला हवा, वैष्णव निंदेची तिथे गरजच काय? महाप्रसादाव्यतिरिक्त संसारात ग्रहण करण्यायोग्य आणखी कुठलीच वस्तू नाही. कारण तो चित्‌चा उद्दीपक आणि जडतेस दूर करणारा आहे. ईशोपनिषद् म्हणते–

---

(१७) अल्प सुकृतिवान मनुष्यास भगवंताचा उच्छिष्ट महाप्रसाद, श्रीगोविन्द, नाम-ब्रह्म आणि वैष्णवांत श्रद्धा होत नाही.

**ईशावास्यमिदं सर्वं यत् किञ्च जगत्यां जगत्।**
**तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद्धनम्॥**(१८)

(ईशोपनिषद्)

अखिल ब्रह्मांड भगवत्-शक्तीने संबंधयुक्त आहे. समस्त वस्तूंमध्ये चित्-शक्तीचा संबंध दर्शन केल्याने बहिर्मुख भोग होत नाही. अंतर्मुख जिवास आपल्या शरीर यात्रेच्या निर्वाहाकरिता जे काही ग्रहण करण्याची आवश्यकता आहे, त्या सगळ्यास भगवत्-प्रसाद समजून जर त्याने ग्रहण केले, तर त्याचे अधःपतन होत नाही, उलट त्याची चिदुन्मुखी प्रवृत्तीच विकसित होते. याचेच नाव महाप्रसाद आहे. मोठी खेदाची गोष्ट आहे की अशा अपूर्व वस्तूतपण आपला विश्वास नाही.

चुडामणी–अच्छा, या विषयास सोडा. आता मूळ विषयाकडे या. मुसलमानांसोबत आपला व्यवहार कसा असणे उचित आहे?

वैष्णवदास–मनुष्य जोपर्यंत मुसलमान आहे, तोपर्यंत त्याच्याकडे पाहण्याचा आमचा दृष्टीकोन उदासीनच असतो. कुणी आधी मुसलमान होता, परंतु आता नित्य सुकृतीच्या बळाने वैष्णव झालाय, तेव्हा आम्ही त्याला मुसलमान मानत नाही. याविषयी शास्त्राचे सुस्पष्ट मत आहे–

**शूद्रं वा भगवद्भक्तं निषादं श्वपचं तथा।**
**वीक्ष्यते जातिसामान्यात् स याति नरकं ध्रुवम्॥**(१९)

(पद्मपुराण)

---

(१८) अखिल ब्रह्मांडात जे काही चेतन आहे, समस्त ईश्वरात अवस्थित आहे तथा त्याचबरोबर त्याने व्याप्त आहे, म्हणून त्यागपूर्वक (यास) भोगत रहा, कुणाच्या धनात आसक्ती ठेऊ नका.

(१९) भगवद्भक्त चारी वर्णांमध्ये अत्यंत अधम शूद्र वर्णाचा असो अथवा वर्णाने बहिर्भूत व्याध वा चांडाळ कुठल्याही कुळाचा का असो, जो त्यास त्या कुळात उत्पन्न झाल्यामुळे त्याच जातीचा मानतात, ते निश्चितच नरकात गमन करतात.

**न मे प्रियश्चतुर्वेदी मद्भक्तः श्वपचः प्रियः।**
**तस्मै देयं ततो ग्राह्यं स च पूज्यो यथा ह्यहम्॥** [२०]

(ह. भ. वि. धृत इतिहास समुच्चय वाक्य)

चुडामणी–समजलो! गृहस्थ वैष्णव कुणा मुसलमान वैष्णवासोबत वैवाहिक संबंध ठेऊ शकतो का?

वैष्णवदास–व्यावहारिक विषयात मुसलमान जगाकरिता मरेपर्यंत मुसलमानच राहतो, परंतु पारमार्थिक विषयात भक्ती प्राप्त केल्यानंतर तो मुसलमान रहात नाही. स्मार्त-कर्म दहा प्रकारची असतात–त्यात विवाहसुद्धा एक आहे. म्हणून गृहस्थ वैष्णव जर हिंदू असेल अर्थात चारही वर्णांतर्गत असेल तर त्यास आपल्या वर्णातच वैवाहिक संबंध केला पाहिजे. कारण संसार-यात्रेच्या निर्वाहाकरिता वर्ण-धर्म नैमित्तिक असूनही त्यांच्याकरता तेच योग्य आहे. यावरून हे समजू नये की वर्ण-व्यवहार सोडल्यानेच वैष्णव होता येते. भक्तांना भक्तीच्या अनुकूल कार्ये करणे कर्तव्य आहे. वर्ण-धर्मात वैराग्य झाल्यावर त्याचा त्याग करता येतो. त्यावेळी वर्ण-धर्मासोबत सगळ्यांचा परित्याग होतो.

वर्ण-धर्म भजनास प्रतिकूल असल्याने अनायासेच त्याचा त्याग केला जाऊ शकतो आणि मुसलमानी-समाज सुद्धा भजनास प्रतिकूल असल्यास श्रद्धाळू मुसलमान देखील त्या समाजास त्यागण्याचा अधिकारी आहे. आपापल्या समाजास त्याग करण्यास उपयुक्त अधिकारी हिंदू आणि मुसलमान–दोघेही जर वैष्णव झाले, तर मग त्यांच्याच भेद राहतोच कुठे? कारण दोघांनीही आपापले व्यवहार सोडले आहे. मग आता परमार्थ विषयात दोघेही भाऊ-भाऊ आहेत. गृहस्थ-वैष्णवाकरिता असा नियम नाही. भजनास प्रतिकूल असूनही समाजास त्यागण्याचा पूर्ण अधिकार प्राप्त होईपर्यंत गृहस्थ वैष्णवांनी समाज त्याग करू नये. परंतु जेव्हा त्यांच्या हृदयात भजनानुकूल विषयांप्रती दृढ आदरयुक्त भाव निर्माण होतो, तेव्हा ते सहजच समाजाचा त्याग करू शकतात. श्रीमद्भागवतात सुद्धा–

---

(२०) भक्तिहीन चतुर्वेदी ब्राह्मण मला प्रिय नाही, परंतु माझा भक्त–चांडाळ कुळात जन्म घेऊनही मला अधिक प्रिय आहे. तोच दानाचा सत्पात्र असतो, तथा त्याचीच कृपा ग्रहण करण्यायोग्य आहे. तो निश्चितच माझ्यासमान पूज्य आहे.

**आज्ञायैव गुणान् दोषान् मयादिष्टानपि स्वकान्।**
**धर्म्मान् सन्त्यज्य यः सर्वान् मां भजेत् स च सत्तमः॥**(२१)

(श्रीमद्भा. ११/११/३२)

गीतेच्या चरम (शेवटच्या, अंतिम) सिद्धांताच्या रूपातसुद्धा हेच प्रतिपादित झाले आहे–

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**
**अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥**(२२)

(गीता १८/६६)

पुनः भागवतातही याची पुष्टी केलेली आहे–

**यदा यस्यानुगृह्णाति भगवानात्मभावितः।**
**स जहाति मतिं लोके वेदे च परिनिष्ठिताम्॥**(२३)

(श्रीमद्भा. ४/२९/४६)

चुडामणी–मुसलमान जर यथार्थ रूपात वैष्णव असेल, तर आपण लोक त्याच्या बरोबर एकत्र खाण्यापिण्याचा व्यवहार करू शकता की नाही?

---

(२१) स्वयं भगवान म्हणतात–मी स्वतः वेदांमध्ये ज्या कर्मांचा उपदेश दिला आहे, त्याच्या गुण-दोषांचा विचार करून त्या कर्मांचा संपूर्णपणे परित्याग करून जो भक्त माझ्याच भजनात मग्न असतो, तो परम संत आहे.

(२२) कर्म आणि ज्ञानादी समस्त नैमित्तिक धर्मांचा परित्याग करून एकमात्र माझ्या (भगवान कृष्णापुढे) शरणागत व्हावे. मी तुला–धर्मत्यागामुळे उत्पन्न झालेल्या सर्व पातकांतून मुक्त करीन. शोक करू नकोस.

(२३) कुण्या जिवाचे आपल्या प्रती आत्मनिवेदन पाहून अथवा त्याच्या आत्मवृत्तीद्वारे आपली सेवा होताना पाहून जेव्हा भगवंत त्या जिवाप्रती अनुग्रह करतात त्याचवेळी तो भक्त लौकिक अर्थात पार्थिव आणि वैदिक समस्त कर्मांतील आसक्तीचा परित्याग करतो.

वैष्णवदास–निरपेक्ष वैष्णव त्याच्याबरोबर बसून महाप्रसादाचे सेवन करू शकतो. परंतु गृहस्थ वैष्णव त्याच्याबरोबर एकाच जागी खाणेपिणे करू शकत नाही. परंतु जिथपर्यंत विष्णू आणि वैष्णवांच्या प्रसादाचा प्रश्न येतो, गृहस्थ वैष्णवास सुद्धा त्याच्याबरोबर एकाच जागी खाण्यात काहीच अडचण नसावी, उलट ते त्याचे कर्तव्य आहे.

चुडामणी–मग वैष्णवांच्या मंदिरात एखाद्या मुसलमान-वैष्णवांस सेवा-पूजेमध्ये अधिकार का नाही दिला जात?

वैष्णवदास–मुसलमान कुळात उत्पन्न वैष्णवास मुसलमान म्हटल्याने अपराध होतो. मानवमात्राचा कृष्ण-सेवेत अधिकार आहे. जर गृहस्थ वैष्णव देव-सेवेत वर्णाश्रमाच्या विरुद्ध कुठले कार्य करतो तर त्याला व्यावहारिक दोष लागतो. निरपेक्ष वैष्णवांकरिता मूर्तिपूजेची व्यवस्था नाही. ते मूर्तिपूजा करीत नाहीत, कारण मूर्तिसेवेने वैष्णवांच्या निरपेक्षतेमध्ये विशेष व्याघात (हानी) पोहोचतो. ते लोक श्रीराधा-वल्लभाची मानसिक-सेवा करतात.

चूडामणी–समजलो! आता हे सांगा की ब्राह्मणांच्या संबंधी आपली काय धारणा आहे?

वैष्णवदास–ब्राह्मण दोन प्रकारचे आहेत–स्वभाव-सिद्ध ब्राह्मण आणि केवळ जातिसिद्ध ब्राह्मण. स्वभाव-सिद्ध ब्राह्मण प्रायः (बहुतांशवेळी) वैष्णव असतात. म्हणून त्यांचा सन्मान सर्वसंमत आहे. जातिसिद्ध ब्राह्मणांचा व्यावहारिक सन्मान आहे. यात वैष्णवांचीही हीच संमती आहे. याविषयी शास्त्रोक्त विचार असा आहे–

**विप्राद्‌ द्विषड्‌गुणयुतादरविन्दनाभ–**
**पादारविन्द–विमुखात्‌ श्वपचं वरिष्ठम्‌।**
**मन्ये तदर्पित मनोवचनेहितार्थ–**
**प्राणं पुनाति स्वकुलं न तू भूरिमानः॥**[२४]

---

(२४) माझ्या मते बारा गुणांनी युक्त ब्राह्मण सुद्धा भगवान पद्मनाभाच्या चरणकमलांपासून विमुख असेल, तर त्याच्यापेक्षा चांडाळकुळात उत्पन्न तो भक्त श्रेष्ठ आहे, ज्याने आपले मन, वचन, कर्म आणि धन कृष्णाच्या चरणी समर्पित केले आहे, कारण तो चांडाळ तर आपल्या कुळासोबत आपल्या प्राणालाही पवित्र करतो, परंतु मोठेपणाचा अभिमान राखणारा तो ब्राह्मण स्वतःस

(श्रीमद्भा. ७/९/१०)

चुडामणी–शूद्र आदींना वेदपाठात अधिकार नाही. शूद्र वैष्णव असेल तर तो वेद पठण करू शकतो का?

वैष्णवदास–कुठल्याही वर्णाचा का नसो, शुद्ध वैष्णव झाल्याने पारमार्थिक ब्राह्मणता त्यास स्वाभाविक रूपाने प्राप्त होते. वेद दोन भागांमध्ये विभक्त आहेत, अर्थात कर्म प्रतिपादक वेद आणि तत्त्व प्रतिपादक वेद. व्यावहारिक ब्राह्मणांचा अधिकार कर्म प्रतिपादक वेदांमध्ये असतो आणि पारमार्थिक ब्राह्मणांचा तत्त्व-प्रतिपादक वेदांमध्ये. शुद्ध वैष्णव ज्या कुठल्याही वर्णात उत्पन्न का न होवोत, ते तत्त्व-प्रतिपादक वेदाचे अध्ययन आणि अध्यापन करू शकतात, तथा तसे करतातही. जसे बृहदारण्यकोपनिषद् (४/४/२१) मध्ये–

**तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः ॥**

अर्थात, धीर आणि स्थिर ब्रह्मज्ञ व्यक्ती परमब्रह्म भगवंतास विशेष रूपाने जाणून त्यांच्याप्रती प्रकृष्ट अर्थात उत्तम ज्ञानस्वरूप प्रेमभक्ती करतील.

बृहदारण्यकोपनिषद् (३/८/१०) मध्ये आणखी एका ठिकाणी म्हटले आहे–

**यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वा अस्माल्लोकात् प्रैति सः कृपणः।**
**अथ य एतदक्षरं विदित्वा अस्माल्लोकात् प्रैति स ब्राह्मणः ॥**(२५)

व्यावहारिक ब्राह्मणांच्या संबंधात मनू म्हणतात–

**योऽनधीत्य द्विजो वेदमन्यत्र कुरुते श्रमम्।**
**स जीवन्नेव शूद्रत्वमाशु गच्छति सान्वयः ॥**(२६)

(मनुस्मृती २/१६८)

---

देखील पवित्र करू शकत नाही.

(२५) हे गार्गी! अक्षर ब्रह्म अर्थात विष्णुवस्तूला न जाणूनच जे लोक या जगातून निघून जातात, ते अत्यंत कृपण-नीच शूद्र आहेत आणि जे त्या अक्षर ब्रह्मास जाणून या संसारातून प्रस्थान करतात, ते ब्रह्मज्ञ ब्राह्मण आहेत.

तत्त्व-प्रतिपादक वेदांचा अधिकार वेदांमध्ये या प्रकारे निरुपित केला आहे–

**यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः॥**(२७)

(श्वे. उ. ६/२३)

'पराभक्ती' म्हणजे शुद्ध भक्ती असे समजायला हवे. याविषयी मी अधिक काही बोलू इच्छित नाही, आपण समजून घ्या. संक्षेपात असे सांगितले जाऊ शकते की ज्यांची अनन्य भक्तीमध्ये श्रद्धा उत्पन्न झाली आहे ते तत्त्व प्रतिपादक वेदाध्ययनाचे अधिकारी आहेत तथा ज्यांना अनन्यभक्ती प्राप्त झाली आहे, ते तत्त्व-प्रतिपादक वेदांचे अध्ययन करण्याचे अधिकारी आहेत.

चुडामणी–तुम्ही हा सिद्धांत करून ठेवलाय का की तत्त्व-प्रतिपादक वेद केवळ वैष्णवधर्माचीच शिकवण देतात, आणि कुठल्याही धर्माची शिकवण देत नाहीत?

वैष्णवदास–धर्म एक आहे, दोन नाहीत, याचे नाव नित्यधर्म वा वैष्णवधर्म आहे. या धर्माच्या सोपानाच्या रूपात समस्त नैमित्तिक धर्मांचा उपदेश दिलेला आहे. भगवान एकादश-स्कंधात म्हणतात–

**कालेन नष्टा प्रलये वाणीयं वेदसंज्ञिता।**
**मयादौ ब्रह्मणे प्रोक्ता धर्मो यस्यां मदात्मकः॥**(२८)

---

(२६) जो द्विज अर्थात ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य उपनयन संस्कारानंतर वेदांचे अध्ययन न करता अर्थ, विज्ञान आणि तर्क आदी निरनिराळ्या शास्त्रांचे अध्ययन आदींमध्ये परिश्रम करतात, ते आपल्या जीवित अवस्थेतच वंशाबरोबर शीघ्रच शूद्रत्वास प्राप्त होतात.

(२७) ज्या साधकाची श्रीभगवतांमध्ये पराभक्ती आहे तथा ज्या प्रकारे भगवंतात आहे त्याच प्रकारे आपल्या गुरूमध्ये सुद्धा शुद्धाभक्ती आहे, त्याच महात्म्याच्या संबंधी या श्रुतींचे रहस्यमय अर्थ संपूर्णपणे प्रकाशित होतात.

(२८) भगवान म्हणाले–ज्यात माझ्या वाणींचे (भागवत धर्मांचे) वर्णन आहे, तीच वेद वाणी कालचक्राने प्रलयकाळात लुप्त झाली होती. मग ब्रह्मकल्पाच्या सुरुवातीस–सृष्टीच्या समयी मी

(श्रीमद्भा. ११/१४/४)

कठोपनिषद् (१/३/९) सुद्धा कथन करते–

**सर्वे वेदा यत् पदमामनन्ति *****
**तत्ते पदं संग्रहेण ब्रवीमि।**[२९]
**'तद्विष्णोः परमं पदम्'** [३०] **इत्यादी**

येथपर्यंत विचार झाल्यावर देवी विद्यारत्न आणि त्यांच्या सोबत्यांची मुखे उदास झालीत. अध्यापक लोकांचा उत्साह अगदीच बारगळला. संध्याकाळचे पाच वाजले होते. सगळ्यांनी प्रस्ताव मांडला, आजचा विचार येथेच स्थगित केला जावा. सर्वसंमतीने सभा विसर्जित झाली. ब्राह्मण पंडित वैष्णवदासाच्या पांडित्याची कौतुकास्पद प्रशंसा करीत निघून गेले. वैष्णव देखील हरि-ध्वनी करून आपापल्या स्थानी निघून गेले.

**॥ सहावा अध्याय समाप्त ॥**



त्याचा ब्रह्मास उपदेश केला होता.

(२९) संपूर्णवेद ज्या पदास वारंवार परम प्राप्य असे म्हणतात, मी त्याचे तुमच्या निकट संक्षेपात वर्णन करतोय.

(३०) तेच विष्णूचे अर्थात परम व्यापक परमात्मा वासुदेवाचे परमपद आहे इत्यादी.

# सातवा अध्याय (नित्यधर्म आणि संसार)

सरस्वती नदीच्या तटावर सप्तग्राम नामक एक खूपच प्राचीन नगर होते. तेथे खूप दिवसांपासून हजारो सोनार वास करीत होते. श्रीउद्धारणदत्तांच्या काळापासून नित्यानन्द प्रभूंच्या कृपेने ते लोक श्रीहरिनाम-संकीर्तनात मस्त रहात असत. त्याच नगरात एक अत्यंत कृपण सोनार राहत असे. त्याचे नाव होते–चण्डीदास. तो धन खर्च होईल या भीतीने तिथल्या नागरिकांच्या हरि-संकीर्तनात भाग घेत नसे. अशा प्रकारे त्याने कंजूषीने बरेचसे धन जमा केले होते. त्याची पत्नी दमयन्तीसुद्धा पतीच्या स्वभाव प्राप्त करून अतिथींचा आणि वैष्णवांचा जरासुद्धा आदर करीत नसे. युवावस्थेतच त्यांना चार पुत्र आणि दोन कन्या प्राप्त झाल्या. कन्यांचे क्रमशः विवाह करून त्यांनी पुत्रांकरिता प्रचुर धन जमवून ठेवले होते.

ज्या घरी संतांचे येणेजाणे नसते, त्या घरातील मुलांमध्ये दया-धर्म सहजच कमी होऊन जातो. मुले जसजशी मोठी होऊ लागली, ती जास्तीतजास्त स्वार्थी होऊ लागली, इतकेच काय तर धनाच्या लोभाने आई-वडिलांच्या मृत्यूची सदा कामना करू लागली. व्यापारी दांपत्याच्या दुःखाला सीमा राहिली नाही. क्रमशः पुत्रांचेही विवाह झाले. सुनाही क्रमशः मोठ्या होऊ लागल्या. त्यादेखील आपापल्या पतींसारखा स्वभाव प्राप्त करून सासू-सासऱ्यांच्या मृत्यूचे चिंतन करू लागल्या. काही काळानंतर पुत्र समजूतदार झाले. दुकानदारीचे काम चांगल्याप्रकारे सांभाळू लागले. घेणे-देणे खूप होऊ लागले. आता ते वडिलांच्या धनाचा आपापसात वाटे करून आपला व्यवसाय खूप चांगल्या रितीने करू लागले.

एक दिवस चण्डीदासाने सगळ्यांना आपल्या जवळ बोलावून म्हटले–पहा, मी लहानपणापासून कंजूषी करून तुम्हा सगळ्यांकरिता इतके धन राखून ठेवले आहे. आम्ही कधीही स्वतःकरता उत्तम खाण्यापिण्याची आणि उत्तम कपड्यांची पर्वा केली नाही. तुमच्या मातेनेसुद्धा असेच जीवन व्यतीत केले आहे. आता आम्ही दिवसेंदिवस वृद्ध होऊ लागलोय. अशा अवस्थेत आमची सेवा करणे तुमचा धर्म आहे. परंतु आम्हाला दुःख होते की तुम्ही आम्हा दोघांचा अत्यंत अनादर करीत असता. आमच्याकडे अजूनही काही गुप्त धन आहे, ते मी त्यालाच देईन, जो आमची उत्तम प्रकारे सेवा करेल.

मुलांनी आणि सुनांनी मौन होऊन त्यांचे म्हणणे ऐकले आणि बाजूला जाऊन परस्पर परामर्श केला–कोणास ठाऊक, पिताजी आपले गुप्त धन कोणास देतील. त्यापेक्षा आपण त्यांना तीर्थाटनास पाठवून देऊया आणि त्यांचे सारे धन त्यांच्या अनुपस्थितीत चोरून परस्परांत वाटून घेऊया. निर्णय पक्का ठरला. सगळ्यांनी मिळून हे निश्चित ठरवले की बहुधा वडिलांनी ते गुप्त धन आपल्या शयन कक्षातच पुरून ठेवले असणार.

मोठ्या पुत्राचे नाव हरिचरण होते. एकदा प्रातःकाळी तो मोठ्या नम्र शब्दांत आपल्या वडिलांकडे येऊन म्हणाला–बाबा! आपण आणि आई एकदा श्रीनवद्वीपधामाचे दर्शन करून यावे. त्यामुळे मनुष्य जन्म सफल होऊन जाईल. असे ऐकले आहे–कलिकाळी श्रीनवद्वीपधामासमान अन्य कुठलेच तीर्थ फलदायक नाही. नवद्वीप धामात जाण्यासाठी काही कष्ट किंवा खर्च लागत नाही. जर चालत जाता येत नसेल, तर प्रवासी नावेने सुद्धा तिथे जाता येते. एक वैष्णवीसुद्धा तुमच्यासोबत जाऊ इच्छिते.

चण्डीदासाने दमयन्तीसमोर पुत्राचा प्रस्ताव ठेवला. दमयन्तीस पुत्राची इच्छा जाणून आनंद झाला. दोघांनी आपापसात निर्णय घेतला की–त्या दिवशीच्या आपल्या धमकीमुळे मुलांची डोकी योग्य मार्गावर आलेली दिसतात आणि राहिली तीर्थाची गोष्ट, तर आपण इतके म्हातारे थोडीच आहोत की पायी चालणार नाही. श्रीपाट कालना आणि शान्तिपूर होत-होत श्रीनवद्वीप धामात पोहोचू शकतो.

शुभ दिन पाहून दोघांनी यात्रा आरंभ केली. वैष्णवीसही बरोबर घेतले. दुसऱ्या दिवशी ते अम्बिका-कालना येथे उपस्थित झाले. तेथे ते दोघे एका दुकानात स्वयंपाक करून जेवायला बसले. त्याचवेळी सप्तग्रामाच्या एका परिचित माणसाने त्यांना पाहून सांगितले की तुमच्या मुलांनी तुमच्या घराचे कुलूप तोडून सारे धन घेतले आहे. आता ते तुम्हाला घरातही घुसू देणार नाहीत. तुमचे गुप्तधन चौघांनी लुटून वाटून घेतले आहे.

या बातमीने चण्डीदास आणि दमयन्ती या दोघांच्याही हृदयास जोराचा धक्का बसला. ते धनाच्या शोकामुळे कातर झाले. भोजनसुद्धा करू शकले नाही. पूर्ण दिवस रडत-रडत घालविला. बरोबरच्या वैष्णवीने त्यांना खूप समजाविले–घरात आसक्ती ठेवू नका. चला तुम्ही दोघांनी साधू बनून एखादा आश्रम बनवून तेथे पडून

रहावे. ज्यांच्याकरिता इतके सगळे केले, तेच जेव्हा शत्रू बनले आहेत, मग घरी परतण्याची आवश्यकता नाही. नवद्वीपाताच राहणे, तेथेच भिक्षा मागून जीवन-निर्वाह करणेच योग्य आहे.

दमयन्ती आणि चण्डीदास आपल्या पुत्रांचा आणि पुत्रवधूंचा हा व्यवहार ऐकून वारंवार म्हणू लागले–आम्ही भले मरून जाऊ, पण घरी परतणार नाही. शेवटी अम्बिका ग्रामी एका वैष्णवाकडे दोन-चार दिवस मुक्काम केला. तेथून शान्तिपुरचे दर्शन करीत ते श्रीनवद्वीपधामात पोहोचले. श्रीमायापुरात एक व्यापारी परिवार राहत असे. ते त्यांच्याच घरी थांबले. दोन-चार दिवस तेथे थांबून ते लोक श्रीनवद्वीपाची सप्तपल्ली, गंगेचा पैलतीर तथा कुलिया ग्रामाच्या सप्तपल्लीचे दर्शन करीत भ्रमण करू लागले. काही दिवसांनी त्यांच्यात पुत्र आणि वधूंप्रती (सुनांप्रती) पुन्हा ममता निर्माण झाली.

चण्डीदास पत्नीस म्हणाले–चल, आपण सप्तग्रामी परत जाऊ, शेवटी आपलीच मुले आहेत न ती, आपल्याविषयी त्यांच्या मनात थोडातरी स्नेह असेलच ना?

लाज नाही वाटत! या वेळेला परतलात तर ते तुमची हत्या करून राहतील. वैष्णवी चिडून म्हणाली.

वैष्णवीच्या बोलण्याने दोघेही घाबरले, ते म्हणाले–देवी! तुम्ही आता तुमच्या आश्रमी परत जा, आम्ही आता खूप समजदार झालो आहोत. कुण्या चांगल्या व्यक्तीकडून उपदेश ग्रहण करून आता आम्ही भिक्षेद्वारे जीवन निर्वाह करून भगवंतांचे भजन करू.

वैष्णवी निघून गेली. पती-पत्नी घराची आशा सोडून कुलिया ग्रामी छकौडी चट्टोपाध्यायच्या घराजवळ एक घर बनवण्याचा प्रयत्न करू लागले. काही भल्या माणसांकडून देणगी घेऊन लवकरच त्यांनी एक घर बनवले. आता दोघेही तेथे स्थायी रूपाने राहू लागले. कुलिया ग्रामाचे दुसरे नाव अपराध भंजनपाट (भंजनग्राम) आहे. येथे वास केल्याने समस्त पूर्व अपराध दूर होतात–असा लोकांचा विश्वास आहे.

एक दिवस चण्डीदास म्हणाले–हरियाची आई! मुलांचे आता नावही घेऊ नकोस. त्यांना आठवू देखील नकोस. आपण अनेक अपराध केलेत. म्हणूनच आपण

व्यापाऱ्याच्या घरी जन्मलो. जन्मदोषाने कृपण होऊन आपण कधीही अतिथी-वैष्णवांची सेवा केली नाही. आता येथे काही पैसे मिळाल्यानंतर अतिथी-सेवा अवश्य करूया, जेणेकरून पुढच्या जन्मी तरी आपले कल्याण होईल. विचार करतोय एखादे दुकान सुरू करावे. सज्जन व्यक्तींकडून काही धन मागून हा रोजगार आरंभ करीन.

चण्डीदासाने काही दिवसांतच एक दुकान सुरू केले. त्यातून रोजच त्यांना काही ना काही लाभ होऊ लागला. पती-पत्नीच्या उदर-पूर्ती अतिरिक्त प्रतिदिन एका अतिथीची सेवाही घडू लागली. पहिल्यापेक्षा त्यांचे जीवन आता चांगल्या प्रकारे व्यतीत होऊ लागले.

चण्डीदासांना थोडे-फार लिहिता-वाचताही येत होते. त्याना जेव्हा-जेव्हा वेळ मिळे, आपल्या दुकानात बसल्याबसल्या ते गुणराजखान कृत 'श्रीकृष्ण विजय' ग्रंथ वाचत असत. ईमानदारीने दुकानदारी करताकरता अतिथींचा सत्कारही करीत असत. अशा प्रकारे पाच-सहा महिने निघून गेले. कुलियाचे सगळेच लोक चण्डीदासाचा परिचय जाणून त्याच्यावर श्रद्धा करू लागले.

त्याच गावात यादवदास नामक एक गृहस्थ ब्राह्मण राहात असत. ते नित्यनेमाने श्रीचैतन्यमंगलाचा पाठ करीत असत. चण्डीदासही कधी-कधी त्यांचा पाठ ऐकण्यास जात असत. यादवदास आणि त्यांची पत्नी सदैव वैष्णव सेवेतच निमग्न असत. ते पाहून चण्डीदास आणि दमयन्तीसही वैष्णव सेवेत रुची उत्पन्न झाली.

एकदा चण्डीदासांनी यादवदासांना विचारले–संसार काय वस्तू आहे?

यादवदास म्हणाले–गंगेच्या पूर्व तटावर श्रीगोद्रुमद्वीपात खूपसे तत्त्वज्ञ वैष्णव राहतात. चला, तेथे जाऊन हा प्रश्न विचारू या. मी सुद्धा कधी-कधी तेथे जाऊन खूपशा उपदेशांचा लाभ घेतो. आजकाल गोद्रुमात ब्राह्मण पंडितांपेक्षा वैष्णव पंडित सिद्धांतांच्या बाबतीत अधिक निपुण आहेत. त्या दिवशी श्रीवैष्णवदास बाबाजींसोबत शास्त्रार्थात ब्राह्मण पंडित पराजित झाले आहेत. तुमचा प्रश्न गंभीर आहे, तेव्हा त्याची मीमांसा तेथे जाऊनच होऊ शकते.

तिसऱ्या प्रहरी यादवदास आणि चण्डीदास गंगेपार जाण्यासाठी तयार झाले. दमयन्ती आता शुद्ध वैष्णवांची सेवा करते, तिच्या हृदयातील कृपणता आता संपूर्णपणे नाहीशी झाली आहे. ती म्हणाली–मी सुद्धा आपल्याबरोबर येते.

यादवदास म्हणाले–तेथील वैष्णव गृहस्थ नाहीत. ते अधिकतः निरपेक्ष आणि गृहत्यागी आहेत. मला भीती वाटते की तुला बरोबर नेण्याने त्यांना कदाचित दुःख होईल.

दमयन्ती म्हणाली–मी दुरूनच त्यांना प्रणाम-दंडवत करीन, त्यांच्या कुंजात येणारही नाही. मी वृद्धा (म्हातारी) आहे, तेव्हा ते लोक माझ्यावर कधीच नाराज होणार नाहीत.

यादवदास म्हणाले–तेथे स्त्रियांना जाण्याचा नियम नाही आहे. तुम्ही तेथे जवळच कोण्या स्थानावर बसून राहावे, आम्ही लोक परतताना तुम्हाला सोबत घेऊन जाऊ.

तिघेही निघाले. हळू-हळू ते गंगेची रेती पार करून प्रद्युम्न कुंजाजवळ पोहोचले. दमयन्ती कुंजाच्या दरवाज्यातच साष्टांग दंडवत प्रणाम करून तिथेच एका जुन्या वटवृक्षाखाली बसली. यादवदास आणि चण्डीदास कुंजात गेले आणि मालती-माधवी मंडपात बसलेल्या वैष्णव मंडळींना भक्तिपूर्वक दंडवत-प्रणाम केला.

येथे मध्यभागी परमहंस बाबाजी बसले आहेत. त्यांच्या चारी बाजूंनी वैष्णवदास, लाहिडी महाशय, बाबा अनन्तदास आणि बरेचसे लोक बसलेले आहेत. यादवदास सुद्धा त्यांच्याजवळ जाऊन बसले तथा त्यांच्याजवळच चण्डीदाससुद्धा बसले.

ही नवी व्यक्ती कोण आहे–अनन्तदास बाबाजींनी यादवदासांकडे पाहिले.

यादवदासाने चण्डीदासाचा सारा वृत्तांत सांगितला. अनन्तदास बाबाजी हसून म्हणाले–हो. संसार यालाच म्हणतात! जे संसारास ओळखतात, ते बुद्धिमान आहेत आणि जे संसारचक्रात पडतात, त्यांची स्थिती बरीच शोचनीय असते.

चण्डीदासाचे मन क्रमशः निर्मळ होत होते. नित्य सुकृत केल्याने अवश्य कल्याण होते. वैष्णवांचा सत्कार, वैष्णव ग्रंथांचे पठण आणि श्रवण याद्वारे नित्य-सुकृताने चित्त निर्मळ होऊन अनन्य भक्तीत सहजच श्रद्धा होते.

चण्डीदास श्री अनन्तदास बाबाजींच्या उपदेशांना ऐकून अत्यंत कातर शब्दांत म्हणू लागले–मी आपल्याकडे ही प्रार्थना करतो की मला हे स्पष्ट करून सांगावे की संसार म्हणजे काय?

अनन्तदास बाबाजी म्हणाले–प्रश्न गंभीर आहे. माझी इच्छा ही आहे की या प्रश्नाचे उत्तर एकतर परमहंस बाबाजींनी द्यावे किंवा वैष्णवदास बाबाजींनी.

परमहंसदास बाबाजी म्हणाले–प्रश्न जसा गंभीर आहे, अनन्तदास बाबाजी खरोखर योग्य उत्तरदाता आहेत. आज आपण सर्व त्यांचा उपदेश ऐकूया.

अनन्तदास–जर आपली आज्ञा असेल, तर मी जे काही जाणतो, ते अवश्य सांगेन. सर्वप्रथम मी भगवत् पार्षद-प्रवर श्रीप्रद्युम्न ब्रह्मचारी–श्री गुरुदेवांच्या चरणकमळांचे स्मरण करतो.

जिवाच्या दोन दशा असतात–मुक्त दशा आणि संसारबद्ध दशा. ते जीव, जे भगवान कृष्णाचे शुद्ध भक्त आहेत तथा जे कधीही मायेद्वारे बद्ध होत नाहीत अथवा मायेद्वारे बद्ध झाल्यावरही कृष्णाच्या कृपेने या मायिक जगातून मुक्त झालेले आहेत, त्यांना मुक्त जीव म्हटले जाते. अशा मुक्त जिवांच्या अवस्थेस मुक्त दशा म्हटले जाते. दुसरीकडे, जे जीव भगवान कृष्णापासून विमुख होऊन अनादी काळापासून मायेने ग्रासले आहेत, त्यांना बद्धजीव म्हणतात आणि अशा बद्धजिवांच्या अवस्थेस संसारबद्ध-दशा म्हणतात. मायामुक्त जीव चिन्मय असतात आणि कृष्णाची सेवा (कृष्णदास्य) हेच त्यांच्या जीवनाचे उद्दिष्ट असते, हेच त्यांचे जीवन असते. ते जड-जगात राहत नाहीत. ते ज्या विशुद्ध चित्-जगात वास करतात त्याचे नाव आहे गोलोक, वैकुण्ठ, वृन्दावन इत्यादी. मायामुक्त जिवांची संख्या अनंत आहे.

मायाबद्ध जिवांची संख्यासुद्धा अनंत आहे. कृष्ण विमुखता हाच जिवांचा दोष आहे. या दोषामुळेच कृष्णाची छाया-शक्ती जिला 'माया' म्हणतात, जिवाला आपल्या सत्, रज आणि तम् या त्रिगुणात्मक रज्जूंनी (दोऱ्यांनी) आबद्ध करते. गुणांच्या तारतम्याने बद्ध जिवांच्या अवस्था मोठ्या विचित्र दिसतात. शरीराची विचित्रता, भावाची विचित्रता, रूपाची विचित्रता, स्वभावाची विचित्रता, स्थानाची विचित्रता आणि गतीची विचित्रता यावर विचार करावा. जिवाने संसारात प्रवेश करून एका नव्या 'अहं'भावाचा आश्रय घेतला आहे. शुद्धावस्थेत जिवाचे "मी

कृष्णदास आहे"–असा 'अहं'भाव होता. परंतु बद्धावस्थेत–मी मनुष्य आहे, मी देवता आहे, मी पशू आहे, मी राजा आहे, मी ब्राह्मण आहे, मी चांडाळ आहे, मी रोगी आहे, मी भुकेला आहे, मी अपमानित आहे, मी दाता आहे, मी पती आहे, मी स्त्री आहे, मी पिता आहे, मी पुत्र आहे, मी शत्रू आहे, मी पंडित आहे, मी रूपवान आहे, मी धनी आहे, मी दरिद्री आहे, मी सुखी आहे, मी दुःखी आहे, मी वीर आहे, मी दुर्बल आहे–असे नाना प्रकारचे 'अहं'भाव निर्माण होतात. याचे नाव 'अहंता' आहे. या अहंतेच्या अतिरिक्त ममता नामक एक दुसरी वस्तूसुद्धा बद्ध जिवात प्रवेश करते जसे–माझे घर, माझी वस्तू, माझे धन, माझे शरीर, माझी मुले, माझी पत्नी, माझा पती, माझी माता, माझा वर्ण, माझी जाती, माझे बळ, माझे रूप, माझे गुण, माझी विद्या, माझे वैराग्य, माझे ज्ञान, माझे विज्ञान, माझे कर्म, माझी संपत्ती, माझे सेवक इत्यादींना 'ममता' म्हणतात. 'मी' आणि 'माझे' यांना घेऊन जो प्रकांड व्यापार बघितला जातो, त्याचेच नाव 'संसार' आहे.

यादवदास–आपण बद्धदशेत 'मी' आणि 'माझे' असे पाहातो. काय मुक्त अवस्थेत 'मी' आणि 'माझे' राहात नाही?

अनन्तदास–राहते. परंतु मुक्त अवस्थेत 'मी' आणि 'माझे' चिन्मय आणि निर्दोष असते. भगवंताने जिवाचे जसे स्वरूप बनविले आहे, त्याचा शुद्ध परिचय मुक्तावस्थेतच योग्य प्रकारे प्राप्त होतो. तेथेही 'मी' अनेक प्रकारचा असतो. तेथे चित्-रस सुद्धा अनेक प्रकारचा असतो. रसाचे जितके चिन्मय उपकरण असतात–तितके सगळे 'माझे' आहेत.

यादवदास–तेव्हा बद्धावस्थेतच अनेक प्रकारचे 'मी' आणि 'माझे' आहेत तर त्यात दोष का असावा?

अनन्तदास–दोष हा आहे की शुद्ध अवस्थेत 'मी' आणि 'माझे' हेच सत्य आहे आणि संसारात जितक्या प्रकारचे 'मी' आणि 'माझे' आहेत–सगळेच कल्पित आहेत, आरोपित आहे. अर्थात जिवासंबंधी हे सत्य नाही, परंतु मिथ्या आहे अथवा याला अशा प्रकारेही सांगू शकतो की जिवाकरिता हे सगळे परिचय अगदीच मिथ्या (खोटे) आहेत. म्हणून संसारातील (जगातील) समस्त परिचयच अनित्य, प्राकृत आणि क्षणिक सुख-दुःखप्रद आहेत.

यादवदास–मायिक संसार मिथ्या आहे का?

अनन्तदास–मायिक जगत मिथ्या नाही, उलट कृष्णाच्या इच्छेने हे जग सत्य आहे. परंतु या मायिक जगात प्रवेश करून जीव ज्यांना 'मी' आणि 'माझे' मानतो, ते सगळे मिथ्या आहेत. जे लोक जगास मिथ्या मानतात ते मायावादी आहेत. असे व्यक्ती अपराधी आहेत.

यादवदास–आपण या मिथ्या-संबंधात का पडलेले आहोत?

अनन्तदास–भगवान पूर्ण चित्-वस्तू आहेत आणि जीव चित्-कण आहे. जड-जगत आणि चित्-जगत–या दोन्हींमधल्या सीमेवर जिवाचे प्रथम अवस्थान आहे. जे जीव येथे कृष्णासोबत आपला संबंध विसरले नाहीत, ते चित्-शक्तीचे बळ प्राप्त करून चित्-जगाच्या प्रती आकृष्ट झाले अर्थात नित्य पार्षद होऊन कृष्णसेवानंदाचा भोग करू लागले आणि जे जीव कृष्णविमुख होऊन मायेचा भोग करण्याची कामना करू लागले, मायेने आपल्या शक्तीने त्यांना आपल्याकडे आकृष्ट केले. त्याचवेळी आपल्याला ही संसारदशा प्राप्त झाली आहे. संसार-दशा प्राप्त झाल्याबरोबरच जिवाचा सत्य परिचय अंतर्हित होऊन जातो. "मी मायेचा भोक्ता आहे", हा मिथ्या अभिमान जिवास विचित्र रूपाने आच्छादित करून टाकतो.

यादवदास–प्रयत्न केल्यावरही आपले सत्यस्वरूप का प्रकाशित होत नाही?

अनन्तदास–प्रयत्न दोन प्रकारचे असतात–उपयुक्त आणि अनुपयुक्त . उपयुक्त प्रयत्न केल्याने मिथ्या अभिमान अवश्य दूर होतो. अनुपयुक्त प्रयत्नाद्वारे तसे फळ कसे प्राप्त होऊ शकते?

यादवदास–अनुपयुक्त प्रयत्न कशास म्हणतात?

अनन्तदास–कर्मकांडाने चित्त शुद्ध करून मग ब्रह्मज्ञानाचा अवलंब करून "मायेतून मुक्त होऊन जाईन"–अशा प्रयत्नाचे नाव अनुपयुक्त प्रयत्न आहे. अष्टांगयोगाद्वारे समाधियोगात चिन्मय होऊन जाईन–हासुद्धा अनुपयुक्त प्रयत्न आहे. अशा प्रकारचे बरेचसे अनुपयुक्त प्रयत्न आहेत.

यादवदास–हे प्रयत्न अनुपयुक्त का आहेत?

अनन्तदास–अशासाठी की या प्रयत्नांनी मनोवांछित फळ प्राप्त करण्याकरिता बऱ्याचशा बाधा येतात, तथा अभिलषित (अभीष्ट) फळ प्राप्त करण्याची संभावना सुद्धा कमी होते. मुद्दा असा आहे की, ज्याच्या प्रती अपराध केल्याने आपली ही अवस्था झाली, त्याच्याच कृपेने आपली ही दशा दूर होऊ शकते, अन्यथा नाही. अनुपयुक्त प्रयत्नांनी आपण आपली शुद्ध दशा प्राप्त करू शकत नाही.

यादवदास–उपयुक्त प्रयत्न काय आहे?

अनन्तदास–"साधुसंग आणि प्रपत्ती अर्थात शरणागती." सत्संगाच्या संबंधात श्रीमद्भागवतात म्हटले आहे–

**अत आत्यन्तिकं क्षेमं पृच्छामो भवतोऽनघाः।**
**संसारेऽस्मिन् क्षणार्धोऽपि सत्संगः सेवधिर्नृणाम्॥**

(श्रीमद्भा. ११/२/३०)

अर्थात हे निष्पाप महात्मगण! आम्ही आपल्याकडे जिज्ञासा करतो की परम कल्याण काय आहे? या संसारात अर्ध्या क्षणाचा सत्संगसुद्धा मनुष्याकरिता परम निधी आहे.

जर विचारले की–या संसार-दशेत पडलेल्या जीवांचे परम कल्याण कसे काय होऊ शकते, तर मी म्हणेन–अर्ध्या क्षणाच्या सत्संगाद्वारेच परम कल्याण प्राप्त करता येते.

शरणागतीच्या संबंधी गीतेच्या सातव्या अध्यायात म्हटले आहे–

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दूरत्यया।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥**[१]

चण्डीदास–महात्मन्! मी आपल्या गोष्टींना नीट समजू शकलो नाही. मी तर केवळ इतकेच समजू शकलो की आपण पवित्र वस्तू होतो, पण कृष्णाला विसरून

(१) या त्रिगुणमयी माझ्या दैवीमायेतून मनुष्य आपल्या प्रयत्नांनी उत्तीर्ण होऊ शकत नाही. म्हणून मायेतून पार होणे कठीण आहे. जे एकमात्र मलाच शरण येतात, ते माझ्या मायेतून तरून जातात.

आपण मायेच्या हाती सापडलो आहोत आणि मायेद्वारेच या जगात बांधले गेलो आहोत. कृष्णाची कृपा झाल्याने आपला परत उद्धार होऊ शकतो, अन्यथा अशाच अवस्थेत भटकत रहावे लागते.

अनन्तदास–हो, तुम्ही सध्या याच गोष्टींवर विश्वास ठेवा. यादवदास या गोष्टींना व्यवस्थित जाणतात. त्यांच्याकडून हळू-हळू या गोष्टी समजून घ्या. श्रीजगदानन्दांनी ‘प्रेम-विवर्त्त’ या ग्रंथात जिवांच्या विभिन्न अवस्थांचे खूपच सुंदर चित्र अंकित केले आहे–

**चित्कण–जीव, कृष्ण–चिन्मय भास्कर।**
**नित्य कृष्णे देखि–कृष्णे करेन आदर॥**

**कृष्ण–बहिर्मुख हञा भोगवाञ्छा करे।**
**निकटस्थ माया तारे जापटिया धरे॥**

**पिशाची पाइले येन मतिच्छन्न हय।**
**मायाग्रस्त जीवेर हय से-भाव उदय॥**

**‘आमि सिद्ध कृष्णदास’ एई कथा भुले।**
**मायार नफर हञा चिरदिन बुले॥**

**कभु राजा, कभु प्रजा, कभु विप्र, शूद्र।**
**कभु दुखी, कभु सुखी, कभु कीट क्षुद्र॥**

**कभु स्वर्गे, कभु मर्त्ये, नरके वा कभु।**
**कभु देव, कभु दैत्य, कभु दास, प्रभु॥**

**एइ रूपे संसार भ्रमिते कौन जन।**
**साधुसङ्गे निज तत्त्व अवगत हन॥**

**निज-तत्त्व जानि आर संसार ना चाय।**
**केन वा भजिनु माया करे हाय हाय॥**

**केंदे बले, ‘ओहे कृष्ण, आमि तब दास।**
**तोमार चरण छाडि हैल सर्वनाश’॥**

**काकुति करिया कृष्णे डाके एक बार।**
**कृपा करि कृष्ण तारे छाडान संसार॥**

**मायाके पिछने राखि कृष्ण-पाने चाय।**
**भजिते भजिते कृष्ण-पादपद्म पाय॥**

**कृष्ण तारे देन निज चिच्छक्तिर बल।**
**माया आकर्षण छाडे हइया दुर्बल॥**

**'साधुसङ्गे कृष्णनाम' एइ मात्र चाइ।**
**संसार जिनिते आर कोन वस्तू नाइ॥**

भावार्थ असा आहे की पदार्थ दोन प्रकारचे असतात–चेतन आणि जड. ज्या पदार्थांमध्ये इच्छा आणि अनुभव-शक्ती असते, ते चेतन पदार्थ आहेत. ज्यांच्यात या दोघांचाही अभाव असतो, ते जड पदार्थ आहेत. चेतन पदार्थही दोन प्रकारचे आहेत–(१) पूर्ण वा विराट चेतन आणि (२) क्षुद्र चेतन. भगवान पूर्ण अथवा विराट चेतन आहेत आणि हे भगवान आहेत स्वयं कृष्ण–"कृष्णस्तु भगवान् स्वयम्". जीव–क्षुद्र चेतन आहे. हे भगवंताचे विभिन्नांश तत्त्व आणि असंख्य आहेत–"स चानन्ताय कल्पते" (श्वेताश्वतर) शास्त्रांमध्ये श्रीकृष्ण आणि जिवांचा पारस्पारिक संबंध सांगण्याकरिता सूर्य आणि त्यांच्या किरणांमध्ये चमकणाऱ्या क्षुद्र कणांच्या परस्पर संबंधाचे उदाहरण दिले जाते. भगवान श्रीकृष्णास चिन्मय सूर्य आणि जीवांना चित्कण म्हटले गेले आहे. चित्कण-जिवाचा धर्म वा स्वभावच कृष्णाची सेवा करणे आहे. त्यांचा हा धर्म त्यांच्या उत्पत्तीबरोबरच त्यांच्यासोबत असतो–अगदी आगीतील दाहिका शक्तिसमान. जसे दाहिका-शक्तीशिवाय आगीची सत्ता स्वीकारली जाऊ शकत नाही, तसेच कृष्ण-सेवेरहित जीवांचे जीवत्व नसते. वस्तूस सोडून धर्म आणि धर्मास सोडून वस्तूचे कुठलेच वेगळे अस्तित्व असू शकत नाही. अशाने तर वस्तू आणि धर्म विकृत होऊन जातील. हो, तर जिवाचा धर्म कृष्णसेवा करणे आहे, परंतु स्वतन्त्र असल्याने जेव्हा तो कृष्णसेवेपासून विमुख होऊन नाना प्रकारच्या भोगांची कामना करू लागतो, त्याचवेळी भगवंताची बहिरंगा-शक्ती माया–जी निकटच असते, ती जिवास जखडून आपल्या जाळ्यात आबद्ध करते. जसे पिशाचीद्वारे जखडल्यानंतर मनुष्याची बुद्धी आच्छादित होऊन जाते, त्याचप्रकारे कृष्णविमुख जिवाचा धर्म मायेद्वारे आच्छादित होऊन जातो. आता तो आपले व

भगवंताचे स्वरूप विसरून जातो तथा मायेचा दास होऊन मायिक संसारात यत्र-तत्र भटकत राहतो. तो कधी राजा असतो, कधी प्रजा, कधी विप्र, कधी शूद्र, कधी सुखी, कधी दुःखी आणि कधी स्वर्गलोकी जातो तर कधी मर्त्यलोकी. अशा प्रकारे संसारात भटकता-भटकता जर सौभाग्यवश एखाद्या साधू-पुरुषाशी भेट घडली, तर त्याचे जीवन कृतार्थ होऊन जाते. त्यांच्या सत्संगाने तो आपले सत्य स्वरूप जाणून संसारातून विरक्त होऊन जातो. त्यास आपल्या वर्तमान अवस्थेवर बराच खेद होतो. तो रडत-रडत भगवंताच्या चरणी प्रार्थना करतो–"हे कृष्ण! मी आपला नित्य-दास आहे! परंतु आपली सेवा विसरून मी अभागी न जाणो कितीतरी दिवसांपासून मायेची सेवा करीत-करीत भटकतो आहे. हे पतितपावन! दीनानाथ! या दीनाचे रक्षण करा. मला आपल्या मायेतून उद्धारून आपल्या सेवेत नियुक्त करा." करुणावरुणालय (करुणेचे सागर) भगवान त्याची करुण हाक ऐकून त्यास शीघ्रच आपल्या दुसऱ्या मायेतून मुक्त करवितात. ते त्यास आपल्या चित्-शक्तीचे बळ प्रदान करतात, ज्यामुळे जिवाप्रती मायेचे आकर्षण हळू-हळू क्षीण होत जाते; आणि तो मायेस मागे सारून कृष्णाकडे अग्रेसर होत-होत शेवटी त्यांच्या चरणकमलांना प्राप्त करण्यास समर्थ होतो. अशा प्रकारे सत्संगात घेतले गेलेले 'श्रीकृष्णनाम' या दुरंत (अपरिमित, खतरनाक आणि अजेय) संसारास पार करण्याकरिता एकमात्र अचूक उपाय आहे.

यादवदास–बाबाजी! आपण ज्या साधु-संगाविषयी बोलता आहात, ते साधुसुद्धा याच संसारात राहतात आणि नाना प्रकारच्या सांसारिक पीडांनी जर्जरित आहेत. मग ते इतर जिवांचा उद्धार कसा काय करू शकतात?

अनन्तदास–साधुदेखील याच जगात राहतात, हे सत्य आहे, परंतु साधू आणि मायाबद्ध जिवांच्या संसारात खूप अंतर आहे. दोघांचेही संसार बाहेरून एकसमान जरी प्रतीत होतात, तरीही आतून मात्र बरेच अंतर आहे. साधू सर्वदा या जगात राहतात, परंतु असाधू व्यक्ती त्यांना ओळखू शकत नाहीत. म्हणूनच सत्संग दुर्लभ आहे. मायेच्या जंजाळात फसलेले मनुष्यसुद्धा दोन भागांत विभक्त आहेत. काही लोक संसाराच्या तुच्छ भोगांमध्ये लिप्त राहून संसाराचा खूप आदर करतात; आणि काही लोक संसारातल्या तुच्छ सुखांनी तृप्त न होऊन अधिकाधिक सुखाकरिता विवेकाचा आश्रय घेतात. एक विवेकरहित आहे आणि दुसरा विवेकयुक्त. काही लोक एकास विषयी आणि दुसऱ्यास मुमुक्षू सुद्धा म्हणतात. येथे 'मुमुक्षू' शब्दाचा अर्थ–

निर्भेद ब्रह्मज्ञानी असा समजू नये. जे संसाराच्या दुःखांना कंटाळून आत्म-तत्त्वाचे अनुसंधान (शोध) करतात, त्यांना शास्त्रांमध्ये 'मुमुक्षू' म्हटले गेले आहे. 'मुमुक्षा' शब्दाचा अर्थ 'मुक्तीची इच्छा' असा आहे. जेव्हा मुमुक्षू मुमुक्षेचा त्याग करून भगवद्भजन करतो, तेव्हा त्याच्या भजनास शुद्धभक्ती म्हणतात. शास्त्रांमध्ये मुक्तीस त्याग करण्याचे विधान नाही. कृष्णतत्त्व आणि जीवतत्त्वाचे ज्ञान झाल्यावर मुक्ती होते. श्रीमद्भागवतात म्हटले गेले आहे–

**रजोभिः समसंख्याताः पार्थिवैरिह जन्तवः।**
**तेषां ये केचनेहन्ते श्रेयो वै मनुजादयः॥**

**प्रायो ममुक्षवस्तेषां केचनैव द्विजोत्तम।**
**मुमुक्षूणां सहस्रेषु कश्चिन्मुच्येत सिध्यति॥**

**मुक्तानामपि सिद्धानां नारायण–परायणः।**
**सुदुर्लभः प्रशान्तात्मा कोटिष्वपि महामुने॥**

(श्रीमद्भा. ६/१४/३-५)

अर्थात, या जगातील प्राणी पृथ्वीच्या धुळी कणांसमानच असंख्य आहेत. त्यापैकी काही मनुष्य आदी श्रेष्ठ जीवच आपल्या कल्याणाची प्रयत्न करतात. त्यातूनही संसारातून मुक्ती मागणारे तर विरळेच असतात आणि मोक्ष मागणाऱ्या हजारांतून मुक्ती वा सिद्धी लाभ करणारा कुणीतरी एखादाच असतो. करोडो सिद्ध आणि मुक्त पुरुषांमध्येही तशा शांतचित्त महापुरुषाचे भेटणे तर कठीण आहे–जो एकमात्र भगवंताचाच परायण आहे. अशा सुदुर्लभ नारायणाच्या भक्तांमध्येसुद्धा कृष्णभक्त अतीव दुर्लभ आहेत. कृष्णभक्त त्यांच्यातील असतात जे मुमुक्षेचा परित्याग करून मुक्त झालेले आहेत. शरीर असेपर्यंत कृष्णभक्त संसारात राहतात खरे, परंतु त्यांचा संसार विषयी लोकांच्या संसारापेक्षा सर्वथा वेगळा असतो. कृष्णभक्तांची स्थिती दोन प्रकारची असते.

यादवदास–आपण विवेकी मनुष्यांच्या चार अवस्था सांगितल्या आहेत; यातील कोणकोणत्या अवस्थांमध्ये स्थित मनुष्यांच्या संगास साधुसंग म्हणतात?

अनन्तदास–विवेकी, मुमुक्षू, मुक्त आणि भक्त–या विवेकाच्या चार अवस्था आहेत. यात विषयी लोकांकरिता विवेकी आणि मुमुक्षूंचा संग करणे लाभदायक

असते. मुक्त मनुष्यांचे दोन विभाग आहेत–(१) चित्-रसाप्रती आग्रह ठेवणारे मुक्त आणि (२) निर्भेद मायावादी मुक्ताभिमानी. यांत प्रथम प्रकारच्या मुक्तांचाच संग करणे योग्य आहे. निर्भेद मायावादी (स्वतःस मुक्त कल्पना करणारे) अपराधी आहेत, म्हणूनच त्यांचा संग करणे सगळयांकरताच अनुचित आहे. श्रीमद्भागवतात अशा मुक्ताभिमानींना अत्यंत तुच्छ मानले गेले आहे.

**येऽन्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिन-**
**स्त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धयः।**
**आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः**
**पतन्त्यधोऽ नादृत-युष्मदङ्घ्रयः॥**(२)

चौथे, भगवद्भक्त दोन प्रकारचे असतात–ऐश्वर्यभावयुक्त आणि माधुर्यभावयुक्त. अशा प्रकारे तर सर्व भगवद्भक्तांच्या संगाने कल्याणच कल्याण आहे; पण विशेषकरून मधुरसाच्या भगवद्भक्तांच्या संगाने हृदयात विशुद्ध भक्तिरसाचा अविर्भाव होतो.

यादवदास–आपण भक्तीच्या दोन प्रकारच्या अवस्था सांगितल्या आहेत. कृपया त्या स्पष्ट करून सांगाव्यात; जेणेकरून माझ्यासारख्या मूढमती मनुष्यासही ते सहजच समजेल.

अनन्तदास–अवस्थितीनुसार भक्त दोन प्रकारचे असतात–गृहस्थभक्त आणि त्यागीभक्त.

यादवदास–गृहस्थभक्तांचा संसाराशी काय संबंध असतो?

अनन्तदास–केवळ गृह निर्माण करून त्यात राहिल्यानेच गृहस्थ बनता येत नाही, तर उपयुक्त पात्रांबरोबर विधिवत विवाह करून घरात राहाणारे 'गृहस्थ' मानले जातात. अशा गृहस्थांमध्ये जे भक्तीचे आचरण करतात, त्यांना 'गृहस्थ भक्त' म्हटले

---

(२) हे कमलनयन! जे लोक आपल्या चरणकमलांचा आश्रय घेत नाहीत आणि आपल्याप्रती भक्तीभावरहित असल्याने त्यांची बुद्धीही शुद्ध नाही ते स्वतःस खोटे–खोटेच मुक्त मानतात. वास्तविक तर ते बद्धच आहेत. ते जर मोठी तपस्या आणि साधनेचे कष्ट घेऊन कल्पित परमपद प्राप्त करीत जरी असले, तरी आपल्या चरणकमलांचा अनादर केल्याने तेथून पतन पावतात.

जाते. मायाबद्ध जीव डोळ्यांनी रंग-रूप पाहतात, कानांनी ऐकतात, नाकाने वास घेतात, त्वचेने स्पर्श करतात, तथा जिभेने रसास्वादन करतात. याच पाच ज्ञानेंद्रियांद्वारे ते जड-जगात प्रविष्ट होऊन विषयांत आसक्त होतात. ते विषयांप्रती जितके जास्त आसक्त होतात, प्राणनाथ श्रीकृष्णापासून तितकेच दूर जातात. यालाच 'बहिर्मुख संसार' म्हणतात. जे लोक याप्रमाणे संसारात लिप्त राहतात, त्यांना विषयी म्हणतात.

गृहस्थभक्त विषयी लोकांप्रमाणे विषयांमध्ये केवळ सुखाचाच शोध घेत नाहीत. त्यांची सहधर्मिणी कृष्णाची सेविका असते, पुत्र आणि कन्या कृष्णाचे परिचारक आणि परिचारिका असतात. त्यांचे डोळे श्रीकृष्णाच्या श्रीमूर्ती आणि तदीय वस्तूंचे दर्शन करून तृप्त होतात, त्यांचे कान हरिकथा आणि संत चरित्रांचे श्रवण करतात, त्यांचे नाक श्रीकृष्णाच्या चरणी समर्पित तुळशी आणि सुगंधित द्रव्यांचा वास घेते, त्यांची जीभ निरंतर कृष्णनाम-सुधा आणि कृष्ण-नैवैद्याचे आस्वादन करते, त्यांची त्वचा भक्तांच्या अंग-स्पर्शाचे सुख अनुभव घेते. त्यांची आशा, क्रिया, कामना, अतिथि-सेवा आणि देवसेवा–सर्व काही कृष्णसेवेच्या अधीन असते. त्यांचे जीवन 'जीवांवर दया', 'कृष्णनाम' आणि 'वैष्णव-सेवेकरिता' असते. अनासक्त होऊन विषयांचा भोग करणे केवळ गृहस्थभक्तांद्वारेच संभव आहे. कलियुगात गृहस्थ-वैष्णव असणेच योग्य आहे; कारण यामुळे पतनाची भीती नसते.[३] भगवद्भक्तीची

(३) "कलियुगात ... भीती नसते." याचे तात्पर्य असे की अपतित होऊन विष्णू आणि वैष्णवांची सेवा करणे मनुष्यमात्राचे कर्तव्य आहे, परंतु सर्वांनाच गृहस्थ व्हावे लागेल तथा कलिकाळी गृहस्थाश्रमाव्यतिरिक्त दुसरे आश्रम ग्रहणीय नाहीत–असा उपदेश देणे हा ग्रंथकाराचा उद्देश नाही. कारण जे अतिशय राजसिक आणि तामसिक प्रवृत्तीचे आहेत, जे विषय भोगांत अत्यंत आसक्त असतात आणि ज्यांची प्रवृत्ती मार्गात रुची असते, ते या विषयांच्या निवृत्तीकरिताच विवाहादीद्वारे गृहस्थ धर्मांचे पालन करतील. परंतु सात्त्विक स्वभावामुळे अशा व्यक्ती ज्या निवृत्ती-पथाचे पथिक आहेत–त्यांनी विवाहादी करून पतित होता कामा नये.

आश्रमाविषयी पद्मपुराणाच्या पाताळ खंडाच्या ५३/५४ व्या श्लोकांमध्ये म्हटले आहे की–"वर्णाश्रमाचारवता पुरुषेण परः पुमान्। विष्णुराराध्यते पन्था नान्यत् तत्तोष-कारणम्॥" अर्थात वर्णाश्रमधर्मांचे पालन केल्यानेच विष्णूची पूजा होते आणि यानेच ते संतुष्ट राहतात. येथे या श्लोकात 'आश्रम-धर्म' या शब्दाने केवळमात्र गृहस्थाश्रमाचाच बोध होत नाही, उलट त्याने चारही आश्रमांस लक्ष्य केले आहे. श्रीमद्भागवतात आश्रमासंबंधी अशा प्रकारे म्हटले गेले

समृद्धीदेखील यातच योग्यप्रकारे होऊ शकते. गृहस्थ वैष्णवांमध्ये अनेक तत्त्वज्ञ पुरुष (गुरू) देखील आहेत. गोस्वामींची अपत्ये जर शुद्ध वैष्णव असतील तर ती देखील गृहस्थ भक्तांतर्गत आहेत. म्हणून त्यांचा संग मनुष्यांकरिता खूपच लाभदायक आहे.

यादवदास–गृहस्थ वैष्णवांस स्मार्त समाजाच्या अधीन रहावे लागते, जर अधीन राहिले नाही तर समाजात त्यांना बरेच कष्ट सोसावे लागतात, अशा अवस्थेत शुद्ध भक्तीचे पालन कसे काय केले जाऊ शकते?

---

आहे–"गृहाश्रमो जघन्तो ब्रह्मचर्यं हृदो मम। वक्षस्थलाद्वने वासः संन्यासः शिरसि स्थितः॥"

अर्थात विराट पुरुष भगवंताच्या जांघेतून (उरुस्थल) गृहस्थाश्रम, हृदयातून ब्रह्मचर्याश्रम, वक्षःस्थलातून वानप्रस्थाश्रम आणि मस्तकातून संन्यासाश्रमाची उत्पत्ती झाली आहे. हेच चार शास्त्रीय आश्रम आहेत. आपल्या योग्यतेनुसार त्यातील कुठल्याही एका आश्रमाच्या अधीन राहून विष्णूची पूजा करणेच वैष्णवतेचे लक्षण आहे. आजकाल याच्या प्रत्यक्ष दृष्टांतांचा अभाव नाही. इतकेच काय तर याच ग्रंथात–प्रेमदास, वैष्णवदास, अनन्तदास आदी उपदेशक पात्र–सर्व गृहत्यागी वा संन्यासी अथवा ब्रह्मचारी आहेत. दुसरी गोष्ट अशी आहे की ग्रंथकर्ता भक्तिविनोद ठाकूर यांचे अनुसरण करणारे सगळेच भक्त गृहस्थ नाहीत, त्यांतील काही ब्रह्मचारी आहेत आणि गृहत्यागी सर्वश्रेष्ठ जगद्गुरू संन्यासी सुद्धा आहेत. या पुस्तकाच्या तिसऱ्या अध्यायात संन्यासास सर्वश्रेष्ठ आश्रम मानले गेले आहे. सर्वशास्त्र शिरोमणी श्रीमद्भागवताचाही हाच सिद्धांत आहे–"वर्णानामाश्रमाणाञ्च जन्मभूम्यनुसारिणीः। आसन् प्रकृतयो नृणां नीचैर्नीचोत्तमोत्तमः॥" [जैवधर्म] याचे तात्पर्य असे की हे आश्रम आपल्या जन्मस्थानानुसार उत्तम आणि मध्यम आहेत अर्थात संन्यास सर्वोत्तम आश्रम आहे तथा गृहस्थाश्रम सर्वात अधम आश्रम आहे. ब्रह्मचर्य आणि वानप्रस्थ क्रमशः मध्यम आश्रम आहेत. ही जिवांची अनित्य स्वभावभूत नैसर्गिक अवस्था आहे.

जीवांचे स्वभाव, वृत्ती आणि क्रियेनुसार वर्णाप्रमाणे आश्रमाचे देखील विभाग केलेले आहेत. नीच स्वभावाचे मनुष्य, ज्यांची रुची प्रवृत्ती मार्गाकडे असते, ते गृहस्थ होण्याकरिता बाध्य असतात. नैष्ठिक ब्रह्मचारी भगवंताचे हृदय-धन आहेत. भगवंताच्या वक्षःस्थळातून वानप्रस्थ त्यागींचा अविर्भाव होतो आणि मस्तकातून समस्त सद्गुणांचे आधार संन्यासी उत्पन्न होतात. म्हणून गृहस्थापेक्षा ब्रह्मचारी, वानप्रस्थी तथा संन्यासी तिन्ही श्रेष्ठच आहेत. जोपर्यंत निवृत्ती मार्गात रुची हृदयात निर्माण होत नाही; तोपर्यंत या तिन्ही उत्तम आश्रमांत प्रवेश करण्याचा अधिकार होत नाही. मनुसंहितेत म्हटले आहे–"प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफलाः॥" श्रीमद्भागवत सुद्धा त्याचे समर्थन करते–"लोके व्यवायमिष-मद्यसेवा नित्या हि जन्तोर्नहि तत्र चोदना। व्यवस्थितिस्तेषु विवाह-यज्ञ-सुराग्रहैरासु निवृत्तिरिष्टा॥"

अनन्तदास–पुत्र आणि कन्येचा विवाह तथा पितृगणाच्या श्राद्धाकरिता क्रिया आणि अन्यान्य बऱ्याच गोष्टींसाठी गृहस्थ वैष्णवांना समाजाशी अवश्यच संबंध ठेवावा लागतोच. परंतु जिथपर्यंत काम्यकर्मांचा प्रश्न आहे, त्यांनी काम्यकर्म करू नयेत. शरीर-यात्रा-निर्वाहाकरिता तर सगळेच पराधीन असतात. जे स्वतःस निरपेक्ष म्हणवतात, ते सुद्धा पराधीन आहेत. आजारी पडल्यावर औषध-सेवन, भूक लागल्यावर खाद्यसंग्रह, थंडीपासून बचावाकरिता वस्त्र-संग्रह तथा ऊन आणि पावसापासून सुरक्षेसाठी घर-दार आदींची अपेक्षा प्रत्येक देहधाऱ्यास असते. निरपेक्ष

---

अन्यान्य अनेक शास्त्रांमध्ये निवृत्ती मार्गाची श्रेष्ठताच प्रतिपादित केली आहे. श्रीभक्तिविनोद ठाकुरांनी या पुस्तकातल्या १०व्या अध्यायाच्या शेवटी श्रीमद्भागवताच्या उपर्युक्त श्लोकाचे अवलंबन करून लिहिले आहे–

"पशुवधास प्रोत्साहित करणे शास्त्रांचे तात्पर्य नाही. 'मां हिंस्यात् सर्वाणि भूतानि'–या वेद-वाणीद्वारे पशू-हिंसेचा निषेध केलेला आहे. मनुष्याचा स्वभाव जोपर्यंत राजसिक आणि तामसिक राहतो, तोपर्यंत मैथुन, मांस आणि मद्याकडे त्यांची स्वाभाविक प्रवृत्ती असते. ते लोक तत्तत्कार्यांकरिता वेदांच्या आज्ञेची अपेक्षा करीत नाहीत. वेदांचे तात्पर्य हे आहे की मनुष्य सात्त्विक वृत्तीचा अवलंब करून जोपर्यंत प्राणी-हिंसा आणि मद्याचा परित्याग करीत नाही, तोपर्यंत या प्रवृत्तींना संकुचित करण्याकरिता तो विवाहाद्वारे स्त्रीसंग, यज्ञात पशुवध आणि विशेष-विशेष वेळी मद्यपान करू शकतो. या उपायांनी त्याची प्रवृत्ती संकुचित झाल्यावर तो क्रमशः या क्रियांतून निवृत्त होत जातो. म्हणून कलिकाळी जीवांना प्रवृत्ती मार्गातून हटवून निवृत्ती मार्गाकडे घेऊन जाण्याकरिता गृहस्थाश्रमाची आवश्यकता आहे. ग्रंथकाराच्या उक्त वाक्याचा अर्थ हा कदापि नाही की उत्तम आश्रमांच्या अधिकारी व्यक्तिंना देखील गृहस्थ होण्याची आवश्यकता आहे. भक्तिविनोद ठाकुरांनी विवाहाचे उद्देश अशाप्रकारे लिहिले आहेत–विवाहासमयी संतानाची कामना अथवा प्रजापतीची उपासना न करून केवळ अशी भावना करायला हवी की–मी एका अशा कृष्णदासीचा संग्रह करीत आहे, जी मला कृष्णसेवेत सहयोग करेल. अशी भावना भक्तीसाठी अनुकूल असते." (जैवधर्म) म्हणून संतानाची कामना न करून जे विवाह करतील, तेच सच्चे (खरे) गृहस्थ-वैष्णव होऊ शकतील. जेथे आपल्या स्त्रीप्रती कृष्णदासीची भावना होते, तेथे तिच्याप्रती भोग कामनेला संधी मिळत नाही, उलट पूज्यभाव निर्माण होतो. हो, ही गोष्ट बरोबर आहे की "पुत्रार्थे क्रियते भार्या" आदी वचनांमुळे संतान-कामनेचीही विधी पाहिली जाते. परंतु येथे पुत्राऐवजी 'कृष्णदासाच्या' अविर्भावाची कामना समजायला हवी–प्राकृत पुत्र वा संतानाची कामना नाही. कारण भगवन्नाम ग्रहण करणाऱ्या वैष्णवांना पुन्नामक नरकात जाण्याची कुठलीच संभावना राहत नाही कारण त्यांना कृष्णदासाव्यतिरिक्त पुत्राची कामना नसते.

होण्याचे तात्पर्य आपल्या आवश्यकता संकुचित करणे हेच आहे. वास्तविक शरीर असताना कुणीही निरपेक्ष असू शकत नाही. जोपर्यंत अधिकात-अधिक निरपेक्ष राहता येईल, तितकेच चांगले आणि भक्तीला पोषक आहे.

पूर्वोक्त सगळ्या कर्मांचा संबंध कृष्णासोबत जोडल्याने त्याचा दोष निघून जातो. जसे–विवाहाच्या वेळी अपत्याची कामना अथवा प्रजापतीची उपासना न करता जर केवळ अशी भावना करावी की मी एका अशा कृष्णदासीचा संग्रह करीत

साधारणतः बद्धजीव प्रवृत्ती मार्गात विचरण करताना आपल्या काम-प्रवृत्तीस चरितार्थ करण्याकरिता स्त्रीचा संभोग करतो आणि फलस्वरूप संतान उत्पन्न होतात. हेच कारण आहे की आजकाल मनुष्य कामुक होत चालले आहेत. "आत्मवत् जायते पुत्रः"–हाच साधारण न्याय आहे. श्रीठाकूर भक्तिविनोदांनी जगातल्या समस्त जिवांच्या कल्याणकामनेने विशेषकरून चण्डीदास आणि दमयन्तीसारख्या मनोवृत्तीच्या लोकांना लक्ष्य करूनच उपदेश केला आहे. गृहस्थाश्रम सर्वात अधम आश्रम आहे. वास्तवात पूर्वजन्माच्या सुकृतीच्या प्रभावाने जे महात्मागण स्वभावानेच निवृत्ती मार्गात विचरण करतात, ते कधीही विवाहाद्वारे संसारात प्रवेश करून पतित होत नाहीत. उन्नत व्यक्तींकरिता पतन होण्याचा अवसर असतो. परंतु पतितांच्या पतनाचे स्थान कोठे? ते नैष्ठिक ब्रह्मचारी आणि संन्यासी जे उपर्युक्त उपदेशांचे रहस्य समजत नाहीत, त्यांच्या शब्दांची दुहाई देत जर ब्रह्मचर्य आणि संन्यासाचा परित्याग करून अवैध भावाने आपली शिष्या, गुरु-भगिनी अथवा कुण्या दुसऱ्या स्त्रीशी विवाह करतात अथवा अशा कार्याकरिता सल्ला देतात अथवा अनुमोदन करतात, तर त्यांच्यासारखे शोचनीय, घृणित, नीच आणि पाखंडी विश्वाच्या इतिहासात विरळेच मिळतील. दुसरीकडे श्रीमद्भागवत, हरिवंश आणि चैतन्यभागवत आदी शास्त्रांमध्ये वर्णित श्रृगाल वासुदेवासारख्या अनधिकारी व्यक्तीकरिता ब्रह्मचारी वा त्यागी किंवा संन्यासाचा वेष धारण करून–त्यांच्या आचरणाचे अनुकरण करून स्वतःस त्या आश्रमस्थ महापुरुषांसमान समजणे अत्यंत घृणास्पद आहे. म्हणून अशा निम्नस्तरीय प्रवृत्तमार्गाच्या लोकांना आधीच विवाहादीद्वारे वैधभावाने आपल्या शोचनीय काम प्रवृत्तीचे दमन करणेच श्रेयस्कर आहे. कारण जीवमात्रास निवृत्तिमार्गी घेऊन जाणेच शास्त्रांचा एकमात्र उद्देश आहे. कुणी कुणी ब्रह्मवैवर्त्तपुराणाच्या कृष्ण खण्डाच्या 'अश्वमेधं गवालंभं संन्यासं पलपैतृकम्। देवरेण सुतोत्पत्ति कलौ पञ्च विवर्जयेत्।' श्लोकाच्या आधारे हे सांगू पाहतात की कलियुगात संन्यास ग्रहण करणे वर्जित आहे. परंतु या श्लोकाचे एक गूढ रहस्य आहे. याद्वारे सर्व संन्यासांचा निषेध केला जात नाही, कारण समस्त शास्त्रांचे ज्ञाता श्रीरामानुज, श्रीमध्व, श्रीविष्णुस्वामी आदी आचार्यगण आणि आचार्यकुल मुकुटमणी गौरभक्त सहा गोस्वामी हे सर्वच त्यागी अथवा संन्यासी होते तथा कलिकाळातच झाले आहेत. आजदेखील संन्यासाची शुद्धधारा पूर्ववत चालत आलेली

आहे जी मला कृष्णसेवेत सहयोग देऊ शकेल, तेव्हा अशी भावना भक्तिनुकूल असते. विषयांत आसक्त आत्मीय अथवा आपला पुरोहित आदी काहीही म्हणोत, मनुष्यांस आपल्याच संकल्पांची फळे मिळतात. पितृ-श्राद्धाच्या दिवशी श्रीकृष्णास भोग लावलेल्या प्रसादाच्या पिंडाने पितृगणाचे श्राद्ध करणे आणि ब्राह्मण-वैष्णवांना भोजन करविणे गृहस्थ वैष्णवांकरिता भक्तिनुकूल असते. समस्त स्मार्त क्रियांना भक्तिमिश्रित केल्याने कर्माचे कर्मत्व निघून जाते. शुद्धभक्तीसोबत वैधकर्म केल्याने ते भक्ति-प्रतिकूल होत नाही. व्यावहारिक क्रियांना अनासक्त आणि विरक्त भावनेने करावयास हवे. पारमार्थिक क्रियांना भक्तांसोबत करावयास हवे. असे केल्याने कोणताच दोष लागत नाही. पहा, श्रीमन् महाप्रभूंचे अधिकांश पार्षद् गृहस्थ भक्तच होते. बरेचसे प्राचीन भक्त राजर्षी आणि देवर्षी होते. धृव, प्रल्हाद आणि पाण्डव आदी गृहस्थ भक्तच होते. गृहस्थ भक्तांनादेखील जगात पूजनीय समजावे.

यादवदास–जर गृहस्थ भक्त इतके पूज्य आणि प्रिय आहेत, तर काही-काही भक्त गृहत्याग का करतात?

अनन्तदास–गृहस्थ भक्तांमध्येच काही गृहत्यागी वैष्णव होण्याचे अधिकारी असतात. जगात त्यांची संख्या खूप कमी आहे. अशा त्यागी भक्तांचा संग दुर्लभ असतो.

यादवदास–कृपया हे सांगा की गृहत्यागी होण्याचा अधिकार कसा प्राप्त होतो?

अनन्तदास–मनुष्यात दोन प्रकारच्या प्रवृत्ती असतात–पहिली बहिर्मुख-प्रवृत्ती आणि दुसरी अंतर्मुख-प्रवृत्ती. वैदिक भाषांमध्ये यांना पराक् आणि प्रत्याक्

---

आहे. त्याचे तात्पर्य असे की–आचार्य शंकरद्वारे प्रवर्तित 'सोऽहं', 'ब्रह्मास्मि' आदी अवैध चिंतन-प्रसूत 'एकदंड-संन्यास' घेणे अनुचित आहे. म्हणून त्याचाच निषेध केलेला आहे. त्रिदण्ड संन्यासच प्रकृत सनातन संन्यास आहे. हा कधीही ग्रहण केला जाऊ शकतो. काही-काही ठिकाणी त्रिदण्ड संन्यासास बाह्यतः एकदंडाच्या रूपातही पाहिले जाते. या श्रेणीचे एकदंडी यति-महाजन सेव्य, सेवक आणि सेवेचे प्रतीक-त्रिदण्ड संन्यासाची नित्यता स्वीकार करून शंकराद्वारे प्रवर्तित एकदंड संन्यासास संपूर्ण अवैध मानतात. म्हणून स्मार्त आचार्याद्वारे संगृहित उक्त श्लोकाच्या आधारे देखील निवृत्तीमार्गीय साधकांनी संन्यास ग्रहण करणेच युक्तियुक्त प्रमाणित होते.

प्रवृत्ती म्हणतात. शुद्ध चिन्मय आत्मा आपल्या स्वरूपास विसरून लिंगदेहाच्या अंतर्गत मनासच आत्मा मानतो. मन इंद्रियांद्वारे बाह्य विषयांकडे धावते, याचेच नाव 'बहिर्मुख-प्रवृत्ती' आहे. जेव्हा प्रवृत्तीची गती जड विषयांतून पलटून मनाकडे आणि मनातून आत्म्याकडे प्रवाहित होऊ लागते, तेव्हा तिला अंतर्मुख-प्रवृत्ती म्हणतात. जोपर्यंत बहिर्मुख प्रवृत्ती प्रबळ राहते, तोपर्यंत सत्संगात राहणे आणि कृष्ण-संसार स्थापन करून समस्त प्रवृत्तींना निरपराध भावाने संचालित करण्याची आवश्यकता असते. कृष्णभक्तीचा आश्रय केल्याने बहिर्मुख-प्रवृत्ती क्रमशः संकुचित होऊन अंतर्मुख होत जाते. जेव्हा प्रवृत्ती संपूर्णपणे अंतर्मुख होते, तेव्हा गृहत्याग करण्याचा अधिकार प्राप्त होतो. अशी अवस्था प्राप्त होण्याआधीच जर गृहत्याग केला, तर पतनाची विशेष भीती असते. गृहस्थाश्रम जिवांकरिता एक पाठशाळास्वरूप आहे, जेथे जीव परमार्थ तत्त्वाची शिकवण प्राप्त करतो, आणि आत्मतत्त्वास विकसित करण्याचा सुयोग प्राप्त करतो. अध्ययन संपले की पाठशाळेचा त्याग करायला हवा.

यादवदास–गृहत्यागी भक्तांची लक्षणे कोणती?

अनन्तदास–स्त्रीसंगाची स्पृहा नसणे, प्राणिमात्रावर दयाभाव असणे, अर्थ व्यवहारास तुच्छ समजणे, केवळ जीवन-निर्वाहोपयोगी भोजन आणि वस्त्रांकरिता यत्न करणे, कृष्णाप्रती विशुद्ध प्रीती असणे, बहिर्मुख लोकांच्या संगापासून दूर राहणे आणि जीवन-मरणात राग-द्वेष नसणे–सगळी गृहत्यागी भक्तांची लक्षणे आहेत. श्रीमद्भागवतात त्यांची लक्षणे याप्रकारे दिली आहेत–

**सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः।**
**भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः॥**[४]

(श्रीमद्भा. ११/२/४५)

**मय्यनन्येन भावेन भक्तिं कुर्वन्ति ये दृढाम्।**
**मत्कृते त्यक्तकर्माणस्त्यक्तस्वजनबा न्धवाः॥**[५]

(श्रीमद्भा. ३/३५/२२)

(४) जे समस्त भूतांमध्ये आत्म्याच्या आत्मास्वरूप श्रीकृष्णचन्द्रास पाहतात आणि आत्म्याच्या आत्मास्वरूप श्रीकृष्णात समस्त प्राणिमात्रांना पाहतात, ते उत्तम भागवत आहेत.

**विसृजति हृदयं न यस्य साक्षाद्-हरिरवशाभिहितोऽप्यघौघनाशः।**
**प्रणयरसनया धृताङ्घ्रिपद्मः स भवति भागवतप्रधान उक्तः॥**[६]

(श्रीमद्भा.११/२/५५)

ज्या गृहस्थ भक्तांमध्ये ही लक्षणे प्रकाशित होतात, ते आता कर्म करण्यायोग्य राहू शकत नाहीत. म्हणून ते गृहत्यागी होतात. असे निरपेक्ष भक्त विरळेच असतात. संपूर्ण जीवनातही जर कधी अशा भक्तांचा संग प्राप्त झाला तर ते आपले सौभाग्य समजावे.

यादवदास–आजकाल साधारणपणे असे बघितले जाते की कुणी कुणी लहानशा वयातच गृहत्याग करून वेष धारण करतात. मग आश्रम बांधून देव-सेवा करू लागतात. हळू-हळू त्यांच्यात स्त्रीसंगाचा दोष प्रवेशू लागतो. तरीही ते हरिनाम सोडत नाहीत. जागोजागी भीक मागून आश्रमाचा खर्च चालवतात. अशा लोकांना त्यागी भक्त म्हणावे की गृहस्थ भक्त?

अनन्तदास–तुम्ही बऱ्याचशा गोष्टी एकत्रच विचारल्या आहेत. मी एकेकाचे उत्तर देतो. गृहत्यागाशी कमी किंवा अधिक वयाचा कसलाच संबंध नसतो. पूर्व आणि वर्तमान संस्कारांच्या बळाने कुणी गृहस्थ भक्त कमी वयातच गृहत्यागाचा अधिकारी होतो. शुकदेव पूर्व संस्कारांमुळे जन्मापासूनच गृहत्यागाचे अधिकारी होते. केवळ हेच पाहणे महत्त्वाचे असते की तो अधिकार कृत्रिम नसावा. यथार्थ निरपेक्षता उत्पन्न झाल्यावर कमी वयामुळे कुठलीच बाधा येऊ शकत नाही.

यादवदास–यथार्थ निरपेक्षता आणि कृत्रिम निरपेक्षता कशास म्हणतात.

---

(५) कपिलदेव येथे साधूचे स्वरूप-लक्षण सांगत आहेत–जे लोक अन्यान्य देवीदेवतांच्या पूजेत आस्था न ठेवता माझी अनन्यभावाने सुदृढ भक्ती करतात, ते माझ्याकरिता संपूर्ण कर्म तथा स्त्री, पुत्र, बंधू, बांधव आदी आपल्या आप्त-संबंधींना सुद्धा त्यागतात.

(६) विवशतेनेसुद्धा ज्यांचे नाम उच्चारण करतातच जीवांचे सर्व पाप दूर होते, त्या श्रीहरीच्या चरणकमलांना ज्यांनी आपल्या प्रेमबंधनाने आपल्या हृदयात बांधले आहे, ते पुरुष भगवंताच्या भक्तांमध्ये प्रधान आहेत.

अनन्तदास–यथार्थ निरपेक्षता, त्या दृढ निरपेक्षतेस म्हणतात, जी कधीच तुटत नाही. कृत्रिम निरपेक्षता प्रतिष्ठेची आशा, धूर्तता आणि शठतेने निर्माण होते. निरपेक्ष गृहत्यागी भक्तांसारखा सन्मान मिळवण्याकरता कुणी-कुणी निरपेक्षतेचे सोंग रचतात. परंतु अशी निरपेक्षता अगदीच निरर्थक आणि अमंगलजनक असते. गृहत्याग केल्याबरोबरच अशी निरपेक्षता दूर होते आणि उपद्रव सुरू होतात.

यादवदास–गृहत्यागी भक्तास संन्यास घेणे आवश्यक आहे का?

अनन्तदास–संसाराच्या माया ममतेपासून दूर झाल्यावर निरपेक्ष अकिंचन भक्त वनांत राहो अथवा घरात, जगाला पवित्रच करतात. त्यापैकी काही-काही भिक्षुक–आश्रम चिन्हांद्वारे परिचित होण्याकरिता कौपीन-कंथा आदी धारण करतात. कौपीन-कंथा ग्रहण करताना काही लोक गृहत्यागी वैष्णवांची साक्ष देऊन आपली प्रतिज्ञा दृढ करतात. यालाच 'भिक्षाश्रम प्रवेश' म्हणतात. जर तुम्ही यालाच 'वेष घेणे' (संन्यास घेणे) म्हणत असाल तर काहीच हरकत नाही.

यादवदास–भिक्षाश्रमोचित चिन्हांद्वारे परिचित होण्याची आवश्यकताच काय आहे?

अनन्तदास–जगात भिक्षाश्रमीच्या नावाने परिचित झाल्याने बरेचसे लाभ होतात. परिवारातली माणसे त्याच्याशी संबंध ठेवणार नाहीत, उलट सहज त्याला सोडून देतील. स्वतःदेखील त्यास पुन्हा संसारात परतण्याची इच्छा होणार नाही. स्वाभाविक निरपेक्षतेसोबतच लोक-भय सुद्धा त्याच्या हृदयात उपस्थित होते. परिपक्व निरपेक्ष गृहत्यागी भक्तांकरिता वेष-ग्रहण, कुठल्याही कामाचे असो वा नसो, परंतु कुणा-कुणासाठी वेषाश्रय बराचसा सहायक असतो. **"स जहाति मतिं लोके वेदे च परिनिष्ठिताम्।"** (श्रीमद्भा. ४/२९/४६) अर्थात भगवत्कृपा प्राप्त भक्त लौकिक वा वैदिक सर्व प्रकारच्या कर्मांप्रतीची आसक्ती परित्याग करतात–अशा भक्तांकरिता–वेषाश्रयाची विधी नाही. त्यांना फक्त लोक अपेक्षेचीच आवश्यकता असते.

यादवदास–वेषाश्रय कुणाकडून ग्रहण करावा?

अनन्तदास–गृहत्यागी वैष्णवांकडून वेषाश्रय ग्रहण करावा. गृहस्थ भक्तांना गृहत्यागी भक्तांच्या व्यवहाराचा अनुभव नसतो. म्हणूनच त्यांनी कुणालाही गृहत्यागीचा वेष देऊ नये. कारण ब्रह्मवैवर्ताचे कथन आहे–

**"अपरीक्ष्योपदिष्टं यत् लोकनाशाय तद् भवेत्।"**

अर्थात स्वयं आचरण न करता धर्मोपदेश केल्याने तो जगात उत्पाताचेच कारण ठरतो.

यादवदास–वेष अथवा वेषाश्रय प्रदान करतांना गुरुदेवांनी कोणकोणत्या विषयांवर विचार करावयास हवा?

अनन्तदास–सर्वप्रथम गुरुदेव हा विचार करतील की ज्या व्यक्तीस ते वेष देणार आहेत, ती व्यक्ती योग्य पात्र आहे किंवा नाही? त्या व्यक्तीने गृहस्थ भक्त बनून कृष्णभक्तीच्या बळाने शम-दमादी ब्रह्म-स्वभाव प्राप्त केलेला आहे की नाही? अर्थ-पिपासा आणि जिव्हा-लालसेचे निर्मुलन झाले आहे की नाही? त्यांनी काही दिवस शिष्यास आपल्याजवळ ठेवून त्याची चांगली परीक्षा करावी. जेव्हा त्यास उपयुक्त पात्र समजले जाते तेव्हा भिक्षाश्रमाचा वेष द्यावा. यापूर्वी कुठल्याही प्रकारे वेष देणे योग्य नाही. अनुपयुक्त पात्रास वेष दिल्याने गुरूचे पतन होणे निश्चित आहे.

यादवदास–आता मला कळतय की वेषाश्रय ग्रहण करणे कोणती गंमत नाही आहे. या प्रथेस अयोग्य गुरूंनी आता व्यावहारिक करणे आरंभ केले आहे. शेवटी काय अवस्था होईल, सांगता येत नाही.

अनन्तदास–श्रीचैतन्य महाप्रभूंनी या पद्धतीस पवित्र ठेवण्याकरता नितांत क्षुद्र दोष असूनही छोट्या हरिदासास कठोर दण्ड दिला होता. आमच्या प्रभूंच्या अनुगत भक्तांना महाप्रभूंद्वारे छोट्या हरिदासास दिलेल्या दंडाचे सर्वदा स्मरण ठेवावयास हवे.

यादवदास–वेष घेऊन आश्रम बांधणे आणि देव-सेवा करणे योग्य पद्धत आहे काय?

अनन्तदास–नाही, योग्य पात्रास भिक्षाश्रमात प्रवेश करून प्रतिदिनी भिक्षेद्वारे आपला जीवन-निर्वाह करावयास हवा. मठ-आश्रम आदींचे अवडंबर करू नये. त्याने एखाद्या ठिकाणी एकांत कुटीत किंवा कुण्या गृहस्थाच्या देवालयात राहावे. ज्या अनुष्ठानांमध्ये धनाची आवश्यकता असते, अशा अनुष्ठानांपासून दूरच रहावयास

हवे. अशा प्रकारे जीवन-व्यतीत करतांना निरपराध होऊन निरंतर कृष्णनाम करावयास हवे.

यादवदास–जे लोक मठ-आश्रम बांधून गृहस्थांप्रमाणे राहतात त्यांना काय म्हणावे?

अनन्तदास–अशा लोकांना 'वांताशी' म्हणतात. जे एकदा वमन (उलटी) केले, तेच पुन्हा पुन्हा खातात.

यादवदास–तेव्हा ते वैष्णव राहात नाहीत का?

अनन्तदास–जर त्यांचा व्यवहार अवैध आणि वैष्णव-आचार विरोधी आहे, तर मग त्यांचा संग करण्यात काय लाभ आहे? आता तर त्यांनी शुद्धभक्तीचा परित्याग करून दुराचार करण्यास आरंभ केलेला असतो; अशा दशेत त्यांच्यासोबत वैष्णवांचा संबंध का असावा?

यादवदास–जोपर्यंत त्यांनी हरिनाम त्यागलेले नाही, तोपर्यंत असे कसे म्हणता येईल की त्यांनी वैष्णवता सोडून दिली आहे?

अनन्तदास–'नाम' आणि 'नामापराध' एकच गोष्ट नाही, 'शुद्ध हरिनाम'– एक गोष्ट आहे आणि बाहेरून हरिनामासमान दिसणारे 'अपराधयुक्त नाम' वेगळी गोष्ट आहे. जेथे नामाच्या आधारे पापाचार दिसतो अर्थात नामही करणार आणि पापही करणार, नामाच्या प्रभावाने पापांपासून मुक्ती तर शेवटी मिळणारच–अशा भावनेने जे हरिनाम केले जाते तो 'नामापराध' ठरतो, शुद्ध हरिनाम नसते. नामापराधापासून सर्वदा दूर रहावयास हवे.

यादवदास–मग अशा व्यक्तींचा संसार कृष्ण-संसार नाही का?

अनन्तदास–कदापि नाही. कृष्ण-संसारात शठतेस स्थान नाही. तेथे तर संपूर्णपणे सरलता विराजमान असते. तेथे अपराध होण्याची संभावनाच नसते.

यादवदास–जर ते भक्तच राहात नाहीत तर कुणा भक्ताबरोबर त्यांच्या तारतम्याचा प्रश्नच उठत नाही.

यादवदास–अशा दशेत त्यांच्या उद्धाराचा काही उपाय असतो का?

अनन्तदास–हो आहे! जर ते आपल्या समस्त दुराचारांचा परित्याग करून निरपराध होऊन रडत-रडत निरंतर हरिनाम करतील तर ते परत भक्तांच्या श्रेणीत येतात.

यादवदास–बाबाजी महाराज! गृहस्थ भक्त वर्णाश्रमाच्या विधींच्या अधीन असतात. वर्णाश्रमधर्म स्वीकारल्याशिवाय एक गृहस्थ वैष्णव होऊ शकत नाही का?

अनन्तदास–अहा! वैष्णवधर्म अत्यंत उदार आहे. जीवमात्र या धर्माचे अधिकारी आहेत; म्हणूनच याचे नाव 'जैवधर्म' आहे. अंत्यज जातीचे मनुष्यदेखील वैष्णवधर्म ग्रहण करून गृहस्थ राहू शकतात. त्यांचा वर्णाश्रम नसतो. मग वर्णाश्रमांतर्गत पतित संन्यासीसुद्धा पुन्हा एकदा शुद्धभक्ती प्राप्त करून गृहस्थ भक्त होऊ शकतात. त्यांचीसुद्धा कुठलीच वर्णाश्रम-विधी असत नाही अथवा जे लोक आपल्या दुराचारांमुळे वर्णाश्रमधर्मातून पतित होतात, ते आणि त्यांची मुले आदी साधुसंगाच्या प्रभावाने शुद्धभक्तीचा आश्रय करीत गृहस्थ भक्त झाले तर त्यांचाही वर्णाश्रम नसतो. म्हणूनच गृहस्थ भक्त दोन प्रकारचे असतात–वर्णाश्रमधर्मयुक्त आणि वर्णाश्रमधर्म रहित.

यादवदास–या दोहोंमध्ये श्रेष्ठ कोण आहे?

अनन्तदास–ज्यांच्यात भक्ती अधिक आहे तेच श्रेष्ठ आहेत. भक्तिहीन झाल्यावर व्यावहारिक दृष्टीने वर्णाश्रमाचे पालन करणारी व्यक्तीच श्रेष्ठ आहे. कारण तिच्यात धर्म आहे आणि दुसरे अंत्यज आहेत. कारण पारमार्थिक दृष्टीने दोघेही अधम आहेत कारण दोघेही भक्तिहीन आहेत.

यादवदास–कुणा गृहस्थ व्यक्तीस गृहत्यागीचा वेष ग्रहण करण्याचा अधिकार आहे का?

अनन्तदास–नाही, असे केल्याने आत्मवंचना आणि जगत्-वंचना–दोन्ही प्रकारचे दोष लागतात. गृहस्थ व्यक्तीने कौपीन आदी धारण करणे म्हणजे गृहत्यागी वेषाश्रयी संतांची खिल्ली उडवणे आणि अपमान करणे आहे.

यादवदास–बाबाजी महाशय! वेष ग्रहण करण्याकरिता एखादी शास्त्रीय पद्धत आहे का?

अनन्तदास–स्पष्टपणे सांगायचे झाले तर नाही. सर्व वर्णांचे लोक वैष्णव होऊ शकतात, परंतु शास्त्रानुसार ब्राह्मणांव्यतिरिक्त अन्य कुणीही संन्यास ग्रहण करू शकत नाही. श्रीमद्भागवतात प्रत्येक वर्णाचे पृथक-पृथक लक्षण सांगतांना शेवटी नारद म्हणतात–

**यस्य यल्लक्षणं प्रोक्तं पुंसो वर्णाभिव्यञ्जकम्।**
**यदन्यत्रापि दृश्येत तत्तेनैव विनिर्दिशेत्॥**

(श्रीमद्भा. ७/११/३५)

अर्थात ज्याची जी लक्षणे सांगितली गेली आहेत त्याच लक्षणांद्वारे वर्णाचे निरूपण करावयास हवे. या शास्त्रीय विधीनुसारच अन्य वर्णांत उत्पन्न व्यक्तींमध्ये ब्राह्मणवर्णाची लक्षणे पाहून त्यास संन्यास देण्याची प्रथा चालत आली आहे. जर ब्राह्मणाव्यतिरिक्त अन्यान्य वर्णाच्या व्यक्तींमध्ये ब्राह्मणवर्णाची लक्षणे प्राप्त झाली आणि त्यांस संन्यास दिला गेला तर या पद्धतीस अवश्यच शास्त्रानुमोदित मानावयास हवे. हे कार्य केवळ पारमार्थिक विषयांतच बलवान आहे, व्यावहारिक विषयांत नाही.

यादवदास–भाऊ चण्डीदास! तुमच्या सगळ्या प्रश्नाचे उत्तर मिळाले का?

चण्डीदास–आज मी धन्य झालो. परम पूजनीय बाबाजी महाराजांच्या उपदेशांचा मी हा भावार्थ समजला की–जीव कृष्णाचा नित्यदास आहे. परंतु अपराधवश आपल्या या नित्य कृष्णदास्यत्वास विसरून स्थूल आणि लिंग–या दोन मायिक शरीरांचा आश्रय घेत मायेच्या गुणांचा अंगीकार करून जो जड वस्तुंमध्ये सुख-दुःख उपभोगत आहे. आपल्या कर्मांचे भोग भोगण्याकरिता त्याने आपल्या गळ्यात जन्म-मृत्यूची माळ घातली आहे. कधी उच्च तर कधी निम्न योनींमध्ये जन्म घेऊन कर्म-फळानुरूप नवनवीन अहंकारांत नाना प्रकारच्या अवस्था प्राप्त करतो. क्षणभंगूर भौतिक शरीरात तहान-भूक आदींद्वारे नाना प्रकारची कर्मे करण्यास बाध्य होतो. तऱ्हेतऱ्हेच्या अभावांची कल्पना करून अत्यंत दुःखी होत जातो. निरनिराळे रोग शरीरास सर्वदा जर्जर करतात. घरात स्त्री-पुत्रांसोबत कलह करून कधी-कधी आत्महत्यासुद्धा करून टाकतो. धनाच्या लोभाने कोण जाणे किती पापे करतो. राजदंड, लोकापवाद, लोकापमान आणि कितीतरी शारीरिक क्लेशांस भोगतो. आत्मीय-वियोग, धननाश, चोरी, दरोडा, अपहरण आदी विविध दुःखे तर मागे लागलेलीच असतात. वृद्ध झाल्यावर घरातली माणसे सेवा करीत नाहीत–त्यामुळे

किती दुःख होते. कफाची अधिकता, वात-वेग आणि वेदनांनी वृद्ध शरीर केवळ दुःखाचे कारण बनते. मेल्यानंतर पुनः गर्भाची असह्य पीडा सहन करावी लागते. मग शरीरात राहता-राहता, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मात्सर्य आदी प्रबळ होऊन विवेकास आच्छादित करून टाकतात. आता मी संसाराचा वास्तविक अर्थ समजलो. मी बाबाजींच्या चरणी वारंवार दंडवत-प्रणाम करतो. वैष्णव जगताचे गुरु आहेत. वैष्णवांच्या कृपेने आज मी संसाराचे यथार्थ ज्ञान प्राप्त करू शकलो आहे.

अनन्तदास बाबाजी महाशयांचे सदुपदेश श्रवण करून सर्व लोक एकस्वराने साधू! साधू!! म्हणू लागले. आत्तापर्यंत तेथे बरेचसे वैष्णव एकत्रित झाले होतो. सर्वांनी मिळून लाहिडी महाशयांचे एक पद कीर्तन आरंभ केले. चण्डीदास कीर्तन करता-करता आनंदविभोर होऊन नृत्य करू लागले. ते समस्त बाबाजी जनांची चरणधूळ होऊन आपल्या मस्तकी धारण करून रडत रडत जमिनीवर लोळण घेऊ लागले.

सगळेच जण एकस्वराने म्हणाले–चण्डीदास मोठे भाग्यवान आहेत.

काही वेळानंतर यादवदास बाबाजी म्हणाले–चण्डीदास! चला, आपण सगळे त्या तटावर जाऊ.

चण्डीदास हसतच उत्तरले–तुम्ही पार करविलेत, तर मी ही पार होऊन जाईल.

दोघांनी प्रद्युम्न कुंजास साष्टांग दंडवत-प्रणाम केला आणि परतले. कुंजातून बाहेर येताच दमयन्तीस प्रणाम करतांना पाहिले. ती या दोघांना प्रणाम करीत म्हणाली–हाय! मला स्त्री-जन्म का मिळाला? जर मी ही पुरुष असते तर अनायासेच या कुंजात जाऊन वैष्णवांचे दर्शन करू शकले असते आणि त्यांची चरणरज मस्तकी धारण करून पवित्र झाले असते. मी जन्मोजन्मी या नवद्वीपात वैष्णवांची दासी होऊन त्यांची सेवा करीत जीवन सार्थकी लावू शकले असते तर किती बरे झाले असते!

यादवदास–अहो! हे गोद्रुमधाम महान पुण्य-भूमी आहे. येथे येताच जिवास शुद्धभक्ती लाभते. हे गोद्रुम आमचे प्राणेश्वर श्रीशचीनन्दन यांची क्रीडा-स्थळी–

गोपपल्ली आहे. या तत्त्वास हृदयंगम करूनच श्रीप्रबोधानन्द सरस्वती प्रार्थना करतात–

**न लोकवेदोदितमार्गभेदैराविश्य संक्लिश्यते रे विमूढाः।**
**हठेन सर्वं परिहृत्य गौडे श्रीगोद्रुमे पर्णकुटीं कुरुध्वम्॥**

(श्रीनवद्वीपशतक–३६)

अरे मूढ (जीव)! तू लोक आणि वेदांचा आश्रय घेऊन घेऊन नाना प्रकारच्या धर्मांचे आचरण करूनही दुःखी असतोस. आता या अनिश्चित मार्गांना त्यागून शीघ्रातिशीघ्र श्रीगोद्रुमी आपली पर्णकुटी निर्माण कर.

अशा प्रकारे परस्पर हरिकथा सांगता-ऐकता तिघेही गंगा पार करून हळू-हळू कुलिया ग्रामी परतले. त्या दिवसापासून चण्डीदास आणि त्यांची पत्नी यांच्यात एक प्रकारचा अद्भुत वैष्णव-भाव प्रकटू लागला, जसे काही मायेचा संसार त्यांना बिलकूल स्पर्शच करत नव्हता. वैष्णव सेवा, सदा कृष्णनाम कीर्तन आणि सर्व जीवांवर दया–त्यांचे भूषण बनले. धन्य व्यापारी पती-पत्नी! धन्य वैष्णव कृपा!! आणि धन्य ती श्रीनवद्वीप भूमी!!!

**॥ सातवा अध्याय समाप्त ॥**



# आठवा अध्याय (नित्यधर्म आणि व्यवहार)

एके दिवशी गोद्रुमातले वैष्णवगण श्रीगोराह्रदाच्या (श्रीगोरा-तलावाच्या) दक्षिण-पूर्व किनारी वनवासी वैष्णवांच्या कुंजात प्रसाद-सेवनानंतर एकत्रित झाले. लाहिडी महाशयांनी एक भक्तिपूर्ण पद ऐकवून वैष्णवांच्या हृदयास व्रजभावाने ओतप्रोत करून टाकले.

पद संपल्यावर काही वैष्णवजन गौरलीला आणि कृष्णलीला यांच्या एकतेवर विचार करू लागले. त्याचवेळी बडगाछीहून काही वैष्णवगण उपस्थित झाले. त्यांनी प्रथम गोराह्रदास आणि मग वैष्णवांस साष्टांग प्रणाम केला. वैष्णवांनी आगंतुकांचा (अतिथींचा) यथोचित सन्मान केला. त्या कुंजात एक खूपच पुरातन वटवृक्ष होता, ज्याच्याखाली एक पक्का पार बांधलेला होता. लोक या वटवृक्षास मोठ्या श्रद्धेने 'निताई वट' म्हणत, कारण नित्यानन्द प्रभूंना या वट-वृक्षाखाली बसणे खूप आवडत असे.

वट-वृक्षाखाली वैष्णव साधूंची एक विशेष सभाच जमली. हळूहळू परस्पर हरिकथा होऊ लागली. याच दरम्यान बडगाछीहून एक नवागंतुक जिज्ञासू युवक नम्रतापूर्वक म्हणाला–मला काही विचारायचे आहे. आपण त्याचे यथोचित उत्तर देऊन मला अनुगृहीत करावे.

निभृत कुंजाचे हरिदास बाबाजी विज्ञ आणि गंभीर विद्वान होते. त्यांचे आयुर्मानही जवळजवळ १०० वर्षे होते. या बाबाजींनी नित्यानन्द प्रभूंना आपल्या डोळ्यांनी या वटवृक्षाखाली बसलेले पाहिले होते. त्यांची स्वतःचीदेखील अशीच हार्दिक इच्छा होती की त्यांचे निर्याणही याच वट-वृक्षाखाली व्हावे. त्यांनी नवागंतुक युवकाचे म्हणणे ऐकून म्हटले–जेथे परमहंस बाबाजींची सभा बसली आहे तेथे, तुला आपल्या प्रश्नांच्या उत्तराकरिता जरासुद्धा आशंका बाळगायचे कारण नाही.

नवागंतुक अत्यंत नम्र शब्दात जिज्ञासा करू लागला की–वैष्णवधर्म नित्यधर्म आहे, जे लोक या धर्माचा आश्रय घेतात, त्यांचे अन्य लोकांसमवेत कशा प्रकारचे व्यवहार योग्य आहेत?

नवागंतुकाचा प्रश्न ऐकून हरिदास बाबाजींनी वैष्णवदास बाबाजींकडे वळत म्हटले–वैष्णवदास! यावेळी बंगभूमीत तुमच्यासमान विद्वान आणि श्रेष्ठ कुणीही नाही. तुम्ही सरस्वती गोस्वामींचा संग केला आहे तथा परमहंस बाबाजींकडून शिक्षण घेतले आहे. तुम्ही खूप सौभाग्यशाली आहात आणि महाप्रभूंचे कृपापात्रही आहात. तेव्हा या प्रश्नाचे उत्तर आपणच द्यायला हवे.

वैष्णवदास बाबाजी विनीत भावाने म्हणाले–महात्मन्! आपण साक्षात बलदेवांचे अवतार श्रीनित्यानन्द प्रभूंचे दर्शन केले आहे आणि न जाणो कित्येक लोकांना उपदेश देऊन त्यांना परमार्थ राज्यात प्रवेश करविला आहे. आज आम्ही देखील आपल्या मुखनिःसृत उपदेश वाणीस श्रवण करण्यास उत्सुक आहोत.

सर्वांनीच वैष्णवदास बाबाजींच्या म्हणण्याचे समर्थन केले. हरिदास बाबाजी त्या सर्वांची विनंती टाळू शकले नाहीत. शेवटी तेच या प्रश्नाचे उत्तर देण्यास तयार झाले. त्यांनी वटवृक्षाखाली श्रीनित्यानन्द प्रभूंना दंडवत-प्रणाम करून बोलणे आरंभ केले–

विश्वात जितके जीव आहेत त्या सर्वांनाच मी कृष्णदास समजून प्रणाम करतो. कुणी मानो वा न मानो, सर्वच त्यांचे दास आहेत. यद्यपि निखिल जीव श्रीकृष्णाचे स्वतःसिद्ध दास आहेत, तथापि जे अज्ञानवश वा भ्रमवश स्वतःस कृष्णदास मानत नाहीत, ते एका श्रेणीचे लोक आहेत आणि जे कृष्णाचे दास्यत्व स्वीकारतात ते दुसऱ्या श्रेणीचे लोक आहेत. अशा तऱ्हेने जगात दोन प्रकारचे लोक असतात–एक बहिर्मुख आणि दुसरे अंतर्मुख वा कृष्णोन्मुख. संसारात कृष्णबहिर्मुख लोकच अधिक आहेत. हे लोक धर्म स्वीकारत नाहीत. अशा लोकांविषयी काही बोलणे अथवा न बोलणे एकसारखेच आहे. त्यांच्यात कर्तव्याकर्तव्याविषयी जराही विवेक नसतो. आपले सुख आणि स्वार्थच त्यांचे सर्वस्व असते. जे लोक धर्म स्वीकारतात त्यांच्यात कर्तव्य-अकर्तव्याचा विवेक असतो. अशा कर्तव्यपरायण मनुष्यांकरिता मनू (६/९२) म्हणतात–

**धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिन्द्रिनिग्रहः।**
**धीर्विद्यासत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम्॥**

धृती (संतोष), क्षमा (सामर्थ्य असूनही दुसऱ्यांद्वारे केलेल्या अपकारांच्या बदल्यात अपकार न करणे), दम (विकाराचे कारण उपस्थित झाल्यावरही मनाची अविकृत अवस्था), अस्तेय (चोरी न करणे), शौच, इंद्रिय-निग्रह (इंद्रियांना विषयांपासून दूर करणे), धी (शास्त्र आदींचे तत्त्वज्ञान), विद्या (आत्मज्ञान), सत्य, अक्रोध (क्रोधाचे कारण उपस्थित झाल्यावरही क्रोध न करणे)–ही दहा धर्मांची लक्षणे आहेत.

यांत धृती, दम, शौच, इंद्रिय-निग्रह आणि विद्या–ही सहातर स्वतःप्रतीची कर्तव्ये आहेत, बाकी क्षमा, अस्तेय, सत्य आणि अक्रोध ही चार दुसऱ्यांच्या संबंधी कर्तव्ये आहेत. ही दहाही प्रकारची धर्मलक्षणे साधारण लोकांकरिता आहेत. कारण यातील एकाही लक्षणात हरि-भजनाचा निर्देश स्पष्ट होत नाही. दुसरे असे की हे ही निश्चयपूर्वक सांगता येत नाही की दहा लक्षणात्मक–धर्मांचे पालन केल्यानेच मानव जीवन संपूर्ण रूपाने कल्याणमय होईल. विष्णुधर्मोत्तरात म्हटले आहे–

**जीविंत विष्णुभक्तस्य वरं पञ्चदिनानि च।**
**न तू कल्पसहस्राणि भक्तिहीनस्य केशवे॥**[१]

कृष्णभक्तिरहित मनुष्य, मनुष्य म्हणविण्याचे अधिकारी नसतात. शास्त्रांमध्ये अशा भक्तिरहित मनुष्यांची गणना दोन पाय असणाऱ्या पशूंसोबत केली आहे–

**श्वविड्वराहोष्ट्रखरैः संस्तुतः पुरुषः पशुः।**
**न यत्कर्णपथोपेतो जातु नाम गदाग्रजः॥**[२]

(श्रीमद्भा. २/३/१९)

---

(१) या संसारात विष्णुभक्ताचे पाच दिवस जगणेदेखील मंगलकारी आहे; तर विष्णु-भक्तिविहीन लोकांची या जगातील हजार कल्पांची विद्यमानतासुद्धा कल्याणप्रद नाही, उलट त्यामुळे जगाचे अमंगलच होते.

(२) ज्याच्या कानांत भगवान श्रीकृष्णाचे नाम कधी प्रवेशलेच नाही, तो मनुष्य विष्ठाभोजी घृणित सूकर (डुक्कर), संसाररूपी मरुभूमीत (वाळवंटात) विचरणकारी तथा कंटकभोजी (काटे खाणारा) उंट आणि स्त्रीपद-ताडित (स्त्रियांची लाथ खाणाऱ्या) तथा ओझे वाहणाऱ्या गाढवापेक्षाही कनिष्ठ आहे.

येथे उपर्युक्त प्रकारच्या लोकांचे कर्तव्य अथवा अकर्तव्य विचारलेले नाही, तर प्रश्नकर्त्यांच्या प्रश्नाचा भाव केवळ अशा लोकांचे व्यवहार वा कर्तव्य निरूपण करण्याचा आहे जे भगवद्भक्तिमार्गाचे अवलंबन करीत आहेत.

ज्या लोकांनी भक्तिपथाचे अवलंबन केलेले आहे, त्यांना तीन श्रेणींत विभक्त केलेले आहे–कनिष्ठ-मध्यम आणि उत्तम. ज्यांनी केवळ नुकताच भक्तिमार्गात प्रवेशमात्र केला आहे, परंतु भक्त बनू शकले नाहीत, त्यांना कनिष्ठ भक्त म्हटले जाते. त्यांची लक्षणे अशी आहेत–

**अर्चायामेव हरये पूजां यः श्रद्धयेहते।**
**न तद्भक्तेषु चान्येषु स भक्तः प्राकृतः स्मृतः॥**

(श्रीमद्भा. ११/२/४७)

अर्थात जे भगवंताची अर्चना आणि श्रीमूर्तींची श्रद्धापूर्वक पूजा तर करतात, परंतु भगवंताच्या भक्तांची आणि अन्य जिवांची विशेष सेवा-शुश्रूषा करीत नाहीत, त्यांना प्राकृत अर्थात कनिष्ठ भक्त म्हटले जाते.

सिद्धांत असा आहे की श्रद्धा हेच भक्तीचे बीज आहे–श्रद्धापूर्वक भगवंताची पूजा केल्यानेच भक्ती होते, ही गोष्ट योग्य आहे, तथापि भक्ताची सेवा-शुश्रूषा केल्याशिवाय भगवंताच्या पूजेस शुद्ध भक्ती म्हणता येत नाही; त्यामुळे भक्तीच्या पूर्ण स्वरूपाची अभिव्यक्ती होत नाही–अर्थात अशा भक्ताचा भक्तिकार्याच्या दरवाज्यात केवळ प्रवेशच झाला आहे. श्रीमद्भागवतात म्हटले गेले आहे–

**यस्यात्मबुद्धिः कुणपे त्रिधातुके स्वधीः कलत्रादिषु भौम इज्यधीः।**
**यत्तीर्थबुद्धिः सलिले न कर्हिचित् जनेष्वभिज्ञेषु स एव गोखरः॥**

(श्रीमद्भा. १०/८४/१३)

जो मनुष्य वात, पित्त आणि कफ–या तीन धातूंनी बनलेल्या शवतुल्य शरीरासच आत्मा–'मी', स्त्री-पुत्र आदींसच 'माझे' आणि माती, दगड, काष्ठ आदी पार्थिव विकारांसच इष्टदेव मानतो तथा जो केवळ पाण्यालाच तीर्थ समजतो–भगवद्भक्तांना नाही, तो मनुष्य असूनही पशूंमध्ये नीच गाढवच आहे.

तात्पर्य असे जरी अर्चामूर्तीत ईश्वरी पूजेच्या अभावामध्ये भक्तीचा प्रादुर्भाव होत नाही, केवळ वितर्काद्वारे हृदय शुष्क होते आणि भजनाचा विषयही निर्दिष्ट होत नाही, तथापि श्रीमूर्तीच्या सेवेकरिता शुद्ध-चिन्मयी बुद्धीची आवश्यकता आहे. या जगात जीवच चिन्मय वस्तू आहे. यातही कृष्णभक्त जीवच शुद्ध-चिन्मय आहेत. भगवान कृष्णसुद्धा शुद्ध चिन्मय वस्तू आहेत. चिन्मय वस्तूची उपलब्धी (प्राप्ती) करण्याकरिता जड, जीव आणि कृष्णाच्या संबंध ज्ञानाचे असणे अनिवार्य आहे. या संबंधज्ञानाबरोबरच श्रीमूर्तीची पूजा करण्याकरिता कृष्ण-पूजा आणि भक्तसेवा– दोन्हीही एकत्रितपणे व्हायला हवे. ज्या श्रद्धेने चिन्मय तत्त्वाप्रती असा आदरभाव असतो, त्यास शास्त्रीय श्रद्धा म्हणतात. चिन्मय तत्त्वाचा यथार्थ संबंध न जाणून जी श्रीमूर्तीची पूजा केली जाते, त्याचा आधार लौकिक-श्रद्धा आहे. म्हणूनच ते भक्तीचे प्रथम द्वार असूनही शुद्ध भक्ती नाही. शास्त्रांमध्ये भक्तीच्या द्वारापर्यंत पोहोचलेल्या मनुष्यांची लक्षणे याप्रकारे दिली आहेत–

**गृहीतविष्णुदीक्षाको विष्णुपूजापरो नरः।**
**वैष्णवोऽभिहितोऽभिज्ञैरितरोऽस्मादवैष्णवः॥**

अर्थात जे विष्णुमंत्राने विधिवत दीक्षित होऊन विष्णूची पूजा करतात त्यांना शास्त्रविद् पंडितगण 'वैष्णव' अशी संज्ञा देतात. त्याव्यतिरिक्त सगळेच अवैष्णव आहेत.

वंशानुक्रमाने जे लोक कुलगुरूस मानून इतर लोकांचे ऐकून-पाहून लौकिक श्रद्धेने अनुप्राणित होऊन विष्णु-मंत्राची दीक्षा घेऊन श्रीविष्णूच्या अर्चामूर्तीची पूजा करतात ते कनिष्ठ अर्थात प्राकृत भक्त आहेत. हे लोक शुद्धभक्त नाहीत. या प्राकृत भक्तांमध्ये 'छायाभक्त्याभास' प्रबळ असतो. भक्त्याभास दोन प्रकारचे असतात–पहिला प्रतिबिंब भक्त्याभास आणि दुसरा छाया भक्त्याभास. प्रतिबिंब भक्त्याभासाची गणना अपराधात झाल्याने यात वैष्णवता नसते. छाया भक्त्याभासात वैष्णवतेचा काहीसा आभास असतो. प्राकृत भक्त प्रतिबिंब भक्त्याभासाच्या अवस्थेपलीकडे असतात. हा छाया भक्त्याभासही मोठ्या सौभाग्याने प्राप्त होतो, कारण ही भक्तीची पूर्व अवस्था असते आणि याहूनही क्रमशः मध्यम आणि उत्तम वैष्णव होता येऊ शकते.

परंतु हे सगळे असूनही या लोकांस शुद्धभक्त म्हणता येत नाही. हे लोक लौकिक श्रद्धेसोबत श्रीअर्चामूर्तीची पूजा करतात आणि साधारण जनांकरिता

सांगितलेल्या दहा लक्षणात्मक धर्मांच्या अनुरूपच या लोकांचे दुसऱ्यांच्या प्रती व्यवहार असतात. भक्तांकरिता शास्त्रांमध्ये जे निर्दिष्ट व्यवहार आहेत, ते यांच्याकरिता नाहीत. सर्वांत प्रमुख गोष्ट तर ही आहे की कोण भक्त आहे आणि कोण अभक्त आहे, हे समजण्याची शक्ती वा बुद्धी या लोकांमध्ये नसते. हा अधिकार मध्यम कोटीच्या वैष्णवांचा आहे. श्रीमद्भागवतात मध्यम वैष्णवांच्या व्यवहाराचे निरूपण करतांना म्हटले आहे–

**ईश्वरे तदधीनेषु बालिशेषु द्विषत्सु च।**
**प्रेममैत्रीकृपोपेक्षा यः करोति स मध्यमः॥**

(श्रीमद्भा. ११/२/४६)

येथे ज्या व्यवहाराचे वर्णन केले गेले आहे, तो नित्यधर्मांतर्गत व्यवहार आहे. येथे नैमित्तिक आणि संसारी व्यवहारांची वर्णने केलेली नाहीत. वैष्णव जीवनात याच व्यवहाराची आवश्यकता असते. जर अन्य व्यवहार या नित्यधर्मगत व्यवहाराच्या विरोधी नसतील तर आवश्यकतेनुसार ग्रहण करता येऊ शकतात.

वैष्णव व्यवहाराची चार प्रकारची पात्रे आहेत–(१) ईश्वर; (२) ईश्वराच्या अधीन भक्त; (३) बालिश अर्थात अतत्त्वज्ञ विषयी आणि; (४) द्वेषी अर्थात भक्तीचा विरोध करणारे. या चारही पात्रांप्रती क्रमशः प्रेम, मैत्री, कृपा आणि उपेक्षा करणेच वैष्णव व्यवहार आहे. अर्थात ईश्वरावर प्रेम, भक्तांशी मित्रता, बालिशांवर कृपा आणि विद्वेषींच्या प्रती उपेक्षाच वैष्णव व्यवहार आहे.

(१) ईश्वराप्रती प्रेम–अर्थात सर्वेश्वर कृष्णाप्रती प्रेम. प्रेमाचा अर्थ 'शुद्ध भक्ती' असा आहे–भक्तिरसामृतसिन्धूमध्ये शुद्धभक्तीचे लक्षण अशा प्रकारे सांगितले आहे–

**अन्याभिलाषिताशून्यं ज्ञानकर्माद्यनावृतम्।**
**आनुकूल्येन कृष्णानुशीलनं भक्तिरुत्तमा॥**

अर्थात श्रीकृष्णाच्या सेवेव्यतिरिक्त अन्यान्य कामनांनी रहित होऊन तथा ज्ञान आणि कर्म आदींप्रती स्वाधीन चेष्टांचा परित्याग करून समस्त इंद्रियांद्वारे जे कृष्णानुशीलन केले जाते–कृष्णाची सेवा केली जाते–त्यास उत्तमाभक्ती म्हटले जाते.

ही उत्तमाभक्ती मध्यमकोटीच्या वैष्णवांच्या साधन, भाव आणि प्रेमदशेपर्यंत प्राप्त केली जाते. आधी विशद् केलेल्या कनिष्ठाधिकारात केवळ श्रीमूर्तीची श्रद्धापूर्वक पूजा करण्याचे लक्षण पाहिले जाते. परंतु उत्तमाभक्तीचे त्यांच्यात कुठलेच लक्षण दिसत नाही. ज्या दिवशी त्यांच्या हृदयात उत्तमा भक्तीचे लक्षणसमूह प्रकाशित होऊ लागतील, त्यादिवशी त्यांची गणना मध्यमाधिकारी वैष्णवांत होऊ लागेल. त्यापूर्वी त्यास भक्ताभास किंवा वैष्णवाभासच म्हटले जाईल. कृष्णानुशीलन म्हणजेच प्रेम आहे, परंतु 'आनुकूल्येन' शब्दाद्वारे कृष्णप्रेमानुकूल भक्तांप्रती मित्रता–अतत्त्वज्ञांवर कृपा आणि भक्ति-विरोधी व्यक्तींची उपेक्षा करणे देखील मध्यम कोटीच्या वैष्णवांचे लक्षण आहे.

(२) भगवंताच्या अधीन भक्तांप्रती मित्रता–ज्या लोकांच्या हृदयात शुद्धभक्तीचा अविर्भाव झालेला आहे, ते भगवंताधीन भक्त आहेत. कनिष्ठाधिकारी स्वयं-भगवंताच्या अधीन शुद्धभक्त नाहीत आणि ते शुद्धभक्तांचा आदर-सत्कारही करीत नाहीत. म्हणूनच मध्यम आणि उत्तम भक्तच मैत्रीचे पात्र आहेत. श्रीचैतन्यचरितामृतात कुलीनग्रामाच्या भक्तांच्या प्रश्नोत्तरात श्रीमन् महाप्रभूंनी ज्या उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ वैष्णवांसंबंधी उपदेश दिला आहे, त्या सर्वांनाच मध्यम आणि उत्तम कोटीचे वैष्णव समजायला हवे. त्यापैकी कुणीही केवळ अर्चामूर्तीचा पूजक कनिष्ठाधिकारी नसतो. केवळ अर्चापूजा करणाऱ्यांच्या मुखातून शुद्ध कृष्णनाम होत नाही. त्याचे नाव छाया-नामाभास असते. मध्यमाधिकारी गृहस्थ वैष्णवांस महाप्रभूंनी तीन प्रकारच्या वैष्णवांची सेवा करण्याची आज्ञा दिली आहे. ज्यांच्या मुखातून केवळ एकदाच कृष्णनाम ऐकू येईल, ज्यांच्या मुखातून निरंतर कृष्णनाम निःसृत होते आणि ज्यांना पाहताक्षणीच आपोआपच कृष्णनाम उदित होते–अशा तिन्ही प्रकारच्या वैष्णवांची सेवा केली पाहिजे. ज्यांच्या मुखातून शुद्ध कृष्णनाम निघत नाही, अशा नामाभास करणाऱ्या वैष्णवांची सेवा वैष्णव-सेवेअंतर्गत येत नाही. केवळ शुद्ध नामाश्रयी वैष्णवांचीच सेवा करणे योग्य आहे.

वैष्णवांच्या तारतम्यानुसार सेवेचेसुद्धा तारतम्य असते. 'मैत्री' शब्दाने संग, वार्तालाप आणि सेवा–सर्वच जाणले पाहिजे. शुद्ध वैष्णवांस पाहताच त्यांचे स्वागत करावयास हवी तथा आदरपूर्वक त्यांच्यासोबत वार्तालाप करावा. त्यांच्या आवश्यकतांसही शक्यतोवर पूर्ण करावयास हवे. हे सगळे वैष्णव-सेवेअंतर्गत येते.

त्यांचा कधीही विद्वेष करू नये. चुकूनही कधी त्यांची निंदा करू नये. त्यांच्या कुरूपतेची घृणा करू नये तथा आजारी असल्यास त्यांचा अनादरही करू नये.

(३) बालिशांवर कृपा–'बालिश' शब्दाचा अतत्त्वज्ञ, मूढ वा मूर्ख मनुष्य असा अर्थ निघतो. कुठल्याही तऱ्हेने शिक्षण मिळालेले नसेल, मायावाद आदी मत-मतांतरात प्रवेश केलेला नसेल तथा भक्ती वा भक्तांप्रती विद्वेष करणे शिकलेले नसेल, तरीही अहंता आणि ममता प्रबळ होऊन ईश्वराप्रती श्रद्धा करू देत नाही, अशा विषयी मनुष्यास 'बालिश' म्हटले जाते. लिहिता-वाचता येऊन केवळ पंडित झाल्यावरही ज्यांच्यात ईश्वर विश्वासाचा अभाव आहे, तेसुद्धा बालिश आहेत. कनिष्ठाधिकारी प्राकृत भक्त भक्तीच्या प्रवेशद्वारी पोहोचूनही संबंधतत्त्वास न जाणल्या कारणाने जोपर्यंत शुद्धभक्ती प्राप्त करीत नाहीत, तोपर्यंत ते ही बालिशच म्हणविण्याच्या योग्य आहेत. संबंधतत्त्वास जाणून शुद्ध भक्तांच्या कृपेने जेव्हा त्यांची रुची शुद्ध हरिनामात होते, तेव्हाच त्यांचा बालिशपणा दूर होईल आणि ते मध्यम कोटींच्या वैष्णवात गणले जातील. अशा बालिशांप्रती मध्यमवैष्णवांच्या कृपारूप व्यवहाराची खूपच आवश्यकता आहे. अतिथी मानून यथाशक्ती त्यांच्या आवश्यकता पूर्ण करावयास हव्यात. इतकेच नाही, तर ज्यामुळे त्यांची अनन्य भक्तीत श्रद्धा उत्पन्न होईल तथा श्रीहरिनामाप्रती त्यांची रुची उत्पन्न होईल–असे प्रयत्न करण्याचे नावच यथार्थ 'कृपा' आहे. अतत्त्वज्ञ असल्या कारणाने बालिश व्यक्ती थोडा देखील कुसंग प्राप्त करून पतित होऊन जाते. म्हणून त्यांना सर्वदा कुसंगापासून स्वतःला वाचवायला हवे तथा त्यांना आपल्यासोबत ठेवून नाम माहात्म्य आणि सदुपदेश श्रवण करवायला हवा. रोगी कधीही स्वतःची चिकित्सा करू शकत नाही. म्हणूनच त्याची चिकित्सा करावयास हवी. जसा रोग्याचा क्रोधपूर्ण व्यवहार क्षम्य आहे, बालिशांचे व्यवहारदेखील अशाप्रकारे क्षम्य आहेत. याचेच नाव कृपा आहे. बालिशांमध्ये खूपसे भ्रम असतात–जसे कर्मकांडात विश्वास, कधी-कधी ज्ञानाकडे कल, ईश्वराच्या अर्चामूर्तीचे कामनेसहित पूजन, योगात श्रद्धा, सत्संगाप्रती उदासीनता, वर्णाश्रमाप्रती आसक्ती आदी अनेक प्रकारचे भ्रम आहेत. संग, कृपा आणि सदुपदेशाद्वारे हे भ्रम दूर झाल्यावर कनिष्ठ अधिकारीही मध्यम कोटीचे अधिकारी होऊ शकतात. जेव्हा असे लोक भगवंताच्या अर्चामूर्तीची पूजा करण्यास आरंभ करतात, तेव्हा समजावे की त्यांनी आपल्या कल्याणाचे बीजारोपण केलेले आहे, आता त्यांच्यात कुठलाच मतवादाचा दोष नाही आहे आणि शीघ्रच त्यांचे कल्याण होणार आहे. मतवादाचा

दोष नसल्याने त्यांच्यात थोडा-थोडा श्रद्धेचा गंध उत्पन्न होतो. परंतु जे लोक मायावादाच्या विचारांनुसार भगवंताची अर्चापूजा करतात, त्यांच्यात श्रीमूर्ती प्रती जरासुद्धा श्रद्धा नसते. ते लोक भगवंताच्या चरणी अपराधी असतात. म्हणूनच 'श्रद्धयेहते' पदाचा व्यवहार (प्रयोग) कनिष्ठाधिकारीप्रती केला गेला आहे. मायावादींचा सिद्धांत हा आहे की–"परब्रह्माचा कुठलाच श्रीविग्रह नसतो, ते निराकार, निर्विशेष आदी आहेत. निम्नाधिकारी साधकांकरिता परब्रह्माच्या काल्पनिक अर्चामूर्तींची व्यवस्था केली गेली आहे." अशा अवस्थेत श्रीविग्रहाप्रती विश्वासच कुठे राहिला? म्हणूनच मायावादींच्या मूर्तिपूजेत आणि कनिष्ठाधिकारी वैष्णवांच्या मूर्तीपूजेत विशेष अंतर आहे. कनिष्ठाधिकारी वैष्णव भगवंतास सविशेष जाणून त्यांच्या श्रीमूर्तीची श्रद्धेने पूजा करतात, परंतु मायावादी भगवंतास निर्विशेष मानून त्यांच्या श्रीमूर्तीस काल्पनिक आणि अनित्य मानतात. हेच कारण आहे की वैष्णवतेचे अन्य कुठलेच लक्षण नसतांनाही, मायावाद-दोषरहित असल्यामुळेच कनिष्ठ अधिकाऱ्यास 'प्राकृत-वैष्णव' असे पद दिले आहे. मायावाद रहित असणेच त्यांची वैष्णवता आहे. याच बळावर साधू-कृपेद्वारे त्यांची अवश्यच हळू-हळू उर्ध्वगती होईल. मध्यमाधिकारी वैष्णवांना यांच्यावर अवश्य कृपा करावयास हवी. असे झाल्यास त्यांची अर्चापूजा आणि हरिनाम शीघ्रच विशुद्ध होऊन (आभास धर्मत्व परित्यागून) चिन्मयतेस प्राप्त होतील.

(४) द्वेषी मनुष्यांची उपेक्षा–येथे हे जाणणे आवश्यक आहे की द्वेषी मनुष्य कोणास म्हणतात? आणि ते किती प्रकारचे असतात? द्वेष एक प्रकारची प्रवृत्ती आहे ज्यास मत्सरताही म्हणतात. प्रेमाच्या ठीक विपरीत प्रवृत्तीचे नाव 'द्वेष' आहे. केवळ ईश्वरच प्रेमाचे पात्र आहेत; या ईश्वराप्रती प्रेमाच्या विपरीत जी प्रवृत्ती असते त्याला द्वेष म्हणतात. द्वेष पाच प्रकारचा असतो–

(क) ईश्वराप्रती अविश्वास.
(ख) ईश्वरास कर्मफलातून उत्पन्न स्वभाव-शक्ती मानणे.
(ग) ईश्वरास विशेष स्वरूपात विश्वास न करणे.
(घ) जीवांना ईश्वराच्या नित्यरूपाच्या अधीन न मानणे.
(ङ) दयाशून्यता.

ज्या लोकांचे हृदय या द्वेष-प्रवृत्तींनी दूषित असते, त्यांना शुद्धभक्ती कधीच प्राप्त होत नाही. ते शुद्धभक्तीच्या प्रवेश-द्वार स्वरूप–कनिष्ठाधिकाऱ्याच्या अर्चाभक्तीने पण रहित असतात. विषयासक्तीच्या सोबत उक्त पाच प्रकारचे द्वेष राहू शकतात. तिसऱ्या आणि चौथ्या प्रकारच्या द्वेषांसोबत कधी-कधी आत्मघाती वैराग्यसुद्धा पाहिले जाते. मायावादी संन्यासींचे जीवनच याचे उदाहरण आहे. या द्वेषी व्यक्तींप्रती शुद्ध भक्त कसा व्यवहार करतील?–ह्यांच्या प्रती उपेक्षा करणेच कर्तव्य आहे.

मनुष्याप्रती मनुष्याचा जो व्यवहार असतो, त्याचा परित्याग करणेच उपेक्षा आहे–असे समजणे चुकीचे आहे. अथवा द्वेषी व्यक्तीवर कुठली विपत्ती आल्यास त्याचे दुःख दूर करण्याचा प्रयत्न करू नये–हे सुद्धा योग्य नाही. गृहस्थ वैष्णवांस लोक-समाजात राहावे लागते. दुसऱ्या लोकांसोबत एकत्र वास केल्याने परस्पर संबंध येतोच; विवाहाद्वारे अनेकांसोबत बंधुत्व स्थापित होते, वाणिज्य-व्यवसायात अनेक लोकांसोबत संबंध निर्माण होतात, विषय संरक्षण आणि पशू-पालन आदी कार्यांतही अनेकांसोबत नाना प्रकारचे संबंध जोडले जातात, एक दुसऱ्यांप्रती सहानुभूती दाखविल्यानेही बरेच संबंध होतात, अशा प्रकारे त्यांच्यासोबत गृहस्थ वैष्णवाचा व्यवहार कशा प्रकारचा असणे योग्य आहे? त्यांना अशा लोकांची उपेक्षा करावयास हवी. परंतु उपेक्षेचा अर्थ हा नाही की त्यांच्यासोबतचा आपला समस्त व्यवहार बंद करावा. उलट उपेक्षेचे तात्पर्य हे आहे की बहिर्मुख लोकांसमवेत व्यावहारिक कार्यांना पूर्ववत चालू ठेवायचे; जिथपर्यंत पारमार्थिक-व्यवहाराचा प्रश्न आहे, त्याविषयी त्यांचा संग करू नये. समजा, आपल्याच परिवारातली एक व्यक्ती आपल्या कर्मानुसार द्वेषी स्वभावाची असेल, तर काय तिचा परित्याग करायचा? कधीच नाही, अनासक्त होऊन त्या व्यक्तीसोबत व्यावहारिक कार्ये तर करावीत, परंतु पारमार्थिक विषयांत त्यांचा संग करू नये. हीच त्या व्यक्तीची उपेक्षा होय. परमार्थासंबंधी मिलन, त्यासंबंधी कथोपकथन, परस्पर उपकार आणि सेवा–अशी कार्येच पारमार्थिक संग आहे. असा संग न करण्याचे नावच उपेक्षा आहे.

द्वेषी व्यक्ती नाना प्रकारच्या मतवादांत पडून शुद्धभक्तीची प्रशंसा अथवा त्यासंबंधी कुठलाच सदुपदेश ऐकताच निरर्थक वाद-विवाद करते–त्यामुळे त्याचाही काही फायदा होत नाही आणि तुमचेही काही कल्याण होत नाही. अशा प्रकारे व्यर्थ तर्कापासून दूर राहून अशा लोकांसोबत केवळ व्यावहारिक संगमात्र करावा. जर असे म्हटले की, द्वेषी व्यक्तींनासुद्धा बालिशांच्या अंतर्गत मानून त्यांच्यावरही कृपा केली

तर बरे होईल, तर असे करण्याने कुठलाही उपकार होणे तर दूर, उलट आपलाही अपकारच होईल. उपकार अवश्य करा परंतु सावधान होऊन.

मध्यमाधिकारी शुद्ध भक्तांना या चार प्रकारच्या व्यवहारांचे अवश्य पालन करायला हवे. असे न केल्याने त्यांना आपल्या अधिकारानुसार आपल्या कर्तव्यांची अवहेलना केल्याने भीषण दोष लागतो–

**स्वे स्वेऽधिकारे या निष्ठा स गुणः परिकीर्त्तितः।**
**विपर्ययस्तु दोषः स्यादुभयोरेष निर्णयः॥**

(श्रीमद्भा. ११/२१/२)

अर्थात, आपापल्या अधिकारानुसार धर्मात दृढ निष्ठा ठेवणे हाच गुण आहे आणि या विपरीत अनधिकार प्रयत्न करणेच दोष आहे. तात्पर्य हे की गुण आणि दोष दोघांचा निर्णय अधिकारानुसार केला जातो, कुठल्या वस्तूच्या अनुसार नाही.

मध्यमाधिकारी शुद्ध भक्तांचे हे कर्तव्य आहे की त्यांनी शास्त्रयुक्तीद्वारा ईश्वराप्रती प्रेम, शुद्ध भक्तांशी मित्रता, बालिश अर्थात अतत्त्वज्ञ व्यक्तींप्रती कृपा आणि द्वेषी मनुष्यांची उपेक्षा करावी. भक्तीच्या तारतम्याने मित्रतेचे तारतम्य, बालिशांची मूर्खता आणि सरलतेच्या तारतम्याने त्यांच्यावरील कृपेचे तारतम्य आणि द्वेषी व्यक्तींच्या द्वेषाच्या तारतम्यापेक्षा उपेक्षेचे तारतम्य उपयुक्त असते. या सगळ्यांचा विचार करीत मध्यम कोटीचे भक्तजन पारमार्थिक व्यवहार करतील. लौकिक व्यवहारास पारमार्थिक व्यवहाराच्या अधीन सरलतेने करावयास हवे.

बडगाछीवाल्या नित्यानन्ददासाने मध्येच प्रश्न विचारला–प्रभो! उत्तम कोटीच्या वैष्णवांचा व्यवहार कसा असतो?

बंधू! तू एक प्रश्न तर आधीच तर विचारला आहेस, मी त्याचेच उत्तर देतोय. माझे बोलणे तर संपू दे. मी आता वृद्ध झालोय, स्मरण शक्तीपण कमी झालीय. प्रसंगवश ज्या गोष्टी आता लक्षात आहेत, प्रसंग बदलल्यावर त्या विसरूनही जाईन. हरिदास बाबाजींनी काहीसे संकोचत म्हटले.

बाबाजी थोड्या कडक प्रवृत्तीचे संत आहेत. यद्यपि ते कुणाचाच कुठलाच दोष घेत नाहीत, तरीही अन्यायपूर्ण गोष्टींचे उत्तर त्याच वेळी फटकन देऊनही टाकतात. त्यांचे बोलणे ऐकून सगळेच निस्तब्ध झाले.

बाबाजींनी वटवृक्षाखालील नित्यानन्द प्रभूंस एकवार पुनः दंडवत प्रणाम केला आणि म्हणाले–जेव्हा मध्यमकोटींच्या वैष्णवांची भक्ती साधन आणि भावावस्थेस पार करून प्रेमावस्थेत पोहोचून अतिशय प्रगाढ होते, त्यावेळी मध्यमाधिकारी भक्त उत्तम भक्ताच्या कोटीत सामील होतात. श्रीमद्भागवतात उत्तम वैष्णवांचे लक्षण याप्रमाणे सांगितले आहे–

**सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः।**
**भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः॥**[३]

(श्रीमद्भा. ११/२/४५)

जे समस्त प्राण्यांमध्ये भगवंतासोबत संबंधजनित प्रेममयभावांची उपलब्धी करतात आणि त्याचबरोबर भगवंतातही समस्त प्राण्यांच्या संबंधजनित प्रेममयभावांची उपलब्धी करतात, ते उत्तम कोटीचे वैष्णव आहेत. या प्रेममय भावाव्यतिरिक्त कुठलाही दुसरा भाव त्यांच्यात दिसत नाही. भगवंतासोबत संबंधजनित दुसरे भावसुद्धा कधी-कधी त्यांच्यात प्रकाशित होतात. अशा भावांस प्रेमाचा विकार समजावा. उदाहरण-स्वरूप, उत्तम भागवत असूनही शुकदेव गोस्वामींनी कंसाप्रती 'भोजपांशुल' आदी ज्या शब्दांचा प्रयोग केला आहे, ते द्वेषपूर्ण आहेत असे प्रतीत होते, परंतु वास्तवात द्वेषपूर्ण नाहीत–प्रेमाचे विकार आहेत. अशा प्रकारेच जेव्हा भक्तांचे जीवन शुद्धप्रेममय होऊन जाते, तेव्हा त्यांना 'उत्तम भागवत' म्हटले जाते. अशा अवस्थेत मध्यमाधिकाराच्या प्रेम, मैत्री, कृपा आणि उपेक्षारूप व्यवहारांच्या तारतम्याचा विचारच होत नाही, उलट त्यांचे सर्व व्यवहार प्रेमाकार होऊन जातात. त्यांच्या दृष्टीने उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ वैष्णवांच्या अथवा वैष्णव आणि अवैष्णवाचा कुठलाच भेद राहात नाही. अशी अवस्था अत्यंत दुर्लभ असते.

---

(३) जे समस्त प्राणिमात्रांमध्ये आत्म्याचे आत्मा स्वरूप श्रीकृष्णचन्द्रास पाहतात आणि आत्म्याच्याही आत्मा स्वरूप कृष्णचन्द्रात सर्व प्राणिमात्रांना पाहतात, ते उत्तम भागवत आहेत.

आता पाहा, कनिष्ठ वैष्णव तर वैष्णवांची सेवाच करीत नाहीत आणि उत्तम वैष्णवांच्या दृष्टीने वैष्णव-अवैष्णवाचा काही विचार-भेद्च राहात नाही, कारण ते प्राणीमात्रास कृष्णदासाच्या रूपात पाहतात. म्हणूनच वैष्णव-सेवा आणि वैष्णव-सन्मान–केवळमात्र मध्यमाधिकारी वैष्णवांचेच व्यवहार आहेत. मध्यम कोटीच्या वैष्णवांकरिता–जे एकदाच कृष्णनाम उच्चारण करतात, जे निरंतर कृष्णनाम करतात आणि ज्यांचे दर्शन केल्यानेच दर्शकाच्या मुखात कृष्णनाम स्वतः नृत्य करू लागते–या तीनही प्रकारच्या वैष्णवांची सेवा करणे आवश्यक आहे. त्यांनी वैष्णव, वैष्णवतर आणि वैष्णवतमाच्या तारतम्यानुसार तीन प्रकारच्या वैष्णवांची सेवा करावयास हवी. "हे उत्तम वैष्णव आहेत, हे मध्यम वैष्णव आहेत आणि हे कनिष्ठ वैष्णव आहेत असा विचार करू नये." अशा गोष्टी केवळ उत्तम वैष्णवाधिकारातच संभव आहेत. जर मध्यमाधिकारी वैष्णव अशा गोष्टी सांगतात, तर ते याकरिता अपराधी असतात.

याविषयी श्रीचैतन्य महाप्रभूंनी कुलीन गावच्या भक्तांना संकेताद्वारे समजाविले होते. मध्यमाधिकारी वैष्णवमात्राकरिता श्रीमन् महाप्रभूंची उपदेशवाणी वेदांहूनही अधिक मान्य आहे. वेद अथवा श्रुती कोणास म्हणतात? उत्तर असे आहे की–परमेश्वराची आज्ञाच वेद आहे. इतके बोलून हरिदास बाबाजी क्षणभर गप्प बसले.

मी आता काही विचारू शकतो का? नित्यानन्ददासाने हात जोडून मोठ्या नम्र शब्दात विचारले.

हरिदास बाबाजी उत्तरले–आनंदाने विचारू शकतोस!

नित्यानन्ददासाने जिज्ञासा केली–बाबाजी! आपण मला कुठल्या श्रेणीचा वैष्णव समजता? अर्थात, मी कनिष्ठ वैष्णव आहे की मध्यम वैष्णव? उत्तम वैष्णव तर मी कदापिही असूच शकत नाही.

हरिदास बाबाजी हसतच म्हणाले–बंधू! नित्यानन्ददास नाम ग्रहण केल्यानंतरही उत्तम वैष्णव होणे बाकी राहते का? माझे निताई मोठे दयाळू आहेत, मार खाऊनही प्रेम प्रदान करतात. मग त्यांचे नाम ग्रहण केल्यावर आणि त्यांचा दास झाल्यावर शिल्लक काय राहते?

नित्यानन्ददास–प्रभो! मी सरलतापूर्वक माझा अधिकार जाणू इच्छितो.

हरिदास–तर मग तू स्वतःविषयी सगळी माहिती सांग, जर निताई माझ्याकडून काही बोलविणार असतील तर मी अवश्यच सांगेन.

नित्यानन्ददास–पद्मावती नदी किनारी एका छोट्याश्या गावात माझा जन्म झाला. माता-पिता नीच जातीचे होते. लहानपणापासूनच मी खूप साधा-सरळ आणि नम्र स्वभावाचा होतो. असत् संगापासून सर्वदा दूर राहत असे. छोट्या वयातच माझा विवाह झाला. काही दिवसांनी माता-पित्याचे देहावसान झाले. घरात आता मी आणि माझी पत्नी–दोघेच प्राणी होतो. काही विशेष संपत्ती नव्हती, रोज कमवून खात होतो. अशा प्रकारे आमचे दिवस सुखाने चालले होते. परंतु हे सुख अधिक दिवस राहिले नाही. माझे विश्व उध्वस्त करीत माझी पत्नी मला एकट्याला सोडून मृत्यू पावली. पत्नी-वियोगाने माझ्या हृदयात संसाराप्रती काहीसे वैराग्य निर्माण झाले. माझ्या पूर्वाश्रमानिकटच बडगाछी गाव आहे. त्यावेळी खूपसे गृहत्यागी वैष्णव तेथे भजन करण्यास येत. लोक त्यांचा खूप सन्मान करीत. मी आधीपासूनच तेथे बहुधा जात असे. माझ्या मनातही तसाच सन्मान मिळवण्याची तीव्र आकांक्षा निर्माण झाली. त्यातच पत्नी-वियोग झाल्याने संसाराविषयी आता कसलेच आकर्षण उरले नव्हते. मी सरळ बडगाछीला पळून आलो आणि क्षणिक वैराग्याच्या आवेशात वैष्णव-वेषही ग्रहण केला.

काही दिवस व्यतीत होताहोताच माझे मन चंचल झाले. हृदयात नाना प्रकारचे वाईट विचार तरळू लागले. स्वतःला सावरणे अत्यंत कठीण झाले. परंतु माझे सौभाग्य म्हणा, मला एका शुद्ध आणि सरल वैष्णवाचा संग मिळाला. आजकाल ते व्रजात भजन करीत आहेत. माझ्याविषयी त्यांना खूप स्नेह होता. त्यांनी मला बरेचसे सदुपदेश प्रदान केले आणि आपल्याबरोबर ठेवून माझे चित्त शोधन केले.

आता माझ्या मनात वाईट विचार येत नाहीत. एक लाख हरिनाम करण्याची इच्छा होते. नाम आणि नामीस अभेद आणि चिन्मय समजतो. एकादशी आणि हरि-तिथींचे विधिवत पालन करतो. तुळशीस जलदान आदी करतो. जेव्हा वैष्णवजन कीर्तन करतात, तेव्हा मी ही त्यांच्यासोबत थोड्या जास्तच आवेशात कीर्तन करतो. वैष्णवांचे चरणामृत पान करतो, नियमित थोड्या-फार भक्ती-ग्रंथांचे वाचनही करतो. उत्तमोत्तम भोजन आणि उत्कृष्ट वस्त्रांची अशी कुठलीच कामना राहिली नाही. व्यर्थ

बडबड आवडत नाही. वैष्णवांना पाहताच त्यांच्या चरणी लोळण घेण्याची इच्छा होते आणि अधूनमधून तसे करतोही, परंतु बरेचदा थोड्या प्रतिष्ठेच्या आशेने. आता आपण कृपा करून सांगा, मी कुठल्या श्रेणीतला वैष्णव आहे तथा माझा व्यवहार कसा असायला हवा?

हरिदास बाबाजींनी वैष्णवदास बाबाजी महाराजांकडे पाहात हसून म्हटले– सांगा तरी, नित्यानन्ददास कुठल्या श्रेणीचा वैष्णव आहे?

वैष्णवदास–जे काही मी ऐकले, त्यावरून असे वाटते की ते कनिष्ठाधिकारास पार करून मध्यमाधिकारात प्रवेश करते झाले आहेत.

हरिदास–माझापण असाच समज आहे.

नित्यानन्ददास–बरे झाले, आज मी वैष्णवांच्या मुखातून आपला अधिकार जाणला. आपण सर्वांनी कृपा करा, की मी क्रमशः उत्तम अधिकारी होऊ शकेन.

वैष्णवदास–वेष घेतांना आपल्या हृदयात प्रतिष्ठेची कामना होती. त्यावेळी आपण वेषाचे अधिकारी नव्हता, म्हणूनच त्यावेळी आपले वेष घेणे अनाधिकार चर्चारूप दोषांनी दूषित होते. ते काही असो, वैष्णवांच्या कृपेने आपले यथेष्ट कल्याणच झाले आहे.

नित्यानन्ददास–माझ्यात अजूनही थोडीफार प्रतिष्ठेची आशा आहे. अजूनही आपल्या डोळ्यांतील पाणी आणि तऱ्हेतऱ्हेच्या भावांनी लोकांना आकर्षित करून उच्च सन्मान मिळवण्याची इच्छा होते.

हरिदास–यत्नपूर्वक याचा परित्याग करायला हवा; नाहीतर त्यामुळे भक्तीचा क्षय होण्याची भीती असते. लक्षात ठेव, जर भक्ती क्षय झाली तर पुनः कनिष्ठ अधिकारात उतरावे लागेल. काम-क्रोध आदी षड्रिपू दूर झाल्यावरही प्रतिष्ठेची आशा दूर होत नाही. ही वैष्णवांची सर्वात जबरदस्त शत्रू आहे. ही साधकास सहजच सोडत नाही, विशेषतः छाया भावाभासास सोडून सच्चा भावाचा एक बिंदू असणेही कल्याणप्रद आहे.

आपण कृपा करा. असे म्हणत-म्हणत नित्यानन्ददासाने हरिदास बाबाजींच्या चरणांची धूळ घेऊन आपल्या मस्तकी धारण केली. पायांची धूळ घेताना

पाहून बाबाजी मोठे संकोचले आणि पटकन उठून त्यांनी नित्यानन्ददासास छातीशी कवटाळले आणि त्याला आपल्या जवळ बसवून त्याच्या पाठीवरून हात फिरवू लागले. नित्यानन्दांच्या डोळ्यांतून घळाघळा अश्रू वाहू लागले. हरिदास बाबाजीही लाख प्रयत्न करूनही आपले अश्रू थांबवू शकले नाहीत. एक अपूर्व भाव उदित झाला. उपस्थित सर्व वैष्णवांचे डोळे भरून आले. नित्यानन्ददासाचे जीवन आज सार्थक झाले. त्याने मनोमन हरिदास बाबाजींस आपले गुरु मानले.

भाव शांत झाल्यावर नित्यानन्ददासाने पुनः विचारले–भक्तीच्या संबंधात कनिष्ठ भक्तांचे मुख्य लक्षण काय आहे? आणि गौण लक्षण काय आहे?

हरिदास–भगवंताच्या नित्य स्वरूपात विश्वास आणि भगवंताच्या अर्चा मूर्तींची पूजा–ही कनिष्ठ वैष्णवांची दोन मुख्य लक्षणे आहेत. त्यांचे श्रवण, कीर्तन, स्मरण आणि वंदनादी अनुष्ठानसमूह गौण लक्षणे आहेत.

नित्यानन्ददास–नित्य-स्वरूपात विश्वास झाल्याशिवाय आणि अर्चामूर्तींच्या विधींचा अवलंब केल्याशिवाय वैष्णव होता येत नाही; म्हणूनच ही दोन मुख्य लक्षणे आहेत–यास मी व्यवस्थित समजलो. परंतु त्यांचे श्रवण, कीर्तन आदी अनुष्ठान गौण लक्षणे का आहेत?

हरिदास–कनिष्ठ वैष्णवांस शुद्धभक्तीच्या स्वरूपाचा बोध होत नाही. श्रवण, कीर्तन, आदी शुद्धभक्तीचे अंग आहेत. शुद्धभक्तीच्या स्वरूपबोधाच्या अभावी त्यांच्या श्रवण आणि कीर्तन आदी क्रिया मुख्य धर्माच्या रूपात प्रकाशित होत नाहीत, उलट गौणरूपात प्रकाशित होतात. विशेषतः सत्त्व, रज आणि तम–हे तिन्ही प्रकृतीचे गुण आहेत. म्हणूनच या क्रिया गुणांपासून उत्पन्न अर्थात गौण म्हणवल्या जातात. परंतु जर ही अनुष्ठानसमूह निर्गुण रूपात असतील तर ती भक्तीचे अंग ठरतात. ज्यावेळी ही अनुष्ठाने निर्गुणतेस प्राप्त करतात, त्यावेळी मध्यमाधिकार उपस्थित होतो.

नित्यानन्ददास–कनिष्ठ वैष्णवांमध्ये कर्म आणि ज्ञान-रूप दोष जोपर्यंत वर्तमान राहतो; तथा भगवद्भक्तीपेक्षा इतर नाना प्रकारच्या कामना त्यांच्या हृदयात भरपूर असतात, तोपर्यंत त्यांना भक्ताची उपाधी कशी काय दिली जाऊ शकते?

हरिदास–भक्तीचे मूळ श्रद्धा आहे. ज्यांच्यात ही श्रद्धा उत्पन्न झाली, ते त्याच वेळी भक्तीचे अधिकारी बनतात. म्हणून यात काहीच संदेह नाही की ते भक्तीच्या द्वारी

येऊन पोहोचलेले आहेत. 'श्रद्धा' शब्दाचा अर्थ 'विश्वास' आहे. कनिष्ठ भक्तांना जेव्हा श्रीमूर्तिप्रती विश्वास निर्माण होतो, ते भक्ति-अधिकारी बनतात.

नित्यानन्ददास–ते केव्हा भक्ती प्राप्त करू शकतात?

हरिदास–जेव्हा त्यांचे ज्ञान आणि कर्मरूप दोष दूर होतील, अनन्यभक्ती व्यतिरिक्त अन्य समस्त अभिलाषांचा त्यांच्यात सर्वथा अभाव होऊन जाईल, तथा भक्त सेवेस अतिथी सेवेपेक्षा भिन्न जाणून जेव्हा भक्तीच्या अनुकूलस्वरूपा भक्तसेवेप्रती त्यांची रुची उत्पन्न होईल, तेव्हा ते मध्यमाधिकारी भक्तांच्या श्रेणीत दाखल होतील.

नित्यानन्ददास–शुद्धभक्ती, संबंधज्ञानासोबत उत्पन्न होते, त्यांच्यात संबंधज्ञान निर्माणच कधी झाले, ज्यामुळे ते शुद्धभक्तीचे अधिकारी बनतील?

हरिदास–मायावादरूप दूषित-ज्ञान दूर झाल्यावर यथार्थ संबंधज्ञान आणि शुद्धभक्ती एकत्रितच प्रकाशित होतात.

नित्यानन्ददास–कधीपर्यंत होतात?

हरिदास–ज्यांच्या सुकृतीत जितकी अधिक शक्ती असते.

नित्यानन्ददास–सुकृतीद्वारे सर्वप्रथम काय होते?

हरिदास–सत्संग प्राप्त होतो.

नित्यानन्ददास–सत्संगानंतर काय होते?

हरिदास–श्रीमद्भागवतात भक्तीच्या क्रम-विकासाचे सुंदर विवेचन आहे–

**सतां प्रसंगान्मम वीर्यसम्विदो भवन्ति हृत्कर्णरसायनाः कथाः।**
**तज्जोषणादाश्वपवर्गवर्त्मनिश्रद्धारतिर्भक्तिरनुक्रमिष्यति॥**(४)

(श्रीमद्भा. ६/२५/२५)

---

(४) सत्पुरुषांच्या समागमाने माझ्या पराक्रमांचे यथार्थ ज्ञान करविणाऱ्या तथा हृदय आणि कानांना प्रिय वाटणाऱ्या वीर्यवती कथा होतात. त्यांचे सेवन केल्याने शीघ्रच अविद्यानिवृत्तीच्या पथ-स्वरूप माझ्यात श्रद्धा, रती आणि प्रेमभक्तीचा क्रमशः प्रकाश होतो.

सत्संगात हरिकथा श्रवण केल्याने क्रमशः श्रद्धा, रती आणि भक्ती प्रकाशित होते.

नित्यानन्ददास–सत्संगाची प्राप्ती कशी होते?

हरिदास–आधीच सांगितले आहे की सत्संग सुकृतीने प्राप्त होतो.

**भवापवर्गो भ्रमतो यदा भवेज्जनस्य तर्ह्यच्युतसत्समागमः।**
**सत्सङ्गमो यर्हि तदैव संङ्गतौ परावरेशे त्वयि जायते रति॥**(५)

(श्रीमद्भा. १०/५१/५३)

नित्यानन्ददास–जर साधुसंगाद्वारेच कनिष्ठ भक्तांची श्रीमूर्तीत रुची रुची उत्पन्न होते, तर या कथनाचे तात्पर्य काय आहे की ते साधू-सेवा करीत नाहीत?

हरिदास–दैवयोगाने सत्संग प्राप्त झाल्यावर श्रीमूर्तिप्रती विश्वास निर्माण होतो, परंतु भगवत्-पूजा आणि साधू-सेवा दोन्ही एकत्रितपणे होणे आवश्यक आहे. जोपर्यंत अशी श्रद्धा उत्पन्न होत नाही, तोपर्यंत अशा श्रद्धेला पूर्ण श्रद्धा म्हटले जाऊ शकत नाही, तथा तोपर्यंत अनन्य भक्तीतही अधिकार होत नाही.

नित्यानन्ददास–कनिष्ठ भक्तांच्या उन्नतीचा काय क्रम आहे?

हरिदास–ज्यांची श्रीमूर्तीच्या प्रती श्रद्धा तर उत्पन्न झालेली आहे, परंतु कर्म आणि ज्ञानरूप दोष तथा कृष्णेतर अभिलाषा दूर होऊ शकलेल्या नाहीत, ते प्रतिदिन भगवंताची पूजा-अर्चा करतात. घटनावश अतिथीरूपात कुणी साधू त्यांच्या निकट उपस्थित होतो. ते इतर अतिथींप्रमाणे त्या साधू महात्म्याचाही सत्कार करतात. त्याबरोबरच ते त्या साधूच्या क्रिया आणि व्यवहारांना लक्ष्य बनवतात; तथा साधूद्वारा केली गेलेली शास्त्रचर्चा श्रवणही करतात, अशा प्रकारे बघून आणि ऐकून कनिष्ठ भक्तांच्या हृदयात साधूंच्या चरित्राप्रती आदरभाव निर्माण होतो.

---

(५) आपल्या स्वरूपात नित्य स्थित राहणाऱ्या भगवंता! जीव अनादी काळापासून जन्म-मृत्युरूप संसारचक्रात भटकत आहे. जेव्हा या चक्रातून मुक्त होण्याची वेळ येते तेव्हा त्यास सत्संग प्राप्त होतो. हे निश्चित आहे की ज्या क्षणी सत्संग प्राप्त होतो, त्याच क्षणी संतांचे आश्रयस्थान चित् आणि अचिताचे ईश्वर आपल्यात जिवाची बुद्धी अत्यंत दृढतेने लागते.

अशा दशेत आपल्या त्रुटींवर त्यांची दृष्टी पडते. ते त्या साधू चरित्राचे अनुसरण करीत आपल्या चरित्रात सुधारणा करण्याचा प्रयत्न करतात. हळू-हळू त्यांचे कर्म आणि ज्ञानरूप दोष क्षीण होऊ लागतात. हृदय जितके अधिक शुद्ध होते, भक्तिमुळे इतर अभिलाषा तितक्याच अधिक हृदयातून दूर होतात. भगवत्तत्त्व आणि भगवत्कथा ऐकता-ऐकता शास्त्र चर्चा होते. हरीची निर्गुणता, हरिनामाची निर्गुणता आणि श्रवण, कीर्तन आदी भक्तीच्या अंगांची निर्गुणता यावर ते जितके अधिक विचार करतील, तितके त्यांचे संबंधज्ञान क्रमशः दृढतर होऊन जाते आणि ज्या वेळेस त्यांचे संबंधज्ञान संपूर्ण होऊन जाते, त्यांचा मध्यमाधिकारही त्याचवेळी उपस्थित होत जातो. याचवेळी त्यांचा वास्तविक रूपात साधुसंग आरंभ होतो. आता ते साधूंना साधारण अतिथींच्या श्रेणीतून वेगळे करून–अत्यंत श्रेष्ठ मानून त्यांच्याप्रती गुरू बुद्धी ठेवू लागतात.

नित्यानन्ददास–बऱ्याचशा कनिष्ठ भक्तांची उन्नती पाहिली जात नाही याचे कारण काय आहे?

हरिदास–द्वेषी संग प्राबल्य असल्याने कनिष्ठाधिकार क्रमशः क्षीण होऊन जातो आणि त्या जागी ज्ञान आणि कर्माधिकार प्रबळ होतो. काही काही ठिकाणी अधिकार क्षीणही होत नाही आणि उन्नतीही होत नाही–अगदी स्थिर राहतो.

नित्यानन्ददास–असे केव्हा होते?

हरिदास–जेथे साधु-संग आणि द्वेषी-संग समान रूपाने चालतात.

नित्यानन्ददास–कुठल्या अवस्थेत निश्चित रूपाने प्रगती होते.

हरिदास–जेथे सत्संग प्रबळ आणि द्वेषी संग दुर्बळ होतो.

नित्यानन्ददास–कनिष्ठाधिकारींमध्ये पाप-पुण्याची प्रवृत्ती कशी असते?

हरिदास–प्रथमावस्थेत कर्मी आणि ज्ञानींप्रमाणे, जसजशी त्यांची भक्तिवृत्ती निर्मळ होत जाते, त्यांची पाप-पुण्याची प्रवृत्तीही शिथिल होत जाते.

नित्यानन्ददास–प्रभो! कनिष्ठाधिकाराच्या बाबी माझ्या लक्षात आल्या, आता मध्यमाधिकारी भक्तांची लक्षणे सांगा.

हरिदास–श्रीकृष्णाप्रती अनन्यभक्ती, भक्तांप्रती आपुलकीचा भाव, त्यांच्याप्रती प्रगाढ ममत्व, त्यांच्या प्रती पूज्य आणि तीर्थ-बुद्धी ठेवीत मित्रता, अतत्त्वज्ञ व्यक्तींप्रती कृपा आणि द्वेषीजनांप्रती उपेक्षा–ही मध्यमाधिकारी भक्तांची मुख्य लक्षणे आहेत. संबंधज्ञानासोबत साधन भक्तीरूप अभिधेयाद्वारे कृष्णप्रेमरूप प्रयोजनाची सिद्धीच या अधिकाराची मुख्य प्रक्रिया आहे. साधारणतः या अवस्थेत निरपराध रूपात सत्संगामध्ये हरिनाम कीर्तन आदी परिलक्षित होते.

नित्यानन्ददास–त्यांचे गौण लक्षण काय आहे?

हरिदास–जीवनयात्रा हेच त्यांचे गौण लक्षण आहे. त्यांचे जीवन संपूर्णपणे श्रीकृष्णाच्या इच्छेच्या अधीन आणि भक्तीच्या अनुकूल असते.

नित्यानन्ददास–त्यांच्यात पाप अथवा अपराध राहू शकतो वा नाही?

हरिदास–प्रथम अवस्थेत थोडा फार अपराध राहू शकतो, परंतु ते हळू-हळू त्याचप्रकारे दूर होतात ज्याप्रमाणे चणे दळतांना सर्वप्रथम काही-काही लहानलहान तुकडे दिसतात, पण काही क्षणांतच दळून झाल्यावर त्या छोट्या तुकड्यांचे अस्तित्वही मिटून जाते. युक्तवैराग्य त्यांचा प्राण असतो.

नित्यानन्ददास–कर्म, ज्ञान आणि कृष्णेतर अभिलाषा त्यांच्यात थोडीफार असते किंवा नाही?

हरिदास–प्रथम अवस्थेत त्यांचा थोडाफार आभास तर राहतोच, परंतु नंतर तो ही निर्मळ होऊन जातो. प्रथम अवस्थेत जे काही राहते ते अधूनमधून यदाकदा दृष्टिगोचर होत राहते, परंतु हळू हळू पुनः अंतर्हित (अदृश्य) होऊन जाते.

नित्यानन्ददास–जीवित राहण्याची इच्छा त्यांच्यात असते की नाही? जर असते तर कशासाठी?

हरिदास–तसे बघितले तर त्यांच्यात जगण्या-मरण्याची अथवा मुक्त राहण्याची काहीच इच्छा नसते, तरीही केवळ भजनाच्या परिपक्वतेकरिता ते जगू इच्छितात.

नित्यानन्ददास–त्यांना मरण्याची इच्छादेखील होत नाही का? मेल्यानंतरच

तर कृष्णकृपेने स्वतःच्या स्वरूपात अवस्थिती होईल? या भौतिक शरीरात सुख तरी कसले आहे?

हरिदास–त्यांची कुठलीच स्वतन्त्र इच्छा नसते. त्यांच्या सगळ्या इच्छा कृष्णेच्छेच्या अधीन असतात. ते असे मानतात की प्रत्येक घटना कृष्णाच्या इच्छेनेच होते; जेव्हा त्यांची जशी इच्छा होते; तेव्हा तशाच घटना होतात. म्हणून त्यांना कुठलीच स्वतन्त्र इच्छा करण्याची आवश्यकता नसते.

नित्यानन्ददास–मी मध्यमाधिकारी भक्तांची लक्षणेसुद्धा समजलो, आता मला उत्तमाधिकारी भक्तांची गौण लक्षणे सांगा.

हरिदास–केवळ दैहिक क्रियाच त्यांचे गौण लक्षण आहे, तेसुद्धा निर्गुण प्रेमाच्या इतक्या अधीन की वेगळ्या रूपात गौण भाव दिसून येत नाही.

नित्यानन्ददास–प्रभो! कनिष्ठाधिकारीकरिता गृहत्यागाचा कुठलाच नियम नसतो, मध्यमाधिकारी गृहस्थ अथवा गृहत्यागी दोघांपैकी कुठल्याही अवस्थेत राहू शकतात, परंतु उत्तमाधिकारी भक्त गृहस्थ राहू शकतात का?

हरिदास–भक्तीचे तारतम्यच अधिकार निर्णयाची कसोटी आहे. गृहस्थ वा गृहत्यागी असल्यानेच कुठला अधिकार प्राप्त होऊ शकत नाही. उत्तमाधिकारी भक्त गृहस्थही राहू शकतात; त्यात काही दोष नाही. व्रजधामातले सगळे गृहस्थ भक्त उत्तमाधिकारी आहेत. आमच्या श्रीचैतन्य महाप्रभूंचे अनेक गृहस्थ भक्त होते; जे उत्तमाधिकारी होते. राय रामानन्द त्याचे जाज्वल्यमान उदाहरण आहेत.

नित्यानन्ददास–प्रभो! जर कुणी उत्तमाधिकारी भक्त गृहस्थ असतील आणि मध्यमाधिकारी भक्त गृहत्यागी असतील, तर त्यांचे एकदुसऱ्यांप्रती काय कर्तव्य असते?

हरिदास–निम्नाधिकारी उत्तमाधिकारीस दंडवत-प्रणाम करतील. हा नियम केवळ मध्यमाधिकारीस लागू आहे, कारण उत्तमाधिकारी भक्त प्रणाम आदींची अपेक्षा ठेवत नाहीत. ते सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी भगवत्-भावाचे दर्शन करीत असतात.

नित्यानन्ददास–बऱ्याचशा वैष्णवांना एकत्रित करून प्रसाद-सेवारूप महोत्सव करणे इष्ट आहे का?

हरिदास–जर कुठल्या कारणास्तव बरेचसे वैष्णव एका ठिकाणी एकत्रित झालेले असतील आणि कुणी मध्यमाधिकारी गृहस्थ भक्त त्यांची प्रसाद-सेवा करू इच्छित असेल, तर त्यात कुठलीच पारमार्थिक आपत्ती नसते. परंतु वैष्णव सेवेकरिता अधिक अवडंबर करणे योग्य नाही, कारण त्यामुळे राजस भाव निर्माण होतो. उपस्थित साधू-वैष्णवांस यत्नपूर्वक प्रसाद द्यावयास हवा. त्यामुळे वैष्णवांप्रती आदरभाव प्रदर्शित होऊ लागतो. म्हणूनच असे करणे कर्तव्यच ठरते. प्रसाद-सेवेकरिता केवळ शुद्ध वैष्णवांनाच निमंत्रित करावे.

नित्यानन्ददास–आमच्या बडगाछीत आजकाल एक नवीन जात निर्माण झाली आहे. हे लोक स्वतःस वैष्णव संतान म्हणवितात. गृहस्थ कनिष्ठाधिकारी लोक त्यांना आमंत्रण देऊन वैष्णव-सेवा (वैष्णव-भोजन) करवितात. त्यांचे हे कार्य कसे आहे?

हरिदास–त्या 'वैष्णव-संतानांना' शुद्धभक्तीची प्राप्ती झाली आहे काय?

नित्यानन्ददास–नाही तर, त्या लोकांपैकी कुणातही शुद्धभक्ती दिसत नाही. ते स्वतःच स्वतःस वैष्णव म्हणवितात. त्यांपैकी कुणी-कुणी कौपीनही धारण केलेले आहे.

हरिदास–सांगू शकत नाही, अशा पद्धतीचे प्रचलन झाले तरी कसे? असे न होणेच उचित आहे. असे जाणवते की कनिष्ठ वैष्णवांमध्ये वैष्णव ओळखण्याच्या शक्तीचा अभावच याचे कारण आहे?

नित्यानन्ददास–वैष्णव संतानाकरिता काही विशेष सन्मान आहे का?

हरिदास–सन्मान वैष्णवतेचाच आहे, जर वैष्णव-संतान शुद्ध वैष्णव असतील तर ते आपल्या भक्तीच्या तारतम्यानुसार सन्मानाचे अधिकारी ठरतात.

नित्यानन्ददास–आणि जर वैष्णव-संतान केवळ व्यावहारिक मनुष्य असतील तर?

हरिदास–तर त्यांच्या प्रती साधारण मनुष्योचित व्यवहारच योग्य आहे. ते वैष्णवोचित सन्मानाचे अधिकारी नाहीत. याविषयी श्रीमन् महाप्रभूंचा उपदेश सर्वदा स्मरणात ठेवण्यासारखा आहे–

**तृणादपि सुनीचेन तरोरपि सहिष्णुना।**
**अमानिना मानदेन कीर्त्तनीयः सदा हरिः॥**

(शिक्षाष्टक–३)

तृणापेक्षाही अधिक दीनहीन, वृक्षापेक्षाही अधिक सहिष्णू तथा स्वयं मानशून्य होऊन दुसऱ्यांना मान प्रदान करीत श्रीहरिनाम संकीर्तन करणेच एकमात्र कर्तव्य आहे.

स्वयं मानशून्य असावयास हवे तथा दुसऱ्यांना यथायोग्य सन्मान द्यावयास हवा. वैष्णवांस वैष्णवोचित सन्मान द्यावयास हवा, तथा जे वैष्णव नाहीत, त्यांना मानवोचित सन्मान देणेच योग्य आहे. दुसऱ्यांप्रती मानद (मान देणारा) न झाल्याने हरिनामात अधिकार उत्पन्न होत नाही.

नित्यानन्ददास–स्वयं अमानी कसे होता येते?

हरिदास–मी ब्राह्मण आहे, मी धनी आहे, मी विद्वान आहे, मी संन्यासी आहे–असा अभिमान करू नये. लोक सन्मान करतात–करू देत, परंतु अशा सन्मानांची जराही आशा ठेऊ नये. स्वतःस सदैव दीनहीन अकिंचन आणि तृणाहूनही अधिक नीच समजावे.

नित्यानन्ददास–यावरून तर हेच समजते की दैन्य आणि दयेशिवाय वैष्णव होता येत नाही.

हरिदास–अगदी बरोबर.

नित्यानन्ददास–मग भक्ती दैन्य आणि दया सापेक्ष आहे का?

हरिदास–तसे नाही, भक्ती पूर्ण निरपेक्ष आहे. भक्ती स्वयं सौंदर्य आहे; आणि स्वयं अलंकारही आहे. ती कुठल्याही सद्गुणाची अपेक्षा ठेवीत नाही. दैन्य आणि दया काही वेगवेगळे गुण नाहीत–भक्तीच्या अंतर्गतच आहेत. "मी कृष्णाचा दास आहे,

अकिंचन आहे, दीनहीन आहे–कंगाल आहे, कृष्णच माझे सर्वस्व आहेत.''–येथे जी भक्ती दिसून येते–तेच दैन्य आहे. श्रीकृष्णाप्रती आर्द्रभावच भक्ती आहे, अन्य सर्व जीव कृष्णदास आहेत, त्यांच्याप्रती आर्द्रभाव दया आहे. म्हणून दया–कृष्णभक्ती अंतर्गत असणारी क्रिया आहे. दया आणि दैन्य यांच्या मध्यवर्ती असणाऱ्या भावास 'क्षमा' म्हणतात. ''मी दीनहीन आहे, मी इतरांचा दंडदाता आहे का?''–जेव्हा हे भाव दयेसोबत मिलित होतात, त्यावेळी क्षमा आपोआपच उपस्थित होते, क्षमाच भक्तिअंतर्गत व्यापार आहे. कृष्ण-सत्य आहेत, जीवांचे कृष्णदास्यही सत्य आहे, जड-जगत जिवांचा पांथ निवास आहे–हेही सत्य आहे, तेव्हा भक्तीही सत्य आहे, कारण कृष्णाप्रती जिवांच्या दास्यभावाचे नावच भक्ती आहे. सत्य, दैन्य, दया आणि क्षमा–हे चारही भक्तिअंतर्गत भावविशेष आहेत.

नित्यानन्ददास–अन्यान्य धर्मावलंबिंप्रती वैष्णवांचा व्यवहार कसा असावा?

हरिदास–श्रीमद्भागवताचा उपदेश आहे–

**नारायणकलाः शान्ताः भजन्ति ह्यनसूयवः।**

(श्रीमद्भा. १/२/२६)

अर्थात, अनिंदक आणि शांत स्वभावाचे संतजन नारायण तथा त्यांच्या अंश आणि कला स्वरूपांची आराधना करतात.

वैष्णवधर्माच्या अतिरिक्त आणखी कुठलाच धर्म नाही. या व्यतिरिक्त जितके धर्म प्रचारित झाले आहेत, अथवा पुढे होतील, ते सर्व वैष्णव धर्माचे सोपान आहेत अथवा विकृती. सोपान असणाऱ्या स्थानीय धर्मांचा यथायोग्य आदर करावा आणि विकृत धर्मांप्रती द्वेषशून्य राहून स्वतः भक्तितत्त्वाचे अनुशीलन करावे. दुसऱ्या धर्मावलंबिंप्रती हिंसा-द्वेष भाव ठेवू नये. जेव्हा त्यांचे शुभदिन उगवतील तेव्हा ते अनायासेच वैष्णव बनतील–यात संदेह नाही.

नित्यानन्ददास–वैष्णवधर्माचा प्रचार करणे कर्तव्य आहे किंवा नाही?

हरिदास–कर्तव्य आहे आणि अवश्य कर्तव्य आहे. आपल्या श्रीचैतन्य महाप्रभूंनी सर्वांवरच या धर्माच्या प्रचाराचा भार सोपविला आहे–

**नाचो गाओ भक्त–संगे कर संकीर्तन। कृष्णनाम उपदेशि, तारो सर्वजन॥**
**अतएव माली आज्ञा दिल सबाकारे। जाहाँ ताहाँ प्रेम फल देह जारे तारे॥**

(श्रीचैतन्यचरितामृत)

हो, एक गोष्ट सर्वदा स्मरणात ठेवावी ती ही की कुपात्रास सुपात्र बनवून नामोपदेश करावा, कुपात्रास नाम देऊ नये. जेथे उपेक्षेची आवश्यकता असते, तेथे अशा शब्दांचा प्रयोग करू नये ज्यामुळे प्रचार कार्यात बाधा उपस्थित होईल.

हरिदास बाबाजींची अमृतमयी मधुरवाणी ऐकून नित्यानन्ददास प्रेमविभोर होऊन बाबाजींच्या चरणी लोळण घालू लागले. वैष्णवांच्या तुमुल हरिध्वनीने सगळे उपवन दुमदुमले. सभा भंग पावली. बाबाजी महाशयांना दंडवत प्रणाम करून सगळे आपापल्या स्थानी परतले.

**॥ आठवा अध्याय समाप्त ॥**



# नववा अध्याय (नित्य धर्म आणि प्राकृत विज्ञान तथा सभ्यता)

लाहिडी महाशयांस गोद्रुमी राहून आता तीन चार वर्षे होत आली होती. आता त्यांचे हृदय अत्यंत पवित्र झाले आहे. खाता-पिता, चालता-फिरता, उठता-बसता, झोपेत-जागेपणी सर्वसमयी हरिनामच करतात, साधारण कपडे घालतात, चपला अथवा खडावांचा वापर मुळीच करीत नसत, जातीचा अभिमान तर इतका दूर झाला की कुणा वैष्णवांस पाहताच श्रद्धेने दंडवत प्रणाम करतात, तथा बलपूर्वक त्यांची चरणधूळ ग्रहण करतात. शोधून-शोधून वैष्णवांचे उच्छिष्ट भोजन करतात. कधी-कधी त्यांच्याकडे त्यांचे पुत्रही येत असतात, परंतु पित्याच्या मानसिक भावांस लक्ष्य करताच तेथून लगेचच पळ काढीत असत–घरी परतण्याचा प्रस्ताव मांडण्याचे त्यांचे साहसच होत नसे. लाहिडी महाशयांना पाहताच वाटते की कुणी वेषधारी बाबाजी बसलेले आहेत. गोद्रुमाच्या वैष्णवांच्या सिद्धांतांस उत्तम प्रकारे समजून घेऊन त्यांनी ठरविले की बाहेरून संन्यास घेऊन कुठलाच लाभ होत नाही, तर हृदयात सच्चे वैराग्य अवतरण्याची आवश्यकता आहे. श्री सनातन गोस्वामींप्रमाणे आपल्या आवश्यकतांस संकुचित करण्याच्या उद्देशाने त्यांनी एकाच धोतराचे चार तुकडे केलेले आहेत. त्यांच्या खांद्यावर यज्ञोपवित झुलते आहे. जेव्हा केव्हा त्यांचे पुत्र त्यांना आर्थिक सहाय्यता देण्याकरता येतात, तेव्हा–"मी विषयी लोकांची एक कवडीही ग्रहण करू शकत नाही"–असे म्हणून टाळतात. एकदा चन्द्रशेखरने कुठल्याशा उत्सवात खर्च करण्याकरिता शंभर रुपये देऊ पाहिले, परंतु लाहिडी महाशयांनी श्री रघुनाथदास गोस्वामींचे चरित्र स्मरण करून त्याचा अस्वीकार केला.

एकदा परमहंस बाबाजी म्हणाले–लाहिडी महाशय! आता आपल्यात थोडीसुद्धा अवैष्णवता उरली नाही. आम्ही तर केवळ वेष ग्रहण केलाय, परंतु आपल्याकडून आम्ही वैराग्याची शिकवणदेखील ग्रहण करू शकतो. जर आपले नावही वैष्णवनाम झाले तर अतिसुंदर होईल.

लाहिडी महाशयांनी मोठ्या विनम्र शब्दात उत्तर दिले–आपण माझे आजोबागुरू आहात,आपली जशी इच्छा असेल तसे करावे.

बाबाजी म्हणाले–आपले घर शान्तिपुरात आहे, म्हणून आम्ही आपल्याला 'श्रीअद्वैतदास' या नावाने बोलावू.

लाहिडी महाशयांनी दंडवत प्रणाम करीत नाम-प्रसादास ग्रहण केले. त्या दिवसापासून सगळे लोक त्यांना अद्वैतदास म्हणून बोलावू लागले. ते ज्या कुटीत भजन करीत, त्या कुटीस लोक अद्वैतकुटी म्हणू लागले.

अद्वैतदासांचे एक बाल्यबंधू होते. त्यांचे नाव दिगम्बर चट्टोपाध्याय होते. मुसलमानी राज्याच्या मोठमोठ्या पदांवर नोकरी करून त्यांनी प्रचुर धन आणि मान मिळविला होता; वय जास्त झाल्याने ते नोकरी सोडून आपल्या अम्बिका गावी राहू लागले होते. गावी पोहोचताच त्यांनी कालिदासास शोधणे सुरू केले. शोधता-शोधता कळले की कालिदास घर-दार सोडून गोद्रुमी 'अद्वैतदास' नाव स्वीकारून भजन करीत आहे.

दिगम्बर चट्टोपाध्याय कट्टर शाक्त आहेत. 'वैष्णव' शब्द ऐकताच कानात बोटे घालतात. आपल्या परममित्राची अशी अधोगती ऐकून खूप हैराण झाले. शेवटी आपल्या सेवकास बोलावून म्हणाले–वामनदास! एका नावेचा त्वरित प्रबंध कर, मी लगोलग गोद्रुमी जात आहे.

वामनदासाने त्वरित एका नावेचा प्रबंध केला. दिगम्बर चट्टोपाध्याय अत्यंत चतुर व्यक्ती आहेत. ते जसे तन्त्रशास्त्राचे मोठे पंडित आहेत, यवन सभ्यतेतही तसेच दक्ष पुरुष आहेत. अरबी आणि फारशीत तर मोठमोठे मौलवीही त्यांच्यासमोर हार मानतात. तन्त्रसंबंधी तर्कांमध्ये त्यांच्यासमोर मोठमोठ्या पंडितांची बोली बंद होते. दिल्ली आणि लखनौ आदी प्रसिद्ध शहरांमध्ये बरीच ख्याती प्राप्त करून आलेत. अवकाशकाळी त्यांनी 'तर्क-संग्रह' नामक एका ग्रंथाची रचना केली आहे. अनेक श्लोकांच्या टीकांमध्ये त्यांनी आपल्या प्रगाढ पांडित्याचा परिचय दिला आहे.

'तन्त्र-संग्रह' ग्रंथ घेऊन दिगम्बर त्वरेने नावेत जाऊन बसले. सहा तासांतच नाव श्रीगोद्रुमघाटावर येऊन पोहोचली. त्यांनी एका चतुर मनुष्यास काही शिकवून-पढवून श्रीअद्वैतदासांकडे पाठविले आणि स्वतः नावेत बसून राहिले.

अद्वैतदास आपल्या कुटीत बसून हरिनाम करत होते. त्याचवेळी दिगम्बर चट्टोपाध्यायांनी पाठविलेल्या माणसाने येऊन त्यांना प्रणाम केला. अद्वैतदासाने

आगंतुक व्यक्तीस विचारले–तू कोण आहेस आणि इथे येण्याचा तुझा उद्देश काय आहे?

आगंतुकाने हात जोडून उत्तर दिले–मला श्रीयुत दिगम्बर चट्टोपाध्यायांनी आपल्याकडे पाठविले आहे. त्यांनी विचारले आहे की कालिदासास माझे नाव लक्षात आहे की नाही?

अद्वैतदासांनी काहीसे उत्सुकतेने विचारले–दिगम्बर? ते तर माझे बालमित्र आहेत. मी त्यांना कसे काय विसरेन? आता त्यांनी वैष्णवधर्म स्वीकारला आहे का?

आगंतुक म्हणाला–ते याच घाटावर नावेत बसलेत. ते वैष्णव झालेत अथवा नाही हे मी सांगू शकत नाही.

अद्वैतदास म्हणाले–ते घाटावर का थांबलेत? या कुटीत का नाही पदार्पण करत?

अद्वैतदासांचे बोलणे ऐकून आगंतुक तिथून निघून गेला, आणि एक तास संपतो न संपतोतोच तीन-चार सज्जनांसोबत दिगम्बर चट्टोपाध्याय अद्वैतकुटीत पोहोचले. दिगम्बर लहानपणापासून मोठ्या उदार चित्ताची व्यक्ती आहे. जुन्या मित्रास पाहताच त्यांचे अंतःकरण आनंदाने पुलकित झाले. त्यांनी आपले निम्नलिखित पद गाऊन अद्वैतदासांस आलिंगन दिले.

**काली !**
**कोण जाणतो जननी ! तुझ्या लीलांना त्रिभुवनात ?**
**कधी पुरुष होऊन कधी प्रकृती होऊन कधी मत्त होते स रणात॥**

**रचते सृष्टी विधाता बनून। पुनः नाश करते बनून शंकर।**
**बनून विष्णू व्यस्त तू रहाते जिवांच्या परिपालनात।**
**कृष्णरूपात वृन्दावनात, मुरली वाजविली होती उपवनात।।**

**नवद्वीपात गौर रूपाने सगळ्यांना रमवले कीर्तनात।**
**कोण जाणते जननी! तुझ्या लीलांना त्रिभुवनात॥**

दिगम्बर चट्टोपाध्यायांस आपल्या निकट बसण्याकरिता एक कुशासन देत अद्वैतदास म्हणाले–यावे बंधू! बऱ्याच दिवसांनी भेट झाली.

कुशासनावर बसताना डोळ्यांतील अश्रूंनी ममता दाखवीत दिगम्बर म्हणाले–कालिदास आता मी कुठे जाऊ? तू तर वैरागी बनून 'न देवाय न धर्माय' बनलास. पंजाबहून न जाणो किती आशा हृदयाशी बाळगून आलो होतो. आपणा बालमित्रांपैकी पेशा पागला, खेंदा, गिरीश, ईशोपागला, धनुवा, कल्लू बढई, कान्ती भट्टाचार्य–सगळे मरून गेले. तू आणि मी आपण दोघेच जिवंत आहोत. वाटले होते, मी एक दिवस गंगा पार करून तुझ्याकडे येईन आणि दुसऱ्या दिवशी तू गंगा पार करून अम्बिकेस येशील. जीवनातले उरलेसुरले दिवस एकत्र गाणी गाऊन आणि तन्त्र वाचून व्यतीत करूया. परंतु हाय रे दुर्भाग्य! तू तर अगदीच शेण निघालास! या लोकीचाही झाला नाहीस आणि परलोकीचाही झाला नाहीस. बरे, हे तरी सांग की तू हे सगळे काय करून ठेवले आहेस?

अद्वैतदासाने पाहिले की मोठ्या विकट माणसाशी संबंध आलाय. कसे तरी या बालमित्राच्या तावडीतून सुटका होईल तर बरे. असा विचार करून ते म्हणाले–दिगम्बर! तुला आठवत नाही? एकदा आपण अम्बिकात विटीदांडू खेळता खेळता एका जुन्या चिंचेच्या झाडाखाली जाऊन पोहोचलो होतो?

दिगम्बर–हो हो, व्यवस्थित आठवतेय. गौरीदास पंडितांच्या घराजवळचे चिंचेचे झाड ना, ज्याच्याखाली गौर-निताई बसले होते?

अद्वैतदास–हो, हो बंधू! खेळता-खेळता तू म्हणाला होतास या चिंचेच्या झाडास हात लावू नकोस, आत्याचा मुलगा याच झाडाखाली बसला होता. स्पर्शाने वैरागी होऊन जाशील.

दिगम्बर–ठीक, ठीक! मला नीट आठवतेय. वैष्णवांप्रती तुझे झुकते माप पाहून मी म्हटले होते–तू गौरांगाच्या जाळ्यात अवश्य फसशील.

अद्वैतदास–बंधू माझा तर सदैव हाच भाव राहिलाय, त्यावेळेस त्यांच्या जाळ्यात आता फसेन, नंतर फसेन असे वाटत होत, पण आतातर जाळ्यात पडलोच.

दिगम्बर–माझा हात धरून बाहेर पड. जाळ्यात पडून राहणे चांगले नाही.

अद्वैतदास–बंधू! या जाळ्यात मोठे सुख आहे! ईश्वराकडे प्रार्थना आहे–मला चिरकाल याच जाळ्यात गुरफटलेला राहू दे. जरा या जाळ्यास स्पर्श तरी करून पाहा.

दिगम्बर–मी सगळे पाहिलेले आहे. त्यात दिखाऊ सुख अवश्य आहे परंतु शेवटी काहीच उरत नाही.

अद्वैतदास–तू ज्या जाळ्यात अडकलायस त्यात कधी सुख मिळणार? चुकूनही असा विचार करू नकोस.

दिगम्बर–पाहा! आम्ही महाविद्येचे उपासक आहोत. आम्ही आताही सुखी आहोत आणि तेव्हाही सुखी राहू. तूही आपल्या परीने सुखी होऊ शकशील, पण आम्हाला मात्र तुम्हा लोकांचे काहीच सुख दिसत नाही. लोक, न जाणो वैष्णव का होतात? पाहा ना, आम्ही मटण-मासे खातो, चांगल्यात चांगले कपडे घालतो, सभ्यतेच्या बाबतीत तुम्हा लोकांपेक्षा कितीतरी पुढे आहोत. प्राकृत विज्ञानाची सर्व सुख-प्रसाधने आम्हास प्राप्त आहेत, ज्यापासून तुम्ही लोक सर्वदा वंचित राहता; आणि शेवटी तुम्हा लोकांचा उद्धार नाही.

अद्वैतदास–का बंधू! शेवटी आमचा उद्धार का नाही?

दिगम्बर–माता निस्तारिणीपासून विमुख झाल्यावर तुमचाच काय ब्रह्मा, विष्णू किंवा महेश यातील कुणाचाच उद्धार होत नाही. माता निस्तारिणी आद्या शक्ती आहे, ती ब्रह्मा, विष्णू आणि महेशांस उत्पन्न करून पुनः कार्य-शक्तीद्वारे त्यांचे पालन करते–मातेची इच्छा झाल्यावर, पुन्हा त्याच ब्रह्मांड-भांडोदरीच्या उदरात प्रवेश करतात. तुम्ही मातेची अशी कोणती उपासना केलीत ज्याने माता तुमच्यावर कृपा करेल?

अद्वैतदास–माता निस्तारिणी चैतन्य वस्तू आहे की जड-वस्तू?

दिगम्बर–ती इच्छामयी चैतन्यरूपिणी आहे. तिच्या इच्छेनेच तर पुरुषाची सृष्टी होते.

अद्वैतदास–पुरुष कोणास म्हणावे? आणि प्रकृती कोणास म्हणावे?

दिगम्बर–वैष्णव तर केवळ भजन करणे जाणतात, त्यांच्यात तत्त्वज्ञानाचा अगदीच अभाव असतो. प्रकृती आणि पुरुष चण्याप्रमाणे दोन असूनही एक आहेत. फोलपटाने झाकून राहिल्याने एक; आणि फोलपट निघताच दोन. पुरुष-चैतन्य आहे आणि प्रकृती जड. जड आणि चैतन्याची अभिन्नावस्थाच 'ब्रह्म' होय.

अद्वैतदास–तुझी आई प्रकृती आहे की पुरुष?

दिगम्बर–कधी पुरुष आहे तर कधी नारी आहे.

अद्वैतदास–चण्याच्या फोलपटाच्या आत प्रकृती आणि पुरुष जसे दोन दलांप्रमाणे राहतात, त्यापैकी कोण माता आणि कोण तुझा पिता?

दिगम्बर–तू तर तत्त्व जिज्ञासा करतो आहेस? ठीक आहे, आम्ही ते पण जाणतो. वास्तविक माता–प्रकृती आहे आणि पिता–चैतन्य आहे.

अद्वैतदास–मग तू कोण आहेस?

दिगम्बर–"**पाशबद्धो भवेज्जीवः पाशमुक्तः सदाशिवः।**" अर्थात मायेद्वारा आच्छादित असल्यावर जीव आणि मायेतून मुक्त झाल्यावर शिव.

अद्वैतदास–तू पुरुष आहेस की प्रकृती?

दिगम्बर–मी पुरुष आहे आणि माता प्रकृती. जोपर्यंत मी बद्ध आहे तोपर्यंत ती माझी आई आहे आणि जेव्हा मी मुक्त असतो तेव्हा ती माझी वामा अर्थात पत्नी असते.

अद्वैतदास–वा! तू तत्त्व चांगले समजाविलेस. आज जी तुझी आई आहे उद्या ती तुझी पत्नी होणार? बरे, आधी हे तर सांग की तुला हे तत्त्व सापडले तरी कुठे?

दिगम्बर–बंधू! मी तुझ्यासारखा वैष्णव-वैष्णव करीत उगाच फिरत नव्हतो. कितीतरी संन्यासी, ब्रह्मचारी, तांत्रिक सिद्ध पुरूषांचा सत्संग करून आणि अहोरात्र

तन्त्रशास्त्राचा अभ्यास करून मी या तत्वज्ञानास प्राप्त केले आहे. तुझी जर इच्छा असेल तर तुलाही मी तयार करू शकतो.

अद्वैतदास–(मनातल्या मनात असा विचार करीत की अगदी वाईट प्रकारे कुसंगात फसलो) ठीक आहे. मला एक गोष्ट समजावून सांग. ती ही की सभ्यता काय आहे आणि प्राकृत विज्ञान कशास म्हणतात?

दिगम्बर–भद्र समाजात भद्र पद्धतीने बोलणे तथा चांगल्या रितीने वागणे, सामान्य लोकांस ज्यामुळे संतोष मिळतो असे कपडे घालणे, अशा पद्धतीने भोजन करणे ज्यामुळे कुणासही कुठल्याही प्रकारची घृणा होणार नाही. तुम्ही या तिन्हींपैकी काहीच करीत नाही.

अद्वैतदास–ते कसे काय?

दिगम्बर–तुम्ही दुसऱ्या कुठल्या समाजात जात नाही. नितांत असामाजिक व्यवहार करता. मधुर भाषण करून लोकरंजन कसे करावे–हे वैष्णवांस जणू ठाऊकच नाही. लोकांना पाहताच म्हणता–"हरिनाम करा" का हो! त्या अतिरिक्त आणखी दुसऱ्या सभ्य गोष्टी नसतात का? तुम्हा लोकांची वेषभूषा पाहून कुणीही सहजच सभेत बसूसुद्धा देत नाही. डोक्यावर शेंडीचे छोटे गाठोडे, गळ्यांत एक टोपलीभर मण्यांच्या माळा आणि एक लंगोटी–ही तर तुमची वेषभूषा! भोजन तर काय–बटाटे रताळी पर्यंत सीमित. वास्तविक तुम्हा लोकात जराही सभ्यता नाही.

अद्वैतदास–(जर थोडेसे भांडण केल्याने हा येथून वैतागून आपोआप गेला तर छान होईल–असा विचार करून) सभ्यतेने परलोकात काही काही विशेष सुविधा प्राप्त होतात का?

दिगम्बर–परलोकात तर काही सुविधा नाही मिळत, परंतु सभ्य नसल्याने समाजाची उन्नती कशी व्हावी? समाजाची उन्नती झाल्याने परलोकासाठी प्रयत्न करता येऊ शकतात.

अद्वैतदास–बंधू! जर असंतुष्ट होणार नसशील तर मी काही बोलू?

दिगम्बर–तू माझ्या बालपणीचा मित्र, तुझ्याकरिता तर मी आपले जीवनही ओवाळून टाकायला तयार आहे. मग तुझी एखादी गोष्ट सहन करू शकत नाही का?

आम्ही सभ्यतेचे प्रेमी आहोत. क्रोध आला तरी गोड बोलणे आम्हाला येते. मानसिक भाव जितके लपवून ठेवता येतील, सभ्यता तितकीच उच्चकोटीची मानली जाते.

अद्वैतदास–मनुष्यजीवन अल्पावधीचे असते. त्यातही त्यांत अनेक विघ्ने आहेत. म्हणून या क्षणिक जीवनात सरलतापूर्वक हरिभजन करणेच मनुष्याचे एकमात्र कर्तव्य आहे. सभ्यता शिकण्याचे तात्पर्य आहे–आत्म्यास धोका देणे. आपण जाणतो की 'धूर्तते'चेच दुसरे नाव 'सभ्यता' आहे. मनुष्य-जीवन जोपर्यंत सन्मार्गावर राहते तोपर्यंत ते सरळ असते. परंतु जसे-जसे ते कुमार्गावर अग्रेसर होऊ लागते, तसेतसे ते गोडगोड वाणीने लोकरंजन करीत-करीत आपल्या कुकर्मावर पडदा टाकण्याकरिता अधिकाधिक सभ्य बनण्याचा प्रयत्न करते. सभ्यता नावाचा कुठलाच गुण नाही,सच्चा व्यवहार आणि सरलताच गुण आहेत. आपल्या दुष्टतेवर पांघरुण घालण्याच्या वर्तमान प्रथेचे नावच 'सभ्यता' आहे. 'सभ्यता' शब्दाचा अर्थ आहे–सभेत बसण्याची योग्यता अर्थात सरल भद्रतेचे अतिरिक्त आणखी काहीच नाही. तुम्ही धूर्ततेस 'सभ्यता' म्हणता. जर निष्पाप सभ्यता कुठे मिळत असेल तर ती केवळ वैष्णवांकडेच मिळते. आणि जर सभ्यता पापपूर्ण आहे तर ती अवैष्णव समाजाचीच अनुवांशिक संपत्ती असू शकते. तुम्ही ज्या सभ्यतेची चर्चा करता, तिचा जिवाच्या नित्य-धर्माशी काहीच संबंध नाही. साधारण लोकांस मुग्ध करणारी वेषभूषाच जर सभ्यता आहे तर वेश्या तुम्हा लोकांपेक्षा कितीतरी अधिक सभ्य आहेत. वस्त्रासंबंधी तर केवळ इतकेच मानले जाऊ शकते की त्यामुळे आवश्यकतेनुसार शरीर झाकता यावे, ते स्वच्छ-नेटके असावे आणि कोणताही दुर्गंध त्यात नसावा. आहारासंबंधी पवित्रता आणि उपयोगितेचा विचार केला जातो. परंतु तुमच्या मतानुसार आहार केवळ स्वादिष्ट असावा,मग तो अपवित्र असला तरी काही हरकत नाही. मद्य-मांस तर स्वभावानेच अपवित्र आहेत, म्हणूनच त्यांचे भोजन-पान केल्याने जी सभ्यता पाळली जाते, ती एखाद्या पाप-आचरणाव्यतिरिक्त आणखी काहीच नाही. वर्तमान सभ्यतेस कलियुगी-सभ्यतासुद्धा म्हणू शकतात.

दिगम्बर–तू बादशाही सभ्यतेस विसरलास काय? पहा, बादशाही दरबारात लोक कसे आदबशीर कायद्याने बसलेले असतात, बोलत असतात?

अद्वैतदास–हा तर केवळ सांसारिक व्यवहारमात्र आहे. असे केले नाही तरी त्यात नुकसान काहीच नाही.बंधू! बरेच दिवस यवनांची चाकरी केल्याने तू तशा

सभ्यतेचा पक्षपाती झाला आहेस. वास्तविक मनुष्याचे निष्पाप जीवनच सभ्य जीवन आहे. पापवृद्धी बरोबरच कलियुगी सभ्यतेची उन्नती म्हणजे विडंबना नाही तर काय?

दिगम्बर–पहा, आधुनिक विद्वानांच्या मतानुसार वर्तमान सभ्यताच 'मनुष्यतेची' कसोटी आहे. जो सभ्य नाही, तो मनुष्य म्हणविण्याचा अधिकारी नाही. स्त्रियांना सुंदर-सुंदर वस्त्रांनी आणि आभूषणांनी सजविणे आणि त्यांच्या दोषांना लपविणेच आधुनिक सभ्यतेचे मूळ लक्षण आहे.

अद्वैतदास–हा सिद्धांत चांगला आहे की वाईट–याचा विचार स्वतःच करू शकतोस. तू ज्या लोकांना विद्वान म्हणतोस–माझ्या मते–ते केवळ धूर्त आहेत. काही तर कुसंस्कारांमुळे आणि काही दोष लपविण्याची सुविधा प्राप्त करण्याकरिता असरल सभ्यतेचे पक्षपाती बनलेले असतात. बुद्धिमान व्यक्ती त्यांच्या समाजात कुठले सुख प्राप्त करतील? धूर्तांच्या सभ्यतेचा गौरव केवळ व्यर्थ-तर्क आणि शारीरिक बळाद्वारे सुरक्षित राहतो.

दिगम्बर–कुणाकुणाचे म्हणणे आहे की संसारात क्रमशः ज्ञानाची समृद्धी होत आहे आणि या ज्ञानाच्या समृद्धीसोबतच सभ्यताही क्रमशः उन्नत होत जाते. अशा प्रकारे ज्ञानाची समृद्धी आणि सभ्यतेची उन्नती आपल्या शीर्ष बिंदूपर्यंत पोचल्यावर हे जग स्वर्ग बनून जाईल.

अद्वैतदास–या भुलवलणाऱ्या गप्पा आहेत. जे अशा गोष्टींवर विश्वास ठेवतात, त्यांच्या विश्वासाची गंमत वाटते आणि धन्य त्यांचे साहस जे अशा गोष्टींचा अंधविश्वासाने प्रचार करतात. ज्ञान दोन प्रकारचे असते–लौकिक आणि पारलौकिक वा पारमार्थिक. पारमार्थिक ज्ञानाची वृद्धी होत आहे–असा तर विश्वास वाटत नाही, उलट पारमार्थिक ज्ञान बऱ्याच ठिकाणी विकृत होत आहे. लौकिक ज्ञानाची वृद्धी होण्याचीच संभावना आहे. जिवांचा लौकिक ज्ञानाशी संबंध तरी काय आहे? लौकिक ज्ञानाची वृद्धी झाल्याने लोकांचे चित्त बहुधा नाना विषयांकडे झुकते. त्याचे फलित असे की मूळ तत्त्वाकडे ओढ कमी झाली आहे. हो, मी हे स्वीकार करतो की लौकिक ज्ञानाची जितकी वृद्धी होत आहे, असरल सभ्यतासुद्धा तितकीच वाढत आहे–हा जिवांकरिता दुर्गतीचा विषय आहे.

दिगम्बर–दुर्गती का?

अद्वैतदास–मी आधीच सांगितले आहे की मानव जीवन अल्पावधीचे आहे. याच थोड्या दिवसांत पथिकाप्रमाणे जिवास परमार्थाकरिता सर्वदा तयार असायला हवे. पांथ-व्यवहाराच्या उन्नतीकरिता वेळ दवडणे म्हणजे मूर्खतेचे लक्षण. लौकिक ज्ञानाची चर्चा जितकी अधिक वाढेल, पारमार्थिक विषयाच्या अनुशीलनासाठी वेळेचा तितकाच अभाव जाणवेल. माझी तर ही धारणा आहे की जीवन-निर्वाहाच्या आवश्यकतेनुसार लौकिक ज्ञानाचा व्यवहार करावा, परंतु उक्त प्रयोजनापेक्षा अधिक लौकिक ज्ञान आणि त्याची सहचरी सभ्यता यांस स्वीकारण्याची जराही आवश्यकता नाही. पार्थिव झगमग (चमक) किती दिवस टिकेल?

दिगम्बर–चांगल्या वैराग्याशी संबंध आलाय. तर मग समाजाचा काहीच उपयोग नाही का?

अद्वैतदास–मनुष्यास जसा समाज मिळेल, त्यापासून त्यास तसाच लाभ होईल. जर वैष्णव समाज मिळाला तर त्याच्या संबंधयोगाने तो चांगल्या कार्यांत रत होईल आणि जर अवैष्णव अर्थात लौकिक समाज भेटला तर त्यापासून जे जिवास स्वीकारण्यायोग्य नाही–असे कार्य मिळेल. बरे, ते जाऊ देत, हे सांग की प्राकृत विज्ञान कशास म्हणतात?

दिगम्बर–तंत्रात प्राकृत विज्ञान अनेक प्रकारचे सांगितले गेले आहे. प्राकृतिक जगात जितक्या प्रकारचे ज्ञान, कौशल आणि सौंदर्य आहेत, ते समस्त प्राकृत विज्ञानांतर्गत आहेत. धनुर्विद्या, आयुर्वेद, गांधर्व विद्या आणि ज्योतिष विद्या–या चार विद्या पण प्राकृत विज्ञानांतर्गत आहेत. प्रकृती आद्याशक्ती आहे. परत तत्त्व-कथा सांगावी लागली. त्यांनी या जड ब्रह्मांडास उत्पन्न आणि प्रकाशित करून आपल्या शक्तीद्वारे यास मोठे विचित्र बनवले आहे. या शक्तीचे एक-एक रूप एक-एक विज्ञान आहे. या विज्ञानास प्राप्त करून माता निस्तारिणीच्या प्रती केलेल्या पापांतून जीव मुक्त होतो. वैष्णवलोक याचे काहीच अनुसंधान करीत नाहीत. आम्ही याच विज्ञानाच्या बळावर मुक्ती प्राप्त करतो. पाहा ना, या विज्ञानाच्या अनुसंधानात प्लेटो, अरिस्टॉटल, सॉक्रिटिस, आणि लोकमान्य हातिम आदी महात्म्यांनी न जाणो कितीतरी ग्रंथ लिहिले आहेत.

अद्वैतदास–तू आत्ताच म्हणालास की वैष्णव विज्ञानाची माहिती बाळगत नाहीत. परंतु वास्तविकपणे असे नाही, कारण वैष्णवांचे शुद्धज्ञान विज्ञानाने समन्वित असते.

**ज्ञानं परमगुह्यं मे यद्विज्ञानसमन्वितम्।**
**सरहस्यं तदङ्गं च गृहाण गदितं मया॥**(१)

सृष्टीच्या पूर्वी ब्रह्माच्या उपासनेने संतुष्ट होऊन भगवंतांनी त्यांना शुद्ध वैष्णवधर्माचा याप्रकारे उपदेश केला होता–हे ब्रह्मन्! विज्ञानाने समन्वित माझे जे अत्यंत गोपनीय ज्ञान आहे, त्याचे रहस्य आणि त्याच्या समस्त अंगांना तुम्हाला सांगत आहे–तुम्ही ते ग्रहण करा. ज्ञान दोन प्रकारचे असते–शुद्धज्ञान आणि विषयज्ञान. विषयज्ञानाला सर्व मनुष्य इंद्रियांच्या द्वारे ग्रहण करतात. हे अशुद्ध ज्ञान आहे, म्हणून चित् वस्तूच्या संबंधी सर्वथा अनुपयोगी असते. त्याची तर केवळ जिवांच्या बद्ध दशेत जीवन यात्रा निर्वाहाच्या वेळी आवश्यकता भासते.

चिदाश्रयी ज्ञानास शुद्धज्ञान म्हणतात. तेच ज्ञान वैष्णवांच्या भजनाचे मूलाधार आणि नित्य असते. हे ज्ञान विषयज्ञानाच्या विपरीत आणि विलक्षण असते. विषयज्ञानासच तर तू विज्ञान म्हणतो आहेस. वास्तविक विषयज्ञान विज्ञान नाहीच आहे. तुझ्या आयुर्वेदादी विषयज्ञानास शुद्धज्ञानापासून वेगळे करण्याचे नावच विज्ञान आहे. विषयज्ञानापेक्षा वेगळ्या शुद्धज्ञानास विज्ञान म्हणतात. वस्तूचे ज्ञान आणि विज्ञान एकच गोष्ट आहे. साक्षात चित्-वस्तूच्या उपलब्धीस ज्ञान म्हणतात. विषय ज्ञानास तुच्छ जाणून शुद्धज्ञानाच्या प्रतिष्ठेचे नाव विज्ञान आहे. 'वस्तू' एक असूनही प्रक्रियांच्या भिन्नतेमुळे 'ज्ञान' आणि 'विज्ञान'–ही दोन पृथक-पृथक नावे झाली. तुम्ही विषयज्ञानास 'विज्ञान' म्हणता आणि वैष्णवजन विषयज्ञानास त्याच्या खऱ्या रूपात संस्थापित करण्यास 'विज्ञान' म्हणतात. ते धनुर्वेद, आयुर्वेद, ज्योतिष, रसायन–आदी विषयांची समीक्षा करून या निष्कर्षाप्रत पोहोचतात की हे सर्व जडज्ञान आहे; त्याबरोबर जिवाचा कुठलाच नित्यसंबंध नाही. म्हणून हे जिवाच्या नित्यधर्मासंबंधी

(१) भगवंत म्हणाले–हे ब्रह्मन्! माझे ज्ञान अद्वय आहे. अद्वय होऊन देखील ते नित्य चार प्रकारचे आहे–ज्ञान, विज्ञान, रहस्य आणि तदंग. तू जीवबुद्धीने त्यास समजू शकत नाही, माझ्या कृपेने त्याची उपलब्धी कर. ज्ञान–माझे स्वरूप आहे, विज्ञान–माझ्या शक्तीचा संबंध आहे, जीव–माझे रहस्य आहे आणि प्रधान–माझे ज्ञानांग आहे. (भागवतार्कमरीचिमाला–१०/२)

सर्वथा अनावश्यक आहे. जे जड प्रवृत्तीद्वारे चालित होऊन जडज्ञानाच्या उन्नतीकरता प्रयत्न करतात, त्यांना वैष्णवजन कर्मींची संज्ञा देतात–त्यांची निंदा करीत नाहीत. कारण ते भौतिक उन्नतीद्वारे वैष्णवांच्या परमार्थ अनुशीलनात परोक्षपणे काही ना काही उपकारच करीत असतात. तुम्ही लोक आपल्या क्षुद्र जडमय ज्ञानास 'प्राकृतिक विज्ञान' म्हणता, त्याला काहीच हरकत नाही. नावावरून वादविवाद करणे म्हणजे मूर्खताच होय.

दिगम्बर–अच्छा, जर भौतिक विज्ञानाची उन्नती झाली नसती तर तुम्ही लोक सुखाने जीवन-निर्वाह आणि भजन कसे काय करू शकला असता? म्हणूनच तुम्हा लोकांनाही जड उन्नतीसाठी प्रयत्न करायलाच हवेत.

अद्वैतदास–प्रवृत्तीनुसार प्रत्येक मनुष्य भिन्न-भिन्न प्रकारे प्रयत्न करीत असतो, परंतु सर्वनियंता ईश्वर त्या प्रयत्नांच्या फळास यथायोग्य इतर मनुष्यांत वाटून टाकतो.

दिगम्बर–प्रवृत्ती कुठून येते?

अद्वैतदास–पूर्वकर्मजन्य संस्कारांनी प्रवृत्ती उत्पन्न होते. ज्यांचा भौतिक संबंध जितका सखोल असतो, ते भौतिक ज्ञान आणि भौतिक ज्ञानातून उत्पन्न शिल्प आदी कार्यांमध्ये तितकेच निपुण असतात. ते जे काही निर्माण करतात–ते सर्व काही वैष्णवांच्या कृष्णसेवेचे उपकरण बनून त्यांचे उपकारच करतात, याविषयी वैष्णवांस वेगळी सेवा करण्याची काहीच आवश्यकता नसते. पहा, सुतार आदी कारागीर धन मिळवण्यासाठी सिंहासनाचे निर्माण करतात, गृहस्थ वैष्णव त्याच सिंहासनावर श्रीविग्रहांची स्थापना करतात, मधमाश्या आपापल्या प्रवृत्तीनुसार मध गोळा करतात. त्याच मधास भक्तजन भगवंताच्या सेवेत अर्पण करतात. संसारात सगळेच परमार्थाकरिता कर्म करीत नाहीत, उलट ते भिन्न-भिन्न प्रवृत्तींद्वारे चालित होऊन कर्मांत प्रवृत्त होतात. मनुष्यांच्या प्रवृत्ती उच्च-नीच या भेदाने नाना प्रकारच्या असतात. नीच मनुष्य नीच प्रवृत्तीचे अवलंबन करून नाना प्रकारची कार्ये करतात; ती समस्त कार्ये उच्च प्रवृत्तींच्या कार्यांची सहाय्यता करतात. अशा प्रकारे श्रेणी विभागाने जगत्‌चक्र खूप सुंदरतेने चालले आहे. जडीय विज्ञानास आश्रय मानणारे कर्मी पुरुष जड-प्रवृत्तीद्वारा चालित होऊन ज्या-ज्या कर्मांचे अनुष्ठान करतात, ती सगळी कर्मे वैष्णवांच्या परमार्थासाठी अर्थात चित्-प्रवृत्तीसाठी सहाय्यक असतात.

भौतिक विज्ञानवादी हे जाणत नाहीत की आपल्या संशोधनाने ते वैष्णवांवर उपकारच करतात, ते तर विष्णुमायेद्वारा मोहित होऊन त्या कर्मांत प्रवृत्त होतात. म्हणूनच संपूर्ण जगत अज्ञात रूपात वैष्णवांचे सेवकच असते.

दिगम्बर–विष्णुमाया कोणास म्हणावे?

अद्वैतदास–मार्कंडेयपुराणांतर्गत चण्डीमाहात्म्यात **"महामाया हरेः शक्तिर्यया सम्मोहितं जगत्"**, इत्यादी ज्यांच्या संबंधी म्हटले गेले आहे, त्याच विष्णुमाया आहेत.

दिगम्बर–आम्ही ज्यांना 'माता निस्तारिणी' म्हणतो त्या कोण आहेत?

अद्वैतदास–त्या विष्णुमाया आहेत.

दिगम्बर–(आपले तन्त्रशास्त्राचे पुस्तक उघडत) हे पाहा, माझी माता चैतन्यरूपिणी, इच्छामयी, त्रिगुणातीता आणि त्रिगुणधारिणी रूपात वर्णिली गेली आहे. तुमची विष्णुमाया निर्गुणा नाही, मग तू माझ्या मातेस आणि विष्णुमायेस एक कसे केलेस? वैष्णवांची हीच गोष्ट मला मुळीच आवडत नाही. तुम्ही लोक मोठे अंधविश्वासू असता.

अद्वैतदास–बंधू दिगम्बरा! रागावू नकोस, खूप दिवसांनी भेटलायस–मी तुला आनंदी करू इच्छितो. 'विष्णुमाया' म्हटल्याने काय दोष लागणार आहे? भगवान विष्णू परमचैतन्य आणि समस्त ईश्वरांचेही ईश्वर आहेत–आणि सर्व त्यांच्या शक्ती आहेत. शक्ती म्हटल्याने कुठल्या वस्तूचा बोध होत नाही, शक्ती वस्तूचा धर्म आहे. शक्तीस सगळ्यांचे मूळ मानणे तत्वविरुद्ध आहे. शक्ती वस्तूपासून कधीही वेगळी राहू शकत नाही, कुठल्या चैतन्य स्वरूप वस्तूस पुढे स्वीकारल्याशिवाय केवळ शक्तीस मानणे आकाश-कुसुमाप्रमाणे निरर्थक असते. वेदान्तभाष्याचे कथन आहे–**"शक्ति-शक्तिमतोरभेदः"**, अर्थात शक्ती आणि शक्तिमान भिन्न नाहीत. शक्ती–कुणी वेगळी वस्तू नाही, वस्तू आहे–शक्तिमान पुरुष. शक्ती याच शक्तिमान पुरुषाच्या इच्छेच्या अधीन गुण वा धर्म आहे. जोपर्यंत ही शक्ती शुद्धचैतन्य-वस्तूचा आश्रय होऊन आपल्या कार्याचा परिचय देते, तोपर्यंत त्या शक्तीस शक्तिमान वस्तूपासून अभेद जाणून चैतन्यरूपिणी, इच्छामयी आणि त्रिगुणातीता म्हणण्यात कुठलीच चूक नाही. 'इच्छा' 'चैतन्य' पुरुषाच्या आश्रित आहे. शक्तीमध्ये इच्छेचा अभाव असतो–

ती पुरुषाच्या इच्छेने कार्य करते. समजा, तुझ्यात चालण्याची शक्ती तर आहे, परंतु तुझी इच्छा झाल्यावरच ही शक्ती कार्य करते. शक्ती चालते आहे–म्हटल्याने शक्तिमानाच्याच चालण्याचा बोध होतो. शब्दाचा व्यवहार केवळ रूपकमात्र असतो. भगवंताची शक्ती एकच आहे. तीच शक्ती वेगवेगळ्या रूपांमध्ये प्रकाशित होते. या भिन्न-भिन्न प्रकाशांची भिन्न-भिन्न नावे आहेत. चित् कार्यात ती 'चित्-शक्ती' म्हणविली जाते आणि अचित् अर्थात जड कार्यांत तीच 'जडशक्ती' वा 'मायाशक्ती' या नावाने परिचित आहे–**"परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते."** (श्वे.उ.)

सत्त्व, रज आणि तम–या त्रिविध गुणांना धारण करणाऱ्या शक्तीस जडशक्ती म्हणतात; ब्रह्मांडाची सृष्टी आणि लय करणे–ही दोन्ही कार्ये याच जडशक्तीची आहेत. याच शक्तीस पुराणांत आणि तंत्रांमध्ये 'विष्णुमाया', महामाया आणि माया आदी अनेक नामांनी निर्देशित केलेले आहे. रूपकाच्या रूपात या शक्तीच्या विविध क्रियांचे वर्णन आढळते. जसे, विधी-हरी-हराचे यापासून निर्माण होणे तथा यांच्याद्वारे शुम्भ आणि निशुम्भाचा वध करणे. जीव जोपर्यंत विषयांत निमग्न राहतो, तोपर्यंत तो या शक्तीच्या अधीन असतो. जीवांचे शुद्धज्ञान उदित झाल्यावर त्यांना आपल्या स्वरूपाचा बोध होतो; त्याबरोबरच ते मायेच्या बंधनातून मुक्त होऊन जातात. त्यावेळी जीव चित्-शक्तीच्या अधीन राहून चिदानंदाचा उपभोग करतात.

दिगम्बर–तुम्ही लोक कुठल्या शक्तीच्या अधीन आहात की नाही?

अद्वैतदास–हो आहोत ना, आम्ही जीवशक्ती आहोत. मायाशक्तीच्या बंधनातून मुक्त होऊन आता चितशक्ती श्रीमती राधाराणीच्या अधीन आहोत.

दिगम्बर–मग काय तुम्ही लोक शाक्त आहात?

अद्वैतदास–हो, वैष्णवजनच खरे शाक्त आहेत. आम्ही लोक चित्-शक्ति-स्वरूपिणी श्रीराधिकेच्या अधीन आहोत, त्यांच्या आश्रयी राहूनच आम्ही लोक कृष्णभजन करीत असतो. म्हणून मग आम्हा लोकांसारखे दुसरे कुणी शाक्त आहेत का? यथार्थ शाक्तच वैष्णव आहेत. आम्ही यांत परस्पर काहीच भेद मानत नाही. चितशक्तीचा आश्रय घेतल्यानंतर ज्यांची केवळ मायाशक्तिप्रती श्रद्धा असते, ते शाक्त असूनही वैष्णव नाहीत अर्थात ते केवळ विषयी असतात. नारदपंचरात्रात दुर्गादेवीचे

कथन आहे–**"तव वक्षसि राधाहं रासे वृन्दावने वने।"**–अर्थात "वृन्दावन नामक वनात मी चित्-स्वरूपात तुमच्या वक्षःस्थळावर विहार करणारी श्रीराधिका आहे." दुर्गादेवीच्या वाणीतून हे स्पष्ट प्रतीत होते की शक्ती दोन नाही–एकच आहे. तीच शक्ती चित्-स्वरूपात श्रीराधिका आणि जडस्वरूपात जडशक्ती (महामाया) आहे. विष्णुमायाच निर्गुण अवस्थेत चित्-शक्ती आणि सगुण अवस्थेत जडशक्ती आहे.

दिगम्बर–तू म्हणालास की तू जीवशक्ती आहेस, ते कसे?

अद्वैतदास–श्रीगीतेत भगवंत म्हणतात–

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।**
**अहङ्कार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा॥**

**अपरमेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्॥**

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा॥**

(गीता ७/४-६)

अर्थात, पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार–या आठ प्रकारच्या माझ्या अपरा अर्थात जड-प्रकृती आहेत. जड मायेच्या अधिकारात हेच आठ विषय आहेत. या जड प्रकृतीपेक्षा श्रेष्ठ आणि पृथक माझी जीव-स्वरूपा आणखी एक प्रकृती आहे, ज्याद्वारे हे जड-जगत समजले अथवा पाहिले जाऊ शकते. दिगम्बर! तू भगवद्गीतेचे माहात्म्य ऐकले आहेस काय? हा ग्रंथ समस्त शास्त्रांचे सार आणि सर्व प्रकारच्या विवादांची मीमांसा करणारा आहे. यात हे प्रतिपादित केलेले आहे की जीवतत्त्व जड जगापेक्षा तत्त्वतः एक पृथक तत्त्व आहे. आणि ते तत्त्वदेखील भगवंताची एक प्रकारची शक्ती आहे. त्यास तत्त्वविद् पुरुष तटस्थाशक्ती सुद्धा म्हणतात. ही तटस्था अर्थात जीवशक्ती, जडशक्तीपेक्षा श्रेष्ठ आणि चित्-शक्तीपेक्षा लघू असते. म्हणूनच प्रत्येक जीव श्रीकृष्णाची शक्ती आहे.

दिगम्बर–कालिदास! तू भगवद्गीता पाहिली आहेस का?

अद्वैतदास–हो, मी खूप पूर्वीच हा ग्रंथ वाचला आहे.

दिगम्बर–त्यातील तत्त्वकथा कशा आहेत?

अद्वैतदास–बंधू दिगम्बरा! मनुष्य जोपर्यंत खडीसाखर खात नाही तोपर्यंत तो गुळाचीच अधिक प्रशंसा करतो.

दिगम्बर–बंधू! हा तर तुझा अंधविश्वास आहे. देवी भागवत आणि देवी गीतेचा सर्वजण आदर करतात. केवळ तुम्ही लोकच या दोन ग्रंथांचे नावदेखील ऐकू इच्छित नाही.

अद्वैतदास–तू 'देवीगीता' वाचली आहेस का?

दिगम्बर–खोटे का बोलू? मी अजूनपर्यंत वाचली नाही. मी त्या दोन्ही ग्रंथांची प्रतिलिपी (नक्कल, दुसरी प्रत) करण्याकरिता गेलो होतो, परंतु ते मिळालेच नाहीत.

अद्वैतदास–तू जे ग्रंथ वाचलेच नाहीस, ते चांगले आहेत वा वाईट–हे तू कसे सांगू शकतोस? मग हा अंधविश्वास माझा आहे की तुझा?

दिगम्बर–बंधु! मी लहानपणापासूनच काहीसे घाबरतो. तू खूप बडबड्या स्वभावाचा (पातळ जिभेचा) आहेस आणि आता तर वैष्णव होऊन अधिकच बडबड्या झाला आहेस. मी जे काही बोलतो, त्याला तू काटशह देतो आहेस (खंडन करतो आहेस).

अद्वैतदास–मी तर एक दीनहीन मूर्ख माणूस आहे. परंतु मी व्यवस्थित समजलो की वैष्णवधर्माव्यतिरिक्त कुठलाच दुसरा शुद्धधर्म नाही. तू सदैव वैष्णवांचा द्वेषच करीत आला आहेस आणि अशा प्रकारे आपल्या कल्याणपथास मुकला आहेस.

दिगम्बर–(काहीसे रागवून) मी इतके साधन-भजन करतो तरीही तू म्हणतोस की मी आपल्या कल्याणाच्या मार्गाला मुकलो म्हणून? मग काय इतके दिवसापर्यंत मी घोड्यासाठी गवतच कापत होतो (ढोरमेहनतच करत आलो)? येथे पाहा–या तन्त्रसंग्रहाकरिता काय कमी परिश्रम घ्यावे लागले? तू तर सभ्यता आणि विज्ञानाची निंदा करून वैष्णवपणच श्रेष्ठ म्हणशील. अशा दशेत मी करू तरी काय शकतो? सभ्य समाजात चल, पाहा, लोक कोणास भला म्हणतात ते?

अद्वैतदास–[मनोमन] कुसंग दूर असेल तरच ठीक. [मोठ्याने किंवा स्पष्टपणे] बरं बाबा! तू मेल्यानंतर तुझी सभ्यता आणि तुझे विज्ञान तुझ्या काय कामाचे?

दिगम्बर–कालिदास! तू सुद्धा अगदी विचित्र माणूस आहेस. मेल्यानंतर मागे काही राहते का? जोपर्यंत संसारात जिवंत आहात, तोपर्यंत भरपूर खा, प्या, आणि मजा करा तसेच यश प्राप्त करा. मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा आणि मैथुन–या पाच 'म'कारांद्वारे आनंदाचा उपभोग करा; मृत्यूच्या वेळी जेथे ज्या अवस्थेत असायला हवे–माता निस्तारिणी तेथे तशी व्यवस्था करेल. मृत्यू होईल–हे जाणून आत्तापासूनच का कष्ट सहन करायचे? जेव्हा पंचभूत पंचभूतांमध्ये विलीन होतील, त्यावेळी तू कुठे असशील? हा संसारच योगमाया, महामाया आणि माया आहे. तीच तुला सुख देते आणि मृत्यूनंतर सुद्धा हीच तुला मुक्ती प्रदान करेल. शक्ती व्यतिरिक्त आणखी काहीच नाही, शक्तीपासून उपजला आहेस–पुन्हा शक्तीतच मिळून जाशील. म्हणूनच शक्तीची सेवा कर. विज्ञानात शक्तीचे बळ पाहा. प्रयत्न करून आपल्या योगबळाची उन्नती कर. शेवटी त्या अव्यक्त शक्ती व्यतिरिक्त आणखी काहीच नाही. न जाणो तुम्ही लोकांनी कुठून चैतन्य पुरुषाची काल्पनिक गोष्ट शोधून काढली आहे आणि त्या गोष्टीवर विश्वास ठेवून या लोकात तर कष्ट भोगतच आहात, परलोकातही आम्हा लोकांपेक्षा अधिक सुखी होऊ शकाल अथवा नाही–सांगता येत नाही. पुरुषाशी काय काम आहे? शक्तीची आराधना करा. शक्तीतच लीन होऊन नित्य अवस्थित राहशील.

अद्वैतदास–बाबा, तू तर जडशक्तीस घेऊनच मुग्ध झालास. जर चैतन्य पुरुष आहे तर मेल्यानंतर तुझे काय होणार? सुख कशास म्हणायचे? उत्तर आहे–मनाच्या समाधानानेच नाव सुख आहे–समस्त भौतिक सुखांना त्यागून मी संतोषरूपी सुखाचा भोग करतो आहे. यानंतरही काही उरत असेल तर तेही माझेच आहे. तुला समाधान नाही. कितीही भोग करत राहिले, तितकीच भोगाची तृष्णा (तहान) वाढतच जाते. खरी गोष्ट तर ही आहे की सुख काय आहे–हे तू अद्याप समजू शकला नाहीस. केवळ सुख-सुख, ओरडून-ओरडून एक दिवस पतनाच्या गड्ड्यात जाऊन पडशील.

दिगम्बर–माझे जे काही व्हायचे असेल, ते तर होईलच, परंतु तू भद्र समाजाचा त्याग का केलास?

अद्वैतदास–मी भद्र समाजाचा त्याग नाही केला, उलट त्यास प्राप्त केले आहे; आणि अभद्र संगाचा आता परित्याग करण्याचा प्रयत्न करतो आहे.

दिगम्बर–अभद्र संगाचा अर्थ?

अद्वैतदास–रागावू नकोस, ऐक मी सांगतो–

**यावत्ते मायया स्पृष्टा भ्रमाम इह कर्मभिः।**
**तावद्भवत्प्रसंगानां संङ्गः स्यान्नो भवे भवे॥**

(श्रीमद्भा. ४/३०/३३)

अर्थात, हे भगवान! आपल्या मायेने मोहित होऊन जोपर्यंत कर्म-मार्गात भटकत राहू, तोपर्यंत जन्मजन्मांतरी आम्हांस आपल्या प्रेमी भक्तांचा संग प्राप्त होऊ शकणार नाही.

पुनः हरिभक्तिविलासात (१०/२९४)–

**असद्भिः सह संङ्गस्तु न कर्त्यव्यः कदाचन।**
**यस्मात् सर्वार्थहानिः स्यादधः पातश्च जायते॥**

कर्मी आणि ज्ञानींप्रमाणे स्थितीहीन असत् पुरुषांचा संग करू नये. कारण अशा कुसंगाने सर्व प्रकारचे पुरुषार्थ नष्ट होतात तथा नीच गती प्राप्त होते.

कात्यायनाचे वाक्य हरिभक्तिविलासातून (१०/२२४) उद्धृत–

**वरं हुतवहज्वालापञ्जरान्तर्व्यवस्थितिः।**
**न शौरिचिन्ताविमुखजनसंवासवैशसम्॥**

–आगीत जळून मरीन, अथवा पिंजऱ्यात सदाकरिता बंद पडून राहीन. तरीही कृष्णचिंतन–विमुखजनांचा संग करण्याची माझी इच्छा नाही.

पुनः श्रीमद्भागवतात–

**सत्यं शौचं दया मौनं बुद्धिर्ह्रीः श्रीर्यशः क्षमा।**
**शमो दमो भगश्चेति यत्संगाद्याति संक्षयम्॥**
**तेष्वशान्तेषु मूढेषु खण्डितात्मस्वसाधुषु।**
**सङ्गं न कुर्याच्छोच्येषु योषित्क्रीडामृगेषु च॥**

(श्रीमद्भा. ३/३१/३३-३४)

–ज्यांच्या संगाने सत्य, शौच (आतील-बाहेरील पवित्रता), दया, वाणी, संयम, बुद्धी, धन-संपत्ती, लज्जा, यश, क्षमा आणि इंद्रियांचा संयम तथा ऐश्वर्य आदी सर्व सद्गुण नष्ट होऊन जातात, अशा अत्यंत शोचनीय स्त्रियांचा क्रीडा-मृग (खेळणे); अशांत, मूढ आणि देहात्मदर्शी असत् पुरुषांचा संग कधीही करू नये.

गरुडपुराणात–

**अन्तर्गतोऽपि वेदानां सर्वशास्त्रार्थवेद्यपि।**
**यो न सर्वेश्वरे भक्तस्तं विद्यात् पुरुषाधमम्॥**

(गरुडपुराण पूर्व २३१/१७)

–संपूर्ण वेद-वेदान्ताचे अध्ययन केल्यावरही तथा अन्यान्य संपूर्ण शास्त्रांचे ज्ञाता असूनही जो सर्वेश्वर श्रीकृष्णाचे भजन करीत नाही, त्यास अत्यंत नीच पुरुष समजावयास हवे.

श्रीमद्भागवतात (६/१/१८)–

**प्रायश्चित्तानि चीर्णानी नारायणपराङ्मुखम्।**
**न निष्पुनन्ति राजेन्द्र सुराकुम्भमिवापगाः॥**

–ज्याप्रकारे अनेक नद्यांच्या पाण्याने धुवूनही दारूचा घडा पवित्र होत नाही, त्याचप्रकारे मोठमोठी प्रायश्चित्ते वारंवार केल्यानेही भगवत्-विमुख मनुष्यास पवित्र करू शकत नाही.

स्कन्दपुराणात–

**हन्ति निन्दति वै द्वेष्टि वैष्णवान्नाभिनन्दति।**
**क्रुध्यते जाति नो हर्षं दर्शने पतनानि षट्॥**

–वैष्णवांना मारणे, त्यांची निंदा करणे, त्यांचा विद्वेष करणे, अभिनंदन न करणे, त्यांच्याप्रती क्रोध प्रकट करणे आणि त्यांना पाहून प्रसन्न न होणे–ही सहा अधःपतनाची कारणे आहेत.

दिगम्बर! या सर्व असत्-संगामुळे जीवांचे कल्याण होऊ शकत नाही. म्हणून अशा समाजात राहण्याचा काय उपयोग?

दिगम्बर–चांगल्या भल्या माणसाशी बोलायला आलो होतो. ठीक आहे, तू शुद्ध वैष्णवांचा संग कर, मी आता घरी जातो.

अद्वैतदास–(मनोमन–योग्य मार्गी लागतो आहे, आता याच्याबरोबर थोडे गोड बोलणे योग्य आहे.) घरी तर जाशीलच परंतु तू माझा बालमित्र आहेस, म्हणून तुला सोडण्याची इच्छाच होत नाही. कृपा करून इथे आलाच आहेस तर थोडावेळ आणखी थांबून येथे प्रसाद् वगैरे घेऊनच जा.

दिगम्बर–कालिदास! तुला तर माहितच आहे की मी खाण्यापिण्याचे खूप पथ्य पाळतो. केवळ एकदाच थोडेसे हविष्यान्न खातो. निघतांना खाऊनच निघालो होतो. तुला भेटून खूप प्रसन्न वाटले. वेळ मिळाला तर पुन्हा भेटू. रात्री थांबू शकत नाही, कारण गुरूनी दिलेल्या पद्धतीनुसार काही क्रिया कराव्या लागतात. आता मी निघायची परवानगी इच्छितो.

अद्वैतदास–ठीक आहे, मग नीघ, तुला नावेपर्यंत सोडायला येतो.

दिगम्बर–नको, नको, त्याची काहीच आवश्यकता नाही. तू तुझे काम कर, माझ्याबरोबर काही माणसे आहेत.

असे म्हणत दिगम्बर काली संबंधी गाणी गात-गात निघून गेले. इकडे अद्वैतदास एकाग्र होऊन आपल्या कुटीत नाम-भजन करू लागले.

**॥ नववा अध्याय समाप्त ॥**



# दहावा अध्याय (नित्यधर्म आणि इतिहास)

अध्यापक हरिहर भट्टाचार्य अग्रद्वीपाचे रहिवासी आहेत. त्यांच्या मनात एक शंका आली. बऱ्याचजणांकडे चौकशी करूनही त्यांची शंका दूर झाली नाही, उलट त्यांचे चित्त अधिकच क्षुब्ध झाले. एकदा त्यांनी अर्कटीला गावाच्या विख्यात अध्यापक श्रीचतुर्भुज न्यायरत्नांस विचारले–महाशय! तुम्ही सांगू शकता का की वैष्णवधर्म केव्हापासून प्रचलित झाला?

हरिहर भट्टाचार्य वैष्णवधर्मात दीक्षित होते. घरात भगवान श्रीकृष्णाची सेवापूजा करतात. चतुर्भुज भट्टाचार्य न्यायशास्त्राचे प्रकांड विद्वान आहेत. जवळजवळ वीसेक वर्षेपर्यंत न्यायाचे गंभीर अध्ययन करून आता धर्माप्रती उदासीन झाले होते. धार्मिक तंट्याविषयी त्यांना जराही आवड नव्हती. केवळ शक्तिपूजेच्यावेळी थोडीशी भक्ती अवश्य दाखवत असत. त्यांनी हरिहरच्या प्रश्नांचा अर्थ असा लावला की हरिहर वैष्णवधर्माचा पक्ष घेऊन त्यांना बिकट समस्येत गुंतवून टाकत आहेत; या व्यर्थच्या तंट्यापासून दूर राहणेच योग्य आहे.

असा विचार करून न्यायरत्न महाशय म्हणाले–हरिहर! आज पुन्हा असा प्रश्न का करीत आहेस? तू तर 'मुक्तिवाद' पर्यंत वाचले आहेस. पाहा, न्यायशास्त्रात वैष्णव धर्माचा कुठेही काहीच उल्लेख नाही. तू असा प्रश्न विचारुन मला का त्रास देत आहेस?

हरिहर थोड्या आवेशात येऊन म्हणाला–महाशय! मी वंश-परंपरेने वैष्णव-मंत्रात दीक्षित आहे आणि वैष्णवधर्मासंबंधी मला काहीच शंका नव्हती. आपण विक्रमपुरच्या तर्क-चूडामणींस तर जाणतच असाल ना! ते आजकाल वैष्णवधर्मास उखडून फेकण्याकरिता देश-विदेशांत त्याविरुद्ध प्रचार करीत आहेत. आणि त्याबरोबरच खूप धन मिळवत आहेत. त्यांनी कुठल्या शाक्त-प्रधान सभेत घोषणा केली आहे की "वैष्णवधर्म अगदीच आधुनिक आहे आणि त्यात काहीच सारतत्त्व नाही. नीच जातीचे लोकच वैष्णव होतात–उच्च जातीच्या लोकांमध्ये वैष्णवधर्माचा आदर नाही." त्यांच्यासारख्या मान्यताप्राप्त विद्वान व्यक्तीच्या मुखातून असा सिद्धांत ऐकून आधी तर माझ्या हृदयात थोडी वेदना अवश्य झाली, परंतु नंतर विचार करून

पाहिल्यावर असे वाटले की बंगालमध्ये श्रीचैतन्यदेवांच्या आविर्भावापूर्वी कुठेच वैष्णवधर्म नव्हता. साधारणतः सर्व ठिकाणी शक्तिमंत्रांनीच उपासना होत असे. आमच्यासारखे दोन-चार वैष्णव मंत्राचे उपासक अवश्य होते. परंतु शेवटी सगळेच ब्रह्मतत्त्वासच लक्ष्य बनवतात आणि मुक्तीकरिताच प्रयत्न करतात. उक्त वैष्णवधर्माचे पालन करण्यास पंचोपासकांचीही संमती होती. परंतु चैतन्य महाप्रभूंनंतर वैष्णव धर्माने एक नवेच रूप धारण केले आहे. वैष्णवजन 'मुक्ती' वा 'ब्रह्म' या दोन्ही नामांपैकी एक ही नाम ऐकणे पसंत करीत नाहीत. भक्तीस त्यांनी काय समजले आहे–मी सांगू शकत नाही. आंधळ्या गायींचा मार्गही वेगळाच असतो–हीच म्हण आजकालच्या वैष्णवांमध्ये पूर्ण चरितार्थ होते आहे. माझा प्रश्न असा आहे की अशा प्रकारचा वैष्णवधर्म आधीपासूनच चालत आला आहे का? अथवा चैतन्यदेवांच्या काळी या धर्माने असे रूप धारण केले आहे?

न्यायरत्न महाशयांनी पाहिले की हरिहरच्या मनातले भाव तर काही वेगळ्याच प्रकारचे आहेत, अर्थात हरिहर कट्टर वैष्णव नाही. हे जाणून त्यांचे मुख प्रसन्नतेने उमलले. ते म्हणाले–हरिहर! तू यथार्थच न्यायशास्त्राचा पंडित आहेस. तू जो काही विचार केलास, त्यास मी अगदी योग्य समजतो. आजकाल नवीन वैष्णवधर्माची जी लाट उठली आहे, त्याविरुद्ध काहीही बोलण्याचे साहस होत नाही. कलियुग आहे. आपल्याला सावधानच रहावयास हवे. या समयी बरेचसे धनी-मानी उच्च कुळाचे सज्जनही चैतन्य मतात प्रवेश करीत आहेत. ते आमचा बराच अनादर करतात. इतकेच काय तर आपल्याला शत्रूही समजतात. मला तर असे वाटते की काही दिवसांतच आपला व्यवसायही नष्ट होईल. आता तर तेली, तमोली (विड्याचे पान विकणारे), वाणी-वकील आदी सगळेच शास्त्रांचे पठण करू लागले आहेत. हे पाहून आम्हांला फार कष्ट होतात. पाहा ना, खूप दिवसांपासून ब्राह्मणांनी एक असा धंदाच बनवून ठेवला होता की ब्राह्मणांना सोडून दुसऱ्या वर्णाचे लोक शास्त्राध्ययन करू शकत नव्हते. सगळेच आमची मते मानण्यास बाध्य असत. परंतु आजकाल सर्व जातींचे लोक वैष्णव बनून धर्म तत्त्वांचे विवेचन करतात. जागोजागी या लोकांकडून या विषयी आम्हाला अगदी तोंडघशी पडावे लागते. निमाई पंडितानेच ब्राह्मण धर्माचा सर्वनाश केला आहे. हरिहर! तर्क चूडामणीने–एकतर पैशाच्या लोभाने असो अथवा ऐकून-बघून असो–जे काही सांगितले आहे ते बरोबरच सांगितले आहे. वैष्णवांची बोलणी ऐकून शरीराचा तिळपापड होतो. हे आता

इथपर्यंत बोलू लागले आहेत की शंकराचार्यांनी भगवंताच्या आज्ञेने मायावाद नामक एका मिथ्यावादाची स्थापना केली आहे आणि वैष्णवधर्मच आदी सनातन वैदिक धर्म आहे. ज्या धर्मास उत्पन्न होऊन अजून शंभर वर्ष पण झाली नाहीत, तोच धर्म आज अनादी झाला! आश्चर्य आहे!! पूर्वी नवद्वीप जितके उन्नत होते, आता तितकेच नेस्तनाबूद झाले आहे. विशेषकरून नवद्वीपाच्या गादीगाछा नामक गावी काही वैष्णव आहेत, ते पृथ्वीला गवताच्या एका पात्यासारखे समजतात. त्या लोकांत एक-दोन चांगले पंडितपण आहेत, ज्यांच्या उत्पातानेच सारा देश नेस्तनाबूद झालाय. वर्णधर्म, नित्य मायावाद, देवदेवींची पूजा आदी सर्व लोप पावत चालले आहेत. आजकाल लोक श्राद्ध आणि पिंडदान आदी कर्मसुद्धा करीत नाहीत. अध्यापकांची उपजीविका चालावी तरी कशी?

हरिहर म्हणाला–महात्मन्! यावर काही उपाय आहे का? आजही मायापुरात सहा-सात मोठमोठे ब्राह्मण पंडित आहेत. गंगेच्या पलीकडे कुलिया ग्रामीसुद्धा अनेक मोठमोठे स्मार्त आणि नैयायिक पंडित आहेत. जर सगळ्यांनी मिळून गादीगाछावर आक्रमण केले तर काही फळ प्राप्ती होईल की नाही?

न्यायरत्नाने काहीसे गंभीर होत उत्तर दिले–का नाही? खूप काही होऊ शकते, परंतु ब्राह्मण पंडितांमध्येही एकजूट असायला हवी. त्यांच्यातही आजकाल बरीच फूट पडली आहे. ऐकण्यात येते की, बऱ्याच पंडितांनी कृष्ण चूडामणीस अग्रणी बनवून गादीगाछातील वैष्णव पंडितांसोबत शास्त्रार्थ केला होता, परंतु वैष्णवांच्या पांडित्य-प्रतिभेसमोर ते टिकूच शकले नाहीत आणि अगदी वाईट पराभव होऊन परतले.

हरिहर म्हणाला–श्रीमानजी! आपण आमचे अध्यापक आहात. मोठमोठे अध्यापक आपले विद्यार्थी आहेत. आपण लिहिलेल्या न्यायशास्त्राची टीका वाचून मोठमोठे विद्वानपण 'फाँकीं'चे शिक्षण प्राप्त करतात. जर आपण मनात आणले तर वैष्णवांना बोलता-बोलता–अगदी सहजासहजी परास्त करू शकता. म्हणून आपण एकदातरी गोद्रुमी चलून या गोष्टीस प्रमाणित करून दाखवा की वैष्णवधर्म अगदीच आधुनिक आणि अवैदिक धर्म आहे. आपल्या या कार्याने ब्राह्मण समाजावर मोठे उपकारच होतील. त्याबरोबरच लुप्त होणाऱ्या आमच्या प्राचीन पंचोपासनेचे देखील संरक्षण होईल.

चतुर्भुज न्यायरत्न वैष्णवांशी तर्क करण्यात मनोमन घाबरत होते. जेथे कृष्ण चूडामणीसारखे विद्वान पंडितही पराजित झाले आहेत, तेथे संभावितपणे त्यांचीही तीच दशा होऊ शकते. ते म्हणाले–हरिहर! मी छद्मवेशात तेथे येईन, तू अध्यापकाच्या रूपातच गादीगाछा गावी तर्कांचा अग्नी प्रज्वलित कर. मग जे काही करायचे ते मी पाहून घेईन.

हरिहर म्हणाला–मी आपल्या आज्ञेचे अवश्य पालन करीन. पुढच्या सोमवारी, "बम बम महादेव" म्हणीत त्या किनारी हल्ला चढवीन.

शेवटी विचार करता-करता सोमवार येऊन ठेपलासुद्धा. हरिहर, कमलाकांत आणि सदाशिव नामक अध्यापकांना बरोबर घेऊन श्रीचतुर्भुज न्यायरत्नांच्या घरी पोहोचले आणि तेथून गंगा पार करून गोद्रुमी पोहोचले. संध्याकाळी चार वाजता ही मंडळी "हरिबोल, हरिबोल" करीत दुर्वासांप्रमाणे माधवी-मंडपात उपस्थित झाली. अद्वैतदास त्यावेळी आपल्या कुटीत हरिनाम करीत बसले होते. त्यांना पाहून ते आपल्या कुटीबाहेर आले आणि त्या लोकांना वेगवेगळी आसने देत मोठ्या प्रेमाने आसनस्थ करीत म्हणाले–बोला, आमच्यासाठी काय सेवा आहे?

हरिहराने उत्तर दिले–आम्ही वैष्णवांशी काही विषयांवर विचारविमर्श करण्याकरिता आलो आहोत.

अद्वैतदास म्हणाले–इथले वैष्णव कुठल्याही विषयावर कुणाशीही वादविवाद करणे पसंत करीत नाहीत. हो जर अगदी साधारणपणे आपण काही विचारू इच्छित असाल तर काही सांगितले जाऊ शकते. त्यादिवशी एक अध्यापक काही जिज्ञासा करण्याच्या बहाण्याने बराच तर्क-वितर्क करू लागले आणि शेवटी खूप दुःखी होऊन परतले. असो, मी परमहंस बाबाजींस विचारुन उत्तर देतो. असे म्हणून ते बाबाजींच्या कुटीत गेले आणि थोड्यावेळाने परतून मंडपात काही आसने घातली.

काही वेळातच परमहंस बाबाजी आपल्या भजन कुटीतून बाहेर येऊन मंडपात आले आणि सर्वप्रथम वृन्दादेवीस दंडवत करून आगंतुक (आलेल्या) अध्यापकांना प्रणाम करीत मोठ्या नम्रतेने म्हणाले–आम्ही आपली काय सेवा करू?

न्यायरत्न उत्तरले–आम्हाला आपल्याला एक दोन गोष्टी विचारायच्या आहेत, आम्हाला त्यांचे उत्तर हवे आहे.

हे ऐकून परमहंस बाबाजींनी श्रीवैष्णवदासांस बोलावले. वैष्णवदास बाबाजी त्यांची आज्ञा ऐकून लगोलग तेथे उपस्थित झाले आणि परमहंस बाबाजींस प्रणाम करीत त्यांच्याजवळ बसले.

बोलता बोलता एक छोटीशी सभाच जमली. सर्वजण बसल्यावर न्यायरत्नाने विचारले–मी जाणू इच्छितो की वैष्णवधर्म पुरातन आहे की आधुनिक?

परमहंस बाबाजींची आज्ञा घेऊन वैष्णवदास शांत तरीही मोठ्या गंभीर स्वरांत म्हणाले–वैष्णवधर्म सनातन आणि नित्य आहे.

न्यायरत्न–मी दोन प्रकारचे वैष्णवधर्म पाहातो आहे. एक प्रकारच्या वैष्णवधर्मात ब्रह्मास निराकार आणि निर्विशेष मानले जाते. परंतु निराकार वस्तूची उपासना होत नाही, म्हणून त्यात साधक सर्वप्रथम एका साकार रूपाची कल्पना करून त्याची उपासना करतो. या उपासनेची आवश्यकता केवळमात्र चित्त शुद्धीकरिता असते आणि चित्तशुद्धी झाल्यावर जेव्हा निराकार ब्रह्मज्ञान उदित होते, तेव्हा पूर्वोक्त, साकार उपासनेची आवश्यकताच राहात नाही. राधाकृष्ण, राम अथवा नृसिंह आदी सर्व रूपे मायेद्वारा कल्पित रूपे आहेत. या कल्पित साकार रूपांची उपासना केल्याने ब्रह्मज्ञान होते–या भावनेने जे लोक विष्णूची पूजा करतात, तथा विष्णु-मंत्राने उपासना करतात, ते पंचोपासकांमध्ये वैष्णव आहेत. दुसऱ्या प्रकारच्या वैष्णवधर्मात भगवान विष्णू अथवा राम वा कृष्णास नित्य साकार परब्रह्म मानले जाते. यापैकी प्रत्येकाची उपासना त्यांच्या निर्दिष्ट मंत्रांनी केल्याने साधक आपल्या उपास्य रूपाचे नित्यज्ञान आणि त्यांची कृपा प्राप्त करतो. या मतानुसार निराकार मत मायावाद आहे, मायावाद शंकराचार्यांची भ्रांती आहे. आता आपण हे सांगा की उपरोक्त दोन्ही प्रकारच्या वैष्णवधर्मांत कुठला धर्म सनातन आणि नित्य आहे?

वैष्णवदास–आपण शेवटी ज्या धर्माचा उल्लेख केलात, तोच वैष्णवधर्म आहे, तोच सनातनधर्म आहे. पहिला धर्म केवळ नाममात्राचा वैष्णवधर्म आहे. हा नित्य वैष्णवधर्माच्या प्रतिकूल अनित्यधर्म आहे, ज्याचे उगमस्थान मायावाद आहे.

न्यायरत्न–समजलो, चैतन्यदेवांनी ज्या मताचा प्रसार केला–आपल्यामते तोच वैष्णवधर्म आहे. केवळ राधाकृष्ण, राम, नृसिंह आदींची उपासना केल्यानेच वैष्णव होता येत नाही, चैतन्यमतानुसार राधाकृष्ण आदींची उपासना केल्यानेच

वैष्णव होता येते. हाच आपला विचार आहे, हो ना? ठीक आहे, हेच खरे, परंतु या धर्मास आपण सनातन कसे काय म्हणू शकता?

वैष्णवदास–वेदशास्त्रांमध्ये सर्व ठिकाणी याच वैष्णवधर्माची शिकवण दिली आहे. समस्त स्मृतीशास्त्रांमध्ये याच वैष्णवधर्माचा उपदेश आहे. समस्त आर्य-इतिहास याच वैष्णवधर्माचे गुणगान करत असतो.

न्यायरत्न–चैतन्यदेवांच्या जन्माची अजून दिडशे वर्षेही पूर्ण झाली नाहीत आणि जर तेच या मताचे मूळ प्रवर्तक आहेत, तर हे मत सनातन कसे काय असू शकते?

वैष्णवदास–जीव ज्या वेळी उत्पन्न झाला, त्याचवेळी वैष्णवधर्म सुद्धा प्रकटित झाला. आणि जिवाचा कुठल्याच जडीयकालात आरंभ नाही, म्हणून जीव अनादी आहे आणि त्याचा धर्म देखील ज्यास जैवधर्म अथवा वैष्णवधर्म म्हणतात, अनादी आहे. ब्रह्मा सर्वांत आदी (पहिला) जीव आहे, ब्रह्माच्या उत्पन्न होण्याबरोबरच वैष्णवधर्माची आधारभूता असलेल्या वेदवाणींचा प्रकाश होतो. त्या वेदवाणींना चतुःश्लोकी देखील म्हणतात. मुण्डकोपनिषदात असे लिहिले आहे–

**ब्रह्मा देवानां प्रथमः सम्बभूव विश्वस्य कर्त्ता भुवनस्य गोप्ता।**
**स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठां अथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह॥**[१]

(मुण्डकोपनिषद् १/१/१)

ही ब्रह्मविद्या काय शिकवण देते–हे ऋग्वेद संहिता (१/२२/२०) मध्ये पाहा–

**तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः। दिवीव चक्षुराततम्।**[२]

---

(१) संपूर्ण जगाचे रचयिता आणि सर्व लोकांची रक्षण करणारे ब्रह्मदेव समस्त देवतांच्याही आधी प्रकट झाले. त्यांनी आपले ज्येष्ठ पुत्र अथर्व यांस समस्त विद्यांची आधारभूता ब्रह्मविद्येचा यथायोग्य उपदेश दिला.

(२) जसे नेत्र आकाशातील सूर्याचे कुठल्याही बाधेशिवाय दर्शन करू शकतात, ज्ञानीजनही त्याचप्रमाणे भगवान विष्णूंच्या त्या परम पदाचे नित्यकाल दर्शन करीत असतात.

कठोपनिषदातही म्हटले आहे–**विष्णोर्यत् परमं पदम्॥**[३]

श्वेताश्वतरोपनिषद् (५/४) मध्येही लिहिले आहे–

**एवं स देवो भगवान् वरेण्यो योनिस्वभावानधितिष्ठत्येकः॥**[४]

तैत्तिरीयोपनिषदातही (२/२) म्हटले आहे–

**सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म। यो वेद निहितं गुहायां परमे व्योमन्।**
**सोऽश्नुते सर्वान् कामान् सह ब्रह्मणा विपश्चिता॥**[५]

न्यायरत्न–आपण ज्या "तद् विष्णोः परमं पदं"–वेदवाणीद्वारे वैष्णवधर्मास इंगित करीत आहात, ती मायावादाच्या अंतर्गत वैष्णवधर्माकरिता नाही–असे आपण कसे म्हणू शकता?

वैष्णवदास–मायावादी वैष्णवधर्मात नित्य आनुगत्य (सेवकभाव) ठेवीत नाहीत. ज्ञान प्राप्त झाल्यावर यामुळे साधक स्वयं ब्रह्म होतो. ब्रह्म झाल्यावर मग आनुगत्य-धर्मच कुठे राहिला? परंतु शास्त्र सांगतात–

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम्॥**[६]

(कठ. उ. २/२३)

---

(३) विष्णूचे चरणकमलच परम श्रेष्ठ आहेत.

(४) ज्या प्रकारे हा सूर्य समस्त दिशांना वरून खालून तथा यत्र-तत्र सर्व बाजूंनी प्रकाशित करीत देदीप्यमान असतो, त्याच प्रकारे समस्त देवतांचेही आदी आणि परम देवता भगवान विष्णू समस्त कारणांचे कारणस्वरूप होऊनही निर्विकार स्वभावात वर्तमान आहेत तथा तेच एकमात्र वरणीय आणि उपास्य आहेत.

(५) ब्रह्म सत्यस्वरूप, ज्ञानस्वरूप आणि अनंतस्वरूप आहे. जो मनुष्य परव्योमात राहून सुद्धा प्राण्यांच्या हृदयरूप गुहेत लपलेल्या त्या ब्रह्मास जाणतो, तो त्या अंतर्यामी ब्रह्मासोबत समस्त भोगांचा अनुभव करतो.

आनुगत्य धर्मच एकमात्र धर्म आहे. त्याद्वारे परब्रह्माची कृपा झाल्यावर परब्रह्माचे नित्यरूप दर्शन करता येऊ शकते. ब्रह्मज्ञानाने त्या नित्यरूपाचे दर्शन होत नाही. याच सुदृढ वेदवाक्यानेच शुद्ध वैष्णवधर्माचे वेदमूलत्व आपण समजू शकता. ज्या वैष्णवधर्माची शिकवण श्रीमन् महाप्रभूंनी दिली आहे, तोच वैष्णवधर्म आहे, यात संदेह करण्याचे काहीच कारण नाही.

न्यायरत्न–समस्त शास्त्रांचे मूळ तात्पर्य कृष्णभजन आहे, ब्रह्मज्ञान नाही– वेदांमध्ये अशा प्रकारचे मंत्र आढळतात का?

वैष्णवदास–**रसो वै सः** (तै. आ.२/७)(७), अर्थात **श्यामाच्छबलं प्रपद्ये शबलाच्छ्यामं प्रपद्ये** (छां. उ. ८/१३/१)(८). अशा प्रकारे अनेक वेदमंत्रांनी कृष्णभजनच निर्दिष्ट केले आहे.

न्यायरत्न–वेदांमध्ये 'कृष्ण' नामाचा उल्लेख कुठे आढळतो का?

वैष्णवदास–'श्याम' शब्दाने कृष्णाचा बोध होत नाही का? **अपश्यं गोपामनिपद्यमानमा** (ऋग्वेद १/२२/१६४/३१)(९) इत्यादी वेदमंत्रांमध्ये कृष्णाचाच उल्लेख केलेला आहे.

न्यायरत्न–या मंत्रांमध्ये 'कृष्णाचे' नाव स्पष्टपणे आढळत नाही. आपण ओढूनताणून तो अर्थ लावण्याचा प्रयत्न का करीत आहात?

---

(६) हा परब्रह्म परमात्मा प्रवचनाने नाही, बुद्धीने नाही आणि जास्ती ऐकल्यानेही प्राप्त होत नाही, तर ज्यास तो कृपा करून स्वीकारतो, त्याच्याद्वारेच प्राप्त करता येतो; कारण हा परमात्मा त्याच्यासमोरच आपल्या यथार्थ रूपास प्रकट करतो.

(७) परम पुरुष (कृष्ण) रसस्वरूप आहेत.

(८) कृष्ण-सेवेद्वारे विचित्र विलासांनी परिपूर्ण अप्राकृत चिदानंदमय धामाची प्राप्ती होते तथा विविध विचित्रतापूर्ण त्या चित् जगतापासून कृष्णाची प्राप्ती होते.

(९) गोपाळ वंशात उत्पन्न झालेल्या कृष्णास पाहिले, ज्याचे कधीच पतन होत नाही, अर्थात ते अच्युत आहेत.

वैष्णवदास–आपण जर वेदांचा व्यवस्थित अभ्यास कराल तर दिसेल की सर्व विषयांच्या संदर्भात वेद अशाच प्रकारच्या वाक्यांचा प्रयोग करतात. आमच्या प्रधान-प्रधान ऋषिमुनींनी या वेदमंत्रांचे जे अर्थ-निरूपण केले आहे, आम्हाला ते अर्थ स्वीकारायला हवे.

न्यायरत्न–आता वैष्णवधर्माचा इतिहास सांगा.

वैष्णवदास–मी आधीच म्हटले आहे की वैष्णवधर्म जिवांच्या उत्पत्तीसोबतच उदित झाला आहे. प्रथम वैष्णव आहेत–ब्रह्मा. श्रीमहादेव वैष्णव आहेत. समस्त प्रजापती वैष्णव आहेत. ब्रह्माचे मानसपुत्र नारदमुनी वैष्णव आहेत. आता यावरून हे स्पष्टपणे प्रतीत होते की की वैष्णवधर्म सृष्टीच्या आदीकालापासून चालत आलेला आहे. हा काही आधुनिक धर्म नाही. खरे तर सर्व जीव निर्गुण प्रकृतीचे नसतात; ज्या जिवाची प्रकृती जितकी निर्गुण असेल, तो तितकाच उत्तम कोटीचा वैष्णव असतो. महाभारत, रामायण आणि पुराणच आर्य जातीचे प्रारंभिक इतिहास-ग्रंथ आहेत. या समस्त ग्रंथांमधून वैष्णवधर्माची उत्कर्षताच प्रतिपादित केलेली आहे. आपण सृष्टीच्या आदीकाळी वैष्णवधर्म पाहिला. त्यानंतर ध्रुव आणि प्रल्हादांना आपण पाहतो. हे दोघेही शुद्ध वैष्णव आहेत. त्यांचे काळी आणखी हजारो-हजारो वैष्णव होते; ज्यांचा संबंधात कुठेच कसलाच उल्लेख मिळत नाही. याचे कारण असे आहे की इतिहासात केवळ प्रमुख-प्रमुख व्यक्तींचीच नावे उल्लेखित असतात. साधारण लोकांच्या नावांना तेथे स्थान नसते. ध्रुव, मनूचे पुत्र आहेत आणि प्रल्हाद कश्यप प्रजापतींचे पौत्र (नातू) आहेत. हे सगळे अत्यंत आदीकालापासून आहेत–यात काहीच संशय नाही. म्हणूनच आपण इतिहासाच्या प्रारंभिक काळापासूनच वैष्णवधर्मास लक्ष्य करीत आहात. ह्यानंतर सूर्यवंशी आणि चन्द्रवंशी राजागण आणि उत्तमोत्तम मुनिजन तथा ऋषिगण सगळेच वैष्णव होते. सत्य, त्रेता आणि द्वापर–या तीन युगांमध्येपण वैष्णवधर्माचा उल्लेख पूर्णपणे दिसून येतो. कलियुगातसुद्धा दक्षिण भारतात श्रीरामानुज, श्रीमध्वाचार्य आणि श्रीविष्णू स्वामी तथा पश्चिम भारतात निम्बादित्य स्वामींनी हजारो-हजारो मनुष्यांना विशुद्ध वैष्णवधर्मात दीक्षित केले होते.

माझ्यामते, त्या लोकांच्या कृपेनेच भारतवर्षातील अर्धेअधिक मनुष्य माया-सागरातून पार होऊन भगवद्भजनात प्रवृत्त झाले आहेत. बंगाल देशातच पाहा, माझे

प्राणेश्वर श्रीशचीनन्दनांनी न जाणो कितीतरी दीनहीन आणि पतितांचा उद्धार केला आहे. हे ऐकून-पाहूनही वैष्णव धर्माचे माहात्म्य आपल्याला पटत नाही का?

न्यायरत्न–ठीक आहे, परंतु प्रल्हाद आदींना कशाच्या आधारावर वैष्णव म्हटले जावे?

वैष्णवदास–शास्त्रांच्या आधारे म्हटले जाऊ शकते. षण्डामर्क प्रल्हादास मायावादाने दूषित ब्रह्मज्ञानाची शिकवण देऊ इच्छित होते, परंतु प्रल्हादाने ती शिकवणूक ग्रहण न करता भगवन्नामासच समस्त शिकवणुकींचे सार मानले होते. म्हणून ते निरंतर मोठ्या प्रेमाने भगवन्नाम करीत असत. अशा अवस्थेत प्रल्हाद एक शुद्ध वैष्णव होते–यात संदेहच काय उरला? यथार्थ गोष्ट तर ही आहे की जोपर्यंत बुद्धी थोडी निरपेक्ष आणि सूक्ष्म नसते, तोपर्यंत शास्त्रांचे गूढ तात्पर्य समजणे कठीण आहे.

न्यायरत्न–जर वैष्णवधर्म अशाच प्रकारे नित्य चालत आलेला आहे, मग चैतन्य महाप्रभूंनी अशी कोणती नवीन शिकवण दिली आहे, ज्यामुळे ते विशेष श्रद्धेचे पात्र झाले आहेत?

वैष्णवदास–वैष्णवधर्म कमळाच्या सुमनाप्रमाणे वेळेनुसार क्रमशः उमलत आला आहे. प्रथम कळीच्या रूपात होता, मग थोडासा विकसित झाल्यासारखा दिसला आणि शेवटी पूर्णपणे विकसित होऊन आपल्या सौरभास (सुगंधास) चारही दिशांत पसरवीत जिवांना आकृष्ट करू लागला. ब्रह्मदेवांच्या समयी भगवत्-ज्ञान, मायाविज्ञान, भक्ति-साधन आणि प्रेम जिवांच्या हृदयात चतुःश्लोकीच्या रूपात व्यक्त झाले. वैष्णवधर्माचा हा अंकुरित होण्याचा काळ आहे. प्रल्हाद आदींच्या समयी कळीच्या रूपात व्यक्त झाला आहे. क्रमशः वेदव्यास मुनींच्या समयी या धर्माच्या पाकळ्या काही-काही विकसित रूपात दिसू लागल्या. रामानुज, मध्व आदी आचार्यांच्या वेळी तो थोडा आणखी विकसित होऊन त्याचा पुष्पाकार दिसू लागला आणि श्रीमन् महाप्रभूंच्या काळी हे अर्ध-विकसित पुष्प पूर्ण विकसित होऊन आपल्या सौरभाने जगतास आकृष्ट करू लागले आहे. नाम-प्रेम वैष्णवधर्माचा अत्यंत निगूढ भाव आहे, ज्यास महाप्रभूंनी जगतातील जिवांकरिता प्रकाशित केला आहे. श्रीनामसंकीर्तन परम अमूल्य आणि अतिशय आदरयुक्त वस्तू आहे–या उपदेशास कधी कुणी प्रकाशित केले होते का? यद्यपि हा उपदेश शास्त्रांमध्ये आधीदेखील वर्तमान होता, तरीही जीवांसमोर ज्वलंत आदर्शाच्या रूपात प्रकाशित नव्हता,

ज्यामुळे साधारण जीव यास आपल्या जीवनात आचरण्याची प्रेरणा प्राप्त करू शकले असते. श्रीमन् महाप्रभूंच्या पूर्वी प्रेमरसाचे भांडार अशा प्रकारे साधारण जीवांमध्ये कधी कुणी लुटविले होते का?

न्यायरत्न–ठीक आहे, जर कीर्तन इतकेच उपकारी आहे तर पंडित-मंडळींमध्ये याचा आदर का नाही?

वैष्णवदास–आजकाल 'पंडित' शब्दाचा अर्थ विपरीत लावला जात आहे. संपूर्ण शास्त्रांमध्ये पारदर्शी (उज्ज्वला) बुद्धीला पंडा म्हटले जाते. अशा बुद्धियुक्त व्यक्तींस पंडित म्हणू शकतो. 'पंडित' शब्दाचा हाच यथार्थ अर्थ आहे. परंतु आजकाल थोडे-फार संस्कृत भाषेचे अध्ययन करून न्याय आणि स्मृती आदी शास्त्रांचे लोकरंजनपूर्ण अर्थ करणारे अथवा निरर्थक युक्ती-जालाचा विस्तार करणारेच पंडित म्हणविले जातात. असे पंडित कशा प्रकारे धर्माचे तात्पर्य आणि शास्त्रांचे वास्तविक अर्थ समजू वा समजावू शकतील? निरपेक्ष शास्त्रांचे अध्ययन केल्याने जे फळ प्राप्त होते, ते शुष्क तर्क-वितर्कांनी थोडेच प्राप्त करता येते? खरी गोष्ट तर ही आहे की व्यर्थ वितंडवादाने जे आपल्यास आणि दुसऱ्यास वंचित करण्यात पटू असतात, असे वंचकच कलियुगात पंडित असतात. अशा पंडित मंडळींमध्ये घट-पट संबंधी तर्कच सर्वदा होत असतात. तेथे वस्तू ज्ञान, संबंधज्ञान-तत्त्व, जीवांचे चरम प्रयोजन तथा त्याच्या प्राप्तीचे उपाय–या विषयांसंबंधी कधीच कुठलीच चर्चा होत नाही. जोपर्यंत तत्त्वाचे यथार्थ विवेचन होत नाही तोपर्यंत प्रेम आणि संकीर्तन, काय वस्तू आहेत, कसे जाणता येऊ शकते?

न्यायरत्न–ठीक आहे. मी हे मानले की आजकाल चांगले पंडित नाहीत. परंतु उच्च श्रेणींचे ब्राह्मण लोक वैष्णवधर्मास का स्वीकारीत नाहीत? ब्राह्मण–सात्त्विक वर्णाचे आहेत. सत्यपथ आणि उत्तम धर्माप्रती ब्राह्मणांची स्वाभाविक रुची असते. मग काय कारण आहे की अधिकांश ब्राह्मण वैष्णवधर्माच्या विरोधी आहेत?

वैष्णवदास–जेव्हा आपण विचारत आहात तेव्हा मला बाध्य होऊन सांगावे लागते. वैष्णवजन स्वभावानेच दुसऱ्यांविषयी कधी चर्चा करीत नाहीत. जर आपण कष्ट मानले नाहीत आणि सत्य जाणण्याची हार्दिक इच्छा बाळगत असाल तर मी आपल्या उरलेल्या प्रश्नांचे उत्तर देण्याचा प्रयत्न करतो.

न्यायरत्न–काहीही होवो, शास्त्रांचे अध्ययन करून आपण शम, दम आणि तितीक्षेचे पक्षपाती आहोत. आम्ही आपल्या बोलण्यास सहन करू शकणार नाही, असे काही नाही. आपण निःसंकोचपणे स्पष्ट बोला. आम्ही योग्य (चांगल्या) गोष्टींचा आदर करतो.

वैष्णवदास–पाहा, रामानुज, मध्व, विष्णुस्वामी आणि निम्बादित्य हे सगळे ब्राह्मण आहेत. त्यांचे हजारो-हजारो ब्राह्मण शिष्य होते. गौड देशीचे आमचे श्रीचैतन्य महाप्रभू वैदिक ब्राह्मण आहेत. आमचे नित्यानन्द प्रभू राढीय ब्राह्मण आहेत; आमचे अद्वैत प्रभू वारेन्द्र ब्राह्मण आहेत तथा आमचे गोस्वामी आणि संतजन अधिकांश ब्राह्मणच आहेत. हजारो-हजारो उच्च श्रेणीचे ब्राह्मण आजकाल वैष्णवधर्म ग्रहण करून त्याचा समग्र विश्वात प्रचार करीत आहेत. असे असतांना आपण असे कसे म्हणू शकता की उच्च श्रेणीचे ब्राह्मण वैष्णव धर्माचा आदर करीत नाहीत? आम्ही जाणतो, जे ब्राह्मण वैष्णव धर्माचा आदर करतात ते अत्यंत उच्च श्रेणीचे ब्राह्मण आहेत. परंतु कूळ आणि संगदोषामुळे तथा असत् शिक्षणामुळे काही लोक ब्राह्मण वंशात जन्म घेऊनही वैष्णवधर्माचा विद्वेष करतात. यामुळे त्यांच्या दुर्भाग्याचा आणि पतनाचाच परिचय होतो. त्यांच्या ब्राह्मणत्वाचा नाही. विशेषतः शास्त्रानुमोदित सद्ब्राह्मण कलिकाळात अत्यंत अल्प आहेत आणि ते अल्पसंख्याक ब्राह्मणच वैष्णव आहेत. ब्राह्मण ज्यावेळी वेद माता गायत्रीस प्राप्त करतात, त्याच वेळी ते दीक्षित वैष्णव होऊन जातात. कलीच्या संसर्गाने त्यापैकी काही लोक पुनः अवैदिकी दीक्षा ग्रहण करून वैष्णव धर्माचा परित्याग करतात. म्हणून वैष्णव-ब्राह्मणांची संख्या अल्प जाणून कुठल्या प्रकारचा दिशाभूल करणारा सिद्धांत मांडू नका.

न्यायरत्न–नीच जातींचेच लोक अधिकांश रूपात वैष्णवधर्म का स्वीकारतात?

वैष्णवदास–यात संदेहाचे काहीच कारण नाही. नीच जातींमध्ये अधिकांश व्यक्ती स्वतःस दीनहीन समजतात. म्हणूनच ते वैष्णवांचे दयापात्र होतात. वैष्णवांच्या कृपेव्यतिरिक्त वैष्णव होता येत नाही. जातिमद आणि धनमद आदींमध्ये उन्मत्त राहिल्याने दीनता हृदयास स्पर्श करीत नाही. म्हणूनच अशा लोकांकरिता वैष्णवांची कृपा लाभ करणे अत्यंत दुर्लभ असते.

न्यायरत्न–मी या विषयास पुढे आणखी वाढवू इच्छित नाही. मी पाहतो आहे की आपण क्रमशः शास्त्रांच्या त्याच कठोर वचनांना उद्धृत करणार जे कलियुगी ब्राह्मणांसंबंधी सांगितले गेले आहेत. वाराहपुराणोक्त "राक्षसाः कलिमाश्रित्य जायन्ते ब्रह्मयोनिषु" आदी वचनांना ऐकून आम्हाला फार दुःख होते. म्हणूनच या विषयाची चर्चा मी छेडत नाही. अच्छा, हे तरी सांगा की आपण ज्ञानाचे अनंत स्वरूप असणाऱ्या श्रीशंकराचार्यांचा आदर का नाही करीत?

वैष्णवदास–आपण हे काय म्हणताय? आम्ही श्रीशंकराचार्यांस महादेवांचा अवतार मानतो. श्रीमन् महाप्रभूंनी त्यांना आचार्यरूपात सन्मान करण्याचा उपदेश दिलेला आहे. आम्ही शंकराचार्यांचा आदर करतो. परंतु त्यांच्याद्वारे प्रकाशित मायावादास स्वीकारीत नाही. मायावाद वैदिक धर्म नाही, तर प्रच्छन्न-बौद्धमत आहे. आसुरी प्रवृत्तीच्या मनुष्यांकरिता भगवंताच्या आज्ञेने शंकराचार्यांनी वेद-वेदान्त आणि गीतादींचे विपरीत अर्थ करून अद्वैतवाद नामक एका असत् मतास प्रकाशित केले आहे. यात आचार्यांचा दोषच काय की ज्यामुळे त्यांची निंदा केली जावी? बुद्धदेव भगवंताचेच अवतार आहेत. त्यांनीही वेद-विरुद्ध बौद्ध मताचा प्रचार केला आहे. असे असले तरी कुठलीही आर्य संतान त्यांची निंदा करते का? जर असे म्हटले की–श्री भगवान आणि महादेवांना अशी कार्ये शोभा देत नाहीत, कारण त्यामुळे वैषम्य दोष लागतो; तर त्यास उत्तर असे आहे की विश्वपालक भगवान आणि त्यांचे कर्म सचिव महादेव सर्वज्ञ आणि सर्वमंगलमय आहेत. त्यांच्यात वैषम्य दोष येऊच शकत नाही. त्यांच्या कार्यांचा गंभीर अर्थ न समजल्याने अज्ञ आणि क्षुद्र जीव त्यांची निंदा करतात. भगवान आणि त्यांचे कर्म, मनुष्याच्या मन आणि बुद्धीच्या आवाक्यापलीकडचे आहेत. म्हणूनच बुद्धिमान मनुष्यांचे हे म्हणणे की "ईश्वराचे हे कार्य बरोबर नाही, असे होणे उचित होते"–योग्य नाही. असुर स्वभावाच्या लोकांस माया-जाळात आबद्ध करून ठेवण्यामागचा हेतू काय आहे–हे तर सर्वनियंता परमेश्वरच जाणतात. आम्हाला जाणण्याचा काहीच उपाय नाही. ही सर्व काही भगवंताची लीला आहे. भगवद्भक्तजन तर भगवंताच्या लीला-कथांच्या श्रवणातच आनंद प्राप्त करतात, या संबंधी कुठल्याही प्रकारचे तर्क-वितर्क करणे त्यांस पसंत नाही.

न्यायरत्न–आपण मायावादास वेद-वेदान्त आणि गीतेविरुद्ध का म्हणता?

वैष्णवदास–जर आपण उपनिषदे आणि वेदान्तसूत्रे वाचली आहेत, तर कृपया असे मंत्र आणि सूत्रे सांगा ज्यांच्यायोगे मायावादाची पुष्टी झाली आहे. मी त्यांचा यथार्थ आणि सरळ अर्थ सांगून प्रमाणित करीन की ते मायावादाची पुष्टी करीत नाहीत. काही-काही मंत्रांमध्ये मायावादाचा आभास अवश्य दिसतो, परंतु आधीच्या आणि नंतरच्या मंत्रांची विवेचना केल्यावर त्यांचा अर्थ स्पष्टच झळकतो आणि मायावादाची पुष्टी करणारा अर्थ तत्क्षणी तिरोहित (दूर) होऊन जातो.

न्यायरत्न–बंधू! मी उपनिषद आणि वेदान्त वाचलेले नाहीत. न्यायशास्त्राचा विषय असेल तर कंबर कसू शकतो. घटाला पट करू शकतो आणि पटाचा घट बनवू शकतो. गीतेचे थोडेसे अध्ययन तर अवश्य केले आहे, परंतु त्यात विशेष प्रवेश नाही. फलस्वरूप मला येथे गप्पच बसावे लागेल. अच्छा, एक गोष्ट आणखी विचारावीशी वाटते. आपण विद्वान आहात, तेव्हा यथायोग्य समजावून सांगा. वैष्णवजन विष्णूच्या प्रसादाप्रती अत्यंत श्रद्धा बाळगतात, परंतु ते अन्य देवी देवतांच्या प्रसादाप्रती अश्रद्धा का करतात? ते अन्य देवी देवतांचा प्रसाद का ग्रहण करत नाहीत?

वैष्णवदास–मी पंडित नाही, नितांत मूर्ख आहे. मी जे काही बोलतोय, ते या माझ्या गुरुदेवांच्या परमहंस महाराजांच्या कृपेनेच बोलतोय. शास्त्र अनंत आहेत. कुणीही संपूर्ण शास्त्रांचे अध्ययन केलेले नाही. शास्त्ररूपी समुद्राचे मंथन करून गुरुदेवांनी मला जी सार शिकवण दिली आहे, मी त्यासच समस्त शास्त्रांद्वारे प्रतिपादित सिद्धांतरूपात ग्रहण केले आहे. आपल्या प्रश्नाचे उत्तर हे आहे की वैष्णवजन अन्य देवी-देवतांच्या प्रसादाप्रती अश्रद्धेचा भाव ठेवीत नाही. श्रीकृष्ण समस्त ईश्वरांचेही ईश्वर अर्थात परमेश्वर आहेत. देव-देवी त्यांचे दास-दासी अर्थात भक्त आहेत. भक्तांच्या प्रसादाप्रती वैष्णवजन कधीही अश्रद्धा प्रकट करू शकत नाहीत, कारण भक्तांच्या प्रसादसेवेने शुद्धभक्तीची प्राप्ती होते. भक्तांची चरणधूळ, त्यांचे चरणामृत आणि अधरामृत–हे तिन्ही भवरोगास दूर करणाऱ्या महाऔषधी स्वरूप आहेत. खरी गोष्ट तर ही आहे की मायावादी कुठल्याही देवतेची पूजा करोत अथवा अन्न आदी नैवेद्य अर्पण करोत, मायावादाच्या निष्ठारूप दोषामुळे त्या देवता त्या नैवेद्यास ग्रहण करीत नाहीत. शास्त्रांमध्ये यांविषयी बरेच प्रमाण आहेत. जिज्ञासा केल्यावर सांगू शकतो. देवी देवतांचे पुजारी अधिकांश मायावादीच असतात. त्यांनी दिलेला देवप्रसाद ग्रहण केल्याने भक्तीची हानीच होते आणि भक्तिदेवीच्या निकट अपराधी व्हावे लागते. जर कुणी शुद्ध वैष्णव कृष्णास अर्पित केलेला प्रसाद अन्य

देवी-देवतांना अर्पण करतो, तेव्हा ते देवी-देवता मोठ्या प्रेमाने त्याला ग्रहण करून नृत्य करू लागतात. आणखी एक गोष्ट पाहा, शास्त्रांची आज्ञाच बलवान आहे. योगशास्त्रात योगाभ्यासी साधकास अन्य देवी-देवतांचा प्रसाद ग्रहण करण्यास निषेध केलेला आहे. याचा अर्थ हा नाही की योगी अन्यान्य देवतांच्या प्रसादाप्रती अश्रद्धेचा भाव ठेवतात. कारण योग-साधनेत प्रसादाचा त्याग केल्याने ध्यानास एकाग्र करण्यास खूप मदत होते. अशा प्रकारे भक्ति-साधनेतही उपास्य देवतेव्यतिरिक्त कुठल्याही दुसऱ्या देवतेचा प्रसाद खाल्ल्याने अनन्य भक्ती सिद्ध होत नाही. म्हणूनच असे समजणे चुकीचे आहे की वैष्णवजन अन्य देवी-देवतांच्या प्रसादाची घृणा करतात. केवळ शास्त्राज्ञेनुसार आपापल्या प्रयोजन-सिद्धीकरिता प्रयत्न केले जातात. बस हेच समजावे.

न्यायरत्न–अच्छा, हे तर समजलो, परंतु तुम्ही लोक शास्त्र-संमत यज्ञांत पशुवधाचा विरोध का करता?

वैष्णवदास–पशूंचा वध करणे हा शास्त्रांचा उद्देश नाही. वेदांमध्ये "मा हिंस्यात सर्वाणि भूतानि"–या मंत्राद्वारे पशुहिंसेचा निषेध केलेला आहे. मानव स्वभाव जोपर्यंत तामसिक आणि राजसिक राहतो, तोपर्यंत मनुष्य स्वभावतः स्त्रीसंग, मांस-भक्षण आणि मद्यपानात आसक्त राहतो. मनुष्यांना उपरोक्त कार्यांत प्रवृत्त करणे वेदांचे उद्दीष्ट नाही, उलट त्यांचा उद्देश्य तर त्यांना त्या-त्या कार्यांपासून निवृत्त करणे आहे. उपरोक्त प्रकारच्या उच्छृंखल प्रवृत्तींचे क्रमशः दमन करण्याकरिता वेदांमध्ये मद्य, मांस आणि मैथुनाची व्यवस्था केलेली आहे, जसे अनियमित समयी मैथुन करणाऱ्यांकरिता विवाहाद्वारे मैथुनाची व्यवस्था, निरंतर पशुवध करून मांसभक्षण करणाऱ्यांकरिता केवळ यज्ञाच्या वेळीच मांसभक्षणाची व्यवस्था आणि विशेष-विशेष वेळी विशेष क्रियांमध्येच मद्यपानाची व्यवस्था आहे. या व्यवस्थांचे विधिवत पालन केल्याने मनुष्याच्या कुप्रवृत्ती क्रमशः संकुचित होत-होत अंततः संपूर्णपणे निवृत्त होऊन जातात. वेदांमध्ये पशूंचा वध करण्याची आज्ञा दिलेली नाही, उलट त्याचे तात्पर्य या शब्दांमध्ये पाहा–

**लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्तु जन्तोर्न हि तत्र चोदना।**
**व्यवस्थितिस्तेषु विवाहयज्ञसुराग्रहै रासुनिवृत्तिरिष्टा॥**(१०)

(श्रीमद्भा.११/५/११)

याविषयी वैष्णवांचा सिद्धांत असा आहे की जर तामसिक आणि राजसिक प्रवृत्तीच्या मनुष्यांनी पशुवध केला तर काही आपत्ती नाही, परंतु सात्त्विक प्रवृत्तीच्या मनुष्यांद्वारे प्राणिहिंसा करणे योग्य नाही. जीवहिंसा पशु-वृत्ती आहे–

**अहस्तानि सहस्तानाम पदानि चतुष्पदाम्।**
**फल्गूनि तत्र महतां जीवो जीवस्य जीवनम्॥**(११)

(श्रीमद्भा. १/१३/४७)

मनुस्मृतीचा निर्णयही सुस्पष्ट आहे–

**प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तू महाफला॥**(१२)

(मनुस्मृती ५/५६)

न्यायरत्न–अच्छा, पितृ-ऋणातून उद्धार होण्याकरिता जे श्राद्धादी कर्म केले जातात, त्यांत वैष्णव आपत्ती का दर्शवितात?

---

(१०) संसारात पाहिले जाते की मद्य, मांस आणि मैथुनाप्रती प्राण्यांची स्वाभाविक प्रवृत्ती असते, तेव्हा त्यांना त्यांत प्रवृत्त करण्याकरिता विधान तर असूच शकत नाही. अशा स्थितीत विवाह, यज्ञ आणि शौत्रामणी यज्ञाद्वारेच त्यांच्या सेवनाची व्यवस्था दिलेली आहे. त्याचा अर्थ आहे–लोकांच्या उच्छृंखल प्रवृत्तींवर नियंत्रण. त्यांचे मर्यादेत स्थापित होणे. वास्तविक त्यांच्यापासून लोकांना निवृत्त करणेच वेदांचे गूढ तात्पर्य आहे.

(११) हातवाल्यांचे हात नसणारे, पाय असणाऱ्यांचे पाय नसणारे (तृणादी) आणि मोठमोठ्या जीवांचे छोटे जीव आहार आहेत. अशा प्रकारे एक जीव दुसऱ्या जिवाच्या जीवनाचे कारण ठरतो.

(१२) (मैथुन, मांस आणि मद्यात मनुष्यांची स्वाभाविक प्रवृत्ती असूनही) या विषयांतून निवृत्त होणेच महाफलदायक असते.

वैष्णवदास–कर्मांत आसक्त पुरुष जे कर्मकांडानुसार श्राद्ध करतात, त्याला वैष्णवांचा काहीच विरोध नसतो. शास्त्र तर केवळ इतकाच निर्देश देते–

**देवर्षिभूताप्तनृणां पितृणां न किंकरो नायमृणी च राजन्।**
**सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुन्दं परिहृत्य कर्तम्॥**

(श्रीमद्भा.११/५/४१)

अर्थात, जो मनुष्य सर्व प्रकारे भगवंताच्या शरणी आला आहे, तो देवता, ऋषी, पितर, प्राणी, कुटुंब आणि अतिथींच्या ऋणातून मुक्त होऊन जातो. तो कुणाच्याही अधीन नसतो, कुणाचाही सेवक नसतो किंवा कुणाचेही बंधन त्याच्यावर नसते. म्हणूनच पितृऋणापासून उद्धार होण्याकरिता कर्मकांडीय श्राद्ध आणि कर्मांचे विधान भगवंतास शरणागत झालेल्या भक्तांकरिता नसते. त्यांच्याकरता भगवंताची पूजा करून पितरांस भगवत्-प्रसाद अर्पण करून बंधु-बांधवांसोबत भगवत्-प्रसाद प्राप्त करणे हाच एकमात्र विधी आहे.

न्यायरत्न–अशी अवस्था आणि अधिकार केव्हापासून मानावा?

वैष्णवदास–ज्या समयी हरिनाम आणि हरिकथेत श्रद्धा उत्पन्न होते, त्यावेळी वैष्णवाचा हा अधिकार उत्पन्न होतो–

**तावत् कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता।**
**मत्कथा श्रवणादौ वा श्रद्धा यावन्न जायते॥**[(१३)]

(श्रीमद्भा. ११/२०/९)

न्यायरत्न–आपले विचार ऐकून मी अत्यंत प्रसन्न झालो. अगाध पांडित्य आणि विचारांची सूक्ष्मता पाहून माझी आज वैष्णव धर्मांत श्रद्धा उत्पन्न झाली आहे. बंधू हरिहर! शुष्क तर्कांनी कुठलाच लाभ होत नाही. हे महामहोपाध्याय पंडित आहेत. शास्त्रांच्या विवेचनात अत्यंत निपुण आहेत. आपल्या व्यवसायाच्या रक्षणाकरिता आम्ही काहीही बोललो तरी निमाई पंडितांसारखा प्रतिभाशाली पंडित

---

(१३) कर्मासंबंधी जितके विधी-निषेध आहेत त्यांच्यानुसार तोपर्यंत कर्म करावयास हवे जोपर्यंत कर्ममय जगत आणि त्यातून प्राप्त होणारे स्वर्ग आदी सुखांपासून वैराग्य होत नाही अथवा जोपर्यंत माझ्या लीला-कथांचे श्रवण-कीर्तन आदींमध्ये श्रद्धा होत नाही.

आणि उत्तम वैष्णव या बंगालच्या भूमीतच काय पण समस्त भारतात कधी जन्मला असेल की नाही–हे शंकास्पद आहे. चला, आता त्या किनारी जाऊ. दिवस मावळतो आहे. अंधार झाल्यावर नदी पार करायला त्रास होतो.

हे ऐकून अध्यापकांच्या दलाने 'हरिबोल, हरिबोल' म्हणत प्रस्थान केले. इकडे वैष्णवगणही भगवान श्रीशचीनन्दन गौरहरीस जय म्हणून नृत्य करू लागले.

**॥ दहावा अध्याय समाप्त ॥**



# अकरावा अध्याय (नित्यधर्म आणि पौत्तलिकता )

भागीरथीच्या पश्चिमी तटावर कुलिया पहाडपूर नामक एक गाव आहे. हे गाव श्रीनवद्वीपांतर्गत कोलद्वीपात अवस्थित आहे. श्रीमन् महाप्रभूंच्या समयी त्याच गावात श्रीमाधवदास चट्टोपाध्याय (नामांतर छकौडी चट्टोपाध्याय) नामक एक वैष्णव राहत असत. श्रीवंशीवदानन्द ठाकूर यांचेच सुपुत्र होते. श्रीचैतन्य महाप्रभूंच्या कृपेने वंशीवदनानन्दामध्ये विशेष प्रभुतेचा अविर्भाव झाला. सगळेजण त्यांना कृष्णाच्या बासरीचा अवतार मानत. श्रीविष्णुप्रियांचे ते मोठे कृपापात्र होते. श्रीप्रिया अप्रकट झाल्यानंतर त्यांनी श्रीप्रिया यांच्याद्वारे सेवित श्रीमूर्तीस श्रीधाममायापुरातून कुलिया पहाडपुरात आणविले होते. तेव्हापासून काही दिवसापर्यंत तर या श्रीमूर्तीची सेवा त्यांचे वंशजच करीत होते. परंतु जेव्हा हे लोक श्रीजान्हवीमातेची कृपा प्राप्त करून कुलिया-पहाडपुराहून श्रीपाट बाघनापाडा येथे निघून गेले, तेव्हा मालंचवासी सेवायितांनी श्रीमूर्तीस कुलियामध्येच ठेवून सेवा करणे आरंभ केले.

प्राचीन नवद्वीपाच्या दुसऱ्या किनारी कुलिया गाव आहे. कुलियामध्ये चिनाडांगा आदी अनेक प्रसिद्ध पाडे (खेडी) आहेत. चिनाडांगामध्ये एक भक्त व्यापारी होते. त्यांनी कुलिया पहाडपुरच्या मंदिरात एकदा एक पारमार्थिक महोत्सव केला होता. त्या उत्सवात अनेक ब्राह्मण पंडित आणि सोळा कोसांच्या नवद्वीपांतर्गत असलेल्या समस्त वैष्णवांना निमंत्रण दिले गेले होते. महोत्सवाच्या दिवशी चोहीकडून वैष्णवगण आले. श्रीनृसिंहपल्लीहून श्रीअनन्तदास आदी, श्रीमायापुरहून श्रीगोराचाँददास बाबाजी आदी, श्रीबिल्व पुष्करिणीहून श्रीनारायणदास बाबाजी प्रभृती, श्रीमोदद्रुमचे प्रसिद्ध नरहरिदास, श्रीगोद्रुमचे श्रीपरमहंस बाबाजी आणि श्रीवैष्णवदास तथा श्रीसमुद्रगडाहून श्रीशचीनन्दनदास आदी वैष्णवजन आले होते. सर्वांच्या ललाटी उर्ध्वपुंड्र तिलक (टिळा), गळ्यात तुळशीच्या माळा आणि समस्त अंगावर श्रीगौरनित्यानन्दांची मुद्रा (छाप) शोभायमान होत होती. सर्वांच्या हाती श्रीहरिनामाची माळ होती. कुणी-कुणी जोरजोरात–**"हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥"** या महामंत्राचे गान करीत होते. कुणी कुणी मृदंग आणि करतालासोबत संकीर्तन करीत येत होते. कुणी

कुणी–“**श्रीकृष्णचैतन्य प्रभू नित्यानन्द।श्रीअद्वैत गदाधर श्रीवासादि गौर भक्तवृन्द॥**” असे कीर्तन करीत नाचत-नाचत चालत येत होते.

अनेकांच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहत होत्या. कुणाकुणाचं अंग पुलकित होत होते. कुणी कुणी अत्यंत कातर होत क्रंदन करीत-करीत म्हणत होते–“हा गौरकिशोर! तुमच्या नवद्वीपातील नित्यलीलेचे दर्शन कधी होणार!” कुणी-कुणी वैष्णवगण मृदंग आदी वाद्यांसोबत ‘नाम' गान करीत येत होते. कुलियाच्या सुंदरी वैष्णवांचे परमोच्च भाव पाहून आपल्या भाग्याची प्रशंसा करीत होत्या. अशा प्रकारे चालता-चालता जेव्हा वैष्णववृंद श्रीमन् महाप्रभूंच्या नाट्यमंदिरात उपस्थित झाले, तेव्हा भक्तवणिक (भक्त-व्यापारी) आपल्या गळ्यात वस्त्र घालून वैष्णवांच्या चरणी पडून नाना प्रकारे आपली दीनता प्रकट करू लागले. वैष्णवजन नाट्यमंदिरात स्थानापन्न झाल्यावर मंदिराच्या सेवकांनी त्यांच्या गळ्यांत भगवंताची प्रसादरूपी माळ घातली. त्यानंतर श्रीचैतन्यमंगलाचे कीर्तन होऊ लागले. श्रीचैतन्यदेवांच्या अमृतमयी लीला श्रवण केल्याने वैष्णवांमध्ये अनेक सात्त्विक भाव प्रकटू लागले. ज्यावेळी ही मंडळी अशा प्रकारे प्रेमानंदात विभोर होत होती, त्यावेळी एका द्वारपालाने अधिकाऱ्यांना सूचना दिली की सातसाईका परगण्याचे प्रधान मौलवी साहेब आपल्या संपूर्ण दलासोबत सभामंडपाबाहेर येऊन बसलेले आहेत. ते वैष्णव पंडितांबरोबर काही बातचीत करू इच्छित आहेत. अधिकाऱ्यांनी समागत पंडित बाबाजी-मंडळींस मौलवी साहेबांच्या आगमनाची आणि त्यांच्या अभिलाषेची वार्ता सांगितली. हे ऐकताच वैष्णव मंडळींचा रसभंग झाल्याने काहीसा विषाद सर्वत्र पसरला.

मौलवी साहेबांचा अभिप्राय आहे तरी काय?–मध्यद्वीपातील कृष्णदास बाबाजींनी अधिकाऱ्यांना विचारले.

“मौलवी साहेब पंडित वैष्णवांसोबत पारमार्थिक विषयावर बातचीत करू इच्छित आहेत. मौलवी साहेब मुसलमानांमध्ये एक अद्वितीय पंडित आहेत तथा दुसऱ्या धर्मांप्रती त्यांच्या हृदयात ईर्षा-द्वेषाची थोडीदेखील भावना नाही. दिल्लीच्या सम्राटाच्या दरबारात त्यांना मोठा सन्मान मिळतो. आमची प्रार्थना आहे की दोन-चार पंडित वैष्णवांनी त्यांच्यासोबत शास्त्रार्थ करावा; कारण यात पवित्र वैष्णवधर्माचा

विजय होण्याची संभावना आहे.” मंदिराच्या अधिकाऱ्यांनी मोठ्या नम्रतेने उत्तर दिले.

वैष्णवधर्माचा प्रचार होऊ शकतो–हे ऐकून काही वैष्णवांच्या मनात मौलवी साहेबांशी बोलण्याची इच्छा उत्पन्न झाली. शेवटी सर्वांनी मिळून निश्चय केला की–मायापुरचे गोराचाँददास पंडित बाबाजी, गोद्रुमचे वैष्णवदास बाबाजी, जन्हुनगरचे प्रेमदास बाबाजी आणि चंपाहटचे कलिपावनदास बाबाजी–हे लोक मौलवी साहेबांसोबत बातचीत करतील आणि बाकी सगळे श्रीचैतन्यमंगल-गीत संपल्यावर तेथे जातील. परामर्श झाल्यावर उक्त चारही बाबाजी “जय नित्यानन्द” म्हणत मौलवी साहेबांकडे गेले.

मंदिराबाहेर एक प्रशस्त मंडप आहे. जवळच एक खूप मोठा पिंपळाचा वृक्ष आहे. त्याच्याच दाट आणि शीतल छायेत मौलवीसाहेब आपल्या दलासोबत बसले होते. वैष्णवांना येतांना पाहून ते सगळे लोक उठून उभे राहिले आणि त्यांची अभ्यर्थना (आदर-सत्कार) करून सर्वांना सन्मानपूर्वक बसविले. वैष्णवगण सर्वांस कृष्णदास जाणून मौलवींच्या हृदयातील विराजमान वासुदेवास दंडवत करून एका वेगळ्या आसनावर बसले. त्यावेळी एक अपूर्व शोभा दृष्टीस पडली. एकीकडे श्वेत दाढीवाले पन्नास मुसलमान पंडित सजूनधजून बसले आहेत, त्यांच्यामागे काही सुसज्जित घोडे बांधलेले आहेत. दुसरीकडे दिव्य-दर्शनधारी चार वैष्णव विनीत भावपूर्वक आसनस्थ झालेले आहेत. त्यांच्यामागे खूपसे हिंदू अत्यंत उत्सुक होऊन बसले आहेत आणि खूपसे आणखीही येऊन-येऊन बसत आहेत.

पंडित गोराचाँद यांनी प्रथमच विचारले–महोदयगण, आपण आम्हा अकिंचनांना का बोलाविले?

मौलवी बदरुद्दीन साहेब विनयपूर्वक उत्तरले–आधी आपण आमचा सलाम ग्रहण करा. आम्ही आपणांस काही प्रश्न विचारू इच्छितो.

पंडित गोराचाँद म्हणाले–आम्ही काय जाणतो म्हणून आपल्या पांडित्यपूर्ण प्रश्नांची उत्तरे देऊ शकू?

बदरुद्दीन साहेब पुढे म्हणाले–हिंदू समाजात प्राचीन काळापासून देवी-देवांची पूजा चालत आली आहे. आम्ही ‘कुराण शरीफ’ मध्ये पाहतो की “अल्ला दोन

नाही–एक आहे. तो निराकार आहे आणि त्यांच्या प्रतिमांचे पूजन केल्याने अपराध होतो." मला याविषयी संदेह आहे आणि या संदेहास दूर करण्याकरिता अनेक ब्राह्मण-पंडितांबरोबर जिज्ञासादेखील केली आहे. ते म्हणतात–अल्ला निराकार आहे, परंतु निराकार वस्तूचे चिंतन असंभव आहे, म्हणून अल्लाच्या एका आकाराची कल्पना करून पूजा करायची असते, परंतु या गोष्टीने आम्हांस संतोष होत नाही. कारण कल्पित आकार सैतानाद्वारे निर्मित असतो ज्यास 'बुत' म्हणतात. अशी बुत-पूजा नितांत निषिद्ध आहे. यामुळे अल्लास संतुष्ट करणे तर दूरच, उलट दंडभागी व्हावे लागते. आम्ही ऐकले आहे, आपल्या आदी प्रचारक भगवान श्रीचैतन्यदेवांनी हिंदू धर्मास निर्दोष घोषित केले आहे, तरीही त्यांच्या संप्रदायात 'बुत-परस्त' अर्थात भूत-पूजेची व्यवस्था दिसून येते. आम्ही जाणू इच्छितो की शास्त्र विचारात इतके निपुण असल्यावरही आपण भूत-पूजेचा परित्याग का नाही करीत?

मौलवी साहेबांचा प्रश्न ऐकून पंडित-वैष्णवजन मनोमन हसू लागले. मग परस्पर परामर्श करून पंडित गोराचाँद यांस मौलवी साहेबांच्या प्रश्नाचे उत्तर देण्यास सांगितले गेले. पंडित गोराचाँदांनी 'जशी आज्ञा' म्हणत प्रश्नांचे उत्तर देण्यास आरंभ केला–

आपण ज्यास अल्ला म्हणता, आम्ही त्यास भगवान म्हणतो. परमेश्वर एकच आहे. कुराण तथा पुराणांमध्ये देश आणि भाषेच्या भेदाने परमेश्वराची अनेक नामे आहेत. विचार हा आहे की जे नाम परमेश्वराच्या समस्त भावांस व्यक्त करते, ते विशेषरूपाने आदरणीय आहे. म्हणूनच आम्ही 'अल्ला' 'ब्रह्म' 'परमात्मा'–या नामांपैकी 'भगवान' नामाप्रती अधिक श्रद्धा ठेवतो. ज्यापेक्षा मोठे आणखी असे काहीच नाही, त्या पदार्थाचे नावच अल्ला आहे. अत्यंत बृहत् भावासच आम्ही परम भाव मानत नाही. ज्या भावात सर्वाधिक चमत्कारिता आहे, मधुरता आहे, तोच भाव अधिक आदरणीय आहे. अत्यंत बृहत् म्हटल्याने एका प्रकारची चमत्कारिता तर जाणवते, परंतु त्याचा विपरीत भाव–अत्यंत 'सूक्ष्म भाव' यातही एक प्रकारची चमत्कारिता आहे. म्हणूनच 'अल्ला' नामाद्वारे चमत्कारितेच्या सीमेचा बोध होत नाही अर्थात 'अल्ला' यात बृहत्व तर आहे, परंतु सूक्ष्मत्व नाही. परंतु 'भगवान'–या शब्दाने मानवी-चिंतनात जितक्या प्रकारच्या चमत्कारिता आहेत, त्या सर्वांचा बोध होतो.

समग्र 'ऐश्वर्य' अर्थात बृहत्ता आणि सूक्ष्मतेची सीमा भगवंताचे पहिले लक्षण आहे. सर्वशक्तीमत्ता भगवंताचे दुसरे लक्षण आहे. मानवी बुद्धीच्या पलिकडचे व्यापार अचिंत्य शक्तीच्या अधीन असतात. भगवंत आपल्या अचिंत्य शक्तीद्वारे युगपत् साकार आणि निराकार दोन्हीही आहेत. ते साकार नसू शकतात–असे मानल्याने त्यांच्या अचिंत्यशक्तीस अस्वीकार करणे होते. त्याच शक्तीद्वारे आपल्या भक्तांच्या निकट भगवान नित्य-लीला-मूर्तिमय आहेत. 'अल्ला', अथवा 'ब्रह्म', वा 'परमात्मा' केवळ निराकार असल्याने विशेष चमत्कारिता रहित आहेत. (तिसरे लक्षण) भगवंत सर्वदा मंगलमय आणि यशपूर्ण आहेत. म्हणून त्यांची लीला अमृतमयी आहे. (चौथे लक्षण) भगवान 'सौंदर्यपूर्ण' आहेत. समस्त जीवगण आपल्या अप्राकृत नेत्रांनी त्यास अतीव सुंदर पुरुषाच्या रूपात दर्शन करतात. (पाचवे लक्षण) भगवान 'अशेष-ज्ञान' अर्थात विशुद्ध, पूर्ण, चित्-स्वरूप जडातीत वस्तू आहेत. त्यांचे चित्-स्वरूपच त्यांची मूर्ती आहे. त्यांची ती मूर्ती 'बुत' अथवा प्राणिमात्रांच्या पलीकडची असते. (सहावे लक्षण) भगवंत सगळ्यांचे स्वामी (कर्ता) असूनही स्वतन्त्र आणि निर्लेप आहेत–ही सहा लक्षणे भगवंतात लक्षित होतात.

त्या भगवंताचे दोन प्रकाश आहेत, अर्थात ऐश्वर्यप्रकाश आणि माधुर्यप्रकाश. माधुर्यप्रकाशच जिवांचा परमबंधू आहे. तोच आमचा हृदयनाथ 'कृष्ण' अथवा 'चैतन्य' आहे. भगवंताच्या कल्पित मूर्ती-पूजेस बुतपरस्त अथवा भूत पूजा म्हटल्याने आम्हा लोकांच्या मताविरुद्ध होत नाही. भगवंताच्या नित्य विग्रहाची (जो संपूर्ण चिन्मय असतो) पूजा करणे वैष्णवांचा धर्म आहे. म्हणूनच वैष्णवांची विग्रह-पूजा बुत-परस्त नसते. कुठल्या पुस्तकात बुत-परस्तचा निषेध केल्यानेच ती निषिद्ध होऊ शकत नाही. जी व्यक्ती पूजा करते, त्याच्या हृदयाच्या निष्ठेवरच सर्व काही निर्भर असते. त्या व्यक्तीचे हृदय भूत-पूजेच्या जितक्या पलीकडे जाते, ती तितकीच शुद्ध रूपाने विग्रह पूजा करते. आपण मौलवी आहात, परम पंडित आहात, आपले हृदय भूतातीत असू शकते, परंतु आपले जे सगळे अपंडित चेले आहेत, त्यांचे हृदय भूत-चिंतनरहित झाले आहे काय? जितके दूरपर्यंत भूतचिंतन आहे, ते तितक्याच दूरपर्यंत भूतपूजा करीत असतात. मुखाने निराकार तर म्हणतात, परंतु हृदय भूत-चिंतनाने भरलेले असते. शुद्ध-विग्रह-पूजा सामाजिक होणे कठीण आहे. ती केवळ अधिकारी व्यक्तीच्या अनुसार व्यक्तिगत गोष्ट आहे. अर्थात जे भूत चिंतनाच्या पलीकडे गेले

आहेत, तेच शुद्ध रूपाने विग्रहाची सेवा-पूजा करू शकतात. मी आपणास विशेष विनंती करीन की आपण याविषयावर सखोल विचार करून पाहावा.

मौलवी साहेब–मी खूप बारकाईने विचार करून पाहिला आहे की आपण लोकांनी 'भगवान' शब्दांत ज्या सहा चमत्कारितांना संयुक्त केले आहे; कुराण-शरीफमध्ये 'अल्ला' शब्दातही त्याच चमत्कारिता सांगितल्या गेल्या आहेत. 'अल्ला' शब्दाचा अर्थ घेऊन तर्क-वितर्क करण्याची आवश्यकता नाही, अल्लाच भगवान आहे.

गोराचाँद–ठीक आहे, जर असे आहे तर आपण परमवस्तूचे सौंदर्य आणि ऐश्वर्य स्वीकारले आहे. म्हणून या जड जगापासून वेगळ्या चित्-जगात त्यांचे सुंदर स्वरूप स्वीकृत झाले. हेच आमचे श्रीविग्रह आहेत.

मौलवी–परमवस्तूच्या चित्-स्वरूप-श्रीविग्रहाची गोष्ट आमच्या कुराणातही लिहिली आहे–म्हणून आम्ही त्यास मानण्यास बाध्य आहोत. परंतु त्या चित्-स्वरूपाची कुठली प्रतिमूर्ती तयार केल्याने ती जडस्वरूप होऊन जाते. यासच आम्ही भूत (बुत) म्हणतो. भूत-पूजा केल्याने परम-वस्तूची पूजा होत नाही. याविषयी आपला विचार व्यक्त करावा.

गोराचाँद–वैष्णव शास्त्रांमध्ये भगवंताच्या विशुद्ध-चिन्मय-मूर्तीची पूजा व्यवस्था आहे. उच्चश्रेणीच्या भक्तांकरिता पार्थिव वस्तू अर्थात पृथ्वी, जल, अग्नी आदी भूतांपासून उत्पन्न वस्तूंची पूजा करण्याचे विधान नाही.

**यस्यात्मबुद्धिः कुणपे त्रिधातुके स्वधीः कलत्रादिषु भौम इज्यधीः।**
**यत्तीर्थबुद्धिः सलिले न कर्हिचिज्जनेष्वभिज्ञेषु स एव गोखरः॥**[१]

(श्रीमद्भा. १०.८४.१३)

(१) जो मनुष्य वात, पित्त आणि कफ–या तीन धातूंनी बनलेल्या शवतुल्य शरीरासच आत्मा–'मी', स्त्री-पुत्र आदींसच 'माझे' आणि माती, दगड, काष्ठ आदी पार्थिव विकारांसच इष्टदेव मानतो तथा जो केवळ पाण्यालाच तीर्थ समजतो–भगवद्भक्तांना नाही, तो मनुष्य असूनही पशूंमध्ये नीच गाढवच आहे.

**भूतानि यान्ति भूतेज्या।**[२]

(गीता ९/२५)

इत्यादी सिद्धांत वाणींच्या योगे भूत-पूजेची अप्रतिष्ठाच सूचित होते. परंतु यात एक विशेष गोष्ट आहे. मनुष्यास ज्ञान आणि संस्कार यांच्या तारतम्याने अधिकारभेद प्राप्त होतो. ज्यांना शुद्ध चिन्मय भाव उमगला आहे, केवळ तेच चिन्मय-विग्रहाची उपासना करण्यास समर्थ होऊ शकतात. त्या विषयी जो जितका नीच आहे, तो तितकेच कमी समजू शकतो. अत्यंत निम्नाधिकारी व्यक्तीस चिन्मय भावाची उपलब्धी होत नाही. म्हणून हे लोक मनानेही ईश्वराचे ध्यान करतांना जडीय-मूर्तीचीच कल्पना करतात. मृण्मयी-मूर्तीस ईश्वर-मूर्ती समजणे आणि मनाद्वारे जडमयी-मूर्तीचे ध्यान करणे एकच आहे. म्हणून त्या अधिकारी व्यक्तीसाठी प्रतिमा पूजन करणे कल्याणजनक आहे. वास्तविक प्रतिमापूजन न केल्याने साधारण जीवांचे अमंगल होते. साधारण जीव जेव्हा ईश्वराप्रती उन्मुख होतो, तेव्हा आपल्या समोर ईश्वराची प्रतिमा न पाहून तो हताश होऊन जातो.

ज्या धर्मांमध्ये प्रतिमा-पूजन नाही त्या धर्माचे निम्नाधिकारी नितांत विषयी आणि ईश्वर-विमुख असतात. म्हणून मूर्तिपूजा मानव-धर्माची आधार-शिला आहे. महाजनांनी विशुद्ध ज्ञान-योगाद्वारे परमेश्वराच्या ज्या मूर्तीचे दर्शन केले आहे, ते भक्तीद्वारे पवित्र झालेल्या आपल्या चित्तात त्याच शुद्ध चिन्मय मूर्तीची भावना करतात. भावना करता-करता जेव्हा भक्ताचे चित्त जगाप्रती प्रसारित होते, तेव्हा जडजगात त्या चित्स्वरूपाचे प्रतिफलन अंकित होते. भगवत् मूर्ती अशाप्रकारे महापुरुषा (महाजना) द्वारे प्रतिफलित होऊन प्रतिमा झाली आहे. तीच प्रतिमा उच्च अधिकाऱ्यांकरिता सर्वदा चिन्मय-विग्रह आहे, मध्यमाधिकाऱ्यांकरिता मनोमय विग्रह आहे; तथा निम्नाधिकाऱ्यांकरिता पहिल्यांदा जडमय विग्रह असूनही क्रमशः भावाद्वारे शोधित बुद्धीच्या पलीकडे जाऊन चिन्मय-विग्रहाच्या रूपात उदित होते. म्हणून समस्त अधिकाऱ्यांकरिता श्रीविग्रहाची प्रतिमा भजनीय आणि पूजनीय आहे. कल्पित मूर्तीची पूजा करण्याची आवश्यकता नाही, परंतु नित्य मूर्तीची प्रतिमा अतिशय मंगलमय असते. वैष्णव संप्रदायात अशा प्रकारे विभिन्न अधिकाऱ्यांकरिता

---

(२) भूत-पूजक भूत-लोकांमध्ये गमन करतात.

प्रतिमा-पूजेची व्यवस्था दिली आहे. यात थोडासुद्धा दोष नाही. कारण याच व्यवस्थेने जीवांचे उत्तरोत्तर कल्याण होते. श्रीमद्भागवतात (११/१४/२६) सांगितले आहे–

**यथा यथात्मा परिमृज्यतेऽसौ मत्पुण्यगाथाश्रवणाभिधानैः।**
**तथा तथा पश्यति वस्तू सूक्ष्मं चक्षुर्यथैवाञ्जनसम्प्रयुक्तम्॥**[३]

जीवात्मा या जगाच्या जडीय मनाद्वारे आवृत आहे. असा आत्मा स्वतःस जाणण्यास तथा परमात्म्याची सेवा करण्यास समर्थ नसतो. श्रवण आणि कीर्तनरूप भक्तीचे साधन करता-करता क्रमशः आत्म्याची शक्ती वाढते. शक्ती वृद्धिंगत झाल्यावर जडीय बंधन सैल होऊन जाते. जड बंधन जितके ढिले होत जाते, आत्म्याची आपली वृत्तीसुद्धा त्याच परिमाणात प्रबळ होत जाते आणि साक्षात दर्शन आणि साक्षात क्रियोन्नतीचा लाभ होतो. कुणी कुणी म्हणतात–"अतत्-वस्तूस दूर करून तत्-वस्तू लाभ (प्राप्त) करण्याचा प्रयत्न करा." यास शुष्क-ज्ञान म्हणता येऊ शकते. जीवांमध्ये अतत्-वस्तूंना परित्याग करण्याची शक्ती असते तरी कुठे? कारागृहात बंद कैदी आपल्या अपराधांची सजा भोगत आहे. निश्चित सजा भोगल्याशिवाय निर्धारित वेळेपूर्वीच तो कारागृहातून मुक्त होण्याची अभिलाषा करू लागला तर तो काय मुक्त होऊ शकतो? ज्या अपराधाकरिता त्यास बंदी बनविले आहे, त्या अपराधास क्षय करणेच तात्पर्य आहे. जीवात्मा भगवंताचा नित्यदास आहे. हे विसरणेच त्याचा मोठा अपराध आहे. या अपराधामुळेच तो मायेद्वारे बद्ध होऊन जातो. संसारात सुख-दुःखाचा आणि पुनःपुन्हा जन्ममरणाचा भोग करतो. मग संसार भोग करताकरता सर्वप्रथम कुठल्याही कारणास्तव का होईना, ईश्वराप्रती थोडीदेखील रुची उत्पन्न झाल्यावर श्रीमूर्तीचे दर्शन करता-करता आणि भगवंताच्या लीला कथा ऐकता-ऐकता त्याचा पूर्वस्वभाव (नित्य कृष्ण-दास्य) बलवान होतो. त्याचा हा स्वभाव जितका दृढ होतो, तो तितकाच चित्-साक्षात्कारायोग्य बनतो. श्रीमूर्तीची सेवा तथा त्या संबंधी श्रवण आणि कीर्तनच अती निम्नाधिकाऱ्याकरिता एकमात्र उपाय आहे. म्हणून महाजनांनी श्रीमूर्तिसेवेची व्यवस्था केलेली आहे.

---

(३) उद्धव! माझ्या परमपवित्र लीला-कथांच्या श्रवण-कीर्तनाने जसजसा हृदयाचा मळ धुतला जातो, तसतसे त्यास माझ्या जडातीत चिन्मय सूक्ष्म-स्वरूपाचे दर्शन होऊ लागते–जसे अंजनाद्वारे नेत्रांचा दोष दूर झाल्यावर त्यात सूक्ष्म वस्तूंना पाहण्याची शक्ती येऊ लागते.

मौलवी–जडवस्तूद्वारे एका मूर्तीची कल्पना करण्यापेक्षा मनोमन ध्यान करणे योग्य नाही काय?

गोराचाँद्–दोन्हीही एकसमान आहेत. मन जडानुगत असते. म्हणून ते जे काही चिंतन करते, जडवस्तूचेच चिंतन करते. जसे "ब्रह्म सर्वव्यापी आहे"– म्हटल्याने आपले मन ब्रह्माच्या सर्वव्यापित्वाचे चिंतन कसे करू शकते?

ते बिचारे तर त्याला आकाशाप्रमाणेच मानेल. त्यावरती ते जाऊ तरी कसे शकते? "ब्रह्माचे चिंतन करतो आहे"–असे म्हटल्याने कालगत ब्रह्माचा उदय अवश्य होतो. देश आणि काल जडीय वस्तू आहेत. जर मानस ध्यान देश आणि कालातीत झाले नाही, तर जडातीत वस्तू भेटावी तरी कशी? माती-पाणी आदींचा परित्याग करून दिक् आणि देशादीमध्ये ईश्वराची कल्पना केली गेली. ही सर्व भूत-पूजा आहे. जड पदार्थांमध्ये एकही असा पदार्थ नाही, ज्याचे अवलंबन करून चित्-वस्तू प्राप्त केली जाऊ शकते. तो पदार्थ आहे केवळमात्र–ईश्वराप्रती असणारा भाव, जो केवळ जीवात्म्यातच निहीत आहे. ईश्वराचे नामोच्चारण, लीला-गान आणि प्रतिमा (श्रीमूर्ती) यांत उद्दीपन प्राप्त झाल्यावरच हा भाव क्रमशः बलवान होऊन भक्ती बनतो. ईश्वराचे चिन्मय-स्वरूप केवळ भक्तीद्वारेच अनुभूत होते, ज्ञान आणि कर्माद्वारे नाही.

मौलवी–जडवस्तू ईश्वरापासून वेगळी आहे. असे म्हणतात, जीवांना जडामध्ये बांधण्याकरिता सैतानाने जडपूजेची व्यवस्था केली आहे. म्हणून माझ्यामते जड-पूजा न करणेच योग्य आहे.

गोराचाँद्–ईश्वर अद्वितीय आहे. त्यांच्यासमान कुणीच नाही. जगतामध्ये जे काही आहे, ते सर्व त्यांच्याद्वारे निर्मित आहे तथा त्यांच्या अधीन आहे. म्हणूनच कुठल्याही वस्तूचे अवलंबन करून त्यांची उपासना जरी केली तरी त्यांची परितुष्टी होऊ शकते. अशी कुठलीच वस्तू नाही, ज्याची उपासना केल्याने त्यांची हिंसा होते. ते परममंगलमय आहेत. म्हणूनच जर सैतान नावाचे कुणी असले, तरीही ईश्वराच्या इच्छेविरुद्ध काहीही करण्याची शक्ती त्यात असू शकत नाही. जर सैतान असला तरीही तो ईश्वराअधीनच जीव असेल. परंतु आमच्या मते असा प्रकांड जीव संभव नाही. कारण ईश्वराच्या इच्छेविरुद्ध या जगात कोणतेच कार्य होऊ शकत नाही, तथा ईश्वरापासून स्वतन्त्र अशी कुठलीच व्यक्ती नाही. "पाप कुठून उत्पन्न झाले?"–आपण असे विचारू शकता. आम्ही उत्तर देऊ–जीवमात्र भगवंताचा दास आहे. या ज्ञानास

विद्या म्हटले जाऊ शकते आणि या ज्ञानास विसरणे म्हणजेच अविद्या होय. कुठल्याशा कारणाने सर्व जीवांनी ज्या अविद्येचा आश्रय घेतला आहे, त्या सर्वांनी आपल्या हृदयात पापाचे बीज पेरले आहे. जो नित्यपार्षद जीव आहे, त्याच्या हृदयात ते पापबीज नसते. सैतान नामक एका विचित्र व्यवहाराची कल्पना न करून उपरोक्त अविद्या तत्त्वास समजणे आवश्यक आहे. म्हणूनच भौतिक विषयांत ईश्वराची उपासना केल्याने अपराध होत नाही. निम्न अधिकाऱ्यास हे नितांत आवश्यक आहे तथा उच्चाधिकाऱ्याचेही याने विशेष कल्याणच होते. आमच्या मते "श्रीमूर्तीची पूजा करणे अनुचित आहे"–हे कथन एक मतवाद मात्र आहे. या कथनाच्या पुष्टीची काही युक्तीही नाही आणि त्यामागे कुठले शास्त्रीय प्रमाणही नाही.

मौलवी–श्रीमूर्तीची पूजा केल्याने ईश्वरी भाव प्रशस्त होत नाही. उपासकाच्या मनात सर्वदा भौतिक भावनाच प्रबल राहतात.

गोराचाँद–प्राचीन इतिहासांच्या अनुशीलनाने आपल्या सिद्धांतातील दोषांचे कारण समजून घेता येते. बऱ्याच व्यक्ती अती निम्न-अधिकाराने श्रीमूर्तीची पूजा आरंभ करतात आणि सत्संगाच्या प्रभावाने त्यांचे भाव जितके उच्च होत जातात, ते श्रीमूर्तीचे तितकेच चिन्मयत्व उपलब्धी करून प्रेम-सागरात निमग्न होतात. अटळ सिद्धांत हा आहे की–सत्संगच सगळ्याचे मूळ आहे. चिन्मय भगवद्भक्ताचा संग झाल्यावर चिन्मय भगवद्भाव उदित होतो आणि भौतिक भाव दूर होऊन जातो. क्रमशः उन्नत होणे सौभाग्याची गोष्ट आहे. दुसरीकडे आर्यधर्माव्यतिरिक्त समस्त धर्मांचे साधारण लोक श्रीमूर्तिपूजेचे विरोधी आहेत परंतु विचारपूर्वक पाहा, त्यापैकी किती लोकांनी चिन्मय भाव प्राप्त केला आहे? वितर्क आणि हिंसेतच दिवस व्यतीत करतात, भगवद्भक्तीचा त्यांनी कधी अनुभवसुद्धा केला आहे?

मौलवी–जर आंतरिक भावाने भगवद्भजन होते, तर मूर्तिपूजा स्वीकारण्यात काहीच दोष नाही. मी हे मानतो. परंतु कुत्रा, मांजर, साप, लंपट पुरुष आदींची पूजन केल्याने भगवद्भजन कसे काय होऊ शकते? पूज्यपाद पैगंबर साहेबांनी अशा भूत-पूजेचा (बुतपरस्त) विशेष तिरस्कार केला आहे.

गोराचाँद–प्रत्येक मनुष्य ईश्वराप्रती कृतज्ञ आहे. तो कितीही पाप का न करो, अधूनमधून ईश्वर एक परम वस्तू आहे–असा विश्वास धरून जगातल्या अद्भुत वस्तूंना नमस्कार करत असतो. सूर्य, नदी, पर्वत, मोठमोठे जीव-जंतू–या सर्वांस मूढ जीव

ईश्वराच्या कृतज्ञतेने उत्तेजित होऊन स्वभावतः नमस्कार करतो आणि त्यांच्या निकट आपल्या अंतस्थ गोष्टी व्यक्त करून आत्मनिवेदन करतो. चिन्मय भगवद्भक्ती आणि अशा प्रकारची भूत-पूजा यांत विशेष अंतर असले तरीही ईश्वराप्रती कृतज्ञता स्वीकार करून जडवस्तूंना नमस्कार करण्याचे फळ क्रमशः चांगलेच असते. म्हणूनच युक्तीपूर्वक विचार केल्याने त्यांना दोष दिला जाऊ शकत नाही. सर्वव्यापी निराकार ईश्वराचे ध्यान आणि त्यांच्याप्रती नमाज आदी देखील शुद्ध चिन्मय भावरहित आहे, जर असेच असले तर मांजर-पूजक आदींपासून त्यांचे वेगळेपण तरी काय काय राहिले? आमच्या मते कुठल्याही प्रकारे का असो, ईश्वराप्रती भावोदय आणि भावालोचना होणे नितांत आवश्यक आहे. जर त्या निम्नधिकाऱ्यांचा तिरस्कार केला गेला, अथवा त्यांची मस्करी केली गेली तर जिवांच्या क्रमोन्नतीचे द्वार एकदम बंदच करणे होईल! मतवादांच्या फंदात पडून जे लोक सांप्रदायिक होतात, त्यांच्यात उदारतेचा अभाव असतो. म्हणूनच ते आपल्यापेक्षा भिन्न उपासकांचा तिरस्कार करतात. त्यांचे असे करणे म्हणजे संपूर्णतः चूकीचे आहे.

मौलवी–मग काय असे म्हणावे की सगळ्या वस्तू ईश्वर आहेत आणि त्या सर्वांची पूजा ईश्वराची पूजा आहे? पाप-वस्तूंची पूजा करणे म्हणजेसुद्धा काय ईश्वरपूजा आहे. ईश्वर अशा प्रकारच्या पूजेने संतुष्ट होतो का?

गोराचाँद–आम्ही सर्वच वस्तूंना ईश्वर म्हणत नाही. या सर्व वस्तूंपेक्षा ईश्वर एक भिन्न वस्तू आहे. सगळ्या वस्तू ईश्वराद्वारे सृष्ट आणि त्याच्या अधीन आहेत. या सर्व वस्तूंशी ईश्वराचा संबंध आहे. या संबंधामुळेच साऱ्या वस्तुंमध्ये ईश्वरी-जिज्ञासा होऊ शकते. समस्त वस्तुंमध्ये ईश्वर जिज्ञासा होता-होता **'जिज्ञासा–आस्वादनावधि'**–या सूत्रानुसार चिन्मय-वस्तूचे आस्वादन होते. आपण परम पंडित आहात. थोड्या उदार दृष्टीकोनाने या विषयी विचार करावा. आम्ही अकिंचन वैष्णव आहोत. अधिक तर्क-वितर्कात प्रवेश करू इच्छित नाही. आज्ञा असेल तर आम्ही श्रीचैतन्यमंगल-गीत ऐकण्यास जाऊ इच्छितो.

मौलवी साहेबांनी हे ऐकून काय निश्चय केला, हे समजत नाही. काही वेळ मौन राहिल्यावर ते म्हणाले–आपल्या विचारांनी मी खूप खूश झालो. पुन्हा कधीतरी येऊन जिज्ञासा करीन. आज फार उशीर झाला आहे, तेव्हा जाऊ इच्छितो.

असे म्हणत मौलवी साहेब दला-बलासोबत घोड्यांवर स्वार होऊन 'सातसाईका' परगण्याकडे रवाना झाले. बाबाजी लोकांच्या दलानेही आनंदाने हरि-ध्वनी देत श्रीचैतन्यमंगल-गानात प्रवेश केला

**॥ अकरावा अध्याय समाप्त ॥**



# बारावा अध्याय (नित्यधर्म आणि साधन)

जगातल्या समस्त तीर्थस्थानांमध्ये श्रीनवद्वीपमंडल प्रधान तीर्थस्थान आहे. श्रीवृन्दावनाप्रमाणेच श्रीनवद्वीपाचाही परीघ १६ कोस आहे. १६ कोस नवद्वीप अष्टदल कमळ आहे. श्रीअन्तर्द्वीप या कमळाच्या कर्णिका (बीजकोश) स्वरूपात विराजमान आहे. याच अन्तर्द्वीपाच्या ठीक मधोमध श्रीमायापूर स्थित आहे. श्रीमायापूरच्या उत्तरेस श्रीसीमन्तद्वीप आहे. सीमन्तद्वीपात श्रीसीमन्तिनी देवीचे मंदिर आहे. मंदिराच्या उत्तरेकडे बिल्वपुष्करिणी आणि दक्षिणेस ब्राह्मणपुष्करिणी नामक दोन गावे आहेत. साधारणतः बिल्वपुष्करिणी आणि ब्राह्मणपुष्करिणीस मिळून सिमुलिया म्हणतात. म्हणून नवद्वीपाच्या उत्तरेस सिमुलिया ग्राम आहे. श्रीमन् महाप्रभूंच्या समयी येथे मोठ्या-मोठ्या पंडितांचा वास होता. श्रीशचीदेवींचे पिता श्रीनीलाम्बर चक्रवर्ती याच गावी निवास करीत होते. यांच्या घराजवळच ब्रजनाथ भट्टाचार्य नामक एक वैदिक ब्राह्मण राहत होते. लहानपणापासून ब्रजनाथची बुद्धी तीक्ष्ण आहे. काही दिवसांतच ते न्यायशास्त्राचे प्रकांड विद्वान झाले तथा बिल्वपुष्करिणी मायापूर, गोद्रुम, मध्यद्वीप, आम्रघट्ट, समुद्रगढ, कुलिया, पूर्वस्थली आदींचे मोठमोठे पंडित ब्रजनाथाच्या न्यायसंबंधी तर्क-वितर्कांचे पांडित्य मानत होते. जिथे कुठेही पंडितगण एकत्रित होत, ब्रजनाथ न्यायपंचानन आपल्या न्यायाच्या तीक्ष्ण तर्क-बाणांनी त्यांना विद्ध करून जर्जरित करून टाकीत असत. एकदा त्यापैकी एक नैयायिक पंडित त्यांच्या तीक्ष्ण तर्कांच्या आघाताने घायाळ होऊन मनोमन खूप दुःखी झाला आणि त्याने तन्त्र-शास्त्रोक्त 'मारणविद्येद्वारे' न्यायपंचाननास जीवे मारण्याचा संकल्प केला. तो रुद्रद्वीपाच्या स्मशानात दिवस-रात्र मारण मंत्राचा जप करू लागला.

अमावस्येची रात्र आहे. चोहीकडे मिट्ट काळोख आहे. अर्ध्या रात्री नैयायिक पंडित स्मशानाच्या मधोमध आसन लावून आपल्या इष्टदेवतेचे आवाहन करून म्हणू लागले–आई! कलियुगात केवळमात्र तूच उपास्य आहेस. ऐकले आहे, तू अत्यंत अल्प जपानेच संतुष्ट होऊन वर देतेस. करालवदनी ! तुझा दास खूप दुःखी होऊन अनेक दिवसांपासून तुझा मंत्र जप करीत आहे. तू एकदा दया कर. आई माझ्यात खूपसे दोष आहेत; तरीही तू माझी आई आहेस, माझे सारे दोष क्षमा करून आज दर्शन दे.

अशा प्रकारे आर्तनाद करीत-करीत नैयायिक पंडिताने ब्रजनाथ न्यायपंचाननाच्या नावाने मंत्रोच्चारण करीत अग्नीत आहुती प्रदान केली. आश्चर्य आहे मंत्राच्या शक्तीचे! आहुती दिली मात्र आणि आकाशात काळेकुट्ट ढग जमा झाले. जोरजोरात हवा वाहू लागली. राहून-राहून विजा चमकत होत्या. ढगांचा गडगडाट इतका जोराचा होता जणूकाही जवळच वज्रपात झाला आहे. त्यावेळी वीज चमकल्याने त्या प्रकाशात एकापेक्षा एक विकट आकाराची भूत-प्रेते दिसू लागली.

नैयायिक पंडित थोडे घाबरले अवश्य, पण तरीही आपल्या संपूर्ण स्नायवीय शक्तीचे संचालन करीत म्हणाले–माते! आता आणखी उशीर करू नकोस.

त्याचवेळी आकाशात दैववाणी झाली–चिंता करू नकोस. ब्रजनाथ न्यायपंचानन आता अधिक दिवसांपर्यंत तर्क-वितर्क करणार नाहीत. थोड्याच दिवसात ते तर्क-वितर्क सोडून शांत होऊन जातील. तू शांत होऊन घरी परत जा.

दैववाणी ऐकून नैयायिक पंडित खूप संतुष्ट झाले आणि तन्त्रकर्ता देवदेव महादेवांस वारंवार प्रणाम करीत आपल्या घरी परतले.

ब्रजनाथ न्यायपंचानन एकविसाव्या वर्षीच दिग्विजयी पंडित झाले. ते अहोरात्र ‘श्रीगंगेशोपाध्यायांच्या’ ग्रंथावलीचे अध्ययन करीत असत. काणभट्टद्वारे रचित ‘दीधिति’ नामक न्यायाच्या टिप्पणीग्रंथात अनेक दोष दाखवून ते स्वतन्त्रपणे एका टिप्पणी ग्रंथाची रचनादेखील करीत होते. विषयाचे जराही चिंतन नव्हते, तसेच ‘परमार्थ’ शब्दसुद्धा कधी त्यांच्या कानी पडला नव्हता. ‘घट-पट’ आणि ‘अवच्छेद’ व्यवच्छेद आदी घेऊन तर्क करणेच त्यांचे एकमात्र कार्य होते. चालता-फिरता, उठता-बसता, दिवस-रात्र पार्थिव-विशेष आणि द्रव्यकाल आदींच्या चिंतेने त्यांचे हृदय भरलेले असे.

एकदा संध्याकाळी ब्रजनाथ भागीरथीच्या तटी बसल्या-बसल्या गौतमाच्या सोळा पदार्थांचे चिंतन करीत होते. त्याचवेळी एका न्यायशास्त्राच्या विद्यार्थ्याने येऊन

त्यांस सांगितले–न्यायपंचानन महाशय! आपण निमाई पंडितांची 'परमाणू-खण्डन' संबंधी फक्किका [१] ऐकली आहे काय?

न्यायपंचाननाने सिंहाप्रमाणे गर्जत म्हटले–निमाई पंडित कोण? तू जगन्नाथ मिश्रच्या पुत्राविषयी बोलत आहेस का? त्यांच्या काही फक्किका सांगू शकतोस का?

विद्यार्थी–काही दिवसांपूर्वी याच नवद्वीपात निमाई पंडित नामक एक महापुरुष होऊन गेलेत. त्यांनी न्यायसंबंधी अनेक नवनवीन फक्किकांच्या रचना करून 'काणभट्ट शिरोमणी'स नाकी नऊ आणले होते. ते न्यायशास्त्राचे एक तत्कालीन विद्वान होते. परंतु न्यायशास्त्रात पारंगत होऊनही ते न्यायशास्त्रास अत्यंत तुच्छ मानत असत. केवळ न्यायासच नाही, तर समस्त संसारास अत्यंत तुच्छ मानून त्यांनी परिव्राजकाचे (संन्यास) पद ग्रहण केले होते. आजकालचे वैष्णवजन त्यांना पूर्णब्रह्म मानतात, तथा 'श्रीगौरहरी मंत्राद्वारे' त्यांची पूजा करतात. न्यायपंचानन महाशय! आपण एकदा तरी त्यांचा युक्तिवाद अवश्य पाहा."

निमाई पंडितांची न्यायसंबंधी फक्किकांची प्रशंसा ऐकून ब्रजनाथ न्यायपंचाननास त्या फक्किकांना जाणण्याचे कुतूहल जागृत झाले. त्यांनी महत्प्रयासाने कुठून-कुठून त्यांच्या काही फक्किकांचा संग्रह केला. मनुष्याचा स्वभावच असा असतो की ज्या विषयाप्रती त्याची श्रद्धा असते त्या विषयाच्या अध्यापकांवर तो स्वाभाविकपणे श्रद्धा करतो. खास करून जीवित महापुरुषांच्या प्रती नाना कारणांनी साधारण लोकांची श्रद्धा सहजच होत नाही. परलोक-प्राप्त महाजनांप्रती लोकांची अधिक श्रद्धा असते. म्हणून निमाई पंडितांच्या फक्किकांचे अनुशीलन करून ब्रजनाथच्या हृदयात निमाई पंडितांप्रती दृढ-श्रद्धा उत्पन्न झाली.

ते म्हणाले–हा निमाई पंडित! जर मी त्या काळी जन्मलो असतो, तर तुमच्याकडून न जाणो कितीतरी ज्ञानार्जन केले असते. निमाई पंडित! तुम्ही एकदा तरी माझ्या हृदयात प्रवेश करा. तुम्ही खरोखरीच पूर्ण ब्रह्म आहात. जर असे नसते, तर न्यायाच्या अशा सुंदर फक्किका तुमच्या मेंदूतून निघाल्या असत्या का? तुम्ही खरोखरीच गौरहरी आहात, कारण तुम्ही या विचित्र फक्किकांची रचना करून

---

(१) फक्किका–कूट प्रश्न, न्यायशास्त्रात प्रचलित अतिसूक्ष्म, पूर्व-पक्ष. बंगाली भाषेत यास 'फाँकी' म्हणतात.

अज्ञानरूप अंधाराचा विनाश केला आहे. अज्ञान=अंधार अर्थात काळाकुट्ट आहे. तुम्ही 'गौर' होऊन या काळिमेला दूर केले आहे. तुम्ही 'हरी' आहात, कारण जगाचे चित्त हरण करू शकता. तुमच्या न्यायाच्या युक्त्यांनी (फाँकींनी) माझ्या चित्ताचे हरण केले आहे.

असे म्हणत-म्हणत ब्रजनाथ उन्मत्त होत "हे निमाई पंडित! हे गौरहरी! दया करा!" म्हणत जोरजोरात आरोळी ठोकू लागले. "मी तुमच्या समान फक्किकांची सृष्टी कधी करू शकेन? तुमची दया झाल्यावर न जाणो न्याय-शास्त्राचा किती मोठा विद्वान होईन?"

ब्रजनाथाने मनोमन विचार केला–जे लोक गौरहरीची पूजा करतात, असे वाटते की ते माझ्याप्रमाणेच निमाई पंडितांप्रती न्याय-पांडित्यामुळेच आकृष्ट झाले असतील. जाऊन पाहायला हवे की, श्रीगौरहरींचे कोणकोणते न्याय-ग्रंथ त्यांच्यापाशी आहेत? असा विचार करून त्याची विचारणा करण्याकरिता त्यांनी गौर-भक्तांसोबत सत्संग करणे आरंभ केले. 'निमाई पंडित', 'गौरहरी' आदी शुद्ध भगवन्नामांचे वारंवार उच्चारण केल्याने तथा गौरभक्तांच्या संगाची इच्छा झाल्याने ब्रजनाथाकडून एक मोठी सुकृती झाली.

ब्रजनाथ एकदा भोजन करीत होते. त्यांची आजी (वडिलांची आई) जवळच बसून त्यांना भरवत होती. त्यांनी आजीस विचारले–आजी! तू गौरहरींना पाहिले आहेस का?

श्रीगौरांगांचे नाव ऐकताच ब्रजनाथाच्या आजीस आपल्या बाल्य-जीवनातल्या सगळ्या गोष्टी आठवू लागल्या. त्या म्हणाल्या–अहा! किती मनोहर रूप होते त्यांचे! त्या मधुर मूर्तीस पुन्हा पाहू शकेन का? त्या भुवनमोहन रूपास पाहून कुणी संसारी राहू शकते काय? जेव्हा ते भावावेशात हरिसंकीर्तन करीत, नवद्वीपाचे पशु-पक्षी, वृक्ष, लता आदी सर्व प्रेममत्त होऊन तनमनाची शुद्ध हरपून बसत असत. आजही जेव्हा ते भाव आमच्या स्मरण पथावर उदित होतात, तेव्हा डोळे आपोआप बरसू लागतात.

ब्रजनाथाने पुन्हा विचारले–आजी! त्यांच्या जीवनातली कुठली घटना तुला ठाऊक आहे का ग?

आजी उत्तरली–का नाही ठाऊक, बेटा! जेव्हा ते शचीमातेबरोबर आपल्या मामाच्या घरी येत, तेव्हा आमच्या घरातल्या वृद्ध स्त्रिया त्यांना पालकाची भाजी आणि भात भरवीत असत. ते पालकाच्या भाजीची खूप प्रशंसा करीत-करीत मोठ्या प्रेमाने भोजन करीत असत. त्याचवेळी ब्रजनाथच्या आईने त्यांच्या ताटात पालकाची भाजी वाढली. पालकाची भाजी पाहून त्यांस फार आनंद झाला, ते नैयायिक निमाई पंडिताची अत्यंत प्रिय पालकाची भाजी समजून मोठ्या प्रेमाने भोजन करू लागले. परमार्थ-ज्ञानरहित ब्रजनाथ निमाई पंडितांच्या पांडित्य-प्रतिभेप्रती खूपच आकृष्ट झाले. निमाई पंडित त्यांना फारच आवडत. निमाई पंडितांचे नावही त्यांच्या कानांना खूपच मधुर वाटत असे, प्रिय वाटत असे. "जय शचीनन्दन" असा जयघोष करीत भिक्षा मागणाऱ्यांना मोठ्या आदराने भिक्षा देत. कधी-कधी मायापुरी निघून जात, तेथे बाबाजी लोकांच्या निकट गौरांग नाम श्रवण करीत तथा त्यांच्या विद्याध्ययनासंबंधी अनेक प्रश्न विचारीत. अशा प्रकारे दोन चार महिने लोटले. ब्रजनाथ, पहिल्यासारखे ब्रजनाथ राहिले नाहीत. सगळ्या बाबतीत त्यांना आता निमाईच आवडत असत. न्यायाचे अध्ययन आणि अध्यापन तथा शुष्क तर्क-वितर्कांमध्ये आता त्यांची थोडीदेखील रुची राहिली नाही. हळूहळू नैयायिक निमाईऐवजी भक्त निमाईने त्यांच्या हृदय-राज्यावर स्वामित्व मिळविले. मृदंग आणि करतालांचा ध्वनी ऐकताच त्यांचे हृदय नाचू लागते. शुद्ध भक्तांना पाहून मनोमन प्रणाम करतात. श्रीनवद्वीप भूमीला श्रीगौरांगदेवांची आविर्भाव भूमी मानून भक्ती करतात. त्यांचे प्रतिस्पर्धी पंडित त्यांची अशी दशा पाहून फार प्रसन्न झाले. आता ते निडर होऊन घराबाहेर पडत असत. नैयायिक पंडितांनी विचार केला–त्यांच्या इष्टदेवानेच ब्रजनाथला निरुद्योगी (सुस्त, आळशी) बनवले. आता घाबरण्याचे काही कारण नाही.

एकदा ब्रजनाथ भागीरथी तिरी एका निर्जन-स्थानी बसल्या बसल्या विचार करीत आहेत–जर निमाईसारखे न्यायशास्त्राचे प्रकांड विद्वान न्यायाचा परित्याग करून भक्तिमार्गाचा अवलंब करू शकतात, तर आपणही तसे करण्यात काय दोष आहे? जोपर्यंत मी न्यायाच्या वलयात बंदिस्त होतो, तो पर्यंत माझा भक्तीशी काही संबंध नव्हता आणि मी निमाईचे नावही जाणत नव्हतो. त्यावेळी मला खाण्यापिण्यास आणि झोपण्यासही वेळ मिळत नसे. परंतु आता तर संपूर्ण विपरीत होताना पाहतो आहे. आता न्यायशास्त्राचे विषयही स्मरणात राहात नाहीत, उलट सर्वदा 'गौरांग' नामच स्मरणी राहते. वैष्णवांचे भावपूर्ण नृत्य अत्यंत मनोहर वाटते.

सर्व काही ठीक आहे, परंतु मी एका वैदिक ब्राह्मणाचा पुत्र आहे; कुलीन आहे आणि समाजात सन्मानित व्यक्ती आहे. मानतो की–वैष्णवांचे समस्त व्यवहार चांगले आहेत; परंतु मला त्यात प्रवेश करणे योग्य वाटत नाही. श्रीमायापुरच्या खोल-भांगा-डांगा तथा वैरागी-डांगाच्या वैष्णवांचे दर्शन करून हृदय पवित्र होऊन जाते. विशेष करून श्रीरघुनाथदास बाबाजींस पाहिल्याने हृदय श्रद्धेने परिपूर्ण होते. सर्वदा त्यांच्या निकट बसून भक्तिशास्त्राचे अनुशीलन करण्याकरता मन ओढावते. वेदही परमार्थ-तत्त्वाचे दर्शन, श्रवण, मनन आणि अनवरत (अविश्रांत) चिंतन करण्याकरिता उपदेश करतात–

**आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो, मन्तव्यो निदिध्यासितव्यः।**

(बृ. उ. ४/५/६)

या मंत्रातील 'मन्तव्यः' शब्दात न्यायशास्त्राच्या अनुशीलनाद्वारे ज्ञान प्राप्त करण्याकरिता उपदेश असूनही 'श्रोतव्य' शब्दाने काही आणखी विषयांचीही आवश्यकता प्रतीत होते. मी माझा बराचसा वेळ तर्क-वितर्कांमध्ये व्यर्थच वाया घालवला आहे. आता आणखी अधिक वेळ वाया न घालविता श्रीगौरहरींचे भजन करणेच उत्तम आहे. आज संध्याकाळनंतर श्रीरघुनाथदास बाबाजींचे दर्शन करणे श्रेयस्कर आहे.

भगवान अंशुमाली (सूर्यदेव) मोठ्या तीव्र गतीने पश्चिम क्षितिजाकडे सरकत आहेत. त्यांची लाल-लाल किरणे पृथ्वीतल सोडून वृक्षांच्या शिखरांत खेळत आहेत. पक्षीगण भिन्न-भिन्न दिशांतून उडत येऊन आपापल्या घरट्यांत प्रवेश करत आहेत. शीतल-मंद वारा प्रवाहित होत आहे. हळूहळू एकदोन तारेही आकाशात दिसू लागलेत. त्याचवेळी मायापूर श्रीवास-अंगणात भगवंताची संध्या-आरती सुरू झाली. वैष्णवगण मधुर स्वरात आरती-कीर्तन करू लागले. त्याच वेळी ब्रजनाथ हळूहळू श्रीवास-अंगणात पोहोचले आणि बकूळ वृक्षाखाली चबुतऱ्यावर बसले. गौरहरीचे आरती-कीर्तन ऐकून त्यांचे चित्त अतिशय आर्द्र झाले. आरती-कीर्तन समाप्त झाल्यावर वैष्णवगण त्याच चबुतऱ्यावर येऊन क्रमशः बसू लागले. वृद्ध रघुनाथदास बाबाजी ही "जय शचीनन्दन", "जय नित्यानन्द", "जय रूप-सनातन", "जय दासगोस्वामी", उच्चारित त्याच चबुतऱ्यावर येऊन बसले. सगळ्यांनी उठून त्यांना दंडवत प्रणाम केला. ब्रजनाथही त्यांना प्रणाम केल्याशिवाय राहू शकले नाहीत.

ब्रजनाथच्या मुखमंडळाचे अपूर्व सौंदर्य पाहून बाबाजींनी त्यांना मिठी मारून आपल्या जवळ बसविले आणि विचारले–बेटा! तू कोण आहेस?

ब्रजनाथने उत्तर दिले–मी एक तत्त्व-पिपासू आहे. आपल्याकडून काही शिकवण ग्रहण करू इच्छितो.

जवळच बसलेले एक वैष्णव ब्रजनाथांचा परिचय जाणत होते. त्यांनी सांगितले–यांचे नाव ब्रजनाथ न्यायपंचानन आहे. समस्त नवद्वीपात यांच्या समान न्यायाचे विद्वान आणखी दुसरे नाहीत. आजकाल यांची शचीनन्दनाप्रती काहीशी श्रद्धा झाली आहे.

ब्रजनाथच्या विद्वत्तेविषयी ऐकून बाबाजी मोठ्या विनम्रतेने म्हणाले–बाबा! तू तर मोठा विद्वान आहेस. आम्ही तर मूर्ख आणि अकिंचन आहोत. तू आमच्या शचीनन्दनाच्या धामाचा रहिवासी आहेस. आम्ही तुझ्या कृपेचे पात्र आहोत. तेव्हा आम्ही तुला काय शिकवणार, तूच आपल्या गौरांगांच्या पवित्र कथा ऐकवून आमच्या दग्ध प्राणांना शीतल कर.

अशा प्रकारे बाबाजी महाराज आणि ब्रजनाथांत गोष्टी होऊ लागल्या. बाकीचे वैष्णवजन तिथून उठून आपापल्या सेवा कार्यांस निघून गेले. आता केवळ दोघेच जण त्या जागी राहिले.

ब्रजनाथ म्हणाले–बाबाजी महाराज! आम्ही ब्राह्मण कुलोत्पन्न आहोत, त्यातूनही विद्येचा मोठा अहंकार आहे. उच्च जाती आणि विद्येच्या अहंकाराने मत्त होऊन पृथ्वीस गोष्पद तुल्य (गाईच्या खूरासमान) लेखतो. साधुसंतांचा सन्मान कसा करायचा हे जाणत नाही. सांगता येत नाही, की कुठल्या सौभाग्याच्या फळाने आपल्या चरित्र आणि आचरणाप्रती माझ्यात काही श्रद्धा निर्माण झाली आहे. मी आपल्याला एक-दोन प्रश्न विचारू इच्छितो; कृपा करून त्यांची उत्तरे प्रदान करा. मी निष्कपट होऊन आपल्याकडे आलो आहे. आपण मला सर्वप्रथम जीवांचे साध्य आणि साधन यांचा उपदेश करावा. न्यायशास्त्राचे अध्ययन करून मी हे निश्चित केले आहे की जीव ईश्वरापासून नित्य भिन्न आहे, आणि ईश्वराची कृपा ही जिवांच्या मुक्तीचे कारण आहे. ज्या उपासनेचे अवलंबन केल्याने ईश्वराची कृपा प्राप्त होते, त्यास साधन म्हणतात. साधनेद्वारे ज्या फळाची प्राप्ती होते, त्यास साध्य म्हणतात. मी

न्यायशास्त्राकडे अनेकदा जिज्ञासा केली आहे की साध्य आणि साधन काय आहे? परंतु न्यायशास्त्र या विषयी बिलकुल मौन राहते—काहीच उत्तर देत नाही. आपण साध्य-साधनासंबंधी आपला सिद्धांत सांगण्याची कृपा करावी.

श्रीरघुनाथदास बाबाजी श्रीरघुनाथदास गोस्वामींचे शिष्य आहेत; तथा एक प्रकांड विद्वान तसेच अनुभवी संत आहेत. अनेक दिवसापर्यंत राधाकुण्डात राहिले आहेत. तेथे राहताना रोज तृतीय प्रहरी दास गोस्वामींजवळ श्रीचैतन्यदेवांच्या लीला कथा श्रवण करीत असत. श्रीरघुनाथदास बाबाजी आणि कृष्णदास कविराज गोस्वामींमध्ये परस्पर तत्त्वाविषयी चर्चा चालत असे. कुठल्याही प्रकारचा संदेह असला, की ते दासगोस्वामींनिकट जिज्ञासा करून आपला संदेह दूर करीत असत. यावेळी श्रीगौरमंडळात श्रीरघुनाथदास बाबाजीच प्रधान विद्वान बाबाजी आहेत. श्रीगोद्रुमच्या प्रेमदास परमहंस बाबाजींसोबत यांच्या मोठ्या प्रेमाने हरिचर्चा होत असत.

ब्रजनाथांचा प्रश्न ऐकून रघुनाथ बाबाजी खूप आनंदित होऊन म्हणाले—अहो न्याय पंचानन! न्यायशास्त्र वाचून ज्यास साध्य-साधनासंबंधी जिज्ञासा उत्पन्न होते, ते जगात धन्य आहेत. कारण न्यायशास्त्राचा प्रधान उद्देशच आहे—न्याय विषयांचा संग्रह करणे. जे न्यायशास्त्राचा अभ्यास करून केवळ शुष्क तर्क करणेच शिकले आहेत, त्यांचा न्याय-पाठ व्यर्थ आहे. त्यांचे परिश्रम वाया गेले. त्यांचे जीवन व्यर्थ आहे.

साधन केल्यावर ज्या तत्त्वाची प्राप्ती होते त्यास 'साध्य' म्हणतात. त्या साध्यास प्राप्त करण्याकरिता ज्या उपायांचा अवलंब केला जातो, त्यास साधन म्हणतात. मायेत फसलेले जीव आपापल्या प्रवृत्ती आणि आपापल्या अधिकारांनुसार साध्य विषयास वेगवेगळ्या रूपात पाहतात—वास्तविक समस्त जीवांचे साध्य-तत्त्व एकच आहे.

प्रवृत्ती आणि अधिकारानुसार साध्य वस्तू तीन प्रकारच्या आहेत—भुक्ती, मुक्ती आणि भक्ती. जे लोक सांसारिक कर्मात फसलेले आहेत आणि सांसारिक कामनांतच व्यस्त आहेत; ते भुक्तीसच आपले साध्य मानतात. शास्त्र कामधेनू आहेत. जो मनुष्य ज्या वस्तूस मिळवण्याची कामना करतो, तो शास्त्रांद्वारे तेच प्राप्त करतो. कर्मकांडीय शास्त्रांमध्ये कर्माधिकारी व्यक्तींकरिता भुक्तीस अर्थात सांसारिक सुख-

भोगासच साध्य म्हटले गेले आहे. प्रापंचिक जगात जितक्या प्रकारच्या भावी सुखांची कामना करता येते, ते सर्व कर्मकांडीय शास्त्रांमध्ये निर्दिष्ट आहे. या संसारात जीव प्रापंचिक शरीर धारण करून इंद्रिय सुखांचाच विशेष आदर करतात. जड-जगत प्राकृत इंद्रियांचे सुख भोगण्याकरताच बनविलेले आहे. जन्मापासून मृत्यूपर्यंत इंद्रियांद्वारे विषय सुखांचा भोग करण्याचे नावच 'ऐहिक सुख' आहे. मृत्यूनंतरच्या अवस्थेत इंद्रिय सुखाच्या भोगास 'आमुत्रिक सुख' म्हणतात. आमुत्रिक सुखे अनेक प्रकारची असतात. स्वर्ग आणि इंद्रलोकामध्ये अप्सरांचे नृत्य दर्शन, अमृत भोजन, नंदन-काननात सुंदर सुंदर पुष्पांचा सुगंध घेणे, इंद्रपुरी आणि नंदन-काननाची शोभा पाहणे, गंधर्वांचे गायन ऐकणे आणि विद्याधारींसोबत संगम–यांस स्वर्गीय सुख म्हणतात. अशा प्रकारे मह आणि जन लोकांमध्येसुद्धा काही अल्प प्रमाणात सुख आहे. तप लोक आणि ब्रह्मलोकात किंचित प्रमाणात इंद्रिय सुखांचे वर्णन केले गेले आहे. भूलोकी (पृथ्वीवर) इंद्रिय सुख अत्यंत स्थूल असते. वरच्या लोकांमध्ये इंद्रिय आणि त्यांचे विषयसमूह क्रमशः सूक्ष्म होत जातात. या सर्व लोकांमध्ये आढळणारी सर्व सुखेच इंद्रिय सुखे आहेत. तेथे चित् सुख नाही. उलट चिदाभास अर्थात लिंगशरीराद्वारे (सूक्ष्मशरीराद्वारे) भोगली जाणारी सुखेच या लोकांमध्ये विद्यमान असतात. या सर्व सुखांच्या भोगांचे नावच भुक्ती आहे. कर्मचक्रात फसलेले जीवसमूह भुक्ती प्राप्त करण्याच्या आशेने उपायस्वरूप ज्या कर्मांचा आश्रय करतात, त्यासच ते साधन म्हणतात. **'स्वर्गकामोऽश्वमेधं यजेत'** [२] (यजु. २/५/५) 'अग्निष्टोम', 'विश्वदेव-बली', 'इष्टापूर्त्त', 'दर्श-पौर्णमासी' आदी अनेक प्रकारची भुक्तीची साधने शास्त्रांत निरुपित आहेत. भोग प्रवृत्तीच्या पुरुषांकरिता भुक्तीच साध्य वस्तू आहे.

काही लोक संसारात नाना प्रकारच्या दुःख-क्लेशांना कंटाळून प्रापंचिक सुखांना (चौदा लोकांमध्ये प्राप्त होणाऱ्या ऐंद्रिक सुखांना) तुच्छ समजून कर्मचक्रातून बाहेर पडण्याची कामना करतात. त्यांच्या मते मुक्तीच एकमात्र साध्य-वस्तू आहे. ते लोक भुक्तीस बंधन समजतात. त्यांचे म्हणणे आहे–ज्या लोकांची भोगप्रवृत्ती दूर झालेली नाही, ते लोक कर्मकांडाचा आश्रय घेवोत, अर्थात कर्ममार्गास आपले साधन मानोत, भुक्तिरूप साध्य प्राप्त करण्याचा प्रयत्न करोत आणि प्राप्तही करोत, परंतु

---

(२) स्वर्गाची अभिलाषा करणारे अश्वमेध यज्ञ करतील.

**"क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति"** [३] (गीता ९/२१)–या श्लोकात हे निश्चितपणे जाणले जाऊ शकते की भुक्ती कदापि नित्य नसते अर्थात अनित्य असते. अनित्य अथवा क्षयिष्णू वस्तू-प्रापंचिक असते–आध्यात्मिक नाही; नित्य-वस्तूच्या प्राप्तीकरिताच साधन करणे कर्तव्य आहे. मुक्ती नित्य असते. म्हणूनच जिवांकरिता तेच साध्य आहे. त्यास वैराग्यादी साधन-चतुःष्टयांनी प्राप्त केले जाऊ शकते. म्हणून साधन-चतुःष्टयच यथार्थ साधन आहे. ज्ञानकांडीय शास्त्रांमध्ये साध्य-साधनाचा असाच विचार पहावयास मिळतो.

शास्त्र–कामधेनू आहे. जीव जेव्हा जसा अधिकार प्राप्त करतो, शास्त्र त्या जिवाकरिता त्याच्या अधिकाराच्या उपयोगी तशीच व्यवस्था देतात. जर मुक्ती झाली तरीही जिवाची सत्ता विद्यमान राहते, तर अशा अवस्थेत मुक्तीच चरम साध्य नाही. म्हणूनच ते निर्वाणापर्यंतच मुक्तीची सीमा ठेवतात. वास्तविक जीव नित्य आहे, म्हणूनच जीवांसंबंधी तसे निर्वाण संपूर्ण असंभव आहे. **"नित्यो-नित्यानां चेतनश्चेतनानाम्"** [४] (श्वे. उ. ६/१३) आदी वेदमंत्रांद्वारे जिवांची नित्यता स्वीकृत आहे. नित्य-वस्तूची निर्वाण-गती असंभव आहे. मुक्त झाल्यावरही जिवांची सत्ता अवश्य विद्यमान आहे. जे लोक असा विश्वास करतात ते भुक्ती आणि मुक्तीस चरम साध्य मानत नाहीत. मुक्ती आणि भुक्ती या दोन्ही अवांतर साध्य वस्तू आहेत. समस्त कार्यांमध्येच साध्य आणि साधन आहेत. ज्या कार्यास उद्देश्य बनविले जाते, त्यास साध्य म्हणतात आणि ज्या कार्याद्वारे साध्य साधित होते, त्यास साधन म्हणतात. विचारपूर्वक पाहिल्यावर साध्य आणि साधन जिवांकरिता एक श्रृंखलामय तत्त्व आहे. आता जे साध्य आहे, आधी तेच पुढच्या साध्याकरिता साधन असते. अशा प्रकारे साध्य-साधनरूप श्रृंखलेचे अवलंबन करून या श्रृंखलेच्या शेवटच्या टोकावर जे साध्य प्राप्त होते, तेच अंतिम आणि सर्वश्रेष्ठ साध्य आहे. ते पुनः साधन नसते. कारण त्यापुढे आणि कुठलेही साध्य तत्त्व नाही. म्हणूनच भक्तीच परम साध्य आहे. कारण भक्तीच जिवांचा नित्य-सिद्ध भाव आहे.

---

(३) पुण्य क्षय झाल्यावर पुनः मर्त्य लोकात प्रवेश करावा लागतो.

(४) ते समस्त नित्य वस्तुंमध्ये परम नित्य आहेत अर्थात सर्वश्रेष्ठ नित्य वस्तू आणि समस्त चेतन वस्तुंमध्ये ते चैतन्यदाता मूळ चेतन आहेत.

मानवी जीवनाचे प्रत्येक कार्य साध्य-साधनरूप श्रृंखलेची एक कडी आहे. अशा अनेक कड्या जोडून क्रमशः कर्म विभागाचे निर्माण करतात. मग त्यापुढे बऱ्याच कड्या जोडून ज्ञानरूप विभागाची निर्मिती करतात. कर्मविभागाचे अंतिम उद्देश्य–भुक्ती आहे.

ज्ञान विभागाचे अंतिम लक्ष्य–मुक्ती आहे आणि भक्तिविभागाचे चरम उद्देश–प्रेमाभक्ती आहे. जिवांच्या सिद्ध सत्तेचे विवेचन केल्यावर असा दृढ निश्चय होतो की भक्तीच साधन आहे तथा भक्तीच साध्य आहे. कर्म आणि ज्ञान अंतिम साध्य आणि साधन नाही आहे. उलट मध्यवर्ती साध्य-साधन आहे.

ब्रजनाथ–**'केन कं पश्येत'** [५] (बृ. उ. ४/५/१५ आणि २/४/२४) इत्यादी श्रुती मंत्रांनी तथा **'अहं ब्रह्मास्मि'** [६] (बृ. उ. १/४/१०), **'प्रज्ञानं ब्रह्म'** [७] (ऐत. उ. १/५/३) ; **'तत्वमसि श्वेतकेतो'** [८] (छा. उ. ६/८/७)–आदी महावाक्यांच्याद्वारे भक्तीची श्रेष्ठता आणि चरम साध्यता प्रमाणित होत नाही. म्हणूनच मुक्तीस चरमसाध्य मानण्यात दोष तरी काय आहे?

बाबाजी–मी आधीच म्हणालो की प्रवृत्तीनुसार साध्ये अनेक प्रकारची असतात. जोपर्यंत भुक्तीची (भोगाची) कामना वर्तमान असते, तोपर्यंत मुक्ती नामक कुठलेच तत्त्व स्वीकृत होत नाही. त्याच्या अधिकाऱ्यांकरिता–**"अक्षय्यं ह वै चातुर्मास्ययाजिनः"** [९] (आपस्तम्ब श्रौतसूत्र २/१/१) इत्यादी अनेक वाक्ये लिहिली गेली आहेत. तेव्हा मग 'मुक्ती' वाईट गोष्ट आहे काय? कर्मीगण भुक्ती अर्थात इंद्रिय सुखाची अपेक्षा करतात–मुक्तीचे अनुसंधान करीत नाहीत. मग काय याचा अर्थ असा

---

(५) कुणी कशा प्रकारे कोणास पहावे?

(६) मी ब्रह्म आहे. (बृहदारण्यकोपनिषद् १/४/१०)

(७) प्रज्ञान ब्रह्म आहे. (ऐतरेयोपनिषद् २/४)

(८) तू देखील तेच आहेस. (छान्दोग्योपनिषद् ६/२५/३)

(९) चार्तुमास्य व्रताचे अनुष्ठान करणारा अक्षय स्वर्ग लाभ करतो.

होतो की वेदादी शास्त्रांमध्ये 'मुक्तीचा' उल्लेखच नाही. कतिपय कर्मी ऋषींचे कथन आहे–समर्थ व्यक्तींकरिता कर्म करणेच कर्तव्य आहे, वैराग्य तर दुर्बल व्यक्तींकरिता आहे. या सर्व व्यवस्था निम्नाधिकाऱ्यांकरिता त्यांच्या आपापल्या अधिकारांप्रती निष्ठा उत्पन्न करविण्याकरिता दिलेल्या आहेत. अधिकारातून च्युत झाल्यावर जीवांचे कल्याण होत नाही. आपापल्या वर्तमान अधिकारांत पूर्ण निष्ठा ठेवीत कर्तव्य पालन केल्याने पुढील उन्नत अधिकारांमध्ये सहजच प्रवेश होतो. म्हणून वेदांमध्ये अशा प्रकारची निष्ठा उत्पन्न करविणाऱ्या व्यवस्थांची निंदा केलेली नाही. जर कुणी अशा व्यवस्थांची निंदा करतो, तर तो अधोगतीस प्राप्त होतो. विश्वात जितके उन्नत जीव आहेत, ते सर्व आपापल्या अधिकार निष्ठेचे अवलंबन करतच उन्नत झाले आहेत. कर्माधिकारात कर्मांचीच अधिक प्रशंसा पाहिली जाते. त्यांत कर्मापेक्षा श्रेष्ठ मुक्ती-साधक-ज्ञानाच्या श्रेष्ठतेचे प्रतिपादन पाहिले जात नाही. त्याच प्रकारे ज्ञानाधिकारात मुक्तीच्या प्रशंसेच्या रूपात उल्लेखित वेद-मंत्रांची प्रतिष्ठा दृष्टिगोचर होते.

जसे कर्माधिकाराच्या वर ज्ञानाधिकार अवस्थित आहे, त्याचप्रकारे ज्ञानाधिकाराच्या वर भक्ती अधिकार अवस्थित आहे. **'तत्त्वमसि', 'अहं ब्रह्मास्मि'** आदी मंत्रांद्वारे ब्रह्मनिर्वाणाच्या प्रशंसेने मुमुक्षू व्यक्तींमध्ये त्यांच्या आपापल्या अधिकारांत निष्ठा उत्पन्न करविली गेली आहे. म्हणूनच ज्ञानाची उत्कर्षता स्थापन करण्यात कुठलाच दोष नाही. तथापि तेच चरम नाही. जिथपर्यंत सिद्धांताची गोष्ट आहे, वेदांमध्ये भक्तीसच साधन आणि प्रेमभक्तीसच साध्याच्या रूपात वर्णित केले गेले आहे.

ब्रजनाथ–महावाक्यांमध्ये अवांतर साध्य आणि साधनाविषयी माहिती सांगितली असू शकते का?

बाबाजी–आपण ज्या वेदवाक्यांस सांगत आहात, त्यांना वेदांमध्ये कुठेही महावाक्यही म्हटले नाही आणि इतर वाक्यांपेक्षा श्रेष्ठही म्हटलेले नाही. ज्ञानाचार्यांनी आपल्या मताची प्रधानता स्थापित करण्याकरिता या वाक्यांना महावाक्य म्हटले आहे. वास्तविक प्रणवच (ॐ अथवा ओंकारच) महावाक्य आहे आणि त्या अतिरिक्त सगळी वेदवाक्ये प्रादेशिक वाक्ये आहेत. तसे पाहायला गेले तर प्रत्येक वेदवाक्यासच महावाक्य म्हणण्यास हरकत नाही, परंतु वेदांमधला एक मंत्र महावाक्य आहे आणि इतर मंत्र साधारण वाक्ये आहेत–असे म्हटल्याने मतवाद उत्पन्न होऊ शकतो आणि

वेदांनिकट अपराधी व्हावे लागते. वेदांमध्ये कुठेकुठे कर्मकांडाची प्रशंसा केलेली आहे तर कुठेकुठे मुक्तीची. अशा प्रकारे वेदांमध्ये नाना प्रकारच्या अवांतर साध्यसाधनांचे वर्णन पाहिले जाते. परंतु सिद्धांत-स्थळी चरम मीमांसेच्या रूपात एकमात्र भक्तीसच साध्य-साधन मानले गेले आहे. वेद-शास्त्र गाय स्वरूप आहे. या गाईचे दोहन करणाऱ्या श्रीनन्दनन्दनाने सिद्धांत-स्थळी वेदांचे चरम तात्पर्य अशा प्रकारे विदित केले आहे–

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन॥**(१०)
**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना।**
**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः॥**(११)

(गीता–६/४६-४७)

**यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ।**
**तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः॥**(१२)

(श्वे. उ. ६/२३)

**भक्तिरस्य भजनं तदिहामुत्रोपाधिनैरास्येनामुस्मिन्मनसः कल्पनम्**(१३)

(गोपालतापनी पूर्व २/२)

---

(१०) अर्जुना! समस्त प्रकारच्या कर्मी, तपस्वी, तथा ज्ञानींपेक्षा योगी श्रेष्ठ असतात. म्हणून तू योगी हो अर्थात माझ्यासोबत योगयुक्त होऊन जा.

(११) संपूर्ण योग्यांमध्येही जो दृढ श्रद्धेने माझ्यात रत आहे, अंतरात्म्याने मला निरंतर भजतो, तोच योगी मला परमश्रेष्ठ म्हणून मान्य आहे.

(१२) ज्या साधकाची भगवंताप्रती पराभक्ती आहे तथा जशी भगवंतात आहे तशीच आपल्या गुरुप्रतीही शुद्धभक्ती आहे, त्याच महात्म्याच्या संबंधी श्रुतींचे रहस्यमय अर्थ संपूर्ण रूपाने प्रकाशित होतात.

(१३) श्रीकृष्णाप्रती भक्तीच भजन आहे. लौकिकी आणि पारलौकिकी समस्त कामनांचा परित्याग करून कृष्णाप्रती मनास समर्पित करून प्रेमाधिक्याने तन्मय होणेच भजन आहे.

**आत्मानमेव प्रियमुपासीत**[१४]

(बृ. उ. १/४/८)

**आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः।**[१५]

(बृ. उ. ४/५/६)

–या वेद्वाणींचे अनुशीलन केल्याने हे स्पष्ट प्रतीत होते की भक्तीच सर्वश्रेष्ठ साधन आहे.

ब्रजनाथ–कर्मकांडात कर्मफल-दाता ईश्वराप्रती भक्ती करण्याचा विधी आहे. ज्ञानकांडातही भगवद्भक्तीची व्यवस्था पहावयास मिळते. भक्ती जर भुक्ती आणि मुक्ती प्राप्त करण्याचे साधन आहे, तर तिला साध्य कसे म्हणावे? ती भुक्ती आणि मुक्तीरूप साध्य प्रदान करून निरस्त (रद्दबातल) होऊन जाईल–ही साधारण गोष्ट आहे. आपण कृपा करून याविषयी शिकवण प्रदान करावी.

बाबाजी–कर्मकांडात भक्तीरूप साधनाद्वारे भोगाची प्राप्ती होते आणि ज्ञानकांडात भक्तीरूप साधनाने मुक्ती प्राप्त होते–हे सत्य आहे. कारण परमेश्वरास संतुष्ट केल्याशिवाय कुठलीच फलप्राप्ती होत नाही आणि परमेश्वर एकमात्र भक्तीनेच संतुष्ट होतात. ईश्वर शक्तींचे आश्रयस्थान आहेत. जीवांमध्ये अथवा जडवस्तूंमध्ये जी काही शक्ती आहे, ती ईश्वराच्याच शक्तीचा अणु-प्रकाशमात्र आहे. कर्म अथवा ज्ञान ईश्वरास संतुष्ट करू शकत नाही. भगवद्भक्तीच्या साहाय्यानेच कर्म आणि ज्ञान फळ प्रदान करतात, ते स्वतन्त्र रूपाने कुठलेच फळ प्रदान करू शकत नाहीत.

म्हणूनच कर्म आणि ज्ञानात भक्तीच्या आभासाची थोडीफार व्यवस्था दिसून येते. यात जी भक्ती दिसून येते, तीसुद्धा शुद्धभक्ती नाही तर भक्तीचा आभासमात्र आहे.

---

(१४) आत्म्याचीच (परमात्मा कृष्णाचीच) प्रीतिपूर्वक उपासना करा.

(१५) मैत्रेयी! परमात्म्याचेच दर्शन करावयास हवे, श्रवण करायला हवे तथा अविरत चिंतन करावयास हवे.

भक्ति-आभास दोन प्रकारचे असतात–शुद्धभक्ति-आभास आणि विद्धभक्ति-आभास. शुद्धभक्ति-आभासासंबधी नंतर सांगतो. विद्धभक्ति-आभास तीन प्रकारचे असतात–(१) कर्मविद्ध भक्त्याभास, (२)ज्ञानविद्ध भक्त्याभास आणि (३) कर्म-ज्ञान उभय-विद्ध भक्त्याभास. यज्ञ आदींच्या समयी " हे इंद्र! हे पूषन! आपण कृपापूर्वक आम्हास यज्ञाचे फळ प्रदान करा." अशा प्रकारच्या कामनांनी युक्त होऊन ज्या सर्व भक्ति-आभासाच्या क्रिया परिलक्षित होतात, त्या सर्व कर्मविद्ध भक्त्याभास आहेत. कर्मविद्ध भक्त्याभासास काही-काही महात्मा 'कर्ममिश्रा भक्ती' आणि काही-काही 'आरोप-सिद्धा' देखील म्हणतात.

"हे यदुनन्दन! मी संसाराला घाबरून तुझ्यापाशी आलो आहे आणि मी अहोरात्र तुझे 'हरे कृष्ण' नाव घेतो. तू कृपा करून मला भक्ती प्रदान कर. हे परमेश्वरा! तुम्ही ब्रह्म आहात, मी मायाजालात फसलो आहे. तुम्ही या मायाजालातून माझा उद्धार करून आपल्यात विलीन करून घ्या, अभेद् करून घ्या."–या सर्व भावना ज्ञानविद्ध भक्त्याभास आहेत. महात्मा लोक यास ज्ञानमिश्रा भक्ती असेही म्हणतात. हीसुद्धा आरोपसिद्धा भक्तीच आहे. या सर्व शुद्धभक्तीपेक्षा भिन्न आहेत.

**"श्रद्धावान् भजते यो माम् "**–गीतेत या वाक्याद्वारे भगवंताने ज्या भक्तीस उद्देश्य केले आहे तीच शुद्धभक्ती आहे. तीच शुद्धभक्ती आमचे साधन आहे आणि सिद्धावस्थेत तेच प्रेम आहे. कर्म आणि ज्ञान–ही दोन्ही क्रमशः भुक्ती आणि मुक्तीची साधने आहेत. ही जिवांच्या नित्य सिद्ध-भावांची साधने नाहीत.

ब्रजनाथ या सर्व तत्त्वांना श्रवण करून यादिवशी आणखी काही प्रश्न विचारू शकले नाही. ते मनोमन म्हणू लागले–न्यायशास्त्राच्या फक्किकांचे अन्वेषण करण्यापेक्षा या सर्व सूक्ष्म तत्त्वांचा विचार करणेच कितीतरी अधिक उत्तम आहे. बाबाजी याविषयी पारंगत आहेत. मी क्रमशः याविषयासंबंधी त्यांच्याकडे जिज्ञासा करून ज्ञानार्जन करीन. आज रात्र अधिक झाली आहे, तेव्हा घरी परतायला हवे.

असा विचार करून ते म्हणाले–बाबाजी महाशय! आज मला आपल्याकडून बरेच ज्ञान प्राप्त झाले. मी अधूनमधून आपल्याकडे येऊन उपदेश प्राप्त करीत जाईन. आपण मोठे अनुभवी आणि प्रकांड विद्वान आहात, माझ्यावर कृपा करावी. आज मी एक गोष्ट विचारू इच्छितो, आज उशीर झालाय, याचे उत्तर ऐकून घरी परतेन.

श्रीशचीनन्दनांनी एखादा ग्रंथ लिहिला आहे काय, ज्यात त्यांच्या समस्त शिकवण प्राप्त होऊ शकतात? जर असेल तर मला तो वाचायचा आहे.

बाबाजी–श्रीश्रीमन्महाप्रभूंनी स्वतः कुठलाच ग्रंथ लिहिला नाही. त्यांच्या भक्तांनी त्यांच्या आज्ञेनुसार ग्रंथ लिहिलेले आहेत. महाप्रभूंनी स्वयं सूत्राच्या रूपात 'शिक्षाष्टक' नामक आठ श्लोक लिहून जीवांना दिले आहे. हे 'शिक्षाष्टक' भक्तांकरिता कंठहार आहे. या आठ श्लोकांमध्येच त्यांनी वेद-वेदान्त, उपनिषद आणि पुराणांच्या सर्व शिकवण घागरीत सागराप्रमाणे भरून ठेवल्या आहेत. भक्तांनी त्यांच्या या गूढ शिकवणुकींच्या आधारे 'दशमूला'ची रचना केली आहे. या दशमूलात संबंध, अभिधेय, प्रयोजनाचा विचार साध्य आणि साधनाच्या सूत्र रूपात सांगितलेला आहे. आपण सर्वप्रथम त्यास समजून घ्या.

ब्रजनाथ–जशी आज्ञा! उद्या पुन्हा संध्याकाळनंतर येईन. आपण मला दशमूलाची शिकवण प्रदान करावी. आपण माझे शिक्षा गुरू आहात–असे म्हणून ब्रजनाथाने बाबाजी महाराजांस दंडवत-प्रणाम केला. बाबाजींनी स्नेहाने गद्गद होऊन त्यांना मिठी मारली आणि म्हणाले–बाबा! तू ब्राह्मणकुळास पवित्र केले आहेस. उद्या संध्याकाळी येऊन मला आनंद प्रदान कर.

**॥ बारावा अध्याय समाप्त ॥**

## ॥ प्रथम खण्ड समाप्त ॥



## संबंध, अभिधेय आणि प्रयोजन-मूलक द्वितीय खण्ड

# तेरावा अध्याय (प्रमाण-विचार आणि प्रमेय आरंभ)

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी श्रीवास-अंगणात ब्रजनाथ पोहोचले आणि एका सघन बकूळ वृक्षाखाली पारावर बसून वृद्ध बाबाजी महाराजांची प्रतीक्षा करू लागले. इकडे का कोणास ठाऊक बाबाजींच्या हृदयात ब्रजनाथाविषयी वात्सल्य भाव जागृत झाला, तेही ब्रजनाथाची प्रतीक्षा करीत होते. ब्रजनाथ आल्याची चाहूल लागताच ते आपल्या भजन कुटीतून बाहेर आले आणि त्यांना मोठ्या प्रेमाने मिठी मारली. तत्पश्चात त्यांना आपल्यासोबत कुटीत घेऊन आले आणि त्यांना बसण्यास आसन देऊन स्वतःही बसले.

ब्रजनाथाने बाबाजींच्या चरणांची धूळ आपल्या मस्तकी लावून मोठ्या नम्रतेने म्हटले–महात्मन्! आपण काल मला निमाई पंडितांचे मूल सिद्धांत दशमूलाची शिकवण देण्याविषयी सांगितले होते. आता कृपया मला त्याविषयी उपदेश करावा.

ब्रजनाथाच्या अशा प्रकारच्या सुंदर प्रश्नास ऐकून बाबाजी मोठे प्रसन्न झाले आणि फार प्रेमाने म्हणाले–बेटा! मी तुला प्रथम दशमूलाचे सूत्र-श्लोक सांगतो. या श्लोकात दशमूलाच्या दहाही तत्त्वांचे सूत्ररूपात निरूपण केलेले आहे. तू पंडित आहेस, या श्लोकाचा तात्त्विक अर्थ विवेचनपूर्वक धारण कर–

**आम्नायः प्राह तत्त्वं हरिमिह परमं सर्वशक्तिं रसाब्धिम्**
**तद्भिन्नांशांश्च जीवान् प्रकृतिकवलितान् तद्विमुक्तांश्च भावाद्।**
**भेदाभेदप्रकाशं सकलमपि हरेः साधनं शुद्ध भक्तिम्**
**साध्यं तत्प्रीतिमेवेत्युपदिशति जनान् गौरचन्द्रः स्वयं सः॥**

अर्थात, गुरू पंरपरेद्वारा प्राप्त वेद-वाणीस 'आम्नाय' म्हणतात. वेद आणि वेदानुगत श्रीमद्भागवत आदी स्मृतिशास्त्र तथा वेदानुगत प्रत्यक्षादी प्रमाणच प्रमाण म्हणून स्वीकारलेले आहेत. या प्रमाणांमुळे हे सिद्ध होते की–(१) हरीच परमतत्त्व

आहेत. (२) ते सर्वशक्तिमान आहेत. (३) ते अखिल रसामृत-सिंधू आहेत. (४) मुक्त आणि बद्ध दोन्ही प्रकारचे जीवच त्यांचे विभिन्नांश तत्त्व आहेत. (५) बद्धजीव मायेच्या अधीन असतात. (६) मुक्तजीव मायामुक्त तत्त्व असतात; (७) चित् अचित् अखिल जगत श्रीहरींचा अचिंत्यभेदाभेद प्रकाश आहे. (८) शुद्धभक्तीच एकमात्र साधन आहे आणि (९) कृष्ण-प्रीतीच एकमात्र वस्तू आहे.

स्वयं–भगवान श्रीगौरांगदेवांनी श्रद्धाळू जीवांस दहा प्रकारच्या तत्त्वांचा उपदेश दिला आहे. त्यातील पहिले आहे–प्रमाणतत्त्व. शेष नऊ, प्रमेयतत्त्वे आहेत. तू प्रथम प्रमाण आणि प्रमेयाचा अर्थ समजून घे. ज्या विषयास प्रमाणाद्वारे सिद्ध केले जाते, त्यास 'प्रमेय' म्हणतात, आणि ज्याच्याद्वारे प्रमेय वस्तूला प्रमाणित केले जाते, त्या वस्तूला प्रमाण असे म्हणतात. उपरोक्त श्लोकात मूळ दहा तत्त्वे अर्थात संपूर्ण दशमूल तत्त्व सामावले आहे. पुढचा श्लोक दशमूलाचा प्रथम श्लोक असेल; ज्यात दशमूलाच्या पहिल्या तत्त्वाचे विवेचन आहे. दुसऱ्या श्लोकापासून ८व्या श्लोकापर्यंत संबंधतत्त्व, ९व्यात अभिधेय तत्त्व (साधन) आणि १०व्या श्लोकात प्रयोजन (साध्य)–तत्त्वाचे वर्णन आहे.

श्लोकाचा अर्थ ऐकून ब्रजनाथ म्हणाले––बाबाजी महाशय! मलाही आत्ता काहीही विचारायचे नाही. पुढच्या श्लोकास ऐकून काही विचारायचे असेल तर आपल्या श्रीचरणी निवेदन करीन; आपण कृपया दशमूलाचा प्रथम श्लोक ऐकवा–

बाबाजी––खूप छान! मी तुला दशमूलाचा प्रथम श्लोक ऐकवतो. ध्यानपूर्वक ऐक–

**स्वतःसिद्धो वेदो हरिदयितवेधःप्रभृतितः**
**प्रमाणं सत् प्राप्तं प्रमिति विषयान् तान्नव विधान्।**
**तथा प्रत्यक्षादिप्रमितिसहितं साधयति नः**
**न युक्तिस्तर्काख्या प्रविशति तथा शक्तिरहिता॥**

(दशमूल १)

अर्थात श्रीहरीचे कृपापात्र ब्रह्मा आदींद्वारे परंपराक्रमाने संप्रदायात जे स्वतःसिद्ध वेद प्राप्त होतात, ते आम्नाय-वाक्य म्हटले जातात. ते आम्नायवाक्य आपल्या अनुगत प्रत्यक्षादी प्रमाणांच्या सहाय्याने नऊ प्रकारच्या प्रमेयतत्त्वांचे साधन

करतात. ज्या युक्तीचे तात्पर्य केवळ तर्क आणि तर्कच असतात, अशी युक्ती अचिंत्य विषयांचे विवेचन करण्यास सर्वदा पंगू असते. अतः अचिंत्य तत्त्वाच्या व्यापारात तर्काचा प्रवेश नाही.

ब्रजनाथ–ब्रह्माने शिष्य-परंपरेद्वारे शिकवण दिलेली आहे. याचे वेदांमध्ये काही प्रमाण आहे का?

बाबाजी–हो, आहे. मुण्डकोषनिषदात (१/१/१) म्हटले आहे–

**ब्रह्मा देवानां प्रथमः सम्बभूव विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता।**
**स ब्रह्मविद्यां सर्वविद्याप्रतिष्ठां अथर्वाय ज्येष्ठपुत्राय प्राह॥**[१]

आणखीही (१/२/१२) मध्ये म्हणतात–

**येनाक्षरं पुरुषं वेद सत्यं प्रोवाच तां तत्त्वतो ब्रह्मविद्याम्॥**[२]

ब्रजनाथ–ऋषींनी स्मृतीशास्त्रांमध्ये वेदांचा अर्थ ठीक-ठीकच केला आहे, त्याचे काही प्रमाण आहे का?

बाबाजी–सर्वशास्त्र चूडामणी श्रीमद्भागवत (११/१४/३-४) मध्ये या गोष्टीचे प्रमाण आहे–

**कालेन नष्टा प्रलये वाणीयं वेदसंज्ञिता।**
**मर्यादा ब्रह्मणे प्रोक्ता धर्मो यस्यां मदात्मकः॥**[३]

**तेन प्रोक्ता च पुत्राय मनवे पूर्वजाय सा॥**[४] **इत्यादी**

ब्रजनाथ–संप्रदाय का बनले?

---

(१) संपूर्ण जगाचे रचयिता आणि सर्व लोकांचे रक्षण करणारे ब्रह्मदेव समस्त देवतांच्याही आधी प्रकट झाले. त्यांनी आपला ज्येष्ठ पुत्र अथर्व यांस समस्त विद्यांची आधारभूता ब्रह्मविद्येचा यथायोग्य उपदेश दिला.

(२) ब्रह्मविद्या त्यास म्हणतात जिच्यायोगे अविनाशी परब्रह्म पुरुषोत्तमाचे सत्यस्वरूप तत्त्वतः जाणता येते.

बाबाजी–संसारात अशा लोकांची गणनाच अधिक आहे, जे मायावादाचा आश्रय करून भक्तिरहित कुपथावर चालतात. मायावाद-दोषरहित शुद्ध भक्तजनांचा जर कुठला वेगळा संप्रदाय नसेल, तर संसारात सत्संग मिळणे दुर्लभ होऊन जाईल. म्हणूनच पद्मपुराणात म्हटले आहे–

**सम्प्रदायविहीना ये मन्त्रास्ते विफला मताः।**
**श्रीब्रह्मरुद्रसनका वैष्णवाः क्षितिपावनाः॥**

अर्थात–श्री (रामानुज), ब्रह्म (मध्व), रुद्र (विष्णुस्वामी) आणि चतुःसन (निम्बादित्य)-–या चार संप्रदायांचे वैष्णवजन जगतास पवित्र करणारे आहेत. या चारही संप्रदायांचे वैष्णवजन जगतास पवित्र करणारे आहेत. या चारही संप्रदायांच्या आचार्यांद्वारे दीक्षित मंत्रांच्या व्यतिरिक्त अन्यान्य समस्त मंत्र निष्फल आहेत.

यांत ब्रह्म-संप्रदाय सर्वांत प्राचीन आहे. ब्रह्मापासून आजतागायत हा संप्रदाय शिष्य-प्रशिष्य-क्रमाने चालत आलेला आहे. गुरु-परंपरेस मानून चालणाऱ्या या संप्रदायांमध्ये वेदान्त आदी परम कल्याणकारी ग्रंथ ज्या रूपात अत्यंत प्राचीन काळापासून चालत आलेले आहेत, त्यावरून त्यांत कुठेही काहीही परिवर्तन अथवा कुठलाही अंश प्रक्षिप्त होण्याची थोडीदेखील संभावना राहत नाही. म्हणूनच संप्रदायाद्वारे मान्यताप्राप्त ग्रंथांमध्ये थोडादेखील संदेह असण्याची आवश्यकता नाही. संप्रदाय एक फारच सुंदर आणि आवश्यक व्यवस्था आहे. हेच कारण आहे की साधुसंतांमध्ये सत्-संप्रदायाची प्रणाली अत्यंत प्राचीनकाळापासून चालत आलेली आहे.

ब्रजनाथ–संप्रदाय प्रणालीत एकानंतर दुसरे अशा समस्त आचार्यांची नावे मिळतात का?

---

(३) भगवंत म्हणाले–ज्यात माझ्या वाणीचे (भागवत धर्माचे) वर्णन आहे, तीच वेद-वाणी कालचक्रात प्रलयकाळी लुप्त झाली होती. मग ब्राह्मकल्पाच्या आदीमध्ये–सृष्टीच्या समयी मी तिचा ब्रह्मास उपदेश केला होता.

(४) ब्रह्माने आपला पुत्र मनू यास आणि मनूने भृगू आदी सप्तर्षींस वेद-विद्येचा उपदेश केला होता.

बाबाजी–संप्रदाय प्रणालीत अधूनमधून होणाऱ्या प्रधान-प्रधान आचार्यांची नावे सापडतात.

ब्रजनाथ–मी ब्रह्म-संप्रदायाची गुरू-परंपरा ऐकू इच्छितो.

बाबाजी–ऐक–

**परव्योमेश्वरस्यासीच्छिष्यो ब्रह्मा जगत्पतिः।**
**तस्य शिष्यो नारदोऽभूद्व्यासस्तस्याप शिष्यताम्॥**
**शुको व्यासस्य शिष्यत्वं प्राप्तो ज्ञानावरोधनात्।**
**व्यासाल्लब्धकृष्णदीक्षो मध्वाचार्यो महायशाः॥**
**तस्य शिष्यो नरहरिस्तच्छिष्यो माधवो द्विजः।**
**अक्षोभ्यस्तस्य शिष्योऽभूत्तच्छिष्यो जयतीर्थकः॥**
**तस्य शिष्यो ज्ञानसिन्धुस्तस्य शिष्यो महानिधिः।**
**विद्यानिधिस्तस्य शिष्यो राजेन्द्रस्तस्य सेवकः॥**

**जयधर्मा मुनिस्तस्य शिष्यो यद्गणमध्यतः।**

**श्रीमद्विष्णुपुरी यस्तु 'भक्तिरत्नावली कृतिः॥'** (५)

**जयधर्मस्य शिष्योऽभूद् ब्रह्मण्यः पुरुषोत्तमः।**
**व्यासतीर्थस्तस्य शिष्यो यश्चक्रे 'विष्णु-संहिताम्'॥**

---

(५) परमेश्वर श्रीनारायणाचे शिष्य ब्रह्मा आहेत, ब्रह्माचे शिष्य नारद झाले. व्यासदेव नारदांचे शिष्य झाले. (शुष्क) ज्ञानाचे अवरोधन (अर्थात श्रीलवेदव्यासांच्या शिष्यांच्या मुखातून भगवंताच्या नाम, रूप,गुण आणि लीलासंबंधी श्लोकांना श्रवण केल्यानंतर पालन केल्या जाणाऱ्या मार्गात बाधा पडल्याने अर्थात त्या प्रती अरुची उत्पन्न झाल्या) कारणाने शुकदेवांनी श्रीव्यासदेवांचे शिष्यत्व स्वीकारले. प्रख्यात मध्वाचार्यांनी श्रीव्यासदेवांकडून कृष्ण-दीक्षा प्राप्त केली होती. मध्वाचार्यांचे नरहरी आणि नरहरींचे माधव-द्विज शिष्य झाले. अक्षोभ्यांनी माधवांची शिष्यता स्वीकार केली. अक्षोभ्यांचे जयतीर्थ, जयतीर्थांचे ज्ञानसिन्धू, ज्ञानसिन्धूंचे महानिधी, महानिधींचे विद्यानिधी आणि विद्यानिधींचे शिष्य राजेन्द्र झाले. राजेन्द्रांचे शिष्य जयधर्म मुनी आहेत. जयधर्मांच्या अनुगत शिष्यांमध्ये श्रीविष्णुपुरी एक प्रधान आचार्य झाले आहेत, ज्यांनी 'भक्तीरत्नावली' नामक ग्रंथाची रचना केली आहे.

**श्रीमल्लक्ष्मीपतिस्तस्य शिष्यो भक्ति-रसाश्रयः।**
**तस्य शिष्यो माधवेन्द्रो यद्धर्मोऽयं प्रवर्तितः॥[६]**

ब्रजनाथ–दशमूलाच्या प्रथम श्लोकात वेदांस एकमात्र प्रमाण स्वीकारलेले आहे तथा प्रत्यक्षादी प्रमाणांस वेदानुगत झाल्यावर त्यांनाही प्रमाण मानले गेले आहे. परंतु न्याय आणि सांख्यादी दर्शनात काही अधिक प्रमाण दिसून येतात. पौराणिकांनी तर आठ प्रकारचे प्रमाण स्वीकारले आहेत. प्रत्यक्ष, अनुमान, अपमान, शब्द, ऐतिह्य, अनुलपब्धी, अर्थापत्ती आणि सम्भव. प्रमाणासंबंधी भिन्न-भिन्न मते असण्याचे कारण काय आहे? आणि जर प्रत्यक्ष आणि अनुमानास सिद्ध-प्रमाणाच्या श्रेणीत ठेवले गेले नाही तर यथार्थ ज्ञानाचा बोध (ज्ञान-व्याप्ती)देखील कसा होऊ शकेल? मला समजावून सांगण्याची कृपा करा.

बाबाजी–प्रत्यक्षादी प्रमाणसमूह इंद्रियांपासून परतन्त्र आहेत आणि बद्धजिवांच्या इंद्रियांमध्ये भ्रम, प्रमाद, विप्रलिप्सा आणि करणापटव--हे चार दोष सर्वदा वर्तमान राहतात. इंद्रियांद्वारे जे ज्ञान प्राप्त होते. त्यास सत्य आणि दोषरहित (अचूक) कसे मानावे? पूर्ण समाधी अवस्थेत स्थित, मोठमोठे महर्षी आणि संत-आचार्यांच्या निर्मल हृदयात सर्वतन्त्र-स्वतन्त्र आणि सर्वशक्तिमान भगवान उदित होऊन वेदाच्या रूपात सिद्ध-ज्ञान प्रकट करतात. म्हणून या स्वतःसिद्ध ज्ञानस्वरूप वेदांची प्रामाणिकता सर्वथा दोषरहित (अचूक) आणि निर्भरयोग्य (अवलंबून राहण्यायोग्य) आहे.

ब्रजनाथ–भ्रम, प्रमाद, विप्रलिप्सा आणि करणापाटवचा अर्थ वेगवेगळा स्पष्ट करून समजावून सांगावा.

बाबाजी–बद्धजीव आपल्या असंपूर्ण इंद्रियांद्वारे कुठल्या विषयाचे जे चुकीचे ज्ञानसंग्रह करतो, त्यास भ्रम म्हणतात. जसे–वाळवंटात उन्हाळ्यात सूर्याच्या किरणांमुळे मृगजळात पाण्याचा भ्रम होतो. जिवाची प्राकृत बुद्धी स्वभावतः सीमित

---

(६) जयधर्मांचे शिष्य पुरुषोत्तम आणि पुरुषोत्तमांचे शिष्य ब्रह्मण्य तीर्थ झाले. ब्रह्मण्य तीर्थांचे शिष्य व्यासतीर्थ झाले, ज्यांनी 'विष्णुसंहितेची' रचना केली आहे. व्यासतीर्थांचे शिष्य श्रीलक्ष्मीपती झाले. याच लक्ष्मीपतींचे शिष्य आहेत–प्रेमभक्तिरसात बुडालेले श्रीमाधवेन्द्र पुरी, जे प्रेमभक्ती रूप धर्माचे प्रवर्तक आहेत.

असते. या सीमित बुद्धीद्वारे असीम परतत्त्वासंबंधी जे सिद्धांत केले जातात, त्यांत चुका राहणे स्वाभाविक आहे. या चुकांचे नाव प्रमाद आहे. जसे–देश आणि काळाच्या सीमेद्वारे सीमित बुद्धीने युक्त कुणाचे देशकालाच्या अतीत ईश्वराच्या कर्तृत्वाविषयी जिज्ञासा करणे. संदेहास विप्रलिप्सा म्हणतात. घटना-चक्राने इंद्रियांची असमर्थता अपरिहार्य आहे. अकस्मात कुठली एक वस्तू पाहून त्यात अन्य वस्तू असण्याचा भ्रम असल्याकारणाने जो चुकीचा सिद्धांत निर्माण होतो, त्यास करणापटव म्हणतात.

ब्रजनाथ–प्रत्यक्ष आदी प्रमाणांचे काही मूल्य नाही काय?

बाबाजी–जड-जगताचे ज्ञान प्राप्त करण्याकरिता प्रत्यक्ष आदी प्रमाणांव्यतिरिक्त आणखी उपायच काय आहे? परंतु चित्-जगतासंबंधी प्रत्यक्ष आदी प्रमाण सर्वथा अनुपयुक्त आहेत. त्यांचा चित्-जगतात प्रवेश नाही. चित्-जगतासंबंधी ज्ञानात वेद्च एकमात्र प्रमाण आहे. जर प्रत्यक्षादी प्रमाणांद्वारे प्राप्त ज्ञान स्वतःसिद्ध वेद-प्रमाणानुगत असेल, तर ते आदरणीय आहे, अन्यथा परित्याज्य आहे. म्हणून स्वतःसिद्ध वेद्च एकमात्र प्रमाण आहेत. हो, प्रत्यक्षादी प्रमाणांनाही प्रमाण मानले जाऊ शकते, जर ते वेदानुगत असेल तर.

ब्रजनाथ–गीता आणि भागवतादी ग्रंथ प्रमाणांच्या श्रेणीत सामील होत नाहीत का?

बाबाजी–गीतेस भगवंताची वाणी असल्याने उपनिषद (गीतोपनिषद) म्हटले गेले आहे. म्हणूनच गीता 'वेद' आहे. त्याचप्रकारे 'दशमूलतत्त्व' श्रीचैतन्य महाप्रभूंची शिकवण असल्याने भगवंताची वाणीच आहे. म्हणूनच तेदेखील 'वेद' आहेत. संपूर्ण वेदार्थांचे सारसंग्रह स्वरूप श्रीमद्भागवत सर्वश्रेष्ठ प्रमाण आहे. अन्य शास्त्रांच्या वाणी वेदानुगत असूनही प्रमाणाच्या स्वरूपात ग्रहण योग्य नाहीत. तन्त्रशास्त्र तीन प्रकारचे आहे–सात्त्विक, राजसिक आणि तामसिक. यांत पंचरात्र आदी सात्त्विक तन्त्रसमूह ('तन्'–धातूच्या विस्तारपूर्वक अर्थाने वेदार्थ विस्तारक तन्त्र शब्द निष्पन्न होऊन) वेदांचे गूढार्थ विस्तारक शास्त्र असल्याने प्रमाण श्रेणीत मान्य आहेत.

ब्रजनाथ–वेदाच्या अंतर्गत खूपसे ग्रंथ आहेत. त्यापैकी कोणकोणते ग्रंथ प्रमाण स्वरूपात ग्रहण करण्यायोग्य आहेत, आणि कोणकोणते ग्रहण करण्यास अयोग्य आहेत?

बाबाजी–वेळोवेळी काही असत् व्यक्ती आपल्या स्वार्थपूर्तीकरिता वेदांमध्ये अनेक अध्याय, मंडळे आणि मंत्र जोडीत असतात. यानंतर जोडलेल्या अंशांस 'प्रक्षिप्त' अंश म्हणतात. वेदग्रंथांची प्रामाणिकता कशीबशी स्वीकारावीच लागेल, अशी गोष्ट नाही. उलट सत् संप्रदायाच्या आचार्यांनी ज्या ज्या वेदग्रंथांस वेळोवेळी प्रामाणिक मानले आहे, तेच वेद आहेत आणि तेच प्रामाणिक आहेत. परंतु ज्या ग्रंथांस अथवा त्यांच्या ज्या अंशांस प्रामाणिक मानले नाहीत, ते त्याज्य आहेत.

ब्रजनाथ–सत् संप्रदायाच्या आचार्यांनी कोणकोणत्या वेद-ग्रंथांना स्वीकारले आहे?

बाबाजी–ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्डक, माण्डुक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छान्दोग्य, बृहदारण्यक आणि श्वेताश्वतर–ही अकरा सात्त्विक उपनिषदे, तसेच गोपालोपनिषद् आणि नृसिंहतापनी इत्यादी कितीतरी उपासनेत सहायक तापनी आणि ब्राह्मण, मण्डल आदी ऋक्, साम, यजुः आणि अथर्वाच्या अंतर्गत कांड विस्तारक वेद-ग्रंथांस आचार्यांनी स्वीकारले आहे. समस्त वेद-ग्रंथ आपणांस सांप्रदायिक आचार्यांकडून प्राप्त झाले आहेत. म्हणूनच त्यांना सत्-प्राप्त प्रमाण म्हटले गेले आहे.

ब्रजनाथ–चित्-विषयांत युक्तीचा प्रवेश नसतो–याचे वेदांमध्ये काही प्रमाण आहे का?

बाबाजी–**"नैषा तर्केण मत्तिरापनेया "** [७] (कठ. उ. १ /२ /९) इत्यादी प्रसिद्ध वेद वाणी आणि **"तर्काप्रतिष्ठानात्"** [८] (ब्रह्मसूत्र २/१/११) आदी वेदान्त-सूत्रांद्वारे ही गोष्ट प्रमाणित होते. आणखीही पहा–

**अचिन्त्याः खलु ये भावा न तांस्तर्केण योजये त्।**
**प्रकृतिभ्यः परं यत्तु तदचिन्त्यस्य लक्षणम्॥** [९]

(महाभारत भी. प. ५/१२)

महाभारताच्या या श्लोकात युक्तीची सीमा निर्धारित केलेली आहे. म्हणूनच भक्तिमार्गाचे आचार्य श्रीरूप गोस्वामी भक्तिरसामृतसिन्धूमध्ये लिहितात (पू. वि. १/३२)–

**स्वल्पापि रुचिरेव स्याद् भक्तितत्त्वावबोधिका।**
**युक्तिस्तु केवला नैव यदस्या अप्रतिष्ठता॥** [१०]

युक्तीद्वारे सत्याचे यथार्थ निरूपण होत नाही–हे प्राचीन उक्तींनी सिद्ध होते–

---

(७) नचिकेता! तू आत्मतत्त्वासंबंधी जी बुद्धी प्राप्त केली आहेस, त्यास तर्काद्वारे नष्ट करणे उचित नाही.

(८) तर्काची प्रतिष्ठा नाही. याद्वारे कुठली वस्तू स्थापित करता येत नाही; कारण आज एखादी व्यक्ती तर्क आणि युक्तीने ज्याची स्थापना करते, उद्या त्याहून अधिक प्रतिभाशाली मनुष्य त्याचे खंडन करून टाकतो. म्हणूनच तर्काची अप्रतिष्ठा दिलेली आहे.

(९) प्रकृतीपलीकडील तत्त्वसमूह अचिंत्य असतात. तर्क प्राकृत विषयांतच लागू होऊ शकतो, कारण तो स्वतः प्रकृतीच्या अंतर्गत आहे. म्हणून तो प्रकृतीच्या पलीकडील तत्त्वांस स्पर्शही करीत नाही. म्हणून जिथपर्यंत अचिंत्य भावांचा प्रश्न आहे, शुष्क तर्काचा वापर अवांछनीय आणि व्यर्थ आहे. (श्रीचैतन्यचरितामृत, अमृतप्रवाह भाष्य)

(१०) भक्तितत्त्व-प्रतिपादक श्रीमद्भागवत आदी शास्त्रांप्रती थोडीशी रुची निर्माण झाल्यावरच भक्तितत्त्व बोधगम्य होऊ शकते. परंतु केवळ शुष्क तर्कांद्वारे त्यास जाणले जाता येत नाही. कारण तर्काची काहीच प्रतिष्ठा अथवा अंत नसतो.

**यत्नेनापादितोऽप्यर्थः कुशलैरनुमातृभिः।**
**अभियुक्ततरैरन्यैरन्थैवोपपाद्यते॥**(११)

तू आज एका युक्ती द्वारे एक सिद्धांत प्रस्थापित केला, उद्या तुझ्याहूनही अधिक बुद्धिमान आणि प्रतिभाशाली दुसरी व्यक्ती त्याचे खंडन करू शकते. म्हणूनच युक्तीचा काही भरवसा देता येतो का?

ब्रजनाथ–बाबाजी! वेद जे स्वतःसिद्ध प्रमाण आहेत–यांस मी व्यवस्थित समजलो. काही तार्किक लोक व्यर्थच वेदांविरूद्ध तर्क-वितर्क करतात. आता कृपा करून दशमूलाचा दुसरा श्लोक सांगा.

बाबाजी–

**हरिस्त्वेकं तत्त्वं विधिशिवसुरेशप्रणमितः**
**यदेवेदं ब्रह्म प्रकृतिरहितं तत्त्वनुमहः।**
**परात्मा तस्यांशो जगदनुगतो विश्वजनकः**
**स वै राधाकान्तो नवजलदकान्तिश्चिदुदयः॥**

(दशमूल २)

अर्थात ब्रह्मा, शिव आणि इन्द्र आदी देववृन्द ज्यांना निरंतर प्रणाम करीत असतात, ते हरीच एकमात्र परमतत्त्व आहेत. शक्तिरहित निर्विशेष ब्रह्म त्या श्रीहरींची अंगकांती आहे आणि विश्वाची सृष्टी करून त्यात आपल्या एका अंशाने प्रविष्ट असणारे सर्वांतर्यामी परम-पुरुष परमात्मा त्या श्रीहरीचे अंशमात्र आहेत. ते श्रीहरीच नव-जलधर कांतीने युक्त चित्-स्वरूप श्रीश्रीराधावल्लभ आहेत.

ब्रजनाथ–उपनिषदांमध्ये प्रकृतीच्या पलीकडल्या ब्रह्मालाच सर्वश्रेष्ठ तत्त्व सांगितले आहे. परंतु श्रीगौरहरींनी कुठल्या युक्तीने वा प्रमाणाने, कुठल्या आधारे या ब्रह्मास श्रीहरींची अंगज्योती म्हटले आहे?

---

(११) कुणी तार्किक व्यक्ती तर्काद्वारे अती सतर्कतेने एका विषयास स्थापित करतो. त्याहूनही अधिक तर्कपटू दुसरी व्यक्ती त्याचे सहजच खंडन करू शकते.

बाबाजी–"श्रीहरीच भगवान आहेत". विष्णुपुराणात भगवत्स्वरूप निरूपण करतांना म्हणतात–

**ऐश्वर्यस्य समग्रस्य वीर्यस्य यशसः श्रियः।**
**ज्ञान वैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीङ्गना॥**

(वि. पु. ६/५/७४)

अर्थात संपूर्ण ऐश्वर्य, संपूर्ण वीर्य, संपूर्ण यश, संपूर्ण श्री अर्थात सौंदर्य, संपूर्ण ज्ञान आणि संपूर्ण वैराग्य–या सहा अचिंत्य गुणांनी युक्त परमतत्त्वच भगवान आहे.

उपरोक्त गुणांमध्ये परस्पर अंग-अंगीचा संबंध आहे. प्रश्न निर्माण होतो– यातील कोणता गुण अंगी आहे आणि कोणकोणते गुण अंग आहेत. अंगी त्यास म्हणतात ज्यात अन्यान्य अंगांचा समावेश होतो. उदाहरणार्थ वृक्ष अंगी आहे आणि फांद्या, पाने अंग आहेत, शरीर अंगी आहे, हात, पाय, त्याचे अंग आहेत. अतः अंगी-गुण ते आहेत ज्यात शेष गुणसमूह अंगाच्या रूपात न्यस्त राहतात. भगवंताच्या चिन्मय-विग्रहाची श्री (रूप)च–अंगी–गुण आहे आणि ऐश्वर्य, वीर्य आणि यश–हे तीन गुण अंग आहेत. ज्ञान आणि वैराग्य हे उरलेले दोन गुण यश नामक गुणाच्या अंतर्गत ज्योती-स्वरूपात अवस्थित आहेत. कारण ज्ञान आणि वैराग्य स्वयं गुण नाहीत, उलट गुणांचे गुण आहेत. हेच ज्ञान-वैराग्य–निर्विकार ज्ञान अर्थात निर्विशेष निराकार ब्रह्माचे स्वरूप आहेत. म्हणून ब्रह्म–चिन्मय ब्रह्मांडाची अंगकांती अर्थात ज्योती आहे. निर्विकार, निष्क्रिय, अवयवरहित निर्विशेष ब्रह्म–स्वयं कुठलेच सिद्ध तत्त्व नाही, तर भगवंताच्या श्रीविग्रहाचे आश्रित-तत्त्व आहे अर्थात ब्रह्म वस्तू नाही–वस्तूचा गुण आहे. भगवंतच ती वस्तू आहे आणि ब्रह्म त्याचा गुण आहे; जसे–अग्नीचा प्रकाश सिद्ध-तत्त्व नाही आहे–तो अग्नीच्या अधीन एक गुणमात्र आहे.

ब्रजनाथ–वेदांमध्ये ठिकठिकाणी ब्रह्माच्या निर्विशेष गुणांचा उल्लेख करून शेवटी सर्वत्र **"ॐ शान्तिः, शान्तिः, हरिः ॐ"**–या मंत्राने ज्या श्रीहरीस सर्वोत्तम तत्त्व म्हटले गेले आहे, ते हरी कोण आहेत?

बाबाजी–चिल्लीला-मिथुन राधाकृष्णच ते हरी आहेत.

ब्रजनाथ–याविषयी मी नंतर विचारीन; आता हे सांगा की जगत्-पिता परमात्मा भगवंताचे अंश कसे काय आहेत?

बाबाजी–भगवान आपल्या ऐश्वर्य आणि वीर्य या दोन गुणांनी व्याप्त होऊन अखिल विश्वाची रचना करतात आणि आपल्या एका अंशाने विष्णूच्या रूपात प्रविष्ट होऊन जातात. भगवंताचा प्रत्येक अंश सर्वदा पूर्णच राहतो, त्यांचा कुठलाच अंश अपूर्ण नसतो–

**पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते॥**(१२)

(बृ.उ. ५/१)

म्हणून जगात प्रविष्ट, पूर्णस्वरूप, जगन्नियन्ता विष्णूच परमात्मा आहेत. या विष्णूंची तीन रूपे आहेत–कारणोदकशायी विष्णू, क्षीरोदकशायी विष्णू आणि गर्भोदकदायी विष्णू. चित् आणि मायिक दोन्ही जगांच्या मध्ये कारणसमुद्र अर्थात विरजा पसरली आहे. याच कारणसमुद्रात भगवदंश कारणोदशायी (कारणसमुद्रात शयन करणारे) विष्णू विराजमान होऊन दूर स्थित मायेप्रती ईक्षण (दृष्टी) करून तिच्यापासून मायिक जगाची रचना करवितात. श्रीगीतेमध्ये (९/१०) भगवान श्रीकृष्णांनी जगत्-सृष्टिविषयी अशा प्रकारे वर्णन केले आहे–

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्।**(१३)

वेदांमध्ये पण असे म्हटले गेले आहे–

**स ऐक्षत** (ऐत. उ. १/१/१) (१४)

---

(१२) हा अवतारी पुरुष पूर्ण आहे आणि त्यातून उत्पन्न झालेला हा अवतारही पूर्ण आहे. पूर्णापासून पूर्णच आविर्भूत होते तथा पूर्णातून पूर्ण काढून घेतल्यावर पूर्णच अवशेष राहते. परमेश्वराच्या पूर्णतेस कुठल्याही प्रकारे हानी पोहोचू शकत नाही.

(१३) माझ्यासारख्या अधिष्ठात्याच्या अध्यक्षतेमध्ये माझी मायाशक्ती चराचर विश्वाची सृष्टी करते.

(१४) त्या परमात्म्याने ईक्षण केले होते.

**स इमान लोकान् असृजत्** (ऐत. उ.१/१/२)[१५]

मायेमध्ये प्रविष्ट कारणोदशायी विष्णूंची ईक्षण-शक्तीच गर्भोदकशायी विष्णू आहेत. त्याच महाविष्णूंचे चिदीक्षणगत किरण-परमाणुसमूहच बद्धजीव आहेत. त्यातील प्रत्येक जिवाच्या हृदयात महाविष्णू आपल्या एका अंशाने अंगठ्याइतक्या रूपात विराजमान आहेत. गर्भोदकशायी विष्णूच्या या अंशाचे नाव क्षीरोदशायी हिरण्यगर्भ ईश्वर वा परमात्मा आहे. श्वेताश्वतरोपनिषद् (४/६) मध्ये **"द्वा सुपर्णा सयुजा सखाया"** या मंत्राद्वारे जिवांच्या हृदयात प्रविष्ट याच परमात्मा आणि जिवाच्या स्थितीची तुलना एकाच फांदीवर बसलेल्या दोन पक्षांशी केली आहे, ज्यात ईश्वररूप पक्षी-कर्मफलदाता आहे आणि जीवरूप पक्षी--कर्मफलाचा भोक्ता आहे. गीतोपनिषदात भगवंतांनी या तत्त्वाची अभिव्यक्ती अशा प्रकारे केली आहे–

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम्॥**
**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत्॥**[१६]

(गीता १०/ ४१-४२)

म्हणून परमपुरुष भगवंताच्या अंशस्वरूप परमात्म्याच्या एका अंशात विश्वजनकत्व, विश्वपालकत्व आदी ईश्वरता प्रकाशित आहे.

ब्रजनाथ–मी पूर्णपणे समजलो की ब्रह्म श्रीहरींची अंगकांती आहे आणि परमात्मा–त्याचे अंश आहेत. परंतु ते भगवान श्रीहरीच स्वयं कृष्ण आहेत–याचे प्रमाण काय आहे?

---

(१५) त्या परमात्म्यानेच आपल्या मायेप्रती ईक्षण करून (दृष्टीक्षेप टाकून) चराचर जगाची सृष्टी केली आहे.

(१६) अर्जुना! ऐश्वर्य, संपत्ती, बल आणि पराक्रम आदींच्या प्रभावाने ज्या-ज्या श्रेष्ठ वस्तू आहेत, त्यांना माझ्या तेजाच्या अंशातून निघालेल्या विभूतीच समज. अथवा हे अर्जुना! तुला माझ्या या संपूर्ण विभूतींना वेगवेगळे जाणण्याची आवश्यकताच काय आहे, तू केवळमात्र इतकेच जाण की मी आपल्या अंशाद्वारे ह्या संपूर्ण विश्वाला धारण करून पूर्ण रूपात व्याप्त होऊन स्थित आहे.

बाबाजी–भगवान सर्वदा ऐश्वर्य आणि माधुर्य या दोन रूपांत नित्य प्रकाशित आहेत. ऐश्वर्य प्रकाशाचे नाव नारायण आहे, जे महाविष्णूचे अंशी आणि परव्योम-वैकुण्ठाचे पती आहेत. भगवंताच्या माधुर्य प्रकाशाचे नाव श्रीकृष्ण आहे. हे श्रीकृष्ण अखिल माधुर्याची सीमा आहेत. त्यांच्यात माधुर्याची इतकी अधिकता आहे की त्यांचे संपूर्ण ऐश्वर्य त्यांच्या माधुर्याच्या किरणांनी आच्छादित असते. सिद्धांततः नारायण आणि कृष्णात कुठलाच भेद नाही, परंतु चित्-जगाच्या रसास्वादनाचा जिथे विचार उपस्थित होतो, तेथे कृष्ण समस्त रसांचे आधार तर आहेतच, शिवाय ते स्वयं रसरूप असल्याने परम उपादेय तत्त्वही आहेत.

श्रीकृष्ण स्वयं-भगवान श्रीहरी आहेत–याचे प्रमाण वेद, उपनिषद आणि पुराणे आहेत. जसे––

ऋग्वेद (१/१२/१६४/ ३१ ऋक्) मध्ये––

**अपश्यं गोपामनिपद्यमानमा च परा च पथिभिश्चरन्तम्। स सध्रीचीः। स विषुचीर्वसान आवरीवर्त्तिभुवनेष्वन्तः॥**[१७]

छांदोग्योपनिषद् (८/१३/१) मध्ये–

**श्यामाच्छबलं प्रपद्ये शबलाच्छ्यामं प्रपद्ये।**[१८]

---

(१७) गोपवंशात उत्पन्न एका बालकास पाहिले, ज्याचे कधीही पतन (विनाश) होत नाही. तो कधी अत्यंत निकट तर कधी दूर नाना पथांवर विचरण करतो. कधी कधी तो भिन्नभिन्न प्रकारच्या वस्त्रांनी सुसज्जित राहतो, तर कधी वेगवेगळ्या (एकावेळी एक रंगाच्या) वस्त्रांनी आवृत रहातो. अशाप्रकारे तो वारंवार आपल्या प्रकट आणि अप्रकट लीला प्रदर्शित करीत असतो.

(१८) कृष्ण-सेवेद्वारे विचित्र विलासांनी पूर्ण अप्राकृत चिदानन्दमय धामाची प्राप्ती होते, तथा विविध विचित्रतांनी पूर्ण त्या चित्-जगातून कृष्णाची प्राप्ती होते. 'श्याम' शब्दाचा अर्थ कृष्णाशी निगडीत आहे. तात्पर्य हे की, 'कृष्ण' अर्थात 'काळा' म्हटल्याने रंगहीन–निर्गुण परतत्त्वाचा बोध होतो आणि 'शबल' शब्दाचा अर्थ 'गौर' आहे. अर्थात नाना प्रकारच्या रंगांनी युक्त अथवा समस्त रंगांच्या मिश्रणाचे नाव 'गौर' आहे. यास आपण दुसऱ्या शब्दांत अशाप्रकारे म्हणू शकतो की समस्त अप्राकृत गुणांनी युक्त परतत्त्वाचे नाव 'गौर' आहे. म्हणून उपरोक्त मंत्राचा गूढ आशय हा आहे की कृष्णभजनाने गौराची आणि गौरभजनाने कृष्णाची प्राप्ती होते.

मंत्रांमध्ये मुक्तीनंतरही शुद्ध जिवांच्या क्रियांचे उल्लेख आहेत.

श्रीमद्भागवतात (१/३/२८)–

**एते चांशकलाः पुंसः कृष्णस्तु भगवान् स्वयम्!** (१९)

श्रीगीतोपनिषदात (७/७) मध्ये––

**मत्तः परतरं नान्यत् किञ्चदस्ति धनञ्जय** (२०)

गोपालतापनी (पूर्व २/८) मध्ये–

**एको वशी सर्वगः कृष्ण इड्य एकोऽपि सन् बहुधा योऽवभति।**(२१)

ब्रजनाथ–श्रीकृष्ण तर मध्यमाकार (मनुष्याच्या समान आकाराचे) आहेत, ते सर्वव्यापी कसे काय असू शकतात? त्यांचे शरीर आहे असे मानल्याने त्यांना एकाच ठिकाणी आबद्ध करणे होते आणि तसे झाल्याने अनेक दोष निर्माण होऊ शकतात. पहिला हा की त्यांचे शरीर असल्याने ते सर्वव्यापी तत्त्व होऊ शकत नाहीत. दुसरे असे की त्यांना गुणांच्या अधीन व्हावे लागेल. मग ते स्वेच्छामय सर्वतन्त्र कसे राहतील? तेव्हा मग याचे समाधान काय?

बाबाजी–बेटा! तू अजून मायिक गुणांनी बद्ध असल्याने असा विचार करीत आहेस. बुद्धी जोपर्यंत मायिक गुणांद्वारे आबद्ध राहते, तोपर्यंत ती शुद्धसत्त्वास स्पर्शही करू शकत नाही. जर तशी बुद्धी आपल्या सीमेचे उल्लंघन करून शुद्धतत्त्व विवेचनाचा प्रयत्न करते, तर शुद्धतत्त्वात मायिक आकार आणि मायिक गुण आरोपून

---

(१९) राम, नृसिंह आदी अवतारसमूह परम पुरुष भगवंताचे अंश वा कला आहेत, परंतु कृष्णच स्वयं भगवान आहेत.

(२०) अर्जुन! माझ्यापेक्षा श्रेष्ठ आणखी काहीच नाही.

(२१) सर्वांना वश करणारे सर्वव्यापी एकमात्र अद्वितीय परब्रह्म श्रीकृष्णदेव, मनुष्य आदी प्राणीमात्रांचे पूजनीय आहेत. ते एक असूनही आपल्या अचिंत्य शक्तीच्या प्रभावाने अनेक रूपांत प्रकाशित होतात तथा नाना प्रकारचे विलास करतात.

त्याची एक प्राकृत मूर्ती घडवते. मग कालांतराने त्या मूर्तीस अनित्य, विकारी तथा गुणांच्या अधीन जाणून त्यास त्यागते आणि निराकार निर्विशेष ब्रह्माची कल्पना करते. अशाप्रकारे परमतत्त्वापर्यंत ती पोहोचू शकत नाही. तू चिन्मय 'मध्यमाकाराच्या' संबंधी जे दोष सांगितले आहेत, वास्तविक ते सर्व सर्वथा निराधार आहेत. निराकार, निर्विकार आणि निष्क्रिय–हे सर्व गुण मायिक गुणांच्या विपरीत भाव आहेत. परंतु हे देखील एक प्रकारे गुणच आहेत. आणि सुंदर, प्रसन्नवदन, कमलनयन, शांतिप्रद्-चरणकमल, कला आणि विलासोपयोगी अंग-प्रत्यंगादी शुद्ध चिन्मय-स्वरूपात्मक चित्-विग्रहत्वदेखील एक प्रकारचे गुण आहेत. या दोन्ही प्रकारच्या गुणांचा आधारस्वरूप 'मध्यमाकार' श्रीविग्रह अतिशय उपादेय असतो. नारदपञ्चरात्रात श्रीविग्रहाचे अत्यंत मनोरम आणि सुसिद्धांतपूर्ण विवेचन केलेले आहे–

**निर्दोषगुणविग्रह आत्मतन्त्रो निश्चेतनात्मकशरीरगुणैश्च हीनः।**
**आनन्दमात्रकरपादमुखोदरादिः सर्वत्र च स्वगतभेदविवर्जितात्मा॥**

अर्थात–श्रीकृष्णाचा विग्रह सच्चिदानंदमय आहे. त्यात जडीय गुणांचा गंधसुद्धा नाही.

ते जडीय देश आणि कालाच्या अधीन नाहीत. उलट ते सर्वकाळ, सर्वत्र समान रूपाने विराजमान आहेत. ते अखंड आणि अद्वयज्ञान-स्वरूप वस्तू आहेत. जड-जगात 'दिक्' असीम वस्तू आहे. पार्थिव विचाराने निराकार वस्तूच असीम वा सर्वव्यापी असू शकते. 'मध्यमाकार' (आकारयुक्त) वस्तू सर्वव्यापी असू शकत नाही. हा विचार फक्त जड जगातच लागू होऊ शकतो. चित्-जगात सर्व वस्तू–सर्व धर्म असीम असतात. म्हणून 'मध्यमाकार' श्रीविग्रह ही सर्वव्यापी आहेत. सर्वव्यापकता हा एक प्रकारचा गुण आहे तो जड-जगातील 'मध्यमाकार' वस्तूत नसतो. परंतु तीच सर्वव्यापकता श्रीकृष्णाच्या मध्यमाकार विग्रहात सुंदर रूपात वर्तमान राहते–त्यांच्या विग्रहाचा हा अलौकिक धर्म आहे. हेच त्या चित् विग्रहाचे माहात्म्य आहे. हे माहात्म्य सर्वव्यापी ब्रह्म भावात प्राप्त होऊ शकते का? जड पदार्थ देश आणि कालाच्या अधीन असतात. कालधर्माने स्वभावतः मुक्त पदार्थास जर दिग्देश आणि कालाच्या अधीन सर्वव्यापी आकाशाच्या समानच मानले गेले, तर कालातीत पदार्थाचे महत्त्व काय राहिले? कृष्णाचे व्रजधामच छांदोग्य-उपनिषदाचे 'ब्रह्मपुर'

आहे. हे ब्रजधाम संपूर्ण ‘चित्-वस्तू’ (अप्राकृत तत्त्व) आहे. त्यात सर्व प्रकारची चिद्गत विचित्रता वर्तमान आहेत. तेथील माती, जल, नद, नदी, पर्वत, वृक्ष, लता, पशू, पक्षी, आकाश, सूर्य, चन्द्र, ग्रह, नक्षत्र आदी सारी वस्तू चिन्मय आहेत. तेथे जडीय दोष बिलकुल नाही आहेत. तेथे सर्वत्र आणि सर्वदा चित्-सुख परिपूर्ण रूपात विराजमान असते. बेटा! हे मायापूर-नवद्वीप पण तेच चिन्मय धाम आहे. परंतु तुम्ही लोक माया-जाळाच्या वरती उभे असल्याने या चिन्मय धामास स्पर्श नाही करू शकत. साधु-संतांच्या कृपेने जेव्हा तुमच्या हृदयात चिद्भाव उदित होईल, तेव्हा तुम्ही लोक पण या भूमीचे चिन्मय धामाच्या रूपात दर्शन करू शकाल आणि तेव्हाच तुम्हा लोकांचा ब्रजवास सिद्ध होईल. मध्यमाकार झाल्याने पार्थिव गुण आणि दोष राहतीलच–असे तुम्हाला कोणी सांगितले? जोपर्यंत तुमची बुद्धी जडीय संस्कारांच्या बंधनात फसलेली आहे, तुम्ही ‘चिन्मय मध्यमाकार’ श्रीविग्रहाच्या यथार्थ महत्त्वाची प्राप्ती करू शकत नाही.

ब्रजनाथ–बाबाजी महाशय! जर श्रीराधाकृष्णांचा विग्रह, त्यांची कांती, शरीर, लीला, सहचर, गृह, कुंज, वन आणि उपवन इत्यादी साऱ्या वस्तू चिन्मय आहेत तर कोणी पण बुद्धिमान मनुष्य त्यांच्या संबधात शंका करू शकत नाही. परंतु मी जाणू इच्छितो की कृष्णांचा चिन्मय विग्रह, त्यांचे धाम आणि त्यांची लीला कधी, कुठे आणि कशा प्रकारे प्रकाशित होते.

बाबाजी–सर्वशक्तिमान श्रीकृष्णांसाठी साऱ्या असंभव गोष्टी पण संभव आहेत–यात आश्चर्याची बाब नाही आहे. ते सर्वतन्त्र-स्वतन्त्र, स्वेच्छामय, लीलामय आणि सर्वशक्तिमान पुरुष आहेत. इच्छा झाल्यास ते आपल्या चिन्मय धामासोबत आपला स्वप्रकाश चिन्मय विग्रह या प्रपंचात प्रकाश करू शकतात–यात शंकाच काय आहे?

ब्रजनाथ–इच्छा केल्याने ते सर्व काही करू शकतात, आपल्या चिन्मय विग्रहास या प्रपंचात प्रकट करू शकतात–हे ठीक आहे. परंतु शंका तर ही आहे की संसारी लोक त्या स्वप्रकाश चिन्मय धामास जड विश्वाचा एक खण्ड भाग आणि ब्रजलीलेच्या साधारण मायिक व्यवहारासमान पाहतात–याचे काय कारण आहे? जर कृष्णाने कृपा करून स्वतःला जगात प्रकाशित केलेच आहे, मग संसारी लोक त्या स्वप्रकाश विग्रहास सच्चिदानंद रूपात दर्शन का नाही करत?

बाबाजी–कृष्णाच्या अनंत चित्-गुणांमध्ये 'भक्तवात्सल्य' एक गुण आहे. याच गुणाने द्रवित होऊन भगवान आपल्या ल्हादिनीशक्तीद्वारा भक्तांना एक प्रकारकी चिन्मयी शक्ती प्रदान करतात, ज्यामुळे भक्तजन स्वप्रकाश भगवत्-स्वरूपाचे आणि त्यांच्या संपूर्ण चिन्मयीलीलेचे साक्षात दर्शन करण्यास समर्थ होतात. परंतु अभक्तांचे नेत्र आणि कर्णादी इंद्रियसमूह मायिक असल्यामुळे हे लोक भगवंताच्या चिल्लीला आणि मानव इतिहासात काही फरक पाहू शकत नाहीत.

ब्रजनाथ–तर काय भगवान श्रीकृष्ण समस्त जिवांच्या प्रती कृपा करण्याकरिता अवतीर्ण होत नाही का?

बाबाजी–निःसंशय भगवंताचा अवतार संपूर्ण जगाच्या कल्याणाकरिता झाला आहे. त्या अवतार-लीलेला भक्तजन शुद्ध चिल्लीलेच्या रूपात दर्शन करतात. अभक्तजन त्यासच साधारण मानव चरित्रासारखे (जड-तत्त्वाच्या रूपात) दर्शन करतात, परंतु वस्तू-शक्तीच्या प्रभावाने त्यांच्यात एक प्रकारची निर्माण होते. ती सुकृती क्रमशः पुष्ट झाल्यावर कृष्णभक्तीच्या प्रती अनन्य श्रद्धा उत्पन्न करवते. म्हणून भगवत्-अवताराद्वारे अखिल विश्वाच्या जीवांचे उपकार होतात, कारण तेच श्रद्धाळू जीव अनन्य भक्तीचे साधन करत-करत एक दिवस भगवंताच्या चिन्मयस्वरूप आणि त्यांच्या चिल्लीलेस पाहाण्यास समर्थ होतात.

ब्रजनाथ–वेदांमध्ये कृष्णलीलेचा सर्वत्र स्पष्ट उल्लेख का नाही आहे?

बाबाजी–वेदांमध्ये यत्र-तत्र-सर्वत्रच श्रीकृष्णलीलेचे वर्णन आहे. हे वर्णन कुठे-कुठे मुख्यवृत्तीचे अवलंबन करून केले गेले आहे, तर कुठे-कुठे गौणवृत्तीचे अवलंबन करून. शब्दांची दोन प्रकारकी वृत्ती (शक्ती) आहे, ज्यांच्या शब्दांत अर्थ निर्णय होतो आहे–अभिधावृत्ती आणि लक्षणावृत्ती. यांना मुख्यवृत्ती आणि गौणवृत्ती पण म्हणतात. अभिधावृत्तीचे अवलंबन करून 'श्यामाच्छबलं प्रपद्ये' इत्यादी मंत्रामध्ये आणि छान्दोग्योपनिषदाच्या अंतिम भागात रसाची नित्यता आणि मुक्त जिवांच्या आपापल्या रसाच्या अनुसार कृष्ण सेवेचे वर्णन केले गेले आहे. शब्दांची लक्षणावृत्तीच गौणवृत्ती आहे. याज्ञवल्क्य, गार्गी आणि मैत्रेयी-संवादात प्रारंभात लक्षणावृत्ती द्वारा कृष्णलीलेचे वर्णन आहे आणि शेवटी मुख्यवृत्तीद्वारा अर्थात अभिधावृत्तीद्वारा कृष्णाची श्रेष्ठता स्थापित केली गेली आहे. वेदांमध्ये कुठेकुठे अन्वय पद्धतीद्वारा भगवंताच्या नित्य लीलेला लक्ष्य केले गेले आहे आणि अनेक स्थानांवर

व्यतिरेक पद्धतीचे अवलंबन करून ब्रह्म आणि परमात्माच्या महिमेचे वर्णन केले गेले आहे. वस्तुतः श्रीकृष्णाचे वर्णन करणेच वेदांची प्रतिज्ञा आहे.

ब्रजनाथ–बाबाजी महाशय! भगवानच परमतत्त्व आहे–यात शंका नाही; परंतु ब्रह्मा, शिव, इन्द्र, सूर्य, गणेश आदी देवतांची वास्तविक स्थिती काय आहे?–सांगण्याची कृपा करा. काही ब्राह्मण लोक महादेवासच सर्वश्रेष्ठ ब्रह्मतत्त्व मानून त्यांची उपासना करतात. आम्ही अशयाच ब्राह्मण कुलात जन्म घेतला आहे, जन्मापासून आतापर्यंत अशाच गोष्टी सांगत आणि ऐकत आलो आहे. मी याचे यथार्थ तत्त्व जाणू इच्छितो.

बाबाजी–साधारण जीव, उपास्य देव-देवी आणि भगवंताच्या गुणांना मी तुम्हाला वेगवेगळे करून सांगू इच्छितो. या गुणांच्या तारतम्यानुसार तुम्ही सहजच सर्वश्रेष्ठ उपास्य-तत्त्वास जाणू शकता–

**अयं नेता सुरम्याङ्गः सर्वसल्लक्षणान्वितः।**
**रुचिरस्तेजसा युक्तो बलीयान् वयसाऽन्वितः॥**
**विविधाद्भुतभाषावित् सत्यवाक्यः प्रियंवदः।**
**वावदूकः सुपाण्डित्यो बुद्धिमान् प्रतिभाऽन्वितः॥**

**विदग्धश्चतुरो दक्षः कृतज्ञः सुदृढव्रतः।**
**देशकालसुपात्रज्ञः शास्त्रचक्षुः शुचिर्वशी॥**
**स्थिरोदान्तः क्षमाशीलो गम्भीरो धृतिमान् समः।**
**वदान्यो धार्म्मिकः शूरः करुणो मान्यमानकृत्॥**

**दक्षिणो विनयी ह्रीमान् शरणागतपालकः।**
**सुखी भक्तसुहृत् प्रेमवश्यः सर्वशुभङ्करः॥**
**प्रतापी कीर्तिमान् रक्तलोकः साधुसमाश्रयः।**
**नारीगणमनोहारी सर्वाराध्यः समृद्धिमान्॥**

**वरीयानीश्वरश्चेति गुणास्तस्यानुकीर्तिताः।**
**समुद्रा इव पञ्चाशद् दुर्विगाहा हरेरमी॥**

**जीवेष्वेते वसन्तोऽपि बिन्दुबिन्दुतया क्वचित्।**
**परिपूर्णतया भान्ति तत्रैव पुरुषोत्तमे॥**

**अथ पञ्च गुणा ये स्युरंशेन गिरिशादिषु॥**

**सदास्वरूपसम्प्राप्तः सर्वज्ञो नित्यनूतनः।**
**सच्चिदानन्दसान्द्राङ्गः सर्वसिद्धिनिषेवितः॥**(२२)

**अथोच्यन्ते गुणाः पञ्च ये लक्ष्मीशादिवर्तिनः।**
**अविचिन्त्यमहाशक्तिः कोटिब्रह्माण्डविग्रहः॥**

**अवतारावलीबीजं हतारिगतिदायकः।**
**आत्मारामगणाकर्षीत्यमी कृष्णेत किलाद्भुताः॥**(२३)

---

(२२) नायक स्वरूप श्रीकृष्णांचे गुण असे आहेत–(१) अत्यंत मनोहर अंग, (२) सर्व सुलक्षणांनी युक्त, (३) सुंदर, (४) महातेजस्वी, (५) बलवान, (६) किशोर वयसयुक्त, (७) विविध प्रकारके अद्भुत भाषाविद्, (८) सत्यवाणी बोलणारे, (९) मृदुभाषी, (१०) वाक्पटू, (११) बुद्धिमान, (१२) सुपण्डित, (१३) प्रतिभाशाली, (१४) विदग्ध अर्थात रसिक, (१५) चतुर, (१६) निपुण, (१७) कृतज्ञ, (१८) सुदृढ-व्रत, (१९) देश-कालपात्राच्या संबधात सुविज्ञ, (२०) शास्त्रदृष्टीने युक्त, (२१) पवित्र, (२२) जितेन्द्रिय, (२३) स्थिर, (२४) संयमी (२५) क्षमाशील, (२६) गंभीर, (२७) धीर, (२८) सम, (२९) वदान्य अर्थात उदार, (३०) धार्मिक, (३१) शूर, (३२) करुण, (३३) मानद् अर्थात दुसऱ्यांना मान देणारा, (३४) दक्षिण अर्थात अनुकूल, (३५) विनयी, (३६) लज्जायुक्त, (३७) शरणागत पालक, (३८) सुखी, (३९) भक्तसुहृद, (४०) प्रेमाच्या अधीन, (४१) मंगलकारी, (४२) प्रतापी, (४३) किर्त्तिशाली, (४४) सर्वांचे प्रिय, (४५) सज्जनांची बाजू घेणारे, (४६) नारी-मनोहारी, (४७) सर्वांचे आराध्य, (४८) ऐश्वर्यशाली, (४९) श्रेष्ठ, (५०) ईश्वर. हे ५० गुण भगवान श्रीकृष्णात समुद्राप्रमाणे अगाध आणि असीम रूपात वर्तमान आहेत. हे उपरोक्त ५० गुण जीवांत बिंदू बिंदू रूपात वर्त्तमान आहेत, परंतु पुरुषोत्तम भगवंतात पूर्णमात्रेत आहेत. श्रीकृष्णांचे अन्य ५ गुण जे ब्रह्मा, शिवादी देवतांमध्ये वर्तमान आहेत, ते हे आहेत–(१) सदा स्वरूपात स्थिती, (२) सर्वज्ञ, (३) नित्य-नवीन, (४) सच्चिदानन्द-घनीभूत-स्वरूप, (५) सर्वसिद्धींद्वारे सेवित. उपरोक्त ५०+५=५५ गुण देवतांमधे आंशिक प्रमाणात वर्त्तमान आहेत.

(२३) लक्ष्मीपती नारायणात उपरोक्त ५५ गुणांच्या शिवाय अधिक ५ गुण पण असतात–(१) अचिंत्य महाशक्तिशाली, (२) कोटी ब्रह्माण्ड-विग्रहत्व, (३) समस्त अवतारांचे मूळ बीज अथवा कारण, (४) आपल्या हातांनी मारल्या जाणाऱ्यांसाठी गतिदायक, (५) आत्माराम जीवांसाठीपण आकर्षक. हे पाच गुण ब्रह्मा, शिव आदींमध्ये नसतात, परंतु श्रीकृष्णात अत्यंत अद्भुत भावात पूर्ण रूपात अस्तित्वात आहेत.

**सर्वाद्भुतचमत्कारलीलाकल्लोलवारिधिः।**
**अतुल्यमधुरप्रेममण्डितप्रियमण्डलः॥**

**त्रिजगन्मानसाकर्षीमुरलीकलकूजितैः।**
**असमानोर्द्धरूपश्रीः विस्मापितचराचरः॥**[२४]

**लीलाप्रेम्णा प्रियाधिक्यं माधुर्य्यं वेणुरूपयोः।**
**इत्यसाधारणं प्रोक्तं गोविन्दस्य चतुष्टयम्॥**[२५]

(भ. र. सि. २/१/२३-३०, ३७-४३)

हे ६४ गुण सच्चिदानन्द श्रीकृष्णात पूर्णमात्रेत शुद्ध चित्-भावात नित्य प्रकाशित आहेत. शेषोक्त चार गुण श्रीकृष्णस्वरूपास सोडून त्यांच्या कोणत्याही इतर विलास-मूर्तींमध्ये पण नसतात. या चार गुणांना सोडून उरलेले ६० गुण पूर्णमात्रेत आणि पूर्णचित् रूपात चित्-घनविग्रहयुक्त नारायणात शोभा प्राप्त करतात. शेषोक्त नऊ गुणांना सोडून बाकी ५५ गुण आंशिक रूपात ब्रह्मा आणि शिव आदी देवतांमध्ये आढळतात. पहिले ५० गुण समस्त जीवांत बिन्दुरूपात असतात. शिव, ब्रह्मा, सूर्य, गणेश आणि इन्द्र–हे देवतागण भगवंताच्या आंशिक गुणांनी युक्त असतात आणि संसाररूप व्यापाराला चालवण्याकरिता अधिकारप्राप्त भगवत्-विभूतिरूप एक प्रकारचा अवतार विशेष आहेत. ह्या सर्व देवता स्वरूपतः भगवंतांचे दास आहेत. त्यांच्या कृपेने अनेकांनी भगवद्भक्ती प्राप्त केली आहे. जिवांच्या अधिकारभेदाने या देवता पण जिवांच्या उपास्य-कोटीत येतात. भगवद्भक्तीच्या अंगस्वरूप यांची पूजा करणे विधीच्या अंतर्गत आहे. त्यांनी कृपा करून अनन्य कृष्णभक्ती दान केल्यावर ते जिवांच्या गुरुरूपात नित्य पूजित होतात. देव-देव महादेव भगवद्भक्तीत इतके पूर्ण

---

(२४) उपरोक्त ५०+५+५ गुणांच्या अतिरिक्त श्रीकृष्णात अजून ४ गुण अधिक आहेत. हे ४ गुण आहेत–(१) सर्वाधिक चमत्कारपूर्ण लीलारूप तरंगांचा अगाध समुद्र, (२) अतुलनीय मधुरप्रेमाद्वारा सुशोभित आणि आपल्या प्रियपात्रांचे मंगलस्वरूप, (३) तिन्ही लोकांना आकर्षित करणारी मुरलीची तान, (४) चराचर विश्वाला चकित आणि मुग्ध करणारी अतुलनीय रूप-श्री.

(२५) (१) लीलामाधुरी, (२) प्रेममाधुरी, (३) रूपमाधुरी, आणि (४) वेणुमाधुरी–हे श्रीकृष्णाचे असाधारण गुण आहेत. या चार गुणांना घेऊन श्रीकृष्णाचे ६४ गुण आणि लक्षण सांगितले गेले आहेत.

आहेत की ते भगवत्-तत्त्वापासून अभेद असल्यासारखे प्रतीत होतात. हेच कारण आहे की मायावादी महादेवास चरम ब्रह्मतत्त्व मानून त्यांची आराधना करतात.

**॥ तेरावा अध्याय समाप्त ॥**



# चौदावा अध्याय (प्रमेयांतर्गत शक्ती विचार)

ब्रजनाथ वृद्ध बाबाजींच्या काल रात्रीच्या विचारांनी खूपच प्रभावित झाले आहेत. आज दिवसभर त्याच सर्व विचारांवर गंभीर चिंतन करून मोठ्या आनंदाचा अनुभव करीत आहेत. अधूनमधून मनोमन म्हणत आहेत–अहा! श्रीगौरांगदेवांचे उपदेश किती अपूर्व आहेत. ऐकल्यानेच जणू हृदयात अमृताचा समुद्र लहरू लागला. जितके ऐकत जातो आहे, ऐकण्याची तहान तितकीच वाढते आहे. बाबाजी महाराजांच्या मुखाने जणू तत्त्वांचे अमृत बरसते, ज्यास ऐकून मनाची तृप्ती होत नाही. सिद्धांत काय असतात–अगदी मोजून मापून तयार झालेले असतात, त्यांचा कुठलाच अंश असंगत नसतो. वाटते, त्या सिद्धांतांच्या मागे-मागे समस्त शास्त्र धावत आहेत, त्यांचे एकेका अक्षराचे प्रतिपादन करण्याकरिता. समजत नाही, शेवटी ब्राह्मण समाज यांची निंदा तरी का करतो? असे वाटते, मायावादाप्रती पक्षपातित्वच ब्राह्मण मंडळी असैद्धांतिक होण्याचे कारण आहे.

असा विचार करता करता ते रघुनाथदास बाबाजींच्या कुटीत पोहोचले. त्यांनी आधी कुटीस आणि नंतर बाबाजी महाशयांस वंदन करून दंडवत-प्रणाम केला. बाबाजींनी त्यांना मोठ्या प्रेमाने आलिंगन देऊन आपल्या निकटच बसविले.

ब्रजनाथांनी बसता बसता उत्कंठित होऊन म्हटले–प्रभो! काल आपणांस मी श्रीदशमूलाचा तृतीय मूल श्लोक ऐकविण्यास सांगितले होते. तो ऐकण्यासाठी माझी खूप इच्छा होत आहे. कृपा करून तो मला ऐकवा.

ब्रजनाथाचे म्हणणे ऐकून बाबाजी खूप आनंदित झाले आणि पुलकित होऊन म्हणाले–

**पराख्यायाः शक्तेरपृथगपि स स्वे महिमनि**
**स्थितो जीवाख्यां स्वामचिदभिहितां तां त्रिपदिकाम्।**
**स्वतन्त्रेच्छः शक्तिं सकलविषये प्रेरणपरो**
**विकाराद्यैः शून्यः परम-पुरुषोऽयं विजयते॥**

(दशमूल ३)

अर्थात, आपल्या अचिंत्य पराशक्तीपासून अभिन्न असूनही भगवान स्वतन्त्र इच्छामय आहेत, ते परम पुरुष स्व-महिम-स्वरूपात नित्य स्थित असतात. चित्-शक्ती, जीवशक्ती आणि मायाशक्ती रूप तीन पदांनी युक्त आपल्या पराशक्तीस उपयुक्त विषयांच्या व्यापारात सर्वदा प्रेरणा देत असतात. असे करताना देखील स्वयं निर्विकार राहून ते परम तत्त्वरूप भगवंत आपल्या पूर्ण-स्वरूपात नित्य विराजमान असतात.

ब्रजनाथ–ब्राह्मण मंडळींचे असे म्हणणे आहे की–परमतत्त्व ब्रह्मावस्थेत लुप्तशक्ती आहे आणि ईश्वरावस्थेत तीच व्यक्तशक्ती आहे. मी याविषयी वेदांताचा सिद्धांत ऐकू इच्छितो.

बाबाजी–समस्त अवस्थांमध्येच परमतत्त्वाच्या शक्तीचा परिचय प्राप्त होत असतो. वेद म्हणतात-

**न तस्य कार्यं करणञ्च विद्यते न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते।**
**परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च॥** (१)

(श्वे. उ. ६/८)

चित्-शक्तीच्या संबंधी–

**ते ध्यानयोगानुगता अपश्यन् देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम्।**
**यः कारणानि निखिलानि तानि कालात्मयुक्तान्यधितिष्ठत्येकः॥** (२)

---

(१) त्या परब्रह्म परमात्म्याची कुठलीही क्रिया प्राकृत नसते, कारण त्यांचे कुठलेही कर्ण-हस्तपादादी इंद्रिये प्राकृत नसतात. प्राकृत इंद्रियांशिवायही त्यांच्या अप्राकृत लीलांचे कार्य होत असते. ते अप्राकृत शरीराने एकाच वेळेस सर्व ठिकाणी विराजमान राहतात. म्हणूनच त्यांच्यापेक्षा मोठा तर लांबच, पण त्यांच्या समानही कुणी दुसरा दिसत नाही. त्या परमेश्वराची अलौकिकी शक्ती नाना प्रकारची असते, ज्यात ज्ञानशक्ती, बलशक्ती आणि क्रियाशक्ती–या तीन प्रधान शक्ती आहेत. या तिन्हींस क्रमशः चित्-शक्ती वा संवित्-शक्ती, सत्-शक्ती अथवा सन्धिनीशक्ती आणि आनंदशक्ती किंवा ल्हादिनीशक्ती म्हटले जाते.

(२) तत्त्वज्ञ ऋषींनी समाधीयोगात स्थित होऊन परब्रह्माच्या गुणांनी विभावित होऊन आपल्या गुणांद्वारे त्या भगवंताची अत्यंत रहस्यपूर्ण दिव्य आणि स्वकीय (स्वरूपभूत) शक्तींचा साक्षात्कार

जीवशक्तीसंबंधी–

**अजामेकां लोहितशुक्लकृष्णां वह्वीः प्रजाः सृजमानां स्वरूपाः।**
**अजो ह्येको जुषमाणोऽनुशेते जहात्येनां भुक्तभोगामजोऽन्यः॥**[३]

(श्वे. उ. ४/५)

मायाशक्तीच्या संबंधी–

**छन्दांसि यज्ञाः क्रतवो व्रतानि**
**भूतं भव्यं यच्च वेदा वदन्ति।**
**अस्मान्मायी सृजते विश्वमेतत्**
**तस्मिंश्चान्यो मायया सन्निरुद्धः॥**[४]

(श्वे. उ. ४/९)

**'परास्य शक्ति'**–या वेद-मंत्रात परमतत्त्वाच्या श्रेष्ठतम अवस्थेतही एका पराशक्तीस स्वीकार केले गेले आहे. वेदात कुठे ही परमतत्त्वाच्या निःशक्तिक अवस्थेचे वर्णन सापडत नाही. त्या परमतत्त्वाच्या सविशेष आविर्भावाचे नाव 'भगवान' आणि निर्विशेष आविर्भावाचे नाव 'ब्रह्म' आहे. या निर्विशेष गुणास (ब्रह्म)

---

केला आहे; जो निखिल-कारणसमुहाचा आणि जीव, प्रकृती, काल आणि कर्मांचा एकमात्र अधिष्ठाता वा नियामक आहे.

(३) लाल, पांढऱ्या आणि काळ्या रंगाची अर्थात रज, सत्त्व आणि तम या तीनही गुणांनी युक्त बऱ्याचशा भूत-समुदायास प्रकाशित करणारी 'स्वरूपा' अर्थात भगवंतांच्या समान एका अजेचे (अजन्मा, अनादी प्रकृतीचे) एका श्रेणीचे अज (अज्ञानी जीव) भजन करतात. परंतु दुसऱ्या प्रकारचे अज (ज्ञानी) पुरुष त्या भोगलेल्या प्रकृतीचा संपूर्णपणे त्याग करतात.

(४) जे सर्व वेदांचे उपदेश आहेत, तूप आदीद्वारे होणारे याग, यज्ञ, क्रतू अर्थात ज्योतिष्टोम आदी विशेष यज्ञ आहेत, नाना प्रकारची व्रते तथा आणखीही जे काही भूत, भविष्य आणि वर्तमान पदार्थ अर्थात संपूर्ण विश्व आहे, ज्यांचे वेदांमध्ये वर्णन प्राप्त होते, हे सर्व माया-प्रकृतीच्या अधीश्वर परमात्म्याने रचले आहे, अशा प्रकारे रचलेल्या या जगामध्ये अज जीव-समुदाय परमात्म्याच्या मायेद्वारे बांधलेला आहे.

देखील पराशक्तीच प्रकाशित करते. म्हणून निर्गुण निर्विशेष ब्रह्मातही शक्तीचा परिचय होतो. या परास्यशक्तीस वेद आणि उपनिषदांमध्ये कुठे चिच्छक्ती आणि कुठेकुठे अंतरंगशक्ती म्हटले आहे. लुप्तशक्ती-ब्रह्म वास्तविक कुठली वस्तू नाही– मायावादींचे एक काल्पनिक तत्त्व आहे. निर्विशेष ब्रह्म वस्तुतः मायावादाच्या पलीकडले आहे. वेदांमध्ये सविशेष ब्रह्माच्या संबंधी अशा प्रकारे वर्णन आले आहे–

**य एकोऽवर्णो बहुधा शक्तियोगाद्**
**वर्णाननेकान् निहितार्थो दधाति ॥**(५)

(श्वे. उ. ४/१)

**य एको जालवानीशत ईशनीभिः**
**सर्वांल्लोकानीशत ईशनीभिः ॥**(६)

(श्वे. उ. ३/१)

आता पहा, परमतत्त्वाची शक्ती कधीही लुप्त होत नाही. परमतत्त्व सर्वदा स्वप्रकाश तत्त्व आहे. त्या स्वप्रकाश तत्त्वाच्या तीन प्रकारच्या शक्तींचे वर्णन या वेदमंत्रांमध्ये प्राप्त होते–

**स विश्वकृद् विश्वविदात्मयोनिर्ज्ञः**
**कालकालो गुणी सर्वविद् यः ।**
**प्रधानक्षेत्रज्ञपतिर्गुणेशः**
**संसारमोक्षस्थितिबन्धहेतुः ॥**(७)

(श्वे. उ. ६ /१६)

---

(५) जे एक वर्ण (रंग)असूनही आपल्या विविध शक्तींच्या प्रभावाने अनेक भावांस (रंगांस) धारण करतात आणि ज्यात अनेक वर्ण अर्थात विविध प्रकारच्या शक्ती अथवा संपूर्ण विश्व निहीत आहे. (ते संपूर्ण विश्वाचे सृष्टिकर्ता आहेत.)

(६) जे एका अद्वितीय जगतरूप जालाचे ईश्वर आहेत; अर्थात मायापती आहेत, ते आपल्या अशा शक्तीद्वारे संपूर्ण जगास नियमित करतात.

या मंत्रामध्ये पराशक्तीच्या तीन पदांस विदित केले आहे. 'प्रधान' शब्दाने मायाशक्तीस, 'क्षेत्रज्ञ' शब्दाने जीवशक्तीस आणि 'क्षेत्रज्ञपति' शब्दाने चित्-शक्तीस लक्ष्य बनविलेले आहे. मायावादात ज्या ब्रह्म–अवस्थेस लुप्त शक्तीचा आणि ईश्वरवस्थेस व्यक्ती शक्तीचा प्रकाश म्हटले आहे, तो एक काल्पनिक मतवाद मात्र आहे. वास्तविक भगवान सर्वदा सर्वशक्तिमान आहेत. त्यांच्या सर्व अवस्थांमध्ये त्यांच्या शक्तीचा परिचय प्राप्त होत असतो.

ते नित्यकाल आपल्या स्वरूपात स्थित राहतात, तथा ते त्या स्वरूपात समस्त शक्तींनी युक्त होऊनही स्वयंस्वेच्छामय परमपुरुष आहेत.

ब्रजनाथ–जर ते शक्तीयुक्त आहेत तर शक्तीद्वारे परिचालित होऊनच ते कार्य करतात. मग त्यांची स्वतन्त्रता आणि स्वेच्छामयता राहिलीच कुठे?

बाबाजी–"**शक्ति शक्तिमतोरभेदः** "–वेदान्ताच्या या सूत्रात शक्ती आणि शक्तिमान पुरुषास परस्पर अभिन्न मानलेले आहे. कार्य–शक्तीचा परिचय आहे अर्थात शक्तीद्वारेच कुठलेही कार्य संपन्न होते. परंतु कार्य करण्याची इच्छा शक्तिमानाचा परिचय आहे. जड-जगत–मायाशक्तीचे कार्य आहे; जीवसमूह–जीवशक्तीचे कार्य आहे आणि चित्-जगत–चित्-शक्तीचे कार्य आहे. चित्-शक्ती, जीवशक्ती आणि मायाशक्तीस त्यांच्या आपापल्या कार्यांमध्ये प्रवृत्त होण्याची प्रेरणा देऊनही भगवान स्वयं कार्यापासून निर्लिप्त आणि निर्विकार आहेत.

ब्रजनाथ–स्वेच्छेने कार्य करूनही ते स्वयं निर्विकार कसे राहू शकतात? कारण स्वेच्छामय होणे म्हणजेच विकार झाला.

बाबाजी–निर्विकार म्हणण्याचे तात्पर्य मायिक विचारांनी शून्य होणे आहे. माया–स्वरूपशक्तीची छाया आहे. मायेचे कार्य सत्य असूनही नित्य सत्य नसते. म्हणून परमतत्त्वात मायेचा विकार नसतो. त्यांच्यात इच्छा आणि विलासरूप जो विकार असतो, तो चिद्वैचित्र्य अर्थात चिन्मय प्रेमाचा विकास विशेष आहे. त्यास

(७) ते (परमात्मा) विश्वाचे रचयिता, सर्वज्ञ, आत्मयोनी अर्थात स्वयं आपल्या प्राकट्याचे हेतू, काळाचेही महाकाळ, संपूर्ण दिव्य गुणांनी संपन्न, सर्वांना जाणणारे; प्रधाना (माया) चे अधीश्वर, क्षेत्रज्ञपती, समस्त गुणांचे ईश्वर अर्थात गुणांच्याही पलीकडले किंवा त्यांचे नियंता तथा जन्म-मृत्यू रूप संसारात बांधणारे, स्थित ठेवणारे आणि त्यातून मुक्त करणारे आहेत.

कुठल्याही प्रकारची जडीय अपवित्रता आदी स्पर्श करू शकत नाहीत. तशी चिद्विचित्रता अद्वयज्ञानात (भगवंतात) असते. स्वेच्छापूर्वक मायिक शक्तीद्वारे जड-जगास उत्पन्न करूनही त्याची चित् स्वरूपता अखंड रूपात अस्तित्वात असते. चिद्वैचित्र्य (भगवंताची लीला आदी चित्-जगातील कुठलाही व्यापार अथवा कुठलेही कार्य) याच्याशी मायेचा काहीच संबंध नसतो. ज्यांची बुद्धी मायिक असते, ते जीव चिन्मय जगाच्या विचित्रतांस मायिक व्यापारासमान पाहतात. जसे कावीळ झालेल्या रोग्यास सर्व पदार्थ पिवळे दिसतात तथा ज्याप्रकारे मेघांद्वारे आच्छादित डोळे सूर्यास मेघाच्छन्न स्वरूपात पाहतात; त्याचप्रकारे मायिक बुद्धीचे लोक–जीव चिन्मय नाम. चिन्मय रूप, चिन्मय गुण तथा चिन्मयी लीलांस देखील मायिक रूपात पाहतात. तात्पर्य हे की, मायाशक्ती–चित् शक्तीची छाया आहे. म्हणून चित् कार्यांमध्येसुद्धा ज्या ज्या विचित्रता असतात, त्या सर्व मायेच्या कार्यातसुद्धा प्रतिफलित होतात. म्हणून मायाशक्तीमध्ये दाखविलेल्या विचित्रता चित् शक्तिगत विचित्रतांचे हेय (अशुद्ध) प्रतिफलन अर्थात छाया मात्र आहे. बाह्यदृष्टीने दोघांमध्ये समानता असूनही या दोन्ही विचित्रता एकमेकांच्या परस्पर विपरीत आहेत. जसे एका मोठ्या काचेच्या आरशात पडलेले माणसाचे प्रतिबिंब आणि त्याच्या कायेत (शरीरात) स्थूलदृष्टीने साम्य असूनही सूक्ष्म दृष्टीने दोन्ही परस्पर विपरीत आहेत. एक काया आहे–दुसरी तिची छाया आहे; कायेचे अंगप्रत्यंग छायेमध्ये उलटे दिसते अर्थात उजवा हात डावीकडे आणि डावा हात उजवीकडे, डावा डोळा उजवीकडे तथा उजवा डोळा डावीकडे दिसतो. त्याचप्रकारे चित् जगाच्या विचित्रता आणि मायिक जगाच्या विचित्रता स्थूलतः एकसमान दिसूनही सूक्ष्मदृष्टीने दोन्हीही परस्पर विपरीत आहेत. मायिक विचित्रता–चित् विचित्रतेचेच विकृत प्रतिफलन आहे. म्हणूनच दोघांच्याही वर्णनात यद्यपि साम्य असले तरी वस्तुगत पार्थक्य (भिन्नता) आहे; फरक आहे. मायिक विकाराने रहित ते स्वेच्छामय पुरुष मायेचे अध्यक्ष-स्वरूप होऊन मायेद्वारे आपले कार्य करवितात.

ब्रजनाथ–श्रीमती राधिका श्रीकृष्णाची कोणती शक्ती आहे?

बाबाजी–श्रीकृष्ण जसे पूर्ण शक्तिमान तत्त्व आहेत, श्रीमती राधिकादेखील तशीच त्यांची पूर्ण शक्ती आहे. श्रीमती राधिकेस पूर्ण स्वरूपशक्तीसुद्धा म्हटले जाऊ शकते. जसे कस्तूरी आणि तिचा सुगंध परस्पर अभिन्न आहेत, ज्याप्रमाणे अग्नी आणि त्याची दाहिका-शक्ती परस्पर अभिन्न आहेत, त्याचप्रकारे श्रीमती राधिका

आणि कृष्णही लीलारस आस्वादनस्थळी नित्य भिन्न असूनही सर्वदा अभिन्न आहेत. त्या स्वरूपशक्ती (श्रीमती राधिके) च्या तीन प्रकारच्या क्रियाशक्ती आहेत–चित् शक्ती, जीवशक्ती आणि मायाशक्ती. चित्-शक्तीचे दुसरे नाव 'अन्तरङ्गाशक्ती'; जीवशक्तीचे दुसरे नाव 'तटस्थाशक्ती 'आणि मायाशक्तीचे दुसरे नाव 'बहिरंगाशक्ती' आहे. स्वरूपशक्ती एक असूनही उक्त तीन रूपांमध्ये कार्यरत असते. स्वरूपशक्तीची जी नित्य लक्षणे आहेत, ती चित् शक्तीमध्ये पूर्ण रूपात, जीवशक्तीत अणुरूपात आणि मायाशक्तीत विकृत रूपात प्रकाशित असतात. या उपरोक्त तीन प्रकारच्या क्रिया शक्तींच्या अतिरिक्त स्वरूपशक्तीच्या आणखीही तीन प्रकारच्या वृत्ती आहेत. त्यांची नावे आहेत–ल्हादिनी, सन्धिनी आणि सम्वित, दशमूलात यांचे अशाप्रकारे वर्णन आहे–

**स वै ह्लादिन्यायाः प्रणयविकृतेर्ह्लादनरत-**
**स्तथा सम्विच्छक्तिप्रकटितरहोभावरसितः।**
**तया श्रीसन्धिन्या कृतविशद तद्धामनिचये**
**रसाम्भोधौ मग्नो व्रजरसविलासी विजयते॥**

(दशमूल ४)

अर्थात, स्वरूपशक्तीच्या तीन प्रकारच्या वृत्ती आहेत–ल्हादिनी, सन्धिनी आणि सम्वित्. ल्हादिनीच्या प्रणयविकारात कृष्ण सदा अनुरक्त राहतात, सम्वित् शक्तीद्वारे प्रकटित अंतरंग भावांद्वारे ते सर्वदा रसिक स्वभाव आहेत तथा सन्धिनीशक्तीद्वारे प्रकटित निर्मल वृन्दावन आणि आदी धामांमध्ये स्वेच्छामय व्रजरस विलासी कृष्ण नित्य-रससमुद्रात निमग्न राहतात.

तात्पर्य हे आहे की, स्वरूपशक्तीच्या ल्हादिनी, सन्धिनी आणि सम्वित्–या तिन्ही वृत्तींचा प्रभाव चित्-शक्ती, जीवशक्ती आणि मायाशक्तीच्या प्रत्येक कार्यात ओतप्रोत असतो. स्वरूपशक्तीची ल्हादिनी वृत्ती वृषभानुनन्दिनी श्रीमती राधिकेच्या रूपात कृष्णास संपूर्ण चिदाल्हाद अर्थात चिन्मय आनंद प्रदान करते. त्या महाभाव स्वरूपा (संपूर्ण भावांच्या समष्टी रूपा) श्रीमती राधिका स्वयं श्रीकृष्णास सर्व प्रकारे आनंद प्रदान तर करतातच, परंतु आपल्या कायव्यूह स्वरूप आठ प्रकारच्या भावांस अष्ट सखी आणि चार प्रकारच्या सेवाभावांस प्रियसखी, नर्मसखी, प्राणसखी आणि परमप्रेष्ठसखी–या चार श्रेणींच्या सखींच्या रूपात नित्य प्रकटित ठेवतात. या समस्त

सख्या चित्-जगत रूप ब्रजच्या नित्य-सिद्ध सख्या आहेत. स्वरूपशक्तीची सम्वित्-वृत्ती ब्रजच्या समस्त प्रकारच्या संबंध भावांचा प्रकाश करते. सन्धिनी व्रजातले पृथ्वी आणि जल आदींनी युक्त ग्राम, वन, उपवन, गिरिगोवर्धन आदी विलासपीठ तथा श्रीराधिका, श्रीकृष्ण, सखी, सखा, गोधन आणि दास दासींचे चिन्मय कलेवर (देह) आणि विलासाच्या समस्त प्रकारच्या चिन्मय उपकरणांस प्रकाशित करते. श्रीकृष्ण ल्हादिनीच्या प्रणय-विकाररूप परमानंदात सर्वदा विभोर असतात, तथा सम्वित्-वृत्तीद्वारे प्रकटित भिन्न-भिन्न भावांनी युक्त होऊन प्रणय रसाचे आस्वादन करतात. वंशी वाजवून त्यायोगे गोपींचे आकर्षण, गोचारण आणि रास आदिलीला–या सर्व क्रिया कृष्ण आपल्या पराशक्तीच्या सम्वित् वृत्तीद्वारे संपादित करतात. सन्धिनीद्वारे प्रकटित धामात व्रजविलासी श्रीकृष्ण सर्वदा रसनिमग्न राहतात. कृष्णाच्या लीलाधामांमध्ये व्रजलीला धामच सर्वोत्तम आहे.

ब्रजनाथ–आपण आत्ताच सांगितले की, सन्धिनी, सम्वित् आणि ल्हादिनी या तिन्ही स्वरूपशक्तीच्या वृत्ती आहेत. तथा स्वरूपशक्तीच्या एका अणू अंशास जीवशक्ती आणि तिच्या छाया अंशास मायाशक्ती म्हणतात. आता कृपया याचा एक आभास द्या की या दोन्ही शक्तींवर उपरोक्त सन्धिनी, सम्वित आणि ल्हादिनी वृत्ती कशा प्रकारे कार्य करतात.

बाबाजी–जीवशक्ती स्वरूपशक्तीची अणुशक्ती आहे, या शक्तीमध्ये स्वरूपशक्तीच्या तीन वृत्ती अणू-अणू मात्रांमध्ये विद्यमान आहेत. अर्थात जिवामध्ये ल्हादिनी वृत्ती–ब्रह्मानंद रूपात, सम्वित् वृत्ती–ब्रह्मज्ञानाच्या रूपात, तथा सन्धिनी वृत्ती–अणू चैतन्य रूपात नित्य वर्तमान असतात. या विषयास जीवतत्त्व विचारात आणखीही स्पष्टपणे समजावून सांगेन. मायाशक्तीमध्ये ल्हादिनी वृत्ती जडानन्द रूपात, सम्वित् वृत्ती भौतिक ज्ञानाच्या रूपात तथा सन्धिनी शक्ती चौदा लोकांच्या संपूर्ण जड ब्रह्मांड तथा जिवांच्या जड शरीरांच्या रूपात प्रकाशित असतात.

ब्रजनाथ–जर शक्तीची समस्त कार्ये अशा प्रकारे चिंतनीय आहेत, तर त्यास अचिंत्य का म्हटले गेले आहे?

बाबाजी–या विषयांचे भिन्न भिन्न रूपात चिंतन तर केले जाऊ शकते, परंतु संबंधाच्या क्षेत्रात सर्व अचिंत्य आहे. या जड जगात परस्पर विरुद्ध धर्मसमूह एकमेकांस नष्ट करणारे असतात. श्रीकृष्णाची शक्ती अशी अचिंत्य प्रभावयुक्त असते

की ती चित् जगामध्ये संपूर्ण विरुद्ध धर्मांनाही अत्यंत अद्भुत आणि सुंदर रूपात एकाच वेळेस, एकत्रित प्रकाशित करते. श्रीकृष्ण रूपवान असूनही अरूप आहेत. सर्वव्यापक असूनही मूर्तिमान आहेत, निर्लेप असूनही सक्रिय आहेत, अज असूनही नन्दनन्दन आहेत, सर्वाराध्य असूनही गोपकुमार आहेत, सर्वज्ञ असूनही नर-भाव प्राप्त आहेत. अशाप्रकारे ते सविशेषही आहेत आणि निर्विशेषही आहेत; अचिंत्य आणि रसमय आहेत; असीम आणि ससीम आहेत, अत्यंत दूरस्थ आणि अत्यंत निकटस्थ आहेत. निर्विकार असूनही गोपिकांच्या मानाला (रागाला) घाबरणारे आहेत; कुठपर्यंत मोजमाप करावे, अशा प्रकारचे असंख्य परस्पर विरोधी धर्मसमूह श्रीकृष्णस्वरूपात, कृष्णधामात तथा कृष्णासंबंधी उपकरणांमध्ये नित्यकाल सुंदररूपात निर्विरोध रूपात एकत्रितपणे अवस्थित आहेत. हेच शक्तीचे अचिंत्यत्व आहे.

ब्रजनाथ–वेद हे स्वीकारते का?

बाबाजी–सर्वत्रच हे स्वीकृत आहे, श्वेताश्वतरोपनिषद् (३/१९) मध्ये म्हटलेले आहे–

**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स श्रृणोत्यकर्णः।**
**स वेत्ति वेद्यं न य तस्यास्ति वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं महान्तम्॥**(८)

ईशोपनिषदामध्येही (५ आणि ८ म.)–

**तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके।**
**तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः॥**(९)

---

(८) ते परमात्मा प्राकृत हातपायरहित असूनही अप्राकृत हातांनी समस्त वस्तूंस ग्रहण करतात तथा अप्राकृत पायांनी सर्वत्र गमन करतात, प्राकृत नेत्र आणि कानांनी रहित होऊनही अप्राकृत नेत्र आणि कानांनी सर्वकाही पाहतात आणि ऐकतात, ते जे काही जाणण्यायोग्य आहे ते सर्वकाही जाणतात, परंतु त्यांनी जाणून दिल्याशिवाय कुणीही त्यांना जाणू शकत नाही. ब्रह्मविद् व्यक्ती त्यांनाच आदिपुरुष अर्थात समस्त कारणांचे मूलकारणस्वरूप महान पुरुष म्हणतात.

(९) ते परमेश्वर चालतातही आणि चालतही नाहीत, ते दूरातिदूरही आहेत आणि अत्यंत समीपही आहेत, ते या समस्त विश्वाच्या अंतर्गत आहेत आणि बाहेर सर्वत्र परिपूर्ण आहेत. हेच चित्-

**स पर्य्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरं**
**शुद्धमपापविद्धम्। कविर्मनीषी परिभूः।**
**स्वयंभूर्याथातथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः।**[१०]

ब्रजनाथ–वेदांमध्ये स्वच्छंद शक्तीयुक्त सर्वतन्त्र-स्वतन्त्र भगवंताच्या संसारात अवतीर्ण होण्याचे काही उल्लेख आहेत का?

बाबाजी–हो, अनेक स्थानी याचे उल्लेख आहेत. तलवकार (केनोपनिषद) मध्ये उमा आणि महेन्द्र संवादात म्हटले गेले आहे की एकदा देवता आणि दानवांमध्ये भयंकर युद्ध झाले. दानवांची दणदणीत हार झाली. त्यांना रणांगणातून पळता भूई थोडी झाली. देवतागण विजयी झाले. हा विजय वस्तुतः भगवंताचाच होता. देवता तर केवळ निमित्तमात्र होत्या. परंतु देवता हे विसरल्याने त्यांना खूप गर्व झाला आणि आपल्या बल पौरुषाच्या वल्गना ते करू लागले. दरम्यान करुणावरुणालय परब्रह्म भगवंतांनी अत्यंत आश्चर्यकारकपणे तेथे अवतीर्ण होऊन त्यांच्या गर्वाचे कारण विचारले आणि क्रमशः त्यांना एक गवताचे पाते देऊन त्याचा ध्वंस करण्यास सांगितले. परंतु जेव्हा आपल्या सर्व शक्ती एकवटूनही त्या गवताच्या पात्यास अग्निदेवही जाळू शकले नाहीत, वायुदेवही उडवू शकले नाहीत, तेव्हा देवता विस्मित झाल्या. त्यांना भगवंतांचे अत्यंत सुंदर रूप आणि अद्भुत सामर्थ्य पाहून खूप आश्चर्य वाटले–

**तस्मै तृणं निदधावैतद्दहेति तदुप प्रेयाय।**
**सर्वजवेन तन्न शशाक दग्धुं स तत एव निववृते,**
**नैतदशकं विज्ञातुं यदेतद्यक्षमिति॥**

(के. उ. ३/६)

---

जगात समस्त विरुद्ध धर्मांचे युगपत् सामंजस्य आहे.

(१०) ते परमात्मा–सर्वव्यापी, शुद्ध, अप्राकृत सच्चिदानंद स्वरूप, अकाय अर्थात प्राकृत शरीराने रहित, छिद्ररहित, शिरांनी रहित, उपाधिरहित, कवी, सर्वज्ञ, स्वयंभू अर्थात स्वेच्छेने प्रकट होणारे तथा सर्वोपरि विद्यमान आणि सर्वनियंता आहेत. त्यांनी स्वयं अचिंत्यशक्तीद्वारे अन्यान्य नित्य पदार्थांस त्यांच्या विशेष गुणांसोबत वेगवेगळे ठेवलेले आहे.

अर्थात त्या यक्षाने (भगवंताने) अग्निदेवासमोर एक गवताचे पाते ठेवून म्हटले–"आपण या सुकलेल्या गवताच्या पात्यास जाळून टाका म्हणजे आपली शक्ती दिसेल", अग्निदेव त्या पात्याजवळ आले आणि त्यांनी आपल्या पूर्ण शक्तीनिशी प्रयत्न केले, पण ते सुकलेले पाते जाळू शकले नाहीत. तेव्हा लज्जित होऊन तेथून परतल्यावर देवतांना म्हटले, "मी तर योग्य रितीने जाणू शकलो नाही की हा यक्ष कोण आहे?"

वेदांचे गूढ तात्पर्य हे आहे की भगवान अचिंत्य सुंदर पुरुष आहेत तथा ते स्वेच्छेने अवतीर्ण होऊन जिवांसोबत लीला करतात.

ब्रजनाथ–भगवंतास रससमुद्र म्हटले गेले आहे; वेदांमध्ये असे वर्णन आहे काय?

बाबाजी–तैत्तिरीय उपनिषद (२/७) मध्ये असे स्पष्ट वर्णन आढळते–

**यद्वैतत्सुकृतम्। रसो वै सः।**
**रसं ह्येवायं लब्ध्वानन्दी भवति। को ह्येवान्यात्कः प्राण्यात्।**
**यदेष आकाश आनन्दो न स्यात्। एष ह्येवानन्दयति।।**[११]

ब्रजनाथ–जर ते रसस्वरूप आहेत, तर बहिर्मुख लोक त्यांना का पाहू शकत नाहीत?

बाबाजी–मायाबद्ध जिवांची स्थिती दोन प्रकारची असते. पराक् स्थिती आणि प्रत्यक् स्थिती. पराक् स्थितीमध्ये अव्यवस्थित जीव कृष्णापासून विमुख असतात. म्हणून ते कृष्णाचे सौंदर्य पाहण्यास असमर्थ असतात. ते केवळ मायिक विषयांचे चिंतन आणि दर्शन करतात. प्रत्यक् स्थितीमध्ये अवस्थित जीव मायेपासून पराङ्मुख आणि कृष्णाप्रती उन्मुख असतात. म्हणून ते कृष्णाचे रसस्वरूप दर्शन करण्यास समर्थ असतात. कठोपनिषदात म्हटले आहे–

---

(११) (पूर्वमंत्रात) ज्यास सुकृत ब्रह्म म्हटले गेले आहे, ते परब्रह्म परमात्म्याच रसस्वरूप आहेत. जीव या रसस्वरूप परब्रह्मास प्राप्त करून आनंदित होतो. हृदयाकाशात आनंद-स्वरूप ब्रह्म नसते तर कोण जगू शकले असते? अर्थात जीवन धारण करण्यास कोण समर्थ झाले असते? परमात्माच जिवांना आनंद प्रदान करतात.

**पराञ्चि खानि व्यतृणत् स्वयंभूस्तस्मात् पराङ् पश्यति नान्तरात्मन्।**
**कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्त्वमिच्छन्॥**(१२)

ब्रजनाथ–**'रसो वै सः'** या वेद-मंत्रामध्ये ज्यास रसमूर्ती म्हटले गेले आहे. ते कोण आहे?

बाबाजी–गोपालतापनी (पूर्व भाग, १२-१३) मध्ये म्हटले आहे–

**गोपवेशं (अभ्राभं तरुणं कल्पद्रुमाश्रितम्)**
**सत्पुण्डरीकनयनं मेघाभं वैद्युताम्बरम्।**
**द्विभुजं मौनमुद्राढ्यं वनमालिनमीश्वरम्॥**(१३)

ब्रजनाथ–आता मी समजलो की, श्रीकृष्णस्वरूपच चित् जगाचे नित्य-सिद्धस्वरूप आहे. तेच सर्वशक्तिमान आहेत, स्वयं रसस्वरूप आहेत, तथा संपूर्ण रसाचे आश्रयस्थान आहेत. ब्रह्मज्ञान आदींद्वारे त्यांना प्राप्त करता येत नाही; अष्टांगयोगाद्वारे त्यांच्या आंशिक तत्त्व–परमात्म्यास प्राप्त होता येते. निर्विशेष ब्रह्म याच श्रीकृष्णाची केवळ अंगकाती आहे. नित्य चित्-सविशेषाने युक्त ते श्रीकृष्णच जगाचे परमाराध्य आहेत, परंतु त्यांना प्राप्त करण्याकरिता उपाय दिसत नाही, कारण ते चिंतनाच्याही पलीकडले आहेत. आणि चिंतनाच्या व्यतिरिक्त मनुष्याकडे अन्य उपाय तरी काय आहे? ब्राह्मण अथवा चांडाळ–कुणीही असो, त्याच्याकरिता

---

(१२) स्वयं प्रकट होणाऱ्या परमेश्वराने समस्त इंद्रियांस बाहेरच्या दिशेने जाणारे बनविले आहे, म्हणूनच जीव इंद्रियांद्वारे साधारणतः बाहेरच्या वस्तूंसच पाहतो, तो आपल्या हृदयात अवस्थित भगवंतांस पाहू शकत नाही. कुणीकुणी धीट व्यक्तीच कृष्णप्रेमरूप अमरत्व प्राप्त करण्याच्या इच्छेने नेत्रादी इंद्रियांस बाह्य विषयांतून हटवून प्रत्यक् आत्मा श्री भगवंतांस पाहू शकतात.

(१३) गोपालबालकाप्रमाणे त्यांचा वेष आहे, (नूतन जलधरासारखा (जलयुक्त मेघासारखा) श्याम (काळा) वर्ण आहे, किशोर अवस्था आहे तथा ते दिव्य कल्पवृक्षाखाली विराजमान आहेत) विकसित श्वेत कमळासमान नेत्र आहेत, त्यांच्या श्रीअंगांची कांती नवीन मेघासमान श्याम आहे, ते विद्युतसदृश तेजोमय पीतांबर धारण करतात, त्यांची द्विभुज मूर्ती आहे, ज्ञानाच्या मुद्रेत स्थित आहेत, गळ्यात पायांपर्यंत लांब वनमाला सुशोभित आहे, ते कृष्णच सर्वांचे ईश्वर आहेत.

चिंतनाशिवाय अन्य उपायच काय आहे? म्हणून त्यांची कृपा प्राप्त करणे अत्यंत कठीण आहे.

बाबाजी–कठोपनिषदात् (२/२/१३) म्हटले आहे–

**तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम्।**(१४)

ब्रजनाथ–त्यांना आत्मस्थ करून निरंतर पाहू शकल्याने शाश्वत शांती प्राप्त होऊ शकते; परंतु त्यांना कुठल्या उपायाने पहावे–हेच तर समजत नाही.

बाबाजी–कठोपनिषदात (१/२/१३) म्हटले आहे–

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्॥**(१५)

श्रीमद्भागवत (१०/१४ /२९) मध्ये देखील म्हणतात–

**अथापि ते देव पदाम्बुजद्वयप्रसादलेशानुग्रहीतएव हि।**
**जानाति तत्त्वं भगवन्महिम्नो न चान्य एकोऽपि चिरं विचिन्वन्॥**(१६)

बेटा! माझे प्रभू मोठे दयाळू आहेत. त्या समस्त आत्म्यांचेही आत्मा श्रीकृष्णास अनेक शास्त्र वाचून-ऐकून अथवा तर्क-वितर्कांद्वारे प्राप्त करता येऊ शकत नाही. तीक्ष्ण बुद्धीद्वारे अथवा अनेक गुरू केल्यानेही ते प्राप्त होऊ शकतील–असेही

(१४) जी बुद्धिमान व्यक्ती परमात्म्यास आत्मस्थ अर्थात आपल्या आत दर्शन करते, तीच नित्य आणि शाश्वत शांतीस प्राप्त करू शकते–दुसरे कुणीही नाही.

(१५) हे परब्रह्म परमात्मा प्रवचनाने नाही, बुद्धीने नाही आणि अनेक शास्त्रांच्या अध्ययनानेही प्राप्त होऊ शकत नाहीत, परंतु ज्यास ते स्वयं कृपा करून स्वीकारतात, त्यांच्याजवळच आपले स्वरूप विशेष रूपाने प्रकट करतात.

(१६) हे देवा! जी व्यक्ती आपल्या युगुल चरणकमलांचा थोडादेखील कृपाप्रसाद प्राप्त करते, त्याने ती अनुगृहीत होते–तीच आपल्या सच्चिदानंदमयी महिमेचे तत्त्व जाणू शकते. दुसरा कोणीही ज्ञान-वैराग्य आदी आपल्या साधनांद्वारे कितीही काळपर्यंत सुद्धा संशोधन करीत राहिला तरीही, तो आपल्या मोठेपणाचे यथार्थ तत्त्व जाणू शकत नाही.

नाही. ते तर त्यांनाच प्राप्त होतात आणि त्यांच्याचसमोर आपले सच्चिदानन्द-घन-स्वरूप प्रकाशित करतात, जे त्यांना (श्रीकृष्णास) 'माझा श्रीकृष्ण'–असे स्वीकारतात. या विचारांस तू अभिधेय तत्त्वाच्या विवेचनासमयी सहजच समजू शकशील.

ब्रजनाथ–वेदांमध्ये कुठे श्रीकृष्णाच्या धामांची नावे लिहिली आहेत का?

बाबाजी–अनेक स्थळी तसा उल्लेख आहे. कुठे 'परव्योम' कुठे 'ब्रह्मगोपालपुरी' आणि कुठे 'गोकुळ' आदी अनेक नावे वेदांमध्ये आढळतात. जसे श्वेताश्वतरोपनिषद् उपनिषदांत (४/८)–

**ऋचोऽक्षरे परमे व्योमन् यस्मिन् देवा अधिविश्वे निषेदुः।**
**यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत्तद्विदुस्त इमे समासते॥**(१७)

मुण्डकोपनिषदात (२ /२/ ७)–

**दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः।**(१८)

पुरुषबोधिनी श्रुतीत–

**गोकुलाख्ये माथुरमण्डले द्वेपार्श्वे चन्द्रावलि राधिका च।**(१९)

गोपालोपनिषदात–

---

(१७) ऋक् मंत्रांचे प्रतिपाद्य ज्या परव्योम-धामात विराजमान अक्षर ब्रह्मास आश्रय करून समस्त देवता स्थित आहेत, त्या परमपुरुषास जो मनुष्य जाणत नाही, तो वेदांद्वारे काय प्रयोजन सिद्ध करेल? अर्थात काहीच सिद्ध करू शकणार नाही. परंतु जो त्या परमात्म्यास तत्त्वाने जाणतो, तो कृतार्थ होऊन जातो.

(१८) ते परमात्मा परव्योमरूप दिव्य ब्रह्मपुरात नित्य विराजमान आहेत.

(१९) 'गोकुल ' नामक मथुरामंडलात भगवंताच्या एकीकडे श्रीमती राधिका आणि दुसरीकडे चन्द्रावली विराजमान आहेत.

**तासां मध्ये साक्षात् ब्रह्मगोपालपुरी हि।**[(२०)]

ब्रजनाथ–तांत्रिक ब्राह्मणगण शिवशक्तीस दुर्गा का म्हणतात?

बाबाजी–मायाशक्तीसच शिवशक्ती म्हटले जाते. या मायेचे तीन गुण आहेत–सत्त्व, रज आणि तम. सत्त्वगुण संपन्न ब्राह्मण सत्त्वगुणांची अधिष्ठात्री मायेची पूजा थोड्या अधिक शुद्ध स्वरूपात करतात. रजोगुणांनी युक्त ब्राह्मण रजोगुण विशिष्ट मायेची आराधना करतात आणि तमोगुणाचा आश्रय करणारे ब्राह्मण अंधःकार–तमोगुणाची अधिष्ठात्री मायेसच विद्या मानून पूजतात. वास्तविक भगवंताच्या पराशक्तीच्या छायारूप विकाराचे नावच 'मायाशक्ती आहे'–ती वेगळ्या स्वरूपात कुठली स्वतन्त्र शक्ती नाही. मायाच जिवांच्या बंधनाचे आणि मोक्षाचे कारण आहे. कृष्णापासून विमुख झाल्यावर माया जीवांस संसार बंधनात टाकून दण्ड देते आणि कृष्णाप्रती उन्मुख झाल्यावर तीच माया सत्त्वगुणाला प्रकाशित करून जीवाला कृष्णज्ञान प्रदान करून त्यांस संसारातून मुक्त करीत कृष्णप्रेमाचे उत्तराधिकारी बनविते. म्हणूनच मायिक गुणांनी बद्ध जीव मायेचे शुद्ध स्वरूप अर्थात भगवंताच्या स्वरूप शक्तीस पाहण्यास असमर्थ होऊन छायाशक्तीलाच (माया) आद्याशक्ती मानतात. माया-मोहित जीव कुठल्याशा सौभाग्यानेच सुकृतीच्या बळावर या उच्च सिद्धांतांस हृदयंगम करण्यास समर्थ असतात. अन्यथा मायेद्वारे मोहित होऊन कुसिद्धांतांच्या चक्रात सापडून यथार्थ ज्ञानाने वंचित राहतो.

ब्रजनाथ–गोकुळ उपासनेत दुर्गादेवीची पार्षदांमध्ये गणना केली आहे. ही गोकुळवाली दुर्गा कोण आहे?

बाबाजी–ही गोकुळाची दुर्गाच योगमाया आहे. चित्-शक्तीच्या विकाराच्या बीज रूपात त्यांची स्थिती आहे. म्हणूनच जेव्हा त्या चित् धामात वर्तमान असतात, तेव्हा त्या स्वतःला स्वरूपशक्तीपेक्षा अभिन्न मानतात.

त्या योगमायेचा विकारच जडमाया आहे. जडमायेत अवस्थित दुर्गा चित् जगात स्थित स्वरूपशक्तिगत दुर्गेची सेविका आहे; स्वरूपशक्तिगत दुर्गा कृष्णाची लीला-पोषणशक्ती आहे. त्याच योगमायेद्वारे प्रदान पारकीय भावास अवलंबन करून

---

(२०) अप्राकृत धामसमूहाच्या मधोमध साक्षात ब्रह्म-गोपालपुरी विराजमान आहे.

गोपी नित्यजगात श्रीकृष्णाच्या रस-विलासाची पुष्टी करतात. रासलीलेच्या–**'योगमायामुपाश्रितः'**[२१] (श्रीमद्भा. १०/२९/१) या वाक्याचे तात्पर्य हे आहे की, स्वरूपशक्तीद्वारे चिद्विलासात बरीचशी अशी कार्ये असतात, जी अज्ञानासमान प्रतीत होतात, परंतु वास्तविक ती कार्ये अज्ञान नसतात. महा रसाच्या पुष्टीकरिता योगमाया अज्ञानासमान प्रतीत होणाऱ्या कार्यांची सृष्टी करते. या विषयाचे विस्तृत विवेचन पुढे रसविचाराच्या प्रसंगांमध्ये केले जाईल.

ब्रजनाथ–धामतत्त्वासंबंधी एक गोष्ट जाणू इच्छितो–ती अशी की वैष्णवजन नवद्वीपास 'श्रीधाम' का म्हणतात?

बाबाजी–श्रीनवद्वीपधाम आणि श्रीवृन्दावनधाम–दोन्ही अभिन्नतत्त्वे आहेत; त्या नवद्वीपधामात मायापूर सर्वतोपरी तत्त्व आहे. ब्रजधामात जे स्थान गोकुळाचे आहे, तेच स्थान मायापुराचे आहे. मायापूर श्रीनवद्वीपधामाचे योगपीठ आहे. श्रीमद्भागवताच्या (७/९/३८) **"छन्नः कलौ"** श्लोकानुसार कलीचे पूर्ण अवतार जसे गुप्त आहेत, त्याच प्रमाणे त्यांचे धामदेखील गुप्त आहे. कलियुगात नवद्वीपसमान कोणतेही तीर्थ नाही. जी व्यक्ती या धामाची चिन्मयता समजून घेते, तीच व्यक्ती ब्रजरसाची यथार्थ अधिकारी आहे. ब्रज म्हणा अथवा नवद्वीप म्हणा, बहिर्मुख दृष्टीने दोन्हीही प्रपंचमय दिसतील. सौभाग्याने ज्यांचे चिन्मय नेत्र उघडतात, केवळ तेच धामाचे यथार्थ दर्शन करण्यास समर्थ असतात.

ब्रजनाथ–या नवद्वीपधामाचे स्वरूप जाणू इच्छितो.

बाबाजी–गोलोक, वृन्दावन आणि श्वेतदीप ही तिन्ही परव्योमाची अंतःपुरे आहेत. गोलोकात श्रीकृष्णाची स्वकीय लीला होते. वृन्दावनात पारकीय लीला आणि श्वेतद्वीपात त्याच लीलेची परिशिष्ट-लीला होते. या तिघांतही तत्त्वतः काहीच भेद नाही. नवद्वीप वस्तुतः श्वेतदीप होऊनही वृन्दावनापासून अभिन्न आहे. नवद्वीपवासी मोठे सौभाग्यवान आहेत–ते सगळे गौरांगदेवांचे पार्षद आहेत. अनेक पुण्य-पुंजीच्या फळाने नवद्वीप वास प्राप्त होतो. वृन्दावनात काही रस अप्रकाशित आहेत, तेच अप्रकाशित रस नवद्वीपधामात परिशिष्ट रूपात प्रकाशित आहेत. त्या रसाचा अधिकारी झाल्यावरच त्याचा अनुभव घेतला जाऊ शकतो.

---

(२१) आपल्या योगमायेचा आश्रय घेऊन श्रीकृष्णाने रासलीला करण्याची अभिलाषा केली.

ब्रजनाथ–नवद्वीपधामाचे क्षेत्रफळ काय आहे?

बाबाजी–श्रीनवद्वीपधामाची परिधी (क्षेत्रफळ) सोळा कोस आहे. त्याचा आकार अष्टदल कमळाप्रमाणे आहे. सीमन्तद्वीप, गोद्रुमद्वीप, मध्यद्वीप, कोलद्वीप, ऋतुद्वीप, जन्हुद्वीप, मोदद्रुमद्वीप आणि रुद्रद्वीप–ही आठ द्वीपे आठ दले आहेत, या सर्वांच्या मधोमध स्थित अंतर्द्वीप या पुष्पाची कर्णिका आहे. या अंतर्द्वीपाच्या मधोमध श्रीमायापूर स्थित आहे. नवद्वीपधामात विशेषतः मायापुरात, भजन-साधन केल्याने अत्यंत शीघ्रच कृष्णप्रेमाची सिद्धी होते. मायापुराच्या मध्यभागी महा योगपीठरूप श्री जगन्नाथ मिश्र यांचे भवन (मंदिर) आहे. सौभाग्यशाली जीव या योगपीठात श्रीगौरांगदेवांच्या नित्य लीलेचे नित्य दर्शन करतात.

ब्रजनाथ–गौरलीला स्वरूपशक्तीचे कार्य आहे का?

बाबाजी–श्रीकृष्णलीला ज्या शक्तीची क्रिया आहे, गौरलीलासुद्धा त्याच शक्तीची क्रिया आहे. श्रीकृष्ण आणि गौरांगदेवांत काहीच भेद नाही. श्रीरूप गोस्वामी म्हणतात-

**राधाकृष्णप्रणय विकृतिर्ह्लादिनीशक्तिरस्मा-**
**देकात्मानावपि भूवि पुरा देहभेदं गतौ तौ।**
**चैतन्याख्यं प्रकटमधुना तद्वयं चैक्यमाप्तं**
**राधाभावद्युतिसुवलितं नौमि कृष्णस्वरूपम्॥** [२२]

कृष्ण आणि चैतन्य हे दोन्ही नित्यप्रकाश आहेत. यापैकी कोण पुढे आहे आणि कोण मागे आहे, सांगू शकत नाही. आधी चैतन्य होते, मग राधाकृष्ण आले, मग दोघे एकत्र होऊन आता चैतन्यदेवांच्या रूपात प्रकटित आहेत–या कथनाचे तात्पर्य हे आहे की यापैकी एक पुढे होता आणि दुसरा नंतर झाला आहे–अशी गोष्ट नाही. दोन्हीही प्रकाश नित्य आहेत, सर्वकाळ आहेत आणि नेहेमी राहतील.

(२२) राधाकृष्णाच्या प्रणय-विकृतीरूप ल्हादिनी शक्तीद्वारे राधाकृष्ण स्वरूपतः एकात्मा होऊनही विलास तत्त्वाच्या नित्याच्या कारणाने राधा आणि कृष्ण दोन रूपांत नित्य विराजमान आहेत. ही दोन्ही तत्त्वे आता या समयी एका स्वरूपात अर्थात चैतन्य तत्त्वाच्या रूपात प्रकटित आहेत. म्हणूनच श्रीमती राधिकेच्या भाव आणि कांतीने युक्त या कृष्णस्वरूपास प्रणाम करतो.

परमतत्त्वाच्या सर्व लीला नित्य असतात. जे या दोन्ही लीलांपैकी एकास गौण आणि दुसरीस मुख्य मानतात, ते नितांत अतत्त्वज्ञ आणि नीरस आहेत.

ब्रजनाथ–जर श्रीगौरांगदेव साक्षात परिपूर्ण तत्त्व आहेत तर त्यांच्या पूजेचा विधी काय आहे?

बाबाजी–'गौरनाम-मंत्रा'द्वारे गौर पूजा केल्याने तेच फळ मिळते, जे फळ 'कृष्णनाम-मंत्रा'द्वारे कृष्णाची पूजा केल्याने मिळते. जे लोक गौर आणि कृष्णात भेद मानतात; ते नितांत मूर्ख आहेत आणि कलीचे दास आहेत.

ब्रजनाथ–छन्नावताराचा मंत्र कुठे प्राप्त केला जातो?

बाबाजी–ज्या तंत्रांनी प्रकाश्य अवतारांचे मंत्र लिहिलेत, त्याच तंत्रांनी छन्नावताराचेही मंत्र छन्न (गुप्त) रूपात लिहून ठेवले आहेत. ज्यांची बुद्धी कुटिल नाही, ते त्यास समजू शकतात.

ब्रजनाथ–गौरांगांचे युगुल कुठल्या प्रणालीने होते?

बाबाजी–गौरांगांचे युगुल दोन प्रकाराने बनते–अर्चन मार्गामध्ये एक प्रकारे आणि भजन मार्गामध्ये दुसऱ्या प्रकारे. अर्चन-मार्गात श्रीगौर-विष्णुप्रियांची पूजा होते आणि भजन-मार्गात श्रीगौर-गदाधराची सेवा होते.

ब्रजनाथ–श्रीविष्णुप्रिया श्रीगौरांगांची कोणती शक्ती आहे?

बाबाजी–साधारणतः भक्तगण त्यांना भू-शक्ती म्हणतात. वास्तविक त्या ल्हादिनीच्या सार-समवेत सम्वित्-शक्ती आहेत अर्थात भक्ति-स्वरूपिणी आहेत–ज्या गौरवतारामध्ये 'श्रीनाम' प्रचार रूप कार्याच्या सहाय्यक रूपात अवतीर्ण झाल्या होत्या. नवद्वीपधाम जणू नवधा-भक्तीचे स्वरूप आहे, त्याचप्रकारे विष्णुप्रिया देखील नवधा भक्तीचे स्वरूप आहेत.

ब्रजनाथ–विष्णुप्रिया देवीस मग स्वरूपशक्ती म्हटले जाऊ शकते का?

बाबाजी–यात शंका आहे का? स्वरूपशक्तीचे ल्हादिनीसार-समवेत सम्वित्-शक्ती स्वरूपशक्ती नाही काय?

ब्रजनाथ–प्रभो! मी लवकरच गौर-अर्चन शिकेन. आता मला आणखी एक गोष्ट आठवली, कृपा करून त्यास उत्तम रितीने समजावून सांगा. आपण सांगितले की, चित्-शक्ती, जीवशक्ती आणि मायाशक्ती–या तिन्ही स्वरूपशक्तीच्या प्रभाव आहेत; ल्हादिनी, सम्वित् आणि सन्धिनी–या तिन्ही स्वरूपशक्तीच्या तीन वृत्ती आहेत; तथा उपरोक्त तिन्ही प्रभावांच्याही वर ल्हादिनी, सम्वित् आणि सन्धिनी–या तीन वृत्तींचे जे काही कार्य अनुभव केले जाते–ते सर्व शक्तीचेच कार्य आहे. त्याव्यतिरिक्त चित्-जगत, चित्-शरीर आणि चित्-लीला हे सर्व काही शक्तीचाच परिचय आहे. मग शक्तिमान श्रीकृष्णाचा परिचय कुठे आहे?

बाबाजी–ही तर मोठी कठीण समस्या आहे. आपल्या तर्कांच्या तीक्ष्ण बाणांनी या वृद्धाचा वध करतोस का? बेटा! प्रश्न जसा सरळ आहे, त्याचे उत्तरही तसेच सरळ आहे. परंतु कठीण आहे, त्याच्या उत्तरास समजणाऱ्या अधिकाऱ्याचे भेटणे. मी सांगतो, तू समजून घे. कृष्णाचे नाम, रूप, गुण आणि लीला–हे सर्वकाही शक्तीचाच परिचय आहे, असे मानले जाते, परंतु ‘स्वतन्त्रता ’ आणि ‘स्वेच्छामयता’ तर शक्तीचे कार्य नाही. हे दोन्ही परम पुरुषाची स्वरूपगत कार्यें आहेत, कृष्ण इच्छामय तथा शक्तीचे आश्रय रूप परम पुरुष आहेत. शक्ती भोग्या आहे, कृष्ण भोक्ता आहेत. शक्ती अधीन असते, कृष्ण स्वाधीन आहेत, शक्तीने स्वाधीन पुरुषास सर्व प्रकारे घेरून ठेवले आहे, तथापि स्वाधीन पुरुष सर्वदा पूर्ण रूपाने अनुभूत आहेत–स्वाधीन पुरुष शक्तीद्वारे आच्छादित असूनही शक्तीचे अध्यक्ष आहेत. मनुष्य शक्तीच्या आश्रयानेच त्या परम पुरुषाचा अनुभव करू शकतो. म्हणून बद्धजीव शक्तीच्या परिचयाच्या विना शक्तिमानाच्या परिचयाचा अनुभव करू शकत नाही. परंतु सर्व भक्तगण त्या शक्तिमानावर प्रेम करतात, तेव्हा ते शक्तिपलीकडील शक्तिमान नेत्याचा (पुरुषाचा) साक्षात्कार करतात. भक्ती–शक्तिमय असते म्हणून ती स्त्री स्वरूपा आहे. म्हणूनच ती श्रीकृष्णाच्या स्वरूप शक्तीच्या अनुगत होऊन इच्छामय कृष्णाच्या पुरुषत्व परिचायक पौरुष विलासाचा अनुभव करते.

ब्रजनाथ–जर शक्तीपलीकडील कुठले परिचयहीन तत्त्व स्वीकार केले जाते, तर ते तत्त्व उपनिषदांचे ‘ब्रह्म’ होऊन जाते.

बाबाजी–उपनिषदाचे ब्रह्म इच्छारहित असते, परंतु उपनिषद-पुरुष कृष्ण स्वेच्छामय आहेत. दोघांमध्येही खूप अंतर आहे. ब्रह्म निर्विशेष असते आणि कृष्ण

शक्तीपासून वेगळे असूनही सविशेष आहेत कारण कृष्णात पुरुषत्व, भोक्तृत्व, अधिकार आणि स्वतन्त्रता आहे. वस्तुतः कृष्ण आणि कृष्णशक्ती अभिन्न आहेत. ती शक्ती जी कृष्णाचा परिचय देते, साक्षात कृष्णच आहे, कारण कृष्ण-कामिनी शक्ती श्रीराधेच्या रूपात आपला परिचय स्त्री रूपात देत असते. कृष्ण सेव्य आहेत, परमाशक्ती श्रीमती त्यांची सेवादासी आहे. आपापला अभिमानच परस्परांचे भेद-तत्त्व आहे.

ब्रजनाथ–कृष्णाची इच्छा आणि भोक्तृत्व जर पुरुषरूपी कृष्णाचाच परिचय आहे, तर श्रीमतींची इच्छा काय आहे?

बाबाजी–श्रीमतींची इच्छा श्रीकृष्णाच्या इच्छेच्या अधीन असते–कृष्णाच्या इच्छेच्या स्वाधीन त्यांची कुठलीही इच्छा अथवा चेष्टा नसते. इच्छा कृष्णाचीच असते, त्या इच्छेच्या अधीन कृष्ण सेवेची इच्छाच श्रीमती राधिकेची इच्छा आहे. श्रीमती राधिका–पूर्णशक्ती वा आदिशक्ती आहेत. कृष्ण–पुरुष अर्थात शक्तीचे अधीश्वर प्रवर्तक आहेत.

या कथोपकथनानंतर अधिक रात्र झालेली पाहून बाबाजींनी ब्रजनाथास घरी परतण्याची आज्ञा दिली. ब्रजनाथ बाबाजी महाराजांस दंडवत प्रमाण करून आनंदाने गद्गद होऊन बिल्वपुष्करिणीकडे चालू लागले.

ब्रजनाथाचे भाव दिवसेंदिवस बदलू लागले आहेत. त्यामुळे त्यांच्या घरच्यांना खूपच चिंता झाली. त्यांच्या आजीने लवकरात लवकर त्यांचा विवाह लावून देण्याचा निश्चय केला. योग्य वधूच्या निवडीचे कार्य आरंभ झाले; परंतु ब्रजनाथ या गोष्टींपासून सर्वथा उदासीन राहत आहेत. विवाहासंबंधी गोष्टींवर जराही लक्ष देत नाहीत. दिवसरात्र बाबाजी महाराजांनी सांगितलेल्या तत्त्वांचे चिंतन करण्यात निमग्न असतात. ऐकलेल्या तत्त्वांस हृदयंगम करणे आणि पुन्हा नवनवीन अमृतमय उपदेशांस ऐकण्याच्या लोभाने श्रीवास अंगणात बाबाजींकडे स्वतः खेचले जात आहेत.

**॥ चौदावा अध्याय समाप्त ॥**



# पंधरावा अध्याय (प्रमेयांतर्गत जीवतत्त्वाचा विचार)

आज ब्रजनाथ अन्य दिवसांपेक्षा आधीच श्रीनिवास अंगणात पोहचले. संध्या-आरतीचे दर्शन करण्याकरिता आज गोद्रुमचे भक्तजनही तेथे संध्याकाळच्या आधीच उपस्थित झाले होते. श्रीप्रेमदास परमहंस बाबाजी, वैष्णवदास आणि अद्वैतदास आदी सगळेच आरती मंडपात बसले होते. ब्रजनाथ गोद्रुमवासी वैष्णवांच्या भावास पाहून विस्मित झाले. त्यांनी मनोमन विचार केला–मीही जितके लवकर होऊ शकेल तितक्या लवकर यांच्या संगाचा लाभ घेऊन जीवन सार्थक करीन. ब्रजनाथाची सुनम्र आणि भक्तिमयी मूर्ती पाहून सर्वांनी त्यांना आशीर्वाद दिला. काही वेळातच त्या लोकांना दक्षिणेकडे श्रीगोद्रुमची यात्रा करताना पाहून वृद्ध बाबाजींनी ब्रजनाथाच्या नेत्रांतून निरंतर अश्रुधारा वाहताना पाहिल्या. रघुनाथदास बाबाजींस ब्रजनाथप्रती अपूर्व स्नेह निर्माण झाला. त्यांनी मोठ्या प्रेमाने विचारले–बाबा! तू का रडतो आहेस?

ब्रजनाथ रडतारडता म्हणाले–प्रभो! आपल्या मधुर उपदेशांस स्मरण करून माझे चित्त विकल होत आहे–सगळे विश्व जसे सारहीन वाटू लागले आहे, श्रीगौरांगदेवांच्या चरणी आश्रय घेण्याकरिता हृदय व्याकूळ होत आहे. आज आपण कृपा करून हे सांगा की मी तत्त्वतः कोण आहे आणि कशाकरिता या जगात आलो आहे?

बाबाजी–बेटा! तू या प्रश्नाने मला धन्य केले आहेस. ज्यादिवशी जिवाच्या सौभाग्याने शुभ दिन उदित होतो; तो सर्वप्रथम हाच प्रश्न करतो. तू दशमूलाचा पाचवा श्लोक ऐक, तुझे सारे संदेह दूर होऊन जातील–

**स्फुलिङ्गाः ऋद्धाग्नेरिव चिदणवो जीवनिचयाः**
**हरेः सूर्यस्यैवापृथगपि तु तद्भेदविषयाः।**
**वशे माया यस्य प्रकृतिपतिरेवेश्वर इह**
**स जीवो मुक्तोऽपि प्रकृतिवशयोग्यः स्वगुणतः॥**

(दशमूल ५)

जळत्या अग्नीतून जशा अनेक ठिणग्या उडतात, त्याच प्रकारे चित्-सूर्यस्वरूप श्रीहरींचे किरण-कण स्थानीय चित्-परमाणु-स्वरूप अनंत जीव आहेत. श्रीहरींपासून अभिन्न असूनही हे जीव त्यांच्यापासून नित्य भिन्न आहेत. ईश्वर आणि जिवात नित्य भेद हा आहे की, ईश्वर मायाशक्ती अर्थात प्रकृतीचे अधीश्वर आहेत आणि जीव मुक्त अवस्थेतही आपल्या स्वभावानुसार माया-प्रकृतीच्या अधीन होण्यायोग्य असतात.

ब्रजनाथ–अपूर्व सिद्धांत आहे. यासंबंधी वेदप्रमाण जाणू इच्छितो. यद्यपि प्रभु-वाक्यच वेद आहेत, तथापि उपनिषदांद्वारे या सिद्धांताचे प्रतिपादन झाल्याने लोक प्रभूंची (महाप्रभूंची) वाणी स्वीकारण्यास बाध्य असतात.

बाबाजी–वेदांमध्ये अनेक ठिकाणी या तत्त्वाचे वर्णन आढळते. मी त्यातील दोन-एक मंत्र सांगतो–

**यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिङ्गा व्युच्चरन्ति।**
**एवमेवास्मदात्मनः सर्वाणि भूतानि व्युच्चरन्ति॥**[१]

(बृ. उ. ४/३/९)

**तस्य वा एतस्य पुरुषस्य द्वे एव स्थाने भवत**
**इदं च परलोकस्थानं च सन्ध्यं तृतीयं स्वप्नस्थानं**
**तस्मिन् सन्ध्ये स्थाने तिष्ठन्नेते उभे स्थाने**
**पश्यतीदं च परलोकस्थानं च।**[२]

(बृ. उ. ४/३/९)

---

(१) जश्या अग्नीतून अनेक क्षुद्र ठिणग्या उडतात, त्याचप्रमाणे समस्त आत्म्यांचेही आत्मा-स्वरूप श्रीकृष्णापासून समस्त जीव उत्पन्न झाले आहेत.

(२) त्या जीव पुरुषाची दोन स्थाने आहेत–हे जड-जगत आणि अनुसंधेय चित्-जगत. जीव या दोघांच्याहीमध्ये संध्य स्थानरूप तृतीय स्वप्न-स्थानी स्थित आहे. तो त्या संध्य-स्थानी स्थित होऊन जड जगत आणि चित् जगत–दोन्ही स्थानांस पाहतो.

या मंत्रात जीवशक्तीचे तटस्थ लक्षण सांगितलेले आहे. पुनः बृहदारण्यकोपनिषदात (४/३/१८) म्हटले गेले आहे–

**तद्यथा महामत्स्य उभे कुलेऽनुसञ्चरति पूर्वं चापरं चैवमेवायं पुरुषएतावुभावन्तावनुसञ्चरतिस्वप्नान्तं च बुद्धान्तं च॥** (३)

ब्रजनाथ–'तटस्थ' शब्दाचा वैदांतिक अर्थ काय आहे?

बाबाजी–जल आणि भूमीच्या मधल्या स्थानास 'तट' असे म्हटले जाते. परंतु जलाला लागून असलेले स्थानच भूमी आहे. मग 'तट' राहिला कुठे? 'तट'–जल आणि भूमी या दोघांना विभक्त करणारी रेखा विशेष आहे. ही तट रेखा स्थूल नेत्रांनी दिसून येत नाही. चित्-जगास जल आणि मायिक जगास भूमी मानल्याने दोघांना विभक्त करणारी सूक्ष्म रेखाच 'तट' आहे. संध्य स्थानी जीवशक्तीची स्थिती आहे. सूर्याच्या किरणांमध्ये जसे अगणित परमाणू उडत असतात, त्याचप्रकारे भगवंतात जिवांची स्थिती आहे. जीव मध्यस्थानी स्थित होऊन एकीकडे चित् जगास आणि दुसरीकडे माया-रचित ब्रम्हांडास पाहतात. भगवंताची चित् शक्ती जशी एकीकडे असीम आहे, तर दुसरीकडे मायाशक्तीही तशीच प्रकांड आहे. या दोघांच्यामध्ये अनंत सूक्ष्म जीव स्थित आहेत. कृष्णाच्या तटस्थ शक्तीतून जीव उत्पन्न झाले आहेत. म्हणूनच जिवांचा स्वभावच तटस्थ असतो.

ब्रजनाथ–तटस्थ स्वभाव कसा आहे?

बाबाजी–ज्याद्वारे दोन्ही जगांमध्ये स्थित होऊन दोन्हींकडे बघता येऊ शकते. दोन्ही शक्तींच्या अधीन होण्याची योग्यताच 'तटस्थ स्वभाव' आहे. तट हा जलाने खंडित होऊन नदीचे रूप धारण करतो आणि पुन्हा नदीची धारा बदलल्याने भूमी खंडासोबत एक होऊन पुन्हा भूमीचे रूप धारण करतो. जीव जर कृष्णाकडे अर्थात चित्-जगाकडे पाहतो, तेव्हा तो कृष्णशक्तीने प्रभावित होऊन चित्-जगात प्रवेश करून शुद्ध चेतन आत्माच्या रूपात भगवंताची सेवा करतो आणि जर मायेकडे

---

(३) ज्या प्रकारे एखादा अगदी मोठा मत्स्य नदीच्या अल्याड आणि पल्याड दोन्ही तीरांवर क्रमशः विचरण करतो, त्याचप्रकारे हा जीव पुरुष जड-जगत आणि चित् जगाच्या मध्यवर्ती कारण-जलात स्थित होऊन याच्या दोन्ही तीरांवर अर्थात स्वप्न स्थान आणि जागृत स्थान, या दोन्ही स्थानी क्रमशः विचरण करतो.

दृष्टी केली तर कृष्ण विमुख होऊन मायाजालात आबद्ध होऊन अडकतो. या उभयनिष्ठ स्वभावाचे नावच 'तटस्थ-स्वभाव' आहे.

ब्रजनाथ–जिवाच्या स्वरूपगत घडणीत कुठले मायिक तत्त्वही आहे का?

बाबाजी–नाही, जीव चित्-वस्तूनेच रचलेले आहेत. नितांत क्षुद्र स्वरूप असल्याने चित्-बलाची कमतरता असल्याने ते मायेद्वारे पराजित अर्थात आच्छादित केले जाऊ शकतात. जिवांच्या सत्तेमध्ये मायेचा गंधही नाही.

ब्रजनाथ–मी माझ्या अध्यापकाकडून ऐकले होते की ब्रह्माचा चित्-खण्ड मायेद्वारे आवृत होऊन जीव झालेला (बनलेला) आहे. आकाश जसे सदा महाकाश आहे, अखंड आहे, परंतु त्याचा काही अंश आवृत होऊन घटाकाश होतो; त्याचप्रमाणे जीवही स्वरूपतः ब्रह्मच आहे; ब्रह्म हेच मायेने आवृत होऊन स्वतःत जीव-अभिमान आणतो. हा विचार कसा आहे?

बाबाजी–हा विचार केवळ मायावाद मात्रच आहे. ब्रम्हवस्तूस माया कशी काय स्पर्श करू शकते? ब्रह्मास जर लुप्तशक्तीसुद्धा मानले गेले तरीही लुप्तशक्तीसोबत मायेचे सान्निध्य कसे संभव आहे? जिथे मायाशक्तीच लुप्त आहे, तेथे मायेची क्रिया कशी संभव असू शकते? म्हणून मायेच्या आवरणाने ब्रह्माची अशी दुर्दशा कधीही संभव नाही. आणि जर ब्रह्माच्या पराशक्तीस स्वीकार केले जाते, तर माया जी अत्यंत तुच्छ शक्ती आहे–कशा प्रकारे चित्-शक्तीस पराजित करून ब्रह्मापासून (ब्रह्म) जिवाची सृष्टी करू शकते? ब्रह्म तर अखंड आहे, मग अशा ब्रह्माचे खण्ड कसे काय पाडल्या जाऊ शकतात? ब्रह्मावर मायेची क्रिया स्वीकार केली जाऊ शकत नाही. जिवांच्या सृष्टीत मायेचा काहीच अधिकार राहत नाही–जीव अणू असूनही मायेपासून परतत्त्व आहे.

ब्रजनाथ–एकदा एक शिक्षकाने म्हटले होते की जीव अन्य काही नाही–ब्रह्माचेच प्रतिबिंब आहे; सूर्य ज्याप्रमाणे जलात प्रतिबिंबित होतो, त्याचप्रमाणे ब्रह्म सुद्धा मायेत प्रतिबिंबित होऊन जीव झाला आहे. हा विचार कसा आहे?

बाबाजी–हा पण मायावादाचाच दुसरा नमूना आहे. ब्रह्माची सीमा नाही, असीम वस्तू कधी ही प्रतिबिंबित होऊ शकत नाही. ब्रह्मास सीमाविशिष्ट करणे वेद विरुद्ध मत आहे, म्हणूनच 'प्रतिबिंब वाद' नितांत त्याज्य आहे.

ब्रजनाथ–आणखी एकदा एका दिग्विजयी संन्यासाने सांगितले होते की–"वास्तविक जीव नामक कुठलाच पदार्थ नाही, केवळ भ्रमामुळेच जीवबुद्धी होते, भ्रम दूर झाल्यावर एकमात्र अखंड ब्रह्मच आहे." या विचारात कितपत तथ्य आहे?

बाबाजी–हाही एकप्रकारचा मायावादच आहे, तथा संपूर्ण निराधार आहे. **'एकमेवाद्वितीयं'** (छा.उ. ६/२/१)–या वेद-वाक्याद्वारे ब्रह्माव्यतिरिक्त आणखी राहतेच काय? जर ब्रह्माव्यतिरिक्त आणखी काहीच नाही, तर हा भ्रम आला कुठून? दुसरी गोष्ट ही की हा भ्रम कुणाचा? जर समजा ब्रह्माचा भ्रम आहे, तर मग तू ब्रह्मामध्ये भ्रम आदी दोषांना स्थित सांगून ब्रह्मास ब्रह्म ठेवलेच नाही. आणि जर भ्रमास स्वतन्त्र रूपात एक वेगळे तत्त्व मानले जाते, तर ब्रह्माच्या अद्वयत्त्वाची हानी होते.

ब्रजनाथ–एकदा एक प्रकांड ब्राह्मण-पंडित नवद्वीपात आले होते, त्यांनी एका पंडित-सभेत हा विचार स्थापित केला होता–केवळ जीवच आहे. तो स्वप्नात सर्वकाही सृष्टी करून त्यापासून सुख-दुःख भोगतो. स्वप्न दूर झाल्यावर ब्रह्मस्वरूप आहे–हा विचार कुठपर्यंत ठीक आहे?

बाबाजी–हाही मायावाद आहे. ब्रह्मावस्थेत 'जीव अवस्था' आणि 'स्वप्न'–हे सर्व कसे संभव असू शकते? शिंपल्यामध्ये 'रजत-भ्रम' (चांदीचा आभास) आणि दोरीमध्ये 'सर्पभ्रम'–या उदाहरणांच्या सहाय्यतेने मायावादी कधीही अद्वय ज्ञानाचा पक्ष मजबूत करू शकत नाहीत. हे सर्व तर्क जीवांस मोहित करण्याकरिता जाळस्वरूप आहेत.

ब्रजनाथ–जिवांच्या स्वरूपात मायेचे कार्य नाही–हे स्वीकारलेच पाहिजे तथा जिवांच्या स्वभावावर मायेचा प्रभाव पडू शकतो–हेही मी पूर्णपणे समजलो आहे. आता मी हे जाणू इच्छितो की काय चित्-शक्तीने जिवास तटस्थ स्वभाव देऊन निर्माण केले आहे?

बाबाजी–नाही, चित्-शक्ती कृष्णाची परिपूर्ण शक्ती आहे–ती जे काही उत्पन्न करते, त्या सर्व नित्यसिद्ध वस्तू असतात. जीव नित्यसिद्ध नाही, तो साधनाद्वारे साधनसिद्ध होऊन नित्यसिद्धासमान आनन्द भोग करतो. श्रीमतींच्या चारही प्रकारच्या सख्या नित्यसिद्ध आहेत, तथा चिच्छक्ती श्रीमती राधिकेच्या कायव्यूह

असतात. समस्त जीव 'श्रीकृष्णाच्या जीवशक्तीने' प्रकाशित होतात. जशी चित्-शक्ती कृष्णाची पूर्णशक्ती आहे, त्याचप्रकारे जीवशक्ती कृष्णाची अपूर्ण शक्ती आहे. पूर्ण शक्तीने ज्याप्रमाणे समस्त पूर्ण तत्त्व रूपांतरित आहेत, अपूर्ण शक्तीनेही त्याचप्रकारे अणू-चैतन्यस्वरूप अनंत जीवसमूह रूपांतरित आहेत. श्रीकृष्ण आपल्या एक-एक शक्तीत अधिष्ठित होऊन तिच्या अनुरूप आपले स्वरूप प्रकाशित करतात. चित्-स्वरूपात अधिष्ठित होऊन ते कृष्ण आणि परव्योमनाथ नारायण स्वरूप प्रकाश करतात, जीवशक्तीत अधिष्ठित होऊन व्रजातल्या आपल्या विलासमूर्तीरूप बलदेव स्वरूपाचा प्रकाश करतात आणि मायाशक्तीत अधिष्ठित होऊन कारणोदकशायी, क्षीरोदकशायी आणि गर्भोदकशायी–या तीन विष्णुस्वरूपांस प्रकाशित करतात. व्रजात आपल्या कृष्णस्वरूपातून संपूर्ण चित्-व्यापारास प्रकट करतात. बलदेव स्वरूपात शेषतत्त्व होऊन शेषीतत्त्वस्वरूप कृष्णाची आठ प्रकारे सेवा करण्याकरिता नित्यमुक्त पार्षद जीवांस प्रकट करतात. पुन्हा परव्योमात शेषरूप संकर्षण होऊन शेषी रूपात नारायणाची आठ प्रकारे सेवा करण्याकरता नित्यपार्षदस्वरूप आठ प्रकारचे सेवक प्रकट करतात. संकर्षण अवताररूप महाविष्णु जीवशक्तीमध्ये अधिष्ठित होऊन परमात्मस्वरूपात जगत्-गत जीवात्म्यांस प्रकट करतात–हे सर्व जीव माया प्रवण असतात. जोपर्यंत हे भगवंताच्या कृपेने चित्-शक्तिगत ल्हादिनीशक्तीचा आश्रय घेत नाहीत, तोपर्यंत त्यांची मायेद्वारे पराजित होण्याची संभावना असते. मायाबद्ध अनंत जीव मायेद्वारा पराजित होऊन मायेच्या त्रिगुणांच्या अधीन असतात. म्हणून, सिद्धांत हा आहे की जीवशक्तीच जीवांस प्रकट करते–चित्-शक्ती नाही.

ब्रजनाथ–आपण आधी सांगितले की चित्-जगत नित्य आहे, तसेच जीवही नित्य आहेत. जर ही गोष्ट ठीक आहे तर नित्य वस्तूची सृष्टी अथवा उद्भव कसे संभव आहे? जर ते कधी प्रकट होतात, तर त्याचे तात्पर्य हे असते की प्रकट होण्यापूर्वी ते अप्रकट होते, मग त्यांची नित्यता कशी मानली जाऊ शकते?

बाबाजी–या जड जगामध्ये तू ज्या देशाचा आणि काळाचा अनुभव घेत आहेस, चित्-जगतातील देश आणि काळ याहून सर्वथा विलक्षण आहेत. जडीय काळ तीन भागात विभक्त आहे–भूत, वर्तमान आणि भविष्य; परंतु चित् जगात केवळ एक अखंड वर्तमान काळच असतो. चित् जगातली प्रत्येक घटना नित्य वर्तमान असते.

आपण जड-जगात जे काही सांगतो, वर्णन करतो, ते सर्व काही जड देश आण जड काळाच्या अधीन असते. म्हणून जेव्हा आपण असे म्हणतो की, “जीव उत्पन्न झाले”, “जिवांची सृष्टी झाली”, “चित्-जगत् प्रकट झाले”, “जिवाच्या स्वरूप-गठनात मायेचे कार्य नाही”, इत्यादी, तेव्हा आपल्या भाषेवर, आपल्या वाक्यांवर जडीय काळाचा प्रभाव असतो. आपल्या बद्धावस्थेत असे होणे अनिवार्य आहे. म्हणूनच अणुचित् जीव आणि समस्त चित् वस्तूंच्या वर्णनात मायिक काळाचा प्रभाव दूर केला जाऊ शकत नाही. त्यात भूत, वर्तमान आणि भविष्यत् काळाचा भाव येतोच येतो. अतः चित-जगताच्या वर्णनांचे तात्पर्य अनुभव करतेवेळी शुद्ध विचार परायण व्यक्ती नित्य वर्तमान काळाचा प्रयोग अनुभवीत असतात. बाबा! याविषयी जरा सावधान रहा. वाक्यांची अनिवार्य त्याज्यता सोडून चिदनुभवच करावा.

जीव नित्य कृष्ण-दास आहे. कृष्ण-दास्य हेच त्याचे नित्यस्वरूप आहे. जीव आपल्या याच नित्यस्वरूपास विसरून मायेद्वारे बांधलेला असतो–असे समस्त वैष्णवगण म्हणतात, परंतु सर्वच जाणतात की जीव नित्य वस्तू असूनही दोन प्रकारचे असतात. एक नित्य-मुक्त आणि दुसरे नित्य-बद्ध. याविषयी मानव-बुद्धी प्रमादाच्या वशीभूत असल्याने असे म्हटले जाते. धीर व्यक्ती चित्-समाधीद्वारे अप्राकृत ‘सत्याचा अनुभव‘ करतात. आपली वाणी मायिक दोषयुक्त असते. म्हणूनच आपण जे काही बोलतो, बोलू त्यात मायिक दोष राहणारच. परंतु बेटा! तू याविषयी सर्वदा निर्मल सत्य अनुभव करण्याचा प्रयत्न कर. याविषयी तर्क मात्र थोडीही सहाय्यता करत नाही. अचिंत्य भावांसंबंधी तर्कास नियुक्त करणे व्यर्थच आहे. मी जाणतो की तू या भावांस आत्ता इतक्या शीघ्रतेने हृदयंगम करू शकणार नाहीस. तुझ्या हृदयात जसजसे चित्-अनुशीलन वाढत जाईल, तसतसे अधिक रूपात चिन्मय भावांची उपलब्धी करत जाशील, अर्थात चिन्मय भावसमूह तुझ्या पवित्र अंतःकरणात स्वतः उदित होऊ लागतील. तुझे शरीर जडमय आहे. तुझ्या शरीराच्या समस्त क्रिया जडमय आहेत. परंतु वास्तविक तू जडमय नाहीस–तर अणू-चैतन्य पदार्थ आहेस. तू स्वतःस जितके अधिक जाणू शकशील, आपल्या स्वरूपास मायिक जगापासून तितकेच अधिक श्रेष्ठ तत्त्व अनुभवशील. मी सांगितल्यानंतरही याची उपलब्धी करू शकणार नाहीस अथवा तू हे ऐकूनही प्राप्त करू शकणार नाहीस. हरिनामाचे अधिकाधिक अनुशीलन कर. असे करताकरता तुझ्या हृदयात चिन्मय भावसमूह आपोआपच उदित होऊ लागतील. तू चिन्मय भावांस जितके अधिक रूपात उदित

करवशील, चित्-जगाची प्रतीती ही तुला तितकीच अधिक होईल. मन आणि वाणी– हे दोन्ही जड-संबंधाने उत्पन्न होतात. म्हणून ते अधिक प्रयत्न करूनही चित्-वस्तूचा अनुभव घेऊ शकत नाहीत. वेदांचे कथन आहे–

**यतो वाचो निवर्त्तन्ते अप्राप्य मनसा सह।**[४]

(तै. ब्र. २/९)

माझा उपदेश आहे की, तू याविषयी कुणालाही सिद्धांत विचारू नये, स्वतः अनुभव करण्याचा प्रयत्न करावा. मी याचा आभासमात्र दिला आहे.

ब्रजनाथ–आपण सांगितले की जीव ज्वलंत अग्नीच्या ठिणगी स्वरूप अथवा चित् सूर्याचे किरणगत परमाणू-स्थानीय तत्त्व आहे. मग यात जीवशक्तीचे कार्यच काय आहे?

बाबाजी–कृष्ण ज्वलंत अग्नी वा सूर्यस्वरूप स्वप्रकाश तत्त्व आहेत. कृष्णस्वरूप ज्वलंत अग्नीची जितकी दूरपर्यंत स्वतःची सीमा असते त्यामधील सर्वकाही संपूर्ण चित्-व्यापार असतो, त्याच्या बहिर्मंडळात त्याची किरणे पसरलेली आहेत. किरण स्वरूपशक्तीचे अणुकार्य आहे. त्या अणुकार्यात किरणसमूह चित्-सूर्याचे परमाणु आहेत. जीव–तेच परमाणु-स्थानीय-तत्त्व आहेत. स्वरूपशक्ती मण्डलवर्ती जगाची प्रकटयित्री आहे, बहिर्मण्डलाची क्रिया–चित्-शक्तीची अणू-अंशरूपी जीवशक्तीची क्रिया आहे. म्हणून जिवासंबंधींच्या क्रिया जीवशक्तीच्या असतात. **"परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते"**[५] (श्वे. उ. ६/८) च्या अनुसार पराशक्ती-स्वरूप चित्-शक्तीच आपल्या मंडळाबाहेर निघून जीवशक्तीच्या रूपात चिन्मंडळ आणि मायामंडळाच्या मध्ये–तटभूमीवर चित्-सूर्याच्या किरण-परमाणुरूप अनंत नित्य जीवांस प्रकट करते.

---

(४) वाणी मनासोबत ज्यास प्राप्त करण्यास असमर्थ होऊन परतते.

(५) त्या अचिंत्य शक्तीचे नाव पराशक्ती आहे. ही स्वाभाविकी शक्ती एक होऊनही ज्ञान, बळ आणि क्रिया भेदाने विविध प्रकारची आहे.

ब्रजनाथ–ज्वलंत अग्नी वा सूर्य आणि स्फुलिंग वा परमाणू–हे सर्व जडपदार्थ आहेत. चित्-तत्त्वाविषयी या जड पदार्थांच्या तुलनेचा प्रयोग का केला गेला आहे?

बाबाजी–मी आधीच म्हटले आहे की जड-वाक्यांद्वारे चित्-तत्त्वासंबंधी जे काही म्हटले जाते, त्यात जड-मल अवश्यच स्पर्श करेल. परंतु दुसरा उपायच काय आहे, बाध्य होऊन असे उदाहरण द्यावे लागते. म्हणूनच तत्त्ववेत्ता पुरुष चित्-वस्तूची अग्नी वा सूर्याशी तुलना करून त्याविषयी समजावण्याची चेष्टा करतात. वास्तवात कृष्ण सूर्यापेक्षा जास्त श्रेष्ठ वस्तू आहेत. कृष्णाचे चिन्मंडळही सूर्याच्या तेजोमंडळापेक्षा अत्यंत श्रेष्ठ आहे आणि कृष्णाचे किरण (जीवशक्ती) तथा किरणगत-परमाणू सूर्याच्या किरणांपेक्षा आणि किरणगत परमाणूंपेक्षा अतिशय श्रेष्ठ आहेत. परंतु असे असूनही अनेक विषयांमध्ये सादृश्य लक्ष्य करूनच या उदाहरणांचा प्रयोग केला गेला आहे. उदाहरण केवळ प्रादेशिक गुणांनाच व्यक्त करतात, सार्वदेशिक गुणांना नाही. सूर्याचा स्वप्रकाश-सौंदर्य गुण तथा त्याच्या किरणांचा पर-प्रकाश गुण–हे दोन्ही गुण चित्–तत्त्वाच्या स्व-प्रकाशत्व आणि पर-प्रकाशत्व गुणांस लक्ष्य करतात. परंतु सूर्याचे दाहकत्व आणि जडत्व आदी गुण चित्-वस्तूमध्ये उदाहरणाची स्थळे नाहीत. "हे दूध जलासमान आहे" असे म्हटल्याने जलाचा तारल्य गुणच ग्रहण करण्यायोग्य आहे. नाहीतर त्या दुधात जलाचे सगळे गुण प्राप्त झाल्याने ते दूध न होता जल नाही का होणार? म्हणूनच उदाहरण कोण्या वस्तूचे प्रादेशिक भावच व्यक्त करतात, सार्वदेशीय भावांची तुलना क्षेत्र नसतात.

ब्रजनाथ–चित्–सूर्याची चिन्मय किरणे आणि त्यात स्थित चित्-परमाणुसमूह चित्-सूर्यापासून अभिन्न होऊनही नित्य भिन्न आहेत. या दोन्ही गोष्टी एकाच वेळी कशा काय सत्य होऊ शकतात?

बाबाजी–जड-जगात कुठल्या वस्तूपासून दुसरी वस्तू उत्पन्न झाल्यावर उत्पन्न झालेली वस्तू त्या मूळ वस्तूपेक्षा एकतर अगदीच भिन्न होऊन जाते अथवा तिच्यासारखीच अभिन्न असते. हा जडधर्माचा स्वभाव आहे. पक्षाने अंडे दिल्यावर अंडे पक्षापेक्षा वेगळे दिसते. मनुष्याचे नख आणि केस जितके दिवस कापले जात नाहीत, तोपर्यंत मनुष्य शरीरातून निर्माण होऊनही शरीरासोबत संलग्न असतात, जोडलेले असतात. परंतु चित्-वस्तूचा धर्म काही विलक्षणच असतो. चित्-सूर्यापासून जे काही निघते, ते सर्व काही युगपत् भेदाभेद व्यापार आहे; जसे किरण आणि किरण-

परमाणू सूर्यातून निघूनही सूर्यापासून वेगळे नसतात. त्याचप्रकारे कृष्णाचे किरण (जीवशक्ती) आणि किरण-परमाणुरूप जीवसमूह कृष्ण-सूर्यापासून उत्पन्न होऊनही कृष्णापासून अपृथक् असतात आणि अपृथक् (अभिन्न) असूनही वेगवेगळे जीव स्वतन्त्र इच्छाकण लाभ करून कृष्णापासून नित्य पृथक आहेत. म्हणूनच जिवाचे कृष्णापासूनचे अभेद आणि भेद–हे तत्त्व नित्यसिद्ध आहे. हाच चित्-व्यापाराचा विलक्षण परिचय आहे. जडाच्या संबंधात पंडितजन एक प्रादेशिक उदाहरण देतात, ते असे की सोन्याचा एक मोठा तुकडा घ्या. त्यातला छोटासा तुकडा कापून बांगडी बनवा. आता सोन्याच्या दृष्टीने तर बांगडीचा सोन्याचा तुकड्यापासून काहीच भेद नाही आहे, अर्थात दोन्ही अभिन्न आहेत, परंतु बांगडीच्या दृष्टीने दोन्ही भिन्न आहेत. परंतु हे उदाहरण चित्-तत्त्वासंबंधी पूर्णपणे योग्य ठरत नाही, उलट एकदेशीय उदाहरण आहे. चित्-तत्त्वाच्या दृष्टीने ईश्वर आणि जीवात अभेद आहे आणि अवस्था तथा परिमाणाच्या दृष्टीने दोघांमध्ये नित्य भेद आहे. ईश्वर पूर्ण चित् आहेत, जीव अणुचित् आहे. ईश्वर विभू आहेत, जीव क्षुद्र आहे. काही लोक याविषयी घटाकाश आणि महाकाशाचे उदाहरण देतात, परंतु हे उदाहरण चित्-तत्त्वाच्या संबंधात सर्वथा असंगत आहे.

ब्रजनाथ–जर चित् आणि जड या दोन्ही भिन्न भिन्न जातीय वस्तू आहेत, तर चित्-वस्तूकरिता कोणत्याही जड वस्तूचे उदाहरण कसे काय असू शकते?

बाबाजी–जडवस्तूत जशा पृथक-पृथक जाती असतात, ज्या जातींस न्यायिक पंडित 'नित्य मानतात', चित् आणि जडाच्या मध्ये तसा कुठलाच जातीभेद नसतो. मी आधीच म्हटले आहे की, 'चित्'च एकमात्र वस्तू आहे आणि जड त्याचाच एक विकार आहे. विकृत वस्तूचे शुद्ध वस्तूसोबत अनेक बाबतींत सादृश्य असते. विकृत-वस्तू शुद्ध वस्तूपासून भिन्न असते; परंतु अनेक विषयांमध्ये तिची सादृश्यता लोप पावत नाही–जसे, जल आणि गारा (हिम-उपल). गारा अर्थात बर्फ जलाचा विकार आहे, विकार असल्याने तो जलापासून भिन्न होतो. परंतु तरीही शीतलता आदी बऱ्याच गुणांचे सादृश्य असतेच. गरम पाणी आणि थंड पाणी यांत शीतलता आदी गुणांचे साधर्म्य तर नसते, परंतु तारल्य गुणाचे साधर्म्य असते. म्हणूनच विकृत पदार्थांत शुद्ध पदार्थांचे थोडेफार सादृश्य अवश्य आढळून येते. या सिद्धांताच्या आधारे जडीय उदाहरणांद्वारे चित्–जगासंबंधी काही-काही अनुशीलन केले जाऊ

शकते. पुनः 'अरुन्धती-दर्शन-न्यायाचा'[६] अवलंबन केल्याने जडतत्त्वाच्या स्थूल आणि विपर्यस्त तत्त्व-परीक्षणाने चित्-तत्त्वाच्या सूक्ष्म धर्मांची उपलब्धी केली जाऊ शकते.

कृष्णलीला संपूर्णपणे चित् लीला आहे. त्यात थोडासुद्धा जडीय भाव नसतो. श्रीमद् भागवतात वर्णित व्रजलीला संपूर्णपणे अप्राकृत आहे. परंतु तेच वर्णन जेव्हा श्रोतृ-मंडळींस वाचून ऐकविले जाते, तेव्हा श्रोत्यांच्या अधिकार भेदाने त्याची भिन्न-भिन्न प्रकारची फळे मिळतात. जड विषयांच्या भोगात आसक्त श्रोता जड विषयालंकारांचे अवलंबन करून साधारण नायक-नायिकेची कथा ऐकतो. मध्यमाधिकारी श्रोता 'अरुंधती-दर्शन'-न्यायाचा आधार घेऊन जडीय वर्णनाशी मिळत्या-जुळत्या चित् विलासाचे दर्शन करतो आणि उत्तम अधिकारी त्या लीला-वर्णनांस श्रवण करून जडाच्याही पलीकडच्या शुद्ध चित्-विलास रसात निमग्न होऊन जातो. या सर्व पूर्वोक्त न्यायांचे अवलंबन केल्याशिवाय जीवांस अप्राकृत तत्त्वासंबंधी शिकवण देण्याकरिता दुसरा उपायच काय आहे? ज्याविषयी वाणी मूक पडते आणि मनाची गती थांबते, त्या विषयास बद्धजीव कशाप्रकारे समजू शकतो? याविषयी सादृश्ययुक्त उदाहरणे आणि 'अरुन्धती-दर्शन'-न्यायाच्या व्यतिरिक्त कुठलाही दुसरा उपाय दिसत नाही. जड पदार्थांमध्ये भेद आणि अभेद एकत्रितपणे दिसत नाहीत. त्यांत एकतर केवळ भेद वा अभेद यापैकी एक काहीतरी होऊ शकते. परंतु परमतत्त्वाच्या संबंधी अशी गोष्ट नाही. कृष्णासोबत कृष्णाच्या जीवशक्तीचा आणि जीवशक्ती परिणत जीवसमुहांचा युगपत् भेद आणि अभेद दोन्हीही स्वीकारावेच लागतात. हे भेदाभेद तत्त्व मानव बुद्धीच्या सीमेच्या पलीकडील असल्याने 'अचिंत्य' म्हटले जाते.

व्रजनाथ–ईश्वर आणि जिवामध्ये काय भेद आहे?

---

(६) 'अरुन्धती-दर्शन'-न्याय–अरुन्धती एक खूपच छोटासा तारा आहे, जो सप्तर्षीमंडळस्थ वशिष्ठाजवळ आहे. त्याचे दर्शन करण्याकरिता ज्याप्रकारे आधी स्थूल दृष्टीने एका मोठ्या ताऱ्याच्या मदतीने त्याचे स्थान निर्णीत केले जाते आणि मग सूक्ष्म दृष्टीने ध्यानपूर्वक पाहिल्याने त्याचे दर्शन होते, त्याचप्रकारे मध्यमाधिकारी वैष्णवजन आप्राकृत राज्याच्या गोष्टी जड जगाच्या भाषा आणि इंद्रियांच्या मदतीने ग्रहण करूनही भक्ति-नेत्रांमध्ये प्रेमरूप अंजन लावून त्याच्या अप्राकृतत्त्वाचे दर्शन आणि अनुभव करतात.

बाबाजी–आधी ईश्वर आणि जिवामधील अभेद जाणून घे, मग त्यांच्यातला नित्य-भेद दाखवून देतो. ईश्वर–ज्ञान-स्वरूप, ज्ञाता-स्वरूप, भोक्तृ-स्वरूप, मन्तृ-स्वरूप, स्व-प्रकाश आणि पर-प्रकाश तत्त्व आहे. तोदेखील समस्त क्षेत्रज्ञ आणि इच्छामय पुरुष आहे. यादृष्टीने दोघेही अभेद आहेत. परंतु ईश्वर पूर्णशक्तिमान आहे. तो पूर्णशक्तीच्या प्रभावाने उपरोक्त समस्त गुणांचा आधार आहे. ते समस्त गुण ईश्वरात पूर्ण मात्रेत असतात. अणू चित्-जिवामध्ये ते समस्त गुण तर असतातच, परंतु अणू मात्रेत. पूर्णता आणि अणुतेच्या भेदाने ईश्वर आणि जिवाच्या स्वभाव आणि स्वरूपात नित्य भेद विद्यमान असूनही उपरोक्त हेतूने ईश्वर आणि जिवामध्ये भेदाचा अभाव आहे. आत्मशक्तीच्या पूर्णतेमुळे ईश्वर स्वरूपशक्ती, जीवशक्ती आणि मायाशक्तीचे अधीश्वर आहे. शक्ती त्याची दासी आहे. तो शक्तीचा स्वामी आहे. त्याच्या इच्छेने शक्ती क्रियावती आहे. हेच ईश्वराचे स्वरूप आहे. जीवांमध्ये ईश्वराचे गुण बिंदू रूपात असूनही जीव शक्तीच्या वशीभूत असतो. 'दशमूलात' 'माया' शब्दाचे तात्पर्य केवळ जड-मायेशीच नाही, परंतु स्वरूप-शक्तीशीदेखील आहे. "मीयते अनया इति माया"[७] या व्युत्पत्तीनुसार माया त्या शक्तीस म्हणतात, जी चित्, अचित् आणि जीव–या तिन्ही जगांमध्ये कृष्णाचा परिचय प्रकाशित करते. म्हणून "माया "शब्दाने केवळ जडशक्तीचच नाही तर स्वरूपशक्तीचाही परिचय बोध होतो. कृष्ण मायेचे अधीश्वर आहेत आणि जीव मायेच्या अधीन असतो. म्हणून श्वेताश्वतर उपनिषदात म्हटले आहे–

**अस्मान्मायी सृजते विश्वमेतत्तस्मिंश्चान्यो मायया संनिरुद्धः ॥**

**मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्।**
**तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्॥**[८]

(श्वे.उ. ४/९-१०)

उपरोक्त मंत्रात 'मायी' शब्दाने मायाधीश कृष्णास आणि प्रकृतीने संपूर्ण

(७) हिच्यायोगे मोजमाप केले जाऊ शकते, म्हणूनच हिला 'माया' म्हटले आहे.

(८) मायेच्या अधीश्वर परमेश्वराने ज्यायोगे संपूर्ण जगाची रचना केली आहे, त्याचद्वारे जीवसमूहदेखील प्रपंचात यथायोग्य बांधलेला आहे. मायेलाच प्रकृती समजावे आणि मायी अर्थात मायाधीशासच महेश्वर समजावे. त्याच महेश्वराच्या अंगांनी हे संपूर्ण जग व्याप्त होत आहे.

शक्तीस लक्ष्य केले आहे. हा महान गुण आणि स्वभाव ईश्वराचा विशेष धर्म आहे, जो जीवात्म्यात नसतो. जीव मुक्त झाल्यावरही या महान गुणास प्राप्त करू शकत नाही. **"जगत् व्यापार वर्ज्जम्"**[९] ब्रह्मसूत्राच्या या सिद्धांत वचनाद्वारे जिवाचा ईश्वराशी नित्यभेद स्थापित केला गेला आहे–या विचाराचे समर्थन समस्त विद्वानमंडळी करते.

येथे नित्यभेद काल्पनिक नाही–नित्यसिद्ध आहे. हा भेद जिवाच्या कुठल्याही अवस्थेत लोप पावत नाही. म्हणूनच जीव कृष्णाचा नित्यदास आहे–या वाक्यास महावाक्य समजावे.

ब्रजनाथ–ईश्वराशी जिवाचा जर नित्यभेदच सिद्ध होतो तर अभेद केव्हा मानला जातो? मग काय 'निर्वाण' नामक एक अवस्था आहे का–यास स्विकारावे का?

बाबाजी–मुळीच नाही. कुठल्याही अवस्थेत कृष्णासोबत जिवाचा अभेद नाही.

ब्रजनाथ–मग आपण 'अचिंत्यभेदाभेद' असे का म्हटले आहे?

बाबाजी–कृष्णासोबत जिवाचा चित्-धर्माच्या दृष्टीने अभेद आहे आणि स्वरूपतः दोहोंमध्ये नित्य भेद आहे. नित्य अभेद असल्यावरही भेद प्रतीतीच नित्य आहे. अभेद स्वरूपाची सिद्धी झाल्यावरही त्याचा अवस्थागत काहीच परिचय नाही. अवस्थागत परिचयाऐवजी नित्य-भेद-प्रकाशच प्रबळ होतो. अर्थात जिथे नित्य अभेद

---

(९) "जगत् व्यापार वर्जं प्रकरणासन्निहितत्त्वात्" (ब्रह्मसूत्र ४/४/१७)–निखिल चित् आणि अचित् जगाची सृष्टी, स्थिती आणि त्याचे नियमन रूप जगत व्यापार केवळमात्र ब्रह्माचेच कार्य आहे–दुसऱ्याचे नाही. या जगात व्यापार कार्यास सोडून इतरेतर समस्त कार्य मुक्तजिवांकरिता संभव आहेत. "यतो वा इमानि भूतानि जायन्ते" (तै. उ. ३/१) (ज्यायोगे समस्त भूत-समुदाय उत्पन्न होतो, जीवित राहतो तथा प्रलयकाळी ज्यात प्रवेश करतो आणि विलीन होऊन जातो) आदी वाक्यसमूह ब्रह्माच्या संबंधीच म्हटली गेली आहेत. इतकेच काय तर ही वचने अनेकदा तोडून मोडून ही जीवांसबंधी लागू केली जाऊ शकत नाहीत. कारण येथे मुक्त जीवांसंबंधी कुठलाच प्रसंग नाही. शास्त्रांमध्ये केवळमात्र भगंवतासच सृष्टी, स्थिती आणि प्रलयाचा कर्ता सांगितले गेले आहे, मुक्तजीवास नाही. जर जीवांनाही या कार्यांचा कर्ता मानले गेले तर, बहु-ईश्वरवादाचा दोष उपस्थित होतो. म्हणून जगत व्यापारात मुक्तजीवाचा अधिकार नाही–हाच सिद्धांत संगत आहे.

आणि नित्य भेद दोन्ही असतात, तिथे भेद प्रतीतीच प्रबळ असते. जसे एका घरास अ-देवदत्त आणि स-देवदत्त दोन्हीही म्हटले गेले तर एखाद्या विचाराने अ-देवदत्तत्व असूनही स-देवदत्तत्त्वाचाच नित्य परिचय राहील. जड जगात आणखी एक उदाहरण देतो–आकाश एक जड द्रव्य आहे. जर त्या आकाशाचादेखील काही आधार असेल, तर तो आधार असून सुद्धा जसा केवळ आकाशाचाच परिचय मिळतो, त्याचप्रकारे अभेद सत्तेमध्ये ज्या नित्य भेदाचा परिचय प्राप्त होतो, तोच त्या वस्तूचा एकमात्र परिचय आहे.

ब्रजनाथ–असे असूनही जिवाचा नित्य स्वभाव आणखी स्पष्ट करण्याची कृपा करावी.

बाबाजी–जीव अणू-चैतन्य, ज्ञान-गुणाने युक्त, 'अहं' शब्द वाच्य, भोक्ता, मन्ता आणि बोद्धा आहे. जिवाचे एक नित्य-स्वरूप आहे. ते नित्य-स्वरूप अत्यंत सूक्ष्म असते. ज्याप्रकारे स्थूल शरीरात हात, पाय, नाक, डोळे इत्यादी अवयव सुंदर रूपाने आपापल्या स्थानी न्यस्त होऊन एका सुंदर रूपास प्रकाशित करतात, त्याचप्रकारे चित्-रूपकणमय शरीरातही चितकणमय अंग-प्रत्यंगांनी गठित सर्वांग सुंदर असे एक चित्-कण स्वरूप प्रकाशित आहे–तेच स्वरूप जिवाचे नित्य स्वरूप आहे. मायाबद्ध असूनही त्याच नित्य-स्वरूपास वरून आणखीही दोन औपाधिक शरीर आच्छादित करतात. औपाधिक शरीरांपैकी एकाचे नाव–लिंगशरीर आणि दुसऱ्याचे नाव स्थूलशरीर. चित्-कण-स्वरूप शरीरावर लिंगशरीराची उपाधी आहे. हे लिंगशरीर जिवांची बद्धदशा प्रारंभ झाल्यापासून ते मुक्त होईपर्यंत अपरिहार्य असते. जन्मांतरसमयी स्थूलशरीराचे परिवर्तन होते, परंतु लिंगशरीराचे परिवर्तन होत नाही. लिंगशरीर एका स्थूल शरीरास सोडताना त्या शरीराच्या समस्त कर्म-वासनांस सोबत घेऊन दुसऱ्या शरीरात प्रवेश करते. वैदिक-पञ्चाग्नि विद्येद्वारे जीव देहांतर आणि अवस्थांतर सिद्ध होतो. छान्दोग्य उपनिषद आणि ब्रह्मसूत्रात चिताग्नी, वृष्ट्याग्नी, भोजनाग्नी, रेतोहवनाग्नी आदी पंचाग्नीच्या प्रणालीचे वर्णन केले गेले आहे. मागील जन्मांच्या संस्कारांनुसार नवीन शरीर प्राप्त झालेल्या जिवांचा स्वभाव घडतो आणि त्या स्वभावानुसार वर्ण प्राप्त करतो. वर्णाश्रमात प्रवेश करून पुन्हा कर्म करू लागतो आणि मृत्यू झाल्यावर पुन्हा तशाच गतीस प्राप्त करतो. नित्यस्वरूपाचे पहिले आवरण लिंगशरीर आणि दुसरे स्थूलशरीर आहे.

ब्रजनाथ–नित्यशरीर आणि लिंगशरीरात काय भेद आहे?

बाबाजी–नित्यशरीर–चित्-कणमय, निर्दोष आणि 'अहं' पदार्थाची यथार्थ वाच्य वस्तू आहे. लिंगशरीर–जड संबंधाने निर्माण होते, जे मन, बुद्धी आणि अहंकार–या तीन विकारांनी गठित होते.

ब्रजनाथ–मन, बुद्धी आणि अहंकार–या काय प्राकृत वस्तू आहेत? जर या प्राकृत आहेत, तर यात ज्ञान आणि क्रिया कशा सिद्ध आहेत?

बाबाजी–

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।**
**अहङ्कार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा॥**[१०]

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम्।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत्॥**[११]

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा॥**[१२]

(गीता ७/४-६)

---

(१०) पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश–हे पाच स्थूल-जड आणि मन, बुद्धी अहंकार–हे तीन सूक्ष्म-जड, असे सर्व मिळून आठ प्रकारची ही माझी अपरा माया प्रकृती आहे.

(११) या अतिरिक्त माझी एक तटस्था-प्रकृतीसुद्धा आहे, जिला परा-प्रकृतीसुद्धा म्हटले जाऊ शकते. ती प्रकृती चैतन्यरूप आणि जीवरूप आहे. तिच्यायोगेच समस्त जीव प्रकाशित होऊन जड-जगास चैतन्यमय करीत असतात. माझ्या अंतरंग-शक्तीद्वारे प्रकटित चित्-जगत आणि बहिरंगाशक्तीद्वारे उत्पन्न जड-जगत–या दोन्ही जगांकरिता उपयोगी असल्याने जीवशक्तीस 'तटस्था' शक्ती म्हटले गेले आहे.

(१२) चित्-अचित् संपूर्ण जड आणि तटस्थ जगत–या दोन प्रकारच्या प्रकृतींच्या योगे उत्पन्न झाले आहे. म्हणून भगवत्स्वरूप मीच चराचर जगाच्या उत्पत्ती आणि प्रलयाचे मूळ कारण आहे.

गीतोपनिषदाच्या या श्लोकांमध्ये चित्-शक्तिमान भगवंताच्या दोन प्रकारच्या प्रकृतींचे वर्णन केले आहे. एकीचे नाव परा-प्रकृती आणि दुसरीचे नाव अपरा-प्रकृती आहे. परा-प्रकृतीस जीवशक्ती आणि अपरा-प्रकृतीस जड वा मायाशक्तीदेखील म्हणतात. जीवशक्ती–चित्-कणमय असते. म्हणून तिचे नाव परा अर्थात श्रेष्ठ शक्ती आहे. मायाशक्ती जड असते. म्हणून तिचे नाव अपरा (श्रेष्ठ नाही) शक्ती आहे. अपराशक्तीपासून जीव बिलकुल भिन्न तत्त्व आहे. अपराशक्तीमध्ये आठ स्थूल तत्त्वे असतात–पृथ्वी, जल, वायू, अग्नी आणि आकाश–ही पंचमहाभूते तसेच मन, बुद्धी आणि अहंकार. जड प्रकृतीच्या अंतर्गत मन, बुद्धी आणि अहंकार–हे तीनही विशेष जडद्रव्य आहेत. यांचा जो ज्ञानाकार दिसून येतो, तो ज्ञान-चित्-स्वरूप नसून जड-स्वरूप असतो. 'मन' जड विषयांकडून जी सर्व प्रतिच्छाया ग्रहण करते, त्यावर ते ज्ञानकांडरूप एका व्यापार स्थापन करते, हा ज्ञानकांडरूप व्यापार जडमूलक असतो, चित्-मूलक नाही. या ज्ञानकांडावर जी वृत्ती सत्-असताचे विवेचन करते, त्यास बुद्धी म्हणतात. ही बुद्धीही जडमूलक असते. उक्त ज्ञानास अंगीकारून ज्या 'अहं' भावाचा प्रादुर्भाव होतो, तोही जडमूलकच असतो, चित्-मूलक नाही. हे तिन्ही मिळून जिवाच्या जड-संबंधमूलक द्वितीय स्वरूपास प्रकाश करतात. या द्वितीय स्वरूपाचे नाव लिंगशरीर आहे. जडबद्ध जिवाच्या लिंगशरीराची 'अहंता' प्रबल होऊन नित्यस्वरूपाच्या 'अंहते'स झाकून टाकते. नित्यस्वरूपात चित्-सूर्य (कृष्ण) याच्या संबंधाने जी 'अहंता' उत्पन्न होते, तीच नित्य आणि शुद्ध अहंता असते.

मुक्तावस्थेत तोच अहंकार परत प्रकट होतो. जोपर्यंत नित्यशरीर लिंगशरीराने झाकलेले असते, तोपर्यंत स्थूल आणि लिंगशरीरगत जडाभिमानच प्रबळ असतो. म्हणून तो पर्यंत चित्-संबंधाभिमान लुप्तप्राय असतो. लिंगशरीर सूक्ष्म असते, म्हणूनच स्थूलशरीर त्यास आच्छादित करून कार्य करते. स्थूलशरीराद्वारे झाकलेले असल्याने स्थूलशरीरगत वर्ण (जाती) आदींचा अहंकार उत्पन्न होतो. यद्यपि मन, बुद्धी आणि अहंकार हे तिन्ही प्राकृत आहेत, तरीही आत्मवृत्तीचा विकार होऊन ते ज्ञानाचा अभिमान करतात.

ब्रजनाथ–मी समजलो, की जिवाचे नित्यस्वरूप चित्-कणमय असते आणि त्या स्वरूपात चित्-कणमय अंगांनी गठित एक सुंदर शरीरदेखील आहे. बद्धावस्थेमध्ये ते चित्-कणमय सुंदर शरीर लिंगशरीराद्वारे आच्छादित असते. जडशरीराद्वारे आच्छादित असल्याने जीव-स्वरूपातही जड-विकार उत्पन्न होतो.

आता मी हे जाणू इच्छितो की–मुक्तावस्थेमध्ये जीव पूर्णपणे निर्दोष असतो का?

बाबाजी–चित्-कणस्वरूप निर्दोष असूनही असंपूर्ण असतो, कारण अत्यंत अणू-स्वरूप असल्याने त्यात दुर्बलता असते. त्या अवस्थेत केवळमात्र हाच दोष दिसून येतो की बलवती मायाशक्तीच्या संसर्गाने जिवाचे चित्-स्वरूप लुप्त होण्यायोग्य असते. श्रीमद्भागवताचे कथन आहे–

**येऽन्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिनस्त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धयः।**
**आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः पतन्त्यधोऽनादृतयुष्मदङ्घ्रयः॥**[१३]

(श्रीमद्भा.१०/२/३२)

म्हणून मुक्तजीव कितीही श्रेष्ठ पद प्राप्त करो, त्यांच्या घडणीची असंपूर्णता नेहमीच त्यांच्यासोबतच राहील. याचेच नाव जीवतत्त्व आहे, म्हणून वेदांमध्ये म्हटले गेले आहे की, ईश्वर मायाधीश आहेत आणि जीव आपल्या सर्व दशांमध्ये मायेच्या अधीन होण्यायोग्य राहतात.

**॥ पंधरावा अध्याय समाप्त ॥**



(१३) हे कमलनयन! आपल्या भक्तांव्यतिरिक्त ज्ञानी, योगी आणि तपस्वी आदी जे लोक स्वतःस खोटेच (उगीचच) मुक्त मानतात, वास्तविक त्यांची बुद्धी बिलकुलच शुद्ध नसते. कारण त्यांच्यात भक्तीचा अभाव असतो. त्यांना अत्यंत कठोर क्लेश सहन करून नाना प्रकारच्या कष्टपूर्ण साधनांद्वारे कल्पित परम पद प्राप्त झाल्यावरही आपल्या चरणकमलांचा अनादर केल्याने अत्यंत पतित व्हावे लागते.

# सोळावा अध्याय (प्रमेयांतर्गत माया-ग्रसित जीवतत्त्वाचे विवेचन)

ब्रजनाथ जीनतत्त्वासंबंधी दशमूलाचा उपदेश ऐकून घरी परतले. आज त्यांना झोपच येत नव्हती. ते बिछान्यावर पडल्या-पडल्या गंभीरतेने विचार करू लागले की, "मी कोण आहे?" या प्रश्नाचे जे उत्तर मी प्राप्त केले, त्यामुळे मी जाणू शकलो की मी श्रीकृष्णरूप चित्-सूर्याचा किरणगत एक कणमात्र आहे. अणू असल्यावरही माझ्यात अस्मदर्थ, ज्ञान-गुण आणि एक बिंदू चिद्गत आनंद आहे. माझे चित्-कणाने बनलेले एक स्वरूप आहे. अत्यंत अणू असूनही ते स्वरूप श्रीकृष्णाच्या मध्यमाकार स्वरूपाच्या अनुरूप आहे. यावेळी मला ते स्वरूप दिसू शकत नाही–हेच माझे दुर्भाग्य आहे. मोठ्या सौभाग्याने त्या स्वरूपाची प्रतीती होते आहे. आपले असे दुर्भाग्य का झाले–यास योग्यप्रकारे जाणण्याची गरज आहे. मी उद्या याविषयी श्री गुरुदेवांकडे जिज्ञासा करीन. असा विचार करताकरता जवळजवळ मध्यरात्री कुठे त्यांना झोप लागली. शेष रात्री त्यांनी स्वप्न पाहिले की त्यांनी संसार त्यागून वैष्णव वेष धारण केला आहे. जागल्यावर त्यांनी विचार केला, "असे वाटते की प्रभू या संसारातून लवकरच माझी मुक्तता करतील."

प्रातःकाली अंगणात बसले होते, त्याचवेळेस काही विद्यार्थी त्यांच्याकडे आले आणि त्यांच्या चरणी प्रणाम करून म्हणाले–आपण आम्हाला बरेच दिवस उत्तम रितीने शिकविले. आपल्या निकट आम्ही न्याय-संबंधी वेगवेगळ्या गूढ शिकवणी प्राप्त केल्या आहेत. आशा आहे की, आता आपण आम्हांस 'न्याय-कुसुमांजली' देखील शिकवाल.

ब्रजनाथांनी मोठ्या विनम्रतेने उत्तर दिले–बंधू! आता माझ्याने अध्यापन कार्य होणार नाही. माझे मन आता तिथे बिलकुल लागत नाही. मी दुसराच कुठलातरी मार्ग स्वीकारण्याचा विचार करीत आहे. या दशेत आपण दुसऱ्या कुण्या अध्यापकाकडे जाऊन अभ्यास करावा.

विद्यार्थ्यांना हे ऐकून खूप दुःख झाले, परंतु ते काय करू शकणार होते? शेवटी ते एकेक करून तेथून उठून चालू लागले. त्याचवेळी श्रीचतुर्भुज मिश्र घटक त्यांच्या घरी आले. त्यांनी ब्रजनाथाच्या आजीकडे (वडलांच्या आईकडे)

ब्रजनाथाच्या विवाहासंबंधी एक प्रस्ताव मांडला–विजयनाथ भट्टाचार्यांस तर आपण जाणताच ना? कुलीनवंश आहे, अवस्थादेखील उत्तम आहे. आपल्यासाठी उपयुक्त घर आहे. आणि सर्वात मोठी गोष्ट ही आहे की कन्या जशी सुंदर आहे, तशीच सुशीलदेखील आहे. भट्टाचार्य, ब्रजनाथशी आपल्या कन्येचा विवाह करताना कुठलीच अट ठेवणार नाहीत. आपण सांगाल त्या रूपात कन्या देण्यास तयार आहेत.

ब्रजनाथाची आजी विवाहाच्या प्रस्तावाने खूपच आनंदित झाली.परंतु, ब्रजनाथ मनोमन खूपच असंतुष्ट झाले. विचार करू लागले–कुठे आई विवाहाची तयारी करीत आहे आणि कुठे मी घरदार सोडण्याचा विचार करतो आहे, यावेळी मला विवाहाच्या गोष्टी बऱ्या वाटतात का?

विवाहाच्या गोष्टीवरून घरात बराच तर्क-वितर्क होऊ लागला. एकीकडे ब्रजनाथची आई, आजी आणि अन्य कुल-वृद्धा तथा दुसरीकडे एकटे ब्रजनाथ. ब्रजनाथ कुठल्याही प्रकारे विवाहास तयार नव्हते आणि वृद्ध स्त्रिया विवाहाकरिता ब्रजनाथावर नाना प्रकारे दबाव टाकीत होत्या. दिवसभर हीच चर्चा सुरू होती. इथे संध्याकाळपासून जो पाऊस सुरू झाला तो रात्रभर थांबण्याचे नावच घेईना. म्हणूनच त्यादिवशी ब्रजनाथाचे मायापुरी जाणे झाले नाही. दुसऱ्या दिवशी विवाहाच्या गोष्टीवरून खूपच बाचाबाची झाल्याने ब्रजनाथाचे भोजनही ठीकठाक झाले नाही. संध्याकाळ होताच ते बाबाजींच्या कुटीवर पोहोचले आणि बाबाजी महाराजांस दंडवत प्रणाम करून त्यांच्याजवळ बसले.

बाबाजी म्हणाले–काल रात्री फारच पाऊस होत होता. म्हणून येऊ शकला नाहीस. आज तुला पाहून मला फारच प्रसन्न वाटते आहे.

ब्रजनाथ–प्रभो! माझ्यावर काही संकटे आली आहेत. असो, त्याविषयी नंतर सांगेन. आता मला हे सांगण्याची कृपा करावी की जीव जेव्हा शुद्ध चित् पदार्थ आहे, तेव्हा त्याची संसाररूप दुर्गती का होते?

बाबाजी हसत म्हणाले–

**स्वरूपार्थैर्हीनान् निजसुखपरान् कृष्णविमुखान्**
**हरेर्माया दण्ड्यान् गुणनिगडजालैः कलयति।**

**तथा स्थूलैर्लिङ्गैर्द्विविधावरणैः क्लेशनिकरै-**
**र्महाकर्मालानैर्नयति पतितान् स्वर्गनिरयौ ॥**

(दशमूल ६)

जीव स्वरूपतः कृष्णाचा नित्यदास आहे. कृष्णदास्य हाच त्याचा स्वरूपधर्म आहे. त्या स्वरूपधर्मरहित, निज सुखपर कृष्ण-विमुख जीवांस दण्ड देण्याकरिता भगवंताची मायाशक्ती त्यांना सत्त्व, रज आणि तमोगुणरूपी साखळीने बांधून टाकते आणि स्थूल तथा लिंगशरीराने जीव-स्वरूपास आच्छादित करून तथा दुःखपूर्ण कर्म-बंधनात टाकून स्वर्ग आणि नरकात त्यांना सुख आणि दुःख भोगवीत फिरवते.

गोलोक वृन्दावनात वृन्दावनबिहारी श्रीकृष्णाच्या सेवेकरिता श्री बलदेव प्रभुद्वारे आणि परव्योम वैकुण्ठात वैकुण्ठाधिपती नारायणाच्या सेवेकरिता श्रीसंकर्षणाद्वारे प्रकटित नित्यपार्षद जीव अनंत आहेत. ते नित्यकाळपर्यंत उपास्याच्या सेवेत रसिक असतात. सर्वथा स्वरूपात स्थित असतात, उपास्यास सुखी ठेवण्यात सदा तत्पर असतात, उपास्याच्या प्रती सर्वदा उन्मुख राहतात. चित्-शक्तीचे बळ प्राप्त करून सदैव बलवान राहतात. त्यांचा जड मायेशी काहीच संबंध नसतो. ते लोक हेही जाणत नाहीत की, 'माया' नामक कुठली शक्तीदेखील आहे की नाही. कारण ते चिन्मंडळात वास करतात. माया त्यांच्यापासून अत्यंत दूर असते. ते सदासर्वकाळ उपास्याच्या सेवा-सुखात निमग्न राहतात. ते जड सुखदुःखाच्या पलीकडले तथा नित्यमुक्त असतात. प्रेमच त्यांचे जीवन असते; शोक, मरण आणि भय हे सर्व काय आहे–याची त्यांना थोडीसुद्धा माहिती नसते.

कारणाब्धिशायी महाविष्णूच्या मायेप्रतीच्या ईक्षण-रूप किरणगत अणुचैतन्य जीवदेखील अनंत आहेत. मायेजवळच स्थित असल्याने जीव मायेची विचित्रता पाहतात. साधारण जिवांची समस्त लक्षणे जी आधीच सांगितली आहेत–यांच्याच दिसून तर येतात. तथापि त्यांचा स्वभाव अत्यंत अणू-क्षुद्र असल्याने ते तटस्थ भावाने कधी चित्-जगाकडे तर कधी मायिक जगाकडे दृष्टीपात करतात. तटस्थावस्थेत जीव अत्यंत दुर्बळ असतो. कारण तोपर्यंत त्यास सेव्य वस्तूच्या कृपेने चित्-बल प्राप्त होत नाही. या अनंत जीवांमधून जे जीव मायेचा भोग करू इच्छितात, ते विषयांमध्ये आसक्त होऊन मायेद्वारे नित्य बद्ध होऊन जातात आणि जे जीव सेव्य वस्तूचे चित्-अनुशीलन करतात, ते सेव्यतत्त्वाच्या कृपेने चित्-शक्तीचे बळ प्राप्त

करून चिद्धामात गमन करतात. बाबा! आपले मोठे दुर्भाग्य आहे की आपण कृष्णाची सेवा विसरून मायेच्या बंधनात पडलो आहोत. म्हणूनच स्वरूपार्थाने रहित झाल्यानेच आपली ही दुर्दशा झाली आहे.

ब्रजनाथ–प्रभो! तटस्थ स्वभावस्थित संधिस्थानाहून काही जीव मायिक जगात का गेले आणि काही चित्-जगात का गेले?

बाबाजी–कृष्ण-स्वरूपाचे लक्षणसमूह जीव-स्वरूपातही अणू मात्रेत प्राप्त होतात. कृष्णाच्या स्वेच्छामयतेचे अणू लक्षण अर्थात स्वतन्त्र वासना जीवांमध्ये नित्य सिद्ध आहे. त्या स्वतन्त्र वासनेने सत् व्यवहार केल्याने जिवाचे कृष्ण-सान्मुख्य योग्य राहते, परंतु तिच्या असत् व्यवहाराने जीव कृष्णापासून विमुख होतो. हीच विमुखता जिवाच्या हृदयात माया भोग करण्याची कामना निर्माण करते. फलस्वरूप ज्यावेळी जीव मायेचा भोग करण्याची आकांक्षा ठेवतो, त्याचवेळी त्यात हा तुच्छ अहंकार येतो की, "मी जड विषयांचा भोक्ता आहे" आणि अविद्या, अस्मिता आदी पंचपर्वा अविद्यागुण[(१)] जिवाच्या शुद्ध-चित्-कणस्वरूपास आच्छादित करतात. स्वतन्त्र वासनेचा सत् व्यवहार अथवा असत् व्यवहारच आपल्या मुक्त अथवा बद्ध होण्याचे एकमात्र कारण आहे.

ब्रजनाथ–कृष्ण परम करुणामय आहेत. मग त्यांनी जीवास इतके दुर्बल का बनविले, ज्यामुळे तो मायेत फसला?

बाबाजी–कृष्ण करुणामय आहेत, हे बरोबर आहे. तथापि ते लीलामयसुद्धा आहेत. भिन्न-भिन्न अवस्थांमध्ये भिन्न-भिन्न प्रकारच्या लीला होतील, असा विचार करून श्रीकृष्णाने जिवास तटस्थावस्थेपासून परमोच्च महाभावादिपर्यंत उन्नत पदाकरिता उपयोगी बनविले आहे तथा या उपयोगितेच्या सुविधा आणि दृढतेकरिता अत्यंत खाली मायिक जडापासून अहंकारापर्यंत परमानंदाच्या प्राप्तीमध्ये अनंत बाधा-स्वरूप मायिक निम्नस्तरांचीदेखील सृष्टी केली आहे. मायाबद्ध जीव स्वरूपापासून विच्युत, निजसुखकर आणि कृष्णविमुख असतात. जीव या अवस्थेत जितके अधिक खाली पडत जातात, करुणावरुणालय श्रीकृष्ण आपल्या धाम आणि पार्षदांसोबत त्याच्यासमोर आविर्भूत होऊन त्यांना उच्चगती प्राप्त करण्याचा तितकाच

---

(१) पंचपर्वा अविद्या–तमः, मोह, महामोह, तमिश्र आणि अन्धतमिश्र.

अधिक सुयोग प्रदान करतात. जे जीव या सुविधा ग्रहण करून उच्चगतीस प्राप्त करण्याचा प्रयत्न करतात, ते क्रमशः चिन्मयधामापर्यंत पोहोचतात आणि तेथे नित्य पार्षदांच्या अवस्थेसारखी अवस्था प्राप्त करतात.

ब्रजनाथ–ईश्वरी लीलेकरिता दुसरे जीव का कष्ट भोगतात?

बाबाजी–जीवांमध्ये स्वतन्त्र वासना असणे, त्यांच्यावर भगवंताच्या विशेष कृपेचा परिचय आहे. कारण स्वतन्त्र वासनेच्या अभावात जड वस्तू नितांत हेय आणि तुच्छ असतात. स्वतन्त्र-वासनेमुळेच जिवाने जड जगाची प्रभुता प्राप्त केली आहे. 'क्लेश' आणि 'सुख' मनाच्या गती आहेत. आपण ज्यांना क्लेश मानतो, आसक्त व्यक्ती त्यांनाच 'सुख' म्हणतात. समस्त प्रकारच्या विषय-सुखांचा अंतिम परिणाम दुःखाव्यतिरिक्त अन्य काहीच नसतो. विषयासक्त मनुष्य शेवटी दुःखच प्राप्त करतात.

तेच दुःख अत्याधिक झाल्यावर सुख मिळविण्याची वासना जन्म घेते. मग वासनेने विवेक आणि विवेकाने जिज्ञासा उत्पन्न होते. जिज्ञासेची भावना उत्पन्न झाल्याने साधुसंग प्राप्त होतो. साधुसंगामुळे श्रद्धा उत्पन्न होते. श्रद्धा उत्पन्न झाल्यावर जीव उन्नत सोपानावर (भक्तिमार्गावर) आरूढ होतो. ज्याप्रमाणे सोने आगीत तापल्यावर हातोडीने ठोकल्यावर निर्मळ होते, त्याचप्रकारे जीवसुद्धा माया भोग आणि कृष्ण-विमुखता रूपी मलाने युक्त झाल्यावर मायिक जगत्‌रूप पीठ अर्थात आधारावर क्लेशरूपी हातोडीने ठोकून-ठोकून शुद्ध केला जातो. म्हणून बहिर्मुख जिवाचा क्लेश शेवटी सुखदायी असतो. म्हणूनच क्लेश भगवंताच्या करुणेचे निदर्शन स्वरूप आहे. अतः कृष्णलीलेमध्ये जीवांस जो क्लेश दिसतो, तो दूरदर्शी व्यक्तींना मंगलप्रद प्रतीत होतो तथा अदूरदर्शी व्यक्तींकरिता क्लेशप्रद असतो.

ब्रजनाथ–जिवाच्या बद्धावस्थेचा क्लेश यद्यपि शेवटी शुभदायक असतो, तथापि वर्तमान अवस्थेत अत्यंत कष्टदायक असतो. सर्वशक्तिमान कृष्ण या कष्टप्रद मार्गाअतिरिक्त दुसरा कुठला पथ काढू शकत नाहीत का?

बाबाजी–कृष्णलीला मोठी विचित्र आणि अनेक प्रकारची असते. हीदेखील त्यांच्या अनेक प्रकारच्या लीलांपैकी एक लीला आहे. स्वेच्छामय पुरुष जेव्हा सर्व प्रकारच्या लीला करतात, तेव्हा मग या लीलेस तरी का सोडतील? सर्व प्रकारच्या विचित्रतांस कायम ठेवण्याकरिता (चालू ठेवण्याकरिता) कुठली एक लीला सोडता

येत नाही. याव्यतिरिक्त दुसऱ्या प्रकारच्या लीला केल्यावरही त्या लीलेच्या उपकरणांस कशा ना कशा प्रकारे कष्ट अवश्य स्वीकारावे लागतात. श्रीकृष्ण पुरुष आणि कर्ता आहेत. समस्त उपकरण पुरुषाच्या इच्छेच्या अधीन असतात तथा कर्तारूप पुरुषाचे कर्मरूप विषय आहेत. कर्त्याच्या इच्छेच्या अधीन असल्याने काही ना काही कष्ट प्राप्त होणे स्वाभाविकच आहे. परंतु ते कष्ट जर शेवटी सुखकारक असतील, तर ते कष्ट–कष्ट राहत नाहीत. तू त्यांना कष्ट म्हणतोस? कृष्णलीलेच्या पोषकतेकरिता जे कष्ट दृष्टीस पडतात, ते जिवांकरिता परम सुखमय असतात. श्रीकृष्णामध्ये जो सुखाचा अंश आहे, त्यास सोडून स्वतन्त्र-वासनेने युक्त जिवाने मायाभिनिवेशजन्य क्लेश स्वीकारले आहेत–यात जर कुणाचा दोष आहे तर तो जिवाचाच आहे–कृष्णाचा नाही.

ब्रजनाथ–जर जिवास स्वतन्त्र वासना दिली गेली नाही, तर काय हानी झाली असती? कृष्ण सर्वज्ञ आहेत. म्हणून ते हे जाणतात की जिवास स्वातंत्र्य दिल्याने तो कष्टच भोगेल. तरीही त्यांनी जाणूनबुजून त्यास स्वतन्त्रता दिलीच आहे. अशा दशेत जिवांच्या कष्टांकरिता कृष्ण दायी (जबाबदार) आहेत की नाहीत?

बाबाजी–स्वातंत्र्य एक अमूल्य रत्न आहे. या स्वातंत्र्याच्या अभावात जडपदार्थ तुच्छ आणि हीन आहेत. जर जिवालाही ही अमूल्य स्वातंत्र्य मिळाले नसती, तर तोदेखील जडपदार्थांप्रमाणेच एक हेय-हीन आणि तुच्छ पदार्थ ठरला असता. जीव चित्-कण पदार्थ आहे. म्हणून चित्-पदार्थाचे समस्त गुणधर्म अणुचित् जिवामध्ये अवश्य आढळतात; परंतु फरक हा आहे की पूर्ण चित्-पदार्थात जे सर्वधर्म पूर्ण रूपात प्राप्त होतात, अणुचित्-पदार्थ जिवात ते अत्यंत क्षुद्र परिमाणात असतात. चित्-पदार्थात एक विशेष धर्म असतो, ज्यास ‘स्वतन्त्रता’म्हणतात. पदार्थाच्या त्या धर्मास पदार्थापासून वेगळे करता येत नाही. म्हणून जीव ज्या परिमाणात अणू असतो, त्याच अनुपातात त्यात ‘स्वतन्त्रता’ रूप धर्म आवश्यक असतो. याच स्वतन्त्रतेमुळे जीव जड जगामध्ये सर्वश्रेष्ठ पदार्थ आहे आणि समस्त जड-जगाचा स्वामी आहे. अशा स्वातंत्र्याने युक्त जीव कृष्णाचा प्रिय सेवक आहे. जीव जेव्हा आपल्या स्वातंत्र्याचा अपव्यवहार करून मायेप्रती अभिनिविष्ट होतो, तेव्हा करुणामय कृष्ण जिवाचे अमंगल होताना पाहून रडत-रडत त्याच्या मागे मागे त्याच्या उद्धाराकरिता जड जगात येतात. जीव कृष्णाच्या अमृतमयी लीलांस जडजगात प्राप्त करू शकत नाही, म्हणूनच श्रीकृष्ण दया करून प्रपंचात आपल्या लीलांना उदित

करवितात. इतकी दया दाखविल्यानंतरही जेव्हा जीव त्या लीलातत्त्वास समजण्यास असमर्थ असतो, तेव्हा श्रीकृष्ण श्रीनवद्वीपात अवतीर्ण होऊन गुरुरूपात परम उपाय स्वरूप आपले नाम, रूप, गुण आणि लीला-कथांची स्वयं व्याख्या करतात तथा स्वयं आचरण करून जीवांस तसे करण्याची प्रेरण आणि उपदेश देतात. बाबा! अशा दयामय श्रीकृष्णावर तुम्ही कसल्या प्रकारचे दोषारोपण करू शकता काय? त्यांची करुणा अपार आहे, परंतु आपले दुर्दैव अत्यंत शोचनीय आहे.

ब्रजनाथ–मग काय मायाशक्तीच आपल्या दुर्दशेचे कारण आहे? जर सर्वशक्तिमान आणि सर्वज्ञ श्रीकृष्ण मायेस जीवांपासून दूर ठेवतील तर जीवांस असे कष्ट, दुःख का होतील?

बाबाजी–माया स्वरूपशक्तीची छाया आहे. म्हणून ती स्वरूपशक्तीचा विकार आहे. अनुपयुक्त जीवांवर संस्कार करण्याकरिता ती भट्टी-स्वरूप आहे. अर्थात त्यांना उपयुक्त बनविण्याचा उपाय आहे. माया कृष्णाची दासी आहे. ती कृष्ण-विमुख जीवांना शासित करून तथा त्यांची चिकित्सा करून त्यांना शुद्ध करते. “मी कृष्णाचा नित्य दास आहे”–हे विसरणेच चित्कण-स्वरूप जिवाचा अपराध आहे. या अपराधाकरिता माया पिशाची जिवास दण्ड देते. हे मायिक जगत कारागृह आहे. या कारागृहाची रक्षयित्री माया आहे. माया या कारागृहात कृष्ण-विमुख जीवांस बंद करून दण्ड प्रदान करते. जसे राजा प्रजेच्या भल्याकरिता कारागृह निर्माण करतो, तसेच भगवंतही जीवांप्रती अपार करुणा प्रकाशित करीत जड-जगत रूपी कारागृहाची स्थापना करतात तथा जड-मायेस या कारागृहाची रक्षयित्री म्हणून नेमलेले आहे.

ब्रजनाथ–जर जड-जगत कारागृह आहे, तर त्यासोबत साखळी (बेडी-हाथकडी) पण हवी. ती बेडी काय आहे?

बाबाजी–मायिक बेड्या तीन प्रकारच्या असतात–सत्वगुणाने बनलेली बेडी, रजोगुणाने बनलेली बेडी आणि तमोगुणाने बनलेली बेडी. माया अपराधी जीवांस आपल्या याच तीन प्रकारच्या बेड्यांमध्ये बांधून ठेवते. प्रत्येक जीव, मग तो तामसिक असो वा राजसिक असो अथवा सात्त्विकही का नसो, मायेच्या बेडीत बांधलेला आहे. बेडी सोन्याची असो, चांदीची असो अथवा लोखंडाची–विभिन्न धातूंद्वारे बनलेली असूनही तिने बद्ध झाल्यावर जे कष्ट होतात, त्यात काहीच अंतर नसते.

ब्रजनाथ–मायेची बेडी चित् कण-विशेष जीवांस कशाप्रकारे बांधू शकते?

बाबाजी–मायिक वस्तू चित्-वस्तूंस स्पर्श करण्यास असमर्थ असते. परंतु "मी मायेचा भोक्ता आहे", जीव जेव्हा असा अभिमान करतो–त्याचवेळी जिवाचे अणुचित्-स्वरूप जड-अहंकाररूप लिंग (सूक्ष्म) शरीराने आवृत होते. सूक्ष्मशरीराद्वारे आवृत जिवाच्या दोन्ही पायांत मायिक बेड्या पडतात. सात्त्विक अहंकारयुक्त उच्चतर लोकांत वास करणाऱ्या जीवांस देवता म्हणतात. त्यांच्या पायांत सोन्याच्या अर्थात सात्त्विक बेड्या असतात. राजस–जीव देवता आणि मानव भाव मिश्रित असतात. त्याच्या पायांत चांदीच्या अर्थात राजसी बेड्या असतात आणि तामसिक जीव पंच 'म'-कारगत जडानंदात मत्त राहतात. त्यांच्या पायांत लोखंडाच्या अर्थात तामसिक बेड्या असतात. त्या बेड्यांमध्ये जखडलेले जीव तुरूंगातून बाहेर पडू शकत नाहीत–नाना प्रकारच्या यंत्रणांस भोगत असतानाही त्यातच आबद्ध असतात.

ब्रजनाथ–मायेच्या तुरुंगात बद्ध जीव काय काय कर्म करतात?

बाबाजी–सर्वप्रथम जीव आपल्या मायिक भोग प्रवृत्तीनुसार अशी काही कर्मे करतात, ज्यायोगे ते आपल्या मनोवांछित भोगांस प्राप्त करू शकतात आणि मग दुसरे असे की मायिक श्रृंखलेत बद्ध असल्याने त्यांस जे कष्ट प्राप्त होतात, त्यांस दूर करण्याचे ते प्रयत्न करतात.

ब्रजनाथ–कृपया प्रथम प्रकारच्या कर्मांस विस्तारपूर्वक सांगा.

बाबाजी–जडीय स्थूल शरीरच स्थूल आवरण आहे. स्थूल आवरणाच्या सहा अवस्था असतात–जन्म, त्याचे अस्तित्व, ऱ्हास, वृद्धी, परिणाम आणि क्षय. हे सहा प्रकारचे विकार स्थूलशरीराचे धर्म आहेत. भूक, तहान–हे सर्व जड शरीराचे अभाव आहेत. जडशरीरात स्थित जीव आपल्या भोग-वासनांद्वारे परिचालित होऊन आहार, निद्रा आणि संग आदींच्या वशीभूत होतो. मायिक विषयांचा भोग करण्याकरिता जीव नाना प्रकारची काम्य कर्मे करतो. स्थूलशरीराच्या जन्मापासून चितारोहणापर्यंत दहा प्रकारच्या कर्मांचे अनुष्ठान करतो. वेद-विहित अठरा प्रकारच्या आणखीही कर्मांचे आचरण करतो. तो या कर्मांद्वारे पुण्य संचय करून स्वर्गात देवभोग्य भोगांस आणि मर्त्यलोकात ब्राह्मण आदी उच्चकुळात जन्म घेऊन सांसारिक सुखांचा उपभोग करण्याच्या आशेने कर्म मार्गात प्रवृत्त होतो. दुसरीकडे बद्ध जीव

अधर्माचा आश्रय घेऊन नाना प्रकारच्या पाप कर्मांद्वारे इंद्रिय-सुखांना भोगतो. पहिल्या प्रकारचे जीव पुण्यजनक कर्मांद्वारे स्वर्गादिंमध्ये गमन करून देवभोग्य विषयांचा भोग करतात तथा भोग काळ समाप्त झाल्यावर पुन्हा मृत्युलोकात मनुष्यादी शरीर प्राप्त करतात. शेषोक्त प्रकारचे जीव पाप आचरणाने नरकात नाना-प्रकारच्या यातनांचा भोग करून पुन्हा मृत्युलोकात जन्म घेतात. अशा प्रकारे मायाबद्ध जीव विषय सुखांचा भोग करण्याकरिता कर्मचक्रात फसून इकडे-तिकडे फिरत असतात. अधूनमधून आपल्या पुण्यजनक कर्मांच्या फळाने काही नश्वर सुख भोग आणि पाप कर्मांच्या फळाने दुःख भोगही करीत असतात.

ब्रजनाथ–दुसऱ्या प्रकारच्या कर्मांनाही स्पष्ट करावे.

बाबाजी–स्थूलशरीरात स्थित जीव स्थूलशरीरगत नाना प्रकारच्या अभावांच्या जाळ्यात सापडून खूप कष्ट भोगतो. तो या कष्टांस दूर करण्याकरिता नाना प्रकारची कर्मे करतो. तहानभुकेच्या कष्टास दूर करण्याकरिता खाद्य आणि पेय पदार्थांचा संग्रह करतो. ही द्रव्ये अत्यंत सहजच मिळू शकतील–याकरिता तो जीव तोडून परिश्रम करून धन संचय करतो. थंडीपासून वाचण्याकरिता गरम वस्त्रांचा संग्रह करतो, इंद्रिय-सुखाची वासना शमविण्याकरिता विवाह करतो. कुटुंब आणि संतान आदींच्या भरण-पोषणाकरिता, त्यांच्या अभावांस दूर करण्याकरिता अथक परिश्रम करतो, स्थूलशरीरात रोग निर्माण झाल्यावर ते दूर करण्याकरिता औषधीचा प्रयोग करतो, विषयांच्या सुरक्षेकरिता इतरांबरोबर लढाई-भांडण करतो आणि न्यायालयात उपस्थित होतो. काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मात्सर्य–या षड्रिपूंच्या अधीन होऊन युद्ध, कलह, हिंसा आणि चोरी आदी दुष्कर्मांत प्रवृत्त होतो. सुखपूर्वक रहाण्याकरिता सुंदर-सुंदर भवनांची निर्मिती करतो–ही सर्व कर्मे अभावांच्या निवृत्तीकरिता असतात. भोग प्रवृत्ती आणि अभाव निवृत्तीच्या कार्यांमध्येच मायाबद्ध जीवांचे सर्व आयुष्य निघून जाते.

ब्रजनाथ–जर मायादेवी जीव-स्वरूपास केवळ सूक्ष्मशरीराद्वारेच आच्छादित करते, तर त्यांचे उद्देश पूर्ण होत नाही का?

बाबाजी–सूक्ष्म शरीराने कार्य होत नाही. म्हणूनच स्थूल आवरणाची आवश्यकता असते. स्थूलशरीराने जी कार्ये केली जातात,त्यामुळे सूक्ष्मशरीरात

वासना निर्माण होतात. पुन्हा त्या वासनांचा भोग करण्याकरिता उपयोगी स्थूलशरीराची प्राप्ती होते.

ब्रजनाथ–कर्म आणि फळ–हे दोन्ही एकत्रितपणे कसे काय संयुक्त असतात? मीमांसकांचे म्हणणे आहे की वास्तविक फलदाता 'ईश्वर' नामक कुणी पदार्थच नाही, ईश्वर एक कल्पित पदार्थ आहे. केलेल्या कर्मांनी एक तत्त्व उत्पन्न होते, ज्यास अपूर्व म्हणतात, हे 'अपूर्व'च समस्त कर्मांचे फळ प्रदान करते. हे सत्य आहे का?

बाबाजी–कर्म-मीमांसक वेदांच्या सिद्धांताशी परिचित नसतात. त्यांनी वेदांमध्ये ढोबळमानाने यज्ञादी कर्मांचा भाव पाहून एक वरवरचा सिद्धांत घडविला आहे. वास्तविक जिथपर्यंत सिद्धांताचा प्रश्न आहे, वेदांमध्ये कुठेही असा सिद्धांत आढळत नाही. वेदांमध्ये ईश्वरास स्पष्टपणे कर्म-फलदाता म्हटले आहे. याविषयी वेदांमध्ये हे स्पष्ट मत आहे–

**द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषष्वजाते।**
**तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्यनश्नन्नन्योऽभिचाकशीती॥**[२]

(श्वे.उ. ४/६, मु.उ. ३/१/१, ऋग्वेद १/१६४/२१)

या वेद मंत्राचा भावार्थ हा आहे की संसाररूपी पिंपळाच्या वृक्षावर दोन पक्षी बसलेले आहेत–एक बद्धजीव, दुसरा त्याच्या मित्राच्या रूपात–ईश्वर. बद्धजीवरूपी पक्षी संसाररूपी वृक्षाच्या फळांस चाखतात आणि ईश्वररूपी पक्षी त्या फळांचा स्वयं उपभोग न करता जीवरूपी पक्षाच्या आस्वादनाचे कार्य पाहतो. तात्पर्य हे आहे की जीव मायेद्वारे बद्ध होऊन कर्म करतात आणि कर्मांची फळे भोगतात. मायाधीश ईश्वर जिवास त्याच्या कर्मानुसार फळ देतात. त्यांची तशी लीला तोपर्यंत चालत राहते, जोपर्यंत जीव भगवत्-सान्मुख्य प्राप्त करीत नाही. आता तूच विचार कर–येथे मीमांसकांचे 'अपूर्व' गेले कुठे? निरीश्वर सिद्धांत कधीही सर्वांग सुंदर नसतो.

ब्रजनाथ–आपण कर्मांस अनादी का म्हटले आहे?

---

(२) क्षीरोदशायी पुरुष आणि जीव या अनित्य संसाररूप पिंपळाच्या वृक्षावर सख्याप्रमाणे वास करतात. या दोघांपैकी एक अर्थात जीव आपल्या कर्मानुसार त्या वृक्षाच्या फळांस चाखत असतो आणि दुसरा अर्थात परमात्मा त्या फळांचा उपभोग न करता साक्षी स्वरूप केवळ पाहत असतो.

बाबाजी–समस्त कर्मांची जड कर्म वासना असते आणि कर्मवासनेचे मूळ अविद्या आहे. "मी कृष्णाचा दास आहे"–याची विस्मृती होण्याचे नावच 'अविद्या' आहे, या अविद्येची उत्पत्ती जड-काळात नाही. ती 'तटस्थ'–संधी स्थानी उदित झाली होती. म्हणूनच जड काळात कर्माचे मूळ प्राप्त होत नाही. हेच कारण आहे की कर्मांस अनादी म्हटले गेले आहे.

ब्रजनाथ–माया आणि अविद्येत काय अंतर आहे?

बाबाजी–माया कृष्णाची शक्ती आहे, श्रीकृष्णाने त्या मायाशक्तीद्वारे जड ब्रम्हांडाची सृष्टी केली आहे आणि बहिर्मुख जिवास शुद्ध करण्याकरिता मायाशक्तीस क्रियावती बनविले आहे. मायेच्या दोन प्रकारच्या वृत्ती असतात–अविद्या आणि प्रधान. 'अविद्या' वृत्ती जीवनिष्ठ आहे आणि 'प्रधान' वृत्ती जडनिष्ठ आहे. प्रधानामुळेच समस्त जड जगत उत्पन्न झाले आहे तथा अविद्येने जिवाची कर्म-वासना जन्मास येते. मायेचे आणखीही दोन विभाग आहेत–विद्या आणि अविद्या. या दोघांचा संबंध जिवाशी असतो अर्थात ते विभाग जीवनिष्ठ आहेत. अविद्या-वृत्तीने जिवाचे बंधन होते आणि विद्या-वृत्तीद्वारे जिवाची मुक्ती होते. अपराधी जीव ज्यावेळी कृष्णोन्मुख होतो, त्यावेळी त्याच्यात विद्या-वृत्तीची क्रिया आरंभ होते. परंतु जोपर्यंत तो श्रीकृष्णास विसरलेला असतो, तोपर्यंत त्याच्यात अविद्या वृत्तीचीच क्रिया चालत राहते. ब्रह्मज्ञान आदी विद्या वृत्तीचीच क्रिया विशेष आहेत. विवेकाच्या प्रथम भागात जिवाच्या शुभ कृतींचा प्रादुर्भाव होतो आणि अंतिम भागात सुज्ञानाचा उदय होतो. अविद्या जिवास आवृत करते आणि विद्या–त्या आवरणास दूर करते.

ब्रजनाथ–प्रधानाची क्रिया कशी होते?

बाबाजी–ईश्वर-चेष्टारूप काळाद्वारे माया-प्रकृती क्षोभित झाल्यावर सर्वप्रथम महत्तत्व उत्पन्न होते. मायेच्या ज्या वृत्तीचे नाव 'प्रधान' आहे, ती क्षोभित झाल्यावर द्रव्यांची सृष्टी होते. महत्तत्त्वाचा विकार उत्पन्न झाल्यावर 'अहंकार' होतो. अहंकाराच्या तामस विकाराने 'आकाश' निर्माण होते. आकाश विकृत झाल्यावर 'वायू' आणि वायूच्या विकाराने 'तेज' निर्माण होते. पुन्हा तेजाच्या विकाराने जल आणि जल विकृत झाल्यावर पृथ्वी निर्माण होते. जड द्रव्यांची अशा प्रकारे सृष्टी झाली आहे. याचे नाव पंच-महाभूत आहे.

आता पंचतन्मात्रांची सृष्टि-प्रणाली ऐक–काळ प्रकृतीच्या अविद्यारूप वृत्तीस क्षोभित करून महत्तत्त्वाच्या 'ज्ञान' आणि 'कर्म' भावास निर्माण करतो. महत्तत्त्वाचा कर्म भाव विकृत होऊन सत्त्व आणि रजोगुणातून ज्ञान आणि क्रियेची निर्मिती करतो. त्याचप्रकारे महत्तत्त्व ही विकृत होऊन अहंकार होतो. अहंकाराचा विकार झाल्यावर बुद्धी उत्पन्न होते. बुद्धी विकृत झाल्यावर आकाशाचा 'शब्द' गुण निर्माण करते. शब्द गुणाच्या विकाराने स्पर्श गुण उत्पन्न होतो. यात वायुचा स्पर्श गुण आणि आकाशाचा शब्द गुण दोन्हीही असतात. यापासून प्राण, ओज आणि बळाची सृष्टी होते. स्पर्श गुण विकृत झाल्यावर तेज पदार्थात रूप, स्पर्श आणि शब्द गुण उत्पन्न होतात, त्या गुणाचे काल द्वारा विकार झाल्यावर जलात रस, रूप, स्पर्श आणि शब्द गुणांचा प्रादुर्भाव होतो. त्या विकाराने पृथ्वीमध्ये गंध, रस, रूप, स्पर्श आणि शब्द गुण उत्पन्न होतात. या विकार क्रियेत चैतन्यरूप पुरुषाची यथायोग्य सहाय्यता असते.

अहंकार तीन प्रकारचा असतो–वैकारिक, तैजस आणि तामस. वैकारिक अहंकाराने द्रव्यांची उत्पत्ती होते, तैजस अहंकाराने दहा इंद्रिये निर्माण होतात. इंद्रिये दोन प्रकारची असतात–ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये. चक्षू, कर्ण, नासिका, जिव्हा आणि त्वचा–ही पाच ज्ञानेंद्रिये आहेत; वाणी, हात, पाय, गुदा, उपस्थ–ही पाच कर्मेंद्रिये आहेत. अशा प्रकारे महाभूत आणि सूक्ष्म भूत, हे सर्व एकत्रित झाल्यावरही कोणतेच कार्य होत नाही, जोपर्यंत त्यात अणुचित् जीव प्रवेश करीत नाही. परंतु महाभूत आणि स्थूल भूताने बनलेल्या शरीरात अणुचित् जीव जसा प्रवेश करता क्षणीच सगळे कार्यरत होतात. वैकारिक तैजस गुण, 'प्रधान' विकृत तामस वस्तुसोबत मिळून कार्य करण्याकरिता उपयुक्त होतात. अशा प्रकारे अविद्या आणि प्रधानाच्या क्रिया होतात.

मायिक तत्त्वे २४ प्रकारची असतात. पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश–ही पंचमहाभूते; गंध, रस, रूप, स्पर्श आणि शब्द–या पाच तन्मात्रा, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये; मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार–ही २४ तत्त्वे प्राकृत तत्त्वे आहेत. या चोवीस तत्त्वांनी घडलेल्या शरीरात प्रविष्ट अणुचैतन्य जीव पंचविसावे तत्त्व आहे तथा परमात्मा ईश्वरच २६वे तत्त्व आहे.

ब्रजनाथ–साडेतीन हात लांब या शरीरात सूक्ष्मशरीराचा भाग किती आणि स्थूलशरीराचा भाग किती आहे तसेच या शरीराच्या कुठल्या भागात जीव चैतन्य वास करते?

बाबाजी–पंचमहाभूते, पंचतन्मात्रा, दहा इंद्रिये–हे सगळे म्हणजे स्थूल शरीर आहे. मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार–हे सर्व सूक्ष्म अर्थात लिंग शरीरात जे 'मी' आणि 'माझे' असा मिथ्याभिमान करतात तथा त्या मिथ्याभिमानामुळे जे सर्वार्थाने च्युत होतात, ते जीव-चैतन्य आहेत. ते अत्यंत सूक्ष्म आणि जडीय देश, काळ आणि गुणांच्या पलीकडील असतात. म्हणूनच अत्यंत सूक्ष्म असूनही सर्व शरीरात त्याची सत्ता व्याप्त होते. जसे 'हरिचन्दन बिंदू' [३] शरीराच्या कुठल्या एखाद्या भागावर लावल्याने संपूर्ण शरीरात सुख व्याप्त होते. त्याचप्रमाणे अणुमात्र जीव ही समस्त शरीराचा क्षेत्रज्ञ आणि सुख-दुःखाचा अनुभवकर्ता आहे.

ब्रजनाथ–जर जीव कर्मांचा आणि सुख-दुःखांचा अनुभवकर्ता ठरतो, तर ईश्वराचे कर्तृत्वच काय राहिले?

बाबाजी–जीव-हेतूकर्ता आहे आणि ईश्वर-प्रयोजककर्ता आहे. जीव आपल्या कर्मांचा कर्ता होऊन ज्या फळांना भोगण्याचा अधिकारी असतो तथा ज्या पुढच्या कर्मांकरिता तो उपयोगी बनतो, त्या फळांस भोगण्यात तथा कार्यांस करण्यात ईश्वर प्रयोजक कर्ता आहे. ईश्वर–फलदाता आहे, जीव–फलभोक्ता आहे.

ब्रजनाथ–मायाबद्ध जिवांच्या किती प्रकारच्या अवस्था आहेत?

बाबाजी–पाच प्रकारच्या अर्थात आच्छादित चेतन, संकुचित चेतन, मुकुलित चेतन आणि पूर्ण विकसित चेतन.

ब्रजनाथ–कोणकोणते जीव आच्छादित चेतन आहेत?

बाबाजी–वृक्ष, लता, तृण, पाषाण या योनींस प्राप्त झालेल्या जिवांस आच्छादित चेतन म्हटले आहे. हे जीव कृष्णदास्यास विसरून मायेच्या जडीय

---

(३) अविरोधश्चन्दनवत् (ब्रह्मसूत्र २/३/२२) आहे. या सूत्राच्या बलदेवकृत 'गोविन्द भाष्या'ची व्याख्या–एकदेशस्थस्यापि हरिचन्दनविन्दोः सकलदेहाह्लादवदनभूतस्यापीत्यर्थः।

गुणांमध्ये अती अभिनिविष्ट होतात. इतके की त्यांच्या चिद्धर्मांचा परिचय लुप्तप्राय होतो. केवळ सहा विकारांद्वारे[४] त्यांच्या चिद्धर्मांचा नाममात्र परिचय प्राप्त होतो. ही अवस्था जिवाच्या पतनाची परम सीमा आहे. अहल्या[५], यमलार्जुन[६] आणि सप्तताल[७] यांच्या पौराणिक गाथांवर विचार केल्यावर उक्त कथनाची पुष्टी होते. एखादा विशिष्ट अपराध घडल्यानंतरच तशी गती प्राप्त होते आणि कृष्णाच्या कृपेनेच त्या अवस्थेतून मुक्ती मिळते.

ब्रजनाथ–संकुचित चेतन कोण आहेत?

बाबाजी–पशु, पक्षी, सर्प, मत्स्य, जल-जंतू, कीटक-पतंग हे सर्व संकुचित चेतन आहेत. आच्छादित चेतनाच्या चेतनेचा परिचय प्रायः लुप्त झालेला असतो. परंतु संकुचित चेतनेची चेतनता काही अंशी अनुभूत असते. आहार, निद्रा, भय, इच्छेनुसार गमनागमन, आपला अधिकार जाणून इतरांशी लढणे-झगडणे, अन्याय पाहून क्रोध–हे सर्व संकुचित चेतनेमध्ये आढळते. यांच्यात केवळ परलोकाचे ज्ञान

(४) सहा विकार–जन्म, स्थिती, वृद्धी, परिणाम, क्षय आणि विनाश.

(५) अहल्या–सत्ययुगातली गोष्ट आहे. आपले पतिदेव गौतम ऋषींच्या अभिशापाने अहल्येस पाषाणाचे शरीर प्राप्त झाले होते. पतीचा अभिशाप ऐकून ती खूप दुःखी झाली आणि गौतम ऋषींच्या चरणी पडून रडत-रडत आपल्या मुक्तीकरिता प्रार्थना करू लागली. पत्नीस अशा प्रकारे रडतांना पाहून त्यांना दया आली. त्यांनी अहल्येस धीर देत म्हटले की त्रेतायुगात भगवान रामचन्द्र पृथ्वीचा भार उतरविण्याकरिता अवतार घेतील. तेव्हा त्यांच्या चरणांच्या स्पर्शाने पाषाण योनीतून तुझी मुक्तता होईल. त्यावर अहल्या म्हणाली–देवा! अजून तर सत्ययुग चालले आहे. त्यानंतर द्वितीय युग द्वापर येईल आणि द्वापर संपल्यानंतर त्रेतायुग प्रारंभ होईल. म्हणजे त्रेतायुग येण्यास खूपच वेळ आहे. मी इतके दिवस कसे कष्ट भोगू? आपण दया करा, जेणेकरून माझा यथाशीघ्र उद्धार होईल.

गौतम प्रसन्न होऊन म्हणाले, घाबरू नकोस, तुझ्याकरिता याच चतुर्युगात सत्ययुगानंतरच त्रेतायुग प्रारंभ होईल आणि द्वितीय युग द्वापर–तृतीय युग त्रेताच्या पश्चात तिसऱ्या युगाच्या रूपात प्रकाशित होईल. गौतमांच्या इच्छेने वर्तमान चतुर्युगात युगाचा क्रम बदलला. सत्यनंतर त्रेताचे आगमन झाले. श्रीरामचन्द्रांनी त्रेतायुगामध्ये अवतार घेऊन आपल्या चरणांच्या स्पर्शाने पाषाणी अहल्येचा उद्धार केला. अहल्या, आच्छादित चेतनरूप पाषाण शरीरातून उद्धार प्राप्त करून पुन्हा आपल्या पतिदेवांकडे निघून गेली.

नसते. वानरांच्या दुष्ट बुद्धीमध्ये काही अंशी विज्ञान-विचारही पहावयास मिळतो. नंतर काय होईल, काय होणार नाही–ते याविषयींच्या भावना करतात. कृतज्ञता आदी गुणही त्यांच्यात आढळतात. काही काही जनावरांमध्ये द्रव्य-गुणांसबंधी ज्ञानही उत्तम असते. परंतु इतके असूनही त्यांच्यात ईश्वरी-जिज्ञासेची प्रवृत्ती नसते. म्हणून त्यांचा चेतन धर्म संकुचित असतो. भरत महाराजांस मृग शरीराची प्राप्ती झाल्यावरही त्यांच्यात भगवन्नामाचे ज्ञान होते–शास्त्रांद्वारे असे जाणले जाते; परंतु ही साधारण

---

(६) यमलार्जुन–एकदा कुबेरांचे पुत्र नलकुबर आणि मणिग्रीव मन्दाकिनीच्या तटी मदोन्मत्त होऊन नग्न अवस्थेत स्त्रियांसोबत विहार करीत होते. संयोगवश देवर्षी नारद फिरत-फिरत त्याच रस्त्याने निघाले. परंतु नलकुबर आणि मणिग्रीव झिंगलेले आणि कामोन्मत्त होत होते. त्यांनी देवर्षींची थोडीही पर्वा केली नाही. देवर्षींचा सन्मान करणे तर दूरच, जेव्हा स्त्रिया लज्जा आणि भयाने थरथर कापत आपल्या वस्त्रांस घालून देवर्षी नारदांकडे पोहोचल्या आणि त्यांच्या चरणी पडून क्षमा मागू लागल्या. तेव्हा ते दोन्ही भाऊ त्यांच्यावर चिडले. त्यांची ती तशी ज्ञानशून्य अवस्था पाहून नारदांनी त्यांना वृक्षयोनीत जन्म ग्रहण करण्याचा अभिशाप दिला. फलस्वरूप ते गोकुळात यमलार्जुन वृक्षांच्या (आच्छादित चेतन) रूपात जन्मले. द्वापर युगात भगवान श्रीकृष्णाच्या चरकमलांच्या स्पर्शाने त्यांचा उद्धार झाला.

(७) सप्तताल–त्रेतायुगात कपिपती बालीस एकदा कुठूनतरी अगदी मधुर अशी सात ताड-फळे मिळाली. ते त्यांना एका ठिकाणी ठेवून स्नानाकरिता गेले. विचार केला–"आता आंघोळ करून परतल्यावर मी ही फळे खाईन". परंतु स्नानाहून परतल्यावर पाहिले की एका विषारी सर्पाने त्या सात फळांस नष्ट केले आहे. त्यावर बालीस मोठा राग आला. त्यांनी सर्पास अभिशाप दिला की त्यास वृक्षयोनी प्राप्त होईल. शापाच्या प्रभावाने सर्प लगेचच 'सप्तताल' वृक्षांच्या रूपात आच्छादित चेतन जन्मास प्राप्त झाला. बालीच्या या कार्याने सर्प-पिता खूप दुःखी आणि क्रोधित झाले. त्यांनीही बालीस शाप दिला–"जो या सात तालवृक्षांस एकाच बाणाने भेदील, तोच बालीचाही वध करील." श्रीरामचन्द्रांनी 'सप्तताल' वृक्षांस एकाच बाणाने भेदून सुग्रीवास विश्वास दिला की ते बालीचा वध करण्यास समर्थ आहेत. कलियुगात् भगवान श्रीचैतन्य महाप्रभू जिवांचा उद्धार करण्यासाठी दक्षिण भारतात भ्रमण करतांना 'सप्तताल' वृक्षांस पाहून प्रेमाने गद्‌गद् झाले आणि त्यांना आलिंगन दिल्याबरोबरच ते वृक्ष अंतर्धान पावले. ते श्रीमन् महाप्रभूंचा स्पर्श प्राप्त करून आच्छादित चेतन जन्मातून मुक्त झाले. ती आश्चर्यजनक लीला पाहून तेथील आदिवासींनी श्रीचैतन्यमहाप्रभूंना साक्षात श्रीरामचन्द्र मानले होते. 'श्रीचैतन्यचरितामृता'त याचे वर्णन याप्रकारे दिलेले आहे–

विधी नाही, स्थळ विशेषात असे होते. भरत[८] आणि नृगराज[९] यांना आपल्या अपराधाकरिता पशुयोनीत जन्म घ्यावा लागला होता. भगवंताच्या कृपेने अपराधाचा क्षय झाल्यावर त्यांना सद्गती मिळाली.

ब्रजनाथ–मुकुलित चेतन कोण आहेत

बाबाजी–मनुष्य शरीरात बद्ध जिवांच्या तीन प्रकारच्या अवस्था लक्षित असतात. त्या अवस्था आहेत–मुकुलित चेतन, विकसित चेतन आणि पूर्ण विकसित चेतन-अवस्था. मानव जातीस साधारणपणे पाच भागांत विभक्त करता येते–(१) नीती-रहित मानव, (२) निरीश्वर-नैतिक मानव, (३) सेश्वर-नैतिक मानव (४) साधन भक्त मानव आणि (५) भाव-भक्त मानव. जे मानव जाणतेपणी वा अजाणतेपणी निरीश्वर आहेत, त एकतर 'नीती शून्य' असतात किंवा 'निरीश्वर-नैतिक'. नीतीसोबत थोडासा ईश्वर विश्वासयुक्त असल्याने मनुष्य 'सेश्वर-नैतिक' म्हणवला जातो. शास्त्रीय विधीनुसार साधन भक्तीमध्ये रुची उत्पन्न झाल्यावर त्यांस 'साधन-भक्त' म्हटले जाते आणि ईश्वराप्रती थोडासा अनुराग उत्पन्न झाल्यावर अशा मानवांस 'भाव-भक्त' म्हणतात. नीती शून्य आणि निरीश्वर-नैतिक दोन्ही प्रकारचे मानव मुकुलित-चेतन आहेत, सेश्वर-नैतिक आणि साधन-भक्त विकसित चेतन आहेत तथा भाव-भक्त मानव पूर्ण-विकसित चेतन आहेत.

ब्रजनाथ–भाव भक्तांकरिता किती दिवसांपर्यंत मायाबद्ध राहणे संभव आहे?

बाबाजी–या प्रश्नाचे उत्तर सातव्या श्लोकाच्या व्याख्येत देईन. आज रात्र अधिक झाली आहे, आता घरी जा.

ब्रजनाथ श्रवण केलेल्या तत्त्वांचे मनन करीत घरी परतले.

**॥ सोळावा अध्याय समाप्त ॥**

---

# सतरावा अध्याय (प्रमेयांतर्गत मायामुक्त जिवांचा विचार)

ब्रजनाथाच्या आजीने (वडिलांच्या आईने) ब्रजनाथाच्या विवाहाची सगळी व्यवस्था पूर्ण केली आहे. रात्री ब्रजनाथांस त्यांनी सगळ्या गोष्टी सांगितल्या. ब्रजनाथाने त्या दिवशी काहीच उत्तर दिले नाही. ते खाऊन पिऊन विसावा घेत आणि

---

(८) भरत–शक्त्यावेशावतार ऋषभदेवांचे १०० पुत्र होते. त्यांतील भरत सर्वांत ज्येष्ठ होते. पिता ब्राह्मण असूनही भरताचे गुण आणि कर्म क्षत्रियासारखे होते. म्हणून ते क्षत्रिय झाले होते. पित्याच्या इच्छेने भरत ससागरा समस्त पृथ्वीच्या सम्राटपदी अभिषिक्त झाले होते. बरेच दिवस राज्य केल्यानंतर संसारातून विरक्त होऊन त्यांनी आपले संपूर्ण राज्य आणि समस्त संपत्ती आपल्या योग्य पुत्रांमध्ये वाटून टाकली आणि एकटेच राजमहालातून निघाले व पुलहाश्रम हरिहर क्षेत्री जाऊन भगवंताच्या आराधनेत तत्पर झाले. एकदा ते आपल्या आश्रमाजवळच असलेल्या पुण्यतोया गण्डकी नदीमध्ये स्नान करून तिच्या पवित्र तटावर भगवान नाम जप करीत होते. त्याचवेळी त्यांची दृष्टी एका तहानलेल्या हरिणीवर पडली, जी सावध होऊन इकडे-तिकडे पाहत होती आणि जल पीत होती. इतक्यात जवळच एका सिंहाची भयंकर गर्जना ऐकून तिने भयवश अचानक नदी पार करण्याकरिता उडी मारली. तिच्या पोटात गर्भ होता, म्हणून अचानक उडी मारल्याने तिच्या गर्भातील पिल्लू शावक योनि-द्वारातून निघून नदीच्या प्रवाहात पडले. इकडे हरिणी त्या पार जाऊन मरण पावली. भरतास खूप दया आली. त्यांनी धावत जाऊन नदीच्या प्रवाहात बूडत असलेल्या मातृहीन मृग-शावकास उचलले आणि आश्रमात आणून मोठ्या लाडाने त्याचे पालन-पोषण करू लागले. मृग-शावकाप्रती त्यांची ममता उत्तरोत्तर वाढू लागली. जसजशी त्यांची ममता वाढू लागली, तसतसे त्यांचे साधन भजनही सुटू लागले आणि शेवटी ते संपूर्णपणे साधन भजनातून च्युत झाले. एकदा अकस्मात् ते मृग-शावक नाहीसे झाले. त्याला कुठेही न पाहिल्याने शोकाने अधीर होऊन त्यांनी ' हा मृग' 'हा मृग' म्हणत आपले प्राण सोडले. त्यानंतर अंतकाळीच्या भावनेनुसार भरतास मृग-जन्म मिळाला. परंतु पूर्व जन्मातील भगवदाराधनेच्या प्रभावाने आपल्या पतनाचे कारण स्मरून त्यांना खूप पश्चात्ताप झाला. ते आपल्या हरीण शरीरातील माता-पित्यांना सोडून पुन्हा पुलहाश्रमात निघून आले आणि तेथे भगवन्नाम श्रवण करून मुक्त झाले. हे संकुचित चेतनेचे उदाहरण आहे. अशा प्रकारे त्यागी आणि संन्यासी असूनही जर कुणी स्त्री आदींच्या प्रती आसक्त होतो, तर तो अवश्यमेव अधोगतीस प्राप्त होतो. काही लोक असा विचार करतात की "क्रमोन्नतीद्वारे मनुष्य जन्मच सर्वोत्तम जन्म आहे आणि यामुळे पुन्हा पतन होत नाही"–असे मत नितांत त्याज्य आणि भ्रांत आहे. वासनेनुसारच

शुद्धजिवाच्या अवस्थेसंबंधी रात्री खूप उशीरापर्यंत चिंतन करीत होते. इकडे त्यांची वृद्धा आजी या चिंतेत मग्न होती की ब्रजनाथास विवाहाकरिता कसे तयार करावे. त्याचवेळी ब्रजनाथाचे मावसभाऊ वेणीमाधव उपस्थित झाले. ज्या मुलीसोबत विवाहाची बोलणी सुरू होती, ती वेणीमाधवांची आतेबहीण लागत होती. विजय विद्यारत्नाने कन्येचा विवाह संबंध पक्का करण्याकरिता त्यांना पाठविले आहे.

वेणीमाधव म्हणाले–आजी! असे झाले तरी काय? ब्रज दादाच्या विवाहास इतका उशीर का होत आहे?

---

जन्म मिळतो. यात परिवर्तनाची संभावनाच नाही. भरताने आपल्या जीवन-चरित्राद्वारे ही शिकवण दिली आहे.

(९) राजा नृग–हे महाराज ईश्वाकुचे पुत्र होते. ते मोठे दानी होते. त्यांनी अगणित ब्राह्मणांस अगणित सुलक्षणा गायी दान केल्या. एकदा त्यांनी दान केलेली एक गाय ब्राह्मणाच्या घरून पुन्हा राजभवनी परतली आणि राजाने नकळत तीच गाय कुण्या दुसऱ्या ब्राह्मणाला दान केली. दान प्राप्त करणारे ब्राह्मण जेव्हा तिला घेऊन घरी जाऊ लागले, तेव्हा रस्त्यात त्या गायीचे पूर्व स्वामी ती गाय आपली असल्याचे सांगू लागले. त्यावर दोन्ही ब्राह्मण परस्परांत भांडू लागले आणि न्यायाकरिता राजा नृगापाशी आले. तंटा मिटविण्याकरिता राजाने त्या विप्रांस गायीच्या ऐवजी वेगवेगळ्या एक लाख उत्तम प्रतीच्या गाई ग्रहण करण्याची विनंती केली. परंतु दोन्ही विप्र संतुष्ट न होताच घरी परतले. इकडे काळ उपस्थित झाल्यावर राजा नृगाचे देहावसान झाले. यमराजाच्या दूतांनी त्यांना यमपुरीत यमराजासमोर उपस्थित केले. यम महाराज म्हणाले–तू आधी तुझ्या पुण्याची फळे भोगू इच्छितोस की पापाची? राजाने उत्तर दिले–पापाची. असे म्हटल्याबरोबर ते खाली पडले आणि सरड्याचे शरीर प्राप्त करून जलशून्य विहीरीत वास करू लागले. द्वापर युगात एकदा यादव कुमारांस उपवनात खेळता खेळता खूप तहान लागली. ते पाणी शोधत शोधत त्या विहीरीजवळ आले आणि त्यात त्यांनी एका मोठ्या जनावरास पडलेले पाहिले. त्यांनी तेथून परतल्यावर श्रीकृष्णास त्या विचित्र प्राण्याच्या विहीरीत पडण्याची बातमी सांगितली. श्रीकृष्णांनी आपल्या डाव्या हाताने खेळताखेळताच त्याला विहीरीबाहेर काढले. कृष्णाच्या करकमलांचा स्पर्श होताच नृगराज सरड्याच्या योनीतून मुक्त झाला. यातून हीच शिकवण मिळते की ब्राह्मण आणि देवतांचे थोडेदेखील धन अपहृत केल्याने जिवाची चेतना संकुचित होऊन जाते; आणि त्यास सरडा आदी आच्छादित चेतन जन्म प्राप्त होऊन कष्ट भोगावे लागतात.

आजी काहीशा दुःखी होत म्हणाल्या–बेटा! तू मोठा समजूतदार मुलगा आहेस. जरा ब्रजनाथास समजावून लग्नाकरिता राजी करण्याचा प्रयत्न कर. मी किती समजावते आहे, पण तो माझे ऐकतच नाही.

वेणीमाधवाची शरीरयष्टी ठेंगणी, छोटी मान, काळा रंग, मिचमिचे डोळे त्यांच्या स्वरूपास प्रकट करतात. म्हटले तर त्यांना सगळेच येते किंवा काहीच नाही. आजीचे बोलणे ऐकून कपाळावर आठ्या आणीत ते म्हणाले, काहीच हरकत नाही. तुझ्या आज्ञेचा अवकाश, वेणीमाधव काय करू शकत नाही? तू तर मला चांगलेच ओळखतेस–लाटांना मोजून पैसा वसूल करू शकतो. ठीक आहे, मी एकदा ब्रजनाथसोबत बोलून करून पाहतो. परंतु आजी! कार्य संपूर्ण झाल्यावर मला पोटभर पुरी-कचोरी खाऊ घालशील ना?

आजी म्हणाली–ब्रजनाथ तर खाऊन-पिऊन झोपलासुद्धा.

ठीक आहे, मी उद्या सकाळी येऊन सारे काही ठीक करतो, असे म्हणत वेणीमाधव घरी परतले.

दुसऱ्या दिवशी भल्या सकाळीच हातात एक लोटा घेऊन ते तेथे उपस्थित झाले. ब्रजनाथ शौचादिपासून निवृत्त होऊन बाहेर चण्डी-मंडपात बसले आहेत. त्यांनी वेणीमाधवास पाहून म्हटले–भाऊ, आज इतक्या सकाळीच कसे?

वेणीमाधव म्हणाले–दादा! तुम्ही तर अनेक दिवस न्यायशास्त्र वाचले आणि शिकविले आहे. तुम्ही पंडित हरिनाथ चुडामणींचे पुत्र आहात–तुमचे नाव देशभरात विख्यात झाले आहे, घरात तुम्हीच एकमात्र पुरुष आहात–जर संतान-संतती नसेल तर तुमच्या इतक्या मोठ्या घराचे रक्षण कोण करील? दादा! आम्हा लोकांचा आग्रह आहे–तुम्ही विवाह करावा.

ब्रजनाथ म्हणाला–भाऊ! मला व्यर्थच जळवू नकोस . आजकाल मी श्रीगौरसुन्दराच्या भक्तांचा आश्रय ग्रहण करीत आहे. मला संसार करण्याची इच्छा नाही. मायापुरात वैष्णवांनिकट बसून खूप शांती मिळते. मला आता संसार आवडतच नाही–मी एकतर संन्यास ग्रहण करीन अथवा वैष्णवांचा पदाश्रित होऊन राहील. तुम्हाला माझे आप्त समजून हृदयातील गोष्ट सांगतो आहे. तुम्ही ही गोष्ट मात्र कुठेही सांगू नका.

वेणीमाधवांनी मनोमन विचार केला की यांना सरळ रस्त्याने प्राप्त करता येणार नाही–त्यांच्यासोबत काहीतरी चाल खेळावी लागेल. असा विचार करून चलाखीने आपल्या मनातले भाव दाबून ते बोलले–मी तुमच्या प्रत्येक कार्यांत नेहमीच सहायक बनलो आहे, जेव्हा तुम्ही संस्कृत पाठशाळेत शिकत होता, तेव्हा मी आपली पुस्तके वाहून पाठशाळेत नेत असे. आता जेव्हा तुम्ही संन्यास घ्याल तेव्हा मी आपला दण्ड-कमंडलुदेखील वहन करीन.

धूर्त लोकांच्या दोन जिभा असतात. ते एकाशी एक आणि दुसऱ्याशी अन्य प्रकारच्या गोष्टी बोलतात. त्यांच्या हृदयातील गोष्टींचा ठाव लागणे कठीण असते; मुखी राम बगलेत सुरी.

वेणीमाधवाच्या गोड गोष्टी ऐकून ब्रजनाथ म्हणाले–भाऊ! मी तुम्हाला सदैव माझा परमबंधू समजत आलोय. स्त्री असल्याने आजी गंभीर विषयांत प्रवेश मिळवू शकत नाही. कुण्या मुलीस माझ्या गळ्यात बांधून मला संसार-समुद्रात बुडविण्यासाठी ते अत्युत्सुक आहेत. तुम्ही जर समजावून सांगून त्यांना या कार्यापासून थांबवू शकलात तर मी आपला चिरऋणी राहील.

वेणीमाधव म्हणाले–शर्माराम असताना कुणीही तुमच्या इच्छेविरुद्ध काहीही करू शकत नाही. दादा! एक गोष्ट जरा मनापासून सांगा, त्यानंतर पहा मी काय करतो ते! मला असे विचारायचे आहे, संसाराप्रती तुम्हा इतकी घृणा का वाटते आहे? कुणाच्या सल्ल्याने तुमच्यात अशा प्रकारचा विरक्त भाव उत्पन्न झाला आहे?

ब्रजनाथांनी आपल्या वैराग्याची सगळी घटना वेणीमाधवांस ऐकविली आणि हेही सांगितले की–मायापुरात एक वृद्ध आणि अनुभवी बाबाजी आहेत, त्यांचे नाव रघुनाथदास बाबाजी आहे. तेच माझे उपदेशक आहेत–प्रतिदिन संध्याकाळनंतर मी त्यांच्या चरणी उपस्थित होऊन संसारज्वाळेपासून शांती लाभ करतो. ते माझ्यावर खूप कृपा करतात.

दुष्ट वेणीमाधवांनी मनोमन विचार केला–हो, ब्रजदादाची दुर्बलता कुठे आहे, हे आता समजलो, आता कपटतेने आणि कौशल्याने यांना सरळ रस्त्यावर आणता येईल. मग प्रकाश्य रूपाने म्हणाले–दादा! आता मी घरी जातो, काही चिंताच नको, मी कोणाच्याही नकळत आजीचे मन वळवीन.

वेणीमाधव आपल्या घराकडे परतले. परंतु घरी न जाता थोड्याच वेळाने दुसऱ्या रस्त्याने ते मायापूर श्रीवास-अंगणी उपस्थित झाले. तेथे बकूळ वृक्षाखाली चौथऱ्यावर बसून मनोमन म्हणू लागेल–हे वैष्णव बेटेच संसाराची मजा लुटतात. किती सुंदर घरे आहेत, कशी कुंजे आहेत, किती सुंदर चौथरा आहे आणि कितीतरी मनोहर प्रांगण आहे. एकेका भजन कुटीत एकेक वैष्णव बसून माला सरकवत आहेत. धर्माच्या सांडाप्रमाणे हे पूर्णपणे निश्चिंत आहेत. पल्ली गावाच्या स्त्रिया गंगा स्नान करून यांना न मागताच फळे-फुले, जल आणि नाना प्रकारच्या भोजन सामग्री देऊन जातात. ब्राह्मणांनी कर्मकांडाची व्यवस्था करून अशाच लाभांकरिता मार्ग प्रस्तुत केला होता. परंतु त्याच्या सारभागाचा भोग तर हल्ली बाबाजी दलच करते आहे. धन्य कलिकाल! कलीच्या या चेल्यांची आजकाल चांगलीच चलती आहे. हाय! माझे कुलीन ब्राह्मणाघरी जन्म घेणे व्यर्थ ठरले. आजकाल आम्हाला तर कुणी विचारतच नाही–जल देणे आणि फळे देणे तर लांबच राहिले. आज स्थिती अशी आहे की वैष्णव-बेटे नैयायिक पंडितांस 'घटपटिया' मूर्खच समजतात. ही गोष्ट ब्रजदादाच्या बाबतीत चपखल बसते. ते इतके शिकूनही लंगोटधारी दुष्टांच्या हाती विकले गेलेत. मी 'वेणीमाधव'–दादास सुधारीन आणि या बेट्यांचीही खबर घेईन–असा विचार करीत करीत ते एका कुटीत प्रविष्ट झाले.

योगायोगाने त्याच कुटीत श्रीरघुनाथदास बाबाजी केळ्याच्या पानांनी बनविलेल्या आसनावर बसून हरिनाम करीत होते. मनुष्याचा स्वभाव त्याच्या चेहऱ्यावरून कळतो. वृद्ध बाबाजींनी पाहिले, त्या ब्राह्मण-कुमाराच्या वेशात साक्षात कलीचे आगमन झाले आहे. वैष्णवजन स्वतःस स्वभावतः तृणाहूनही हीन समजतात. ते शत्रुंच्या अत्याचारांस सहन करूनही त्यांच्या कल्याणाची कामना करतात. ते स्वतः अमानी होऊनही दुसऱ्यांस मान देतात. अतः बाबाजींनी वेणीमाधवास आदरपूर्वक बसविले.

वेणीमाधव नितांत अवैष्णव असल्याने वैष्णव मर्यादेचे उल्लंघन करीत वृद्ध बाबाजींना आशीर्वाद देत बसले.

बाबाजी महाशयांनी विचारले–बाबा! तुझे नाव काय? तू इथे का आलास?

आपल्याकरिता 'तू' शब्दाचा व्यवहार ऐकून वेणीमाधव जरा क्रुद्ध झाले.वक्रतेने ते म्हणाले–अरे बाबाजी! काय कौपीन घातल्यानेच ब्राम्हाणांसमान

होता येते का? ठीक आहे, ते काहीही असो. मी तुम्हाला विचारतो–तुम्ही ब्रजनाथ न्याय पञ्चाननास ओळखता का?

बाबाजी–कृपा करून अपराध क्षमा करा, मज वृद्धाचा वाक्-दोष चित्ती धरू नका. ब्रजनाथ कधीकधी कृपा करून येथे येतात.

वेणीमाधव–तो माणूस सरळ स्वभावाचा नाही. दोन-चार दिवस येऊन विनयादीद्वारे तुम्हाला वशीभूत करून त्याला जे हवे आहे ते करेल. बेलपुकुरचे ब्राह्मण तुमच्या व्यवहाराने अत्यंत क्षुब्ध झाले आहेत. त्या लोकांनी विचारविमर्श करून ब्रजनाथास तुमच्याकडे पाठविले आहे. तुम्ही वृद्ध आहात–जरा सावधान रहा. अधूनमधून मी तुमच्याकडे येऊन त्यांच्या षड्यंत्राची बातमी देतच राहीन. माझ्या संबंधी तुम्ही त्याला काहीही सांगू नका, नाहीतर तुमचे अधिकच अनिष्ट होईल. आज मी जातो, असे म्हणत वेणीमाधव आपल्या घरी परतले.

दुपारची वेळ होती. ब्रजनाथ भोजन करून व्हरांड्यात बसले होते. त्याच दरम्यान वेणीमाधव कुठुनसे आले आणि त्यांच्याजवळ बसले. मग बोलता बोलता म्हणाले–दादा! आज काही कारणास्तव मी मायापुरात गेलो होतो. तेथे एका म्हाताऱ्यास पाहिले–कदाचित तोच रघुनाथदास बाबाजी असावा. त्याच्याशी बोलताना तुमचा विषयही निघाला. त्याने तुमच्यासंबधी अशी एक घृणास्पद गोष्ट सांगितली की तशी गोष्ट कोणीही कुठल्याही ब्राह्मणाप्रती उच्चारू शकत नाही. शेवटी म्हणाले–"ब्रजनाथास छत्तीस जातींचे उष्टे चारून त्याचे ब्राह्मणत्वच काढून टाकील"–छिः! तुमच्यासारख्या विद्वान व्यक्तीस अशा माणसाकडे जाणे कुठल्याही प्रकारे शोभा देत नाही. त्यामुळे ब्राह्मण पंडितांची प्रतिष्ठा धुळीत मिळेल.

वेणीमाधवाचे बोलणे ऐकून ब्रजनाथ मोठे आश्चर्यचकित झाले. वैष्णवांप्रती त्यांच्या हृदयात जो श्रद्धेचा भाव होता आणि वृद्ध बाबाजींप्रती जी भक्ती होती, न जाणो का ती द्विगुणित झाली. ते काहीसे गंभीर होत म्हणाले–भाऊ! आज मी व्यस्त आहे, तुम्ही जा, उद्या तुमचे म्हणणे ऐकून विचार करीन.

वेणीमाधव निघून गेले. ब्रजनाथ वेणीमाधवाच्या द्विमुखी स्वभावाशी व्यवस्थित परिचित होते. प्रचुर न्यायाचा अभ्यास केला होता, तथापि ते स्वभावतः दुष्टता पसंत करीत नसत. संन्यास घेण्यास मदत करेल, अशा विचाराने त्यांनी

वेणीमाधवाप्रती बंधुत्वाचा भाव दाखविला होता. परंतु त्यांच्या लक्षात आले की, वेणीमाधवाने आपला काही स्वार्थ साधण्याकरिता गोड-गोड बाता मारल्या होत्या. विचार करताकरता त्यांना आठवले की ज्या कन्येबरोबर माझ्या विवाहाच्या गोष्टी चालल्या आहेत, त्यात वेणीमाधवाचाच काहीतरी स्वार्थ आहे. म्हणूनच ते मायापुरात कुठल्या दुरभिसंधीचे (अपकीर्तीचे) बीज रोवायला गेले असतील. असा विचार करून ते मनोमन म्हणाले–हे भगवान! गुरू आणि वैष्णवांच्या चरणी माझी श्रद्धा दृढ राहो आणि दुर्जनांच्या उत्पाताने ती कधीच कमी न होवो. अशा प्रकारे विचार करता-करता संध्याकाळ झाली. संध्याकाळ झाल्यावर ते मोठ्या व्याकूळ चित्ताने श्रीवास-अंगणी पोहोचले.

इकडे वेणीमाधव निघून गेल्यावर बाबाजींनी मनोमन विचार केला–हा माणूस निश्चितच ब्रह्मराक्षस आहे–

**राक्षसाः कलिमाश्रित्य जायन्ते ब्रह्मयोनिषु।**[१]

(चै. भा. आ. १६/३०१ धृत वराहपुराणे महेश वाक्य)

ही शास्त्र-वाणी या व्यक्तीविषयी चपखल बसते. वर्णाहंकार, वृथा अहंकार, वैष्णव-विद्वेष आणि धर्म-ध्वजित्वाची छाप त्याच्या मुखावर स्पष्टपणे अंकित आहे. छोटीशी मान, मिचमिचे डोळे आणि बोलण्यातली चतुरता त्यांच्या अन्तरङ्गाचा परिचय देतात. अहा! ब्रजनाथ किती मधुर स्वभावाची व्यक्ती आहे आणि कुठे ही असुर स्वभावाची व्यक्ती! हे कृष्ण! हे गौरांग! अशा दुर्जन व्यक्तींचा कुसंग कधीच न मिळो. आज ब्रजनाथासही सावध करतो.

ब्रजनाथ कुटीत येताच बाबाजी मोठ्या प्रेमाने म्हणाले, "ये बाबा, ये"–असे म्हणत त्यांनी त्यांना छातीशी कवटाळले. ब्रजनाथाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या; गळा अवरुद्ध झाला. ते बाबाजींच्या चरणी पडले.

बाबाजींनी ब्रजनाथास मोठ्या स्नेहाने उठविते म्हटले–आज सकाळीच एक काळ्या रंगाचे ब्राह्मण आले होते. ते काही उद्वेगजनक गोष्टी ऐकवून गेले. तू त्यांना ओळखतोस का?

---

(१) राक्षसगण कलियुगाचा आश्रय घेऊन ब्राह्मण कुलात जन्म ग्रहण करतात.

ब्रजनाथ–प्रभो! आपणच सांगितलेत की संसारात अनेक प्रकारचे जीव आहेत.त्यांपैकी काही लोक मत्सरतावश दुसऱ्या जीवांस व्यर्थच उद्वेग देऊन सुखी होतात. आमचे वेणीमाधव भाऊ अशा लोकांमधले प्रधान पंडा आहेत. त्यांच्याविषयी काही चर्चा न झाली तर फार आनंद होईल. यथार्थ गोष्ट तर ही आहे की आपल्याकडे माझी निंदा करणे आणि खोटेखोटेच दोषारोपण करून परस्परांत झगडे लावणे हाच त्यांचा स्वभाव आहे. त्यांच्या गोष्टी ऐकून आपल्याला वाईट तर नाही ना वाटले?

बाबाजी–हा कृष्ण! हा गौरांग! मी अनेक दिवसांपासून वैष्णव-सेवेत नियुक्त आहे–मी त्यांच्या कृपेने वैष्णव-अवैष्णव ओळखण्याची शक्ती मिळविली आहे. मला सगळे माहिती आहे–याविषयी मला काहीच बोलायचे नाही.

ब्रजनाथ–त्या सर्व गोष्टी विसरून आपण कृपा करून मला हे सांगा की मायेने बांधलेला जीव मुक्त कसा होतो?

बाबाजी–श्रीदशमूलाच्या सातव्या श्लोकात तुला आपल्या प्रश्नाचे उत्तर मिळेल–

**यदा भ्रामं भ्रामं हरिरसगलद्वैष्णवजनं**
**कदाचित् संपश्यन् तदनुगमने स्याद् रुचियुतः।**
**तदा कृष्णवृत्त्यात्यजति शनकैर्मायिकदशां**
**स्वरूपं विभ्राणो विमलरसभोगं स कुरुते॥**

(दशमूल ७)

अर्थात संसारात श्रेष्ठ-कनिष्ठ योनींमध्ये भ्रमण करता-करता जेव्हा हरि-रसात मत्त वैष्णवाचे दर्शन होते, तेव्हा मायाबद्ध जिवास वैष्णव-मार्गाप्रती रुची उत्पन्न होते. कृष्णनामाचे उच्चारण करता-करता हळूहळू त्यांची मायिक दशा दूर होते–जीव क्रमशः स्व-स्वरूप प्राप्त करीत विमल कृष्ण-सेवा-रस आस्वादन करण्यायोग्य होतो.

ब्रजनाथ–याविषयी एक-दोन वेदप्रमाण ऐकू इच्छितो.

बाबाजी–वेदांमध्ये म्हटले आहे–

**समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमानः।**
**जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानमेति वीतशोकः॥**[२]

(मु. उ. ३/१/२, श्वे. उ. ४/७)

ब्रजनाथ–जर सेवनीय ईश्वरास पाहू शकतो, तर जीव सर्वदा शोकरहित होऊन त्यांच्या महिमेस प्रत्यक्ष पाहू शकतो, या वाक्याने मुक्तीस समजावे का?

बाबाजी–मायेच्या बंधनातून मुक्त होण्याचे नावच 'मुक्ती' आहे. ही मुक्ती साधुसंगप्राप्त पुरुषासच सुलभ आहे, परंतु मुक्ती झाल्यावर जिवास जो महिमा प्राप्त होतो, तोच अन्वेषण करण्यायोग्य आहे.

**मुक्तिर्हित्वान्यथारूपं स्वरूपेण व्यवस्थितिः**[३]

(श्रीमद्भा. २/१०/६)

या अर्धश्लोकात हे सांगितले आहे की–अन्यथा रूपाचा परित्याग करून स्वरूपात अवस्थितीच जिवाचे प्रयोजन (मुक्ती) आहे. ज्याक्षणी बंधनातून सुटका होते, त्याच क्षणी मुक्तीचे कार्य समाप्त होते; परंतु स्वरूपात अवस्थित होऊन जिवाच्या अनंत क्रिया आरंभ होतात–हेच जिवाचे मूळ प्रयोजन आहे. आत्यंतिक दुःख निवृत्तीस 'मुक्ती' म्हटले जाते; परंतु मुक्ती झाल्यावर चित् सुखाची प्राप्ती रूप आणखी एक अवस्था आहे. छान्दोग्योपनिषदामध्ये या अवस्थेचे वर्णन आहे–

---

(२) पूर्वोक्त एकाच वृक्षावर अवस्थित जीव मायेद्वारे मोहित होऊन शोक करता-करता पतित झाला. जर कधी जीव सेवनीय वस्तू परमेश्वराचे दर्शन करतो. तेव्हा शोकरहित होऊन आपल्या कृष्णदास्यरूप महिमेस प्राप्त करतो.

(३) जीव-चित्-स्वरूप–शुद्ध कृष्णदास आहे. अविद्येत प्रवेश करणेच त्याच्याकरिता विरूप आहे. (हे विरूपच अन्यथारूप आहे.) याचा परित्याग करून स्वरूपात स्थिती मिळवणे म्हणजेच मुक्ती होय.–(श्रीमन् महाप्रभूंची शिकवण)

**एवमेवैष सम्प्रसादोऽस्माच्छरीरात् समुत्थाय**
**परं ज्योतिरूपसम्पद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते**
**स उत्तमपुरुषः स तत्र पर्येति जक्षन् क्रीडन् रममाणः ॥**[४]

(छा. उ. ८ /१२/३)

ब्रजनाथ–मायामुक्त पुरूषांची काय लक्षणे आहेत?

बाबाजी–छान्दोग्योपनिषदामध्ये मायामुक्त पुरूषांची आठ प्रकारची लक्षणे सांगितली गेली आहेत–

**आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्प सोऽन्वेष्टव्यः ॥**[५]

ब्रजनाथ–मूलमंत्रात म्हटले आहे की, संसारामध्ये भ्रमण करता करता जीव जेव्हा हरि-रस रसिक-वैष्णवांचा संग प्राप्त करतो, तेव्हा त्याचे कल्याण उदित होते. या गोष्टीत माझा पूर्वपक्ष आहे की ब्रह्मज्ञान, अष्टांगयोग आदी शुभ कर्मांद्वारे शेवटी हरिभक्तीची प्राप्ती होते का?

बाबाजी–श्रीभगवंतांनी आपल्या श्रीमुखाने सांगितले आहे–

---

(४) जीव मुक्ती प्राप्त करून या स्थूल आणि सूक्ष्म शरीरातून समुत्थान करून चिन्मय ज्योति-संपन्न आपल्या चिन्मय अप्राकृत स्वरूपात स्थित होतो, तो उत्तम पुरुष आहे. तो त्याच चिद्धामात भोग, क्रीडा आणि आनंदरूप संभोगादीमध्ये मग्न होऊन जातो. (श्रीमन् महाप्रभूंची शिकवण)

(५) आत्म्यात आठ गुण असतात. आत्मा पापशून्य अर्थात मायेची अविद्या आदी पापवृत्तींपासून संबंधशून्य असतो. 'विजर' शब्दाचे तात्पर्य जराधर्मरहित अर्थात नित्यनूतन आहे. विमृत्यू–ज्याचे पतन होत नाही अर्थात मृत्यूशून्य. विशोक अर्थात शोकरहित आहे. 'विजिघत्स' अर्थात भोगवासनारहित, अपिपास अर्थात अन्याभिलाषशून्य, केवळमात्र प्रियतमच्या सेवेव्यतिरिक्त अन्यकामनारहित. 'सत्यकाम' शब्दाने कृष्ण-सेवेच्या उपयुक्त कामनेचा बोध होतो; अशा समस्त कामना निर्दोष असतात. सत्यसंकल्प अर्थात ज्या कामना करतात, त्या सिद्ध होतात. बद्धजिवात या आठ धर्मांचा अभाव असतो. (श्रीमन् महाप्रभूंची शिकवण)

**न रोधयति मां योगो न सांख्यं धर्म एव वा।**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो नेष्टापूर्त्तं न दक्षिणा॥**

**व्रतानि यज्ञाश्छन्दांसि तीर्थानि नियमा यमाः।**
**यथावरुन्धे सत्संगः सर्वसंगापहो हि माम्॥**

(श्रीमद्भा. ११/१२/१-२)

तात्पर्य हे की योग, सांख्य-ज्ञान, स्मार्त्तधर्म, वेदाध्ययन, तपस्या, संन्यास, इष्टापूर्त, दक्षिणा, व्रत, यज्ञ, तीर्थ-भ्रमण आणि यम-नियम–हे सर्व काही मला तसे वशीभूत करू शकत नाही, जसे समस्त प्रकारच्या आसक्तींना नष्ट करणारा सत्संग मला वशीभूत करतो. कोठपर्यंत सांगू, अष्टांगयोग मला गौण रूपाने संतुष्ट करतो, परंतु सत्संग तर मला संपूर्ण रूपात वश करून टाकतो. हरिभक्तिसुधोदय (८/५१) मध्ये म्हटले आहे–

**यस्य यत्संगतिः पुंसो मणिवत् स्यात् स तद्गुणः।**
**स्वकुलर्द्ध्यैततो धीमान् स्वयूथान्येव संश्रयेत्॥**

अर्थात ज्या व्यक्तीस जसा संग मिळतो, त्यात अगदी तसेच गुण निर्माण होतात, जसे मणी ज्या वस्तूस स्पर्श करतो, त्या वस्तुसारखाच रंग मण्यात दिसू लागतो. म्हणूनच शुद्ध साधुपुरुषांच्या संगाने शुद्ध साधु बनता येऊ शकते. साधुसंग समस्त कल्याणांचेच मूळ आहे. शास्त्रांमध्ये जो 'निःसंग' होण्याचा उपदेश दिला गेला आहे, तेथे 'निःसंग' शब्दाचे तात्पर्य साधुसंगाशी आहे. जर अजाणतेपणीही (अनपेक्षितपणे) सत्संग झाला, तर त्यामुळे जिवाचे परम कल्याणच होते–

**संगो यः संसृतेर्हेतुरसत्सु विहितोऽधिया।**
**स एव साधुषु कृतो निःसंगत्वाय कल्पते॥**

(श्रीमद्भा. ३/२३/५५)

अर्थात अज्ञानवश असत्पुरूषांसोबत केलेला संग जो संसारबंधनाचे कारण ठरतो, तोच संग अजाणतेपणी जर सत्पुरूषांसोबत होतो तेव्हा तोच निःसंग म्हणविला जातो. जसे श्रीमद्भागवतात (७ /५ /२२) मध्ये सांगितले आहे–

**नैषां मतिस्तावदुरुक्रमाङ्घ्रिं स्पृशत्यनर्थापगमो यदर्थः।**
**महीयसां पादरजोभिषेकं निष्किञ्चनानां न वृणीत यावत्॥**

अर्थात जोपर्यंत जीव अकिंचन, भगवत्प्रेमी, महात्मा, भगवद्भक्तांच्या चरणांच्या धुळीत स्नान करीत नाही, तोपर्यंत समस्त अनर्थांचा नाश करणाऱ्या भगवत्-चरणी त्याची बुद्धी लागत नाही. आणखीही–

**न ह्यम्मयानि तीर्थानि न देवा मृच्छिलामयाः।**
**ते पुनन्त्युरुकालेन दर्शनादेव साधवः॥**

(श्रीमद्भा.१०/ ४८ /३१)

अर्थात गंगा आदी जलमय तीर्थ आणि मृत्तिका तथा शिलामय देवतांची अनेक दिवसांपर्यंत श्रद्धेने सेवा केल्याने ते पवित्र करतात, परंतु संतपुरुष तर दर्शनमात्राने पवित्र करून टाकतात. म्हणून भागवतात पुन्हा म्हटले गेले आहे–

**भवापवर्गो भ्रमतो यदा भवेज्जनस्य तर्ह्यच्युत सत्समागमः।**
**सत्सङ्गमो यर्हि तदैव सद्गतौ परावरेशे त्वयि जायते मतिः॥**[६]

(श्रीमद्भा. १०/५१/५२)

बाबा! अनादी-मायाबद्ध जीव संसारात कधी देव योनीत आणि कधी पशू आदी नाना योनींमध्ये अनादी काळापासून कर्मचक्रात भ्रमण करीत आहेत. जर कधी पूर्व सुकृतीच्या प्रभावाने साधुसंग होतो, तेव्हा त्याच क्षणी निखिल कार्य-कारणाचे नियंता भगवान श्रीकृष्णाच्या चरणी जिवाची मती दृढतेने लागते.

ब्रजनाथ–ज्या सुकृतीने साधुसंग मिळतो, ती कोणती सुकृती आहे? कर्म आहे अथवा ज्ञान?

---

(६) हे अच्युत! जीव अनादीकाळापासून जन्म-मृत्युरूप संसाराच्या चक्रात भटकतो आहे. जेव्हा त्या चक्रातून मुक्त होण्याची वेळ येते, तेव्हा सत्संग प्राप्त होतो; आणि ज्या क्षणी सत्संग प्राप्त होतो, त्याक्षणी संतांचे परम आश्रय आणि निखिल कार्य-कारणाचे नियंता आपणांत जिवाची बुद्धी अत्यंत दृढतेने लागते.

बाबाजी–शास्त्रांमध्ये शुभकर्मास 'सुकृती' म्हटले गेले आहे. शुभ कर्म दोन प्रकारची आहेत–भक्ति-प्रवर्तक आणि अवांतर फळ-प्रवर्तक. नित्य-नैमित्तिक कर्म, सांख्यादी ज्ञान हे सर्व काही अवांतर फळास देणाऱ्या सुकृती आहेत. सत्संग आणि भक्तिजनक देश, काल आणि द्रव्याचा संगच–भक्तिप्रद सुकृती आहेत. भक्तिप्रद सुकृती अधिक परिमाणात एकत्रित झाल्यावर त्या कृष्णभक्ती उत्पन्न करतात. अवांतर-फलप्रद सुकृती आपल्या बदल्यात फळे देऊन निवृत्त होऊन जातात. संसारात जितक्याही प्रकारचे दान आदी शुभकर्म आहेत, ते भोगरूप फल प्रदान करतात. ब्रह्मज्ञान संबंधी सुकृती मुक्ति-फळ देतात .उक्त दोन्ही प्रकारच्या सुकृती भक्ति-फळ प्रदान करण्यास समर्थ नाहीत. संत पुरूषांचा संग, एकादशी, जन्माष्टमी, गौरपूर्णिमा आदी साधुभावास निर्माण करणारे काळ, तुळशी, श्रीमंदिर, महाप्रसाद, तीर्थ आणि साधु-वस्तूंचे दर्शन आणि स्पर्श–या सर्व क्रिया भक्तिप्रद सुकृती आहेत.

ब्रजनाथ–जर कोणी व्यक्ती सांसारिक दुःखांनी मर्माहत होऊन त्यापासून सुटका मिळविण्यासाठी विवेकपूर्वक हरिचरणी शरणागत होते, तर त्या व्यक्तीस भक्ती प्राप्त होत नाही का?

बाबाजी–जर मायेच्या दुःखांनी पीडित होऊन विवेक बुद्धीद्वारे ती व्यक्ती हे जाणते की सांसारिक-धर्म–सर्व वाईट आहेत, भगवंतांचे चरणकमल आणि शुद्धभक्तजनच तिचे एकमात्र आश्रय आहेत आणि असे जाणून अनन्य गती होऊन जेव्हा ती भगवंताच्या चरणकमलांप्रती धावित होते, तेव्हा ती सर्वप्रथम भगवद्-भक्तांच्या चरणांचा आश्रय घेते. त्यामुळेच त्या व्यक्तीची भक्तिप्रद मुख्य सुकृती होते–त्यामुळेच ती भगवंताच्या चरणकमलांस प्राप्त करते. आधी तिने जे वैराग्य आणि विवेक प्राप्त केले होते, ते भक्तीच्या प्राप्तीचे गौण उपाय होते. म्हणून सत्संगाच्या व्यतिरिक्त भक्ती प्राप्त करण्याकरिता दुसरा कोणताच मुख्य उपाय नाही.

ब्रजनाथ–गौण भक्तिसाधक असल्यावरही कर्म, ज्ञान, वैराग्य आणि विवेकास भक्तिप्रद-सुकृती म्हणण्यास अडचण काय आहे?

बाबाजी–हो, यात विशेष अडचण आहे. ते साधारणतः जिवास एका अवांतर फळात आबद्ध करतात–अर्थात कर्म जिवास भोगरूपी फलात बांधून शांत होते. वैराग्य आणि विवेक–हे जीवांस अभेद ब्रह्मज्ञानात बुडवून निवृत्त होतात. साधारणतः ब्रह्मज्ञान जिवास भगवंताच्या चरणकमलांच्या प्राप्तीपासून दूरच ठेवते.

म्हणूनच त्यांस विश्वासपूर्वक भक्तिप्रद-सुकृती म्हणता येऊ शकत नाही. हे क्वचितच कुणाला भक्तीपर्यंत घेऊन जातात. परंतु तो साधारण विधी नाही. शुद्धभक्तांच्या संगाचे काही अवांतर फळ नाही–तो जिवास प्रेमापर्यंत अवश्य घेऊन जाईल. असे श्रीमद्भागवतात म्हटले आहे–

**सतां प्रसङ्गान्मम वीर्यसम्विदो भवन्ति हृत्कर्णरसायनाः कथा।**
**तज्जोषणादाश्वपवर्गवर्त्मनि श्रद्धारतिर्भक्तिरनुक्रमिष्यति॥**(७)

(श्रीमद्भा. ३/२५/२५)

ब्रजनाथ–सत्संगच एकमात्र भक्तिप्रद-सुकृती आहे. साधुजनांच्या मुखातून वाहणाऱ्या हरिकथेचे श्रवण आणि तत्पश्चात भक्तीची प्राप्ती यालाच भक्तीचा क्रम-विकास म्हणतात का?

बाबाजी–मी भक्तीच्या क्रम-विकासाचे यथोचितपणे वर्णन करीत आहे. ध्यान देऊन ऐक, संसारात भ्रमण करता करता जिवाच्या सौभाग्यवश भक्तिप्रद-सुकृती होते. शुद्धभक्तीची जी अंगे सांगितली गेली आहेत, त्यातले कुठलेसे एक अंग दैवात् मानव जीवनात घडते. जसे–घटनावश एकादशीच्या दिवशी उपवास, भगवंताच्या लीलास्थळी–तीर्थांचे दर्शन वा त्यांचा स्पर्श, अतिथीच्या बहाण्याने कुण्या शुद्धभक्तावर उपकार, अकिंचन साधूंच्या श्रीमुखातून वाहणारे हरिनाम वा हरिकथा आदींचे श्रवण. उक्त कार्यांपासून जे लोक भोग-मोक्षाची वासना-कामना करतात, त्या लोकांकरिता उक्त क्रिया भक्तिप्रद-सुकृती नाहीत. अतत्त्वज्ञ व्यक्ती जर संयोगवश अथवा लौकिक रूपात भुक्ति-मुक्तीच्या कामनेतून रहित होऊन सर्व कार्यांस करते, तर ही समस्त कार्ये भक्तिप्रद-सुकृती असतात.

याच भक्तिप्रद-सुकृती अनेक जन्मांत एकत्रित आणि संचित होऊन अनन्य भक्तीविषयी श्रद्धा उत्पन्न करवितात. जेव्हा अनन्य भक्तीमध्ये श्रद्धा होते, तेव्हा शुद्ध भक्तांचा–सच्चा संतांचा संग प्राप्त करण्याची लालसा उत्पन्न होते. सत्संगाने साधन

---

(७) सत्पुरुषांच्या समागमाने माझ्या पराक्रमाचे यथार्थ ज्ञान करविणाऱ्या तथा हृदय आणि कानांस प्रिय वाटणाऱ्या कथा होतात. त्यांना सेवन करून शीघ्र अविद्या निवृत्ती पथस्वरूप माझ्यात सर्वप्रथम श्रद्धा, मग रती आणि शेवटी प्रेमभक्तीचा उदय होतो.

आणि भजन क्रमशः होऊ लागतात. भजन जितके शुद्ध होऊ लागते, अनर्थ त्याच परिमाणात दूर होऊ लागतात. अनर्थ दूर झाल्यावर मागील श्रद्धा निर्मळ होऊन निष्ठेच्या रूपात बदलते. निष्ठादेखील क्रमशः निर्मळ होऊन रुची होऊन जाते. रुची भक्तीच्या सौंदर्याने अधिक दृढ झाल्यावर आसक्तीच्या रूपात बदलून जाते, तीच आसक्ती क्रमशः पूर्णता लाभल्यावर भाव अथवा रती होते. रती सामग्रीसोबत मिळून रस होतात–हाच 'प्रेमोपत्तीचा' क्रम विकास आहे

मूळ कथा ही आहे की शुद्ध साधुपुरुषांचे दर्शन झाल्यावर सुकृतशाली व्यक्तींमध्ये सन्मार्गावर (भक्तिपथावर) चालण्याची प्रवृत्ती जन्म घेते. सिद्धांत हा आहे की घटनावश सर्वप्रथम साधुसंग होतो. त्यानंतर श्रद्धा आणि श्रद्धा झाल्यावर द्वितीय साधुसंग होतो. प्रथम सांधुसंगाचे फळ आहे श्रद्धा. श्रद्धेचे दुसरे नाव शरणागती आहे. भगवत्-प्रिय देश,काल, द्रव्य आणि पात्र–यांच्या संपर्काने प्रथम साधुसंग प्राप्त होतो. प्रथम साधुसंगाने ज्या शरणापत्तिरूप श्रद्धेचा उदय होतो, गीतेत तिची लक्षणे अशा प्रकारे सांगितली गेली आहेत–

**सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।**
**अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥**

(गीता १८/६६)

अर्थात, स्मार्त-धर्म, अष्टांगयोग, सांख्य, ज्ञान आणि वैराग्य हे सर्व धर्म 'सर्वधर्म' शब्दाने उक्त झालेले आहेत. या सर्व धर्मांनी जिवाचे प्रयोजन सिद्ध होत नाही. म्हणूनच त्यांच्या त्यागाची गोष्ट सांगितली आहे. भगवान म्हणतात–सच्चिदानन्द-घनस्वरूप मी व्रज-विलासी कृष्णच जिवांची एकमात्र गती आहे, असे जाणून भोग-मोक्ष आदीच्या कामनांनी रहित होऊन अनन्यभावाने माझ्या शरणागत होणेच प्रवृत्तिरूप श्रद्धा आहे. तशी श्रद्धा उदित झाल्याने जीव रडत-रडत वैष्णव साधूंच्या अनुगमनात प्रवृत्त होतात. यावेळी ते ज्या साधूचा आश्रय ग्रहण करतात, त्यांचेच नाव 'गुरू' आहे.

ब्रजनाथ–जिवाचे अनर्थ किती प्रकारचे असतात?

बाबाजी–अनर्थ चार प्रकारचे असतात–(१) स्वरूपाची अप्राप्ती, (२) असत्-तृष्णा, (३) अपराध, (४) हृदय-दौर्बल्य. "मी शुद्ध चित्-कण कृष्णदास आहे."–हे

विसरून जीव आपल्या स्व-स्वरूपापासून खूप दूर होऊन जातो, स्वस्वरूपाची अप्राप्तीच जिवाचा प्रथम अनर्थ आहे. जड पदार्थांमध्ये 'मी' आणि 'माझा' बुद्धी असल्याने जी असत्-विषयांच्या सुखांची तृष्णा होते, त्यास असत्-तृष्णा म्हणतात. पुत्राची कामना, धनाची कामना आणि स्वर्गाची कामना–या तीन प्रकारच्या असत्-तृष्णा आहेत. अपराध दहा प्रकारचे असतात. ते नंतर सांगेन. हृदय दौर्बल्यामुळे शोक आदी निर्माण होतात. हे चार प्रकारचे अनर्थ अविद्येद्वारा बद्ध जिवांची नैसर्गिक फळे आहेत. सत्संगामध्ये शुद्ध कृष्णानुशीलन केल्याने हे सर्व अनर्थ क्रमशः दूर होतात. योग आदी अन्य-अन्य मार्गांमध्ये प्रत्याहार, यम, नियम,वैराग्य आदी साधन-चतुष्टयांची जी व्यवस्था आहे, ती उद्वेगरहित होण्याचा उपाय नाही, त्यात पतनाची अधिकच आशंका असते आणि त्याद्वारे शेवटी कल्याण होणे अत्यंत कठीण असते. उद्वेगरहित होण्याचा एकमात्र उपाय आहे–सत्संगात कृष्णाचे शुद्ध रूपाने अनुशीलन होणे. अनर्थ जितके अधिक दूर होतात, मायिक दशा तितकीच अधिक तिरोहित होते आणि मायिक दशा ज्या परिमाणात दूर होते, जिवाचे स्व-स्वरूप त्याच परिमाणात उदित होते.

ब्रजनाथ–अनर्थरहित व्यक्तींस 'मुक्त' पुरुष म्हणता येते का?

बाबाजी–याविषयी श्रीमद्भागवताचे (६/१४/३-५) निम्नलिखित श्लोक विवेचनीय आहेत–

**रजोभिः समसंख्याताः पार्थिवैरिह जन्तवः।**
**तेषां ये केचनेहन्ते श्रेयो वै मनुजादयः॥**

**प्रायो मुमुक्षवस्तेषां केचनैव द्विजोत्तम।**
**मुमुक्षुणां सहस्रेषु कश्चिम्मुच्यते सिध्यति॥**

**मुक्तानामपि सिद्धानां नारायणपरायणः।**
**सुदुर्लभः प्रशान्तात्मा कोटिष्वपि महामुने॥**(८)

---

(८) भगवन्! या जगात पृथ्वीच्या धूलिकणांसमानच असंख्य जीव आहेत. त्यापैकी काहीच जीव आपल्या कल्याणासाठी झटतात. (अधिकांश जीव विषयी, जडीभूत आणि तुच्छ इंद्रिय सुखांमध्ये प्रमत्त राहतात.) जे थोडेसे जीव आपल्या कल्याणासाठी कार्यरत असतात, त्यातलेही काहीच संसारातून मुक्ती अथवा सिद्धी लाभ करतात. कोटी सिद्ध आणि मुक्त पुरुषांमध्येही काही शांतचित्त

अनर्थमुक्त पुरुषच शुद्धभक्त आहेत–भक्त अत्यंत दुर्लभ आहेत, कोटी-कोटी मुक्त पुरुषांमधून क्वचितच एखादा कृष्णभक्त भेटतो. म्हणूनच कृष्णभक्तांपेक्षा श्रेष्ठ दुसरा दुर्लभ संग जगात मिळू शकत नाही.

ब्रजनाथ–'वैष्णवजन' म्हटल्याने गृहत्यागी वैष्णवाचा बोध होतो का?

बाबाजी–शुद्ध कृष्णभक्तच वैष्णव आहेत. मग ते गृहस्थ असोत अथवा गृहत्यागी, ब्राह्मण असो वा चांडाळ, धनी असो वा दरिद्री. ज्यांची ज्या परिमाणात शुद्ध कृष्णभक्ती आहे, ते त्या परिमाणात कृष्णभक्त असतात.

ब्रजनाथ–मायेद्वारे बांधलेले जीव पाच प्रकारचे असतात, असे आपण आधीच सांगितले आहे. आपण साधन-भक्त आणि भाव-भक्तांची गणनादेखील मायाबद्ध जीवांतर्गत केली आहे. कुठल्या अवस्थेपर्यंत पोहोचल्यावर भक्तजन 'मायामुक्त' श्रेणीमध्ये परिगणित होतात?

बाबाजी–तसे पाहिले तर भक्त-जीवन आरंभ होताच जीव माया-मुक्त म्हणविले जातात, परंतु 'वस्तुगत मुक्ती' भक्ति-साधनेची परिपक्व अवस्था उपस्थित झाल्यावरच होऊ शकते.

त्याआधी केवळ स्वरूपगत-मुक्तीच होते. जिवाचे स्थूल आणि लिंगशरीर संपूर्णपणे विच्छिन्न झाल्यावरच वस्तुगत-माया-मुक्ती होते. साधनभक्तीचे अनुशीलन करता-करता भावभक्तीचा उदय होतो. भावभक्तीमध्ये दृढतेने अवस्थित आल्यावर जीव जडशरीराचा परित्याग करून नंतर लिंगशरीर देखील सोडून चित्-शरीरात अवस्थित होतो. म्हणूनच साधनभक्ति-काळात मायिक दशा रहाते, भावभक्तीच्या प्रारंभीही ती दशा संपूर्णपणे दूर होत नाही–या दोन्ही अवस्थांचे विवेचन करून साधनभक्ती आणि भावभक्तीस मायेत बांधलेल्या पाच प्रकारच्या जीवांमध्ये ठेवले गेले आहे. विषयी आणि मुमुक्षू लोक तर या पाच प्रकारच्या जिवांच्या श्रेणीत अवश्यच परिगणित होतात. मायेतून सुटकारा एकमात्र हरिभक्तिद्वारेच सिद्ध होतो. जीव अपराधी होऊन मायाबद्ध होतात. "मी कृष्णदास आहे" हे विसरणे हाच मूळ अपराध होय. कृष्णकृपेशिवाय अपराध दूर होऊ शकत नाही. म्हणून त्यांच्या

---

महापुरुषच भगवान नारायणाचे भक्त होतात. म्हणूनच नारायणभक्त अतीव दुर्लभ आहेत.

कृपेव्यतिरिक्त मायेतून मुक्ती मिळवण्याची संभावना नाही. ज्ञानी संप्रदायाचा विश्वास आहे–केवळ ज्ञानानेच मुक्ती मिळते. परंतु हा संपूर्ण निराधार विश्वास आहे. भगवत् कृपेशिवाय मायेतून कदापि सुटका मिळू शकत नाही. म्हणूनच श्रीमद्भागवतात (१०/२/३२-३३) म्हटले आहे–

**येऽन्येऽरविन्दाक्ष विमुक्तमानिनस्त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धयः।**
**आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः पतन्त्यधोऽनादृतयुष्मदङ्घ्रयः॥**[९]

**तथा न ते माधव तावकाः क्वचिद् भ्रश्यन्ति मार्गात् त्वयि बद्धसौहृदाः।**
**त्वयाभिगुप्ता विचरन्ति निर्भया विनायकानीकपमूर्द्धसु प्रभो॥**[१०]

ब्रजनाथ–मायामुक्त जीव किती प्रकारचे असतात?

बाबाजी–मायामुक्त जीव दोन प्रकारचे आहेत–नित्यमुक्त आणि बद्धमुक्त. जे जीव मायेद्वारे कधीही बद्ध होत नाहीत, ते नित्यमुक्त जीव आहेत.

नित्यमुक्त जीवही दोन प्रकारचे आहेत–ऐश्वर्यगत-नित्यमुक्त जीव आणि माधुर्यगत-नित्यमुक्त जीव. ऐश्वर्यगत-नित्यमुक्त जीव वैकुण्ठपती नारायणाचे पार्षद आहेत आणि परव्योमस्थ (वैकुण्ठस्थ) मूलसंकर्षणाचे किरण-कण आहेत. माधुर्यगत-नित्यमुक्त जीव गोलोक-वृन्दावननाथ श्रीकृष्णाचे पार्षद आहेत. ते गोलोक-वृन्दावनस्थ श्रीबलदेवांचे किरणकण आहेत.

बद्धमुक्त जीव तीन प्रकारचे आहेत–ऐश्वर्यगत, माधुर्यगत आणि ब्रह्मज्योतिर्गत. जे साधनकाळात ऐश्वर्य-प्रिय असतात, ते परव्योमनाथाच्या नित्य

---

(९) हे कमलनयन! जे लोक मी "मी मुक्त झालो आहे"–असा अभिमान करतात आणि आपल्या प्रती भक्तिशून्य आहेत, त्यांची बुद्धी शुद्ध नाही. ते अनेक क्लेश सहन करून मायातीत परमपद स्वरूप ब्रह्मापर्यंत प्राप्ती करून सुद्धा भगवद्भक्तीचा अनादर केल्याने अधःपतित होऊन जातात.

(१०) हे माधवा! जे आपले निजजन–भक्त आहेत, ज्यांनी आपल्या चरणी स्वतःची खरी प्रीती जोडलेली आहे, ते कधीच त्या ज्ञानाभिमान्यांप्रमाणे आपल्या साधनमार्गातून पतित होत नाहीत. प्रभो! ते आपल्याद्वारे सुरक्षित झाल्याने विघ्न निर्माण करणाऱ्यांच्या डोक्यावर पाय देऊन निर्भयपणे वावरतात, कुठलीही बाधा त्यांच्या मार्गात विघ्न आणू शकत नाही.

पार्षदांसोबत सालोक्य प्राप्त करतात; साधनकाळात जे माधुर्य-प्रिय असतात, ते मोक्ष प्राप्त केल्यानंतर नित्य-वृन्दावन आदी धामांमध्ये सेवा सुखाचा भोग करतात. आणि जे जीव साधनकाळात अभेद अनुसंधानात तत्पर असतात, ते मोक्ष प्राप्त करून ब्रह्म-सायुज्यरूप सर्वनाशास प्राप्त करतात.

ब्रजनाथ–जे श्रीगौरकिशोरांचे अनन्य भक्त आहेत, त्यांची चरम गती काय होते?

बाबाजी–श्रीकृष्ण आणि श्रीगौरकिशोर–ही पृथक तत्त्वे नाहीत. हे दोन्हीही मधुर रसाचे आश्रयस्थान आहेत. थोडासा केवळमात्र भेद हा आहे की माधुर्यरसाचे दोन प्रकोष्ठ असतात, अर्थात माधुर्य आणि औदार्य; त्यांच्यात जेथे माधुर्य प्रबळ असते, तेथे श्रीकृष्ण-स्वरूप विराजमान राहते आणि जेथे औदार्य प्रबळ होते, तेथे श्रीगौरांग-स्वरूप विराजमान राहते. मूळ वृन्दावनातही दोन पृथक प्रकोष्ठ आहेत–एक कृष्णपीठ आणि दुसरे गौरपीठ. कृष्णपीठात जे सर्व नित्यसिद्ध आणि नित्यमुक्त पार्षद माधुर्य-प्रधान-औदार्य भाव प्राप्त केलेले आहेत, ते कृष्णगण आहेत; श्रीगौरपीठात हे समस्त नित्यसिद्ध आणि नित्यमुक्त पार्षदगणच औदार्य-प्रधान-माधुर्य भोग करतात. काहीकाही क्षेत्रांमध्ये कुणी कुणी पार्षद स्वरूप-व्यूहाद्वारे दोन्हीही पीठांमध्ये वर्तमान राहतात, पुनः कोणी-कोणी एकाच स्वरूपात एकाच पीठात वर्त्तमान राहतात, दुसऱ्या पीठात नाही. जे साधनकाळात केवळ गौर उपासक असतात, ते सिद्धिकाळात गौरपीठात सेवा करतात, जे साधनकाळात केवळ कृष्ण उपासक आहेत, ते सिद्धिकाळात कृष्णपीठात सेवा करतात. आणि जे साधनकाळात कृष्ण आणि गौर, दोन्ही स्वरूपांचे उपासक असतात, सिद्धिकाळात ते दोन शरीरे धारण करून दोन्ही पीठांमध्ये एकाचवेळी वर्तमान राहतात. हेच गौर-कृष्णाच्या अचिंत्य-भेदाभेदाचे परम रहस्य आहे.

येथपर्यंत मायामुक्त-अवस्थेसंबंधी उपदेश श्रवण करून ब्रजनाथ अधिक स्थिर राहू शकले नाहीत. ते भावावेशात वृद्ध वैष्णव बाबाजींच्या चरणांप्रती पडले. बाबाजी महाशयांनी रडतरडत ब्रजनाथास मिठी मारली. रात्र खूपच झाली होती. ब्रजनाथ बाबाजी महाशयांची अनुमती घेऊन घरी परतले. संपूर्ण रस्ताभर बाबाजींच्या उपदेशांच्या चिंतनात विभोर होते.

घरी पोहोचल्यावर भोजन करता करता ते आजीस म्हणाले–आजी! जर तुम्ही लोक मला पाहू इच्छिता तर माझ्या विवाहाची चर्चा बंद ठेवा आणि वेणीमाधवासोबत कुठलाच संबंध ठेवू नका–तो माझा परम शत्रू आहे, मी उद्यापासून त्याच्याबरोबर कधीही बोलणार नाही, आणि तुम्ही लोकसुद्धा याविषयी काहीच प्रयत्न करू नका.

ब्रजनाथाची आजी मोठी बुद्धिमती आहे, त्यांनी ब्रजनाथाच्या भावांस समजून मनोमन म्हटले–विवाहाचा प्रस्ताव आता स्थगित ठेवणेच चांगले आहे, ब्रजचा जो भाव पाहते आहे, त्यामुळे असे प्रतीत होते की जर विवाहाकरिता त्याच्यावर दबाव टाकला तर असे होऊ शकते की, तो वाराणसी किंवा वृन्दावनात निघून जाईल. भगवंताची जशी इच्छा असेल तसेच होईल.

**॥ सतरावा अध्याय समाप्त ॥**



# अठरावा अध्याय (प्रमेयांतर्गत भेदाभेद विचार)

वेणीमाधव मोठी दुष्ट व्यक्ती होती. ब्रजनाथाद्वारे तिरस्कृत झाल्यावर त्याने विचार केला–ब्रजनाथाने माझा तिरस्कार केला आहे; ठीक आहे. मी ब्रजनाथास बरोबरच बाबाजी-दलासही याचा इंगा दाखवीन. त्याने काही दुष्ट लोकांशी संगनमत करून ब्रजनाथास चांगले पिटण्याचे षड्यंत्र रचले. असे ठरले की, जेव्हा ब्रजनाथ रात्री मायापुराहून परतेल–तेव्हा रस्त्यात लक्ष्मण टेकडीजवळ निर्जन स्थळी त्याला खूप मारायचे. ब्रजनाथास ही गोष्ट कुठूनतरी कळली. त्यांनी बाबाजींसोबत परामर्श करून ठरविले की ते दररोज मायापुरी येणार नाहीत आणि ज्या दिवशी येतील, दिवसाढवळ्या येतील आणि बरोबर एक बलिष्ठ व्यक्तीसुद्धा घेऊन येतील.

ब्रजनाथाची काही नोकरमाणसे होती. त्यात हरीश डोम एक पक्का लाठीबाज होता. एक दिवस ब्रजनाथांनी हरीशला बोलावून म्हटले–हरीश! आजकाल मी काही विपदेत पडलो आहे. जर तू माझी काही मदत करू शकशील तर माझे रक्षण होऊ शकते.

हरीश म्हणाला–ठाकूर! मी आपल्याकरता प्राणही देऊ शकतो. जर आदेश असेल तर आपल्या शत्रूस आत्ताच मारून टाकतो.

ब्रजनाथ म्हणाले–वेणीमाधव मोठा दुष्ट आहे. तो माझे अनिष्ट करू पाहतो आहे. मी त्याच्या उत्पाताने श्रीवास-अंगणात वैष्णवांनिकट जाण्याचे साहस करू शकत नाही. त्याने मला रस्त्यात मारण्याकरिता काही दुष्टासोंबत मिळून युक्ती केली आहे.

हरीश म्हणाला–ठाकूर! हरीश जिवंत असल्यावर आपल्याला कुठलीच भीती नाही. असे वाटतेय की माझी ही काठी वेणीमाधव ठाकूरच्या डोक्यावर नक्कीच पडणार. ते काहीही असो, जेव्हा आपण श्रीवास अंगणी जाल, तेव्हा मला आपल्यासोबत घ्या, मग बघीन, कोण बेटा काय करतोय ते. मी एकटाच शंभरांना पुरून उरेन.

हरीश डोमासोबत अशा प्रकारे विमर्श करून ब्रजनाथ दोन-चार दिवसांच्या अंतराने श्रीवास-अंगणी जायला निघाले. परंतु तेथे अधिक वेळ थांबू शकले नाहीत. तत्त्वसंबंधी चर्चा न होऊ शकल्याने मनोमन खूप दुःखी होत होते. अशा प्रकारे दहा-वीस दिवस लोटतात न लोटतात तोच वेणीमाधवास सापाने चावले आणि त्याचा मृत्यू झाला. वेणीमाधवाच्या मृत्यूची बातमी ऐकून ब्रजनाथाने मनोमन विचार केला–"वैष्णव विद्वेषामुळेच त्याची अशी गती झाली ना?" पुन्हा विचार केला–**"अद्य वाब्दशतान्ते वा मृत्युर्वै प्राणिनां ध्रुवः"**[१] (श्रीमद्भा. १०/१/३८) परमायू समाप्त झाली, मेला. आता माझ्या श्रीवास-अंगणी येण्याजाण्यातला कंटक (काटा) दूर झाला.

ब्रजनाथ त्याच दिवशी संध्याकाळनंतर श्रीवास अंगणी पोहोचले आणि बाबाजी महाशयांस प्रणाम करीत म्हणाले–आजपासून मी पुन्हा प्रतिदिन आपल्या चरणी उपस्थित होऊ शकेन. बाधा-स्वरूप वेणीमाधव आज हा संसार सोडून निघून गेला.

परम कारुणिक बाबाजी महाशय या अनुदित-विवेक-जिवाच्या मृत्युच्या बातमीने आधी खूप दुःखित झाले. त्या नंतर काहीसे स्थिर होऊन म्हणाले–"**स्वकर्मफलभुक् पुमान्** ", पुरुष आपल्या कर्मांच्या फळास भोगत असतात. जीव कृष्णाचा आहे, कृष्ण त्यास जेथे पाठवतील तेथेच तो जाईल. बाबा! तुला आणखी काही त्रास तर नाही ना?

ब्रजनाथ–मला तर केवळ हेच कष्ट आहेत की मी बरेच दिवसांपर्यंत आपल्या उपदेशामृतापासून वंचित राहिलो. आज पुनः श्रीदशमूलांच्या उरलेल्या उपदेशांस ऐकू इच्छितो.

बाबाजी–मी तुझ्याकरिता सर्वदा प्रस्तुत आहे. तू कुठपर्यंत ऐकले होते आणि त्यास ऐकल्यानंतर तुझ्या मनात काय प्रश्न उठले, बोल.

ब्रजनाथ–श्रीश्रीगौरकिशोरांनी जगतास जी अमूल्य शिकवण दिली आहे, त्या शुद्धमताचे नाव काय आहे? अद्वैतवाद, द्वैतवाद, शुद्धद्वैतवाद, विशिष्टाद्वैतवाद,

---

(१) आज असो किंवा शंभर वर्षांनंतर असो, प्राण्यांचा मृत्यू अवश्य होतो हे अटळ सत्य आहे.

द्वैताद्वैतावाद–या सर्व मतांची आपल्या पूर्व-पूर्व आचार्यांनी स्थापना केली आहे. श्री गौरांगदेवांनी याच मतांपैकी कुठल्या एकास ग्रहण केले आहे अथवा कुठले पृथक मत चालविले आहे का? आपण संप्रदाय-प्रणालीसंदर्भात म्हटले आहे की, श्रीगौरांगदेव ब्रह्म-संप्रदायांतर्गत आहेत. जर अशी गोष्ट आहे तर त्यांना मध्वाचार्यांद्वारे प्रकाशित द्वैतवादाचे आचार्य मानावे की आणखी काही?

बाबाजी–बाबा! तू श्रीदशमूलाचा आठवा श्लोक ऐक–

**हरेः शक्तेः सर्वं चिदचिदखिलं स्यात् परिणतिः**
**विवर्तं नो सत्यं श्रुतिमितिविरुद्धं कलिमलम्।**
**हरेर्भेदाभेदौ श्रुतिविहिततत्त्वं सुविमलं**
**ततः प्रेम्नः सिद्धिर्भवति नितरां नित्यविषये॥**

(दशमूल ८)

अर्थात चित्-अचित् समस्त जगत कृष्ण-शक्तीची परिणती आहे. विवर्तवाद सत्य नाही. उलट तो कळीकाळाचा मळ आणि वेद-विरुद्ध मत आहे. अचिंत्यभेदाभेद-तत्त्वच वेद-संमत विशुद्ध मत आहे. अचिंत्य भेदाभेद-तत्त्वानेच नित्य तत्त्वाप्रती प्रेम-सिद्धी होते.

उपनिषदांच्या वाणीस 'वेदान्त' म्हणतात. वेदांताचा यथार्थ अर्थ प्रकाशित करण्याकरिता व्यासदेवांनी विषयांचे विभागपूर्वक चार अध्यायांनी युक्त 'ब्रह्मसूत्र' नावाने ज्या सूत्रांची रचना केली आहे, त्यांनाच 'वेदान्तसूत्र' ही म्हणतात. विद्वान मंडळीमध्ये वेदान्तसूत्रांचा मोठा आदर आहे. साधारण रूपात सिद्धांत हा आहे की, वेदान्तसूत्रांमध्ये जे काही सांगितले गेले आहे, तोच वेदांचा यथार्थ अर्थ आहे. प्रत्येक मताचे आचार्यगण वेदान्तसूत्राच्या मदतीने आपापले मत-पोषक सिद्धांत निर्माण करतात.

श्रीशंकराचार्यांनी या सूत्रांद्वारे 'विवर्तवादाचा' उपदेश केला आहे. ते म्हणतात–ब्रह्माची परिणती स्वीकार केल्याने ब्रह्माचे ब्रह्मत्व राहत नाही. म्हणूनच परिणामवाद चांगला नाही–विवर्तवादच युक्तिसंगत सुंदर मत आहे. विवर्तवादाचे दुसरे नाव 'मायावाद' आहे. त्यांनी वेद-मंत्रांचा आवश्यकतेनुसार संग्रह करून विवर्तवादाची पुष्टी केली आहे. यावरून असे प्रतीत होते की परिणामवाद प्राचीन

काळापासूनच प्रचलित आहे. श्रीशंकरांनी विवर्तवाद स्थापन करून परिणामवादाच्या गतीस थांबविले आहे. विवर्तवाद एक मतवाद आहे.

श्रीमन् मध्वाचार्य विवर्तवादाने संतुष्ट होऊ शकले नाहीत. त्यांनी द्वैतवादाची सृष्टी केली. त्यांनीही आपल्या प्रयोजनाच्या (जरूरीप्रमाणे) वेद-मंत्रांचा संग्रह करून त्यातून द्वैतवादाचे प्रतिपादन केले आहे. त्याच प्रकारे श्रीमद्-रामानुजार्यांनी विशिष्टाद्वैतवादाचा,श्रीनिम्बादित्याचार्यांनी द्वैताद्वैतवादाचा आणि श्रीविष्णुस्वामींनी शुद्धाद्वैतवादाचा प्रचार केला आहे. श्रीशंकराचार्यांचा मायावाद भक्तितत्त्वाच्या प्रतिकूल आहे. चारही वैष्णव आचार्यांनी वेगवेगळ्या मताचा प्रचार करूनही आपापल्या सिद्धांतांना भक्तिमूलक बनविले आहे. श्रीमन् महाप्रभूंनी समस्त श्रुती-वाणींस आदरपूर्वक ग्रहण करून त्यातून जे सिद्ध होते, तोच उपदेश केला आहे. महाप्रभूंच्या प्रचारित उपदेश अर्थात सिद्धांताचे नाव 'अचिंत्य भेदाभेद तत्त्व' आहे. श्रीमन् महाप्रभूंनी श्रीमन् मध्वाचार्यांच्या संप्रदायात आविर्भूत होऊनही त्यांच्या मताचे सारमात्र ग्रहण केले आहे.

ब्रजनाथ–परिणामवाद कशास म्हणतात?

बाबाजी–परिणामवाद दोन प्रकारचे असतात. 'ब्रह्म-परिणामवाद' आणि तत्-'शक्ती-परिणामवाद'. ब्रह्म-परिणमावादाची शिकवण ही आहे–अचिंत्य आणि निर्विशेष ब्रह्म परिणत होऊन एका अंशातून जीव आणि दुसऱ्या अंशातून जड-जगत झाले आहेत. या मतानुसार '**एकमेवाद्वितीयम्**' [(२)] (छा. ६२/ १) श्रुती मंत्राद्वारे ब्रह्म नामक केवळ एक वस्तू स्वीकृत आहे, या मतासही 'अद्वैतवाद' असेही म्हणता येऊ शकते. पहा, विकारासच परिणाम म्हटले गेले आहे.

शक्ति-परिणामवादी म्हणतात–ब्रह्माचा विकार कदापिही संभव नाही. उलट ब्रह्माची अचिंत्यशक्ती परिणत होऊन जीवशक्ती अंशाने जीवसमूह आणि मायाशक्ती अंशाने जड-जगाच्या रूपात प्रकाशित आहे, असे मानल्याने परिणामवादातही ब्रह्म विकृत होत नाही.

---

(२) या विश्वाच्या सृष्टी होण्यापूर्वी एक अद्वितीय आणि सत्य तत्त्वमात्र होते.

**सतत्त्वतोऽन्यथा-बुद्धिर्विकार इत्युदाहृतः।**[३]

(सदानन्द-कृत 'वेदान्तसार' संख्या-५९)

विकार काय आहे? हे सत्य तत्त्वापेक्षा एक अन्यथा बुध्दिमात्र आहे. दूध दह्याच्या रूपात विकृत होते. दह्यामध्ये दूध-रूपकत्व आहे. दूध विकृत झाल्यावर अर्थात घट्ट झाल्यावर त्या विकृत अर्थात घट्ट झालेल्या वस्तूस दूध नाही–दही म्हटले जाते. ब्रह्म परिणामवादात जगत आणि जीव ब्रह्माचे विकार आहेत. हा विचार अत्यंत अशुद्ध आहे–यात जरादेखील संशय नाही; निर्विशेष ब्रह्मच केवळ एकमात्र वस्तू आहे, त्याव्यतिरिक्त जर अन्य कुठलीही वस्तू स्वीकृत नाही, तर तिचा 'विकार' ही दुसरी वस्तू आलीच कुठून? म्हणून ब्रह्म तत्त्वात विकाराचे काहीच स्थान दिसून येत नाही.

त्यांना विकारी मानून वस्तू सिद्धी होत नाही. म्हणूनच ब्रह्म-परिणामवाद कुठल्याही परिस्थितीत युक्तिसंगत ठरत नाही. 'शक्ति-परिणामवादा'त अशा प्रकारचा कुठलाच दोष स्पर्श करीत नाही. ब्रह्म अविकृतच राहते, त्याची अघटन-घटन पटीयसी शक्ती कुठेतरी अणू अंशाने जीव रूपात परिणत झाली आहे आणि कुठे कुठे छाया अंशाने जड ब्रह्मांड रूपात परिणत झाली आहे. ब्रह्माची इच्छा झाली की 'जीव-जगत व्हावे' आणि लगेचच त्याच्या पराशक्तिगत जीवशक्तीने अनंत जीवांना प्रकट केले. ब्रह्माची इच्छा झाली की जड-जगत व्हावे आणि त्याच वेळी पराशक्तीच्या छायारूप-मायाशक्तीने असीम जड-जगताला प्रकट केले. यात ब्रह्म स्वयं विकृत होत नाही. जर असे म्हटले की इच्छा होणे हाच त्यांचा विकार आहे आणि हा विकार ब्रह्मात कसा काय असू शकतो? तर याचे उत्तर असे की, तुम्ही जिवाच्या इच्छेला लक्ष्य करून ब्रह्म तत्त्वाच्या इच्छेसही विकार म्हणत आहात. जीव क्षुद्र आहे. त्याची जी इच्छा होते, ती दुसऱ्या शक्तीच्या संस्पर्शाने निर्माण होते. म्हणूनच जिवाची इच्छा 'विकार' असते, परंतु ब्रह्माची इच्छा तशी नसते.

---

(३) कोण्या एक सत्य तत्त्वापासून कोणते दुसरे तत्त्व उत्पन्न झाल्यावर उत्पन्न वस्तूमध्ये जी अन्य वस्तू उत्पन्न झाल्याची बुद्धी असते, त्यास विकार अर्थात परिणाम म्हणतात. जसे–ब्रह्म एक सत्यवस्तू आहे, त्यापासून जीवरूप एक सत्यवस्तू आणि मायिक ब्रह्माण्डरूप एक अधिक सत्यवस्तू पृथक रूपाने उत्पन्न झाली आहे–अशा बुद्धीस विकार किंवा परिणाम म्हणतात. (अमृत प्रवाह भाष्य)

ब्रह्माची निरंकुश इच्छाच ब्रह्माचे स्वरूप-लक्षण आहे–ती ब्रह्माच्या शक्तीपासून अपृथक असूनही पृथक आहे. म्हणूनच ब्रह्माची इच्छाच ब्रह्माचे स्वरूप आहे, त्यात विकारास स्थान नाही. त्याची परिणतीसुद्धा नाही, इच्छा झाल्याबरोबरच शक्ती क्रियावती होते. परिणाम शक्तीचाच असतो. हे सूक्ष्म विवेचन किंवा विभाग जिवाच्या क्षुद्र बुद्धीपलीकडचा आहे–केवळ वेद-प्रमाणाद्वारेच यास समजले जाऊ शकते.

आता शक्तीचा परिणाम कसा होतो? हेच विवेचनीय आहे. दूध जसे दही झाले आहे, शक्ती-परिणामवादाचा हा सर्वांश उपमा स्थळ नाही आहे. यद्यपि प्राकृत वस्तूंशी अप्राकृत तत्त्वाचे उदाहरण संपूर्णपणे ठीक बसत नाही, तथापि प्राकृत उदाहरण अप्राकृत तत्त्वाच्या कुठल्या एका अंशास स्पष्ट करते. असे म्हटले गेले आहे–"प्राकृत चिन्तामणी नाना प्रकारच्या रत्नांचे ढीग प्रसवूनही अविकृत राहतो" [४] अप्राकृत तत्त्वाच्या सृष्टी-व्यापारासही त्याच प्रकारे समजावयास हवे. परमेश्वर आपल्या अचिंत्यशक्तीद्वारे इच्छा होताच अनंत जीवमय जैवजगत आणि चौदा लोकयुक्त अनंत ब्रम्हांडांची रचना करूनही संपूर्णपणे विकारशून्य राहतात. 'विकारशून्य' शब्दाद्वारे कुणी असे समजू नये की तत्त्व-वस्तू निर्विशेष आहे, उलट बृहत्-वस्तू ब्रह्म सर्वदा षडैश्वर्यपूर्ण भगवत्-स्वरूप आहे, केवळ निर्विशेष म्हटल्याने त्यांची चित्-शक्ती स्वीकृत होत नाही. परतत्त्व आपल्या अचिंत्यशक्तीद्वारे नित्य सविशेष आणि निर्विशेष दोन्ही आहेत, केवळ निर्विशेष मानल्याने त्यांचे अर्ध स्वरूपच मानणे होते आणि त्याने पूर्णतेची हानी होते. परतत्त्वात 'अपादान', 'करण' आणि 'अधिकरण' रूप तीन कारकत्वे श्रुतींद्वारे वर्णित आहे–

**यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति।**
**यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्म।**

---

(४) वस्तुतः परिणामवाद सेइत प्रमाण। देहे आत्मबुद्धि हय विवर्त्तेर स्थान॥
अविचिन्त्य शक्तियुक्त श्रीभगवान्। इच्छाय जगत्-रूपे पाय परिणाम॥
तथापि अचिन्त्य शक्त्ये हय अविकारी। प्राकृत चिन्तामणि ताहे दृष्टान्त धरि॥
नाना रत्नराशि हय चिन्तामणि हइते। तथापिह मणि रहे स्वरूपे अविकृते॥
प्राकृत वस्तुते यदि अचिन्त्यशक्ति हय। ईश्वरेर अचिन्त्य-शक्ति-इथे कि विस्मय॥

(चै. च. आ. ७/१२३-२७)

(तै. भृगु., १ अनु.)

अर्थात “हे सर्व प्राणी ज्यांच्यापासून उत्पन्न होतात”–या वाक्याने ईश्वराचे अपादन-कारकत्व सिद्ध होते. उत्पन्न होऊन ज्यांच्यामुळे हे सर्व जीवित आहेत,–या वाक्याने त्यांचे करण-कारकत्व लक्षित होते, ’ज्यांच्यात गमन आणि प्रवेश करतात’–या वाक्याने ईश्वराचे अधिकरण कारकत्व सिद्ध होते.

या तीन लक्षणांनी परतत्त्व विशिष्ट आहे–हेच त्याचे विशेष आहे. म्हणून भगवान सर्वदा सविशेष आहेत (ज्यांची विषय जिज्ञासा करीत आहेस–तेच ब्रह्म आहेत.) श्रीजीव गोस्वामी भगवत्तत्त्वाचे विवेचन करतांना लिहितात–

**एकमेव परमं तत्त्वं स्वाभाविकाचिन्त्यशक्त्या**
**सर्वदैव स्वरूपतद्रूपवैभवजीवप्रधानरूपेण**
**चतुर्द्धावतिष्ठते सूर्यान्तरमण्डलस्थित तेज इव**
**मण्डल तद्बहिर्गततद्रश्मितत्प्रतिच्छविरूपेण।**

अर्थात परमतत्त्व एकच आहेत. ते स्वाभाविक अचिंत्यशक्तिसंपन्न आहेत, त्याच शक्तीच्या आधारे ते सर्वदा स्वरूप, तद्रुप-वैभव, जीव आणि प्रधान–या चार रूपांमध्ये प्रकाशित आहेत. याविषयी सूर्यमंडलस्थ तेज, मंडळ, त्या मंडळाबाहेरील सूर्यरश्मी आणि त्यांची प्रतिच्छवी अर्थात दूरगत प्रतिफलन–ही किंचित उदाहरणे आहेत.

सच्चिदानन्दमात्र विग्रहच त्यांचे स्वरूप आहे. चिन्मय नाम, धाम, संगी आणि त्यांच्या व्यवहारात येणारी समस्त उपकरणेच स्वरूप-वैभव आहेत. नित्यमुक्त, नित्यबद्ध, अनंत जीवच अणुचित् आश्रय आहेत आणि मायाप्रधान आणि त्यातून उत्पन्न समस्त जडीय स्थूल आणि सूक्ष्म जगतच ‘प्रधान’ शब्दवाच्य आहे. हे चारही प्रकाश ज्याप्रमाणे नित्य आहेत, परम तत्त्वाचे एकत्वही त्याचप्रकारे नित्य आहे. हे दोन्ही परस्पर नित्य विरुद्ध व्यापार एकत्रितपणे कशा प्रकारे संभव आहेत? उत्तर असे की–जिवाच्या बुद्धीने हे असंभव आहे; कारण जिवाची बुद्धी ससीम आहे. परमेश्वराच्या अचिंत्य शक्तीद्वारे हे असंभव नाही.

ब्रजनाथ–‘विवर्तवाद’ कशास म्हणतात?

बाबाजी–वेदांमध्ये वितर्कासंबंधी उल्लेख सापडतो, परंतु तो विवर्तवाद नाही. श्रीशंकराचार्यांनी 'विवर्त' शब्दाचा जसा अर्थ लावला आहे, त्यामुळे 'विवर्तवाद' आणि 'मायावाद' एकत्र झाले आहेत.

'विवर्त' शब्दाचा वैज्ञानिक अर्थ अशाप्रकारे आहे–

**अतत्त्वतोऽन्यथाबुद्धिर्विवर्त्तइत्युदाहृतः।**

(सदानन्द कृत 'वेदान्तसार' ४९ संख्या)

अर्थात एका वस्तूत दुसऱ्या वस्तूची प्रतीती (भ्रम) असण्याचेच नाव 'विवर्त' आहे. जीव चित्-कण वस्तू आहे, परंतु जडीय स्थूल आणि लिंगदेहामध्ये आबद्ध होऊन भ्रमवशतः स्थूल आणि लिंगशरीरासच 'मी' म्हणून जो परिचय प्रदान केला जातो, तीच तत्त्व-ज्ञान-शून्य-अन्यथाबुद्धी आहे–हेच वेद प्रतिपादित एकमात्र विवर्ताचे उदाहरण आहे. जसे–कुणी समजते की मी 'सनातन पाण्डेयचा' पुत्र रमानाथ पाण्डेय आहे आणि कुणी असे समजत आहे की मी 'हरखुआ' डोबांचा पुत्र 'मधुआ' डोंब आहे. अशी बुद्धी नितांत भ्रमपूर्ण आहे. चित्-कण जीव रमानाथ पाण्डेय ही नाही आणि मधुआ डोंबही नाही, तरीही देहात आत्मबुद्धी असल्याने असे प्रतीत होते. 'रज्जुमध्ये (दोरीमध्ये) सर्प-भ्रम' आणि 'शुक्तीमध्ये (शिंपल्यामध्ये) रजत-भ्रम (चांदीचा भ्रम)' अशीच उदाहरणे आहेत. म्हणून या सर्व उदाहरणांद्वारे मायिक शरीरात आत्मबुद्धीरूप विवर्त-भ्रमास दूर करण्याकरिता वेदांमध्ये परामर्श आहे. मायावादी वेदांचे यथार्थ तात्पर्य त्यागून एक प्रकारच्या हास्यास्पद विवर्तवादाची स्थापना करतात. "मी ब्रह्म आहे"–हीच तात्त्विक बुद्धी आहे आणि "मी जीव आहे"–हीच अन्यथाबुद्धी वा विवर्त आहे–हे मायावादींचे मत आहे. वास्तविक अशा विवर्तवादाने सत्याचा निर्णय होत नाही. विवर्तवाद वास्तवात शक्ती-परिणामवादाच्या विरोधी नाही. परंतु मायावाद्यांचा विवर्तवाद नितांत हास्यास्पद आहे. मायावाद्यांचा विवर्तवाद अनेक प्रकारचा आहे. त्यात ब्रह्माचे जीवभ्रमाद्वारे जीवत्व, भ्रमतत्त्वाचे प्रतिबिंब होऊन जीवत्व आणि स्वप्नात ब्रह्मापासून पृथक-पृथक जीव आणि जड-जगाची ब्रह्मअतिरिक्त बुद्धी–हे तीन प्रकारचे विवर्तवाद अधिक प्रचलित आहेत. हे समस्त विवर्तवाद सत्य नाहीत, त्याबरोबरच वेद-प्रमाणांविरूद्धही आहेत.

ब्रजनाथ–मायावाद काय वस्तू आहे, मी यास समजू शकत नाही?

बाबाजी–जरा लक्ष देऊन ऐक. मायाशक्ती स्वरूपशक्तीची सावलीमात्र आहे. चित्-जगात तिचा प्रवेश नाही. ही जड-जगाची अधिकर्त्री आहे. जीव अविद्याग्रस्त होऊन भ्रमाने जड-जगात प्रविष्ट होतो. चित् वस्तूची स्वतन्त्र सत्ता आणि स्वतन्त्र शक्ती आहे. परंतु मायावाद वस्तुतः यास मानत नाही. मायावादाचे कथन आहे–जीवच ब्रह्म आहे–मायेमुळे भेद प्रतीत होतो, 'जोपर्यंत मायेसोबत संबंध आहे, तोपर्यंत जिवाचे जीवत्व आहे, माया संबंध दूर होताच जीव–ब्रह्म असतो. मायेपासून पृथक होऊन चित्कणाची स्थिती नसते, म्हणून जिवाचा मोक्षच त्याचे ब्रह्मतत्त्वासोबत निर्वाण आहे. अशा प्रकारे मायावाद शुद्ध जिवाची सत्ता स्वीकारत नाही. ते आणखीही म्हणतात–भगवंत मायेचे आश्रित तत्त्व असल्याने जेव्हा जड-जगात येतात तेव्हा त्यांना मायेचा आश्रय घ्यावा लागतो. ते एखादे मायिक-स्वरूप ग्रहण केल्याशिवाय संसारात आविर्भूत होऊ शकत नाहीत, कारण ब्रह्मावस्थेत ते निराकार आहेत–त्यांचा कुठलाच विग्रह नाही. ईश्वरावस्थेत त्यांचे मायिक शरीर असते. अवतारगण मायिक शरीर ग्रहण करून जगात अवतीर्ण होतात आणि मोठमोठी कार्ये करतात. त्यानंतर मायिक शरीरास या जगात ठेवून स्वधामास गमन करतात. मायावादी भगवंताप्रती काही अनुग्रह प्रकाशपूर्वक जीव आणि ईश्वराच्या अवतारांमध्ये काही भेद स्वीकार करतात. तो भेद असा की जीव कर्म-परतन्त्र होऊन स्थूल शरीर धारण करतात आणि इच्छेच्या विरुद्धही कर्मांच्या प्रवाहात जरा, मरण आणि जन्म प्राप्त करण्याकरिता बाध्य आहेत. परंतु ईश्वर स्वेच्छेने मायिक शरीर, मायिक उपाधी, मायिक नाम आणि मायिक गुणांस ग्रहण करतात आणि त्यांची इच्छा झाल्यावर ते या सर्वांचा परित्याग करून शुद्धचैतन्य बनू शकतात, ईश्वर कर्म तर करतात, परंतु कर्मफलाधीन नसतात–हे सर्व मायावादींचे असत् सिद्धांत आहेत.

ब्रजनाथ–वेदांमध्ये अशा मायावादाचा उपदेश कुठे आढळतो का?

बाबाजी–नाही! वेदांमध्ये कुठेही असा मायावाद आढळत नाही. मायावाद बौद्धधर्म आहे, पद्मपुराणात लिहिले आहे–

**मायावादमसच्छास्त्रं प्रच्छन्नबौद्धमुच्यते।**
**मयैव विहितं देवि कलौ ब्राह्मणमूर्त्तिना॥**

(उत्तरखण्ड ४२/६)

(अर्थात) श्रीमहादेव उमादेवीच्या प्रश्नाचे उत्तर देतांना म्हणतात, देवी! मायावाद अत्यंत असत्-शास्त्र आहे. हे बौद्धमत आहे, वैदिक-वाणींच्या आड प्रच्छन्न रूपाने आर्यांच्या धर्मात प्रवेश केला आहे. मी कलिकाळात ब्राह्मण-मूर्ती धारण करून या मायावादाचा प्रचार करीन.

ब्रजनाथ–प्रभो! देवदेव महादेव तर वैष्णवांमध्ये अग्रगण्य आहेत, त्यांनी असे वाईट कर्म का केले?

बाबाजी–श्रीमहादेव भगवंताचे गुणावतार आहेत. असुरगण भक्तिपथास ग्रहण करून सकाम भावाने भगवंताची उपासना करून आपापला दुष्ट उद्देश्य सफल करण्याचा प्रयत्न करू लागले. हे पाहून परम करुणामय भक्तवत्सल भगवंतांनी विचार केला की असुरगण भक्तिपथास भ्रष्ट करून भक्तांना कष्ट प्रदान करीत आहेत. म्हणूनच भक्तिपथास भ्रष्ट होण्यापासून वाचविले पाहिजे, असा विचार करून त्यांनी श्रीमहादेवांस बोलावून म्हटले–'हे शंभो! तामस प्रवृत्तीयुक्त असुरांमध्ये माझ्या शुद्ध भक्तीचा प्रचार केल्याने जीव-जगताचे कल्याण होऊ शकत नाही. म्हणूनच दैत्यांस मोहित करण्याकरिता एका अशा शास्त्राचा प्रचार करा, ज्यायोगे असा मायावाद प्रकाशित होवो, जो मला दैत्यांपासून गोपनीय ठेवील. आसुरी-प्रवृत्तीचे लोक शुद्धभक्तिपथाचा त्याग करून त्या मायावादाचा आश्रय ग्रहण करतील तथा सहृदय भक्तजन कुठल्याही प्रकारच्या बाधेविना शुद्धभक्तीचे आस्वादन करतील.' परम वैष्णव श्रीमहादेवांनी या कठीण कार्याचा भार ग्रहण करण्यास सर्वप्रथम दुःख प्रकट केले. परंतु भगवंताची आज्ञा मानून मायावादाचा प्रचार केला. म्हणून जगद्गुरू श्रीमन् महादेवांचा यात दोष तरी काय आहे? ज्या परमेश्वराच्या कौशल्याने संपूर्ण जगत्-चक्र सुंदर रूपात चालू आहे, जे जगताच्या संपूर्ण जिवांच्या कल्याणाकरिता आपल्या हातात कौशल्यरूपी सुदर्शन चक्र धारण करीत आहेत, त्यांच्या आज्ञेत न जाणो कुठले कल्याण निहीत आहे, हे तेच जाणोत. अधीन सेवक-वृंदाचे एकमात्र कर्तव्य तर प्रभूच्या आज्ञेचे पालन करणे हेच आहे. म्हणूनच शुद्धवैष्णवजन मायावाद-प्रचारक शिवांचे अवतार असणारे शंकराचार्य यांच्यात कुठलाच दोष पाहत नाहीत. या कथनाचे शास्त्रीय प्रमाण ऐक–

**त्वमाराध्य तथा शंभो ग्रहिष्यामि वरं सदा।**
**द्वापरादौ युगे भूत्वा कलया मानुषादिषु॥**

**स्वागमैः कल्पितैस्त्वञ्च जनान् मद्विमुखान् कुरु।**
**माञ्च गोपय येन स्यात् सृष्टिरेषोत्तरोत्तरा॥**[५]

(पद्मपुराण, उत्तरखण्ड, ४२/१०९-११० आणि
नारदपंचरात्र ४/२/२९-३०)

आणखीही–

**एष मोहं सृजाम्याशु यो जनान् मोहयिष्यति।**
**त्वञ्च रुद्र महाबाहो मोहशास्त्राणि कारय॥**

**अतथ्यानि वितथ्यानि दर्शयस्व महाभुज।**
**प्रकाशं कुरु चात्मानमप्रकाशञ्च मां कुरु॥**[६]

(वराहपुराण)

ब्रजनाथ–मायावादाच्या विरुद्ध काय वेद-प्रमाण उपलब्ध आहेत?

बाबाजी–अखिल वेदशास्त्रच मायावादाच्या विरुद्ध प्रमाण आहेत. समस्त वेदांना धुंडाळून मायावादींनी त्यातील चार वाक्यांस आपल्या पक्षामध्ये गणले आहे. ते या वाक्यांस महावाक्य म्हणतात. ही चार वेद-वाक्ये अशी आहेत–(१) **'सर्वं खल्विदं ब्रह्म'**[७] (छा.उ. ३ /१४/१); **'नेह नानास्तिकिञ्चन'**[८] (बृ.उ. ४/४/१९, कठ .उ. २/

---

(५) श्रीविष्णू म्हणाले–हे शंभो! स्वयं भगवान असूनही मी ज्याप्रकारे असुर-मोहन कार्याकरिता वेगवेगळ्या देवी देवतांची आराधना केली आहे. त्याचप्रकारे तुझीही आराधना करून सर्वदा वर प्राप्त करीन. तू कलियुगात मनुष्य आदी जीवांमध्ये अंशरूपात अवतीर्ण व्हावे आणि आगमादी शास्त्रांमध्ये कल्पित मताचा प्रचार करून त्यायोगे मानव-समुदायास माझ्यापासून विमुख करून मला लपवून ठेव. त्याद्वारे माझ्या लीला पुष्टिकरिता जगतात उत्तरोत्तर बहिर्मुख-सृष्टी वाढतच जाईल.

(६) मी अशा मोहाची रचना करणार आहे, जी जनसमुदायास मोहित करेल. हे महाबाहो रुद्र! तू देखील मोह-शास्त्राची रचना कर. हे महाभुज! अतथ्यास तथ्य आणि तथ्यास अतथ्याच्या रूपात प्रकाशित कर. तू आपल्या आत्म-विध्वसंक रुद्ररूपाचा प्रकाश कर आणि माझ्या नित्य भगवत्-स्वरूपास आवृत कर.

१ ११) (२) **'प्रज्ञानं ब्रह्म'** [९] (ऐत.५/३) ; (३) **'तत्त्वमसि श्वेतकेतो'**[१०] (छा.उ. ६ ८/७) (४) **'अहं ब्रह्मास्मि'**[११] (बृ. उ. १/४/१०)

पहिल्या महावाक्यातून काय प्राप्त होते? हे जीव आणि जडात्मक समस्त विश्वच ब्रह्म आहे, ब्रह्माव्यतिरिक्त आणखी काहीही नाही. त्या ब्रह्माचा परिचय काय आहे? यास दुसऱ्या ठिकाणी म्हणतात–

**न तस्य कार्यं करणञ्च विद्यते न तत् समश्चाभ्यधिकश्च दृश्यते।**
**परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च॥**

(श्वे. उ. ६/८)

अर्थात त्या परब्रह्म परमात्म्याची कुठलीही क्रिया प्राकृत नसते, कारण त्यांचे कुठलेच करण (अवयव)–हस्त-पदादी प्राकृत नसतात. प्राकृत करणाविनाच त्यांच्या अप्राकृत लीलेचे कार्य होते. ते अप्राकृत शरीराने एकाच वेळी सर्वत्र विराजमान राहतात. म्हणूनच त्यांच्यापेक्षा मोठा तर दूरच, परंतु त्यांच्या समानदेखील दुसरे कुणीच दिसत नाही. त्या परमेश्वराची अलौकिकी शक्ती विविध प्रकारची असते असे ऐकण्यात येते, ज्यात ज्ञानशक्ती, बलशक्ती आणि क्रियाशक्ती–या तीन प्रधान आहेत. या तिघांस क्रमशः चित्-शक्ती वा सम्वित्-शक्ती, सत् अथवा सन्धिनीशक्ती आणि आनंद वा ल्हादिनीशक्ती सुद्धा म्हणतात.

त्या ब्रह्मास आणि त्याच्या शक्तीस अभिन्न मानले गेले आहे. त्या शक्तीस स्वाभाविकी शक्ती म्हटले गेले आहे, त्या शक्तीत विचित्रता आहे. शक्ती आणि

---

(७) समस्त जगतच ब्रह्म आहे.

(८) ब्रह्मात कसल्याही प्रकारचे नानात्व नाही.

(९) प्रज्ञानच ब्रह्म आहे.

(१०) हे श्वेतकेतो! तू तोच आहेस.

(११) मी ब्रह्म आहे.

शक्तिमानास अभिन्न मानल्याने ब्रह्माचे नानात्व होत नाही, परंतु ब्रह्म आणि शक्तीस पृथक जाणून जगाप्रती दृष्टिपात केल्याने नानात्व सिद्ध होते.

**नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान्॥**[१२]

(कठ. उ. ५/१३, श्वे.उ. ६/१३)

या श्रुतीवाक्यामध्ये वस्तूचे नानात्व आणि अनेक नित्य-वस्तूंचा स्वीकार केला गेला आहे. अशा प्रकारच्या वाक्यात शक्तीस शक्तिमानापासून वेगळे करून त्यांच्या ज्ञान, बल आणि क्रियांचा विचार केला गेला आहे.

(२) **'प्रज्ञानं ब्रह्म'** (ऐत. उ.१/५/२) [१३] –या वाक्यात ज्या प्रज्ञानास ब्रह्मासोबत एक मानलेले आहे, त्या 'प्रज्ञा' शब्दाचा व्यवहार बृहदारण्यक श्रुतीमध्ये प्रेमभक्तीकरिता झाला आहे.–**"तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः"**[१४] (४ / ४/२१)

(३) **'तत्त्वमसि श्वेतकेतो'**[१५] (छा. उ. ६/८/७) या वाक्यात ज्या ब्रह्मासोबत ऐक्याची शिकवण दिली गेली आहे, त्यासंबंधी बृहदारण्यकोपनिषदामध्ये अशा प्रकारे म्हटले गेले आहे–

**यो वा एतदक्षरं गार्ग्यविदित्वास्माल्लोकात्प्रैति स कृपणोऽथ।**
**य एतदक्षरं गार्गि विदित्वास्माल्लोकात्प्रैति स ब्राह्मणः॥**[१६]

(बृ.उ.३/८/१०)

---

(१२) ते समस्त नित्य वस्तूंमध्ये परम नित्य आहेत, अर्थात श्रेष्ठ नित्य वस्तू आहेत, आणि समस्त चेतन वस्तूंमध्ये ते चैतन्यदाता मूळ-चेतन आहेत. ते एक असूनही सर्वांच्या इच्छा पूर्ण करतात.

(१३) प्रज्ञानच ब्रह्म आहे.

(१४) धीर–स्थिर ब्रह्मज्ञ व्यक्ती परब्रह्म भगवंतास विशेष रूपाने जाणून त्यांच्या प्रती प्रकृत ज्ञान-स्वरूपा प्रेमभक्ती करतील.

(१५) हे श्वेतकेतो! तू तोच आहेस

**'तत्त्वमसि'**–ज्ञान-प्राप्त व्यक्ती शेवटी भगवद्भक्ती प्राप्त करून ब्राह्मण होतात.

(४) **'अहं ब्रह्मास्मि'** [१७] (बृ.उ. १ /४/ १०)–या वाक्यात ज्या विद्येची प्रतिष्ठा आहे, ती विद्या जर शेवटी भक्तिरूपिणी नसेल, तर अशा विद्येस ईशोपनिषदात हेय मानले गेले आहे–

**अन्धं तमः प्रविशन्ति येऽविद्यामुपास ते।**
**ततो भूय इव ते तमो य उ विद्यायां रताः॥** [१८]

(ईशोपनिषद् ९ म.)

अर्थात अविद्येची उपासना करून जो आत्म्याचे चिन्मयत्व जाणत नाही, तो घोर अंधःकारात प्रवेश करतो. जे अविद्येचा परित्याग करतात, परंतु जिवास चित्कण न जाणून ब्रह्म मानतात, ते त्याहूनही अधिक अंधःकारात प्रवेश करतात.

बाबा! वेदशास्त्र अपार आहे. प्रत्येक उपनिषदाच्या प्रत्येक मंत्राचा वेगवेगळा विचार करून पुन्हा त्या सगळ्यांचे समष्टिगत विवेचन केल्याने वेदांचा यथार्थ अर्थ जाणला जाऊ शकतो. प्रादेशिक वाक्यास घेऊन ओढाताण केल्याने एक ना एक कुमत तर बाहेर येणारच. म्हणूनच श्रीचैतन्यमहाप्रभूंनी वेदांचे सर्वांगीण विवेचन करून जीव आणि जडाचा श्रीहरीशी युगपत् 'भेदाभेद रूप अचिंत्य-परमतत्त्वा'चा उपदेश केला आहे.

ब्रजनाथ–अचिंत्यभेदाभेद-तत्त्व वेद-विहित मत आहे, यास वेद-प्रमाणासोबत योग्यरीतीने समजावण्याची कृपा करावी.

---

(१६) गार्गी! अक्षर ब्रह्मास (विष्णूस) जाणल्याविना जे या जगातून महाप्रस्थान करतात, ते अत्यंत कृपण वा नीच शूद्र आहेत आणि जे त्या अक्षर पुरुषास जाणून या संसारातून प्रस्थान करतात, ते ब्रह्मज्ञ ब्राह्मण आहेत.

(१७) मी ब्रह्म आहे.

(१८) जे अविद्येत स्थित आहेत, ते गहन अंधःकारात प्रवेश करतात आणि जे विद्येमध्ये रत आहेत, ते त्याहूनही अधिक घोरतर अंधारात प्रवेश करतात.

बाबाजी–

**सर्वं खल्विदं ब्रह्म**[१९] (छा.उ. ३ /१४ /१)
**आत्मैवेदं सर्वमिति**[२०] (छा.उ. ७/२५/३)
**सदेव सौम्येदमग्र आसीद् एकमेवाद्वितीयम्**[२१] (छा.उ. ६/२/१)
**एवं स देवो भगवान् वरण्यो योनिस्वभावानधितिष्ठत्येकः**[२२] (श्वे. उ. ५/ ४)

इत्यादी अनेक वेदमंत्र आहेत, ज्यायोगे अभेदाचे प्रतिपादन होते. आता भेद-समर्थक मंत्र ऐक–

**ॐ ब्रह्मविद्याप्नोति परम्**[२३] (तै. ब्र.२/१)

**महान्तं विभुमात्मानं मत्वा धीरो न शोचति**[२४] (कठ.उ. १/२/२२)

**सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म। यो वेद निहितं**
**गुहायां परमो व्योमन्। सोऽश्नुते सर्वान्**
**कामान् सह ब्रह्मणा विपश्चिता॥**[२५] (तै. ब्र. २/१ अनु.)
**यस्मात् परं नापरमस्ति किञ्चिद् यस्मान्नाणीयो न**

---

(१९) हे संपूर्ण जग निश्चितच ब्रह्म आहे.

(२०) येथे दिसणारे सर्वकाही आत्मा आहे.

(२१) हे सौम्य! प्रथम हा संसार एका अद्वितीय सत्स्वरूपात वर्तमान होता आणि या विश्व सृष्टीच्या पूर्वी एक, अद्वितीय. सत्-वस्तुमात्र होती.

(२२) ज्या प्रकारे हा सूर्य एका जागी स्थित होऊनही समस्त दिशांना प्रकाशित करतो, त्याचप्रकारे समस्त देवतांचेही परमदेव स्वयं भगवान समस्त कारणांचे कारण-स्वरूप होऊनही निर्विकार स्वभावात अधिष्ठित आहेत आणि तेच एकमात्र वरणीय आणि उपास्य आहेत.

(२३) ब्रह्मविद् पुरुष परब्रह्मास प्राप्त होतात.

(२४) धीर आणि विद्वान पुरुष आत्म्यास परिच्छिन्न शरीरात स्थित पाहूनही त्या आत्म्यास महान आणि सर्वव्यापी जाणून जराही शोक करीत नाही.

**ज्यायोऽस्ति कश्चित्।**तेनेदं पूर्णं पुरूषेण सर्वम्**[२६] (श्वे. उ. ३/९)
**प्रधानक्षेत्रज्ञपतिर्गुणेशः**[२७] (श्वे.उ. ६ /१६)
**तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्**[२८] (कठ.उ.२ /२३)
**तमाहुरग्र्य पुरुषं महान्तम्**[२९] (श्वे. उ. ३/१९)
**यथातथ्यतोऽर्थान् व्यदधात्**[३०] (ईश. ८ म.)

**नैतदशकं विज्ञातुं यदेतयद्क्षमि ति**[३१] (के.उ. ३/६)
**असद्वा इदमग्र-आसीत्। ततो वै सदजायत।**
**तदात्मानं स्वयमकुरूत। तस्मात् तत् सुकृतमुच्यत इति**[३२] (तै. २/७)

---

(२५) ब्रह्म–सत्य, ज्ञान आणि अनंत-स्वरूप आहे. जे त्या परव्योमस्थ ब्रह्मास प्राण्यांच्या हृदयरुप गुहेत विराजमान जाणतात, ते त्या अंतर्यामी सर्वज्ञ ब्रह्मासोबत समस्त कामनांची सिद्धी लाभ करतात.

(२६) ज्यांच्यापेक्षा श्रेष्ठ दुसरे काहीही नाही, ज्यांच्यापेक्षा कोणीही अधिक मोठे किंवा अधिक सूक्ष्म नाही, जे एकटेच वृक्षासमान निश्चल होऊन ज्योतिर्मय मंडळात स्थित आहेत. त्या एक परमपुरुषात हे संपूर्ण जगत परिपूर्ण आहे.

(२७) प्रधानाचे अधीश्वर, क्षेत्रज्ञाचे पती आणि समस्त गुणांचे ईश्वर अर्थात त्रिगुणांच्या अतीत आहेत.

(२८) त्यांच्या निकटच ते परमात्मा आपले शरीर विशेष प्रकारे प्रकाशित करतात.

(२९) ब्रह्मविद् पंडित पुरुष त्यांनाच आदी अर्थात सर्व कारणांचे आदिकारणस्वरूप महान पुरुष असे जाणून कीर्तन करतात.

(३०) त्यांनी स्वयं अचिंत्यशक्तीद्वारे अन्य नित्य पदार्थांस त्यांच्या विशेष-विशेष गुणांसोबत वेगवेगळे ठेवले आहे.

(३१) अग्निदेव देवतांना म्हणाले–मी तर ठीक समजू शकलो नाही की हा यक्ष कोण आहे?

(३२) प्रथम हे जगत एकमात्र ब्रह्म-स्वरूपात अव्यक्त होते, तेच (अव्यक्त) ब्रह्मापासून व्यक्त झाले आहे. त्या ब्रह्माने स्वतःस पुरुष रूपात प्रकाशित केले, म्हणूनच त्या पुरुष रूपास 'सुकृती' म्हटले गेले आहे.

**नित्यो नित्यानाम्**[३३] (कठ. उ. २/१३, श्वे. उ. ६/१३)
**सर्वं ह्येतद् ब्रह्मायमात्मा ब्रह्म सोऽयमात्मा चतुष्पात्**[३४] (मा. उ. २)
**अयं आत्मा सर्वेषां भूतानां मधु**[३५] (बृ.उ. २ / ५ /१४)

इत्यादी असंख्य वेद वाणींनी नित्यभेद सिद्ध आहे. वेदशास्त्र सर्वांग-सुंदर आहेत. वेदाचे कुठलेच अंग परित्याग करण्यासारखे नाही. नित्यभेद सत्य आहे आणि नित्य–अभेदही सत्य आहे–युगपत् उभय तत्त्वच सत्य असल्याने भेद आणि अभेद–उभयनिष्ठ अनेक श्रुती विद्यमान आहेत. हा युगपत् भेदाभेद अचिंत्य आहे. अर्थात मानवी चिंतेच्याही (विचाराच्याही) पलीकडील आहे. याविषयी तर्क-वितर्क केल्याने प्रमाद होतो. वेदांमध्ये जेथेजेथे जे काही सांगितले गेले आहे, ते सर्व सत्य आहे–आपली बुद्धी अत्यंत क्षुद्र असल्यामुळे त्याचा सम्यक अर्थ समजण्यास आपण असमर्थ आहोत, म्हणून वेदार्थांची अवज्ञा करू नये.

**नैषा तर्केण मतिरापनेया**[३६] (कठ. उ. १ /२/९)
**नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च**[३७] (केन. उ. २ /२)

---

(३३) जो समस्त नित्य-वस्तुंमध्ये परम नित्य अर्थात श्रेष्ठ नित्य वस्तू आहे.

(३४) हे सर्व काही अवर ब्रह्म आहे अर्थात ब्रह्मशक्तीपासून उत्पन्न तत्त्व विशेष आहे. आत्म-स्वरूप कृष्णच परब्रह्म आहेत. तेच चार-पद असणारे अर्थात एक असूनही आपल्या अचिंत्यशक्तीद्वारे नित्य चार स्वरूपांत महारसमय आहेत.

(३५) श्रीकृष्णास लक्ष्य करून त्यांच्या गुणांच्या वर्णनाद्वारे वेद गौण रूपात म्हणतात की कृष्णच संपूर्ण भूतसमुदायाचे मधू आहेत.

(३६) नचिकेता! तू आत्मतत्त्वासंबंधी जी बुद्धी प्राप्त केली आहेस, त्यास तर्काद्वारे नष्ट करणे योग्य नाही.

(३७) मी असे समजत नाही की मी ब्रह्मास यथायोग्य जाणले आहे. (मी त्यांना जाणत नाही–अशी गोष्ट नाही आणि मी त्यांना जाणतो–अशीही गोष्ट नाही. अर्थात आपल्यात जे त्यांना जाणतात, तेच त्यांना जाणतात.)

या श्रुती-मंत्राद्वारे हे स्पष्टच सांगत आहेत की परमेश्वराची शक्ती अचिंत्य आहे, त्यात युक्तिवाद लावू नये. श्रीमहाभारतात म्हणतात–

**पुराणं मानवो धर्मः सांगवेदं चिकित्सितम्।**
**आज्ञासिद्धानि चत्वारि न हन्तव्यानि हेतुभिः॥**(३८)

म्हणून अचिंत्य-भेदाभेद सिद्धांतच वेद-विहित सुविमल तत्त्व आहे. जिवांच्या चरम प्रयोजनाच्या दृष्टिकोनातूनही अचिंत्य-भेदाभेदाच्या अतिरिक्त कुठलाही सिद्धांत दिसत नाही. अचिंत्य-भेदाभेद स्वीकारल्याने भेद-प्रतीती नित्य होईल. या प्रतीतीशिवाय जिवाचे श्रेष्ठ प्रयोजन–प्रीती कशाहीप्रकारे सिद्ध होत नाही.

ब्रजनाथ–प्रीतीच श्रेष्ठ प्रयोजन आहे, याचे प्रमाण वा युक्ती काय आहे?

बाबाजी–वेदांमध्ये म्हटले गेले आहे (मु. उ. ३/१/४)–

**प्राणो ह्येष यः सर्व भूतैर्विभाति विजानन् विद्वान् भवते नातिवादि।**
**आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः॥**(३९)

अर्थात ब्रह्मविदांमध्ये (ब्रह्माच्या जाणकारांमध्ये) श्रेष्ठ पुरुष आत्मरती आणि आत्मक्रीड होऊन प्रेमाच्या क्रियेद्वारे लक्षित होतात; ती रतीच प्रीती आहे. बृहदारण्यकोपनिषद् (२/४/५, ४/५/६) मध्ये म्हणतात–

**न वा अरे सर्वस्य कामाय सर्वं प्रियं।**
**भवत्यात्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति॥**(४०)

---

(३८) सात्त्वत पुराण, मनूद्वारा उपदिष्ट धर्म, षडंग वेद आणि चिकित्सा शास्त्र–हे चारही भगवंताच्या आज्ञा-सिद्ध अर्थात आप्तवाक्ये आहेत. तर्काद्वारे या चारांची हत्या करणे वा ध्वंस करणे योग्य नाही.

(३९) जे प्राण्यांचे मुख्य प्राण आहेत, जे समस्त भूतसमुदायात आत्माच्या रूपात प्रकाशित आहेत, त्यांना जे जाणतात, ते विद्वान पुरुष प्रेमभक्ती रूप विज्ञानाद्वारे परम पुरुषास जाणून अतिवादी होत नाहीत (अर्थात जीवनमुक्त पुरुषांकरिता भगवंताच्या गुण-कीर्तनाअतिरिक्त आणखी दुसरा कुठलाही श्रेष्ठ कीर्तनाचा विषय होऊ शकत नाही.) असे जीवन-मुक्त पुरुष भगवंताप्रती रतियुक्त आणि त्यांच्या प्रेमलीलेमध्ये अवस्थित असतात–असे पुरुषच ब्रह्मविद् पुरुषांमध्ये श्रेष्ठ आहेत.

उक्त मंत्राद्वारे हे जाणले जाऊ शकते की प्रीतीच जिवाचे मुख्य प्रयोजन आहे. बाबा! वेद आणि श्रीमद्भागवत आदी पुराणांमध्ये अशी अनेक उदाहरणे आहेत.

**को ह्येवान्यात् कः प्राण्यात्। यदेष आकाश आनन्दो न स्यात्। एष ह्येवानन्दयति॥**(४१)
(तैत्तिरीयोपनिषद्)

'आनंद' प्रीतीचा पर्यायवाची शब्द आहे. जीवमात्र आनंदाकरता चेष्टा करतात. मुमुक्षू व्यक्ती मोक्षासच आनंद मानतात. म्हणूनच ते मोक्षाकरिता वेडेपिसे होतात. भोगी (भुभुक्षू) व्यक्ती विषय-भोगास आनंद समजतात. म्हणूनच हे लोक विषय-भोगांच्या मागे-मागेच धावत राहतात. आनंद प्राप्तीची आशाच त्यांना त्या-त्या कार्यांमध्ये प्रवृत्त करीत असते. भक्तदेखील कृष्ण-सेवानंदाकरता प्रयत्नशील आहेत. म्हणून सर्व प्रकारचे लोक प्रीतीचाच शोध घेत असतात; इतकेच काय तर ते प्रीतीकरिता शरीरही सोडण्यास तयार असतात. सिद्धांत हा आहे की प्रीतीच सर्वांचे मुख्य प्रयोजन आहे. यास कुणीही अस्वीकार करू शकत नाही. मग तो नास्तिक असो अथवा आस्तिक, कर्मी असो वा ज्ञानी, सकाम असो वा निष्काम–सर्वचजण एकमात्र प्रीतीच्या शोधात राहतात, परंतु अन्वेषण केल्यानेच प्रीती भेटेल असे नाही.

कर्मवादी स्वर्गसुखास प्रीतीप्रद समजतात, परंतु **"क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति"**(४२) (गीता ९/२१) यानुसार जेव्हा स्वर्गलोकातून च्युत होतात, तेव्हा ते आपली चूक जाणतात. मनुष्यलोकात धन, पुत्र, यश आणि बळ प्राप्त करून त्यात

---

(४०) याज्ञवल्क्य म्हणाले–मैत्रेयी! सर्वांच्या प्रयोजनाकरिता सर्व प्रिय नसतात, आपल्याच प्रयोजनाकरिता सर्व प्रिय असतात.

(४१) परब्रह्म परमात्माच रस-स्वरूप आहेत. जीव त्या रस-स्वरूप परब्रह्मास प्राप्त करून आनंदित होतो; हृदयाकाशात आनंदस्वरूप ब्रह्म जर राहिले नसते, तर कोण जीवित राहू शकत होते? परमात्माच जीवांना आनंद प्रदान करतात.

(४२) स्वर्गवासीगण विशाल स्वर्गलोकाचा भोग करून पुण्य क्षीण झाल्यावर पुनः मर्त्यलोकात प्रवेश करतात. अशा प्रकारे भोगांची कामना करणारे कर्मीजन आवागमन करीत राहतात.

प्रीतीचा अभाव पाहून पुन्हा स्वर्गसुखाची कल्पना करतात; स्वर्गातून अधःपतित होताना ते स्वर्गापेक्षाही उन्नत सुखांकडे सन्मानपूर्वक पाहतात.

जेव्हा ते जाणतात की मर्त्यलोक, स्वर्गलोक वा ब्रह्मलोकांपर्यंतची सारी सुखे अस्थायी आणि अनित्य आहेत; तेव्हा ते या सुखांपासून विरक्त होऊन ब्रह्मनिर्वाणाच्या अनुसंधानात तत्परतेने रत होतात. परंतु ब्रह्मनिर्वाणातही जेव्हा आनंदाचा अभाव पाहतात, तेव्हा ते तटस्थ होऊन दुसऱ्या कुठल्या पथाचा शोध घेतात, ज्यायोगे प्रीती वा आनंदास प्राप्त करू शकतील. निर्भेद ब्रह्मनिर्वाणात आनंद वा प्रीतीची संभावना कुठे आहे? तेथे आनंदाचा अनुभव कोण करील? जेव्हा माझा 'मी' च राहत नाही, तेव्हा मग ब्रह्माचा अनुभव कोण करणार? ब्रह्म आनंद असूनही भोक्त्याच्या अभावात निरर्थक आहे, या दशेमध्ये आनंद आहे वा नाही–या विषयासंबंधी सिद्धांताचे प्रयोजनच काय राहिले? 'मी' च्या नाशासोबतच माझे ही अस्तित्व लोप झाले. माझे आणखी राहिलेच काय, ज्यातून सुख वा आनंद आहे वा नाही, याचा अनुभव मिळू शकेल, मी नाही तर काहीच नाही. जर असे म्हटले की ब्रह्मरूप मी राहिला, तर असे म्हणणे ठीक नाही, कारण ब्रह्मरूप 'मी' नित्यच आहे. त्याकरिता साधन आणि सिद्धी सर्वकाही बेकार आहे. म्हणून ब्रह्म-निर्वाणात प्रीती सिद्ध नसते, जरी असली तरीही आकाश-कुसुमाप्रमाणे अनुभूत होते.

भक्तीमध्ये केवळ प्रयोजन-सिद्धी पाहिली जाते. भक्तीची चरमावस्थाच प्रीती आहे, तीच प्रीती नित्य आहे. शुद्ध जीव नित्य आहेत, शुद्धकृष्ण देखील नित्य आहेत आणि शुद्ध प्रीतीसुद्धा नित्य आहे. म्हणूनच अचिंत्य-भेदाभेद स्वीकृत झाल्यानेच प्रेमाची नित्यता सिद्ध होते, अन्यथा जिवाची चरम प्रयोजनरूप प्रीती अनित्य होऊन जाते आणि त्याची सत्ताही लुप्त होते. म्हणूनच समस्त शास्त्रांमध्ये अचिंत्य-भेदाभेद रूप सत्य-सिद्धांताची पुष्टी केली गेली आहे. याव्यतिरिक्त सर्व वाद केवळ मतवाद आहेत.

ब्रजनाथ प्रेमतत्त्वाचे चिंतन करता-करता परमानंदात विभोर होऊन घरी परतले.

**॥ अठरावा अध्याय समाप्त ॥**



# एकोणिसावा अध्याय (प्रमेयांतर्गत अभिधेय-विचार)

ब्रजनाथ खाऊनपिऊन बिछान्यावर पडले; त्यांच्या हृदयात अचिंत्य-भेदाभेद-तत्त्वासंबंधी वेगवेगळे विचार उठू लागले. कधी विचार करीत–अचिंत्य भेदाभेद-तत्त्व ही एक प्रकारचा मायावादच आहे, पुनः गंभीरपणे विचार करू लागत–परंतु या मताविरुद्ध कुठलेच शास्त्र नाही. यांत समस्त शास्त्रांची मीमांसा प्राप्त होते. श्रीमद् गौरकिशोर साक्षात पूर्ण भगवंत आहेत. त्यांच्या गंभीर शिकवणींमध्ये जरादेखील दोष राहण्याची संभावनाच नसते. मी त्या परम प्रेममय श्रीगौरकिशोरांच्या चरणकमलांचा कदापि परित्याग करणार नाही. परंतु हाय! शेवटी मी काय मिळविले? अचिंत्यभेदाभेद-तत्त्वच सत्य आहे, हे तर जाणले–परंतु या ज्ञानाने मला काय लाभ झाला? बाबाजींनी सांगितले की प्रीतीच जिवांच्या जीवनाचे परम तात्पर्य आहे. कर्मी आणि ज्ञानीही प्रीतीचा शोध घेतात, परंतु शुद्ध प्रीती काय वस्तू आहे, ते जाणत नाहीत. म्हणूनच प्रीतीच्या विशुद्ध अवस्थेस प्राप्त करणे आवश्यक आहे; आता प्रश्न असा आहे की कुठल्या उपायाने त्यास प्राप्त करावे? बाबाजी महाशयांना याविषयी विचारून सिद्धांत ग्रहण करीन. असा सगळा विचार करता करता झोपी गेले.

अधिक रात्र झाल्यावर झोप आल्याने ब्रजनाथ आज थोड्या उशीरापर्यंतच झोपून राहिले. दिवस उगवून वर आला होता. बिछान्यातून उठून आता शौचादितून नुकतेच निवृत्त झाले होते, तोच त्यांचे मामा विजय कुमार भट्टाचार्य महाशय उपस्थित झाले. खूप दिवसांनंतर श्रीमोदद्रुमहून मामास आलेले पाहिल्यावर ब्रजनाथ मोठे प्रसन्न झाले. त्यांनी त्यांना दंडवत प्रणाम केला आणि मोठ्या आदराने बसविले.

विजयकुमार भट्टाचार्य श्रीमद्भागवताचे मोठे पंडित आणि कथाकार होते. श्रीमन्नारायणाच्या कृपेने श्रीगौरांगाप्रती त्यांच्या हृदयात खूप श्रद्धा उत्पन्न झाली होती. ते खूप दूरपर्यंत श्रीमद्भागवताचे पाठ करण्याकरिता जात असत. काही दिवस आधी त्यांनी देनुड नामक गावी श्रीवृन्दावनदास ठाकुरांचे दर्शन करण्याचा सुयोग प्राप्त केला. श्रीवृन्दावनदास ठाकूर महाशयांनी त्यांना श्रीधाममायापुराच्या अचिंत्य योगपीठाचे दर्शन करण्याची आज्ञा दिली होती. ते आणखीही म्हणाले होते की काहीच दिवसांत श्रीमन् महाप्रभूंच्या लीलास्थळी लुप्तप्राय होऊन जातील आणि

चारशे वर्षांनंतर पुनः प्रकट होतील आणि गौरलीला-स्थळ श्रीकृष्णलीला-स्थळ श्रीवृन्दावनापासून अभिन्न-तत्त्व आहे, जे मायापुराचे चिन्मयत्व दर्शन करण्यास समर्थ असतात, केवळ तेच श्रीवृन्दावनाचे दर्शन करू शकतात. व्यासावतार श्रीवृन्दावनदास ठाकुरांच्या गोष्टी ऐकून विजयकुमार श्रीमायापुरच्या दर्शनाकरिता मोठे व्याकूळ झाले होते. त्यांनी निश्चय केला की बिल्वपुष्करिणीमध्ये आपली बहीण आणि भाच्यास भेटून पुढे श्रीमायापुरला जावे. त्यावेळी बिल्वपुष्करिणी आणि ब्रह्मपुष्करिणी परस्पर मिळालेली गावे होती–आजकालप्रमाणे ही गावे एक-दूसऱ्यापासून लांब नव्हती. श्रीमायापूर योगपीठापासून एक मैलाच्या आतच बिल्वपुष्करिणीची सीमा मिळत होती. परित्यक्त बिल्वपुष्करिणीस आजकाल 'टोटा' आणि 'तारणवास' या नावांनी पुकारले जाते.

परस्पर कुशल जिज्ञासेच्या पश्चात विजयकुमार म्हणाले–मी श्रीमायापुराचे दर्शन घेऊन आत्ताच येत आहे, आजीस सांग की मी मायापुराहून परतल्यावर येथेच दुपारचे भोजन करीन.

ब्रजनाथ म्हणाले–मामा! आपण मायापुराचे दर्शन का करीत आहात?

विजयकुमार ब्रजनाथाच्या वर्तमान अवस्थेशी परिचित नव्हते. त्यांनी ऐकले होते, ब्रजनाथाने आजकाल न्यायशास्त्राचे अनुशीलन सोडून वेदान्त अध्ययन सुरू केले आहे. म्हणूनच त्यांनी आपल्या भजनाविषयी त्यांना काही सांगणे उचित समजले नाही. म्हणून आपला यथार्थ उद्देश त्यांच्यापासून लपवून म्हणाले–मायापुरात एका माणसाला भेटायचे आहे.

ब्रजनाथांस हे माहीत होते की त्यांचे मामा गौरभक्त आहेत तथा श्रीमद्भागवताचे मोठे पंडित आहेत. म्हणून त्यांनी अनुमान लावले की मामा कुठल्यातरी परमार्थिक अनुसंधानाकरिता श्रीमायापुरला जात असावेत. असा विचार करून ते प्रकट रूपात बोलले–मामा! श्रीमायापुरामध्ये श्रीरघुनाथदास एका उच्चकोटीचे परम श्रद्धास्पद वैष्णव आहेत, त्यांच्यासोबत तुम्ही थोडा वार्तालाप अवश्य करा.

ब्रजनाथाचे म्हणणे ऐकून विजयकुमार म्हणाले–आता तू वैष्णवांप्रती श्रद्धा ठेवू लागला आहेस काय? ऐकले होते–तू न्यायशास्त्र सोडून वेदान्ताचे अध्ययन

करीत आहेस. इथे तर पाहतो आहे–तू भक्तिमार्गात प्रवेश करीत आहेस, म्हणून आता तुझ्यापासून कोणतीही गोष्ट लपवण्याची गरज नाही. गोष्ट अशी आहे की श्रीवृन्दावनदास ठाकूर महाशयांनी मला श्रीमायापुरात श्रीयोगपीठाचे दर्शन करण्याची आज्ञा दिली आहे. म्हणून मी विचार केला की श्रीमायापुरच्या घाटावर गंगास्नान करून श्रीयोगपीठाचे दर्शन आणि परिक्रमा करून श्रीवास-अंगणात वैष्णवांच्या चरणधुळीत एकदा मनसोक्त लोळण घेईन.

ब्रजनाथ म्हणाले–मामा! कृपया मलाही आपल्यासोबत घेऊन चला. चला, आईला भेटून आपण दोघेही मायापुरी जाऊया.

अशाप्रकारे गप्पा झाल्यावर दोघेही ब्रजनाथाच्या आईस सांगून श्रीमायापुरसाठी रवाना झाले. सर्वप्रथम दोघांनी गंगास्नान केले.

स्नान करता करता विजयकुमार म्हणाले, अहा! आज माझा जन्म सार्थक झाला. ज्या घाटावर श्रीशचीनन्दन गौरहरींनी जान्हवीदेवीप्रती अपार करुणा दाखवीत चोवीस वर्षांपर्यंत जलक्रीडा केली आहे, परम दुर्लभ अशा त्याच जलात स्नान करून आज मला परम आनंदाचा अनुभव होत आहे.

विजयकुमारच्या उद्दीपनमय वचनांस ऐकून ब्रजनाथ आर्द्र होऊन म्हणाले–मामा! आज आपल्या चरणांच्या कृपेने मी धन्य झालो आहे.

स्नान केल्यानंतर दोघेही श्रीजगन्नाथ मिश्र यांच्या भवनात (श्रीमहाप्रभूंच्या जन्मस्थानात) पोहोचून महाप्रेमात विभोर झाले. अश्रुजलाने त्यांचे सारे शरीर ओलेचिंब झाले.

विजयकुमार म्हणाले–ज्याने गौडभूमीत जन्म घेऊन या महायोगपीठाचे दर्शन घेतले नाही, त्याचा जन्म व्यर्थच गेला. पाहा, पाहा, या जड नेत्रांनी हे धाम साधारण भूमीप्रमाणे दिसत आहे आणि सर्वत्र वाळलेल्या गवताचे घर दिसतात, परंतु गौरांगांच्या कृपेने आज आपण किती सुंदर वैभव पाहत आहोत! पाहा! किती उंच आणि भव्य रत्नमय महाल आहेत, किती रमणीय उद्याने आहेत, तोरणांची शोभा तर पाहातच रहावी अशी आहे. हे पाहा, घराच्या आत श्रीगौरांग-विष्णुप्रिया उभे आहेत. किती मनोहर रूप आहे! किती मनोहर रूप आहे!!

असे म्हणता म्हणता दोघेही अचेत (बेशुद्ध) होऊन पडले. बऱ्याच वेळानंतर दुसऱ्या भक्तांच्या सहाय्यतेने उठून श्रीवास-अंगणात प्रविष्ट झाले. डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहत होत्या. दोघेही श्रीवास-अंगणात गडाबडा लोळत म्हणू लागले–हा श्रीवास! हा अद्वैत! हा नित्यानन्द! हा गदाधर-गौरांग! आपण आम्हावर दया करा–आम्हाला अभिमान-रहित करून आपल्या श्रीचरणी स्थान प्रदान करा.

या दोन्ही ब्राह्मणांचे असे भाव पाहून तेथील वैष्णवगण मोठे आनंदित झाले आणि "मायापूरचन्द्रांचा जय!" "अजित गौराङ्गांचा जय!!" "नित्यानन्द प्रभूंचा जय!!!" असे म्हणत नृत्य करू लागले. क्षणभरातच ब्रजनाथने इष्टदेव श्रीरघुनाथदास बाबाजींच्या चरणी आपला देह समर्पित केला. वृद्ध बाबाजींनी त्यांना उठवून गळाभेट करीत म्हणाले–बाबा! आज यावेळी कसे येणे केलेस? तुझ्यासोबत हे महाजन कोण आहेत?

ब्रजनाथाने विनीत शब्दांत त्यांना सर्व गोष्टी सांगितल्या. त्या नंतर वैष्णवांनी दोघांना मोठ्या आदराने बसविले.

विजयकुमारने मोठ्या नम्रतेने श्रीमद् रघुनाथदास बाबाजींस विचारले–प्रभो! प्रयोजन प्राप्तीचा उपाय काय आहे? कृपा करून हे सांगा की आम्ही प्रयोजन कसे प्राप्त करावे?

बाबाजी–आपण परमभक्त आहात, आपण सर्वकाही प्राप्त केलेले आहे. तथापि जर आपण अनुग्रह करून माझ्यापाशी जिज्ञासा करीत आहात, तर मी जे काही जाणतो, ते सांगतो आहे. ज्ञान आणि कर्माने शून्य कृष्णभक्तीच जीवांचे चरम प्रयोजन आहे आणि तोच प्रयोजनसिद्धीचा उपायही आहे. साधनावस्थेमध्ये त्यास साधनभक्ती आणि सिद्धावस्थेमध्ये त्यास प्रेमभक्ती म्हणतात.

विजय–भक्तीचे स्वरूप-लक्षण काय आहे?

बाबाजी–श्रीमन् महाप्रभूंच्या आज्ञेने श्रीरूपगोस्वामींनी 'भक्तिरसामृतसिन्धू'मध्ये भक्तीच्या स्वरूप-लक्षणाचे निरूपण केलेले आहे–

**अन्याभिलाषिताशून्यं ज्ञानकर्माद्यनावृतम्।**
**आनुकूल्येन कृष्णानुशीलनं भक्तिरुत्तमा॥**[(१)]

(भ. र. सि.–१/१/११)

या सूत्रामध्ये भक्तीचे स्वरूप आणि तटस्थ अशा दोन्ही लक्षणांचे विषद रूपाने विवेचन केले आहे. 'उत्तमाभक्ती' शब्दाचे शुद्ध भक्तीशी तात्पर्य आहे. कर्ममिश्रा भक्ती वा ज्ञानमिश्रा भक्ती शुद्धभक्ती नसते. कर्ममिश्रा भक्तीचे उद्देश्य–भोग आहे तथा ज्ञानमिश्रा भक्तीचे उद्देश्य–मुक्ती आहे. भुक्ती आणि मुक्ती स्पृहारहित भक्तीच उत्तमाभक्ती आहे. भक्तीमुळे प्रेमफळ प्राप्त होते. ती भक्ती काय आहे? तन, मन आणि वचनाद्वारे कृष्णाशीलनुरूप कृती आणि प्रीतिमय मानस भाव भक्तीचे 'स्वरूपलक्षण' आहेत. कृती आणि भाव–हे दोन्ही आनुकुल्याच्या सोबत सर्वदा क्रियाशील राहतात. जिवाची जी आपली शक्ती आहे, त्यावर कृष्ण-कृपा आणि भक्त-कृपेने भगवंताच्या स्वरूपशक्तीच्या वृत्ती विशेषाचा उदय झाल्यावर भक्तीचे स्वरूप उदित होते.

वर्तमान दशेत जिवाचे तन, मन आणि वचन–सर्वकाही जड-भावापन्न आहेत.

जीव जेव्हा आपल्या विवेक शक्तीद्वारे त्यांना चालवितो, जडसंबंधीय ज्ञान आणि वैराग्यरूप शुष्क व्यवहारच उदित होतात–त्यामुळे भक्तिवृत्तीचा उदय होत नाही. कृष्णाच्या स्वरूपशक्तीची वृत्ती जेव्हा त्यांच्यात थोडी-थोडी क्रियावती होते, त्याचवेळी शुद्धभक्तिवृत्ती प्रकाशित होते. श्रीकृष्णच भगवत्तेची सीमा आहेत. म्हणून कृष्णानुशीलनच भक्तिकृती आहे. ब्रह्माचे अनुशीलन आणि परमात्म्याचे अनुशीलन रूप कृती ज्ञान आणि कर्माचे अंग आहेत–भक्तीचे नाहीत. कृती दोन प्रकारच्या असतात–अनुकूल आणि प्रतिकूल. अनुकूल कृतीमुळेच भक्ती सिद्ध होते.

'आनुकूल्येन 'शब्दाने कृष्णाच्या प्रती रोचमान प्रवृत्तीस समजावे. ही अवस्था साधनाकाळात काही स्थूल संबंध ठेवते, परंतु सिद्धीकाळात स्थूल जगाशी

---

(१) कृष्ण-सेवेअतिरिक्त अन्यान्य कामनारहित, निर्भेद ब्रह्मज्ञान, नित्य नैमित्तिक आदी कर्म, योग, तपस्या आदींपासून सर्वथा अनावृत आणि अनुकूल भावाने कृष्णानुशीलन अर्थात श्रीकृष्णांच्या सेवेस उत्तम भक्ती म्हणतात.

सर्व प्रकारे संबंधरहित झाल्याने पूर्ण निर्मळ होते. या दोन्ही अवस्थांमध्ये भक्तीचे लक्षण एकच प्रकारचे असते. म्हणून अनुकूल भावांसोबत कृष्णानुशीलनच भक्तीचे 'स्वरूपलक्षण' आहे.

'स्वरूपलक्षणा'संबंधी काही सांगण्यासाठी 'तटस्थलक्षण' ही सांगणे आवश्यक असते. श्रीमद् रूपगोस्वामींनी भक्तीची दोन तटस्थ लक्षणे सांगितली आहेत–एक अन्याभिलाषिता-शून्यता आणि दुसरे ज्ञानकर्मादिंपासून अनावृतता. भक्तीच्या उन्नतीच्या अभिलाषेअतिरिक्त समस्त प्रकारच्या अभिलाषा भक्ति-विरोधी आहेत–आणि अन्याभिलाषितेच्या अंतर्गत आहेत. ज्ञान, कर्म, योग आणि वैराग्य आदी प्रबळ होऊन हृदयास आवृत केल्यावर भक्ति-विरोधी ठरतात. म्हणून उक्त दोन्ही विरोधी लक्षणांनी रहित झाल्यावरच अनुकूल भावाने जे कृष्णानुशीलन होते, त्यासच 'शुद्धभक्ती' (२) म्हटले जाऊ शकते.

विजय–भक्तीच्या कोणकोणत्या विशेषता आहेत?

बाबाजी–श्रीमद् रूपगोस्वामींनी 'भक्तिरसामृतसिन्धू' मध्ये भक्तीच्या सहा विशेषतांचे वर्णन केले आहे–

**क्लेशघ्नी शुभदा मोक्षलघुताकृत् सुदुर्लभा।**
**सान्द्रानन्दविशेषात्मा श्रीकृष्णाकर्षिणी च सा॥**

(भ. र. सि. १ /१ /१७)

अर्थात

(१) क्लेशघ्नी–सर्व प्रकारच्या दुःखांचा नाश करते.
(२) शुभदा–संपूर्ण कल्याण करणारी.
(३) मोक्ष-लघुताकृत्–मोक्षासही तुच्छ उपलब्धी करविणारी आहे.
(४) सुदुर्लभा–अत्यंतच दुर्लभ आहे.

---

(२) 'शुद्धभक्ति' हैते हय 'प्रेमा' उत्पन्न। अतएव शुद्ध-भक्तिर कहिये 'लक्षण'॥
अन्य-वांछा, अन्य-पूजा छाड़ि 'ज्ञान' 'कर्म'। आनुकूल्ये सर्वेन्द्रिये कृष्णानुशीलन॥
एइ 'शुद्धिभक्ति', इहा हैते 'प्रेमा' हय। पञ्चरात्रे 'भागवते' एइ लक्षण कय॥

(चै. च. म.१९/१६६, १६८-१६९)

(५) सान्द्रानन्द-विशेषात्मा–घनीभूत आनंदस्वरूपा आहे.
(६) श्रीकृष्णाकर्षणी–श्रीकृष्णास आकर्षित करणारी आहे.

विजय–भक्ती क्लेशघ्नी कशी असते?

बाबाजी–क्लेश तीन प्रकारचे असतात–पाप, पाप-बीज आणि अविद्या. पातक, महापातक आणि अतिपातक आदी क्रिया 'पाप' आहेत. ज्यांच्या हृदयात शुद्धभक्ती आविर्भूत होते, ते स्वभावतः पाप कार्य करीत नाहीत. पाप करण्याच्या वासनेस 'पाप-बीज' म्हणतात. भक्तिपूर्ण हृदयात पाप-वासना रहात नाही. जिवाच्या स्वरूपभ्रमाचे नावच अविद्या आहे. शुद्धभक्ती उदित झाल्यावर "मी कृष्ण दास आहे" अशी बुद्धी सहजच उदित होते. म्हणूनच अशा दशेत स्वरूप-भ्रम रूप अविद्या राहत नाही. भक्ती देवीचा प्रकाश पसरताच हृदयातून पाप, पाप-बीज आणि अविद्यारूप अंधकार दूर होऊन जातो. भक्तीच्या शुभागमनाने सर्व प्रकारची दुःखे दूर होतात. म्हणूनच तर भक्ती क्लेशघ्नी आहे.

विजय–भक्ती शुभदा कशी असते?

बाबाजी–संपूर्ण जगातील अनुराग, सद्गुण आणि जितक्या प्रकारची अन्य सुखे आहेत, ते सर्व 'शुभ' शब्दाचे अर्थ आहेत. ज्यांच्या हृदयात शुद्ध भक्तीचा उदय झाला आहे, ते दैन्य, दया, मानशून्यता आणि मानद या चार गुणांनी अलंकृत असतात. म्हणूनच समस्त जग त्याच्याप्रती अनुराग प्रकट करीत असते. समस्त प्रकारचे सद्गुण भक्तिमान पुरूषांमध्ये अनायसेच प्रकाशित होतात. भक्ती समस्त प्रकारच्या सुखांस देऊ शकते–इच्छा केल्याने ती विषय-सुख, निर्विशेष ब्रह्म-सुख, समस्त सिद्धी, भुक्ती, मुक्ती आदी सर्व काही देऊ शकते–परंतु भक्त चतुवर्गातील काहीच घेऊ इच्छित नाहीत. म्हणूनच भक्तिदेवी त्यांना नित्य परमानन्द प्रदान करते

विजय–भक्ती कशाप्रकारे मोक्षासही तुच्छ उपलब्धी ठरविते?

बाबाजी–भगवत्-रती थोड्या मात्रेमध्ये जरी हृदयात उदित झाली, तर धर्म, अर्थ, काम, मोक्ष, सहजच तुच्छ प्रतीत होऊ लागतात.

विजय–भक्तीस सुदुर्लभा का म्हणतात?

बाबाजी–या विषयास योग्य प्रकारे समजणे आवश्यक आहे. लाख साधन केल्यावरही भजन-कुशलतेच्या अभावात भक्ती प्राप्त करणे कठीण आहे. भक्तिदेवी अधिकांश लोकांस मुक्ती देऊन संतुष्ट करते–उच्च अधिकार पाहिल्याशिवाय भक्ती होत नाही. या दोन्ही कारणांमुळे भक्ती सुदुर्लभा आहे. ज्ञान-साधनात अभेद-ब्रह्म-ज्ञानरूप मुक्ती अवश्य मिळते, यज्ञ आदी पुण्यकर्मांद्वारे भुक्तीही सहज मिळू शकते, परंतु भक्तियोगाशिवाय लाख साधन करूनही ‘हरिभक्ती’ मिळू शकत नाही.

विजय–भक्तीस घनीभूत आनंदस्वरूपा का म्हटले गेले आहे?

बाबाजी–भक्ती चित्-सुख आहे–म्हणून आनंद-समुद्र आहे. जड-जगात जितक्या प्रकारची सुखे आहेत अथवा जड-जगाच्या विपरीत चिंतामय जगात जो ब्रह्मानंद आहे, त्या सर्वांस एकत्रित करून कोटीवेळा गुणल्यानंतर जे सुख होते, त्याचीदेखील भक्तिसुख-समुद्राच्या एका थेंबाशी तुलना करता येणे शक्य नाही. जड-सुख नितांत तुच्छ असते. जड-विपरीत सुख नितांत शुष्क असते. या दोन्ही प्रकारची सुखेच चित्-सुखापासून विजातीय आणि विलक्षण असतात. विजातीय वस्तूंची परस्पर कोणतीही तुलना होऊ शकत नाही. म्हणूनच ज्यांनी भक्ती-सुखाचे आस्वादन प्राप्त केले आहे, त्यांच्यानिकट ब्रह्म-सुख गोष्पद-तुल्य प्रतीत होते. त्या सुखास तेच जाणू शकतात, जे त्या सुखास प्राप्त करू शकले आहेत, दुसरे कोणीही त्या सुखास वर्णू अथवा जाणू शकत नाहीत.

विजय–भक्ती श्रीकृष्णाकर्षणी कशी काय असते?

बाबाजी–ज्यांच्या हृदयात भक्तिदेवीचा आविर्भाव होतो, श्रीकृष्ण आपल्या समस्त प्रियजनांसोबत वशीभूत होऊन त्यांच्याप्रती आकृष्ट होऊन जातात. अन्य कुठल्याही उपायाने कृष्णास वशीभूत वा आकृष्ट करता येणे शक्य नाही.

विजय–जर भक्ती अशीच उपादेय आहे, तर जे लोक अधिक शास्त्राध्ययन करतात, ते भक्ती प्राप्त करण्याकरिता का प्रयत्न करीत नाहीत?

बाबाजी–यथार्थ गोष्ट तर ही आहे की मानव-बुद्धी ससीम आहे, म्हणून अशी ससीम आणि जड-बुद्धी, जडातीत भक्तितत्त्व आणि कृष्णतत्त्वापर्यंत पोहोचू शकत नाही. परंतु पूर्व-संचित सुकृतीच्या प्रभावाने ज्यांच्या हृदयात थोडीदेखील रुची उत्पन्न

होते, ते भक्तितत्त्वास सहजच समजू शकतात–सौभाग्यवान जीवांव्यतिरिक्त दुसरे कुणीही भक्तितत्त्व समजू शकत नाहीत.

विजय–युक्तीस प्रतिष्ठा का नाही?

बाबाजी–चित्-सुखात युक्तीस अधिकार नाही. म्हणूनच **'नैषातर्केण'**(३) (कठ. उ. १/२/९) आणि **'तर्काप्रतिष्ठानात्'**(४) (ब्रह्मसूत्र २/१/११) आदी वचनांद्वारे वेदान्तामध्ये चित्-विषयात युक्तीची अकर्मण्यता दाखविली आहे.

ब्रजनाथ–साधनभक्ती आणि प्रेमभक्तीच्या मधोमध कुठली भक्ती आहे की नाही?

बाबाजी–हो, आहे! अवस्थाभेदाने भक्ती तीन प्रकारची असते–साधनभक्ती, भावभक्ती आणि प्रेमभक्ती.

ब्रजनाथ–साधनभक्तीचे लक्षण काय आहेत?

बाबाजी–भक्ती एकच आहे–भेद केवळ अवस्थेचा आहे. बद्धजिवाच्या इंद्रियांद्वारे जोपर्यंत ती साधित होते, तोपर्यंत तिला साधन-भक्ती म्हटले जाते.

ब्रजनाथ–आपण सांगितलेत की प्रेम-भक्ती नित्यसिद्ध भाव आहे, मग नित्यसिद्ध भावाची साधना कशी काय होते?

बाबाजी–नित्यसिद्ध भाव वास्तविक साध्य नाही, हृदयात त्यांस प्रकट करण्याचे नावच 'साधन' आहे.(५) अजूनपर्यंत हृदयात प्रकाशित न झाल्याने

---

(३) नचिकेता! तू आत्मतत्त्वासंबंधी जी बुद्धी प्राप्त केली आहे, तिला तर्काद्वारे नष्ट करणे योग्य नाही.

(४) तर्कास प्रतिष्ठा नाही. त्याच्याद्वारे कुठली वस्तू स्थापित करता येऊ शकत नाही, कारण आज एक व्यक्ती तर्क आणि युक्तीने ज्यास स्थापित करते, उद्या त्यापेक्षा अधिक प्रतिभाशाली व्यक्ती त्यास रद्द करून टाकते. म्हणूनच तर्काची अप्रतिष्ठा सांगितली गेली आहे.

(५) कृतिसाध्या भवेत् साध्यभावा सा साधनाभिधा।
नित्यसिद्धस्य भावस्य प्राकट्यं हृदि साध्यता॥ (भ. र. सि. १/२/२)

(आच्छादित राहिल्याने) काही दिवसांपर्यंतच त्याची साध्यता आहे–स्वरूपतः तो नित्यसिद्ध भाव आहे.

ब्रजनाथ–कृपया या सिद्धांतास थोडे अधिक स्पष्ट करावे.

बाबाजी–प्रेमभक्ती स्वरूपशक्तीची एक वृत्ती आहे–अतः ती अवश्यच नित्यसिद्ध आहे. जडबद्ध जिवाच्या हृदयात ती प्रकट नसते. तन, मन आणि वचनाने तिला हृदयात प्रकट करण्याकरिता जी कृती केली जाते, तीच तिची 'साधना' आहे.

जोपर्यंत ती साधित होते, तोपर्यंत तिच्यात साध्यभाव आहे. परंतु प्रकट होताच तिची नित्यसिद्धता स्पष्ट आहे.

ब्रजनाथ–साधनेचे लक्षण काय आहेत?

बाबाजी–ज्या कुठल्याही उपायाने कृष्णामध्ये मन लावले जाते, तेच साधनभक्तीचे लक्षण आहे.

ब्रजनाथ–साधनभक्ती किती प्रकारची असते?

बाबाजी–दोन प्रकारची असते–वैधी आणि रागानुगा.

ब्रजनाथ–वैधीभक्ती कशास म्हणतात?

जिवाची प्रवृत्ती दोन प्रकारे उदित होते. विधीनुसार जी प्रवृत्ती उत्पन्न होते, तिला वैधी-प्रवृत्ती म्हणतात. शास्त्रच विधी आहेत. शास्त्रांच्या शासनात राहून ज्या भक्तीचा उदय होतो, ती वैधी-प्रवृत्तीने उत्पन्न झाल्याने 'वैधीभक्ती' म्हणविली जाते.

ब्रजनाथ–'रागा'च्या लक्षणांची जिज्ञासा नंतर करीन, आता हे सांगा की विधीचे लक्षण काय आहे?

बाबाजी–शास्त्रांमध्ये ज्याचे कर्तव्याच्या रूपात निरूपित केलेले आहे–त्याला 'विधी' म्हणतात. शास्त्रांमध्ये ज्यास अकर्तव्य म्हणून घोषित केलेले आहे,

---

नित्यसिद्ध कृष्णप्रेम 'साध्य' कभु नय। श्रवणादि शुद्धचित्ते करये उदय॥
श्रवणादि क्रिया तार स्वरूप लक्षण। तटस्थ लक्षणे उपजय प्रेमधन॥ (चै. च. म. २२/१०४-१०३)

त्याचे नाव 'निषेध' आहे. विधींचे पालन आणि निषेधांचे वर्जन करणेच जिवांचा वैध-धर्म आहे.

ब्रजनाथ–आपण जसे सांगितले आहे–त्यावरून असे प्रतीत होते की समस्त धर्मशास्त्रांची विधानेच वैध-धर्म आहेत. समस्त धर्मशास्त्रांच्या विधि-निषेधांस वाचून कलियुगाच्या अल्पायुषी आणि दुर्बळ जिवांकरिता वैध धर्माचा निर्णय करणे असंभव आहे. अतः संक्षेपात विधि-निषेधाचा निर्णय करण्याकरिता शास्त्रांमध्ये कुठला संकेत आढळून येतो का?

बाबाजी–पद्मपुराण (उत्तरखण्ड ४२ अ., १०३ श्लोकात तथा नारदपंचरात्र ४/ २/२३) मध्ये लिहितात–

**स्मर्त्तव्यः सततं विष्णुर्विस्मर्त्तव्यो न जातुचित्।**
**सर्वे विधिनिषेधाः स्युरेतयोरेव किङ्कराः॥**[६]

भगवान विष्णूंस आयुष्यभर सदैव स्मरणात ठेवा–हीच मूळ विधी आहे; जिवाच्या जीवन निर्वाहाकरिता वर्णश्रमादी व्यवस्था याच विधीच्या अधीन आहेत. भगवंतास कधीच विसरू नये–हाच मूळ निषेध आहे. पाप आणि बहिर्मुखता-वर्जन तथा पापांचे प्रायश्चित्त, हे सर्व या मूळ निषेध-विधीच्या अनुगत आहेत. म्हणूनच शास्त्रोक्त समस्त विधी आणि निषेध भगवत्-स्मरण-विधी आणि विस्मरण-निषेधाचे चिर किंकर (दास) आहेत. यावरून असे समजावे की वर्णाश्रमादी समस्त प्रकारच्या विधींमध्ये भगवत्-स्मरण-विधीच नित्य आहे.

**मुखबाहूरुपादेभ्यः पुरुषस्याश्रमैः सह।**
**चत्वारो जज्ञिरे वर्णा गुणैर्विप्रादयः पृथक॥**

---

(६) विष्णूंस सर्वदा स्मरणात ठेवा, त्यांना कधीच विसरू नका. अन्यान्य समस्त विधि-निषेध या दोघांच्याही अनुगत आहेत. तात्पर्य हे की, शास्त्रांमध्ये जितक्या प्रकारच्या विधींची व्यवस्था आहे तथा निषेधाचे निर्धारण आहे, ते समस्त उक्त दोन मूळ विधी आणि निषेध वाक्यांच्या आधारावरच प्रतिष्ठित आहेत. ज्यायोगे भगवंताचे निरंतर स्मरण होत राहील, त्यासच कर्तव्य मानायला हवे आहे; हीच विधी आहे आणि ज्यायोगे भगवंताचे निरंतर विस्मरण होते, अशी कार्येच 'निषेध' आहेत. (अमृतप्रवाह भाष्य)

**य एषां पुरुषं साक्षादात्मप्रभवमीश्वरम्।**
**न भजन्त्यवजानन्ति स्थानाद्भ्रष्टाः पतन्त्यधः॥**[७]

(श्रीमद्भा. ११/५/२-३)

ब्रजनाथ–वर्णाश्रमाच्या विधींचे पालन करणारे सर्वच लोक कृष्णभक्तीचे साधन का करीत नाहीत?

बाबाजी–श्रीरूपगोस्वामींनी सांगितले आहे–शास्त्र-विधींचे पालन करणाऱ्यांमध्ये ज्या लोकांची भक्तीप्रती श्रद्धा उत्पन्न होते, केवळ त्यांचाच भक्तीत अधिकार असतो. अशा लोकांची वैध-जीवनाप्रती आसक्ती नसते. त्यांना वैराग्यही येत नाही. जीविका निर्वाहासाठी (उपजीविकेसाठी) सांसारिक विधींचे पालन करतात आणि श्रद्धाळू होऊन शुद्धभक्तीच्या साधनात प्रवृत्त होतात. अनेक जन्मांच्या सुकृतीच्या फळस्वरूपच वैध-जीवांमध्ये असा अधिकार उदित होतो. श्रद्धावान भक्ती अधिकारी तीन प्रकारचे असतात–उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ.

ब्रजनाथ–श्रीगीतेमध्ये असे म्हटले गेले आहे की, आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी आणि ज्ञानी–या चार प्रकारचे लोक भजन करतात; ते कुठल्या भक्तीचे अधिकारी आहेत?

बाबाजी–आर्ती, जिज्ञासा, अर्थार्थिता आणि ज्ञान–हे चारही जेव्हा साधुसंगाच्या प्रभावाने दूर होतात, आणि अनन्या-भक्तीमध्ये श्रद्धा उत्पन्न होते, त्याचेवळी ते भक्तीचे अधिकारी होतात. गजेन्द्र[८], शौनकादी महर्षी[९], ध्रुव[१०] आणि चार कुमार[११] याचे उदाहरण आहेत.

ब्रजनाथ–भक्तजनांची मुक्ती होत नाही काय?

---

(७) आदिपुरुष विष्णूंच्या मुखातून ब्राह्मण, भुजांतून क्षत्रिय, जाघांतून वैश्य आणि चरणांतून शूद्र–हे चारही वर्ण वेगवेगळ्या आश्रमांसोबत आणि आपल्या वर्णगत गुणांसहित उत्पन्न झाले आहेत. म्हणूनच या चार वर्ण आणि आश्रमांमध्ये राहणारा जो मनुष्य आपले प्रभू भगवान विष्णूंचे स्मरण करीत नाही, उलट आपल्या वर्ण आणि आश्रमाच्या अहंकारात मत्त होऊन त्यांचा अनादर करतो, तो आपले स्थान, वर्ण, आश्रम आणि मनुष्य-योनीतूनही च्युत होतो–त्याचे अधःपतन होऊन जाते.

बाबाजी–सालोक्य, सार्ष्टी, सामीप्य, सारूप्य आणि सायुज्य–या पाच प्रकारच्या मुक्तींमध्ये सायुज्यमुक्ती भक्तितत्त्वाची नितांत विरोधिनी आहे. म्हणून भगवद्भक्त यास कदापि स्वीकार करीत नाहीत. सालोक्य, सार्ष्टी, सामीप्य आणि सारूप्य–या चार मुक्ती पूर्ण भक्ति-विरोधी नसल्यातरी आंशिक रूपात यांच्यात भक्ति-प्रतिकूलता आहे. कृष्णभक्त नारायण-धामगत या चारींनाही कदापि ग्रहण करीत नाहीत. या मुक्ती कुठे-कुठे सुख-ऐश्वर्य प्रदान करतात आणि कुठे-कुठे चरमावस्थेत

---

(८) गजेन्द्र–चौथ्या मन्वंतरामधील गोष्ट आहे. पर्वतराज त्रिकुटाच्या डोंगररांगांमधील घोर जंगलामध्ये खूपशा हत्तीणींसोबत एक गजेन्द्र निवास करीत होता. तो मोठमोठ्या बलवान हत्तींचा सरदार होता. पर्वतराजीच्या पायथ्याशी एक सुबृहत् आणि रमणीय सरोवर होते. एके दिवशी गजेन्द्र त्या सरोवरात आपल्या हत्तीणी आणि मुलांसोबत निर्भय होऊन क्रीडेत मत्त होता. त्याचवेळी अकस्मात एका बलवान मगरीने क्रोधित होऊन त्याचा पाय पकडला. बलवान गजेन्द्रानेही आपल्या शक्तीनुसार स्वतःस सोडविण्याचा खूप प्रयत्न केला. एक हजार वर्षे लोटली, त्या दोघांना लढता-लढता. परंतु गजेन्द्र स्वतःस सोडवू शकला नाही. हळूहळू गजेन्द्र शिथिल होऊ लागला. आपल्या रक्षणाचा कुठलाच उपाय दिसेना, तेव्हा त्याने श्रीभगवंतांची अनन्य शरणागती पत्करली, आणि आर्ततेने त्यांना पुकारू लागला. चक्रधारी भगवंत गरूडावर स्वार होऊन त्वरितच तेथे उपस्थित झाले आणि चक्राने मगरीचे तोंड फाडून गजेन्द्रास सोडविले. गजेन्द्र पूर्वजन्मी पाण्ड्यदेशीचा राजा होता. त्याचे नाव इन्द्रद्युम्न होते. एकेकाळी तो ध्यानमग्न होऊन पूजा करीत होता. त्याचवेळी महर्षी अगस्त्य तेथे आले. परंतु राजाने ध्यानमग्न असल्याने त्यांचा सत्कार केला नाही. यावर महर्षी अगस्त्यांनी क्रोधित होऊन राजास गजयोनी प्राप्त करशील असा शाप दिला. हे संकुचित-चेतन आणि आर्ताचे उदाहरण आहे.

(९) एकदा शौनकादी ऋषींनी चरमकल्याण प्राप्तीच्या आशेने श्रीहरितीर्थ नैमिषारण्यामध्ये एक हजार वर्षांपर्यंत यागयज्ञ आदींचे अनुष्ठान केले. परंतु त्यामुळे आपल्या अभीष्ट पूर्तीची आशा न पाहताच त्यांनी श्रीकृष्णद्वैपायन वेदव्यासांचे अत्यंत प्रिय शिष्य श्रीसूत गोस्वामींजवळ सहा प्रश्न केले आणि आपल्या प्रश्नांची उत्तरे प्राप्त करून यथार्थ सिद्धीस प्राप्त झाले. त्यांचे ते सहा प्रश्न होते–(१) प्राण्यांचे परम कल्याण काय आहे? (२) आत्म्यांचेही आत्मा परमात्मा श्रीहरी ज्यायोगे प्रसन्न होतील, असा श्रवणीय विषय काय आहे? (३) वासुदेव श्रीकृष्ण भगवान देवकीच्या गर्भातून काय-काय करण्याच्या इच्छेने अवतीर्ण झाले? (४) भगवान वासुदेवांनी कोणकोणत्या अवतारांमध्ये कोणकोणत्या लीला केल्या होत्या? (५) श्रीहरीच्या गुणांचे तथा महिमांचे वर्णन करा. (६) श्रीकृष्णांनी स्वधामी गमन केल्यावर धर्माने कुणाचा आश्रय घेतला? ब्राह्मण कुळात

प्रेम सेवेकडे अग्रेसर करवितात. जेथे सुख–ऐश्वर्यच त्यांचे चरम फल असते, तेथे त्या भक्तजनांकरिता त्याज्य आहेत. मुक्तीची गोष्ट तर दूरच राहो, नारायणाचा प्रसादही श्रीकृष्णाच्या अनन्य भक्तांच्या चित्तास भुलवू शकत नाही. कारण श्रीनारायण आणि श्रीकृष्ण स्वरूपात सिद्धांताच्या दृष्टीने काहीच भेद नसूनही रसाच्या दृष्टीने श्रीकृष्णरूपाचा उत्कर्ष नित्यसिद्ध आहे.

ब्रजनाथ–आर्यकुळात जन्म घेऊन वर्णाश्रमाच्या विधींचे पालन करणाऱ्या व्यक्तीच भक्तीच्या अधिकारी असतात का?

---

जन्म घेऊनही ते ऋषिगण ब्राह्मणेतर कुळात उत्पन्न श्रीसूत गोस्वामींस गुरुरूपात वरण करून त्यांच्या निकट सरल भावाने 'जिज्ञासू' झाले होते. श्रीव्यासदेवांचे अतिशय प्रियपात्र श्रीसूत गोस्वामींनी मोठ्या स्नेहाने त्यांच्या प्रश्नांची उत्तरे दिली होती, जी ऐकून ते परमसिद्धीस प्राप्त झाले. जिज्ञासू भक्ताचे हेच सार्थीखरे उदाहरण आहे.

(१०) ध्रुव–सृष्टीच्या प्रारंभीची गोष्ट आहे. स्वायंभुव मनूच्या वंशात उत्पन्न सम्राट उत्तानपादांच्या दोन राण्या होत्या. मोठीचे नाव सुनीती आणि छोटीचे नाव सुरुची होते. राजा छोट्या राणीच्या वशीभूत होते. सुनितीचे पुत्र होते, ध्रुव. विमातेच्या अत्याचारांमुळे बालक ध्रुव पितृस्नेहापासून वंचित होऊन राज्य-प्राप्तीच्या आशेने मातेच्या उपदेशानुसार घनदाट अरण्यात जाऊन पद्मपलाशलोचन श्रीहरींच्या आराधनेत तन्मय होऊन गेला. मोठी कठोर आराधना होती ती. परंतु ही कठोर आराधना होती–राज्य-प्राप्ती रूप अर्थाकरिता–परमार्थाकरिता नाही. श्रीनारदांच्या कृपेने त्यांना भगवद् अनुग्रह प्राप्त झाला. भगवंताच्या कृपेने त्यांची राज्यप्राप्तीची आकांक्षाही दूर झाली आणि त्यांनी शुद्धभक्ती प्राप्त केली. पार्थिव वर प्राप्तीच्या आशेने अर्थार्थी होऊन अनन्य मनाने भगवंतांचे भजन केल्याने शेवटी नित्यमंगलाची प्राप्ती होते–याचे ध्रुव उदाहरण आहेत.

(११) सनक, सनातन, सनन्दन आणि सनत्कुमार हे चारही कुमार आहेत. सृष्टीच्या प्रारंभी ब्रह्माने ध्यानमग्न होऊन यांची मानस सृष्टी केली होती. म्हणूनच ते ब्रह्माचे मानसपुत्र म्हणविले जातात. चारही कुमार अत्यंत ज्ञानाच्या प्रभावाने संसार-आसक्तीच्या सर्वथा पलीकडले होते. ते आपले पिता ब्रह्मा यांच्या सृष्टी कार्यांमध्ये सहाय्यक न होऊन ब्रह्मज्ञानाकडे झुकले. यामुळे ब्रह्मदेवांना फार वाईट वाटले. त्यांनी चारही कुमारांच्या कल्याणाकरिता भगवान श्रीहरींकडे प्रार्थना केली. ब्रह्मदेवांच्या प्रार्थनेने भगवंत हंसरूपात अवतीर्ण झाले आणि त्यांनी चारही कुमारांचे चित्त शुष्क अद्वैत-ज्ञानापासून हटवून भक्तितत्त्व-ज्ञानामध्ये लावले. म्हणूनच सनकादी ऋषींना ज्ञानी भक्त म्हटले जाते. हेच निम्बादित्य संप्रदायाचे आदी प्रवर्तक आहेत.

बाबाजी–भक्तीमध्ये मनुष्यमात्रास अधिकार प्राप्त करण्याची योग्यता आहे.

ब्रजनाथ–जर असे आहे, तर मग वर्णाश्रमात स्थित व्यक्तींस दोन कर्तव्ये दिसतात–एक वर्णाश्रमाच्या विधींचे पालन करणे आणि दुसरे शुद्धभक्ति-धर्माचे पालन करणे. परंतु वर्णाश्रमाच्या बहिर्भूत व्यक्तींचे केवळ एकच कर्तव्य असते–भक्तीच्या अंगाचे पालन करणे. अशा दशेत वर्णाश्रमधर्मात स्थित व्यक्तींस अधिक कष्ट झेलावे लागतात, कारण त्यांना कर्मांग आणि भक्त्यंग–दोघांचेही पालन करावे लागते. असे का?

बाबाजी–शुद्धभक्त्याधिकारी व्यक्ती वर्णाश्रमधर्मात स्थित असूनही केवळ भक्त्यंग पालन करण्याकरिता बाध्य आहेत. भक्त्यंगाचे पालन केल्याने कर्मांगाचे पालन आपोआपच होऊन जाते. जेथे कर्मांग भक्तीपासून स्वतन्त्र असते, अथवा भक्तीच्या विरोधी असते, तेथे कर्मांगाचे पालन न केल्याने कुठलाच दोष लागत नाही. भक्ति-अधिकाऱ्यास अकर्म आणि विकर्मात स्वभावतःच रुची नसते. परंतु जर दैववश कुठले पाप-कर्म घडलेच, तरी त्यास प्रायश्चित्त रूपात कर्मांगांच्या अनुष्ठानाची काहीच आवश्यकता नसते. ज्यांच्या हृदयात भक्ती आहे., त्यांच्याकडून संयोगवशतः कुठले पापकर्म घडल्यावरही ते पाप त्यांच्या हृदयात स्थिर राहत नाही, शीघ्रच अनायासे विनष्ट होऊन जाते. म्हणूनच त्यांना प्रायश्चित्ताची कुठलीच आवश्यकता नसते.

ब्रजनाथ–भक्त्याधिकारी पुरुष देवऋण आदींपासून उऋण कसे काय होऊ शकतात?

बाबाजी–श्रीमद्भागवतात असे म्हटले गेले आहे की भगवंताचे शरणागत असणारे कुणाचेच ऋणी नसतात–

**देवर्षिभूताप्त नृणां पितॄणां न किङ्करो नायमृणी च राजन्।**
**सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुन्दं परिहृत्य कर्त्तम्॥**(१२)

(१२) जो सर्व प्रकारे शरणागतवत्सल भगवान मुकुन्दाच्या शरणी आला आहे, तो देवता, पितर, प्राणी आणि कुटुंबीय आणि अतिथींच्या ऋणातून उऋण होऊन जातो, तो कुणाच्या अधीन वा कुणा अन्याचा सेवक नसतो.

(श्रीमद्भा. ११/५/४१)

संपूर्ण गीतेचे अंतिम (१८/६६) तात्पर्य हे आहे की, जे लोक समस्त धर्मांचा भरवसा सोडून भगवंताचे शरणागत होतात; भगवंत त्यांना समस्त पापांतून मुक्त करतात. गीतेचे तात्पर्य हे आहे की जेव्हा अनन्य भक्तिप्रती अधिकार निर्माण होतो, तेव्हा ती अधिकारी व्यक्ती ज्ञानशास्त्र आणि कर्मशास्त्राच्या विधींचे पालन करण्याकरिता बाध्य असते. केवळ भक्तीच्या अनुशीलनानेच तिची सर्व सिद्धी होऊन जाते. म्हणूनच–"**न मे भक्तः प्रणश्यति** " (गीता ९/३१)–भगवंताच्या या प्रतिज्ञेस सर्वोपरी समजावे.

इतके ऐकून ब्रजनाथ आणि विजयकुमार दोघेही एकत्रित बोलले–आमच्या हृदयात भक्तिसंबंधी आणखी कुठल्याही प्रकारचा संदेह नाही. आम्हाला हे समजले आहे की ज्ञान आणि कर्म अत्यंत तुच्छ आहेत; भक्तिदेवीच्या कृपेशिवाय जिवाचे कुठल्याही प्रकारचे मंगल होऊ शकत नाही. प्रभो! कृपा करून शुद्धभक्तीच्या अंगांविषयी सांगा, ज्यायोगे आम्ही लोक कृतार्थ होऊन जाऊ शकू.

बाबाजी–ब्रजनाथ! तू दशमूलाच्या आठव्या श्लोकापर्यंत श्रवण केले आहे; तू ते आपल्या वेळेनुसार आपल्या मामांस ऐकव. तुझ्या मामांस पाहून मला मोठी प्रसन्नता वाटत आहे. आता तुम्ही नववा श्लोक ऐका–

**श्रुतिः कृष्णाख्यानं स्मरणनतिपूजाविधिगणाः**
**तथा दास्यं सख्यं परिचरणमप्यात्मददनम्।**
**नवाङ्गान्येतानीह विधिगतभक्तेरनुदिनं**
**भजन् श्रद्धायुक्तः सुविमलरतिं वै स लभते॥**

(दशमूल ९)

अर्थात श्रवण, कीर्तन, स्मरण, वंदन, पादसेवन, अर्चन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन–या नवधा वैधीभक्तीचे जे लोक श्रद्धापूर्वक प्रतिदिन अनुशीलन करतात, ते विमल कृष्णरती प्राप्त करतात.

श्रीकृष्ण नाम, रूप, गुण आणि लीलासंबंधी अप्राकृत वर्णन आदींचा कर्णेंद्रियांशी स्पर्श 'श्रवण' म्हणविला जातो. श्रवणाच्या दोन अवस्था असतात–श्रद्धा

उत्पन्न होण्याआधी साधूंच्या निकट जे कृष्णाच्या गुणानुवादाचे श्रवण केले जाते, ते एक प्रकारचे श्रवण आहे.

त्या श्रवणाने श्रद्धा उदित होते, श्रद्धा उत्पन्न झाल्यावर प्रगाढ उत्कंठेसोबत कृष्णनामादी श्रवण करण्याची प्रवृत्ती होते. तदनंतर गुरू वैष्णवांनिकट जे कृष्णनामादी ऐकले जाते, त्याचेच नाव–द्वितीय श्रवण–जे शुद्ध भक्तीचेच एक अंग आहे. साधनकाळात गुरुवैष्णवांनिकट श्रवण करता करता सिद्धिकाळाचे श्रवण उदित होते; 'श्रवण' भक्तीचे प्रथम अंग आहे.

भगवन्नाम रूप, गुण आणि लीलासंबंधी शब्दांचा जिव्हेशी (जिभेशी) होणारा स्पर्श कीर्तन म्हणविला जातो. कृष्णकथा आणि कृष्णानामादीचे वर्णन, शास्त्र-पाठ करून दुसऱ्यांना ऐकविणे, गीताद्वारे लोकांना कृष्णाकडे आकर्षित करणे तथा दैन्योक्ती, विज्ञप्ती, स्तवपाठ आणि प्रार्थना आदी–हे सगळे कीर्तनाचे भेद आहेत. नवधा-भक्तीमध्ये कीर्तनास सर्वश्रेष्ठ अंग सांगितले गेले आहे; विशेषतः कलियुगात कीर्तनच सर्वांचे कल्याण करण्यास समर्थ आहे–असे समस्त शास्त्रांमध्ये प्रतिपादित केलेले आहे. पद्मपुराण (उत्तरखण्ड, अ. ४२, श्लोक २५) मध्ये म्हणतात–

**ध्यायन् कृते यजन् यज्ञैस्त्रेतायां द्वापरेऽर्चयन्।**
**यदाप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम्॥**

हरिकीर्तनाने चित्त जितके निर्मळ होते, तितके अन्य कुठल्याही उपायाने होत नाही. जेव्हा बरेचसे भक्त एकत्र मिळून कीर्तन करतात, तेव्हा त्यास संकीर्तन म्हणतात.

कृष्णाचे नाम, रूप, गुण आणि लीलेच्या स्मरणाचे नाव 'स्मरण' आहे. स्मरण पाच प्रकारचे असते. एखाद्या पाहिलेल्या–ऐकलेल्या अथवा अनुभव केलेल्या गोष्टीचे पुन्हा मनन करण्याचे नाव 'स्मरण' आहे; पूर्व-विषयातून चित्तास ओढून साधारण रूपात मनाने एखाद्या विषयास धारण करण्याचे नाव–'धारणा' आहे; रूप आदीचे विशेष रूपाने चिंतन करण्याचे नाव 'ध्यान' आहे; तैल धारावत् अविच्छिन्न ध्यानाचे नाव 'ध्रुवानुस्मृती' आहे आणि ध्येयमात्राच्या स्फूर्तीचे नाव 'समाधी' आहे.

श्रवण, कीर्तन आणि स्मरण–भक्तीचे हे तीन प्रधान अंग आहेत. इतर समस्त अंग या तिघांच्या अंतर्भूत आहेत. श्रवण, कीर्तन आणि स्मरण–या तिघांत

कीर्तनच सर्वप्रधान अंग आहे; कारण श्रवण आणि स्मरण कीर्तनाच्या अन्तर्भुक्त राहू शकतात.

श्रीमद्भागवत (७/५/२३) च्या **"श्रवणं कीर्तनं विष्णोः"** श्लोकानुसार 'पादसेवा' वा 'परिचर्या' हे भक्तीचे चतुर्थ अंग आहे. श्रवण-कीर्तन आणि स्मरणासोबत 'पादसेवा' करणे कर्तव्य आहे. पादसेवन कार्यात आपले अकिंचनत्व, सेवेत आपली अयोग्यता-बुद्धी तथा सेव्यामध्ये सच्चिदानंदत्व-बुद्धीचे होणे नितांत आवश्यक आहे. पादसेवा कार्यात श्रीमुख-दर्शन, स्पर्शन, परिक्रमा, अनुव्रजन, भगवन्मंदिर-गंगा-पुरुषोत्तम-द्वारका-मथुरा-नवद्वीप आदी तीर्थस्थानांचे दर्शन आदी अंतर्भूत आहे. श्रीरूप गोस्वामींनी भक्तीच्या ६४ अंगांचे वर्णन करतांना याचे मोठे स्पष्ट आणि मार्मिक विवेचन प्रस्तुत केले आहे. श्रीतुलसी-सेवा आणि साधुसेवा दोन्ही याच अंगाच्या अंतर्भूत आहेत.

पंचम अंग आहे–अर्चन. अर्चन-मार्गामध्ये अधिकार आणि प्रक्रियासंबंधी अनेक विचार आहेत. श्रवण, कीर्तन आणि स्मरणात नियुक्त झाल्यावरसुद्धा जर अर्चन मार्गात श्रद्धा असेल, तर श्रीगुरुदेवांकडून मंत्र-दीक्षा घेऊन अर्चन-क्रिया करावयास हवी.

ब्रजनाथ–नाम आणि मंत्रामध्ये काय भेद आहे?

बाबाजी–श्रीभगवन्नामच मंत्राचे प्राण आहेत. नामामध्ये 'नमः' आदी शब्दांस लावून भगवंताशी कुठलाही एक संबंध स्थापन करून ऋषींनी नामापासून काही विशेष प्रकारच्या शक्तीचे उद्घाटन केले आहे[(१३)]. नामच निरपेक्ष तत्त्व आहे, तथापि देहादी मायिक उपाधींमुळे जीव जड विषयांमध्ये फसलेला आहे. आता त्याच्या चित्तास विषयांतून दूर करण्याकरिता मर्यादा-मार्गात अर्चन-विधींचे निरूपण झाले आहे. विषयी लोकांकरिता दीक्षा ग्रहण करणे नितांत आवश्यक आहे. श्रीकृष्ण मंत्रामध्ये 'सिद्ध-साध्य-सुसिद्ध-अरि'[(१४)] –विचाराची आवश्यकता नाही. कृष्णमंत्र-दीक्षाच जिवाकरिता अत्यंत कल्याणकारी आहे. संसारात जितक्या प्रकारचे मंत्र

---

(१३) 'कृष्णमन्त्र' जप सदा–एइ मन्त्रसार॥ कृष्णमन्त्र हैते हबे संसार-मोचन। कृष्णनाम हैते पावे कृष्णेर चरण॥ नाम बिना कलिकाले नाहि आर धर्म। सर्वमन्त्रसार नाम,–एई शास्त्रमर्म॥ (चै. च. आ. ७/७२-७४)

आहेत, त्यांत कृष्णमंत्र सर्वाधिक शक्तिशाली आहे. सद्गुरूच्या निकट हा मंत्र प्राप्त केल्याबरोबरच सत्-शिष्य कृष्ण-बल प्राप्त करतो.

श्रीगुरुदेव जिज्ञासूस अर्चनाची शिकवण देतात, संक्षेपात हेच ज्ञातव्य आहे की श्रीकृष्णजन्म, कार्तिक-व्रत, एकादशी-व्रत, माघ-स्नान आदी अर्चन-मार्गाअंतर्गत आहेत. अर्चनाच्या विषयी हे जाणणे आवश्यक आहे की कृष्णासोबत कृष्णभक्तांचेही अर्चन होणे नितांत आवश्यक आहे.

वंदनच वैधीभक्तीचे सहावे अंग आहे. पादसेवा आणि कीर्तन आदींमध्ये वंदन अंतर्भुक्त असूनसुद्धा यास पृथक अंग सांगितले गेले आहे. नमस्कारासच वंदन म्हटलेले आहे. नमस्कार दोन प्रकारचे असतात–एकांग नमस्कार आणि अष्टांग नमस्कार. एका हाताने केला गेलेला नमस्कार, वस्त्रांनी झाकलेल्या शरीराने नमस्कार,भगवंताच्या पुढे, मागे आणि डावीकडून केला गेलेला नमस्कार तथा गर्भ-मंदिरात केला गेलेला नमस्कार–हे सर्व नमस्कार अपराध मानले गेले आहेत.

दास्य सातवे अंग आहे–मी कृष्णाचा दास आहे, असा अभिमान असणेच दास्य आहे. दास्य-भावयुक्त होऊन जे कृष्णभजन होते, तेच भजन श्रेष्ठ आहे. नमः, स्तुती, समस्त कर्मांचे अर्पण, परिचर्या, आचरण, स्मृती आणि 'कथा-श्रवण'[(१५)] हे सर्व दास्यात अंतर्भाव्य आहेत, अर्थात त्यात समाविष्ट आहेत.

---

(१४) गुरुदेव शिष्यास दीक्षा देताना सिद्ध, साध्य, सुसिद्ध आणि अरि (शत्रू) या चार दोषांचे शोधन केल्यानंतरच दीक्षा देतात. चारही दोष आणि त्यांच्या शोधनासंबंधात हरिभक्तिविलासामध्ये प्रथम विलासाच्या ५२व्या अनुच्छेदापासून १०३व्या अनुच्छेदापर्यंत द्रष्टव्य आहे. परंतु अष्टादश अक्षराचे मंत्रराज अर्थात कृष्णमंत्रामध्ये या चार दोषांच्या विवेचनाची आवश्यकता नसते. हा मंत्र इतका शक्तिशाली आहे की सिद्ध-साध्य-सुसिद्ध-अरि–या दोषांची अपेक्षा ठेवत नाही. त्रैलोक्य-संमोहन तंत्रामध्ये महादेवाने म्हटले आहे की–"अष्टादशाक्षर मन्त्रमधिकृत्य श्रीशिवेनोक्तम्।न चात्र शात्रवा दोषा वर्णष्वादि-विचारणा॥" आणि बृहद्गौतमीयामध्ये देखील पाहिले जाते–"सिद्ध-साध्य-सुसिद्धारि-रूपा नात्र विचारणा।सर्वेषां सिद्ध-मन्त्रानां यतो ब्रह्माक्षरो मनुः॥" या मंत्राचे प्रत्येक अक्षरच ब्रह्म आहे.

(१५) कथा श्रवण अर्थात आज्ञापालन.

सख्य आठवे अंग आहे–कृष्णाप्रती हित-कृतीयुक्त बंधुभाव लक्षणच सख्य आहे. सख्य दोन प्रकारचे असते–एक वैधाङ्ग सख्य आणि दुसरे रागाङ्ग-सख्य. येथे सख्याचे तात्पर्य वैधाङ्ग सख्याशी आहे. अर्चा मूर्तींच्या सेवेत जो सख्य भाव आहे ते वैध-सख्य आहे.

आत्मनिवेदनास नववे अंग म्हणतात–शरीरापासून ते शुद्ध आत्म्यापर्यंत सर्वकाही कृष्णास अर्पण करण्याचे नाव आत्मनिवेदन आहे. आपल्याकरिता कृतिरहित होणे तथा कृष्णाकरिता कृतियुक्त असणेच आत्मनिवेदन आहे. जसे विकलेल्या गायीस आपल्या पालन-पोषणाची चिंता राहात नाही, त्याचप्रकारे कृष्णेच्छेच्या अधीन राहणे तथा आपल्या इच्छेस त्यांच्या अधीन ठेवणेच आत्मनिवेदनाचे लक्षण आहे. वैध-आत्मनिवेदनाचे उदाहरण खाली दिले जात आहे–

**स वै मनः कृष्णपदारविन्दयोर्वचांसि वैकुण्ठगुणानुवर्णने।**
**करौ हरेर्ममन्दिरमार्जनादिषु श्रुतिञ्चकाराच्युतसत्कथोदये॥**
**मुकुन्दलिङ्गालयदर्शने दृशौ तद्भृत्यगात्रस्पर्शेऽङ्गसङ्गमम्।**
**घ्राणञ्च तत्पादसरोजसौरभे श्रीमत्तुलस्यां रसनां तदर्पिते॥**
**पादौ हरेः क्षेत्रपदानुसर्पणे शिरोहृषीकेशपदाभिवन्दने।**

**कामञ्च दास्ये न तु कामकाम्यया**
**यथोत्तमःश्लोकजनाश्रया रतिः॥**(१६)

---

(१६) अम्बरीष महाराजांनी आपल्या मनास श्रीकृष्णाच्या चरणारविंदयुगुलामध्ये, वाणीस भगवत्-गुणानुवर्णनामध्ये, हातांस श्रीहरिमंदिरमार्जनसेवेमध्ये आणि आपल्या कानांस अच्युताच्या मंगलमयी कथेच्या श्रवणात लावले आहे. त्यांनी आपले नेत्र मुकुन्द-मूर्ती आणि मंदिरांच्या दर्शनात, अंग-संग भगवद्-भक्तांच्या शरीर-स्पर्शामध्ये, नासिका त्यांच्या चरणकमलांवर अर्पित श्रीमती तुळशीच्या दिव्य गंधामध्ये आणि रसनेस (जिभेस) भगवंताप्रती अर्पित नैवेद्य प्रसादामध्ये संलग्न केलेले आहे. त्यांचे पाय भगवंताच्या क्षेत्र आदींच्या पायी यात्रा करण्यात रत असतात आणि ते मस्तकाने भगवान श्रीकृष्णाच्या चरणकमलांची वंदना करीत असतात–राजा अम्बरीषाने फुलांची माळ, चंदनादी भोग-सामग्रींस भगवंताच्या सेवेत समर्पित केलेले होते–भोगण्याच्या इच्छेनेच नाही, तर याकरिता की त्यायोगे ते भगवत्प्रेम प्राप्त होवो, जे पवित्रकीर्ती भगवंताच्या परिकरांमध्येच निवास करते.

बाबाजींच्या मधुर उपेदशांस ऐकून ब्रजनाथ आणि विजयकुमार आनंदाने विभोर होऊन बाबाजी महाशयांस दंडवत-प्रणाम करीत म्हणाले–प्रभो! आपण साक्षात भगवत्-पार्षद आहात; आपल्या उपदेशामृताचे पान करून आम्ही दोघेही आज कृतार्थ झालो. जाति-कुळ आणि विद्येच्या अहंकारामध्ये आमचे दिवस व्यर्थ जात होते. जन्मजन्मांतरीच्या संचित सुकृती राशीच्या प्रभावामुळेच आम्ही आपली कृपा प्राप्त केली आहे.

विजयकुमार म्हणाले–हे भागवत प्रवर! श्रीवृन्दावनदास ठाकुरांनी मला श्रीमायापूर-योगपीठाचे दर्शन करण्याची आज्ञा दिली होती. त्यांच्या कृपेनेच आज मला भगवद्धाम आणि भगवत्-पार्षदाचे दर्शन करणे संभव होऊ शकले. जर कृपा झाली तर उद्या संध्याकाळी येथे पुन्हा येईन.

श्रीवृन्दावनदास ठाकुरांचे नाव ऐकून वृद्ध बाबाजी साष्टांग-दडंवत करीत म्हणाले–माझ्या चैतन्यलीलेचे जे व्यासावतार आहेत, मी त्यांना पुन्हा पुन्हा प्रणाम करतो.

दिवस आणखीनच वर चढू लागला आहे. ब्रजनाथ आणि विजयकुमार ब्रजनाथाच्या घराकडे रवाना झाले.

**॥ एकोणिसावा अध्याय समाप्त ॥**



# विसावा अध्याय (प्रमेयांतर्गत अभिधेय-विचार–वैध साधनभक्ती)

दुपारच्या आधीच ब्रजनाथ आणि विजयकुमार घरी पोहोचले. ब्रजनाथाची माता आधीपासूनच त्यांची प्रतीक्षा करीत होती. त्यांनी मोठ्या प्रेमाने आपल्या भावास स्वादिष्ट, प्रसादान्न भोजन करविले. भोजनानंतर मामा आणि भाच्यात परस्पर नाना प्रकारच्या प्रेमाने भरलेल्या गप्पा होऊ लागल्या. ब्रजनाथाने ज्या उपदेशांस बाबाजी महाराजांकडून आधी ऐकले होते, त्याच उपदेशांस क्रमशः आपल्या मामांना सांगू लागले.

त्या अमृतमय उपदेशांस ऐकून विजयकुमार मोठे आनंदित झाले आणि म्हणाले–तुझे मोठे सौभाग्य आहे. मोठ्या सौभाग्यानेच सत्संग प्राप्त होतो. तुला बाबाजींसारख्या दुर्लभ आणि परम संतांचा संग प्राप्त झाला आहे. त्यांच्याकडून तू परमार्थ तत्त्वासंबंधी बरेच काही श्रवण केले आहेस. भक्तिकथा आणि हरिकथांच्या श्रवणाने कल्याणाची प्राप्ती होते; परंतु महत् पुरुषांच्या मुखाने जर या कथा ऐकल्या, तर कल्याण अधिकच शीघ्र होते. बाबा! तू समस्त शास्त्रांमध्ये सुपंडित आहेस, खास करून न्यायशास्त्राचा अद्वितीय पंडित आहेस, वैदिक ब्राह्मणांमध्ये कुलीन आहेस, निर्धनही नाहीस, ही सर्व धनसंपत्ती यावेळी तुझ्याकरिता अलंकार स्वरूप होत आहे. याचे कारण हे आहे की तू साधु-वैष्णवांचा पदाश्रय प्राप्त करून श्रीकृष्णाच्या लीलाकथांमध्ये रुची घेत आहेस.

अशा प्रकारे परमार्थासंबंधी चर्चा चालू होती की तेवढ्यात ब्रजनाथाची माता तेथे उपस्थित झाली आणि विजयकुमारांस म्हणाली–भाऊ! तू खूप दिवसांनी आलास, ब्रजला जरा समजावून सांगून गृहस्थ कर. याच्या व्यवहारांमुळे मला भीती वाटते की हा साधू तर होणार नाही ना! विवाहाकरिता बरेच लोक येतात, परंतु याने तर विवाह न करण्याची प्रतिज्ञाच केली आहे. माझ्या सासूबाईसुद्धा खूप प्रयत्न करीत आहेत, परंतु त्या काहीच करू शकत नाहीत.

बहिणीचे बोलणे ऐकून विजयकुमार म्हणाले–मी येथे दहा-पंधरा दिवसापर्यंत थांबणार आहे. मी क्रमशः या विषयावर परामर्श करून मग तुला सांगेन. आता तू घरात जा.

ब्रजनाथाची आई आत निघून गेली. ते दोघे पुन्हा पारमार्थिक चर्चा करू लागले. तो संपूर्ण दिवस अशाच प्रकारे व्यतीत झाला.

दुसऱ्या दिवशी भोजनानंतर विजयकुमार म्हणाले–आज संध्याकाळी आपण दोघेही पुन्हा श्रीवास अंगणी जाऊया आणि तेथे श्रीरूप गोस्वामींद्वारे उल्लेखित ६४ प्रकारच्या भक्तीच्या अंगांचे विस्तृत विवेचन श्रवण करूया. ब्रजनाथ! तुझ्यासारखा सत्संग मला जन्मजन्मांतरी प्राप्त होवो. पाहा, बाबाजी महाशयांनी साधनभक्तीचे दोन मार्ग सांगितले आहेत. एक–वैधमार्ग आणि दुसरा रागमार्ग. आपण लोक वास्तविक वैधमार्गाचे अधिकारी आहोत. म्हणून आम्हाला रागमार्गासंबंधी उपदेश श्रवण करण्याआधी वैधमार्गास योग्यप्रकारे समजून साधन कार्याचा प्रारंभ केला पाहिजे. काल बाबाजी महाराजांनी नवविधा भक्तीचा उपदेश केला होता, परंतु मी समजू शकत नाही की नवधाभक्तीचा प्रारंभ कसा करू? आज याविषयी व्यवस्थित समजून घेतो.

अशा प्रकारे बोलता-बोलता संध्याकाळ झाली. सूर्याची किरणे पृथ्वीवरून उठून आता वृक्षांच्या उंचउंच फांद्यांशी खेळू लागली. विजयकुमार आणि ब्रजनाथ घरून निघून श्रीवास-अंगणी उपस्थित झाले आणि वैष्णव मंडळीस दंडवत-प्रणाम करून वृद्ध बाबाजींच्या कुटीत प्रविष्ट झाले.

बाबाजी जिज्ञासू भक्तांस पाहून मोठे प्रसन्न झाले आणि त्यांना अगदी प्रेमाने छातीशी कवटाळीत आसनावर बसविले. त्या दोघांनीही बाबाजींस दंडवत प्रणाम केला आणि ते बसले.

एक-दोन गप्पांनंतर विजयकुमार म्हणाले–प्रभो! आम्ही लोक आपल्याला खूपच कष्ट देत आहोत. आपण भक्तवत्सल आहात–तेव्हा कृपापूर्वक त्या कष्टास स्वीकारावे. आज आम्ही आपल्याकडून श्रीरूपगोस्वामीद्वारा लिखित भक्तीच्या ६४ प्रकारच्या अंगांसंबंधी जाणून घेऊ इच्छितो, जर आम्हांस याचे अधिकारी समजत असाल, तर कृपा करून सांगा. ज्यायोगे आम्ही शुद्धभक्तीचा सहजच अनुभव करू शकू.

बाबाजी हसतच म्हणाले–सावधानतेने ऐका; मी श्रीरूपगोस्वामींद्वारे सांगितलेल्या भक्तीच्या ६४ प्रकारच्या अंगांचे वर्णन करीत आहे. ६४ प्रकारच्या

अंगांमध्ये पहिली १० प्रारंभिक अंगे आहेत. ती दहा अशी–(१) गुरुपदाश्रय, (२) गुरुंनिकट कृष्णदीक्षा आणि शिक्षा, (३) विश्वासपूर्वक गुरुसेवा, (४) साधुमार्गाचे अनुसरण, (५) सद्धर्माची जिज्ञासा, (६) कृष्णाच्या उद्देशाने भोग-विलासाचा त्याग, (७) द्वारका आदी धामांमध्ये तथा गंगा-यमुनेनिकट निवास, (८) जीवन-निर्वाहोपयोगी यथायोग्य अर्थ वा विषय स्वीकार, (९) एकादशी, जन्माष्टमी आदी हरिवासराचा सन्मान, (१०) आवळा, पिंपळ आदी वृक्षांना गौरव प्रदान करणे.

यानंतरची दहा अंगे निषेधाच्या रूपात पालनीय आहेत–

(११) कृष्ण-बहिर्मुख व्यक्तींचा संग त्याग, (१२) अनधिकाऱ्यास शिष्य न करणे, (१३) अवडंबरपूर्ण उद्यमांचा (महोत्सव आदींचा) परित्याग, (१४) अनेक ग्रंथांचे पठण-पाठन आणि व्याख्यावादाचा परित्याग, (१५) व्यवहारात कृपणतेचा परित्याग, (१६) शोकादींच्या अधीन न होणे, (१७) अन्यान्य देवतांची अवज्ञा न करणे, (१८) प्राणीमात्रास उद्वेग न देणे, (१९) सेवापराध आणि नामापराधापासून सर्वदा दूर रहाणे, (२०) भगवान आणि भक्तांची निंदा आदी ऐकून त्यास सहन न करणे.

या वीस प्रकारच्या अंगांस भक्ति-मंदिराचे प्रवेशद्वार स्वरूप समजा. यांत गुरु-पदाश्रय आदी प्रथम तीन प्रधान कार्यें आहेत.

(२१) वैष्णव-चिन्ह धारण, (२२) हरिनामाक्षर धारण, (२३) निर्माल्य (भगवंतास अर्पण केलेल्या माला आदी) धारण करणे, (२४) भगवंतासन्मुख नृत्य, (२५) श्रीगुरू, वैष्णव आणि भगवंतास दंडवत प्रणाम, (२६) त्यांचे दर्शन झाल्याबरोबर आसनावरून उठून त्यांना अभिवादन करणे, (२७) श्रीमूर्तीची अनुव्रज्या अर्थात अनुगमन करणे, (२८) भगवंताच्या मंदिरांत जाणे, (२९) मंदिर परिक्रमा, (३०) अर्चन, (३१) परिचर्या (सेवा), (३२) गान, (३३) भगवत्-कृपेची प्रतीक्षा, (३४) त्रिसंध्यांमध्ये आचमनपूर्वक जप, (३५) विज्ञप्ती अर्थात दीनतापूर्वक प्रार्थना, (३६) स्तव, (३७) भगवत्-प्रसादाचे आस्वादन, (३८) श्रीचरणामृत पान करणे, (३९) धूप-माल्यादीचे सौरभ ग्रहण, (४०) श्रीमूर्तीचा स्पर्श, (४१) श्रीमूर्तीचे दर्शन, (४२) आरती आणि उत्सव आदी दर्शन, (४३) श्रीहरीचे नाम, रूप, गुण आणि लीलांचे श्रवण, (४४) संकीर्तन, (४५) स्मरण, (४६) ध्यान, (४७) दास्य, (४८) सख्य, (४९) आत्मसमर्पण, (५०) कृष्णास प्रिय वस्तू समर्पण, (५१) श्रीकृष्णाच्या

सुखाकरिता निरंतर कृती, (५२) भगवंताच्या चरणी शरणागती, (५३) तुलसी-सेवा (५४) श्रीमद् भागवत आदी भक्ति-ग्रंथांस सन्मान देणे, (५५) भगवंताचे आविर्भावस्थान मथुरा आदींचे माहात्म्य श्रवण आणि कीर्तन करणे तथा त्या धामांची परिक्रमा आदी करणे, (५६) वैष्णवांची सेवा, (५७) शक्तीनुसार प्राप्त सामग्रींद्वारा साधूंच्या संगतीत महोत्सव, (५८) चातुर्मास्य व्रत आणि विशेष रूपाने कार्तिक मासात नियमसेवेचे पालन, (५९) भगवंताच्या जन्माच्या दिवशी उत्सव, (६०) श्रद्धापूर्वक श्रीमूर्तीची पूजा, (६१) रसिक भक्तांसोबत श्रीमद्भागवताच्या अर्थाचे आस्वादन करणे, (६२) स्वजातीय स्निग्ध अथवा आपल्यापेक्षा श्रेष्ठ साधु-संतांचा संग, (६३) श्रीनाम-संकीर्तन, (६४) मथुरा आदी भगवत्धामांमध्ये वास.

अंतिम पाच अंगांचे वर्णन यद्यपि मागील अंगांसोबत केले गेले आहे तथापि हे पाच अंग अत्यंत श्रेष्ठ आहेत. याचे नाव पंचांग-भक्तीदेखील आहे. या सर्व अंगांचे शरीर, इंद्रिय आणि अंतःकरणाद्वारे पालन करून कृष्ण-उपासना केली जाते. २१ पासून ४९ पर्यंतचे अंग कृष्णदीक्षा आदी द्वितीय अंगांच्या अंतर्गत आहेत.

विजय–प्रभो! (१) श्रीगुरू पदाश्रयासंबंधी आम्हास काही विस्तारपूर्वक उपदेश करा.

बाबाजी–शिष्याने अनन्य कृष्णभक्तीचा अधिकारी होऊन उपयुक्त गुरूपाशी कृष्णतत्त्व जाणण्याकरिता श्रीगुरूचा पदाश्रय करावा. श्रद्धाळू झाल्यावरच जीव कृष्णभक्तीचा अधिकारी होतो. मागील जन्मांच्या सुकृतींच्या प्रभावामुळे संतांच्या मुखांतून हरिकथा श्रवण करून हरिविषयी जो दृढ विश्वास उत्पन्न होतो, त्याचेच नाव ‘श्रद्धा’ आहे. ‘श्रद्धे’च्या सोबत थोडी शरणापत्तीदेखील उदित होते. श्रद्धा आणि शरणापत्ती साधारणपणे एकच तत्त्व आहे. संसारात कृष्णभक्तीच सर्वोन्नत आहे– कृष्णभक्तीच्या जे अनुकूल असते, त्यास आपले कर्तव्य जाणून करीन, श्रीकृष्णभक्तीस प्रतिकूल व्यापाराचे वर्जन करीन; कृष्णच माझे एकमात्र रक्षणकर्ता आहेत; मी कृष्णास आपला एकमात्र पालनकर्ता या रूपात मानून त्यास स्वीकारतो; मी अत्यंत दीन आणि अकिंचन आहे आणि माझी स्वतन्त्र इच्छा चांगली नाही, कृष्णाच्या इच्छेचे अनुगमनच सर्वप्रकारे कल्याणप्रद आहे–असा दृढ विश्वास ज्यास झाला आहे, तेच अनन्य भक्तीचे अधिकारी आहेत, हा अधिकार प्राप्त होताच जीव भक्तीच्या

उपदेशाकरिता व्याकूळ होऊन जेथे सद्गुरू प्राप्त करतो, त्यांचा पदाश्रय ग्रहण करतो अर्थात त्यांचा शिष्य होऊन भक्तीची शिकवण ग्रहण करतो.

**तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्।**[१] (मु. उ. १/२/१२)

**आचार्यवान् पुरुषो वेद।**[२] (छा. उ. ६/१४/२)

श्रीहरिभक्तिविलासामध्ये (१/२३/६४) सद्गुरू आणि सत्-शिष्याचे लक्षण विस्तारपूर्वक दिले गेले आहेत. सारार्थ हा आहे की शुद्धचारित्र्याने युक्त श्रद्धावान पुरुषच शिष्य होण्याच्या योग्य आहे तथा शुद्धभक्तीने संपन्न, भक्तितत्त्वविद, चरित्रवान, सरल, निर्लोभ, मायावादशून्य आणि कार्यदक्ष पुरुषच सद्गुरू आहेत.

या प्रकारच्या गुणांनी युक्त, सर्व समाज-मान्य ब्राह्मण असूनही अन्यान्य वर्णाच्या लोकांचे गुरू होऊ शकतात. ब्राह्मणाच्या अभावी शिष्य आपल्यापेक्षा उन्नत वर्णाच्या व्यक्तीस गुरू करू शकतो. या विचारांचे मूळ तात्पर्य हे आहे की वर्णाश्रमाचा विचार सोडून जेथे कोठेही कृष्णतत्त्वविद व्यक्ती भेटेल, त्यांना गुरू बनविले जाऊ शकते. जर ब्राह्मण कुळात उत्पन्न कुठल्या व्यक्तीमध्ये उपर्युक्त गुण आढळतात आणि त्यास गुरू बनवले तर आर्यवंशामध्ये जन्मलेल्या वर्णाभिमानी संसारात काही सुविधा होते. वस्तुतः उपयुक्त भक्तच गुरू आहे. शास्त्रांत गुरु-शिष्य परीक्षेच्या नियमाचा आणि काळाचा निर्णय केला गेला आहे; त्याचे तात्पर्य हे आहे की ज्या वेळी गुरू शिष्यास अधिकारी समजेल आणि शिष्य जेव्हा गुरूस शुद्धभक्त समजून त्याच्याप्रती श्रद्धा ठेवेल त्याचवेळी गुरू शिष्याप्रती कृपा करतील.

गुरू दोन प्रकारचे असतात–दीक्षागुरू आणि शिक्षागुरू. दीक्षागुरूजवळ दीक्षा ग्रहण करायला हवी; त्याच्या सोबतच अर्चनसंबधी शिकवण घ्यायला हवी. दीक्षागुरू एक असतात आणि शिक्षागुरू अनेक असू शकतात. दीक्षागुरूपण शिक्षागुरूच्या रूपात ज्ञान देण्यास समर्थ आहेत.

---

(१) त्या भगवत्-वस्तूचे ज्ञान प्राप्त करण्याकरिता हातात समिधा घेऊन वेदास यथायोग्य जाणणाऱ्या आणि भगवत्सेवापरायण ब्रह्मज्ञ सद्गुरूंकडे कायमनोवाक्य सर्व प्रकारे विनयपूर्वक गमन करावे.

(२) ज्याने आचारवान सद्गुरूचा आश्रय घेतला आहे, त्याने त्या परब्रह्मास जाणले आहे.

विजयकुमार–दीक्षागुरू अपरित्यज्य आहेत अर्थात गुरूचा त्याग करू नये. अशा दशेत जर गुरुदेव सदुपदेश देण्यास समर्थ नसतील तर ते कसा उपदेश देतील?

बाबाजी–गुरू स्वीकारताना गुरूस शब्दोक्त तत्त्व (वेदांमध्ये कथित तत्त्वामध्ये) आणि परतत्त्वामध्ये पारंगत पाहण्याकरिता परीक्षा घेतली जाते. असे गुरू सर्व प्रकारे तत्त्व उपदेश करण्यास अवश्यच समर्थ असतील. दीक्षागुरूचा त्याग करण्याचा विधी नाही, परंतु दोन परिस्थितींमध्ये त्यांचा त्याग केला जाऊ शकतो. पहिली परिस्थिती ही की गुरूचा स्वीकार करण्याच्या वेळी जर शिष्याने गुरूची तत्त्वज्ञता आणि वैष्णवता आदी गुणांची परीक्षा केल्याशिवाय त्यांना गुरू मानलेले असेल, परंतु वास्तवात त्या गुरूद्वारे काहीच कार्य झालेले नाही (अर्थात त्यांच्याकडून कुठल्याही प्रकारचे आध्यात्मिक लाभ झालेले नसतील,) तर तशा गुरूचा परित्याग करावयास हवा. याविषयी बरेचशे शास्त्र-प्रमाण आहेत–

**यो व्यक्ति न्यायरहितमन्यायेन श्रृणोति यः।**
**तावुभौ नरकं घोरं व्रजतः कालमक्षय म्॥**[३]

नारदपंचरात्र (ह. भ. वि. १/६२)

**गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः।**
**उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते॥**[४]

(महाभारत, उद्योग पर्व १७९/२५ आणि ना. पं. १/१०/२०)

**अवैष्णवोपदिष्टेन मंत्रेण निरयं व्रजेत्।**
**पुनश्च विधिना सम्यग् ग्राहयेद्वैष्णवाद् गुरोः॥**[५]

(ह. भ. वि. ४/१४४)

---

(३) जे आचार्यांच्या वेशात अन्याय अर्थात सात्त्वतशास्त्र विरोधी शिकवण प्रदान करतात आणि जे (शिष्यरूपात) अन्याय रूपाने त्यास श्रवण करतात, ते दोघेही अनंत काळापर्यंत घोर नरकात पडतात.

(४) शिष्याने काय करायला हवे, अथवा काय करू नये–हे जे गुरू जाणत नाहीत, तसेच कुसंगाच्या प्रभावाने अथवा वैष्णव-विरोधाच्या फलस्वरूप उन्मार्गगामी आढळल्यास अशा गुरूचा त्याग करणेच कर्तव्य आहे.

दुसरी परिस्थिती अशी आहे की–गुरू स्वीकारताना गुरुदेव वैष्णव आणि तत्त्वज्ञ होते, परंतु असत् संगाच्या प्रभावाने नंतर मायावादी वा वैव-विद्वेषी झाले; अशा दशेत तशा गुरूचा त्याग करणेच योग्य आहे. जर स्वीकारलेले गुरुदेव मायावादी अथवा वैष्णवद्वेषी अथवा पापसक्त नसतील, तर अल्पज्ञतेकरिता त्यांचा त्याग करणे उचित नाही. अशा अवस्थेत त्यांना गुरूचा सन्मान प्रदान करीत त्यांची आज्ञा घेऊन कुणा दुसऱ्या तत्त्वज्ञ आणि वैष्णव पुरुषाची सेवा करीत त्यांच्याकडून तत्त्वाची शिकवण ग्रहण करावी.

विजय–(२) कृष्ण-दीक्षादी उपदेशासंबंधी सांगावे.

बाबाजी–श्रीगुरुंनिकट भगवत्-अर्चन आणि विशुद्ध भागवत-धर्माची शिकवण ग्रहण करीत सरल भावाने कृष्ण-सेवा आणि कृष्णानुशीलन करावयास हवे. अर्चनाच्या अंगांचे विवेचन नंतर केले जाईल. संबंधज्ञान, अभिधेयज्ञान आणि प्रयोजनज्ञानासंबंधी श्रीगुरुदेवांकडून उपदेश घेण्याची नितांत आवश्यकता आहे.

विजय–(३) विश्वासपूर्वक गुरूंची सेवा कशी असते?

बाबाजी–श्रीगुरुदेवांस मरणशील अर्थात साधारण जीव समजू नये, उलट त्यांना सर्वदेवमय जाणावयास हवे. त्यांची कधीही अवज्ञा करू नये, त्यांना वैकुण्ठतत्त्व समजावयास हवे.

विजय–(४) साधुमार्गाचे अनुसरण कशास म्हणतात?

बाबाजी–ज्या कोणत्या उपायाने कृष्णाच्या चरणी मन लावले जाईल, त्यास साधनभक्ती तर म्हणता येऊ शकते; परंतु पूर्व-महाजन ज्या मार्गाचे अनुसरण करून गेले आहेत, त्याच मार्गाचे अनुसरण करणे कर्तव्य आहे. याचे कारण हे आहे की तो मार्ग सर्वदा दुःखरहित, श्रमरहित आणि समस्त कल्याणाचा हेतू असतो.

---

(५) (स्त्रीसंगी आणि कृष्णभक्तिरहित) अवैष्णव गुरूकडून मंत्र ग्रहण केल्याने नरकगामी व्हावे लागते. म्हणून शास्त्रीय विधींद्वारे पुनः वैष्णव गुरूच्या निकट मंत्र ग्रहण करावयास हवा.

**स मृग्यः श्रेयसां हेतुः पन्थाः सन्तापवर्जितः।**
**अनवाप्तश्रमं पूर्वे येन सन्तः प्रतस्थिरे॥**(६)

(स्कन्दपुराण)

कुठलाच पंथ कुण्या एका व्यक्तीद्वारे सुंदर रूपाने निरूपित होत नाही. पूर्व-महाजनांनी एकानंतर दुसऱ्याने क्रमशः त्या भक्तियोग पथास स्वच्छ केले आहे, त्या पथातील लहानमोठ्या समस्त विघ्नबाधांस दूर करून त्यास सहज आणि निर्भय बनविले आहे. म्हणूनच त्या मार्गाचे अवलंबन करणेच योग्य आहे. श्रुती, स्मृती, पुराण आणि पञ्चरात्र–या शास्त्रीय विधींचे उल्लंघन करून जर श्रीहरीची एकांतिक अर्थात अनन्य भक्ती जरी केली गेली तरी त्या भक्तीने कधीही कल्याण होऊ शकत नाही, उलट त्यास उत्पाताचा हेतूच मानावा लागेल–

**श्रुति–स्मृति–पुराणादि–पञ्चरात्र–विधिं विना।**
**ऐकान्तिकी हरेर्भक्तिरुत्पातायैव कल्पते॥**

ब्रह्मयामल (भक्तिरसामृतसिन्धू)

विजय–हरिप्रती अनन्य भक्ती उत्पाताचे कारण कसे काय असू शकते, हे कृपया स्पष्ट करून सांगा.

बाबाजी–शुद्धभक्तीचा एकांतिक भाव अर्थात अनन्य भाव पूर्व-महाजन-पथाचा अवलंबन केल्यानेच प्राप्त होतो. पूर्व-महाजन-पथास सोडून कुण्या दुसरा मार्ग निर्माण केल्याने एकांतिक भाव प्राप्त होत नाही. म्हणूनच शुद्धभक्तीस न समजल्याने तिच्या काही-काही भावाभासास ग्रहण करून दत्तात्रेय, बुद्ध आदी अर्वाचीन प्रचारकांमधून कुणी मायावादमिश्र, कुणी नास्तिकतामिश्र एक-एक क्षुद्र पंथ प्रदर्शन करून त्यातच ऐकांतिकी हरिभक्तीचा आरोप केला आहे, परंतु वास्तवात त्या लोकांद्वारा प्रवर्तित पथ हरिभक्ती नाही आहे, उत्पात-विशेष आहे. रागमार्गीय भजनात श्रुति-स्मृति-पुराण-पंचरात्रादी विधींची अपेक्षा रहात नाही. तेथे तर केवळ व्रजजनानुगमनाची अपेक्षा असते. परंतु विधिमार्गाच्या अधिकारी साधकांस ध्रुव, प्रल्हाद, नारद, व्यास आणि शुक आदी महाजनांद्वारे निर्दिष्ट एकमात्र भक्तीपथाचे

(६) पूर्व महाजनांनी ज्या मार्गास अत्यंत सुलभ अर्थात श्रमरहित जाणून ग्रहण केले आहे, तोच पथ कल्याण-प्राप्तीकरता संतापरहित आहे. म्हणून तोच पथ एकमात्र ग्रहण करण्यायोग्य आहे.

अवलंबन करणे आवश्यक असते. म्हणून वैधभक्तांकरिता साधुमार्ग अनुसरणाव्यतिरिक्त कुठलाच दुसरा उपाय नाही.

विजय–(५) सद्धर्माची जिज्ञासा कशी असते?

बाबाजी–सद्धर्माचा अर्थ खरा धर्म अथवा खऱ्या साधूंचा धर्म आहे. सद्धर्म समजण्याकरिता अत्यंत आग्रहपूर्वक जिज्ञासा करण्यासच सद्धर्माची जिज्ञासा म्हणतात.

विजय–(६) कृष्णाच्या उद्देशाने भोग आदींचा त्याग कशास म्हणतात?

बाबाजी–आहार-विहार आदींद्वारे सुख भोगण्याचे नाव भोग आहे. हा भोग साधारणतः भजन-विरोधी असतो. कृष्णभजनाच्या उद्देशाने अशा भोगांचा परित्याग केल्याने भजन सुलभ होते. मद्यपान करणाऱ्या व्यक्तीप्रमाणे भोगात आसक्त व्यक्ती भोगांस भोगण्यात अशाप्रकारे लिप्त राहतात की ते शुद्धभजन करू शकत नाहीत. म्हणून केवळ भगवत्-प्रसादाचेच सेवन करावे. सेवेच्या उपयोगी-शरीराचे रक्षण करणेसुद्धा कर्तव्यच आहे. एकादशी, जन्माष्टमी, रामनवमी, फाल्गुनी-पौर्णिमा, नृसिंहचतुर्दशी आदी दिवशी समस्त प्रकारच्या भोगांचा त्याग करावा.

विजय–(७) द्वारका आदी धामांमध्ये तथा गंगेच्या निकट वासाचे तात्पर्य काय आहे?

बाबाजी–ज्या-ज्या स्थानी भगवंताच्या जन्म आदी लीला झाल्या आहेत, त्या स्थानी आणि गंगा-यमुना आदी पुण्य–सलिला नद्यांच्या जवळ वास केल्याने भक्तिनिष्ठा उत्पन्न होते.

विजय–श्रीनवद्वीपात वास केल्याने जी पवित्रता होते, ती गङ्गेमुळे होते किंवा मग याचे दुसरे काही कारणसुद्धा आहे?

बाबाजी–अहा! श्रीनवद्वीपाच्या सोळा कोसांच्या अंतर्गत जेथेसुद्धा वास केला जाईल, त्यामुळे वृन्दावनातच वास होतो, विशेषकरून मायापुरात जर वास केला जाईल. अयोध्या, मथुरा, गया, काशी, काञ्ची, अवन्तिका आणि द्वारका–या सात मोक्षदायिका पुरींमध्ये हे ‘श्रीमायापूर’ अतिशय प्रधान तीर्थ आहे. याचे कारण हे आहे की येथे श्रीमन् महाप्रभूंनी आपले नित्यधाम–श्वेतद्वीपास अवतीर्ण केले आहे.

श्रीमन् महाप्रभूंच्या चार शताब्दींनंतर हे श्वेतदीप पृथ्वीच्या समस्त तीर्थ स्थळांपेक्षा प्रधान तीर्थस्थान बनेल. येथे वास केल्यामुळे समस्त प्रकारचे अपराध दूर होतात आणि शुद्धभक्ती प्राप्त होते. श्रीप्रबोधानन्द सरस्वतींनी या धामास वृन्दावनापासून अभिन्न मानूनही कुठल्या विषयी याचे माहात्म्य अधिक दाखविले आहे.

विजय–जीवननिर्वाहोपयोगी अर्थ वा विषय स्वीकारण्याचे तात्पर्य काय आहे?

बाबाजी–'नारदीयपुराणा'त म्हटले आहे–

**यावता स्यात् स्वनिर्वाहः स्वीकुर्यात्तावदर्थवित्।**
**आधिक्ये न्यूनतायां च च्यवते परमार्थतः॥(७)**

वैधीभक्तीचे अधिकारी वर्णाश्रमधर्मानुसार निर्धारित सदुपायांद्वारे अर्थ-उपार्जन करून जीवन-निर्वाह करतील. आवश्यकतेनुसार अर्थ स्वीकारल्याने कल्याण होते–आवश्यकतेपेक्षा अधिक ग्रहण करण्याच्या लालसेने आसक्ती होते, जी भजनास क्रमशः नष्ट करते. आवश्यकतेपेक्षा कमी स्वीकारणेही अहितकारक ठरते, कारण असे झाल्याने अभाव उपस्थित होऊन भजनास क्षीण करतो. म्हणूनच जोपर्यंत निरपेक्ष होण्याचा अधिकार प्राप्त होत नाही तोपर्यंत जीवननिर्वाहोपयोगी अर्थादी स्वीकार करीत शुद्ध भक्तीचे अनुशीलन करावयास हवे.

विजय–(८) हरिवासराचा सन्मान कसा होतो?

बाबाजी–शुद्ध एकादशीचे नाव हरिवासर आहे. विद्ध एकादशीचा त्याग केला पाहिजे. महाद्वादशी उपस्थित झाल्यावर एकादशी सोडून द्वादशीचे पालन करावे. पूर्व-दिनी ब्रह्मचर्य, हरिवासराच्या दिवशी निरंबू (निर्जल) उपवास आणि रात्री-जागरणासोबत निरंतर भजन आणि उपवासाच्या दुसऱ्या दिवशी ब्रह्मचर्य आणि उपयुक्त वेळी पारणे करणे (उपवास सोडणे)–हेच हरिवासराचा सन्मान करणे होय. महाप्रसादाचा त्याग केल्याशिवाय निरंबू (पाणी प्यायल्याशिवाय) उपवास होत नाही.

---

(७) ज्या मात्रेत विषयांस स्वीकारल्याने आपल्या भक्तीचा निर्वाह होतो, धनवान पुरुष त्याच मात्रेत धन ग्रहण करतील. कारण आवश्यकतेपेक्षा अधिक वा अल्प ग्रहण केल्याने परमार्थातून भ्रष्ट व्हावे लागते.

सामर्थ्यहीन अथवा शक्तिहीन अवस्थेत प्रतिनिधी किंवा अनुकल्पाची व्यवस्था आहे–**'नक्तं हविष्यान्नं'** (हरिभक्तिविलास १२/३९, धृत वायुपुराण) या वचनांद्वारे अनुकल्पाची विधी आहे.[८]

विजय–(१०) आवळा-पिंपळ आदी वृक्षांना गौरव प्रदान कसा केला जातो?

बाबाजी–आवळा, पिंपळ, तुलसी, गो, ब्राह्मण आणि वैष्णव–यांची पूजा केल्याने, त्यांचे ध्यान केल्याने आणि त्यांना नमस्कार केल्याने मनुष्याचे पाप नष्ट होते–

**अश्वत्थ तुलसी-धात्री-गो-भूमि-सुर-वैष्णवाः।**
**पूजिताः प्रणता ध्याताः क्षपयन्ति नृणामघम्॥**

(स्कन्दपुराण)

वैधीभक्तीचे अधिकारी या संसारात राहून जीवनयात्रा निर्वाहाकरिता उपयोगी पिंपळ आदी सावलीदार वृक्ष, आवळा आदी फळयुक्त वृक्ष, तुळस आदी भजनीय वृक्ष, गाय आदी उपकारी पशू, ब्राह्मण अर्थात धर्म शिक्षक आणि समाजरक्षक तसेच भक्त-वैष्णव–या सर्वांचे पूजन आणि ध्यान करण्याकरिता तसेच त्यांना प्रणाम करण्याकरिता बाध्य आहेत. या कार्यांद्वारे त्यांनी जगाचे रक्षण करावे.

---

(८) प्रतिनिधीद्वारे उपवासाची विधी (हरिभक्तिविलास–१२/३४)–''उपवासे त्वशक्तस्य आहिताग्नेरथापि वा। पुत्रान् वा कारयेदन्यान् ब्राह्मणान् वापि कारयेत्॥'' अर्थात साग्निक ब्राह्मण उपवास करण्यास असमर्थ असल्यास पुत्रांद्वारे अथवा ब्राह्मणांद्वारे उपवास करवतील.

हविष्यान्न आदींद्वारे उपवासाचा विधी (ह. भ. वि. १२ /३९ धृत वायुपुराण)–''नक्तं हविष्यान्नमनोदनम्बा फलं तिलाः क्षीरमथाम्बुचाज्यं। यत् पञ्चगव्यं यदि वापि वायुः प्रशस्तमत्रोत्तरमुत्तरञ्च॥'' अर्थात रात्री हविष्यान्न, अन्न सोडून इतर द्रव्य, फळे, तीळ, दुग्ध, जल, तूप, पंचगव्य अथवा वायू–या सर्व वस्तू क्रमाने एकापेक्षा एक श्रेष्ठ आहेत. महाभारत उद्योग पर्वानुसार जल, मुळे, फळे, दुग्ध, तूप, ब्राह्मण, कामना, गुरु-वचन तथा औषधी या आठहींमुळे व्रत नष्ट होत नाही.–''अष्टैतान्य-व्रतघ्नानि आपो मुलं फलं पयः। हविर्ब्राह्मणकाम्य च गुरोर्वचनमौषधम्॥''

विजय–(११) कृष्ण-बहिर्मुख व्यक्तींचा संगत्याग याविषयी विस्तारपूर्वक सांगा.

बाबाजी–भाव उदित झाल्यावर भक्ती प्रगाढ होते. जोपर्यंत भाव उदित होत नाही, तोपर्यंत भक्ति-विरोधी संगाचा परित्याग करणे आवश्यक आहे. 'संग' शब्दाने आसक्तीचा बोध होतो. म्हणूनच दुसऱ्या लोकांसोबत जी निकटता होते अथवा बातचीत होते, त्यास 'संग' म्हणता येत नाही. संग तर तेव्हा होतो, जेव्हा त्या निकटतेत अथवा बोलण्यामध्ये (संभाषणात) आसक्ती असते. भगवत्-विमुख लोकांचा संग नितांत वर्जनीय आहे. भाव उदित झाल्यावर बहिर्मुख संगाप्रती कधी स्पृहा होत नसते. वैधीभक्तीच्या अधिकाऱ्यांस अशा संगापासून सर्वदा दूर रहावयास हवे. झाडे-झुडपे ज्याप्रकारे दूषित वायूने तथा अधिक उष्णतेमुळे नष्ट होऊन जातात, त्याचप्रकारे कृष्ण-विमुखतेने भक्तिलता देखील सुकून जाते.

विजय–कृष्ण-विमुख कोण आहेत?

बाबाजी–कृष्णभक्तिरहित विषयी (भोगांमध्ये आसक्त), स्त्रीसंगी (स्त्री-संगात आसक्त), मायावाद आणि नास्तिकता दोषांनी कलुषित हृदय असणारे आणि कर्मजड–या चार प्रकारचे लोक कृष्ण-विमुख आहेत. या चार प्रकारच्या लोकांची संगत दुरूनच त्यागावी.

विजय–(१२) अनधिकारीस शिष्य न करण्याविषयी जाणण्यायोग्य विशेष गोष्टी काय आहेत?

बाबाजी–धनाच्या लोभाने बरेच शिष्य करणे एक प्रधान दोष आहे. अनेक शिष्य बनविल्याने अशा काही व्यक्तींसदेखील शिष्य करावे लागते, ज्यांच्या हृदयात श्रद्धेचा देखील अभाव आहे. अश्रद्धाळूस शिष्य केल्याने अपराध होतो. श्रद्धाळू पुरुषांव्यतिरिक्त दुसरे शिष्य होण्याकरिता योग्य नसतात.

विजय–(१३) अवडंबरपूर्ण उद्यमांचा (महोत्सव आदी) परित्याग याचे तात्पर्य काय आहे?

बाबाजी–संक्षेपात जीवन-निर्वाह करीत भगवद्भजन करावयास हवे. विराट व्यापार आरंभ केल्याने त्यांच्या प्रती अशी काही आसक्ती होते की भजनात मन लागत नाही.

विजय–(१४) नाना प्रकारच्या ग्रंथांचे पठण-पाठन आणि व्याख्यावाद यांचा परित्याग करणे याचे तात्पर्य काय आहे?

बाबाजी–शास्त्र समुद्राच्या समान आहेत. ज्या विषयाची शिकवण घ्यायला हवी, त्या विषयीच्या ग्रंथांचे आद्योपांत विवेचनपूर्वक अध्ययन करणे उत्तम असते. अनेक ग्रंथांस थोडे-थोडे वाचल्याने कुठल्याच विषयाचे पूर्ण ज्ञान होत नाही. विशेषतः भक्तिशास्त्रांस जर मन लावून सावधानतेने अध्ययन केले नाही, तर संबंधतत्त्व-संबंधी बुद्धीचा उदय होत नाही. लक्षात ठेवावे की ग्रंथांचा सरळ अर्थच घ्यावा, अर्थवाद केल्याने विपरीत सिद्धांत होऊन जातात.

विजय–(१५) व्यवहारात कृपणतेचा परित्याग कशास म्हणतात?

बाबाजी–जीवनयात्रा निर्वाहाकरिता भोजन आणि आच्छादनाकरिता उपयोगी द्रव्यांचा संग्रह करणे आवश्यक आहे. द्रव्य नसल्यावर कष्ट होतात आणि मिळाल्यावरही नष्ट झाल्याने कष्ट होतात. अशा प्रकारे दुःख उपस्थित झाल्यावर भक्तांनी घाबरू नये, उलट मनोमन भगवंताचे स्मरण करीत रहावे.

विजय–(१६) शोक आदींपासून कसे वाचावे?

बाबाजी–शोक, भय, क्रोध आणि मत्सरतेने परिपूर्ण चित्तात श्रीकृष्णाचे स्फुरण होत नाही. बंधु-बांधवांच्या विच्छेदाने (वियोगाने) तथा कामनांमध्ये बाधा पडल्यामुळे शोक-मोह आदी होऊ शकतात. परंतु त्या शोक, मोह आदींच्या अधीन पडून राहणे योग्य नाही. पुत्र-वियोग झाल्यावर अवश्यच शोक होईल, परंतु हरिचिंतनाद्वारे त्या शोकास दूर करणे आवश्यक आहे. अशा प्रकारे भगवंताच्या चरणकमळी चित्तास स्थिर ठेवण्याचा अभ्यास करणे योग्य आहे.

विजय–(१७) अन्यान्य देवीदेवतांची अवज्ञा करू नये–यामुळे असे समजावे का की त्या-त्या अन्य देवीदेवतांची पूजा करावी?

बाबाजी–कृष्णाप्रती अनन्याभक्ती असणे आवश्यक आहे. श्रीकृष्ण समस्त देवतांची मूळ देवता आहेत. यद्यपि कुठल्याही देवतेस कृष्णाहून स्वतन्त्र समजून पूजा करू नये तथापि दूसऱ्या लोकांना देवतांची पूजा करताना पाहून न तर त्या देवतांची पूजा करावी आणि त्यांची अवज्ञाही करू नये. समस्त देवतांस श्रीकृष्णाचे सेवक मानून त्यांना सन्मान देत एकमात्र कृष्णाचेच निरंतर स्मरण करावे. जिवाचे अंतःकरण जोपर्यंत निर्गुण होत नाही, तोपर्यंत तेथे अनन्य-भक्ती उदित होत नाही. ज्यांचे चित्त (अंतःकरण) सत्त्व, रज आणि तम या त्रिगुणांनी आच्छादित आहे, ते आपापल्यांत प्रबळ असणाऱ्या गुणांनुसार देवतांची पूजा करतात, त्यांच्या अधिकारानुसारच त्यांची तशी निष्ठा असते. म्हणूनच त्या लोकांच्या उपास्य देवतांसंबंधी कोणत्याही प्रकारे अनादराचा भाव प्रकट करू नये. त्या लोकांच्या उपास्य देवतांच्या कृपेने क्रमोन्नती होताहोता त्या उपासकांचे चित्त कधीतरी निश्चित निर्गुण होईल.

विजय–(१८) "प्राणीमात्रांस उद्वेग देऊ नये" यासंबंधी सांगा.

बाबाजी–जे प्राणीमात्रांच्या प्रती दयाभाव ठेवतात, त्यांना कुठल्याही प्रकारे तन-मन-वचनाने उद्वेग देत नाहीत, त्यांच्या प्रती श्रीकृष्ण शीघ्रच संतुष्ट होतात. दया–वैष्णवांचा प्रधान धर्म आहे.

विजय–(१९) सेवापराध आणि नामापराध वर्जन कसे होईल?

बाबाजी–अर्चनसंबंधी सेवापराधाचे आणि साधारणतः भक्तीच्या संबंधी नामापराधाचे विशेष सावधानतेने वर्जन करावे. पालखीवर बसून किंवा पादुका (पादत्राण) घालून भगवंताच्या मंदिरात प्रवेश आदी बत्तीस प्रकारचे सेवापराध आहेत. साधु-निंदा, गुरुदेवांची अवज्ञा आदी दहा प्रकारचे नामापराध आहेत. या दोन्ही प्रकारच्या अपराधांचे अवश्य वर्जन करावे.

विजय–(२०) भगवंत आणि भक्तीची निंदा ऐकून सहन न करणे–या उपदेशानुसार निंदा करणाऱ्यासोबत त्याच वेळी भांडण करण्याचा विधी (नियम) आहे का?

बाबाजी–जे लोक श्रीकृष्ण आणि वैष्णवांची निंदा करतात, ते कृष्णविमुख आहेत; अशा लोकांचा संग सर्व प्रकारे त्यागावा.

विजय–पूर्वोक्त २० अंगांसोबत दुसऱ्या अंगांचा काय संबंध आहे?

बाबाजी–यानंतरची ४४ अंगे या पूर्वोक्त २० अंगांतच अंतर्भूत आहेत. विस्तारपूर्वक समजावण्यासाठी यांस वेगवेगळ्या अंगांच्या रूपात दाखविले आहे. (२१) 'वैष्णव चिन्ह-धारण' करण्या पासून (५०) 'कृष्णास प्रिय वस्तू समर्पण' पर्यंतची ३० अंगे अर्चन मार्गाच्या अंतर्भूत आहेत–

(२१) गळ्यात त्रिकंठी तुळशीची माळ आणि शरीरावर द्वादश तिलक धारण करण्याचे नाव वैष्णव-चिन्ह धारण करणे आहे. साधक वैष्णवांनी चिन्हांस अवश्य धारण करावे.

(२२) 'हरे कृष्ण' आदी नाम अथवा पंचतत्त्वांची नावे आदी चंदनाद्वारे आपल्या श्रेष्ठ अंगांवर धारण करण्याचे नाव हरिनामाक्षर धारण करणे आहे.

**त्वयोपभुक्त-स्रग्-गन्ध-वासोऽलंकार-चर्चिताः।**
**उच्छिष्टभोजिनो दासास्तव मायां जयेम हि॥**[९]

भागवताच्या या (११/६/४६) श्लोकात निर्माल्य धारणाची विधी दिलेली आहे. (२४) कृष्णासमोर नृत्य, (२५) दंडवत्–प्रणाम, (२६) अभ्युत्थान अर्थात श्रीविग्रहांचे आगमन होताना पाहून उठून उभे राहणे, (२७) अनुव्रज्या अर्थात श्रीमूर्तीच्या मागेमागे चालणे, (२८) कृष्णाच्या मंदिरात जाणे, (२९) परिक्रमा अर्थात श्रीमूर्तीस दक्षिणेकडे (उजवीकडे) ठेवून तीन वेळा प्रदक्षिणा करणे, (३०) अर्चन अर्थात विभिन्न उपचारांद्वारा श्रीमूर्तीची पूजा करणे–कतिपय अगांची पृथक (वेगळी) व्याख्या करण्याची आवश्यकता नाही आहे.

(३१) **परिचर्या तु सेवोपकरणादिपरिष्क्रिया।**
**तथा प्रकीर्णकच्छत्रवादित्राद्यैरुपासना॥**

(भ. र. सि. १/२/१४०)

---

(९) आम्ही आपण धारण केलेली माळ घातली, आपण लावलेले चंदन लावले, आपण उतरविलेली वस्त्रे घालून आणि आपण धारण केलेल्या आभूषणांनी स्वतःस सजवत राहू. आम्ही आपले उच्छिष्ट खाणारे सेवक आहोत. म्हणूनच आम्ही आपल्या मायेवर अवश्यच विजय प्राप्त करू शकू.

अर्थात राजाप्रमाणे श्रीकृष्णाची सेवा करण्यास परिचर्या म्हणतात. ही परिचर्या दोन प्रकारची असते. जसे–उपकरणांस स्वच्छ करणे आणि चामर व वाद्यांदिंद्वारे सेवा वा उपासना.

(३२) गान, (३३) संकीर्तन, (३४) विज्ञप्ती अर्थात दैन्यसूचक वाणी-प्रयोग, (३६) स्तव-पाठ, (३७) नैवेद्याचे आस्वादन, (३८) चरणोदकाचे आस्वादन, (३९) धूप आणि माला आदींचा सौरभ ग्रहण करणे, (४०) श्रीमूर्तीचा स्पर्श, (४१) श्रीमूर्तीचे दर्शन करणे, (४२) आरती करणे, (४३) श्रीकृष्णाचे नाम, रूप, गुण आणि लीला-कथांचे श्रवण करणे, (४४) सर्वत्र कृष्ण-कृपेचा अनुभव करणे, (४५) स्मरण अर्थात कृष्णाच्या नाम-रूप-गुण आणि त्यांच्या लीला-कथांचे स्मरण करणे, (४६) ध्यान–हे कतिपय अंग अगदीच स्पष्ट आहेत. (४७) कर्मांचे अर्पण आणि किंकर होणे–हे दोन प्रकारचे दास्य भाव आहेत, (४८) सख्य दोन प्रकारचे असते–विश्वास आणि मित्रवृत्ती (४९) 'आत्मनिवेदन' शब्दाचा अर्थ हा आहे की आत्म शब्दाने देहीची 'अहंता' आणि देह-निष्ठ 'ममता'–या दोहोंस कृष्णाप्रती अर्पण करणे.

विजय–देहीची अहंता आणि देह-निष्ठ ममता–या दोहोंस आणखी स्पष्ट करण्याची कृपा करा.

बाबाजी–शरीराच्या आत जीव आहे, तोच देही आणि 'अहं' म्हणविला जातो. त्याचे अवलंबन करून जी 'मी' पणाची बुद्धी होते, तिलाच देह-निष्ठ अहंता म्हणतात; देहामध्ये जी 'माझे' पणाची बुद्धी होते, तिलाच देह-निष्ठ ममता म्हणतात. या 'मी ' आणि 'माझे' या दोघांनाही श्रीकृष्णाच्या प्रती अर्पण करायला हवे. 'मी' आणि 'माझी' या बुद्धीस सोडून "मी कृष्णाचा प्रसाद भोजन करणारा कृष्णाचा दास आहे" आणि हे शरीर कृष्णाच्या सेवेस उपयोगी एक यंत्र आहे–या बुद्धीने शरीर-यात्रेचा निर्वाह करणे हेच आत्मनिवेदन आहे.

विजय–प्रिय वस्तूंस कृष्णाप्रती कसे अर्पण करावे?

बाबाजी–(५०) संसारात जी वस्तू आवडू लागते, तिला कृष्ण-संबधी करून ग्रहण करण्यास प्रिय वस्तूंस कृष्णाप्रती अर्पण करणे आहे.

विजय–(५१) कृष्णाच्या उद्देशाने अखिल क्रिया कशा असाव्यात?

बाबाजी–लौकिकी आणि वैदिकी समस्त प्रकारच्या क्रियांस हरि-सेवेच्या अनुकूल केल्याने श्रीकृष्णाच्या उद्देशाने अखिल क्रिया करणे होते.

विजय–(५२) सर्व प्रकारे शरणापत्ती ग्रहण करणे कसे काय होऊ शकते?

बाबाजी–हे भगवंता, मी तुझा आहे–अशा प्रकारे मन आणि वाणीने म्हणणे आणि–"हे भगवंता, मी तुम्हाला शरण आलो आहे"–अशा भावनेस शरणापत्ती म्हणतात.

विजय–(५३) तुळशीची सेवा कशी केली जावी?

बाबाजी–तुळशीची सेवा नऊ प्रकारे केली जाते–तुळशीचे दर्शन, तुळशीचा स्पर्श, तुळशीचे ध्यान, तुळशीचे कीर्तन, तुळशीस प्रणाम, तुळशीचे माहात्म्य ऐकणे, तुळशीचे रोप लावणे, तुळशीची सेवा आणि तुळशीचे नित्य पूजन.

विजय–(५४) शास्त्राचा सन्मान कसा केला जातो?

बाबाजी–भगवद्भक्ति-प्रतिपादक शास्त्रच 'शास्त्र' आहेत; त्यांत श्रीमद्भागवतच सर्वश्रेष्ठ आहे; कारण ते सर्व वेदान्त-सार-स्वरूप आहे; त्याच्या रसरूप अमृताचे आस्वादन करणाऱ्यास दुसऱ्या कुठल्याही शास्त्राप्रती रुची होत नाही.

विजय–(५५) कृष्णाचे जन्मस्थान मथुरेचे माहात्म्य काय आहे?

बाबाजी–मथुरेसंबंधी श्रवण, कीर्तन आणि स्मरण; तेथे जाण्याची इच्छा आणि दर्शन, स्पर्शन, तेथे वास करणे तथा त्या धामाची सेवा–या क्रियांनी अभिलाषा पूर्ण होते. श्रीमायापुरच्या संबंधीदेखील अशा प्रकारे जाणावे.

विजय–(५६) वैष्णव-सेवेचे तात्पर्य काय आहे?

बाबाजी–वैष्णव भगवंतांचे अधिक प्रिय आहेत. वैष्णवाची सेवा केल्याने भगवंताप्रती भक्ती होते. शास्त्रात असे सांगितले गेले आहे की समस्त देवतांच्या आराधनेपेक्षा विष्णूची आराधना श्रेष्ठ आहे आणि विष्णूच्या आराधनेपेक्षाही त्यांचे सेवक वैष्णवांची पूजा श्रेष्ठ आहे.

विजय–(५७) शक्तीनुसार महोत्सव करणे याचे तात्पर्य काय आहे?

बाबाजी–भगवंताच्या मंदिर आदींमध्ये आपल्या शक्तीनुसार द्रव्यादी संग्रह करून भगवत्सेवापूर्वक शुद्ध वैष्णवांच्या सेवेस महोत्सव म्हणतात–यापेक्षा श्रेष्ठ उत्सव विश्वात अन्य कुठलाही नाही.

विजय–(५८) कार्तिक महिन्याचा समादर म्हणजे काय?

बाबाजी–कार्तिक मासाचे नाव ऊर्जा आहे. या महिन्यात नियमित रूपाने श्रवण, कीर्तन आदी भक्तीच्या अंगांच्या पालनाद्वारे श्रीदामोदराची सेवा करण्याचे नाव 'ऊर्जादर' अर्थात उर्जेचा आदर करणे आहे.

विजय–(५९) जन्माच्या दिनी यात्रा-उत्सव पालन कसे होते?

बाबाजी–भाद्रपदातील कृष्णाष्टमी आणि फाल्गुन महिन्याच्या पौर्णिमेस उत्सव करण्याचे नाव 'श्रीजन्मयात्रा' आहे. शरणागतजनांस याचे अवश्य पालन करावयास हवे.

विजय–(६०) श्रद्धापूर्वक श्रीमूर्तींची परिचर्या कशी होते?

बाबाजी–श्रीमूर्तींच्या सेवा-पूजेत प्रीतिपूर्ण उत्साहाचे असणे अत्यंत आवश्यक असते. जे लोक परम उत्साहाने श्रीमूर्तींची सेवा पूजा करतात, कृष्ण त्यांस केवळ मुक्तिरूप तुच्छ फळ न देता, भक्तिरूप महाफळदेखील प्रदान करतात.

विजय–(६१) रसिकजनांच्या संगतीत भागवताचा अर्थ कशाप्रकारे आस्वादावा?

बाबाजी–वेदरूप कल्पवृक्षाचा सुमिष्ठ रस श्रीमद्भागवत आहे. रसविमुख व्यक्तींच्या संगात श्रीमद्भागवताचे रसास्वादन होत नाही, उलट अपराध होतो. जे श्रीभागवताचे रसज्ञ अर्थात शुद्धभक्तीचे अधिकारी आहेत–कृष्णाच्या लीलारसाचे पिपासू आहेत, त्यांच्या संगात श्रीमद्भागवताच्या श्लोकांचे रसास्वादन करावे. साधारण सभांमध्ये श्रीमद्भागवताचा पाठ केल्याने वा श्रवण केल्याने शुद्धभक्तीचा लाभ होत नाही.

विजय–(६२) स्वजातीयाशय-स्निग्ध भक्तजनांचा संग कशास म्हणतात?

बाबाजी–सत्संगाच्या नावाखाली अभक्तजनांचा संग केल्याने भक्तीची उन्नती होत नाही. श्रीकृष्णाच्या अप्राकृत लीलांमध्ये सेवा प्राप्त करणेच भक्तजनांकरिता अभीष्ट असते; अशी अभिलाषा ज्यांना आहे, त्यांना 'भक्त' म्हटले जाते, अशा भक्तांमध्ये आपल्यापेक्षा श्रेष्ठ भक्तांचा संग केल्याने भक्तीची उन्नती होते. असे न झाल्याने भक्तीची उन्नती थांबते आणि ज्या श्रेणीच्या लोकांचा संग केला जातो, त्याच प्रकारचा स्वभावही होऊन लागतो. हरिभक्तिसुधोदय (८/५१) मध्ये संगासंबधी अशाप्रकारे म्हटले गेले आहे–

**यस्य यत्संगतिः पुंसो मणिवत् स्यात् स तद्‌गुणः।**
**स्वकुलर्द्धै ततो धीमान् स्वयूथान्येव संश्रयेत्॥**

अर्थात जसे रत्नास ज्या रंगाच्या वस्तूसोबत ठेवले गेले, त्या वस्तुसमानच रत्नाचा रंग दिसू लागतो, त्याचप्रकारे ज्या पुरुषाचा जसा संग असतो, त्याच अनुरूप त्याचा स्वभाव होऊन जातो. म्हणून शुद्ध संतांच्या संगाने शुद्ध संत बनता येते. साधुसंग (सत्संग) सर्वप्रकारे कल्याणप्रद असतो. शास्त्रांमध्ये जो निःसंग होण्याचा परामर्श दिला गेला आहे, त्याचे तात्पर्य साधुसंग करण्यास सांगितले गेले आहे.

विजय–(६३) नामसंकीर्तन कशास म्हणतात?

बाबाजी–नाम अप्राकृत चैतन्यरस आहे, त्यात जड भावाचा थोडासुद्धा गंध नसतो. भक्त जिवाच्या सेवा-वृत्तीने भक्ति-शोधित रसना आदींवर श्रीनाम स्वयं स्फूर्ती लाभ करतात. नाम जड इंद्रियांद्वारे ग्रहण करता येत नाही. अशा प्रकारे निरंतर स्वयं आणि दुसऱ्यांसोबत मिळून नामसंकीर्तन करावे.

विजय–(६४) मथुरा अर्थात जन्मस्थानात वास करण्यासंबंधी आपल्या कृपेने आम्ही काहीतरी समजलो आहोत, आता याचे सार सांगण्याची कृपा करावी.

बाबाजी–शेवटची पाच अंगे सर्वश्रेष्ठ आहेत. अपराधांपासून दूर राहत यांच्याशी थोडादेखील संबंध स्थापन केल्याने त्यांच्या अत्यंत अद्भुत प्रभावाने भावावस्थेचा उदय होतो.

विजय–या साधनांसंबंधी जर आणखी काही जाणण्यायोग्य असेल तर कृपया सांगावे.

बाबाजी–भक्तीच्या या अंगांच्या काही अवांतर फळांचे वर्णन शास्त्रांमध्ये प्राप्त होते. या अवांतर फळांचे वर्णन बहिर्मुख लोकांमध्ये भजनाची रुची निर्माण करण्याकरिता आहे. या समस्त अंगांचे मुख्य फळ कृष्णरतीस प्रकाशित करणे आहे. भक्तीच्या जाणकारांची समस्त कामे भक्तीच्या अंगरूपात असावयास हवी, कर्मांग रूपात नाही. ज्ञान आणि वैराग्याद्वारे कधी-कधी कोणास भक्ति-मंदिरात प्रवेशाधिकाराची थोडीशी अनुकूलता प्राप्त होते. तथापि ज्ञान आणि वैराग्य भक्तीची अंगे नाहीत. याचे कारण हे आहे की हे चित्तास कठोर बनवितात, परंतु भक्ती सुकुमार स्वभावाची असते. भक्तीमुळे जे ज्ञान आणि वैराग्य आपोआप उपस्थित होतात, तेच स्वीकृत आहेत; ज्ञान आणि वैराग्य भक्तीचे कारण असू शकत नाहीत; ज्ञान आणि वैराग्य जे देऊ शकत नाहीत, भक्तीद्वारे ते सहजच प्राप्त केले जाऊ शकते. साधनभक्ती हरिभजनामध्ये अशी रुची उत्पन्न करविते की अत्यंत कठीण विषयराग अर्थात विषयांप्रती राहणारी आसक्ती देखील दूर होऊन जाते.

साधकांकरिता युक्त-वैराग्यच आवश्यक आहे, फल्गु-वैराग्य (कपट-वैराग्य) यापासून सर्वदा दूर रहावयास हवे. समस्त विषयांस कृष्णाच्या संबंधयुक्त करून अनासक्त भावाने आवश्यकतेनुसार (यथायोग्य) त्या विषयांस ग्रहण करण्याचे नाव युक्त वैराग्य आहे. हरि-संबंधी वस्तूंस सांसारिक मानून मुक्तीच्या लोभाने त्यांचा परित्याग करण्यास फल्गु-वैराग्य म्हणतात. म्हणूनच आध्यात्मिक-ज्ञान आणि फल्गु-वैराग्याचा परित्याग करणेच योग्य आहे. धन आणि शिष्य आदींच्या उद्देशाने जी भक्ती प्रदर्शित होते, ती शुद्ध भक्तीपासून खूप दूर असते, म्हणूनच अशी दिखाऊ-भक्ती भक्तीचे अंग नाही आहे. विवेक आदी गुण भक्तीच्या अधिकाऱ्यांचे गुण आहेत, म्हणून तीदेखील भक्तीची अंगे नाहीत. यम, नियम, शौचाचार आदी कृष्णाच्या प्रती उन्मुख व्यक्तींमध्ये स्वयं उपस्थित होतात, म्हणून हीदेखील भक्तीची अंगे नाहीत. अंतःशुध्दी, बहिःशुध्दी, तप आणि शम आदी गुणही कृष्णभक्तांचा स्वयं आश्रय करतात, त्यांच्याकरिता भक्तास प्रयत्न करावे लागत नाहीत. भक्तीची जी अंगे सांगितली आहेत, त्यांत कितीतरी प्रधान अंगे आहेत. त्या प्रधान अंगांपैकी कुठल्या एका अंगाच्या अथवा अनेकांगांच्या साधनेत निष्ठा झाल्याने सिद्धी प्राप्त होते. मी वैधी साधनभक्तीच्या संबंधांत सर्व गोष्टी संक्षेपात सांगितल्या आहेत. आता तुम्ही लोक हृदयात भावनापूर्वक चांगल्याप्रकारे समजून घ्याव्या आणि आपल्या भरपूर सामर्थ्याद्वारे त्यांचे आचरण करावे.

ब्रजनाथ आणि विजयकुमार बाबाजींच्या उपदेशांस ऐकून त्यांच्या चरणी साष्टांग दंडवत प्रणाम करीत म्हणाले–प्रभो! आपण कृपा करून आमचा उद्धार करावा. आम्ही लोक अभिमानरूपी खड्ड्यात वाईट रितीने फसलेले आहोत.

बाबाजी म्हणाले–कृष्ण अवश्यच तुमच्यावर कृपा करतील.

रात्र अधिक झाल्यामुळे मामा आणि भागिनेय घरी परतले.

**॥ विसावा अध्याय समाप्त ॥**



# एकविसावा अध्याय (प्रमेयांतर्गत अभिधेय-विचार–रागानुगाभक्ती)

वैध साधनभक्तीसंबंधी विचारांस ऐकून विजयकुमार आणि ब्रजनाथ खूपच प्रभावित झाले. दोघांनी परस्पर भेटून निश्चय केला की परमार्थ राज्यात प्रवेश करण्याकरिता कुण्या एका सिद्ध महात्म्याकडून हरिनाम आणि दीक्षा ग्रहण करणे आवश्यक आहे. म्हणूनच त्यांनी वेळ न दवडता दुसऱ्याच दिवशी बाबाजी महाराजांकडून दीक्षा ग्रहण करण्याचा निश्चय केला.

विजयकुमारांना लहानपणीच त्यांच्या कुलगुरूद्वारे दीक्षा-मंत्र मिळाला होता. परंतु ब्रजनाथास केवळ गायत्री मंत्राच्या व्यतिरिक्त अन्य कुठल्याही मंत्राची दीक्षा मिळाली नव्हती. बाबाजी महोदयांच्या उपदेशांनी ते दोघे आधीच चांगल्या प्रकारे समजले होते की अवैष्णव गुरूद्वारे प्राप्त मंत्र जप केल्याने जीव नरकगामी होतो, म्हणूनच विवेक-बुद्धी झाल्यावर त्यास पुन्हा शास्त्रीय विधींनुसार शुद्ध-वैष्णव गुरूकडून दीक्षा घ्यावयास हवी. विशेष करून सिद्ध-भक्ताकडून मंत्र ग्रहण केल्याने अती शीघ्रच मंत्राची सिद्धी होते. असा विचार करून दोघांनी हा निर्णय घेतला की ते दोघेही उद्या सकाळी मायापुरात गंगा-स्नान करून परमाराध्य बाबाजी महाशयांकडे दीक्षा घेतील.

दुसऱ्या दिवशी सकाळी गंगा-स्नान करून द्वादश अंगांवर तिलक धारण करून दोघांनीही श्रीरघुनाथदास बाबाजींच्या चरण-प्रांतामध्ये पोहोचून त्यांना साष्टांग दंडवत-प्रणाम केला.

बाबाजी महाराज सिद्ध-वैष्णव होते. त्या दोघांचे मनोगत ते समजले. परंतु वरकरणी म्हणाले–आज इतक्या सकाळी कसे काय येणे केले? काय गोष्ट आहे?

दोघेही नम्रतापूर्वक उत्तरले–प्रभो! आम्हाला दीन-हीन आणि कंगाल समजून आमच्यावर कृपा करावी.

दोघांचेही बोलणे ऐकून बाबाजी मोठे प्रसन्न झाले आणि दोघांस एक-एक करून आपल्या कुटीत बोलावून अष्टादशाक्षर मंत्र प्रदान केला. मंत्र प्राप्त करून ते दोघेही जप करता-करता महाप्रेमात मत्त होऊन “जय गौरांग, जय गौरांग” म्हणत

नृत्य करू लागले. गळ्यात त्रिकंठी तुळशीची माळ, सुंदर यज्ञोपवीत, द्वादश अंगांना तिलक, मनोहर मुख-मंडळ, काही-काही सात्त्विक विकार आणि डोळ्यांतून निरंतर वाहणाऱ्या अश्रुधारा–असे सुंदर रूप पाहून बाबाजी दोघांनाही गळाभेट करीत म्हणाले–आज तुम्ही दोघांनी मला पवित्र केले आहे.

ते दोघेही बाबाजींच्या चरणधुळीस वारंवार आस्वादन करीत मस्तकी आणि सर्वांगांवर मळू लागले. इकडे ब्रजनाथाच्या पूर्व-व्यवस्थेनुसार त्यांचे दोन नोकर श्रीमन् महाप्रभूंच्या भोगाची प्रचुर सामग्री घेऊन उपस्थित झाले. विजयकुमार आणि ब्रजनाथांनी हात जोडून त्या भोग-सामग्रींचा नैवेद्य अर्पण करण्याची प्रार्थना केली. श्रीवास-अंगणातील अधिकारी महोदयांनी पुजारीद्वारे नैवेद्य दाखवून श्रीपंचतत्त्वास समर्पण केला.

शंख आणि घंटा वाजू लागले. वैष्णवजन झांजा, टाळ आणि मृदुंग घेऊन श्रीमन् महाप्रभूंसमोर भोगारतीचे गान करू लागले. हळूहळू खूपसे वैष्णवजन एकत्रित झाले. मोठ्या समारंभाद्वारे भोग संपन्न झाला. प्रसाद घेण्याकरिता नाट्य मंदिराचे स्थान निश्चित करण्यात आले. 'हरेर्नामा'चा उच्चध्वनी ऐकून आपापले जलपात्र घेऊन सगळे वैष्णव एकत्रित झाले. महाप्रसादाच्या महिमेचे पद जोरजोरात गायले जाऊ लागले. तदनंतर सर्वांनी प्रसाद घेण्यास आरंभ केला. ब्रजनाथ आणि विजयकुमार महा-महाप्रसादाच्या (गुरुवैष्णवजनांच्या उच्छिष्टप्रसादाच्या) आशेने आत्ताच बसायला इच्छुक नव्हते. परंतु प्रधान-प्रधान बाबाजी महोदयांनी त्या दोघांस बलपूर्वक बसवून म्हटले–तुम्ही लोक गृहस्थ वैष्णव आहात. तुमच्या चरणी दंडवत-प्रणाम करून आम्ही धन्य होऊ.

विजयकुमार आणि ब्रजनाथ हात जोडून नम्रतापूर्वक म्हणाले–आपण लोक महान त्यागी वैष्णव आहात. आपले अधरामृत (उष्टे) प्राप्त करणे म्हणजे आमच्याकरिता सौभाग्याची गोष्ट आहे. आपणांसोबत बसल्याने आम्हास अपराध लागेल.

वैष्णव म्हणाले–वैष्णवतेमध्ये गृहस्थ आणि गृहत्यागीचा कुठलाच भेद नसतो. भक्तीच्या परिमाणानुसारच वैष्णवाचे तारतम्य होते. अर्थात भगवंताप्रती ज्यास अधिक भक्ती आहे, तोच अधिक उन्नत वैष्णव आहे.

अशा प्रकारे सांगता-ऐकता सगळे एकत्रच बसून प्रसाद घेऊ लागले. परंतु विजयकुमार आणि ब्रजनाथ श्रद्धापूर्वक प्रसाद समोर ठेवून गप्प बसून राहिले. प्रसाद घेता-घेता काही वैष्णवांची दृष्टी त्यांच्यावर पडली. त्यांनी दोघांचे गप्प बसण्याचे कारण ओळखून रघुनाथदास बाबाजींस म्हटले–वैष्णव प्रवर! आपण आपल्या श्रद्धाळू शिष्यांवर कृपा करावी, नाहीतर ते प्रसाद घेणार नाहीत.

वैष्णवांचा अनुरोध ऐकून वृद्ध बाबाजींनी आपल्या प्रसादातील थोडासा काढून त्यांना दिला. दोघांनीही परम श्रद्धेने गुरुदेवांनी दिलेल्या प्रसादास ग्रहण केले आणि 'श्रीगुरवे नमः' असे उच्चारण करून प्रसाद घेऊ लागले. अधूनमधून 'साधू सावधान' आणि प्रसाद-माहात्म्यसूचक ध्वनी उद्घोषित होऊ लागला. अहा! त्यावेळी श्रीवास-अंगणातील नाट्य मंदिरात काय अपूर्व शोभा उदित झाली! सर्वांनी पाहिले, श्रीशची, सीता आणि मालिनीदेवी प्रसाद घेऊन येत आहेत आणि श्रीमन् महाप्रभू आपल्या प्रियजनांसोबत बसून मोठ्या प्रेमाने प्रसाद घेत आहेत. हे पाहून वैष्णव प्रसाद घेणे विसरून गेले, प्रसादाकरिता उठलेले हात जसेच्या तसेच राहिले. जोपर्यंत ही लीला प्रकट राहिली तोपर्यंत सर्वजण जडवत होऊन दर्शन करीत होते. नेत्रांतून आनंदाश्रू गुपचूप झरू लागले. काही वेळातच ती लीला डोळ्यांसमोरून अंतर्धान पावली. आता सगळेच एकमेकांकडे पाहून रडू लागले. त्यावेळी प्रसादाचा स्वाद इतका मधुर लागला की त्याचे वर्णन करता येणे शक्य नव्हते.

सर्वांनी एका स्वरात म्हटले–हे दोन्ही ब्राह्मणकुमार श्रीमन् महाप्रभूंचे नितांत कृपापात्र आहेत. म्हणूनच आज यांच्या महोत्सवात गौर-लीलेचा पुनः आविर्भाव झाला.

ब्रजनाथ आणि विजयकुमार रडतरडत म्हणाले–आम्ही खूपच दीनहीन अकिंचन आहोत, आम्ही काहीच जाणत नाही–आज श्रीगुरुदेव आणि वैष्णवजनांच्या अहैतुकी कृपेने आम्ही हे सर्व पाहू शकलो. आज आमचे जन्म घेणे सार्थकी लागले आहे.

प्रसाद घेतल्यावर वैष्णवजनांची आज्ञा घेऊन विजय आणि ब्रजनाथ घरी परतले.

आता दोघेही प्रतिदिन गंगा-स्नान करून गुरुदेवांस दंडवत-प्रणाम करतात.

भगवत्-विग्रहाचे दर्शन करून भगवन्मंदिर आणि तुळशीची परिक्रमा करतात. अशा प्रकारे रोज काही ना काही शिकवण ग्रहण करतात. चार-पाच दिवस लोटले. एकदा संध्याकाळी हे दोघे श्रीवास-अंगणी उपस्थित झाले. संध्या-आरती आणि नामसंकीर्तन झाले होते. श्रीरघुनाथदास बाबाजी आपल्या कुटीत बसून मधुरस्वरानी हळूहळू नाम जप करीत होते. त्याचवेळी दोघांनी बाबाजींच्या चरणी दंडवत-प्रणाम केला. बाबाजींनी मोठ्या प्रेमाने त्यांच्या डोक्यावर आपले करकमल ठेवून कुशल-क्षेम विचारून त्यांना आसनस्थ केले.

सुयोग पाहून ब्रजनाथ म्हणाले–प्रभो! आपल्या कृपेने आम्ही वैधी-भक्तीसाधनास योग्य प्रकारे समजलो आहोत. आता कृपा करून आम्हांस रागानुगा भक्तिसंबंधी उपदेश प्रदान करावा. रागानुगा भक्तीस समजण्याकरिता आमची तीव्र लालसा होत आहे.

असे ऐकून बाबाजी खूप आनंदित झाले आणि म्हणाले–श्रीगौरचन्द्राने तुम्हा दोघांना आपलेसे केले आहे. तुमच्याकरिता काहीही अदेय (न देण्यायोग्य) नाही. सावधान होऊन ऐका–मी रागानुगा भक्तीची व्याख्या करीत आहे–

सर्वप्रथम मी त्या श्रीरूप गोस्वामींच्या चरणकमळी वारंवार प्रणाम करतो, ज्यांना श्रीमन् महाप्रभूंनी मुसलमान-संगातून उद्धार करून प्रयागमध्ये रसतत्त्वाची शिकवण दिली. ज्यांना त्याच परम करुणामय श्रीगौरांग महाप्रभूंनी विषयगर्तातून उद्धारून श्रीस्वरूप दामोदर प्रभूंच्या हाती समर्पण करून सर्व सिद्धी प्रदान केल्या होत्या, त्या व्रज-रसाचे भ्रमर श्रीरघुनाथदास गोस्वामींच्या चरणी शरण घेत आहे. रागानुगा भक्तीचे विवेचन करण्याआधी रागात्मिका भक्तीचे स्वरूप सांगणे आवश्यक आहे.

ब्रजनाथ–मी सर्वप्रथम हे जाणू इच्छितो की 'राग' कशास म्हणतात?

बाबाजी–विषयी पुरुषास स्वाभाविक विषय-संसर्गापासून विषयांच्या प्रती अनेक आकारांमध्ये जी अत्यधिक प्रीती होते, त्यास राग म्हणतात. जसे सौंदर्य पाहून डोळे ज्याप्रमाणे अधीर होतात, त्याचप्रकारे येथे विषयाप्रती 'रंजकता' राहते आणि हृदयात 'राग'. जेव्हा श्रीकृष्ण त्या रागाचे एकमात्र विषय बनतात, तेव्हा त्या रागास 'रागभक्ती' म्हणतात. श्रीरूप गोस्वामींनी 'रागा'ची परिभाषा अशा प्रकारे केली

आहे–इष्टाच्या विषयी स्वारसिकी परमा-आविष्टतेस 'राग' म्हणतात; कृष्णभक्ती जेव्हा या रागमयी अवस्थेस प्राप्त होते, तेव्हा त्या भक्तीस 'रागात्मिका भक्ती' म्हणतात. संक्षेपात असे म्हणता येईल की कृष्णाच्या प्रती प्रेममयी तृष्णेस 'रागात्मिका भक्ती' असे म्हणतात. ज्याच्या हृदयात असा 'राग' उदित होत नाही, त्यास शास्त्रीय विधींच्या आचरणाद्वारेच भक्ती लाभ करण्याचा प्रयत्न करणे श्रेयस्कर आहे. वैधी भक्तीमध्ये संभ्रम (गौरव-बुद्धी), भय आणि श्रद्धा कार्य करतात. रागात्मिका भक्तीमध्ये कृष्णलीलेप्रती लोभच कार्य करीत असतो.

ब्रजनाथ–रागमयी भक्तीचा अधिकारी कोण आहे?

बाबाजी–वैधी-श्रद्धा जशी वैधी भक्तीचा अधिकार प्रदान करते, त्याचप्रमाणे लोभमयी श्रद्धा रागात्मिका भक्तीचा अधिकार प्रदान करते. व्रजवासींचा श्रीकृष्णाच्या प्रती भावच रागात्मिका भक्तीचे सर्वश्रेष्ठ उदाहरण आहे. व्रजवासींच्या श्रीकृष्णाच्या प्रती भावास लक्ष्य करून, त्यास प्राप्त करण्यासाठी ज्या सौभाग्यशाली जीवास लोभ होतो, तोच रागानुगा भक्तीचा अधिकारी आहे.

ब्रजनाथ–त्या लोभाचे लक्षण काय आहे?

बाबाजी–व्रजवासींच्या परम मधुर भावांस ऐकून त्यात प्रवेश करण्याकरिता बुद्धी ज्याची अपेक्षा करते, तीच त्या लोभाच्या उत्पन्न होण्याचे लक्षण आहे. वैधी भक्तीचा अधिकारी पुरुष कृष्ण-कथा ऐकून तिला बुद्धी, शास्त्र आणि युक्तीच्या कसोटीवर कसतो आणि या तिघांसोबत कृष्ण-कथेची संगती बसल्यावरच तो पुढे जातो. परंतु राग-मार्गात असे नसते. या मार्गात बुद्धी, शास्त्र आणि युक्तीची अपेक्षा नसते, अपेक्षा असते ती केवळ व्रजवासीजनांच्या भावाप्रती लोभाची. व्रजवासींचा कृष्णाप्रती कसा मधुर भाव होता, मलादेखील तसाच भाव प्राप्त होऊ शकतो काय, तो भाव कसा काय प्राप्त होईल, म्हणूनच तडफड होते–अशी तडफड अथवा तीव्र लालसादेखील उक्त लोभाचे लक्षण आहे. असा लोभ झाल्याशिवाय रागानुगा भक्तीमध्ये अधिकार होत नाही–असे समजावे.

ब्रजनाथ–रागानुगा भक्तीची काय प्रक्रिया असते?

बाबाजी–साधकाचा ज्या व्रजवासी (गोप वा गोपी) च्या सेवा-सौंदर्याप्रती लोभ झाला आहे, त्यास सर्वदा स्मरण करावे आणि त्याच्या प्रिय श्रीकृष्णाच्या आणि

त्या व्रजवासी (गोप वा गोपी) यांच्या परस्पर लीला-कथांमध्ये निरत होऊन स्वयं शरीराने अथवा मनाने सर्वदा व्रजधामात निवास करावा. या भावास प्राप्त करण्याच्या लोभाने आपल्या अभिलषित व्रजवासीचे अनुसरण करीत सदासर्वकाळ दोन प्रकारच्या सेवा कराव्यात, अर्थात, बाहेरून साधक रूपात सेवा आणि आतून सिद्धदेहाची भावनापूर्वक सेवा करावी. हीच रागानुगा भक्तीची प्रक्रिया आहे.

व्रजनाथ–वैधी भक्तीच्या अंगांसोबत रागानुगा भक्तीचा काय संबंध आहे?

बाबाजी–वैधी भक्तीची श्रवण-कीर्तनादी जी सर्व अंगे सांगितली गेली आहेत, ती सर्व अंगे रागानुगा-साधकाच्या साधनेतही वर्तमान राहतात. साधक व्रजजनांच्या अनुगत होऊन ज्या समयी नित्य सेवानंदाचे आस्वादन करतात, त्यांच्या बाह्य शरीरात वैधी भक्तीचे अंगसमूह लक्षित होतात.

व्रजनाथ–रागानुगाभक्तीचा महिमा सांगावा.

बाबाजी–वैधी भक्तीच्या अंगांचे निष्ठेने खूप काळापर्यंत पालन केल्यावरही जे फळ मिळत नाही, रागानुगा भक्तीद्वारे ते फळ थोड्याच काळात प्राप्त करता येते. वैध-मार्गाची भक्ती विधीच्या सापेक्ष (अपेक्षा ठेवणारी) असल्याने दुर्बळ असते आणि रागानुगा भक्ती संपूर्ण निरपेक्ष असल्याने स्वभावतः प्रबळ असते. म्हणून व्रजच्या प्रेमीजनांच्या आनुगत्याभिमान-लक्षण-भावाद्वारे जो राग उदित होतो, त्यात श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, वंदन आणि आत्मनिवेदन रूप प्रक्रिया सर्वदा अवलंबित होतात. ज्यांचे हृदय निर्गुण असते, त्यांनाच व्रजजनांच्या आनुगत्यात रुची निर्माण होते. म्हणून रागानुगा भक्तीच्या प्रती लोभ मोठाच दुर्लभ परंतु परम श्रेयाचे मूळ आहे. रागात्मिका भक्ती जितक्या प्रकारची असते, रागानुगा भक्तीसुद्धा तितक्याच प्रकारची असते.

व्रजनाथ–रागात्मिका भक्ती किती प्रकारची असते?

बाबाजी–रागात्मिका भक्ती दोन प्रकारची असते–कामरूपा आणि संबंधरूपा.

व्रजनाथ–कामरूपा आणि संबंधरूपाचा भेद स्पष्ट करावा.

बाबाजी–श्रीमद्भागवतात असे म्हटले आहे–

**कामाद्-द्वेषाद्-भयात् स्नेहाद् यथा भक्त्येश्वरे मनः।**
**आवेश्य तदघं हित्वा बहवस्तद्गतिं गताः॥**

**गोप्यः कामाद् भयात् कंसो द्वेषाच्चैद्यादयो नृपाः।**
**सम्बन्धाद् वृष्णयः स्नेहाद् यूयं भक्त्या वयं विभो॥**

(श्रीमद्भा. ११/२९/३०)

याचे तात्पर्य असे की काम, द्वेष, भय आणि स्नेहाने आपल्या मनास भक्तीमध्ये आविष्ट करून त्या त्या भावांचा दोष त्यागून अनेक मनुष्य भगवत्-गतीस प्राप्त झाले आहेत. गोपींनी कामाने, कंसाने भयाने, शिशुपाल आदी राजांनी द्वेषाने, यदुवंशींनी पारिवारिक संबंधांनी, तुम्ही पांडवांनी स्नेहाने आणि आम्ही (नारदादी) ऋषींनी भक्तीने आपल्या मनास भगवंतात लावून भगवत्-गती प्राप्त केली आहे.

काम, भय, द्वेष, संबंध, स्नेह आणि भक्ती–या सहापैकी भय आणि द्वेष–या दोन अनुकूल भावांच्या विपरीत प्रतिकूल भाव असल्याने अनुकरण योग्य नाहीत. स्नेह–एका अंशी सख्यभावाने युक्त असल्याने वैधी भक्तीच्या अंतर्गत आहे, दुसऱ्या अंशी प्रेम भावाने युक्त असल्याने साधन-राज्यामध्ये त्याची (स्नेहाची) उपयोगिता नाही. म्हणूनच रागानुगा साधनभक्तीमध्ये स्नेहाचे स्थान नाही.

भक्त्या वयं–अर्थात आम्ही भक्तीने भगवंतास प्राप्त झालेलो आहोत–यामध्ये जो भक्ती शब्द आला आहे, त्याद्वारे वैधी भक्तीस समजावे अर्थात भक्ती शब्दाने काही ठिकाणी ऋषींद्वारे स्वीकारलेली वैधी भक्ती आणि काही ठिकाणी ज्ञान-मिश्रा भक्ती समजली जावी.

तद्गतिं गताः–अर्थात बऱ्याच जणांनी भगवत्-गतीस प्राप्त केले आहे–या वाक्याचा अर्थ योग्य रितीने समजून घेणे आवश्यक आहे. किरण आणि सूर्य जशा एकच वस्तू आहेत, त्याचप्रमाणे ब्रह्म आणि कृष्ण एकच वस्तू आहेत. कृष्णाच्या अंगज्योतीचे नावच ब्रह्म आहे. ज्ञानी-भक्त ब्रह्मात लय होतात, कृष्णाचे शत्रू देखील कृष्णाद्वारे मारल्या गेल्यावर ब्रह्मात प्रवेश करतात. यापैकी कुणीकुणी सारूप्याभास प्राप्त करून ब्रह्मसुखात मग्न राहतात. ब्रह्माण्डपुराणानुसार हे मायेच्या पलीकडील सिद्धलोकात निवास करतात. सिद्धलोकात दोन प्रकारचे जीव निवास करतात–एक ज्ञानसिद्धी प्राप्त जीव, दुसरे भगवंताद्वारे मारले गेलेले असुर. ज्ञानसिद्धांपैकी कुणी-

कुणी सौभाग्यवश पूर्वोक्त 'रागा'चा आश्रय करून श्रीकृष्णाच्या चरणकमलांचे भजन करीत-करीत कृष्ण-प्रेम लाभ करतात आणि भगवंताच्या प्रियजनांच्या श्रेणीमध्ये येतात. जसे किरण आणि सूर्य एकच वस्तू आहेत, त्याचप्रकारे कृष्णकिरण-स्वरूप-ब्रह्म आणि कृष्णात वस्तुतः भेद नाही. 'तद्गतिं'–शब्दाचा अर्थ कृष्ण-गती आहे. सायुज्यमुक्तीस प्राप्त झालेले ज्ञानी आणि असुर दोघेही कृष्ण-किरण स्वरूप ब्रह्मास प्राप्त होतात. शुद्ध भक्तजन प्रेमाद्वारे मूल वस्तू श्रीकृष्णाची सेवा प्राप्त करतात. आता भय, द्वेष, स्नेह आणि भक्ती–या चौघांनाही काढून टाकल्यास काम आणि संबंध हे दोन शिल्लक राहतात. म्हणून रागमार्गात काम आणि संबंध हे दोन भावच कार्य करतात. अतः रागमयी भक्ती दोन प्रकारची असते–कामरूपा आणि संबंधरूपा.

ब्रजनाथ–कामरूपा भक्तीचे स्वरूप सांगा

बाबाजी–'काम' शब्दाने संभोग-तृष्णेचा बोध होतो, संभोग-तृष्णेचे स्वरूप रागात्मिका भक्तीच्या स्वरूपात बदलल्याने त्यात अहैतुकी प्रीतिमय स्वभाव उदित होतो अर्थात प्रीती-संभोग कृष्ण-तृष्णामयी असतो–कृष्णाच्या सुख-समृध्दीकरताच अखिल कृती केल्या जातात आणि आपल्या सुखासाठी कृतिरहित असतात, जर आपल्या सुखाची कृती असलीच तरीही ती कृष्णाच्या सुख-समृद्धीकरता स्वीकृत असते. हे अपूर्व प्रेम केवळ व्रजांगनांमध्येच विराजमान असते. व्रजगोपींचे हे प्रेम एका आश्चर्यजनक माधुरीस प्राप्त करीत त्या त्या क्रीडांस उत्पन्न करते. म्हणून प्रेम-विशेष तत्त्वास पंडितजन 'काम' म्हणतात. वास्तवात व्रजबालांचा काम अप्राकृत आणि दोष-गंधांपासून सर्वथा रहित असतो. बद्धजीवाचा काम सदोष आणि तुच्छ असतो. व्रजगोपींचे प्रेम इतके विशुद्ध आणि सर्वाकर्षक असते की उद्धवासारखे भगवंताचे परम प्रियजनदेखील त्यास प्राप्त करण्याची लालसा करतात. व्रजगोपींच्या 'कामा'च्या तुलनेचे दुसरे स्थळच नाही; केवळ तोच काम आपल्या तुलनेचे स्थळ आहे. 'कामरूपा' रागात्मिका भक्ती व्रजच्या अतिरिक्त अन्य कोठेही पहावयास मिळत नाही. मथुरेत कुब्जेमध्ये जो काम पाहिला जातो, तो वास्तवात काम नाही–रती मात्र आहे, ज्या कामाचे येथे विवेचन झाले आहे, त्याच्याशी कुब्जेचा काहीच संबंध नाही.

ब्रजनाथ–'संबंधरूपा' भक्ती कशी असते?

बाबाजी–"मी कृष्णाचा पिता आहे", "मी कृष्णाची माता आहे"–इत्यादी अभिमानाने जी कृष्णभक्ती होते, त्यास 'संबंधरूपा' भक्ती म्हणतात. व्रजामध्ये नन्दबाबा आणि यशोमती माता 'संबंधरूपा भक्ती'ची उदाहरणे आहेत. अशा प्रकारे काम आणि संबंध भावाने शुद्ध प्रेमाच्या स्वरूपास प्राप्त करता येते. म्हणून हे दोन्ही भाव नित्यसिद्ध भक्तांचे आश्रय आहेत. रागानुगा भक्तीच्या विवेचनेमध्ये यांचा केवळ उल्लेख मात्र केला गेला आहे. आता पहा, 'कामानुगा' आणि 'संबंधानुगा' भेदाने दोन प्रकारची रागानुगा साधनभक्ती असते.

व्रजनाथ–कामानुगा रागानुगा साधनभक्तीच्या संबंधी सांगावे.

बाबाजी–कामरूपा भक्तीच्या अनुगामिनी तृष्णेसच कामानुगा म्हणतात. ही दोन प्रकारची असते–संभोगेच्छामयी आणि तत्तद्भावेच्छामयी.

व्रजनाथ–संभोगेच्छामयी कशी असते?

बाबाजी–संभोगेच्छामयी केलि-तात्पर्यमयी असते. 'केलि' शब्दाचा अर्थ क्रीडा आहे. व्रजदेवींसोबत कृष्णाच्या अप्राकृत क्रीडेसच 'संभोग' म्हणतात.

व्रजनाथ–तत्तद्भावेच्छामयी कशी असते?

बाबाजी–व्रज-यूथेश्वरींचे कृष्णाप्रती जे मधुर भाव असतात, तसेच मधुर भावाची जी कामना होते, त्यास तत्तद्भावेच्छात्मिका म्हटले जाऊ शकते.

व्रजनाथ–ही दोन प्रकारची रागानुगा साधनभक्ती कशी उदित होते?

बाबाजी–श्रीकृष्णमूर्तीच्या माधुरीचे दर्शन करून आणि श्रीकृष्णाच्या मधुर लीला-कथांस श्रवण करून त्या भावांकरिता ज्यांच्या हृदयात तीव्र लालसा होते. ते लोकच कामानुगा आणि संबंधानुगा रागानुगा आणि भक्तीच्या साधनात प्रवृत्त होतात.

व्रजनाथ–श्रीकृष्ण पुरुष आहेत, व्रजदेवी प्रकृती अर्थात स्त्री आहेत–केवळ स्त्रियांचाच रागानुगा भक्तीमध्ये अधिकार पाहतो आहे, पुरुषांमध्ये हा भाव कसा काय येऊ शकतो?

बाबाजी–जगात वर्तमान असणारे जीव आपापल्या स्वभाव-भेदानुसार पाच प्रकारच्या रसांचा आश्रय घेतात. हे पाच रस आहेत–शांत, दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर–यापैकी दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर या चार रसांचे आश्रय व्रजवासीजन आहेत. दास्य, सख्य आणि पितृत्व अभिमानी वात्सल्य–हे तीन रस पुरुषांचे भाव आहेत. ज्यांची या रसांमध्ये प्रवृत्ती होते, ते पुरुष भावाने कृष्णाची सेवा करतात. मातेचे वात्सल्य आणि श्रृंगार–हे दोन स्त्री-भाव-युक्त रस आहेत. ज्यांचे चित्त या दोन रसांद्वारे विभावित होते, ते स्त्री भावाने कृष्णाची सेवा करतात. सिद्धजनांमध्ये जसे स्त्री आणि पुरुष वेगवेगळे आहेत, त्याचप्रकारे त्यांच्या अनुगत साधकांमध्ये हे दोन भाव वेगवेगळे असतात.

व्रजनाथ–पुरुष कशा प्रकारे व्रजदेवींच्या भावाने (स्त्री-भावाने) साधन करतील?

बाबाजी–अधिकार भेदाने ज्यांना श्रृंगाररसात रुची उत्पन्न झाली आहे, ते स्थूल-शरीराने पुरुष असूनही सिद्ध शरीरात स्त्री-आकारात असतात. रुची आणि स्वभावानुसार ते ज्या गोपीच्या अनुगत होण्यायोग्य असतील, तिच्या अनुगत होऊन आपल्या सिद्ध शरीराने कृष्णाची सेवा करोत. पद्मपुराणात पुरुषांच्या अशा भावांचे वर्णन सापडते. जसे–दण्डकारण्यवासी महर्षींनी श्रीरामचन्द्राचे परम सुंदर रूप पाहून पती भावाने त्यांचे भजन केले होते, ते महर्षिगणच श्रीगोकुळ लीलेमध्ये स्त्रीत्व लाभ करून (गोपी शरीरात) कामरूपा-रागमयी भक्तीद्वारे हरिसेवेत प्रवृत्त झालेत.

व्रजनाथ–आम्ही ऐकले आहे, गोकुळातल्या स्त्रिया नित्यसिद्धा आहेत, त्या कृष्ण-लीलेच्या पुष्टीकरिता व्रजामध्ये अवतीर्ण झाल्या आहेत. अशा दशेत पद्मपुराणाच्या वर्णनाची संगती कशी काय होते?

बाबाजी–नित्यसिद्धांचे कृष्णाच्या रासलीलेमध्ये सहजच गमन झाले होते. परंतु कामरूपा साधनभक्तीद्वारे सिद्ध झाल्यावर ज्यांचा गोपीच्या रूपात जन्म झाला,

त्यांनी **"वार्यमाणाः पतिभिः"** [१] (श्रीमद्भा. १०/२९/८) या श्लोकानुसार कृष्णाची मानससेवा करून अप्राकृत (जडापलीकडील चिन्मय) स्वरूप प्राप्त केले होते, या गोपी अधिकांश दण्डकारण्यातील महर्षींच होत्या.

ब्रजनाथ–नित्यसिद्धा गोपी कोण आहेत? यातील साधनसिद्धा कोणास म्हणावे?

बाबाजी–श्रीमती राधा कृष्णाची स्वरूपशक्ती आहेत. त्यांचे पहिले कायव्यूह–अष्टसखी आहेत, आणि दुसऱ्या सखींना त्यांचा क्रमशः मागील कायव्यूह समजावे. या सर्व सख्या नित्यसिद्धा आहेत. या जीवशक्तिगत तत्त्व नाहीत–स्वरूपशक्तिगत तत्त्व आहेत. व्रजातल्या सामान्य (साधारण) सख्या ज्या साधनाद्वारे सिद्ध होऊन श्रीमती राधाच्या परिकरांच्या अनुगत होतात, त्या साधनसिद्ध जीव आहेत. ल्हादिनीशक्तीचे बळ प्राप्त करून त्या व्रजातल्या नित्यसिद्धांसोबत सालोक्य प्राप्त करू शकल्या होत्या. जो जीव रागानुगामार्गाने श्रृंगाररसाची साधना करून सिद्धीस प्राप्त करतो, तो त्या साधनसिद्धा सखींची श्रेणी प्राप्त करतो. यांत ज्या रिंरसा अर्थात कृष्णासोबत रमण करण्याच्या इच्छेने केवळ विधीमार्गानेच सेवा करतात, त्या द्वारकापुरीमध्ये महिषी (राणी) ची श्रेणी प्राप्त करतात, विधिमार्गात व्रजदेवींचे आनुगत्य प्राप्त करता येत नाही. परंतु ज्या अंतःकरणाद्वारे रागमार्ग आणि शरीराने विधिमार्गाचे आचरण करतात, त्या व्रज-सेवाच प्राप्त करतात.

ब्रजनाथ–'रिंरसा ' अर्थात रमणाची वासना कशाप्रकारे पूर्ण केली जाते?

बाबाजी–ज्यांना कृष्णाप्रती महिषीभाव आवडतो, त्या धृष्टता सोडून गृहिणीप्रमाणे कृष्णाची सेवा करू इच्छितात, त्या व्रज-सुंदरीप्रमाणे सेवा करू इच्छित नाहीत.

ब्रजनाथ–कृपया याविषयास अधिक स्पष्ट करावे.

---

(१) पूर्ण श्लोक अशा प्रकारे आहे–"ता वार्यमाणाः पतिभिः पितृभिर्भ्रातृ-बन्धुभिः। गोविन्दापहृतात्मानो न न्यवर्त्तन्त मोहिताः" अर्थात पती, पिता-माता आणि बंधु-बांधव यांनी मनाई केल्यावरही (नित्यसिद्धा) गोपी थांबल्या नाहीत, कारण त्यांचे चित्त श्रीगोविन्दाद्वारे चोरले गेल्याने त्या मोहित झाल्या होत्या. येथे भागवताचा (१०/२३/२०) श्लोक देखील विवेचनीय आहे.

बाबाजी–कृष्णास आपला पती मानून जी सेवा-साधना होते, त्या सेवा-साधनेस ‘महिषी भाव’ म्हणतात. महिषी भाव प्राप्त झाल्यावर त्यांना ‘स्वकीया’ देखील म्हटले जाते. साधनकाळात ज्यांना स्वकीया अर्थात महिषी भाव राहतो, त्या व्रजदेवींच्या पारकीय रसाचा अनुभव करू शकत नाहीत आणि म्हणूनच त्या पारकीय-भावयुक्त व्रजदेवींचे अनुगमन करण्यास असमर्थ होतात. म्हणूनच पारकीय भावाने रागानुगा भक्तीचे साधन करणेच व्रजरस प्राप्तीचा हेतू आहे.

व्रजनाथ–आपल्या कृपेने मी येथपर्यंत समजलो. आता कृपया हे सांगा की ‘काम’ आणि ‘प्रेम’ यात काय भेद् आहे? जर यांत काहीच भेद् नाही तर ‘कामरूपा’ च्या बदल्यात ‘प्रेमरूपा’ म्हटल्याने काम चालत नाही काय? ‘काम’ शब्द् ऐकण्यास जरा कटू वाटतो.

बाबाजी–काम आणि प्रेम यांत काही भेद् आहे. प्रेम म्हटल्याने त्याच्यात आणि संबंधरूपा रागमयी-भक्तीत काहीच अंतर राहत नाही, दोन्ही एक होऊन जातात. संबंधरूपा भक्तीमध्ये ‘काम’ अर्थात संभोगाची इच्छा होत नाही. संबंधरूपा भक्ती केलितात्पर्यमयीदेखील नसते, तरीही ते प्रेम आहे. प्रेमात संभोगाची इच्छारूप एक प्रवृत्ती संयुक्त झाल्यावर ती भक्ती ‘कामरूपा’ म्हणविली जाते. अन्यान्य रसांमध्ये ‘कामरूपा’ भक्ती होत नाही. कामरूपा भक्ती एकमात्र श्रृंगाररसामध्येच होते आणि तीदेखील व्रजदेवींमध्येच. संसारात इंद्रिय-प्रीतिरूप जो काम आहे, तो या अप्राकृत कामापेक्षा वेगळा आहे. या जगामध्ये जो काम आहे, तो या निर्दोष अप्राकृत कामाचाच विकार आहे. कुब्जेचा भाव कृष्णाप्रती नियुक्त झाल्यावरही त्यास ‘साक्षात काम’ म्हणता येत नाही. इंद्रिय-तृप्तिकर जडीय काम जसा तुच्छ आणि परिणामामध्ये दुःखकर असतो, प्रेमांगाचा काम तसाच आनंदपूर्ण, परम उपादेय आणि नित्य सुखकर असतो. ‘प्राकृत काम’ तुच्छ आणि दोषपूर्ण असल्याने ‘अप्राकृत काम’ शब्दाचा व्यवहार (वापर) केल्याने कुठल्याही प्रकारचा संकोच होऊ नये.

व्रजनाथ–आता संबंधरूपा रागानुगा भक्तीची व्याख्या करावी.

बाबाजी–स्वतःत कृष्णाचे माता-पिता आदी संबंधांचा आरोप करण्याचे नाव ‘संबंधानुगा’ भक्ती आहे, यात दास्य, सख्य आणि वात्सल्य–या तीन रसांच्या क्रिया असू शकतात. मी सेवक आहे, कृष्ण प्रभू आहेत, मी कृष्णाचा सखा आहे, मी

कृष्णाचा पिता अथवा माता आहे–हे सगळे संबंध आहेत. संबंधानुगाभक्ती व्रजवासींमध्येच अतिशय निर्मळ रूपात असते.

ब्रजनाथ–दास्य, सख्य आणि वात्सल्यात रागानुगा भक्तीचे कशाप्रकारे अनुशीलन होते?

बाबाजी–ज्यांची दास्य-रसात रुची असते–ते रक्तक, पत्रक आदी नित्यसिद्ध दासांच्या अनुगत होऊन त्यांच्या मधुर भावांचे आणि व्यवहारांचे अनुकरण करीत कृष्णाची सेवा करतात, ज्यांची सख्य रसात रुची होते, ते कृष्णाचे प्रिय-सखा सुबल आदींपैकी कुण्या एका सख्याच्या भाव आणि कृतींचे अनुकरण करीत कृष्ण-सेवा करतात आणि ज्यांची वात्सल्य रसाप्रती रुची असते, ते नन्द अथवा यशोमतीच्या भाव आणि कृतींचे अनुकरण करीत कृष्णाची सेवा करतात.

ब्रजनाथ–भाव आणि कृतींच्या अनुकरणाचे तात्पर्य काय आहे?

बाबाजी–कृष्णाप्रती ज्यांचा जो सिद्धभाव असतो, त्यानुसार विशेष-विशेष भाव आणि कृतींचा उदय होतो. या भाव आणि कृतींसोबतच काही बाह्य-क्रियादेखील लक्षित होतात. संबंधानुगा भक्तीमध्ये साधक याच भाव, प्रयत्न आणि क्रियांस वा व्यवहारांस अनुकरण करून कृष्णाची सेवा करतात. उदाहरणार्थ नन्द महाराजांचा कृष्णाप्रती पित्याचा भाव आहे. आता पितृ-भावाने त्यांच्या कृष्णाप्रती ज्या सर्व कृती होतात, त्यांचे अनुकरण करावे. परंतु स्मरणात ठेवावे की "मी नन्द आहे, मी यशोमती आहे, मी सुबल आहे, रक्तक आहे"–अशी भावना वा चिंतन कधीच करू नये, तर आपल्या रुचि-भेदाने त्या महाजनांच्या अनुगत होऊन त्यांच्या भावांचेच अनुकरण करावे–नाहीतर अपराध होईल.

ब्रजनाथ–आम्हाला कोणत्या रागानुगा भक्तीमध्ये अधिकार आहे?

बाबाजी–बाबा! आपल्या स्वभावाविषयी विचार कर आणि त्यानुसार पाहा की तुझा अधिकार काय आहे. स्वभावानुसार जशी रुची होते, त्याच्या अनुरूप रस स्वीकार कर. त्या रसाचे अवलंबन करून त्या रसाच्या कुण्या एका नित्यसिद्ध अधिकाऱ्याचे अनुगमन करीत रहा. यात केवळ आपल्या रुचीची परीक्षा करणे आवश्यक आहे. जर तुझी रुची रागमार्गात आहे, तर आपल्या त्या रुचीनुसार कार्य कर. जोपर्यंत रागमार्गात रुची होत नाही, तोपर्यंत केवळ विधिमार्गात निष्ठा ठेव.

विजयकुमार–प्रभो! मी बऱ्याच दिवसांपासून श्रीमद्भागवताचा पाठ करतो आहे, जेथे कोठेही जातो, श्रीकृष्णाच्या लीला-कथांचे श्रवण करतो, जेव्हा कधी कृष्णलीलेचे अनुशीलन करतो, माझ्या हृदयात असा भाव होतो की मी श्रीमती ललितादेवीप्रमाणे युगुल-सेवा करावी.

बाबाजी–तुला आणखी काहीही सांगण्याची आवश्यकता नाही. तू श्रीललितेच्या अनुगत कुणी मंजरी आहेस. तुला कोणती सेवा आवडते?

विजय–माझी अशी इच्छा होते की श्रीललितादेवींनी मला पुष्पाच्या माला गुंफण्याची आज्ञा द्यावी, मी सुंदर-सुंदर कोमल-कोमल पुष्पांनी सुंदर-सुंदर हार गुंफून ते श्रीमती ललिता सखीच्या करकमलात द्यावे आणि त्यांनी माझ्याकडे कृपापूर्ण हास्यपूर्ण कटाक्षाने पाहून त्या पुष्पहारास राधा-कृष्णाच्या गळ्यात घालावे.

बाबाजी–तुझी तशी सेवा-साधना सिद्ध होवो–मी आशीर्वाद देतो. बाबाजींचा स्नेहपूर्ण आशीर्वाद ऐकून विजयकुमारचे डोळे भरून आले. ते श्रीगुरुदेवांच्या (बाबाजींच्या) चरणी पडून रडू लागले.

त्यांचा तसा भाव पाहून बाबाजी म्हणाले, बाबा! तू निरंतर त्याच भावाने रागानुगा भक्तीचे साधन कर आणि बाहेरून वैधी-भक्तीच्या साधन-अंगांचे नियमितपणे आचरण करीत राहा.

विजयकुमारची संपत्ती पाहून ब्रजनाथ हात जोडून नम्रतापूर्वक म्हणाले–प्रभो! मी जेव्हा कधी श्रीकृष्ण-लीलेचे अनुशीलन करतो, सुबलच्या अनुगत राहून कृष्णाची सेवा करण्याची माझी इच्छा होते.

बाबाजी–तुला कोणती सेवा आवडते?

ब्रजनाथ–जेव्हा वासरे चरतचरत दूर निघून जातात, तेव्हा सुबल सख्यासोबत त्या वासरांना परतवून आणणे मला खूप आवडते. कृष्णाने एका ठिकाणी बासरी वाजवीत रहावे आणि मी सुबलच्या आज्ञेने वासरांस पाणी पाजून बंधू कृष्णाच्या निकट त्यांना आणावे–अशी माझी इच्छा होते.

बाबाजी–मी आशीर्वाद देतो–तू सुबलच्या अनुगत होऊन कृष्णाची सेवा करावीस; तू सख्य रसाचा अधिकारी हो.

आश्चर्याची गोष्ट घडली. त्या दिवसापासून विजयकुमारच्या चित्तात श्रीमती ललितेची दासी होण्याचा भाव उपस्थित झाला; ते वृद्ध बाबाजींस श्रीललितेच्या रूपात दर्शन करू लागले.

विजयकुमार म्हणाले–प्रभो! याविषयी आणखी काय जाणणे बाकी आहे? कृपया जाणण्याची आज्ञा करावी.

बाबाजी–आणखी काहीच बाकी नाही; केवळ तुमच्या सिद्ध-शरीराचे नाम, रूप, वसन आदी तुम्हाला जाणणे आवश्यक आहे. तू कधी एकटा ये, मी तुला सांगेन.

जशी आज्ञा–विजयकुमारने दंडवत-प्रणाम करता करता उत्तर दिले.

ब्रजनाथ त्या दिवसापासून बाबाजींस सुबलच्या रूपात पाहू लागला. बाबाजींनी ब्रजनाथास म्हटले–तूदेखील कधीतरी एकटाच माझ्याकडे ये, मी तुझे सिद्धनाम, रूप आणि वसन-भूषण तुला सांगेन.

ब्रजनाथ दंडवत प्रणाम करता-करता म्हणाले, जशी आज्ञा.

ब्रजनाथ आणि विजयकुमारने स्वतःस कृत-कृतार्थ मानले आणि त्या दिवसापासून ते परमानंदाने, रागानुगामार्गाच्या सेवेत नियुक्त झाले. बाहेरून सर्वकाही पहिल्यासारखेच राहिले; परंतु अंतरीचा भाव पलटला. विजयकुमारचा बाहेरील व्यवहार पुरुषाप्रमाणेच राहिला, परंतु अंतरात स्त्री-भाव उदित झाला. ब्रजनाथाच्या अंतरात गोप-बालकाचा स्वभाव निर्माण झाला.

रात्र अधिक झाली होती. दोघेही हरिनामाच्या माळेवर–**"हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे।हरे राम हरे राम राम राम हरे हरे॥"**–गुरूंनी दिलेल्या या नाम रूप महामंत्राचे गान करीत करीत घरी परतले. रात्रीचे बारा वाजले होते. चन्द्राचा सुंदर प्रकाश जणू चांदीच्या राशींचा वर्षाव करीत होता. मनमोहक मलयानिल मस्त होऊन वाहत होता. लक्ष्मण-टेकडीजवळ सुंदर आणि निर्जन स्थानी एका आवळ्याच्या झाडाखाली बसून दोघे संभाषण करू लागले.

विजयकुमार–ब्रजनाथ! आपल्या मनीचे साध्य पूर्ण झाले. वैष्णवांच्या कृपेने आपल्यावर अवश्यच श्रीकृष्णाची कृपा होणार. आता हा विचार करायचा आहे की

आपल्याला पुढे काय करायचे आहे? ब्रजनाथ! तू सरल चित्ताने मला हे सांग की तुला काय करावेसे वाटते? विवाह करायचा आहे की परिव्राजक (संन्यासी) बनायचे आहे? मी याविषयी तुझ्यावर कोणत्याही प्रकारचा दबाव टाकू इच्छित नाही. तुझ्या आईस समजावण्याकरिता केवळ तुझ्या मनातली गोष्ट मात्र जाणू इच्छितो.

ब्रजनाथ–मामा! आपण माझ्या भक्तीचे पात्र आहात; त्यावरही पंडित आणि वैष्णव आहात; वडिलांच्या अभावात आपणच घराचे मालक आहात; आपण जशी आज्ञा द्याल, मी त्या पथावर चालण्यास तयार आहे. विवाह केल्यावर संसारात आसक्त होऊन परमार्थातून च्युत होऊन न जाऊ, म्हणून विवाह करण्यास जीव घाबरतो. आपला काय विचार आहे?

विजय–मी याविषयी तुझ्यावर कोणतेही दडपण आणू इच्छित नाही; तू स्वतःच विचार करून सांग.

ब्रजनाथ–माझ्या मते श्रीगुरुदेवांची आज्ञा घेऊन कार्य करणेच योग्य आहे.

विजय–ठीक आहे. उद्या प्रभुपादांकडे याविषयी आज्ञा घेईन.

ब्रजनाथ–मामा! आपला काय विचार आहे? आपण गृहस्थ राहाल की परिव्राजक?

विजय–बाबा! माझाही तुझ्याप्रमाणेच अजून अस्थिर सिद्धांत आहे. कधी विचार करतो, गृहस्थ धर्मास तिलांजली देऊन परिव्राजक होऊन जाऊ आणि कधी विचार करतो, असे केल्याने कदाचित असे तर नाही ना होणार की हृदय शुष्क होऊन जावे आणि भक्तरसातूनही वंचित व्हावे लागेल. म्हणूनच याविषयी श्रीगुरुदेवांच्या आज्ञेनुसारच कार्य करणे योग्य वाटते मला. ते जशी आज्ञा देतील, तसेच करीन.

रात्र खूप झाली म्हणून मामा-भागिनेय हरिनाम करताकरता घरी परतले आणि प्रसाद घेऊन झोपी गेले.

**॥ एकविसावा अध्याय समाप्त ॥**



# बाविसावा अध्याय (प्रमेयांतर्गत प्रयोजनतत्त्वाचा विचार आरंभ)

आज एकादशी आहे. श्रीवास-अंगणात बकुळाच्या झाडाखाली चांगल्याच ऐसपेस कट्ट्यावर वैष्णवजन कीर्तन करीत आहेत. कुणी-कुणी हा गौरांग! हा नित्यानन्द! म्हणत मोठ्ठे श्वास भरत आहेत. आमचे वृद्ध बाबाजी महाशय न जाणो कुठल्या भावात विभोर आहेत! पाहता पाहता ते बिलकुल निःस्तब्ध झाले आणि काही वेळानंतर "हा धिक्!" म्हणत मोठमोठ्याने रडू लागले. "हाय! माझे रूप कुठे आहेत? माझे सनातन कुठे आहेत? माझे दास-गोस्वामी कुठे आहेत? माझे प्राणप्रिय सहोदर कृष्णदास कविराज मला एकटे सोडून कोठे निघून गेले? हाय! त्यांचे वियोग-दुःख सहन करण्याकरिता मी आजही जीवित आहे. मला काहीही बरे वाटत नाही. श्रीराधाकुण्डाचे ध्यानही मला कष्टप्रद प्रतीत होते. माझे प्राण तडफडत आहेत. रूप-सनातन यांनी दर्शन देऊन माझ्या विकल प्राणांचे रक्षण करावे. त्यांचा वियोग झाल्यावरही माझे प्राण गेले नाहीत, माझा धिक्कार आहे." अशा प्रकारे बोलता बोलता ते अंगणाच्या धुळीत लोळू लागले.

उपस्थित वैष्णव म्हणाले—बाबाजी! आपण शांत व्हा, रूप-रघुनाथ आपल्या हृदयातच आहेत. श्रीचैतन्य महाप्रभू आणि नित्यानन्द प्रभू आपल्यासमोर नृत्य करीत आहेत.

"ऐं! ऐं कुठे!" बाबाजी टुणकन उडी मारून उभे राहिले. समोर श्रीचैतन्य महाप्रभू, श्रीनित्यानन्द प्रभू, श्री अद्वैत प्रभू, श्रीगदाधर आणि श्रीनिवास आदी भक्तजनांस कीर्तन करताना पाहिले. ते सर्व महाभावात विभोर होऊन नृत्य करीत होते. या दृश्यास पाहून ते म्हणाले—"धन्य मायापूर! व्रजाचा शोक केवळ मायापुरातच दूर होतो." दृश्य अंतर्धान झाल्यावर ते खूप वेळापर्यंत नृत्य करीत राहिले. नंतर शांत होऊन आपल्या कुटीत बसले.

बाबाजी नुकतेच बसले होते, तितक्यात विजयकुमार आणि व्रजनाथाने त्यांच्या चरणांवर पडून प्रणाम केला. त्यांना पाहून बाबाजी मोठे प्रसन्न झाले आणि म्हणाले—तुम्हा लोकांचे भजन कसे चालले आहे?

दोघांनी हात जोडीत विनयपूर्वक म्हटले–प्रभो! आपली कृपा हवी! आपली कृपाच आमचे सर्वस्व आहे. जन्मजन्मांतरीच्या संचित सुकृती राशीमुळेच आम्ही अनायसेच आपल्या चरणकमळी स्थान प्राप्त केले आहे, आज एकादशी आहे, आपल्या आज्ञेनुसार आम्ही निर्जल उपवास ठेवून आपल्या दर्शनाकरिता आलो आहोत.

बाबाजी–तुम्ही लोक धन्य आहात. लवकरच भावावस्था प्राप्त कराल.

विजयकुमार–प्रभो! भावावस्था कशास म्हणतात? आपण तर आम्हाला अजूनपर्यंत 'भावावस्थे'च्यासंबंधी काहीच सांगितले नाहीत. सांगण्याची कृपा करा.

बाबाजी–मी आत्तापर्यंत तुम्हा दोघांना साधनाच्या विषयीच उपदेश दिला आहे. साधन करता-करता सिद्धावस्था येते. त्या सिद्धावस्थेचा प्रागभावच (पूर्वाभासच) भाव आहे, श्रीदशमूलात सिद्धावस्थेचे वर्णन अशा प्रकारे केले आहे–

**स्वरूपावस्थाने मधुररसभावोदय इह**
**ब्रजे राधाकृष्णस्वजनजनभावं हृदि वहन्।**
**परानन्दे प्रीतिं जगदतुलसम्पत् सुखमहो**
**विलासाख्ये तत्त्वे परमपरिचर्यां स लभते॥**

(दशमूल १०क)

अर्थात–साधनभक्तीच्या परिपक्व अवस्थेमध्ये जीव जेव्हा आपल्या स्वरूपात अवस्थित होतो, तेव्हा ल्हादिनीशक्तीच्या प्रभावाने त्यात मधुर रसाचा भाव उदित होतो–अर्थात त्याच्या हृदयात व्रजामध्ये श्रीराधा-कृष्णाच्या स्वजन-परिजनांच्या अनुगत होण्याचा भाव उदित होतो. क्रमशः जगात अतुल संपद-सुख आणि विलासाख्य परानंद तत्त्वाची सेवादेखील त्यास प्राप्त होते. जिवास यापेक्षा अधिक कुठलाच लाभ होऊ शकत नाही.

या श्लोकात प्रयोजनरूप प्रेमावस्थेचे वर्णन आहे. प्रेमावस्थेची प्रथम अवस्थाच भाव आहे–

**प्रभुः कः को जीवः कथमिदमचिद्विश्वमिति वा**
**विचार्यैतानर्थान् हरिभजन कृच्छास्त्रचतुरः।**

**अभेदाशां धर्म्मान् सकलमपराधं परिहरन्**
**हरेर्नामानन्दं पिबति हरिदासो हरिजनैः ॥**

(दशमूल १० ख)

अर्थात, कृष्ण कोण आहेत? मी (जीव) कोण आहे? हे चित्-अचित् विश्व काय आहे? या विषयांचे विवेचन करून हरिभजनपरायण, शास्त्र-विषयांत कुशल व्यक्ती अभेदाची आशा, समस्त प्रकारचे धर्म-अधर्म आणि अपराधांचे वर्जन करून सत्संगामध्ये राहून स्वतःस हरीचा दास समजत हरिनामानंदाचे आस्वादन करतात.

हा दशमूल एक अपूर्व सुंदर संग्रह आहे. श्रीमन् महाप्रभूंच्या सर्व शिकवणी या दशमूलात घागरीत सागराप्रमाणे भरलेल्या आहेत.

विजय–मी दशमूलाचे संक्षिप्त माहात्म्य ऐकू इच्छितो–

बाबाजी–श्रवण कर–

**संसेव्य दशमूलं वै हित्वाऽविद्याऽमयं जनः।**
**भावपुष्टिं तथा तुष्टिं लभते साधुसंगतः ॥**

(दशमूल माहात्म्य)

अर्थात–या दशमूलाचे सेवन केल्याने जिवाचा अविद्यारूपी रोग मूळापासून दूर होतो आणि त्या नंतर तो जीव साधुसंगाद्वारे पुष्टी आणि तुष्टी लाभ करतो.

विजय–प्रभो! हा अपूर्व दशमूल आम्हा सर्वांच्या गळ्याचा कंठहार होवो. आम्ही प्रतिदिनी या दशमूलाचा पाठ करून श्रीमन् महाप्रभूंस प्रणाम करू. आता कृपया 'भावतत्त्वा'स विस्ताराने स्पष्ट करा.

बाबाजी–जर प्रेमास सूर्य मानले तर प्रेमरूप सूर्याचा अंश शुद्ध सत्त्व-विशेषरूप-तत्त्वच–'भाव' आहे.

शुद्धसत्त्व-विशेष-स्वरूपच भावाचे स्वरूपलक्षण आहे. भावाचे दुसरे नाव 'रती' आहे. भावास कुणीकुणी 'प्रेमांकुर ' देखील म्हणतात. सर्व-प्रकाशिका स्वरूपशक्तीच्या सम्वित् नामक वृत्तीस शुद्धसत्त्व म्हटले जाऊ शकते–ती मायेची

वृत्ती नाही. त्या सम्वित् नामक वृत्तीसोबत ल्हादिनी-वृत्ती मिलित झाल्यावर त्यांच्या सार-अंशासच 'भाव' म्हटले जाते.

सम्वित्-वृत्तीद्वारे वस्तूचे ज्ञान होते आणि ल्हादिनी-वृत्तीद्वारे वस्तू आस्वादित होते. कृष्णच परम वस्तू आहेत. कृष्णरूप परम-वस्तूस स्वरूपशक्तीच्या सर्व-प्रकाशिका-वृत्तीमुळे जाणता येते. त्यांना जीवशक्तीच्या सम्वित्–वृत्तीने जाणता येऊ शकत नाही. भगवंताच्या कृपेने अथवा भक्ताच्या कृपेने जेव्हा जिवाच्या हृदयात स्वरूपशक्तीचा आविर्भाव होतो, तेव्हा जिवाच्या हृदयात स्वरूपशक्तीची सम्वित्-वृत्ती काम करते, असे झाल्यावरच चित्-जगाचे ज्ञान प्रकाशित होते. चित्-जगाचे स्वरूपच शुद्धसत्त्व आहे, मायिक जगाचे स्वरूप, सत्त्व, रज आणि तम गुणांनी मिश्रित स्थूलतत्त्व आहे. या चित्-जगाच्या ज्ञानासोबत ल्हादिनीचे सार मिलित झाल्यावर चित्-जगाचा मधुरास्वाद उदित होतो. तोच आस्वाद पूर्ण रूपाने उदित झाल्यावर 'प्रेम' म्हणविला जातो.

जर प्रेमास सूर्य मानले गेले तर भाव–त्याचे किरण आहेत. भावाच्या स्वरूपाचा हाच परिचय आहे. भावाची विशेषता ही आहे की तो जिवाच्या हृदयास पवित्र करून अतिशय मसृण अर्थात कोमल बनवितो. 'रुची' शब्दाने प्राप्ति-अभिलाष, आनुकूल्याभिलाष आणि सौहार्दाभिलाषाचा बोध होतो. भावास प्रेमाचे प्रथम चित्र म्हणता येईल. 'मसृण' शब्दाने चित्ताची आर्द्रता–कोमलता समजावी. तंत्रामध्ये प्रेमाच्या प्रारंभिक अवस्थेस 'भाव' म्हटले गेले आहे. भावाचा उदय झाल्यावर पुलक आदी सात्त्विक विकारसमूह अल्प मात्रेमध्ये प्रकाशित होतात. नित्य-सिद्धांमध्ये भाव स्वतःसिद्ध असतो. तोच भाव बद्धजिवाच्या मनोवृत्तीवर आविर्भूत होऊन मनोवृत्तीच्या स्वरूपतेस प्राप्त होतो. म्हणून स्वयं प्रकाश रूप असूनही प्रकाश्याप्रमाणे अर्थात आधी नव्हता, आता निर्माण झाला, असाच भासतो. भावाचे स्वाभाविक कार्यच कृष्णस्वरूप आणि कृष्णलीलेच्या स्वरूपास प्रकाशित करणे आहे; मनोवृत्तीच्या रूपात प्रकाशित राहूनही तो दुसऱ्या प्रकारच्या ज्ञानाद्वारे प्रकाश्याप्रमाणे भाव धारण करीत असतो. वास्तविक रती स्वयं आस्वादन-स्वरूपा असते आणि तसे असूनही ती बद्धजिवांकरिता कृष्ण आणि कृष्णलीला आस्वादनाच्या हेतूरूपात दिसून येते.

ब्रजनाथ–भाव किती प्रकारचे असतात?

बाबाजी–उत्पत्ती भेदाने भाव दोन प्रकारचे असतात–(१) ’साधनाभिनिवेशज’ भाव आणि (२) कृष्ण आणि कृष्णभक्ताचा ‘प्रसादज’ भाव. साधारणपणे साधनाभिनिवेशज भावच लक्षित होतो, प्रसादज-भाव विरळाच पहावयास मिळतो.

ब्रजनाथ–साधनाभिनिवेशज–भाव कशास म्हणतात?

बाबाजी–वैधी आणि रागानुगामार्गाच्या भेदाने साधनाभिनिवेशज भाव दोन प्रकारचा असतो. साधनाभिनिवेशज-भाव सर्वप्रथम रुचीस उत्पन्न करतो, पश्चात भगवंताप्रती आसक्ती आणि शेवटी रतीस उत्पन्न करतो. पुराणांत आणि नाट्यशास्त्रांत रती आणि भावास एक मानले गेले असल्याने मीदेखील दोघांना एकच मानतो आहे. वैधीभक्ती-साधनाभिनिवेशज अवस्थेत श्रद्धा प्रथम निष्ठेस उत्पन्न करते आणि मग निष्ठा रुचीस निर्माण करते. परंतु रागानुगाभक्तीच्या साधनज-भावात एकाच वेळेस रुची उत्पन्न होते.

ब्रजनाथ–श्रीकृष्ण आणि कृष्णभक्त-प्रसादज-भाव कशास म्हणतात?

बाबाजी–कुठल्याही प्रकारच्या साधनाशिवाय जो भाव अकस्मात उदित होतो, त्यास कृष्ण प्रसादज भाव वा कृष्णभक्त प्रसादज-भाव म्हणतात.

ब्रजनाथ–श्रीकृष्ण-प्रसादज-भावाची व्याख्या करावी.

बाबाजी–कृष्ण-प्रसाद (कृपा) तीन प्रकारचा असतो–(१) वाचिक, (२) आलोक दान आणि (३) हार्द. कृष्ण कुण्या ब्राह्मणावर कृपा करताना म्हणाले–“ हे द्विजेन्द्र! सर्वश्रेष्ठ मंगलास प्रदान करणारी पूर्णानंदमयी अव्याभिचारिणी माझी भक्ती तुझ्यात उदित होवो.”–असे म्हणताच त्याच्या हृदयात (वाचिक प्रसादज) भाव उदित झाला.

वनात राहणाऱ्या ऋषींनी यापूर्वी कृष्णास कधी पाहिले नव्हते. आज कृष्णाचे दर्शन करताच त्यांच्या हृदयात भाव उत्पन्न झाला. हा कृष्णकृपेचाच प्रभाव होता. हे आलोकदानज-भावाचे उदाहरण आहे.

अंतःकरणात जो प्रसाद उदित होतो, त्याचे नाव ‘हार्दभाव’ आहे. हार्द-भावाचे उदाहरण श्रीशुक आदी भगवद्भक्तांच्या जीवन-चरित्रात प्राप्त करता येते.

श्रीमन् महाप्रभूंच्या अवतारात हे तिन्ही प्रसादज-भाव अनेक स्थानी दिसून येतात. श्रीमन् महाप्रभूंस पाहून असंख्य लोकांमध्ये भावोदय झाला होता. जगाई मधाई आदींनी वाचिक प्रसादज-भाव प्राप्त केला होता, जीवगोस्वामी आदींनी आन्तर प्रसादज-भाव प्राप्त केला होता.

ब्रजनाथ–तद्भक्त प्रसादज-भाव कशास म्हणतात?

बाबाजी–श्रीनारदमुनींच्या कृपेने ध्रुव आणि प्रल्हादास भगवद्भाव प्राप्त झाला होता. श्रीरूप-सनातन आदी पार्षदांच्या कृपेने असंख्य लोकांच्या हृदयात भक्तीचे भाव उदित झाले होते.

विजय–भावोदय होण्याची लक्षणे कोणती?

बाबाजी–भावोदय झाल्यावर साधकात क्षांती (क्षमा), अव्यर्थकालत्व, विरक्ती, मानशून्यता, आशाबंध, उत्कंठा, नामकीर्तनात रुची, कृष्णाच्या गुणगानात रुची आणि कृष्णाच्या लीलास्थळांमध्ये प्रीती–ही सर्व लक्षणे दिसू लागतात.

विजय–क्षांती कशास म्हणतात?

बाबाजी–क्रोध अथवा चित्त-चांचल्याचे कारण उपस्थित झाल्यावरही शांत राहण्यास क्षांती म्हणतात; क्षांतीस 'क्षमा' म्हणता येऊ शकेल.

विजय–अव्यर्थकालत्व कशास म्हणतात?

बाबाजी–समय व्यर्थ जाऊ नये, म्हणून निरंतर हरिभजनात तत्पर राहण्याचे नाव अव्यर्थकालत्व आहे.

विजय–विरक्तीचे तात्पर्य सांगावे.

बाबाजी–विषय-सुखांप्रती इंद्रियांच्या अरुचीस 'विरक्ती' म्हणतात.

विजय–ज्या लोकांनी 'वेष' घेतला आहे, ते स्वतःस विरक्त म्हणू शकतात की नाही?

बाबाजी–वेष एक लौकिक व्यापार आहे. हृदयात भाव उदित झाल्यावर चित्-जगाप्रती प्रबळ रूपात रुची होते आणि जड-जगाप्रती जी रुची होती, ती

हळूहळू कमी होत जाते तथा शेवटी जेव्हा भाव पूर्ण रूपात प्रकाशित होतो तेव्हा जड रूचीदेखील शून्यप्राय होते. याचेच नाव विरक्ती आहे. विरक्ती प्राप्त झाल्यानंतर आपल्या आवश्यकतांस कमी करण्याच्या उद्देशाने जे वैष्णव वेष घेतात, त्यांना 'विरक्त वैष्णव' म्हटले जाते. जे लोक भाव उदय होण्याच्या पूर्वीच 'वेष' घेतात, त्यांचा वेष अवैध आहे, अर्थात तो 'वेष' वेष नसतोच. श्रीमन् महाप्रभूंनी छोट्या हरिदासास दण्ड देतांना जगास हीच शिकवण दिली आहे.

विजयकुमार–मानशून्यता कशास म्हणतात?

बाबाजी–धन, बल, रूप, उच्च पद, उच्च जाती आणि उच्च कूळ आदींमुळे अभिमान निर्माण होतो. यांच्या वर्तमान राहण्यानेही ज्यांना अभिमान होत नाही, ते 'मानशून्य' आहेत. पद्मपुराणात मानशून्यतेचे मोठे सुंदर उदाहरण आहे. एक मोठे प्रतिभाशाली सम्राट होते. मोठमोठे राजे त्यांच्या अधीन होते. परंतु सौभाग्यवश राज्याच्या हृदयात कृष्णभक्ती उदित झाली. ते आपल्या विराट ऐश्वर्य आणि सम्राट-पदाचा अभिमान सोडून शत्रुच्या नगरात माधुकरी भिक्षेद्वारे आपला जीवन-निर्वाह करू लागले. ब्राह्मण आणि शत्रू सर्वांस नमस्कार करू लागले.

विजय–आशाबंध कशास म्हणतात?

बाबाजी–कृष्ण माझ्यावर अवश्यच कृपा करतील–अशा प्रकारे दृढ विश्वासासोबत भजनात मन लावण्याचे नाव 'आशाबंध' आहे.

विजय–उत्कंठा कशास म्हणतात?

बाबाजी–आपल्या मनोरथाच्या प्राप्तीकरिता अत्याधिक लोभ असल्यावर त्यास 'उत्कंठा' म्हणतात.

विजय–'नामकीर्तनात रुची' कशास म्हणतात?

बाबाजी–जितक्या प्रकारची भजने आहेत, त्या सर्वांत श्रीनाम-भजनच सर्वश्रेष्ठ आहे, या विश्वासासोबत निरंतर हरिनाम घेण्यास 'नामकीर्तनात रुची' म्हणता येते. श्रीनामात रुची होणे परम श्रेयाच्या प्राप्तीची किल्ली आहे. नामतत्त्वासंबंधी दुसऱ्या दिवशी समजावून घे.

विजय–कृष्णाच्या गुणगानात आसक्ती कशास म्हणतात?

बाबाजी–श्रीकृष्णकर्णामृतात म्हटले आहे–

**माधुर्यादपि मधुरं मन्मथता तस्य किमपि कैशोरम्।**
**चापल्यादपि चपलं चेतो वत हरति हन्त किं कुर्मः॥**[१]

श्रीकृष्णाच्या गुणावलीस कितीही वेळा ऐकले, तरी तृप्ती होत नाही आणि अधिक ऐकण्याची इच्छा होते–आसक्ती वाढत जाते.

विजय–कृष्णाच्या लीलास्थळांमध्ये प्रीती कशी होते?

बाबाजी–जेव्हा कुणी भक्त श्रीनवद्वीपधामाची परिक्रमा करतात, तेव्हा ते विचारतात–हे धामवासींनो! आमच्या प्राणप्रिय प्रभूंचा जन्म कोठे झाला होता? महाप्रभूंचे कीर्तनमंडळ कुठल्या मार्गाने गेले होते? कृपा करून हेही सांगावे की प्रभूंनी गोपांसोबत कुठल्या स्थानी पूर्वान्ह लीला केली होती? धामवासी उत्तर देतात–हे स्थान जेथे आम्ही आहोत, श्रीमायापूर आहे. समोर तुलसीकाननाने वेढलेले जे उंच स्थान दिसत आहे, तेथेच श्रीमन् महाप्रभूंचा जन्म झाला होता. पाहा, हे गंगानगर, सिमुलिया, गादिगाछा मजिदा आदी ग्राम आहेत; याच ग्रामांतून श्रीमन् महाप्रभूंचे सर्वप्रथम संकीर्तन मंडळ निघाले होते. गौडवासियांच्या मुखातून प्रेमाने अशा मधुर गोष्टी ऐकून त्यांच्या शरीरावर रोमांच उठतात, हृदय आनंदाने गद्‌गद होऊन जाते तथा नेत्रांतून अश्रुबिंदू झरू लागतात. अशा प्रकारे ते महाप्रभूंच्या सर्व लीलास्थळांची परिक्रमा करतात–यालाच 'तद्वसति स्थले प्रीति' अर्थात–'भगवत्-लीलास्थळांमध्ये प्रीती' म्हणतात.

ब्रजनाथ–जेथे अशा प्रकारचे भाव दिसून येतात, तेथे काय असे समजावे की त्या व्यक्तीमध्ये कृष्णाच्या प्रती रती उदित झाली आहे?

---

(१) माधुर्याहूनही अधिक मधुर, चापल्याहूनही अधिक चपळ श्रीकृष्णाचा मन्मथ धर्मयुक्त कुठला अनिर्वचनीय भाव माझ्या चित्तास हरण करीत आहे. हाय! मी काय करू?

बाबाजी–नाही! सरळरूपात श्रीकृष्णाप्रती जे भाव उदित होतात, त्याचेच नाव 'रती' आहे. असे भाव दुसऱ्या जागी लक्षित झाल्यावरही त्यास रती म्हटले जात नाही.

ब्रजनाथ–कृपया एकदोन उदाहरण देऊन या विषयास आणखी अधिक स्पष्ट करावे.

बाबाजी–समजा एखादी व्यक्ती मुक्तीची कामना करते. निराकार ब्रह्माची शुष्क आणि कष्टप्रद उपासना त्यास दुःखदायी वाटू लागली. त्याने कोठून तरी ऐकले की भगवन्नामाचे उच्चारण केल्याने ती मुक्ती अत्यंत सहजच सुलभ होते, अजामिळ आदींनी भगवन्नामाचे उच्चारण करून मोठ्या सहजपणे मुक्ती प्राप्त केली आहे. हे ऐकून तो मोठा आनंदित झाला आणि नामाच्या मुक्ती देण्याच्या शक्तीचे स्मरण करीत सहजच मुक्ती मिळेल म्हणून आनंदाने विव्हळ होऊन रडतरडत नामोच्चारणपूर्वक अचेतन होऊन कोसळला. येथे या मुक्तिकामी साधकाद्वारे उच्चारित नाम शुद्ध नाम नाही आणि त्याचा तो भावही कृष्णरती (शुद्धभाव) नाही. कारण कृष्णाप्रती त्याचा 'सरल भाव' नाही. त्याचे मूळ उद्देश्य मुक्ती प्राप्त करणे आहे; कृष्णप्रेम नाही. त्याच्याद्वारे उच्चारित नाम–नामाभास आहे तथा त्याचा भाव–भावाभास आहे. याचे उदाहरण–कुणी विषयभोगाची कामना करणारी व्यक्ती दुर्गादेवीची पूजा करून "वरं देहि, धनं देहि" आदी प्रार्थना करतो आणि "दुर्गादेवी प्रसन्न होऊन माझी मनोकामना शीघ्रच पूर्ण करेल"–असा विचार करून रडतरडत देवीसमोर 'हा दुर्गे'–म्हणत गडाबडा लोळतो. येथे या व्यक्तीचे रडणे आणि पडणे आदींमध्ये जो भाव दिसून येतो, तो भाव शुद्ध नाही, उलट कुठेकुठे तो 'भावाभास' आणि कुठेकुठे तो 'कुभाव' म्हणविला जातो. शुद्ध कृष्णभजनाशिवाय 'भाव' उदय होत नाही. कृष्णाच्या संबधित भावासही कुभाव किंवा भावाभासच म्हणता येईल, जर त्याचे उद्दीष्ट भोग वा मोक्ष असेल तर. मायावादाने दूषित हृदयात कसल्याही प्रकारचे भाव का न उत्पन्न होत, त्या सर्व भावांस 'कुभाव'च म्हटले जाईल. अशी व्यक्ती जरी सात प्रहरांपर्यंत अचेतन पडून राहिली, तरीदेखील त्यास भाव म्हणता येणार नाही. हाय! समस्त प्रकारच्या कामनांतून मुक्त आणि परममुक्त जनदेखील ज्याचे निरंतर अनुसंधान करतात आणि अत्यंत भजनशील व्यक्तीसही कृष्ण ज्यास परमगोप्य असल्याने सहजच देत नाहीत, ती 'भगवती-रती' शुद्धभक्ति-शून्य आणि भोग मोक्षाची कामनारूपी चिखलाने भरलेल्या हृदयात कशी काय उदित होऊ शकते?

ब्रजनाथ–प्रभो! अनेक स्थळी असे पाहिले जाते की विषय-भोग आणि मुक्ति–कामींच्या शरीरात हरिनाम संकीर्तन करता-करता पूर्वोक्त भावांची लक्षणसमूहे उदित होतात, त्यांना काय म्हणावे?

बाबाजी–अशा लोकांमध्ये भावाच्या बाह्य लक्षणांस पाहून केवळ मूर्ख लोकच आश्चर्य प्रकट करतात. परंतु जे लोक भावतत्त्वास नीट समजतात, ते अशा भावांस 'रत्याभास म्हणतात आणि यापासून सर्वदा दूर राहतात.

विजय–हा रत्याभ्यास किती प्रकारचा असतो?

बाबाजी–दोन प्रकारचा–प्रतिबिंब-रत्याभ्यास आणि छाया-रत्याभ्यास.

विजय–प्रतिबिंब-रत्याभ्यास कशास म्हणतात?

बाबाजी–जे लोक मुक्तीची कामना ठेवतात, ते असा विचार करतात की ब्रह्मज्ञानाशिवाय मुक्ती मिळत नाही, परंतु ब्रह्मज्ञानाची साधना मोठी कठीण आणि कष्टदायिनी आहे. अशा दशेत जर केवळ हरिनाम केल्यानेच ती मुक्ती प्राप्त होईल तर अत्यंत सहजपणे आणि विनासायासच ब्रह्मज्ञान प्राप्त होईल. असा विचार करून कष्ट सहन केल्याशिवायच मुक्ती प्राप्त करण्याच्या आशेने परमानंदित होऊन त्यांच्या शरीरात अश्रु-पुलक आदी विकारांचे आभासमात्र उदित होतात. अशा अश्रु-पुलकादी भाव-विकारांस 'प्रतिबिंबाभास' म्हणतात.

ब्रजनाथ–यास प्रतिबिंब का म्हटले गेले आहे?

बाबाजी–विषय-भोग आणि मोक्ष प्राप्त करणाऱ्यांस जर सौभाग्याने कधी काळी सत्संग प्राप्त होतो, तर तेही भगवन्नाम कीर्तन आदी करू लागतात आणि त्यावेळी शुद्धभक्ताच्या हृदय-आकाशात उदित भाव-चन्द्राचा काही ना काही आभास त्या मुक्ति-पिपासूच्या हृदयातही उदित होतो, याचेच नाव 'प्रतिबिंब' आहे. भोग आणि मोक्षाची इच्छा करणाऱ्यांच्या हृदयात 'शुद्धभाव' कदापि उदित होत नाही. शुद्धभक्तांचा भाव पाहून त्यांचा भावाभास उदित होतो. या भावाभासाचे नाव प्रतिबिंबाभास आहे. प्रतिबिंब भावाभास प्रायः जीवांचे नित्यकल्याण उत्पन्न करीत नाही, केवळ भोग आणि मोक्ष प्रदान करून दूर होऊन जातो. अशा भावाभासास एका प्रकाराने नामापराधच म्हणावे लागेल.

ब्रजनाथ–छाया-भावाभासाचे स्वरूप सांगा.

बाबाजी–आत्मतत्त्वापासून अपरिचित सरल कनिष्ठ भक्तजनांची भगवत्प्रिय क्रिया, काल, देश आणि पात्र आदींच्या संगाने रतीच्या लक्षणांसमान क्षुद्र, कौतूहलमयी, चंचला आणि दुःखहारिणी एका प्रकारची रति-छाया उदित होते, तिलाच छाया-रत्याभास म्हणतात. भक्ती काही मर्यादेपर्यंत शुद्ध असूनही दृढ होत नाही, त्याचवेळेस हा रत्याभास उदित होतो. जे काहीही असो, हा छाया-भावाभास अनेक सुकृतींच्या प्रभावानेच उत्पन्न होतो. कारण छाया-भावाभास सत्संगाद्वारे शुद्ध होऊन क्रमशः शुद्धभावाच्या रूपात उदित होतो. परंतु लक्षात ठेवावे की हा भावाभास कितीही उत्तम असला तरी, शुद्ध वैष्णवाप्रती अपराध झाल्यावर कृष्णपक्षाच्या चन्द्राप्रमाणे हळूहळू क्षीण होऊन जातो. भावाभासाची तर गोष्टच काय, शुद्धभावही कृष्णभक्तांच्या प्रती अपराध झाल्यावर क्रमशः तिरोहित होतो. सुप्रतिष्ठित मुमुक्षू व्यक्तीचा अधिक संग केल्यावर भावपण भावाभास होऊन जातो अथवा स्वतःतच ईश्वर असल्याचा अभिमान आणतो. म्हणून कोठे कोठे नृत्य करता-करता नवीन भक्तजनांमध्ये मुक्तिपक्षीय 'ईश्वर भाव' उदित होताना पाहिला जातो. नवीन भक्तगणच विचार केल्याशिवाय मुमुक्षूंचा (मुक्तिकामींचा) संग करतात. त्यामुळे त्यांच्यात हे सर्व उपद्रव उपस्थित होतात. या नवीन भक्तांनी मुमुक्षू व्यक्तींच्या संगाचा सावधानतेने परित्याग केला पाहिजे. कधी-कधी असे पाहिले जाते की कुण्या व्यक्तीत अकस्मात भाव उदित होतो, याचे समाधान अशा प्रकारे करावे की त्या व्यक्तीने पूर्व-जन्मी खूपसे साधन केले होते, परंतु आत्तापर्यंत नाना प्रकारच्या विघ्न-बाधांमुळे त्याच्या पूर्व जन्मीच्या सुसाधनांचे फळ उत्पन्न होऊ शकले नाही, परंतु बाधा दूर होताच अकस्मात त्यांच्या हृदयात शुद्ध भाव उदित झाला. कधी-कधी कृष्णाच्या अहैतुकी कृपेने असा श्रेष्ठ भाव अकस्मात उत्पन्न होतो. या भावास 'श्रीकृष्ण-प्रसादजभाव' म्हणता येऊ शकते. खरा भाव प्रकाशित झाल्यावरही भावुकाच्या आचरणात काही-काही दोषासारखे परिलक्षित झाल्यावरही त्याच्याप्रती दोषबुद्धी करू नये अर्थात त्यात दोषारोपण करू नये. कारण भाव उदित झाल्यावर साधक सर्वप्रकारे कृतकृत्य होऊन जातो. अशा दशेत त्याच्यात पाप-आचरण संभवत नाही. जर कधी असा पापाचार दिसून आला तर या विषयी दोन प्रकारे विचार करायला हवा.

महापुरुष-भक्ताकडून संयोगवश एक पाप कार्य घडले, ते त्याच्यात कधीही स्थायी रूपात राहू शकत नाही, अथवा पूर्व जन्मीचे काही पापाभास आहेत, जे भाव

उदित झाल्यावरही अजून संपूर्णपणे नष्ट होऊ शकलेले नाहीत, आता शीघ्रच नष्ट होणार आहेत. असा विचार करून भक्तजनांच्या यःकश्चित दोषांकडे लक्ष देऊ नये. जर अशा स्थळी दोष पाहिले तर नामापराधच होईल. नृसिंहपुराणात अशा दोषांकडे लक्ष देण्यास निषेध केला आहे–

**भगवति च हरावनन्यचेता भृशमलिनोऽपि विराजते मनुष्यः।**
**न हि शशकलुषच्छविः कदाचित् तिमिरपराभवतामुपैति चन्द्रः॥**

अर्थात ज्या प्रकारे चन्द्र शशांकयुक्त असूनही कधी अंधःकाराने झाकोळला जात नाही, त्याच प्रकारे भगवान श्रीहरीच्या प्रती अनन्य भावाने युक्त मानव अतिशय दुराचारी असूनही शोभा प्राप्त करतो–या उपदेशाने असे समजू नये की भक्तजन निरंतर पापच करीत असतात; खरेतर हे आहे की भक्तिनिष्ठा उत्पन्न झाल्यावर पापवासना राहतच नाही. परंतु जोपर्यंत शरीर वर्तमान राहते, तोपर्यंत घटनावशतः अकस्मात एखादे पाप-कर्म घडून जाते. परंतु तो अनन्य भक्त आपल्या भजन प्रभावाने त्या पापास तत्क्षणी अशाप्रकारे जाळून टाकतो, जशी ज्वलंत आग कापसाच्या छोट्याशा ढीगाला जाळून टाकते आणि भविष्यात तो सावधान होतो, ज्यायोगे पुन्हा पाप घडू नये.

अनन्य भक्ती उदित झाल्यावर समस्त प्रकारची पापे दूर होऊन जातात. जे लोक वारंवार पाप कार्य करतात, त्यांच्यात अनन्यभक्ती निर्माण झालीच नाही–असे समजावे. कारण भक्ति-क्रियेसोबत वारंवार जाणूनबुजून पाप करणे नामापराध आहे, जो भक्तिवृत्तीस मुळापासून उखडून फेकतो. भक्तजन या अपराधांपासून खूपच लांब राहतात.

रती स्वभावतः निरंतर उत्तरोत्तर अभिलाषमयी असल्याने अशांत स्वभावयुक्त उष्ण आणि प्रबळ आनंदमयी असते तथा संचारी भावरूप उष्णता ओकून सुद्धा कोटी चन्द्रांपेक्षादेखील सुशीतल आणि अमृतमय स्वादयुक्त असते.

ब्रजनाथ आणि विजयकुमार भावतत्त्वाची व्याख्या ऐकून खूपच चकित झाले आणि भावात मग्न होऊन गप्प बसले. काही वेळानंतर म्हणाले–प्रभो! आपण आमच्या दग्ध हृदयात उपदेशामृताची प्रबळ रूपात वर्षा करून प्रेमाचा पूर आणला आहे. आता आम्ही काय करावे? कुठे जावे? काहीच समजत नाही. ब्राह्मणकुळात

जन्म होण्याचा प्रचुर अभिमान आहे, दीनतेचा हृदयात सर्वदा अभाव आहे. अशा दशेत आमच्याकरिता भावाची प्राप्ती होणे खूप दूरची गोष्ट आहे. तेव्हा एकमात्र केवळ हाच भरवसा आहे की आपण मोठे प्रेममय आणि दयाळू आहात, एक थेंब प्रदान केल्याने आम्ही कृतकृत्य होऊन जाऊ. आपल्यासोबत आमचा जो पारमार्थिक संबंध स्थापित झाला आहे–तोच आमच्या आशेचे एकमात्र स्थळ आहे. आम्ही अतिशय दीनहीन आणि अकिंचन आहोत आणि आपण भगवत्पार्षद आणि परम कृपाळू आहात. कृपा करून आम्हांस आमच्या कर्तव्याविषयी उपदेश प्रदान करावा. माझी तर अशी इच्छा होत आहे की मी याच क्षणी घर-दार सोडून आपल्या चरणकमलांचा दास होऊन येथेच पडून रहावे.

विजयकुमार योग्य संधी पाहून म्हणाले–प्रभो! ब्रजनाथ अजून बालक आहे, त्यांची माता त्यांना गृहस्थ करू इच्छित आहे. परंतु त्यांची अशी इच्छा नाही. कृपा करून याविषयी ह्यांनी काय करावे–आज्ञा द्यावी.

बाबाजी–तुम्ही लोक कृष्णाचे कृपापात्र आहात. आपल्या संसाराला कृष्णाचा संसार बनवून कृष्णाची सेवा करा. आमच्या महाप्रभूंनी जगास जी शिकवण दिली आहे, जगाने त्याच शिकवणीवर अंमल करावा. जगात दोन प्रकारे राहून भगवद्भजन करता येते–गृहस्थ राहून अथवा गृह-त्याग करून. जोपर्यंत गृहत्यागाचा अधिकार होत नाही, तोपर्यंत मनुष्यास गृहस्थ राहूनच कृष्णसेवा करावयास हवी.

महाप्रभूंनी आपल्या प्रकट लीलेमध्ये पहिल्या चोवीस वर्षांमध्ये ज्या लीला केल्या आहेत–त्या गृहस्थ वैष्णवांकरिता आदर्श आणि अंतिम चोवीस वर्षांपर्यंत ज्या लीला केल्या आहेत, त्या गृहत्यागी वैष्णवांकरिता आदर्श आहेत. गृहस्थ-वैष्णव महाप्रभूंच्या गृहस्थ जीवनास लक्ष्य मानून आपले आचरण निश्चित करतील. माझ्या मते तुम्हीही तेच करावे. असे समजू नका की गृहस्थाश्रमात कृष्णप्रेमाची पराकाष्ठा प्राप्त करता येत नाही. महाप्रभूंचे अधिकांश कृपापात्र तर गृहस्थच होते, ज्यांच्या चरण धुळीकरिता गृहत्यागी वैष्णवदेखील प्रार्थना करीत होते.

रात्र खूप झाली होती. विजय आणि ब्रजनाथ दोघांनीही अन्य वैष्णवांसोबत हरिगुणगान करीत-करीत श्रीवास-अंगणात संपूर्ण रात्र घालविली. प्रातःकाळी शौचादी क्रिया आटोपून गंगास्नान केल्यानंतर गुरुदेव आणि वैष्णवांस दंडवत प्रणाम केला. पुन्हा संकीर्तनानंतर महाप्रसाद सेवा करून तृतीय प्रहरी घरी परतले.

विजयकुमारने आपल्या बहिणीस बोलावून म्हटले–तू ब्रजनाथच्या विवाहाची तयारी कर. हा विवाह करेल. मी काही दिवसांकरिता मोदद्रुमी जात आहे. विवाहाची तिथी ठरल्यावर कळव. मी सपरिवार येऊन विवाहाचे शुभ कार्य संपन्न करीन. मी उद्याच हरिनाथला (त्यांचे लहान भाऊ) येथे पाठवून देईन. तो येथे राहून सर्व व्यवस्था करेल.

ब्रजनाथाच्या आईला आणि आजीला जणूकाही पृथ्वीचे राज्यच मिळाले. त्या खूप आनंदित झाल्या. त्यांनी विजयकुमारला नवीन वस्त्रे आदी देऊन निरोप दिला.

**॥ बाविसावा अध्याय समाप्त ॥**



# तेवीसावा अध्याय (प्रमेयांतर्गत नामतत्त्वाचा विचार)

बिल्वपुष्करिणी एक खूपच रमणीय गाव आहे. त्याच्या उत्तरेस आणि पश्चिमेस दोन्ही दिशांना भगवती भागीरथी प्रवाहित होते. गावाच्या एका कोपऱ्यात बेलाच्या वृक्षांनी वेढलेले एक अत्यंत रम्य सरोवर आहे, ज्याच्या तीरावर 'बिल्वपक्ष' महादेवाचे मंदिर आहे. या मंदिरापासून थोड्याच अंतरावर 'भवतारण' विराजमान आहे. बिल्वपुष्करिणी आणि ब्राह्मण-पुष्करिणीच्या मध्ये 'सिमुलिया' नामक गाव आहे. ही सर्व गावे श्रीनवद्वीप नगराच्या अंतर्गत आहेत. बिल्वपुष्करिणी गावाच्या मधोमध एक मोठा रस्ता जातो. या मोठ्या रस्त्याच्या वरच उत्तरेकडे ब्रजनाथाचे घर आहे. विजयकुमार आपल्या बहिणीस येथे निरोप देऊन काही दूर गेल्यानंतर रस्त्यात त्यांनी विचार केला की श्रीनामतत्त्वास श्रीबाबाजींकडून जाणून घेतल्यानंतरच घरी परतणे योग्य ठरेल. असा विचार करून ते बिल्वपुष्करिणीस परतले आणि बहिणीला म्हणाले, 'मी येथे आणखी एक-दोन दिवस थांबून मग परतीन.'

मामा परतल्याने ब्रजनाथास खूप आनंद झाला. दोघेही चण्डी-मंडपात बसून दशमूल शिक्षेसंबंधी वार्तालाप करू लागले. आतापर्यंत सूर्यदेव अस्ताचली जाण्याच्या तयारीत होते. पक्षिसमूह आपापल्या घरट्यांकडे तीव्र गतीने उडत चालले होते. पशूंचे समूह भराभर पावले टाकीत आपापल्या घरांकडे परतत होते. त्याचवेळी श्रीरामानुज-संप्रदायाचे दोन वैष्णव संत तेथे पोहोचले आणि त्यांनी ब्रजनाथाच्या घरासमोरच एका फणसाच्या झाडाखाली आपले आसन जमविले. इकडून तिकडून काही लाकडे गोळा करून त्यांनी धुणी पेटविली. त्यांच्या ललाटावर श्रीसंप्रदायाचा तिलक सुशोभित होत होता. मुख-मंडलावर अद्भुत शांती विराजमान होती.

ब्रजनाथाची आई अतिथींचा मोठा सत्कार करीत असे. अतिथी भुकेले असतील असा विचार करून त्यांना घरून नाना प्रकारच्या भोज्य-सामग्री आणून दोघांसमोर उपस्थित करून त्यापासून भोजन बनवायचा अनुरोध केला. ते संतुष्ट होऊन पोळ्या बनवू लागले. ब्रजनाथ आणि विजयकुमार दोघेही वैष्णवांची शांत-प्रशांत मुख-मंडले पाहून त्यांच्याजवळ गेले. ब्रजनाथ आणि विजयकुमारच्या गळ्यात तुळशी माळा आणि शरीरावर द्वादश तिलक पाहून दोघेही वैष्णव-संत खूप प्रसन्न झाले आणि आपले घोंगडे जमिनीवर व्यवस्थित पसरवून त्याच्यावर त्यांना

मोठ्या सन्मानाने बसविले.

त्यांचा परिचय प्राप्त करण्याच्या उद्देशाने ब्रजनाथाने विचारले–महाराज! आपण कुठून आलात?

दोघांपैकी एका बाबाजींनी उत्तर दिले–आम्ही अयोध्येहून आलो आहोत. आमची खूप दिवसांची इच्छा होती की श्रीचैतन्य महाप्रभूंची लीलाभूमी श्रीनवद्वीपधामाचे दर्शन करावे. आज आमचे परम सौभाग्य आहे की आम्ही भगवंताच्या कृपेने श्रीनवद्वीपधामी पोहोचलो आहोत. आम्ही येथे काही दिवस राहून श्रीमन् महाप्रभूंच्या लालीस्थळांचे दर्शन करू इच्छित आहोत.

ब्रजनाथ म्हणाले–आपण श्रीनवद्वीपातच पोहोचला आहात; आज आपण येथे विश्राम करून श्रीमन् महाप्रभूंचे जन्मस्थान आणि श्रीवास-अंगणाचे दर्शन करावे.

ब्रजनाथाचे बोलणे ऐकून ते दोघेही वैष्णव मोठे आनंदित झाले आणि गीतेच्या या श्लोकास (१५/६) म्हणू लागले–

**यद्गत्वा न निवर्त्तन्ते तद्धाम परमं मम।**(१)

आज आमचे जीवन धन्य झाले–सप्त-पुरींमध्ये प्रधान श्रीमायातीर्थाचे दर्शन करून आम्ही धन्य झालो.

तत्पश्चात अर्थ-पंचकाच्या(२) संबंधी विचारविनीमय झाला. दोन्ही रामानुज वैष्णवांनी अर्थ-पंचकाच्या स्व-स्वरूप, पर-स्वरूप, उपाय-स्वरूप, पुरुषार्थ-स्वरूप आणि विरोधी स्वरूप–या पाच विषयांवर विचार प्रस्तुत केले. विजयकुमार त्या विचारांस ऐकून 'तत्त्व-त्रय' यावर नाना प्रकारे विचार करू लागले.

काही वेळापर्यंत विचार झाल्यावर विजयकुमार म्हणाले–आपल्या

---

(१) माझ्या त्या परमधामी गेल्यावर मग परतणे होत नाही.

(२) अर्थ-पंचक–श्रीरामानुज संप्रदायाचा छोटा परंतु फारच प्रशंसनीय ग्रंथ आहे. यांत पाच विषयांचे सुंदर विवेचन केलेले आहे.

संप्रदायात श्रीनामतत्त्वासंबंधी काय सिद्धांत आहे?

परंतु या प्रश्नाच्या उत्तरादाखल त्या दोन्ही वैष्णवांनी जे काही सांगितले ते ऐकून ब्रजनाथ आणि विजयकुमारास थोडेदेखील सुख झाले नाही.

ब्रजनाथ म्हणाले–मामाजी! मी फार विचार करून पाहिले की कृष्णनाम ग्रहण करण्याव्यतिरिक्त जिवाच्या कल्याणाचा दुसरा काहीच उपाय नाही. आपले प्राणेश्वर श्रीगौरांग महाप्रभू शुद्ध कृष्णनामाचा जगात प्रचार करण्याकरिताच या मायातीर्थी अवतीर्ण झाले होते.

श्रीगुरुदेवांनी काल आपल्याला जो उपदेश प्रदान केला होता, त्यात त्यांनी सांगितले होते की–समस्त प्रकारच्या भक्तीच्या अंगांमध्ये श्रीनामच प्रधान आहे. त्यांनी हेदेखील सांगितले होते की नामतत्त्वास पृथक रूपात समजून घ्यावे. म्हणूनच चला आज नामतत्त्वास यथायोग्य समजून घेऊया.

संध्याकाळ झाली होती. काहीसा अंधारही झाला आहे. श्रीवास-अंगणात भगवंताची संध्या आरती झालेली आहे. वैष्णवजन बकूळ-चौथऱ्यावर बसलेले आहेत. वृद्ध रघुनाथदास बाबाजीदेखील तेथेच त्यांच्या मध्ये बसून तुळशी माळेवर संख्यापूर्वक नामजप करीत आहेत. त्याचवेळी ब्रजनाथ आणि विजयकुमारने त्यांच्या चरणी साष्टांग प्रणाम केला.

बाबाजी महोदय त्यांना आलिंगन देत म्हटले–तुम्हा लोकांचे भजन-सुख तर वाढत आहे ना?

विजयकुमार हात जोडून म्हणाले–प्रभो! आपल्या कृपेमुळे आमचे सर्व प्रकारे कल्याणच होत आहे. कृपा करून आज आम्हाला नामतत्त्वाचा उपदेश प्रदान करावा.

बाबाजी महाराज मोठे प्रसन्न झाले आणि म्हणाले–भगवन्नाम दोन प्रकारचे असते–मुख्य नाम आणि गौण नाम. मायिक गुण अवलंबनपूर्वक जगत सृष्टी संबधी जी सर्व नावे प्रचलित आहेत, ती सर्व गौण–अर्थात गुण-संबंधी आहेत. सृष्टिकर्ता, जगत्पाता, विश्वनियंता, विश्वपालक, परमात्मा आदी खूपशी नामे गौण आहेत. त्यांच्या अतिरिक्त ब्रह्म आदी नामेदेखील गौण नामाच्याच अंतर्गत आहेत. या गौण

नामांचे फळ अत्यंत अधिक झाल्यावरही त्यांच्याद्वारे चित्-फळ सहसा उदय होत नाही. मायिक काल आणि देशाच्या अतीत चित्-जगात जी नामे नित्य वर्तमान आहेत, ती नामसमूहे–चिन्मय आणि मुख्य आहेत. नारायण, वासुदेव, जनार्दन, हृषीकेश, हरी, अच्युत, गोविन्द, गोपाळ, राम आदी मुख्य नामे आहेत. ही नामे भगवद्धामात भगवत्-स्वरूपासोबत एक होऊन वर्तमान आहेत. जड जगात महासौभाग्यशाली पुरुषांच्या जिव्हेवर ही नामे भक्तीद्वारे आकृष्ट होऊन नृत्य करतात. नामासोबत मायिक जगाचा काहीच संबंध नसतो. नामामध्ये स्वभावतः भगवत्-स्वरूपाच्या सर्व शक्ती विद्यमान असतात. म्हणून नामदेखील सर्वशक्तिसंपन्न आहे. ते मायिक जगात अवतीर्ण होऊन मायेचा ध्वंस करण्यास प्रवृत्त होते. या मायिक संसारात हरिनामाव्यतिरिक्त जिवांचा अन्य कुणीच बंधू नाही. बृहन्नारदीयपुराणात हरिनामासच एकमात्र गती सांगितले आहे–

**हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनम्।**
**कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा॥**(३)

(बृ. पु. ३८/१२६)

नामाच्या अनंत शक्ती आहेत. पातकांचा ध्वंस करण्यासाठी लागणारी अद्भुत शक्ती हरिनामामध्ये आहे. हरिनाम क्षणभरात समस्त प्रकारच्या पातकांस जाळून टाकते.

**अवशेनापि यन्नाम्नि कीर्तिते सर्वपातकैः।**
**पुमान् विमुच्यते सद्यः सिंहत्रस्तैर्मृगैरिव॥**(४)

---

(३) सत्ययुगात ध्यान, त्रेतायुगात यज्ञ, द्वापरात अर्चनाची प्रधानता आहे. परंतु कलियुगामध्ये हरिनामच माझे जीवन आहे, हरिनामाच माझे जीवन आहे, हरिनामच माझे जीवन आहे. कलियुगात नामाव्यतिरिक्त जिवाची दुसरी गती नाही, दुसरी गती नाही, दुसरी गती नाही. तीन वेळा उक्तीद्वारे कलियुगात दुसऱ्या साधनांची निरर्थकता दाखविली गेली आहे.

(४) जी व्यक्ती अजाणतेपणीदेखील श्रीनारायणाचे कीर्तन करते, ती तत्क्षणी समस्त प्रकारच्या पापांतून मुक्त होते. हरिनाम-कीर्तन केल्याने पापी व्यक्ती पापाच्या तावडीतून ठीक अगदी तशा सुटकारा मिळवते, जसे हरिण एका भयानक सिंहाच्या तावडीतून सुटकारा मिळवतो.

(गरुडपुराण १/२३२/१२)

नामाश्रित व्यक्तींची सारी दुःखे श्रीनामाद्वारे दूर होतात. नामामुळे सर्व प्रकारचे रोगदेखील दूर होतात–

**आधयो व्याधयो यस्य स्मरणान्नामकीर्त्तनात्।**
**तदैव विलयं यान्ति तमनन्तं नमाम्यहम्॥**[(५)]

(स्कन्दपुराण)

हरिनाम करणारा आपल्या कुळास, समाजास आणि पृथ्वीस पवित्र करतो–

**महापातकयुक्तोऽपि कीर्त्तयन्ननिशं हरिम्।**
**शुद्धान्तःकरणो भूत्वा जायते पंक्तिपावनः॥**[(६)]

(ब्रह्माण्डपुराण)

नामपरायण व्यक्तीची सारी दुःखे. सारे उपद्रव, समस्त प्रकारचे रोग आदी शांत होऊन जातात–

**सर्व-रोगोपशमं सर्वोपद्रवनाशनम्।**
**शान्तिदं सर्वरिष्टानां हरेर्नामानुकीर्तनम्॥**[(७)]

(बृहद्विष्णुपुराण)

नामोच्चारणकारीस कलीचे दोष स्पर्श करीत नाहीत–

---

(५) ज्यांच्या ‘नाम’ स्मरण आणि कीर्तनाने समस्त प्रकारच्या आधिव्याधी संपूर्णपणे दूर होतात, मी त्या अनन्तदेवास नमस्कार करतो.

(६) जर महापापीदेखील निरंतर हरिनाम करतो, तर त्याचे अंतःकरण शुद्ध होऊन जाते आणि तो पंक्ति-पावन होऊन जातो अर्थात तो द्विजत्व प्राप्त करून पृथ्वीस पवित्र करतो.

(७) श्रीहरिनामाचे कीर्तन केल्याने सर्व प्रकारचे रोग दूर होऊन जातात. सर्व प्रकारचे उपद्रव शांत होतात, सर्वप्रकारचे विघ्ने विनष्ट होतात आणि पराशांती प्राप्त होते.

**हरे केशव गोविन्द वासुदेव जगन्मय।**
**इतीरयन्ती ये नित्यं न हि तान् बाधते कलिः ॥**[८]

(बृहन्नारदीयपुराण)

नाम श्रवण करताच नारकीचा उद्धार होऊन जातो–

**यथा यथा हरेर्नाम कीर्त्तयन्ति स्म नारकाः।**
**तथा तथा हरौ भक्तिमुद्वहन्तो दिवं ययुः ॥**[९]

(नृसिंह-तापनी)

हरिनामोच्चरणाने प्रारब्ध कर्म विनष्ट होऊन जातात–

**यन्नामधेयं म्रियमाण आतुरः पतन् स्खलन् वा विवशो गृणन् पुमान्।**
**विमुक्तकर्मार्गल उत्तमां गतिं प्राप्नोति यक्ष्यन्ति न तं कलौ जनाः ॥**[१०]

(श्रीमद्भा. १२/३/४४)

हरिनाम-कीर्तनाचा महिमा वेद पठणाहूनही अधिक आहे–

**मा ऋचो मा यजुस्तात मा साम पठ किञ्चन।**
**गोविन्देति हरेर्नाम गेयं गायस्व नित्यशः ॥**[११]

(स्कन्दपुराण)

---

(८) जे लोक नित्यकाल "हे हरे! हे गोविन्द! हे केशव! हे वासुदेव! हे जगन्मय!"–असे म्हणून कीर्तन करतात, त्यांना कली जरादेखील कष्ट देऊ शकत नाही.

(९) अतिशय नारकी व्यक्तीदेखील जेथे जेथे श्रीहरीचे नामकीर्तन करतात, ते त्या त्या स्थळींच हरीच्या प्रती भक्ती प्राप्त करून दिव्य धामात गमन करतात.

(१०) मनुष्य मरतेवेळी आतुरतेच्या स्थितीमध्ये अथवा पडताना किंवा घसरून पडताना विवश होऊनही जर भगवंताच्या कुठल्याही एका नामाचे उच्चारण करतो, तर त्याची सर्व कर्मबंधने छिन्न-भिन्न होऊन जातात आणि त्यास उत्तमातील उत्तम गती प्राप्त होते. परंतु हाय रे कलियुग! कलियुगाने प्रभावित होऊन लोक त्या भगवंताच्या आराधनेपासूनही विमुख होऊन जातात.

हरिनाम सर्व तीर्थांपेक्षाही श्रेष्ठ आहे–

**तीर्थकोटीसहस्राणि तीर्थकोटीशतानि च।**
**तानि सर्वाण्यवाप्नोति विष्णोर्नामानि कीर्त्तनात्॥**(१२)

(वामनपुराण)

हरिनामाचा आभासही समस्त प्रकारच्या सत्कर्मांपेक्षा अनंत पटींनी अधिक फलदायक आहे–

**गो-कोटी-दानं ग्रहणे खगस्य प्रयागगङ्गोदककल्पवासः।**
**यज्ञायुतं मेरुसुवर्णदानं गोविन्द कीर्त्तेर्न समं शतांशैः॥**(१३)

(स्कन्दपुराण)

हरिनाम समस्त प्रकारच्या अर्थांस प्रदान करू शकते–

**एतत् षड्वर्गहरणं रिपुनिग्रहणं परम्।**
**अध्यात्ममूलमेतद्धि विष्णोर्नामानुकीर्त्तनम्॥**(१४)

(स्कन्दपुराण)

हरिनाम सर्वशक्तिसंपन्न आहे–

---

(११) ऋक्, साम आणि यजुः आदी वेदांच्या पठण-पाठणाची काहीच आवश्यकता नाही, केवळ श्रीहरीच्या 'गोविन्द' नामाचेच संकीर्तन करणे योग्य आहे, तू निरंतर हेच करावे.

(१२) शंभर कोटी वा एक हजार कोटी तीर्थांचे भ्रमण करण्याचे जे फळ होते, ते सर्व केवळ श्रीविष्णूंच्या नामांच्या कीर्तनाद्वारेच प्राप्त करता येते.

(१३) सूर्य-ग्रहण वा चन्द्र-ग्रहणाच्या दिवशी कोटी गोदान, प्रयाग वा गंगातटी एक कल्पापर्यंत वास, हजारो यज्ञ आणि सुमेरू पर्वतासमान उंच सोन्याच्या पर्वताचे दान–हे सर्व काही 'श्रीगोविन्द' नामाच्या कीर्तनाच्या शंभराव्या भागाइतके देखील असू शकत नाही.

(१४) श्रीविष्णूंचे नामसंकीर्तन जन्म-मृत्यू आदी षड्वर्गाचे विनाशक, काम-क्रोध आदी षड्रिपूंचे दमन करणारे आणि अध्यात्म ज्ञानाचे मूळ आहे.

**दानव्रततपस्तीर्थक्षेत्रादीनाञ्च या स्थिताः।**
**शक्तयो देवमहतां सर्वपापहराः शुभाः॥**

**राजसूयाश्वमेधानां ज्ञानसाध्यात्मवस्तुनः।**
**आकृष्य हरिणा सर्वाः स्थापिता स्वेषु नामसु॥**[१५]

(स्कन्दपुराण)

हरिनाम संपूर्ण जगास आनंद प्रदान करणारे आहे–

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च।**[१६]

(गीता ११/३६)

नामोच्चारणकारीस नाम जगतपूज्य बनविते–

**नारायण जगन्नाथ वासुदेव जनार्दन।**
**इतीरयन्ति ये नित्यं ते वै सर्वत्र वन्दिताः॥**[१७]

(बृ. पु)

नामच अगतींची एकमात्र गती आहे–

**अनन्यगतयो मर्त्त्या भोगिनोऽपि परन्तपाः।**
**ज्ञानवैराग्यरहिता ब्रह्मचर्यादिवर्जिताः॥**

---

(१५) दानात, व्रतात, तपात, तीर्थ-क्षेत्रांत, प्रधान-प्रधान देवतांमध्ये, समस्त प्रकारची पापे हरण करणाऱ्या सत्कर्मांमध्ये, शक्तिसमूहांमध्ये, राजसूय आणि अश्वमेध यज्ञादींमध्ये तथा ज्ञान-साध्य आत्म वस्तूमध्ये–जेथेही जे काही आहे, श्रीहरींनी त्यांना तेथून आकर्षित करून आपल्या नामात स्थापन करून ठेवले आहे.

(१६) हे हृषीकेश! आपल्या यश-कीर्तनास ऐकून जगत अत्यंत हर्षित आणि अनुरागास प्राप्त होत आहे.

(१७) जे लोक निरंतर हे नारायण! हे जगन्नाथ! हे वासुदेव! हे जनार्दन! अशाप्रकारे कीर्तन करतात, ते सर्वत्र पूजनीय असतात.

**सर्वधर्मोज्झिताः विष्णोर्नाममात्रैकजल्पकाः।**
**सुखेन यां गतिं यान्ति न तां सर्वेऽपि धार्मिकाः॥**(१८)

(पद्मपुराण)

हरिनाम सदा-सर्वदा आणि सर्व अवस्थांमध्ये केले जाऊ शकते–

**न देशनियमस् तस्मिन् न कालनियमस्तथा।**
**नोच्छिष्टादौ निषेधोऽस्ति श्रीहरेर्नाम्नि लुब्धक॥**(१९)

(विष्णु धर्मोत्तर)

हरिनाम मुक्तीची स्पृहा असणाऱ्यांना अनायासेच मुक्ती प्रदान करते–

**नारायणाच्युतानन्तवासुदेवेतियो नरः।**
**सततं कीर्त्तयेद्भुवि याति मल्लयतां स हि॥**(२०)

(वराहपुराण)

**किं करिष्यति सांख्येन किं योगैर्नरनायक।**
**मुक्तिमिच्छसि राजेन्द्र कुरु गोविन्दकीर्त्तनम्॥**(२१)

---

(१८) ज्यांची अन्य कुठलीही गती नाही, जे भोगी आहेत, दुसऱ्यांना त्रास देतात, ज्ञान आणि वैराग्यरहित आहेत, ब्रह्मचर्य-वर्जित आहेत, आणि जे समस्त धर्मांच्या बाहेर आहेत, ते केवळ मात्र विष्णूचे नामकीर्तन करीत जी गती प्राप्त करतात, त्या गतीस सारे धार्मिकजन एकत्र मिळूनही प्राप्त करू शकत नाहीत.

(१९) हे नाम-लोभी! भगवन्नाम-कीर्तनात देश आणि काळाचा कुठलाच नियम नसतो आणि उच्छिष्ट-मुखाने अथवा कुठल्याही अशुची अवस्थेत याचा निषेध होत नाही होत अर्थात कुणीही व्यक्ती पवित्र आणि अपवित्र अशा समस्त अवस्थांमध्ये हरिनाम-कीर्तन करू शकते.

(२०) जो मनुष्य 'नारायण', 'अच्युत', 'वासुदेव'–या नामांचे निरंतर कीर्तन करीत पृथ्वीवर विचरण करतो, तो माझ्यासोबत एकाच लोकात–गमन करतो.

(२१) हे राजेंद्र! जर आपण मुक्त होऊ इच्छिता, तर आपण श्रीगोविन्द नामाचे कीर्तन करावे. हे नरश्रेष्ठ! सांख्य वा योगाने काहीही होऊ शकत नाही, ते काय करू शकतात?

(गरुडपुराण)

हरिनाम जिवास वैकुण्ठलोकाची प्राप्ती करवून देते–

**सर्वत्र सर्वकालेषु येऽपि कुर्वन्ति पातकम्।**
**नामसंकीर्त्तनं कृत्वा यान्ति विष्णोः परं पदम्॥** (२२)

(नन्दीपुराण)

हरिनाम भगवंतास प्रसन्न करण्याकरिता सर्वोत्तम आहे–

**नामसंकीर्त्तनं विष्णोः क्षुत्तृष्ट्प्रपीडितादिषु।**
**करोति सततं विप्रास्तस्य प्रीतो ह्यधोक्षजः॥** (२३)

(बृहन्नाददीयपुराण)

हरिनाम भगवंतास वशीभूत करण्यास समर्थ आहे–

**ऋणमेतत् प्रवृध्दं मे हृदयान्नापसर्पति।**
**यद्गोविन्देति चुक्रोश कृष्णा मां दूरवासिनम्॥** (२४)

(महाभारत)

हरिनाम जिवाचा परम पुरुषार्थ आहे–

**इदमेव हि माङ्गल्यमेतदेव धनार्जनम्।**
**जीवितस्य फलञ्चैतद्यद्दामोदरकीर्त्तनम्॥** (२५)

(स्कन्द आणि पद्मपुराण)

---

(२२) जे सर्वत्र आणि सर्वदा पाप कार्य करतात, ते देखील नामसंकीर्तन करून विष्णूचे परम पद प्राप्त करतात.

(२३) हे विप्रगण! भुकेने आणि तहानेने अत्यंत पीडित होऊनही जे निरंतर विष्णूचे नामसंकीर्तन करतात, त्यांच्या प्रती अधोक्षज विष्णू अत्यंत प्रसन्न राहतात.

(२४) खूपच दूर असल्याकारणाने द्रौपदीने मला मला जोराने 'हे गोविन्द' म्हणत पुकारले. तिच्या कातर हाकेचे माझ्यावर मोठेच ऋण झाले, जे आजही माझ्या हृदयातून उतरू शकलेले नाही.

हरिनाम-कीर्तन सर्व प्रकारच्या भक्तीसाधनांमध्ये श्रेष्ठ आहे–

**अघच्छित्स्मरणं विष्णोर्बह्वायासेन साध्यते।**
**ओष्ठस्पन्दनमात्रेण कीर्त्तनं तु ततो वरम्॥**(२६)

(वैष्णव-चिन्तामणि)

**यदभ्यर्च्य हरिं भक्त्या कृते क्रतुशतैरपि।**
**फलं प्राप्नोत्यविकलं कलौ गोविन्दकीर्त्तनम्॥**(२७)

(विष्णु-रहस्य)

**कृते यद्ध्यायतो विष्णुं त्रेतायां यजतो मखैः।**
**द्वापरे परिचर्यायां कलौ तद्धरिकीर्त्तनात्॥**(२८)

(श्रीमद्भा. १२ /३/५२)

विजयकुमार! आता विचार करून पाहा! हरिनामाचा आभासही समस्त सत्कर्मांपेक्षा श्रेष्ठ आहे. कारण सत्कर्म मात्र उपाय-स्वरूपच होऊन काम्यफळास देऊन दूर होतात. विशेषतः सत्कर्म कसेही का नसो, ते जडमय असते. परंतु हरिनाम चिन्मय आहे. म्हणूनच उपाय-स्वरूप असूनही फळाच्या स्थानी ते स्वयं उपेय-

---

(२५) भगवंताच्या 'दामोदर'–नामाचे कीर्तनच कल्याणाचा एकमात्र हेतू, धन-संग्रह आणि जीवनाचे फल आहे.

(२६) विष्णूंच्या स्मरणाने मोठ्या परिश्रमाने पापे नष्ट होतात, परंतु त्यांच्या नामकीर्तनाद्वारे ती पापे अती सहजच नष्ट होऊन जातात. भगवन्नाम ओष्ठस्पंदन मात्रानेच कीर्तन होऊन जाते, जे स्मरणापेक्षाही अतिशय श्रेष्ठ आहे.

(२७) सत्ययुगात श्रद्धापूर्वक शेकडो यज्ञ आदींद्वारे जे फळ लाभते, कलिकाळात श्रीगोविन्दाच्या नामकीर्तनाद्वारे ते संपूर्ण फळ प्राप्त केले जाऊ शकते.

(२८) सत्ययुगात भगवंताचे ध्यान केल्याने, त्रेतामध्ये मोठमोठ्या यज्ञांद्वारे त्यांची आराधना केल्याने आणि द्वापरात विधिपूर्वक त्यांचे अर्चन केल्याने जे फळ मिळते, ते कलियुगात केवळ भगवन्नामाच्या कीर्तनानेच प्राप्त होते.

स्वरूपच आहे, आणखीही पाहा, भक्तीची जी सर्व अंगे सांगितली आहेत, ती सर्व हरिनामाचा आश्रय घेऊन वर्तमान आहेत.

विजय–प्रभो! हरिनाम पूर्ण चिन्मय आहे–याचा मला योग्य प्रकारे विश्वास पटला आहे. तरीदेखील नामतत्त्वासंबंधी शंकारहित होण्याकरिता हे समजणे आवश्यक आहे की अक्षरात्मक नाम चिन्मय कसे काय असू शकते? तेव्हा आपण कृपया याविषयी स्पष्टीकरण करावे.

बाबाजी–पद्मपुराणात नामाचे स्वरूप सांगितले आहे–

**नाम चिन्तामणिः कृष्णश्चैतन्यरसविग्रहः।**
**पूर्णः शुद्धो नित्य मुक्तोऽभिन्नत्वान्नामनामिनोः॥**[२९]

नाम आणि नामी परस्पर अभेद तत्त्व आहेत. म्हणूनच नामी कृष्णाचे समस्त चिन्मय गुण त्यांच्या नामामध्ये आहेत. नाम सर्वदा पूर्ण-तत्त्व आहे, हरिनामामध्ये जड-संस्पर्श नाही, ते नित्यमुक्त आहे, कारण ते मायिक गुणांद्वारे कधीच आबद्ध होत नाही.

नाम–स्वयं कृष्ण आहेत, म्हणून चैतन्य-रसाचे घन-विग्रह आहेत. नाम–चिन्तामणी आहे, त्यांच्याकडे जे काही मागितले जाते, ते सर्वकाही देण्याचे समर्थ आहेत.

विजय–नामाक्षर कशाप्रकारे मायिक शब्दांच्या पलीकडले असते?

बाबाजी–जड-जगात हरिनामाचा जन्म झालेला नाही. चित्कण-स्वरूप जीव शुद्ध स्वरूपात अवस्थित होऊन आपल्या चिन्मय शरीराने हरिनामाचे उच्चारण करण्याचा अधिकारी आहे. परंतु मायाबद्ध झाल्यावर जड-इंद्रियांद्वारे तो शुद्धनाम करू शकत नाही. ल्हादिनीशक्तीची कृपा झाल्यावर ज्यावेळी स्व-स्वरूपाची प्रक्रिया आरंभ होते, त्यावेळी त्याचा नामोदय होतो. नामोदय होताच शुद्धनाम मनोवृत्तीवर

---

(२९) नाम आणि नामीमध्ये काहीच भेद नसल्याने नामच चिन्तामणिस्वरूप आहे, अर्थात परम पुरुषार्थ देणारे आहे. हे 'नाम' कृष्णचैतन्य रस-स्वरूप, पूर्ण शुद्ध अर्थात अपरिच्छिन्न आणि माया-संबंधाने रहित नित्यमुक्त आहे.

कृपापूर्वक अवतीर्ण होऊन भक्ताच्या भक्तीद्वारे पवित्र झालेल्या रसनेवर नृत्य करते. नाम अक्षराकृती नाही, केवळ जड जिव्हेवर नृत्य करताना ते वर्णाच्या आकारात प्रकट होते–हेच नामाचे रहस्य आहे.

विजय–मुख्य नामांमध्ये कोणते नाम अतिशय मधुर आहे?

बाबाजी–शतनामस्तोत्रात म्हटले आहे–

**विष्णोरेकैकं नामापि सर्ववेदाधिकं मतम्।**
**तादृक् नाममसहस्रेण रामनामसमं स्मृतमं॥** (३०)

पुनः ब्रह्माण्डपुराणातही म्हटले गेले आहे–

**सहस्रनाम्नां पुण्यानां त्रिरावृत्या तु यत् फलम्।**
**एकावृत्या तु कृष्णस्य नामैकं तत् प्रयच्छति॥** (३१)

कृष्णनामच सर्वोत्तम आहे. म्हणूनच आमचे प्राणनाथ श्रीगौरांगसुंदर यांनी ज्या 'हरे कृष्ण हरे कृष्ण' इत्यादी नामांची शिकवण दिली आहे, त्या नामास निरंतर घेत रहावे.

विजय–हरिनाम साधनाची पद्धती काय आहे?

बाबाजी–तुळशीची माळ किंवा तिच्या अभावी हातावर संख्या ठीक मोजून अपराधांपासून दूर राहून निरंतर हरिनाम करीत रहावे. शुद्धनाम केल्याने नामाच्या फलाची–प्रेमाची प्राप्ती होते. मोजून हरिनाम करण्याचे तात्पर्य हे आहे की साधक हे समजू शकेल की त्याचे नाम-अनुशीलन वाढते आहे की घटते आहे. तुळशी हरीस

---

(३०) विष्णूंचे एक-एक नाम समस्त वेदांच्या पठणापेक्षा पण अधिक फलदायक असते. परंतु अशी सहस्र नावे एकत्र येऊन एक 'राम' नामाच्या समतुल्य होतात.

(३१) विष्णूंच्या पवित्र सहस्रनामांचे उच्चारण केल्याने जे फळ होते, कृष्णनाम एकदाच उच्चारल्याने तेच फळ प्राप्त होते. तात्पर्य हे की, एक रामनाम हजार विष्णुनामांच्या बरोबर असते. तीन हजार विष्णुनाम अर्थात तीन रामनाम एका कृष्णनामाच्या समतुल्य आहेत. तीन वेळा रामनामाचे फळ तेच होते जे एकवेळ कृष्णनाम केल्याने होते.

अत्यंत प्रिय आहे. म्हणून तिच्या स्पर्शमात्राने नामाचे अधिक फळ अनुभवता येते. 'नाम' करताना कृष्णाचे 'स्वरूप' आणि 'नाम' यांत अभेद बुद्धी ठेवून नामजप करावा.

विजय–प्रभो! साधन अंग ९ किंवा ६४ प्रकारची असतात. मग नामरूपी केवळ एक अंगच निरंतर झाल्याने इतर साधनांकरिता वेळ कसा काय काढावा?

बाबाजी–ही काही कठीण गोष्ट नाही. ६४ प्रकारची भक्तिअंगे नवधा भक्तिअंतर्गत आहेत. श्रीमूर्तीचे अर्चन असो अथवा निर्जनमध्ये (एकांतामध्ये) [(३२)] नामाचे साधन असो, भक्तीच्या नऊ प्रकारच्या अंगांचे सर्वत्र अनुशीलन केले जाऊ शकते. श्रीमूर्तीसमोर कृष्णनामाचे शुद्ध रूपाने श्रवण, कीर्तन आणि स्मरण आदी होणे म्हणजेच नाम साधन करणे झाले. जेथे श्रीमूर्ती नाही, तेथे श्रीमूर्तीचे स्मरण करावे आणि त्या श्रीमूर्तीत त्यांच्या नाम-श्रवण-कीर्तनादी रूप नवधाभक्तीच्या समस्त अंगांचे साधन करावे. ज्यांची काही सौभाग्यवश नामकीर्तनात विशेष रुची होते, ते निरंतर 'नाम' कीर्तन करतात.

या द्वारेच त्यांचे भक्तीच्या समस्त अंगांचे पालन करणे होऊन जाते. श्रवण-कीर्तन आदी साधनांमध्ये श्रीनामकीर्तन सर्वात प्रबळ आहे. कीर्तनानंदाच्या समयी दुसऱ्या साधनांगांचा परिचय व्यक्त न होतादेखील हेच यथेष्ट आहे.

विजय–निरंतर नाम कसे होते?

बाबाजी–निद्राकाळाव्यतिरिक्त उठता-बसता, खाता-पिता किंवा कुठलेही काम करता-करता–सर्व समयी नामकीर्तन करण्याचेच नाव निरंतर नामकीर्तन आहे. नामसाधनात देश, काळ, अवस्था किंवा शुचि-अशुचिसंबधी कुठलाही निषेध नाही.

विजय–अहा! नाम-भगवंताची कृपा असीम आहे. परंतु जोपर्यंत आपण आम्हाला निरंतर नाम करण्याची शक्ती प्रदान करीत नाहीत, तोपर्यंत वैष्णव-पदवी प्राप्त होण्याची कुठलीच आशा नाही.

---

(३२) सतराव्या अध्यायात उद्धृत 'यस्य यत्संगति' श्लोकात ज्या प्रकारे श्रीलभक्तिविनोद ठाकुरांनी निःसंगांचा अर्थ साधुसंग केला आहे, त्याचप्रकारे येथेदेखील निर्जनाचे तात्पर्य साधुसंगात राहून भजन करणेच आहे.

बाबाजी–मी आधीच सांगितले आहे की, वैष्णव तीन प्रकारचे असतात–

कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम. श्रीचैतन्य महाप्रभूंनी सत्य-राजखाँ यांना सांगितले होते की, जे एकदा जरी कृष्णनाम करतात–ते वैष्णव आहेत, जे निरंतर कृष्णनाम करतात–ते मध्यम वैष्णव आहेत आणि ज्यांना पाहिल्यानेच मात्र दुसऱ्यांच्या मुखातून कृष्णनाम येते–ते उत्तम वैष्णव आहेत. म्हणून जेव्हा तुम्ही लोक कधी-कधी श्रद्धापूर्वक कृष्णनाम करता, तेव्हा तुम्ही लोकांनी वैष्णव-पदवी प्राप्त केलेली आहे.

विजय–शुद्ध कृष्णनामासंबंधी आणखीही जे काही जाणण्यायोग्य आहे, ते कृपा करून सांगावे.

बाबाजी–पूर्ण श्रद्धेने उदित झालेल्या अनन्य भक्तीद्वारे ज्या कृष्णनामाचा उदय होतो, त्यालाच कृष्णनाम म्हणतात. त्याव्यतिरिक्त जे काही नामासारखे लक्षित होते, तो एक तर नामाभास आहे अथवा नामापराध.

विजय–प्रभो! हरिनामास साध्य म्हणावे की साधन?

बाबाजी–जेव्हा नाम साधनभक्तीसोबत घेतले जाते, तेव्हा त्या नामास 'साधन' म्हणू शकता. मग जेव्हा 'भाव' आणि 'प्रेमभक्ती' सोबत घेतले जाते, तेव्हा नामासच 'साध्यवस्तू' समजावे. साधकाच्या भक्तीच्या अवस्था भेदाने संकोच आणि विकासाची वेगवेगळी प्रतीती होते.

विजय–कृष्णनाम आणि कृष्णस्वरूपाचा काही परिचय भेद आहे की नाही?

बाबाजी–नाही, काहीच परिचय भेद नाही. केवळ एक रहस्य हे आहे की, 'स्वरूपा'पेक्षाही 'नाम' अधिक कृपा करते. स्वरूपाप्रती जो अपराध होतो, त्यास स्वरूप कधीच क्षमा करीत नाही. परंतु कृष्णनाम स्वरूपाप्रती झालेला अपराध तसेच आपल्या प्रती झालेला अपराध अशा दोघांनाही क्षमा करते. तुम्ही लोक नामापराधास योग्यप्रकारे समजून त्याचे यत्नपूर्वक वर्जन करून नाम करा, कारण निरपराध झाल्याशिवाय शुद्धनाम होत नाही. उद्या नामापराधाविषयी समजावून घ्या.

ब्रजनाथ आणि विजयकुमार नाम-माहात्म्य आणि नामाचे स्वरूप तत्त्व जाणून श्रीगुरुदेवांची चरणधूळ घेऊन हळूहळू बिल्वपुष्करिणीला रवाना झाले.

**॥ तेवीसावा अध्याय समाप्त ॥**

# चोवीसावा अध्याय (प्रमेयांतर्गत नामापराधाचा विचार)

त्या दिवशी ब्रजनाथ आणि विजयकुमार श्रीनामाचा महिमा आणि श्रीनामाचे स्वरूपतत्त्व जाणून मोठे आनंदित झाले आणि घरी पोहोचल्यावर विशुद्ध भावाने तुळशी माळेवर संख्यापूर्वक पन्नास हजार नाम केल्यानंतर झोपले. खूप रात्र झाली होती. आज शुद्धनाम करताकरता त्यांना कृष्ण-कृपेचा साक्षात अनुभव झाला.

दुसऱ्या दिवशी सकाळी जेव्हा ते दोघे झोपेतून जागे झाले तेव्हा आपापसांत आदल्या रात्रीची चर्चा करू लागले आणि आपापले अनुभव व्यक्त करून मोठे प्रसन्न झाले. गंगा-स्नान, कृष्ण-पूजन, हरिनाम-कीर्तन, दशमूलपाठ, श्रीमद्भागवत-समीक्षा, वैष्णव-सेवा आणि भगवत्-प्रसाद्-सेवेमध्ये त्यांचा तो दिवस गेला. संध्याकाळनंतर दोघेही श्रीवास-अंगणात वृद्ध बाबाजींच्या कुटीमध्ये उपस्थित झाले. साष्टांग दंडवत-प्रणाम केल्यानंतर विजयकुमारने आदल्या दिवशीच्या प्रस्तावानुसार नामापराध-तत्त्वासंबंधी विचारले.

विजयकुमारची तत्त्व-जिज्ञासा ऐकून बाबाजी महाराज मोठे प्रसन्न झाले आणि प्रेमपूर्वक म्हणाले–नाम जसे सर्वोत्तम तत्त्व आहे, नामापराधही त्याचप्रकारे सर्व प्रकारच्या पापांपेक्षा आणि अपराधांपेक्षा अधिक भयंकर असतो. सर्व प्रकारची पापे आणि अपराध तर नाम उच्चारणासोबतच दूर होऊन जातात, परंतु नामापराध तितक्या सहजपणे दूर होत नाही. पद्मपुराणात श्रीनामाच्या महिमेचे वर्णन करताना म्हटले गेले आहे–

**नामापराधयुक्तानां नामान्येव हरन्त्यघम्।**
**अविश्रान्तप्रयुक्तानि तान्येवार्थकराणि च॥** [१]

(स्वर्गखण्ड ४८/४९)

जर नामापराधी व्यक्ती निरंतर नाम जपतील तर एकमात्र नामदेवच त्या अपराधांस दूर करतात. पाहा, नामापराध नष्ट करण्याचा उपाय किती कठीण आहे. म्हणूनच

(१) नामापराधयुक्त व्यक्तींची पापे आणि अपराध नामच नष्ट करते. निरंतर नाम केल्यानेच प्रेम रूप अर्थ वा प्रयोजन (उद्दिष्ट) प्राप्त होते.

बुद्धिमान मनुष्य नामापराध वर्जनपूर्वक नाम घेतात. जर असा प्रयत्न केला गेला की नामापराध होऊच नये तर अत्यंत शीघ्रच शुद्धनाम उदित होते.

कुणी मनुष्य नाम जपत आहे, नाम घेता-घेता त्याच्या शरीरावर रोमांच उठतो, डोळ्यांतून अश्रुधारासुद्धा वाहू लागतात, तरीही नामापराधामुळे त्याच्याद्वारे उच्चारित नाम (शुद्ध) नाम नसते. म्हणूनच साधकांस याविषयी विशेष सावधानता बाळगायला हवी, अन्यथा शुद्धनाम उच्चारण होऊ शकणार नाही.

विजय–प्रभो! शुद्धनाम कशास म्हणतात?

बाबाजी–दहा प्रकारच्या नामापराधांरहित हरिनामालाच शुद्धनाम म्हणतात. अक्षरांची शुद्धता अथवा अशुद्धता आदींचा यात कुठलाही विचार होत नाही.

**नामैकं यस्य वाचि स्मरण पथगतं श्रोत्रमूलं गतं वा**
**शुद्धं वाशुद्धवर्णं व्यवहितरहितं तारयत्येव सत्यम्।**
**तच्चेद्देहद्रविणजनता लोभपाषाणमध्ये**
**निक्षिप्तं स्यान्नफलजनकं शीघ्रमेवात्र विप्र॥**

(पद्मपुराण, स्वर्गखण्ड ४८/ ६०-६१)

या श्लोकाचा अर्थ हा आहे की–हे विप्रवर! एक हरिनामदेखील ज्याच्या जिव्हेवर उदित होते, किंवा कर्णेंद्रियात प्रवेश करते, अथवा स्मरण-पथावर जागरूक होते, त्याचा ते नाम (प्रभू) अवश्यच उद्धार करेल. येथे नामोच्चारणामध्ये वर्णांची शुद्धता अथवा अशुद्धता, किंवा विधीनुसार शुद्ध उच्चारण अथवा अशुद्ध उच्चारण आदींचे महत्त्व नाही. अर्थात श्रीनाम या सगळ्यांचा काहीच विचार करीत नाहीत, परंतु विचारणीय हे आहे की जर ते सर्वशक्तिसंपन्न नाम शरीर, गृह, अर्थ-संपत्ती, पुत्र-परिवार आणि लोभ (कांचन, कामिनी आणि प्रतिष्ठादी) आदी पाषाणावर पतित झाले अर्थात त्यांच्या उद्देशाने घेतले घेतले गेले तर फळ शीघ्र उत्पन्न होत नाही.

ही बाधा दोन प्रकारची असते–सामान्य आणि बृहत् (मोठी). बाधा आल्यावर उच्चारलेले नाम–'नामाभास' होते. नामाभास उशीराने फळ प्रदान करते. बृहत् बाधा आल्यावर उच्चारलेले नाम–नामापराध बनते, जो निरंतर नामोच्चारणाशिवाय दूर होऊ शकत नाही.

विजय–मला तर असे प्रतीत होते की, साधकाकरिता नामापराधाचे ज्ञान असणे अत्यंत आवश्यक आहे. आपण कृपा करून आम्हांस नामापराधाचा विचार विस्तारपूर्वक सांगा.

बाबाजी–नामापराध दहा प्रकारचे असतात. पद्मपुराणात याचे फारच मार्मिक विश्लेषण प्राप्त होते–

**(१) सतां निन्दा नाम्नः परमपराधं वितनुते।**
**यतः ख्यातिं यातं कथमुसहते तद्विगर्हाम्॥**
**(२) शिवस्य श्रीविष्णोर्य इह गुण नामादिसकलं।**
**धिया भिन्नं पश्येत् स खलु हरिनामाहितकरः॥**
**(३) गुरोरवज्ञा (४) श्रुतिशास्त्रनिन्दनम्**
**(५) तथार्थवादो (६) हरिनाम्नि कल्पनम्।**
**(७) नाम्नो बलाद् यस्य हि पापबुद्धिर्न विद्यते तस्य यमैर्हि शुद्धिः॥**
**(८) धर्मव्रतत्यागहुतादिसर्वशुभक्रियासाम्यपिप्रमादः।**
**(९) अश्रद्दधाने विमुखेऽप्य शृण्वति यश्चोपदेशः शिवनामापराधः॥**
**(१०) श्रुतेऽपि नाममहात्म्ये यः प्रीतिरहितो नरः।**
**अहंममादि परमो नाम्नि सोऽप्यराधकृत्॥**[२]

---

(२) (१) संतांची निंदा श्रीनामानिकट भीषण अपराध विस्तार करते, ज्या नामपरायण संत-महात्म्यांच्याद्वारे श्रीकृष्ण नामाच्या महिमेचा संसारात प्रचार होतो, त्यांची निंदा श्रीनामप्रभू कशी काय सहन करू शकतील? म्हणून साधुसंतांची निंदा करणे पहिला अपराध आहे. (२) या संसारात जे मनुष्य बुद्धीद्वारे परम मंगलमय श्रीविष्णूंच्या नाम, रूप, गुण आणि लीला आदींमध्ये भेद दर्शन करतात, अर्थात भौतिक पदार्थांप्रमाणेच श्रीविष्णूंचे नाम, रूप, गुण आणि लीलास नामी-विष्णूंपेक्षा वेगळे मानतात, अथवा शिव आदी देवतांना विष्णूंपासून स्वतन्त्र अथवा विष्णूंच्या समान मानतात, त्यांचे ते हरिनाम (नामापराध) निश्चितच अहितकर आहे. (३) नाम-तत्त्वविद् गुरूस मरणशील आणि पंचभौतिक शरीरयुक्त साधारण मनुष्य मानून त्यांची अवज्ञा करणे; (४) वेद आणि सात्त्वत पुराण आदी शास्त्रांची निंदा करणे; (५) हरिनामाच्या महिमेस अतिस्तुती समजणे; (६) भगवान्नामास काल्पनिक समजणे; (७) ज्यांची श्रीनामाच्या बळावर पापकर्मे करण्याची प्रवृत्ती होते, त्यांची अनेक यम, नियम, ध्यान, धारणा आदी कृत्रिम योग-प्रक्रियांद्वारेदेखील शुद्धी होत नाही–हे निश्चित आहे. (८) धर्म, व्रत, त्याग, होम आदी प्राकृत शुद्ध कर्मांस अप्राकृत भगवान्नामासमान अथवा तुल्य समजणेदेखील प्रमाद किंवा असावधानी आहे;

विजय–कृपापूर्वक एकेका श्लोकाची वेगवेगळी व्याख्या करून सर्व अपराधांविषयी आम्हांस नीट समजावून सांगावे.

बाबाजी–पहिल्या श्लोकामध्ये दोन अपराधांचे वर्णन केलेले आहे. प्रथम अपराध हा आहे की–ज्या संतांनी कर्म, धर्म, ज्ञान, योग, तपस्या आदींचा संपूर्णपणे परित्याग करून अनन्य भावाने भगवन्नामाचा आश्रय घेतला आहे, त्यांची निंदा केल्याने मोठा अपराध होतो. कारण जे लोक या जगात नामाच्या वास्तविक माहात्म्याचा प्रचार करतात, त्यांची निंदा हरिनाम सहन करू शकत नाही. एकांतिक नामपरायण संतांची निंदा करू नये, उलट त्यांना सर्वश्रेष्ठ साधू मानून त्यांच्या संगात राहून नामकीर्तन केले पाहिजे. असे केल्याने नामाची लवकरच कृपा होते.

विजय–प्रथम अपराध तर नीट समजला, कृपया दुसऱ्या अपराधालाही अशाप्रकारे समजावून सांगा.

बाबाजी–पहिल्या श्लोकाच्या दुसऱ्या भागात द्वितीय अपराधाचा उल्लेख आहे, त्याची व्याख्या दोन प्रकारे केली जाऊ शकते. पहिली व्याख्या अशी आहे की, देवतांचे अग्रणी सदाशिव आणि श्रीविष्णू, दोघांचीही नावे आणि गुण आदींस बुद्धीद्वारे वेगवेगळे मानल्याने नामापराध होतो. तात्पर्य हे आहे की, सदाशिवांस भगवान श्रीविष्णूंपासून वेगळे एक स्वतन्त्र शक्तिसिद्ध ईश्वर मानण्याने बहुईश्वरवादाचा दोष उपस्थित होतो, यामुळे भगवंताप्रती अनन्य भक्तीमध्ये बाधा निर्माण होते. म्हणून श्रीकृष्णच सर्वेश्वर आहेत आणि त्यांच्या शक्तीनेच शिव आदी देवतांचे ईश्वरत्व सिद्ध आहे–या देवतांची अन्य कुठली वेगळी शक्ति-सिद्धता नाही–असा निश्चय करून हरिनाम केल्याने नामापराध होत नाही. दुसरी व्याख्या अशा प्रकारे आहे–शिवस्वरूप अर्थात सर्वमंगलमय स्वरूप श्रीभगवंताच्या नाम, रूप, गुण आणि लीलांस भगवंताच्या नित्यसिद्ध विग्रहापासून वेगळे मानल्याने नामापराध होतो. म्हणून कृष्ण-स्वरूप, कृष्णनाम, कृष्णगुण तथा कृष्णलीला हे सर्व अप्राकृत आणि परस्पर अपृथक

---

(९) श्रद्धाहीन आणि नाम-श्रवण करण्यापासून विमुख मनुष्यास नामाचा उपदेश देणेदेखील नामापराध आहे. (१०) नामाच्या अद्भुत महिमेस ऐकूनही जे (रक्त, मांस आणि त्वचेच्या) शरीरात 'मी' आणि सांसारिक भोग्य पदार्थांत 'माझे' अशी बुद्धी ठेवतात तथा श्रीनामोच्चारणामध्ये प्रीती अथवा आग्रह दाखवीत नाहीत, तेदेखील नामापराधी आहेत.

आहेत–असे ज्ञान आणि विज्ञान लाभ करून कृष्णनाम जपावे, नाही तर अपराध होतो. अशाप्रकारे संबंधज्ञान प्राप्त करून कृष्णनाम करण्याचा नियम आहे.

विजय–पहिल्या आणि दुसऱ्या नामापराधास यथायोग्य समजलो, कारण आपण कृपा करून आम्हास आधीच श्रीकृष्णाच्या अप्राकृत चिन्मय-स्वरूपाच्या गुण-गुणी, नाम-नामी आणि अंश-अंशी आदी भेदाभेद तत्त्वास समजाविले आहे. जे नामश्रय ग्रहण करतात, त्यांच्याकरिता श्रीगुरुदेवांकडून चित् आणि अचित् तत्त्वातील पार्थक्य (भेद) आणि त्यांचे परस्पर संबंध ज्ञान जाणणे आवश्यक आहे. आता तृतीय अपराधाची व्याख्या करावी.

बाबाजी–(३) जे नामतत्त्वाच्या सर्वश्रेष्ठतेची शिकवण देतात, ते नामगुरू असतात, त्यांच्याप्रती अचला भक्ती ठेवणे कर्तव्य आहे. जे लोक नामगुरूंच्या प्रती अशी अवज्ञा करतात की ते केवळमात्र नामशास्त्रापर्यंतच जाणतात; परंतु जे वेदान्तदर्शन आदी शास्त्रांचे पंडित आहेत ते अधिक शास्त्रांचे अर्थ जाणतात, ते नामपराधी आहेत. वास्तविक नाम-तत्त्वविद् गुरूपेक्षा उत्तम गुरू नाहीत, त्यांना कनिष्ठ मानल्याने अपराध होईल.

विजय–प्रभो! जर आमची आपल्याप्रती शुद्ध भक्ती असेल, तरच आमचे कल्याण आहे. कृपया चौथ्या अपराधाची व्याख्या समजवावी.

बाबाजी–(४) श्रुतींमध्ये जेथे परमार्थाविषयी विशेष शिकवण दिलेली आहे, तेथे श्रीनामाचे सर्वश्रेष्ठ रूपात वर्णन केलेले आहे. जसे (हरिभक्तिविलास ११/२७४-२७६ धृत ऋग्वेद १ मण्डल, १५६ सूक्त, ३ म.)–

**ॐ आस्य जानन्तो नाम चिद्विविक्तन महस्ते विष्णो सुमतिं भजामहे** (३)
**ॐ तत्सत्। ॐ पदं देवस्य नमसा व्यन्तः श्रवस्यवश्रव आपन्नमृक्तम्।**
**नामानि चिद्दधिरे यज्ञियानि भद्रायन्ते रणयन्तः संदृष्टौ॥** (४)

---

(३) हे विष्णो! जो मनुष्य तुमच्या नावाचे विचारपूर्वक सत्य उच्चारण करतो, त्यांच्या भजन आदी नियमांमध्ये काहीच गडबड नसते. अर्थात श्रीनाम-ग्रहणात देश, काल आणि पात्र (अधिकारी) यांच्या विषमतेचा विचार नसतो. कारण नामच ज्ञान-स्वरूप आहे, सर्वप्रकाश स्वरूप आहे आणि परम ज्ञातव्य विषय आहे. म्हणूनच आम्ही नामाची वंदना करतो आहे.

**ॐ तमुस्तोतारः पूर्वं यथाविद ऋतस्य गवर्भं जनुषा पिपर्त्तन।**
**आस्य जानन्तो नाम चिद्विविक्तन महस्ते विष्णो सुमतिं भजामहे॥**(५)

अशा प्रकारे सर्व वेदांमध्ये आणि उपनिषदांमध्ये नामाचा महिमा पाहिला जातो. ज्या मंत्रांमध्ये नामाचा महिमा प्रकाशित आहे, त्यांची निंदा केल्याने नामापराध होतो. काही लोक दुर्भाग्यवश श्रुतींच्या दुसऱ्या उपदेशांचा सन्मान अधिक करतात तथा नाम-महिमा-सूचक श्रुति-मंत्रांची उपेक्षा करतात. असे करणे पण नामापराध आहे. या नामापराधाचे फळ असे असते की अपराध्याला नामात रुची होत नाही. तुम्ही लोक या प्रधान श्रुतिमंत्रांना श्रुतींचा प्राण समजून हरिनाम करावे.

विजय–प्रभो! आपल्या श्रीमुखातून जणू अमृत बरसते आहे. आता पाचव्या अपराधाविषयी समजून घेण्याची मोठी उत्कंठा लागली आहे.

बाबाजी–(५) हरिनामात अर्थवादच पाचवा नामापराध आहे. जैमिनीसंहितेमध्ये या अपराधाचा उल्लेख अशाप्रकारे केलेला आहे–

**श्रुतिस्मृतिपुराणेषु नाममाहात्म्यवाचिषु।**
**येऽर्थवाद इति ब्रूयुर्न तेषां निरयक्षयः।।**(६)

---

(४) हे परम पूजनीय! आपल्या चरणकमळी मी वारंवार प्रणाम करतो आहे, कारण याच चरणकमळांची महिमा ऐकून भक्तजन यश आणि मोक्षाचे अधिकारी होऊ शकतात. इतकेच काय तर, जे आपल्या चरणकमळांचे निर्वाचन करण्याकरिता वाद-विवादात प्रवृत्त होतात, आणि परस्पर कीर्तनाद्वारे त्यांचे अनुशीलन करतात, त्यांच्या अंतःकरणात आसक्तीचा प्रादुर्भाव झाल्यानंतर ते त्या चरणांचा साक्षात्कार करण्याकरिता श्रीचैतन्य-स्वरूप आपल्या नामाचाच आश्रय घेतात.

(५) उ' अर्थात अत्यंत विस्मयपूर्वक म्हटले जाऊ शकते, की त्या प्राचीन, प्रसिद्ध, पूर्ण 'तत् आणि 'सत्' पदार्थास श्रीकृष्णासंबंधी जसे तुम्ही लोक जाणता, तसेच कीर्तन करून जन्माची सार्थकता करावी, पण आपण तसे करीत नाही. याचे कारण हे आहे की जेव्हा आम्ही हे जाणत नाही की त्यांचे स्तव अथवा कीर्तन कसे केले जाते, तेव्हा चिर-निरवच्छिन्न 'नाम' जपणेच आपले नित्य कार्य आहे.

(६) भगवन्नामाच्या महिमेस प्रकाश करणारे वेद-पुराण आणि उपनिषद आदींच्या मंत्रांस जे अतिस्तुती रूप 'अर्थवाद' मानतात, ते अक्षय नरकात गमन करतात आणि तेथून त्यांचे कधीच परतणे होत

ब्रह्मसंहितेमध्ये बोधायनप्रती श्रीभगवंत म्हणतात–

**यन्नामकीर्तनफलं विविधं निशम्य न श्रद्दधाति मनुते यदुतार्थवादम्।**
**यो मानुषस्तमिह दुखचये क्षिपामि संसार घोरविविधार्त्तिनिपीडिताङ्गम्॥**(७)

शास्त्रांमध्ये असे म्हटले गेले आहे की भगवन्नामात भगवंताच्या सर्व शक्ती निहीत आहेत, नाम पूर्ण चिन्मय आहे, म्हणूनच ते मायिक जगतास ध्वंस करण्यास समर्थ आहे.

**कृष्णेति मङ्गलं नाम यस्य वाचि प्रवर्त्तते।**
**भस्मीभवन्ति राजेन्द्र महापातक कोटयः॥**(७अ)

(विष्णुधर्मपुराण)

**नान्यत् पश्यामि जन्तूनां विहाय हरिकीर्त्तनम्।**
**सर्वपापप्रशमनं प्रायश्चित्तं द्विजोत्तमः॥**(८)

(बृ. पु.)

**नाम्नोऽस्य यावती शक्तिः पापनिर्हरणे हरेः।**
**तावत् कर्त्तुन शक्नोति पातकं पातकी जनः॥**(९)

---

नाही.

(७) जो मनुष्य हरिनामाचा महिमा ऐकूनही त्याच्या प्रती श्रद्धायुक्त होत नाही, उलट त्या महिमेस अतिस्तुती समजतो, त्यास मी सर्व प्रकारच्या दुःखांनी परिपूर्ण घोर संसारात फेकून देतो.

(७अ) हे राजन! ज्यांच्या तोंडात परम मंगलस्वरूप 'कृष्ण' नाम निवास करते, त्यांची कोटी-कोटी महापातके जळून भस्म होऊन जातात.

(८) हे विप्रवर! जे समस्त पापांस ध्वंस करणाऱ्या प्रायश्चित्त-स्वरूप श्रीहरिनामाचा परित्याग करतात, मी त्यांना पशूव्यतिरिक्त आणखी काहीही समजत नाही.

(९) श्रीहरीच्या या नामांमध्ये पापहरण करण्याची जितकी शक्ती विद्यमान आहे, अत्यंत पापी व्यक्तीदेखील इतके पाप करण्यास समर्थ नाही.

(बृहद्विष्णुपुराण)

हे सर्व नाम-माहात्म्य परम सत्य आहे, यास ऐकून कर्म आणि ज्ञानव्यवसायी लोक आपापल्या व्यवसायाच्या रक्षणाकरिता अर्थवादाची कल्पना करतात. अर्थवादाचे तात्पर्य हे आहे की शास्त्रांमध्ये नामाचा जो महिमा सांगितली गेली आहे, वास्तविक सत्य नाही, तो तर केवळ नामामध्ये रुची उत्पन्न करविण्याकरिता वाढवून-चढवून सांगितला गेला आहे. या नामापराधाने अपराधी व्यक्तीची नामात रुची होत नाही. तुम्ही दोघे शास्त्रीय वचनांवर पूर्ण विश्वास करून हरिनाम करा. जे अर्थवाद करतात, त्यांचा कधीही संग करू नये. इतकेच काय तर, जर अकस्मात कधी ते तुमच्या नजरेसमोर जरी दिसले तरी समस्त कपड्यांसकट स्नान करून घ्यावे–ही श्रीचैतन्य महाप्रभूंची शिकवण आहे.

विजय–प्रभो! गृहस्थ लोकांकरिता शुद्ध हरिनाम उच्चारण करणे सरळ वाटत नाही, कारण ते सर्व समयी नामापराधी असत् पुरूषांनी घेरलेले असतात. आमच्या सारख्या ब्राह्मण-पंडितांकरिता सत्संग मोठेच कठीण आहे. हे प्रभो! आपण कृपा करून आम्हांस कुसंग सोडण्याची शक्ती प्रदान करा. आपल्या तोंडाने जितके अधिक श्रवण करतो आहे, श्रवणाची पिपासा अधिकच वाढत चालली आहे. आता सहावा नामापराध सांगण्याची कृपा करावी.

बाबाजी–(६) भगवंताच्या नामांना कल्पित मानल्याने सहावा नामापराध होतो. मायावादी आणि भौतिक कर्मवादी निर्विकार आणि नाम-रूप-रहित ब्रह्मास परमतत्त्व मानतात.

जे असे मानतात की ऋषींनी आपल्या कार्यांच्या सिद्धीकरिता राम-कृष्ण आदी नामांची कल्पना केली आहे–ते नामापराधी आहेत. हरिनाम काल्पनिक नाही, तर नित्य आणि चिन्मय वस्तू आहे–भक्तीद्वारे चित् इंद्रियांवर आविर्भूत मात्र होते. सद्गुरू आणि वेद-शास्त्र हीच शिकवण देतात. अतः हरिनाम परम सत्य मानावे; त्यास कल्पित समजल्याने कधीही नामाची कृपा प्राप्त करता येत नाही.

विजय–प्रभो! आपल्या अभय चरणकमलांचा आश्रय करण्यापूर्वी कुसंगामुळे आम्हीदेखील असेच समजत होतो, परंतु आपल्या कृपेने तशी बुद्धी आता राहिली नाही. आता सातव्या नामापराधाची व्याख्या करावी.

बाबाजी–(७) जे नामाच्या बळावर पाप-कर्मांत प्रवृत्त होतात, ते नामापराधी आहेत. नामाच्या भरवशावर जी पापकर्मे केली जातात, ती पापसमूहे यम-नियम आदींनी दूर होत नाहीत, कारण अशी पापसमूहे नामापराधाच्या श्रेणीमध्ये आल्याने केवळमात्र नामापराध-विध्वंसक पद्धतीद्वारेच नष्ट केली जाऊ शकतात.

विजय–प्रभो! जर असे कुठलेच पाप नाही जे हरिनामामुळे नष्ट होत नाही, तर नामोच्चारणकारींची पापे नष्ट न होऊन अपराधाच्या श्रेणीत का येतात?

बाबाजी–जीव ज्यादिवशी शुद्धनाम ग्रहण करतो, त्यादिवशी त्याच्याद्वारे घेतलेले एक हरिनामाच त्याचे प्रारब्ध आणि अप्रारब्ध संपूर्ण-पापराशीस ध्वंस करते आणि त्या नामाच्या पश्चात जे दुसरे नाम ग्रहण केले जाते, त्यायोगे नामामध्ये प्रेम निर्माण होते. म्हणून शुद्ध हरिनाम करणाऱ्या पुरुषांमध्ये पाप-बुद्धी राहणे तर दूरचीच गोष्ट, पुण्यकर्मांमध्ये देखील त्यांची रुची नसते. नामाश्रित व्यक्ती कधीच पाप करीत नाहीत. परंतु यात एक विचार आहे, तो असा की साधक पुरुष नाम तर घेतात, परंतु त्यांचा काहीकाही नामापराध राहिल्याने त्यांचे उच्चारित नाम केवळ 'नामाभास' असते, शुद्धनाम नसते. नामाभासाच्या आधी केलेली पापे ध्वंस होतात आणि नवीन पापांमध्ये रुची निर्माण होत नाही, परंतु पूर्व अभ्यासामुळे काही काही पापे राहून जातात, ती नामाभासामुळे हळूहळू नष्ट होतात, अकस्मात कधी नवीन पापेपण होतात, परंतु ती सुद्धा नामाभासाने दूर होऊन जातात. परंतु जर तो नामाश्रयी पुरुष असा विचार करीत असेल की जेव्हा नामाच्या प्रभावाने सर्व पापे नष्ट होतात, तर मग मीदेखील जी पापे करतो, तीसुद्धा अवश्यच नष्ट होऊन जातील आणि असे समजून तो पाप कार्यांत प्रवृत्त होतो, तर तो नामापराधी आहे.

विजय–आता आठवा नामापराध सांगावा.

बाबाजी–(८) धर्म अर्थात वर्णाश्रम आणि दानादी धर्म, व्रत, त्याग अर्थात समस्त प्रकारच्या शुभ कर्मांचा त्याग अर्थात समस्त कर्मफल त्यागरूप संन्यास-धर्म, नाना प्रकारचे यज्ञ आणि अष्टांगयोग–ही सगळी सत्कर्मे आहेत. त्यांना सोडून शास्त्रांमध्ये ज्या अन्य शुभ क्रिया निर्धारित केलेल्या आहेत–त्या सर्व जड धर्मांतर्गत आहेत; म्हणून प्राकृत आहेत. परंतु भगवन्नाम प्रकृतीच्या पलीकडले आहे. पूर्वोक्त समस्त सत्कर्मे उपायरूपात उपस्थित होऊन अप्राकृत सुखरूप उपेय देण्याची प्रतिज्ञा करतात, म्हणूनच ते केवळ उपायमात्र आहेत–उपेय नाहीत. परंतु हरिनाम

साधनकाळी उपाय असूनही फळाच्या वेळी स्वयं उपेय आहे. अतः हरिनामासोबत कुठल्याही सत्कर्मांची तुलना केली जाऊ शकत नाही. जे लोक असे करतात, अर्थात हरिनाम आणि सत्कर्मांना समान मानतात, ते नामापराधी आहेत. जर कुणी त्या कर्मांपासून मिळणाऱ्या तुच्छ फळांकरिता श्रीहरिनामाकडे प्रार्थना करतात, तर ते नामापराधी आहेत. कारण त्यामुळे अन्यान्य सत्कर्मांसोबत श्रीनामाची साम्यबुद्धी होते. तुम्ही लोक सत्कर्मांच्या फळांस तुच्छ जाणून हरिनामाचा अप्राकृत बुद्धीने आश्रय घ्या–याचेच नाव अभिधेयज्ञान आहे.

विजय–प्रभो! आम्ही हे यथायोग्य समजलो की, हरिनामासमान आणखी काहीच नाही. आता नवव्या अपराधासंबंधी सांगावे.

बाबाजी–(९) वेदांमध्ये जितक्या प्रकारचे उपदेश आहेत, त्यात हरिनामाचा उपदेश सर्वश्रेष्ठ आहे. ज्यांची अनन्य भक्तीमध्ये श्रद्धा झाली आहे, तेच हरिनामाचे यथार्थ अधिकारी आहेत. ज्यांच्यात तशी श्रद्धा नाही, जे अप्राकृत हरिसेवेपासून विमुख आहेत, आणि हरिनाम श्रवण करण्यात ज्यांना अरुची आहे, त्यांना हरिनामाचा उपदेश केल्याने नामापराध होतो. अशा लोकांकरिता हाच उपदेश श्रेयस्कर ठरेल की हरिनामच सर्वश्रेष्ठ आहे आणि हरिनाम ग्रहण केल्यानेच सर्वांचे कल्याण होईल. योग्य अधिकाऱ्याव्यतिरिक्त दुसऱ्यांस हरिनाम देऊ नये. जेव्हा तुम्ही परम-भागवत व्हाल, तेव्हा तुम्हीदेखील शक्तीचा संचार करू शकाल. सर्वप्रथम जिवात शक्ती संचार करून त्याच्यात नामाप्रती श्रद्धा निर्माण करावी, नंतर त्यास हरिनामाचा उपदेश करावा. जोपर्यंत मध्यम वैष्णव राहाल, तोपर्यंत अश्रद्धाळू, विमुख आणि विद्वेषी लोकांची उपेक्षा करावी.

विजय–प्रभो! काही लोक अर्थ-संपत्ती अथवा प्रतिष्ठेच्या लोभापायी अनाधिकाऱ्यासही हरिनाम प्रदान करतात, त्यांचे ते आचरण कसे आहे?

बाबाजी–ते नामापराधी आहेत.

विजय–कृपया दहाव्या अपराधाची व्याख्या करावी.

बाबाजी–(१०) जे लोक जडीय संसारात "मी अमुक आहे आणि ही सारी संपत्ती आणि पुत्र-परिवार आदी माझे आहेत "–अशा प्रकारची बुद्धी ठेवून मत्त राहतात, संयोगवश कधी क्षणिक वैराग्य किंवा ज्ञान उदित झाल्यावर पंडितांकडून

हरिनाम महिमा ऐकतात; आणि नंतर जाणूनबुजूनही नामामध्ये अनुराग ठेवीत नाहीत, तेसुद्धा नामापराधी आहेत; म्हणून शिक्षाष्टकाच्या दुसऱ्या श्लोकामध्ये म्हटले गेले आहे–

**नाम्नामकारि बहुधा निज सर्वशक्तिस्तत्रार्पिता नियमितः स्मरणे न कालः।**
**एतादृशी तव कृपा भगवन्ममापि दुर्दैवमीदृशमिहाजनि नानुरागः॥**(१०)

बाबाजी–या दहा प्रकारच्या नामापराधांतून मुक्त होऊन निरंतर हरिनाम करा. श्रीनाम शीघ्रच कृपा करून प्रेम प्रदान करून परमभागवत करतील.

विजय–प्रभो! पाहतो आहे की मायावादी, कर्मी आणि योगी–सर्वच नामापराधी आहेत. अशा अवस्थेत जेव्हा खूपसारे लोक मिळून जे नामसंकीर्तन करतात, त्यात शुद्ध वैष्णवांनी योगदान करावे किंवा नाही?

बाबाजी–ज्या संकीर्तनमंडळीत नामापराधी व्यक्ती प्रधान गायक आदींच्या रूपात कीर्तन करतात, त्यात वैष्णवजनांनी योगदान करणे योग्य नाही, परंतु ज्या संकीर्तनमंडळीत शुद्ध वैष्णव अथवा साधारण नामाभासी व्यक्तींची प्रधानता असते, त्यात योगदान केल्याने दोष लागत नाही, उलट नामसंकीर्तनामध्ये आनंद लाभ होतो. आज अधिक रात्र झाली आहे, उद्या नामाभासासंदर्भात सांगेन.

विजय आणि ब्रजनाथ नाम-प्रेमाने गद्‌गद होऊन बाबाजी महाशयांची स्तुती करीत त्यांची चरणधूळ मस्तकी धारण करून "हरि हरये नमः, कृष्ण यादवाय नमः" असे कीर्तन करीत घरी परतले.

**॥ चोवीसावा अध्याय समाप्त ॥**



(१०) भगवान! आपण गोविन्द, गोपाल, वनमाळी आदी अनेक नामे प्रकट करून ठेवलेली आहेत आणि त्या नामांमध्ये आपली संपूर्ण शक्ती निहीत करून ठेवली आहे. श्रीनामस्मरणात काल-अकालाचा विचारदेखील ठेवलेला नाही. आपली अशा प्रकारची कृपा आहे आणि इकडे नामापराधरूप दुर्दैवामुळे अशा सुलभ हरिनामामध्येदेखील माझी रुची होत नाही.

# पंचवीसावा अध्याय (प्रमेयांतर्गत नामापराधाचा विचार)

दुसऱ्या दिवशी संध्याकाळनंतर लगेचच विजय आणि ब्रजनाथ वृद्ध बाबाजी महोदयांकडे पोहोचले आणि त्यांना साष्टांग दंडवत-प्रणाम करून बसले. संधी मिळताच विजय नम्रतापूर्वक म्हणाले–प्रभो! आपण कृपा करून आम्हांस नामाभास-तत्त्वासंबंधी संपूर्णपणे सांगण्याची कृपा करावी, आम्ही नामतत्त्वाचे रहस्य जाणण्याकरिता अत्यंत व्याकूळ आहोत.

बाबाजी म्हणाले–तुम्ही लोक धन्य आहात. श्रीनामतत्त्वास समजण्याकरिता नाम, नामाभास आणि नामापराध–या तीन विषयांस यथायोग्य जाणणे आवश्यक असते. नाम आणि नामापराधासंबंधी मी बरेच काही सांगितले आहे; यावेळी नामाभासाविषयी सांगतो आहे. नामाच्या आभासास नामाभास म्हणतात.

विजय–नामाभास कशास म्हणतात आणि तो किती प्रकारचा असतो?

बाबाजी–'आभास' शब्दाने 'कांती', 'छाया', आणि 'प्रतिबिंब' यांचा बोध होतो. एखाद्या प्रकाशवान पदार्थाची जी कांती निघते तिला 'कांती' वा 'छाया' म्हणू शकतो. म्हणून नामरूप सूर्याचे दोन प्रकारे आभास होतात–एक 'नामछाया' आणि दुसरा 'नाम-प्रतिबिंब'. तत्त्वविद् पुरुष भक्त्याभास, भावाभास, नामाभास, वैष्णवाभास आदी शब्दांचा व्यवहार सर्वकाळ करीत असतात. सर्व प्रकारचे आभास दोन प्रकारचे असतात–'प्रतिबिंब' आणि 'छाया'.

विजय–वैष्णव लोक हरिनामाचे अनुशीलन करतात, जेव्हा ते भक्त्याभासासोबत नामाचे अनुशीलन करतात, तेव्हा त्यांचे अनुशीलन झालेले नाम–'नामाभास' म्हणविले जाते. ते स्वयंदेखील वैष्णव-आभास असतात–शुद्ध वैष्णव नाहीत. भाव आणि भक्ती–एकच वस्तू आहे; केवळ अवस्था भेदाने भिन्न-भिन्न नामांनी परिचित होते.

विजय–कुठल्या अवस्थेत जीव 'वैष्णवाभास' म्हणविले जातात?

बाबाजी–श्रीमद्भागवत (११/२/४७) म्हणते–

**अर्चायामेव हरये पूजां यः श्रद्धयेहते।**
**न तद्भक्तेषु चान्येषु स भक्तः प्राकृतः स्मृतः॥**[१]

या श्लोकामध्ये ज्या 'श्रद्धा' शब्दाचा उल्लेख आहे, ती शुद्ध श्रद्धा नाही, तर श्रद्धाभास आहे, कारण भगवद्भक्तांची पूजा सोडून कृष्ण-पूजेमध्ये जी श्रद्धा होते, ती शुद्ध श्रद्धेची एकतर छाया असते अथवा प्रतिबिंब. तशी श्रद्धा लौकिक श्रद्धामात्र असते, अप्राकृत श्रद्धा नाही. म्हणूनच ज्यांच्यात अशी श्रद्धा दिसून येते, त्यांना प्राकृत भक्त किंवा वैष्णवाभास समजावे. श्रीमन् महाप्रभूंनी श्रीरघुनाथदास गोस्वामींचे वडील आणि काका हिरण्य-गोवर्धन यांस 'वैष्णव-प्राय' म्हटले आहे. वैष्णव-प्राय शब्दाचा अर्थ हा आहे की शुद्धभक्ताप्रमाणे ते माला-मुद्रा आदी वैष्णव-वेष धारण करून 'नामाभास' करतात; परंतु वास्तविक ते शुद्धवैष्णव नाहीत.

विजय–मायावादी जर वैष्णव चिन्ह धारण करून नाम उच्चारण करतील तर त्यांना वैष्णवाभास म्हणू शकतो का?

बाबाजी–नाही, त्यांना वैष्णवाभासदेखील म्हणता येणार नाही; ते अपराधी आहेत, म्हणूनच त्यांना 'वैष्णवापराधी' म्हणता येईल. प्रतिबिंब-नामाभास आणि प्रतिबिंब-भावाभासाचा आश्रय घेतल्याने त्यांना वैष्णवाभास म्हणायला तर हवे, परंतु अत्यंत अधिक अपराधी असल्याने ते स्वयं 'वैष्णव' नामापासून वेगळे होतात.

विजय–प्रभो! कृपा करून शुद्धनामाचे लक्षण आणखीही स्पष्ट रूपात सांगा, ज्यामुळे आम्ही त्यास सरलतापूर्वक समजू शकू.

बाबाजी–अन्याभिलाषिता रहित आणि ज्ञान-कर्म आदींच्या आच्छादनांपासून रहित तथा अनुकूल भावाने नाम ग्रहण केल्याने शुद्ध नाम होते. नामाच्या चिन्मय भावास स्पष्ट रूपात प्रकट करून परमानन्द अनुभव करण्याची अभिलाषा अन्याभिलाष नाही. याव्यतिरिक्त नामाद्वारे पाप दूर करणे अथवा मोक्ष प्राप्त करणे आदी समस्त प्रकारच्या वासनांनाच 'अन्याभिलाष' म्हणतात. अन्याभिलाष राहिल्यास नाम शुद्ध होत नाही. ज्ञान, कर्म, योग आदी साधनांद्वारे त्यांच्यापासून

---

(१) जे श्रद्धापूर्वक भगवंताच्या अर्चा-मूर्तीस हरी मानून पूजा करतात, परंतु कृष्णांच्या अन्यजीव आणि भक्तांची श्रद्धापूर्वक पूजा करीत नाहीत, ते प्राकृत (कनिष्ठ) भक्त आहेत.

मिळणाऱ्या फळांची आशादेखील जोपर्यंत त्यागली जात नाही, तोपर्यंत शुद्धनाम होत नाही.

प्रतिकूल-भावांस हृदयातून काढून टाकून केवळ नामाच्या अनुकूल प्रवृत्तीसोबत जे नाम ग्रहण केले जाते, त्यास 'शुद्धनाम' म्हणतात. भक्तीच्या या लक्षणांस ध्यानात ठेवून विचार केल्याने हे स्पष्ट होते की नामापराध आणि नामभासरहित नामच शुद्धनाम आहे. म्हणूनच कलियुग पावनावतारी श्रीगौरचन्द्रांनी म्हटले आहे–

**तृणादपि सुनीचेन तरोरपि सहिष्णुना।**
**अमानिना मानदेन कीर्त्तनीयः सदा हरिः॥**

अर्थात जे स्वतःस तृणाहूनही दीनहीन समजतात, जे वृक्षाहूनही अधिक सहिष्णू असतात, स्वयं मान मिळविण्याची अभिलाषा ठेवीत नाहीत आणि दुसऱ्यांस मान देतात, तेच सदासर्वदा श्रीहरिनाम-संकीर्तनाचे अधिकारी आहेत.

विजय–प्रभो! नामाभास आणि नामापराधात स्वरूपतः भेद काय आहे?

बाबाजी–शुद्धनाम न झाल्यास त्याला नामाभास म्हणतात. तो नामाभास एखाद्या अवस्थेमध्ये 'नामाभास' म्हणवला जातो आणि एखाद्या अवस्थेत 'नामापराध'. जेव्हा अज्ञानवश अर्थात भ्रम-प्रमादवश अशुद्ध नाम होते, तेव्हा त्यास 'नामाभास' म्हणतात आणि जेव्हा मायावाद आदींमुळे भोग आणि मोक्षाकरिता अशुद्ध नाम होते, तेव्हा त्यास 'नामापराध' म्हणतात. ज्या दहा प्रकारच्या अपराधांस मी आधी सांगितले आहे, ते जर सरल अज्ञतेमुळे होतात, तर अशा दशेमध्ये घेतलेले अशुद्ध नाम नामापराध नाही, नामाभास होतो. ही गोष्ट लक्षात ठेवायला हवी की नामाभासामध्ये जोपर्यंत नामापराधाची लक्षणे नसतात, तोपर्यंत अशी आशा ठेवता येते की नामाभास दूर होईल आणि शुद्धनाम उदित होईल. परंतु नामापराध झाल्यावर नामोदय होणे मोठे कठीण असते. मी नामापराध दूर करण्याकरिता जो विधी सांगितली आहे, त्याव्यतिरिक्त कुठल्याही उपायाद्वारे कल्याण होऊ शकत नाही.

विजय–नामाभास करणाऱ्या मनुष्यांस काय करायला हवे ज्यामुळे त्यांचा नामाभास 'शुद्धनाम' होऊ शकेल?

बाबाजी–शुद्धभक्तांचा संग करणे योग्य आहे. शुद्धभक्तांसोबतच राहून त्यांच्या आदेश आणि निर्देशानुसार नाम केल्याने शुद्धभक्तीमध्ये रुची होते, त्यावेळी साधकाच्या रसनेवर (जिव्हेवर) जे 'नाम' आविर्भूत होते, ते शुद्धनाम असते. सोबतच नामापराधी व्यक्तींच्या संगाचा यत्नपूर्वक त्याग करणे आवश्यक आहे. कारण नामापराधींच्या संगात राहिल्याने शुद्धनामाचा उदय होत नाही. सत्संगच जिवांच्या कल्याणाचा एकमात्र हेतू आहे. म्हणून प्राणेश्वर श्रीगौरांगदेवांनी सनातन गोस्वामींस हा उपदेश दिला होता–'सत्संगच' भक्तीचे मूळ आहे. योषित (स्त्री) संग आणि अभक्त संग, या दोहोंस सर्वथा त्यागून सत्संगामध्ये कृष्णनाम करा.

विजय–प्रभो! आपल्या स्त्रीचा त्याग केल्याशिवाय साधक शुद्धनाम घेऊ शकत नाही का?

बाबाजी–स्त्रीसंग सोडणेच कर्तव्य आहे. गृहस्थ-वैष्णव आपल्या विवाहिता स्त्रीसोबत अनासक्त भावात राहून वैष्णव संसाराची समृद्धी करतात. अशा संगास स्त्रीसंग म्हणत नाही. स्त्रीप्रती पुरुषाची आसक्ती तथा पुरुषाप्रती स्त्रीच्या आसक्तीचे नावच 'योषित-संग' आहे. याच आसक्तीचा त्याग करून गृहस्थ व्यक्ती जर कृष्णनाम ग्रहण करतील, तर ते निश्चितच परम पुरुषार्थ प्राप्त करू शकतील.

विजय–नामाभास किती प्रकारचे असतात?

बाबाजी–श्रीमद्भागवतात नामाभास चार प्रकारचे सांगितले आहेत–

**साङ्केत्यं पारिहास्यं वा स्तोभं हेलनमेव वा।**
**वैकुण्ठनामग्रहणमशेषाघहरं विदुः॥**[२]

(श्रीमद्भा. ६/२/१४)

नामतत्त्व आणि संबंधतत्त्वाने अनभिज्ञ व्यक्ती चार प्रकारे नामाभास करतात–(१) संकेताद्वारे, (२) परिहासाद्वारे, (३) स्तोभाद्वारे आणि (४) अवहेलाद्वारे.

---

(२) संकेत (दुसऱ्या वस्तूस लक्ष्य करून भगवन्नाम उच्चारण), परिहास (उपहासपूर्वक नामोच्चारण), स्तोभ (असन्मानपूर्वक नामोच्चारण) आणि हेला (अनादरपूर्वक नामोच्चारण)–हे चार छाया नामाभास आहेत. पंडितजन अशा नामाभासांस अशेष पाप-नाशक जाणतात.

विजय–सांकेत्य-नामाभास कशास म्हणतात?

बाबाजी–अन्य वस्तूंस लक्ष्य करून भगवंताचे जे नाम उच्चारित होते, त्यास सांकेत्य नामाभास म्हणतात. जसे अजामिलाने मरताना आपला पुत्र नारायण यास हाक मारली. भगवान कृष्णाचे नावदेखील नारायण आहे. म्हणूनच अजामिलाचे 'नारायण' नाम–सांकेत्य-नामाभास झाले. म्लेच्छ लोक डुकरास पाहून 'हाराम'. 'हाराम' म्हणत घृणा प्रदर्शित करतात. 'हाराम' शब्दात 'हा राम' हे दोन शब्द आहेत. म्हणून 'हाराम' शब्दाचे उच्चारणकारीदेखील या सांकेत्य नामास ग्रहण केल्याच्या फलस्वरूप जन्म-मृत्यूच्या चक्रातून मुक्ती मिळवितात. नामाभासाने मुक्ती होते–यास समस्त शास्त्र स्वीकारतात. नामाक्षरांसोबत मुकुन्दाचा (मुक्तिदाता भगवंताचा) संबंध दृढ रूपाने ओतप्रोत आहे. म्हणूनच नाम उच्चारण केल्याने भगवान मुकुन्दाचा स्पर्श होतो आणि या स्पर्शाने अनायासेच मुक्ती प्राप्त होते.

जी मुक्ती ब्रह्मज्ञानाद्वारे अनेक कष्टांनी प्राप्त होते, तीच मुक्ती नामाभासाद्वारे परिश्रमाशिवाय अनायासेच सर्व लोक प्राप्त करतात.

विजय–प्रभो! व्यर्थच आपल्या पांडित्याचा अभिमान करणारे मुमुक्षू (मुक्तीची स्पृहा असणारे), तत्त्वज्ञानरहित म्लेच्छगण तथा परमार्थ-विरोधी असुर लोक परिहास (थट्टा-मस्करी अशा उपहास रूपात) कृष्णनामाचे उच्चारण करून मुक्ती प्राप्त करतात–आपण शास्त्रांमध्ये अनेकानेक स्थानी असे वाचले आहे, कृपया स्तोभ-नामाभाससंबंधी सांगावे.

बाबाजी–दुसऱ्यांस कृष्णनाम करताना बाधा देतेवेळी असन्मानपूर्वक जे नाम उच्चारण होते, त्यास 'स्तोभ' म्हणतात. एक शुद्ध-वैष्णव हरिनाम उच्चारण करीत आहेत. त्याचवेळी एक पाखंडी व्यक्ती त्यांना पाहून चिडते आणि तोंड वाकडे करीत म्हणते–"तुझे हरि-केस्ट (कृष्ण) सर्वकाही करतील!"–हेच स्तोभाचे उदाहरण आहे. या स्तोभ-नामाने त्या पाखंडी व्यक्तीची मुक्ती होऊ शकते–नामाक्षराची अशी स्वाभाविक शक्ती आहे.

विजय–हेला नामाभास कशास म्हणतात?

बाबाजी–अनादरपूर्वक नाम-ग्रहण करण्यास हेला-नामाभास म्हणतात. प्रभासखंडामध्ये अनादरपूर्वक नाम ग्रहणाचे फळदेखील संसारातून उद्धार होणे असे

सांगितले आहे–

**मधुरमधुरमेतन्मङ्गलं मङ्गलानां सकल निगमवल्लीसत्फलं चित्स्वरूपम्।**
**सकृदपि परिगीतं श्रद्धया हेलया वा भृगुवर नरमात्रं तारयेत् कृष्णनाम॥**[३]

या श्लोकामध्ये 'श्रद्धया' शब्दाचा अर्थ आहे–आदरपूर्वक आणि 'हेलया' या शब्दाचा अर्थ आहे–अनादरपूर्वक. **'नरमात्रं तारयेत्'**–या वाक्याचे तात्पर्य हे आहे की कृष्णनाम मुसलमानांनादेखील मुक्ती प्रदान करते.

विजय–अवहेलनेने नाम जपल्याने अपराध होत नाही काय?

बाबाजी–जाणून-बुजून असत् उद्देशाने अवहेलना झाल्यावर अपराध होतो, परंतु अज्ञतापूर्वक हेला झाल्यावर नामाभास होतो.

विजय–नामाभासाचे फळ काय आहे आणि नामाभासाने काय-काय होऊ शकत नाही?

बाबाजी–नामाभासाने सर्व प्रकारचे भोग-सुख, मुक्ती आणि अष्ट प्रकारच्या सिद्धी–हे सर्व काही मिळविता येते, परंतु त्यायोगे कृष्णप्रेम रूप परमपुरुषार्थ प्राप्त करता येत नाही. परंतु नामाभासी असत्संग सोडून शुद्धभक्तांचा जर निरंतर संग करतो आणि त्यांच्या उपदेशांचे नियमित पालन करतो, तर तो शीघ्रच मध्यम वैष्णव बनतो आणि काही दिवसांतच शुद्धभक्ती प्राप्त करून वैष्णव-प्रेम प्राप्त करतो.

विजय–प्रभो! बरेचसे वैष्णवाभास वैष्णव-चिन्ह धारण करून निरंतर नामाभास करतात; परंतु बरेच दिवस असे करूनही ते प्रेम लाभ करीत नाहीत, याचे कारण काय आहे?

बाबाजी–यात एक रहस्य आहे. ते असे की वैष्णवाभास साधक शुद्धभक्ती प्राप्त करण्यायोग्य झाल्यावरही अनन्य भक्तीच्या अभावात ते साधू मानून ज्याचा संग

---

(३) हे भृगुवर! हे कृष्णनाम मधुराहून सुमधुर आहे. समस्त प्रकारच्या मंगलांचेदेखील मंगलस्वरूप आहे तथा निखिल श्रुतिसमूहरूपी लतेचे सुमधुर आणि सुपक्व फळ आहे. या चैतन्यस्वरूप तारक ब्रह्म श्रीकृष्णनामास एकदादेखील श्रद्धेने अथवा अवहेलापूर्वक कीर्तन का न केले असो, उक्त कृष्णनाम मनुष्य मात्राचा उद्धार करून टाकते.

करतात, ती व्यक्ती जर शुद्धभक्त नसून मायावादी असेल, तर त्याच्या कुसंगाने साधक मायावादी अपसिद्धांतांची शिकवण प्राप्त करतात, ज्यामुळे त्यांच्या उरल्या-सुरल्या भक्तीचा आभासही दूर होऊन जातो आणि क्रमशः वैष्णवापराधी आणि नामापराधींच्या श्रेणीमध्ये जाऊन पडतात. अशा अवस्थेत कल्याण होणे कठीणच नाही तर असंभव होऊन जाते. हो, जर त्यांची पूर्व-सुकृती प्रबळ असेल तर ती सुकृतीच त्यांना कुसंगापासून हटवून सत्संगात पोहोचविते आणि सत्संगात पुनः त्यांस शुद्ध वैष्णवता प्राप्त होते.

विजय–प्रभो! नामापराधाचे फळ काय असते?

बाबाजी–पाच महापापांना कोटीपट गूणल्याने जी पापराशी होते, त्यापेक्षाही नामापराध अधिक भयंकर असतो. म्हणून नामापराधाचे फळ सहजच अनुमान करता येते.

विजय–प्रभो! नामापराधाचे फळ फारच भयंकर असते, हे समजलो. परंतु नामापराधाच्या समयी जे नामाक्षर उच्चारित होते, त्याचे काही चांगले फळ होत नाही का?

बाबाजी–नामापराधी ज्या फळाची आकांक्षा करीत नामोच्चारण करतात, 'नाम' त्यास तेच फळ प्रदान करते. परंतु त्यास कृष्णप्रेमरूप फळ प्रदान करीत नाही. त्याचबरोबर त्या नामापराधीस आपल्या नामापराधाचे फळदेखील भोगावे लागते. नामापराधी शठतापूर्वक जे नाम घेतात, त्याचे फळ अशा प्रकारे असते–नामापराधी सर्वसाधारणपणे शठतापूर्वक (धूर्ततापूर्वक) नाम ग्रहण करतात, त्यांचे हे शठताशून्य नामोच्चारण सुकृतीच्या रूपात एकत्रित होते. हळूहळू ही सुकृती थोडी अधिक झाल्यानंतर त्या प्रभावाने शुद्धनाम ग्रहणकारी संतांचा संग प्राप्त होतो. सत्संगाच्या प्रभावाने नामापराधी निरंतर नाम उच्चारण करताकरता नामापराधापासून मुक्त होतात. या प्रणालीचे अवलंबन करून मोठमोठे मुमुक्षू (मुक्तीची कामना करणारे) देखील क्रमशः हरिभक्त झाले आहेत.

विजय–जर एक नामच समस्त पापांचे हरण करण्यास समर्थ आहे मग निरंतर (तैलधारावत) नामाची आवश्यकताच काय आहे?

बाबाजी–नामापराधींचे अंतःकरण आणि व्यवहार सर्वथा आणि सर्वदा

दूषित असतात. ते स्वभावतःच बहिर्मुख असतात. म्हणून साधु-व्यक्ती, साधु-वस्तू आणि सत्कालाप्रती त्यांना रुची नसते. कुपात्रात, कुसिद्धान्तात तथा कुकार्यात त्यांची नैसर्गिक रुची असते. निरंतर नामोच्चारणाने त्यांना असत्संग आणि असत्कर्माकरिता वेळच मिळत नाही. म्हणून कुसंग न झाल्याने नाम क्रमशः शुद्ध होऊन सत्-विषयात त्यांना रुची प्रदान करते.

विजय–प्रभो! आपल्या मुखातून श्रीनामतत्त्वाचा अमृत-प्रवाह निघून आमच्या कर्ण-पथातून हृदयात प्रवेश करून आम्हास नामप्रेम-रसात उन्मत्त करीत आहे. आज आम्ही नाम, नामाभास आणि नामापराधास वेगवेगळ्या प्रकारे यथायोग्य जाणून कृतार्थ झालो आहोत. आता उपसंहारात आमच्याकरिता जो उपदेश उचित आहे तो ऐकवण्याची कृपा करावी.

बाबाजी–पंडित जगदानन्दांच्या प्रेम-विवर्तग्रंथात एक अत्यंत सुंदर उपदेश आहे. तुम्ही सर्व त्याचे श्रवण करा–

**असाधु संगे भाई, कृष्णनाम नाहि हय।**(४)
**नामाक्षर बाहिराय बटे, तबु नाम कभु नय॥**

---

(४) लक्षात ठेवा, असाधुसंगामध्ये कृष्णनाम उदित होत नाही, तेथे केवळ नामाक्षरच मुखातून निघते, शुद्ध कृष्णनाम नाही. तेथे तर सर्वदा नामापराधच होतो. मोठ्या सौभाग्याने कधी कधी नामाभास होतो. परंतु हा नामाभास आणि नामापराध दोन्हीही कृष्णभक्तीकरिता बाधा स्वरूप आहेत. जर तुम्ही शुद्ध कृष्णनाम करू इच्छिता तर साधुसंग करा. त्याचबरोबर भोग,मोक्ष आणि सिद्धी इत्यादी कामनांचा परित्याग करा, दहा अपराध तथा मान-अपमान आदींपासून दूर रहावे. अनासक्त होऊन आवश्यकतेनुसार विषयांचा भोग करीत निरंतर कृष्णनाम कीर्तन करावे. जे कृष्णभक्तीकरिता अनुकूल आहे ते सर्व ग्रहण करावे, आणि जे कृष्णभक्तीस प्रतिकूल आहे, ते सोडून द्यावे. कर्म, ज्ञान आणि योग चेष्टांस सोडावे तशा मर्कट वैराग्यापासून सदा दूर रहावे, जे केवळ देहाची शोभा वाढवते. कृष्णच सर्वदा माझे पालक आणि रक्षक आहेत–असा पूर्ण विश्वास ठेवावा. दैन्यगुणास स्वीकारावे आणि कृष्णचरणी आत्मनिवेदन करावे. या सहा प्रकारच्या शरणागतीचे आचरण करून मायारूपी जंजाळास नष्ट करावे. जिवाकरिता साधुसंग प्राप्त करणे अत्यंत दुर्लभ आहे–असे जाणून भगवान श्रीकृष्ण स्वतःच साधू आणि भक्ताच्या रूपात नदिया (नवद्वीप) मध्ये अवतरित झाले आहेत. म्हणूनच हे बुद्धिमान पुरुषांनो! श्रीगौरांगदेवांच्या चरणकमलांचाच आश्रय ग्रहण करावा! त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ साधू किंवा गुरू कोण आहे? ते स्वयं कृष्ण आहेत.

**कभु नामाभास हय, सदा नाम अपराध।**
**ए सब जानिबे भाई, कृष्णभक्तिर बाध॥**

**यदि करिबे कृष्णनाम, साधु संग कर।**
**भुक्ति-मुक्ति-सिद्धी वांछा दूरे परिहर॥**

**'दश अपराध' त्यज्य मान अपमान।**
**अनासक्त्ये विषय भुञ्ज आर लह कृष्णनाम॥**

**कृष्णभक्तिर अनुकूल सब करह स्वीकार।**
**कृष्णभक्तिर प्रतिकूल सब कर परिहार॥**

**ज्ञान-योगचेष्टा छाड आर कर्मसंग।**
**मर्कट-वैराग्य त्यज याते देह-रंग॥**

---

वैरागी बंधू! जेव्हा तुम्ही इतरांना भेटाल, त्यांच्यांसोबत व्यर्थ गप्पा करू नयेत आणि ऐकूही नयेत.

जर गौरचन्द्रांच्या चरणी प्रीती ठेवू इच्छिता तर स्वप्नातही कधी स्त्रियांशी संभाषण करू नका. लक्षात ठेवा, तुम्ही घरी आपल्या स्त्रीला सोडून येथे भजन करण्याकरिता आला आहात. याविषयी छोट्या हरिदासाप्रती श्रीमन् महाप्रभूंचा कठोर व्यवहार सर्वदा ध्यानात ठेवा. उत्तम भोजन करू नका आणि उत्तम वस्त्रे परिधान करू नका. हृदयात सर्वदा राधाकृष्णाची सेवा करा. मोठ्या हरिदासाप्रमाणे रात्रंदिवस–सर्वकाळ हरिनाम करावे आणि अष्टकाल राधाकृष्णाची कुंजवनात सेवा करावी. गृहस्थ काय किंवा वैरागी (विरक्त) काय, श्रीगौरांग महाप्रभू सगळ्यांनाच सांगतात–सर्वांनी सदैव हरिनाम करावे. नाम जपल्याशिवाय एकही क्षण व्यर्थ दवडू नये–याचे सर्वदा स्मरण रहावे. अनेक साधनांची काहीच आवश्यकता नाही, केवळ हरिनाम करावे, यानेच तुमचे जीवन सार्थकी लागेल. बद्धजीवांवर कृपा करण्याकरिताच स्वयं कृष्णच 'नाम' बनले आहेत. पुनः ते कृष्णच गौर आणि गौरधाम बनले आहेत. अतः एकांत आणि सरल चित्ताने श्रीगौरचन्द्रांचे भजन करावे. असे केल्यानेच कृष्णचन्द्रांच्या चरणकमलांची प्राप्ती करता येईल. गौरभक्तांच्या संगात हा गौरांग! असे आळवीत 'हरे कृष्ण' नामाचे नृत्य करीत करीत कीर्तन करावे. असे केल्याने शीघ्रच तुम्ही कृष्णनाम-प्रेम प्राप्त करून घ्याल, ज्याचे वितरण करण्याकरिता श्रीचैतन्य महाप्रभू या जगात अवतीर्ण झाले आहेत.

कृष्ण आमार पाले, रक्षे–जान सर्वकाल।
आत्मनिवेदन दैन्ये घुचाओ जंजाल॥

साधु पावा कष्ट बड जीवेर जानिया।
साधु-भक्त रूपे कृष्ण आइला नदीया॥

गोरापद आश्रय करह बुद्धिमान।
गोरा वई साधु गुरु केवा आछे आन॥

वैरागी भाई ग्राम्य-कथा ना सुनिबे काने।
ग्राम्य–वार्ता ना कहिबे, जबे मिलिबे आने॥

स्वपनेओ ना कर भाई स्त्री सम्भाषण।
गृहे स्त्री छाडिया भाई आसियाछ वन॥

यदि चाह प्रणय राखिते गौरांगेर सने।
छोट हरिदासेर कथा थाके येन मने॥

भाल ना खाइबे, आर भाल ना परिबे।
हृदयेते राधाकृष्ण सर्वदा सेविबे॥

बड हरिदासेर न्याय कृष्णनाम बलिबे बदने।
अष्टकाल राधाकृष्ण सेविबे कुंजवने॥

गृहस्थ, वैरागी दूँहे बले गोराराय।
देख भाई नाम बिना जेन दिन नाही जाय॥

बहु अंग साधने भाई नाही प्रयोजन।
कृष्ण नामाश्रये शुद्ध करह जीवन॥

बद्धजीवे कृपा करि कृष्ण हैल 'नाम '।
कलि जीवे दया करि कृष्ण हैल गौरधाम॥

एकान्त सरल भावे भज गौरजन।
तबे त पाईबे भाई श्रीकृष्ण चरण॥

**गौरजन संग कर गौराङ्ग बलिया।**
**'हरे कृष्ण ' नाम बल नाचिया-नाचिया॥**

**अचिरे पाइबे भाई नाम-प्रेमधन।**
**याहा विलाइते प्रभुर 'नदे' ए आगमन॥**

अशा प्रकारे वृद्ध बाबाजींच्या मुखातून श्रीजगदानन्दांद्वारे रचित 'प्रेमविवर्त' ऐकून विजय आणि ब्रजनाथ महाप्रेमात विभोर होऊन व्याकूळ झाले. बाबाजी बराच वेळापर्यंत अचेतन प्राय राहिल्यानंतर विजय आणि ब्रजनाथाच्या गळ्यास आपल्या दोन्ही हातांनी पकडून रडत-रडत निम्नलिखित कीर्तनपद गाऊ लागले–

**कृष्ण नाम धरे कत बल।**
**विषय-वासनानले मोर चित्त सदा जले, रवि-तप्त मरुभूमि सम।**
**कर्णरन्ध्र पथ दिया, हृदि माझे प्रवेशिया, बरिसय सुधा अनुपम॥ १ ॥**
**हृदय हइते बले, जिह्वार अग्रेते चले, शब्द रूपे नाचे अनुक्षण।**
**कंठे मोर भंगेस्वर, अंग कांपे थर थर, स्थिर हइते ना पारे चरण॥ २ ॥**
**चक्षे धारा देहे घर्म, पुलकित सब चर्म, विवर्ण हइल कलेवर।**
**मूर्च्छित हइल मन, प्रलयेर आगमन, भावे सर्वदेह जर-जर॥ ।३ ॥**
**करि एत उपद्रव, चित्ते वर्षे सुधा-द्रव, मोरे डारे प्रेमेर सागरे।**
**किछु ना बुझिते दिल, मोरे त वातुल कैल, मोर चित्त वित्त सब हरे॥ ४॥**
**लइनु आश्रय जार, हेन व्यवहार ताँर, वर्णिते ना पारि ए सकल।**
**कृष्ण नाम इच्छामय, जाहे जाहे सुखी हय, सेइ मोर सुखेर सम्बल॥ ५॥**
**प्रेमेर कलिका नाम, अद्भुत रसेर धाम, हेन बल करये प्रकाश।**
**इषत् विकशि पुन; देखाय निज रूप गुण, चित्त हरि लय कृष्ण पास॥ ६ ॥**
**पूर्ण विकशित हञा, ब्रजे मोरे जाय लञा, देखाय मोरे स्वरूप विलास।**
**मोरे सिद्धदेह दिया, कृष्ण-पासे राखे गिया, ए देहेर करे सर्वनाश॥ ७॥**
**कृष्णनाम चिन्तामणि, अखिल रसेर खनि, नित्यमुक्त शुद्ध रसमय।**
**नामेर बालाइ यत, सब लये हइ हत, तबे मोर सुखेर उदय॥ ८॥**

–असे नामकीर्तन करीत करीत अर्धी रात्र झाली. कीर्तन संपल्यावर विजय आणि ब्रजनाथ गुरुदेवांची आज्ञा घेऊन नामरसात विभोर होऊन घरी परतले.

**॥ पंचवीसावा अध्याय समाप्त॥**

**॥ दुसरा खण्ड समाप्त॥**

# तिसरा खण्ड

## सव्वीसावा अध्याय (रस-विचार–प्रारंभिक )

जवळजवळ एक महिन्यापासून विजयकुमार अनुपस्थित होते. ब्रजनाथच्या पितामहीने ब्रजनाथ आणि विजयकुमार दोघांचाही मनोभाव जाणून घटक ब्राह्मणाद्वारे एक सुपात्री निवडली. विजयकुमारला ही बातमी धाडण्यात आली. त्यांनी आपल्या छोट्या भावास भागिनेयाच्या (भाच्याच्या) विवाहाची व्यवस्था करण्याकरिता बिल्वपुष्करिणीस पाठविले. शुभदिन आणि शुभलग्नी विवाहकार्य संपन्न झाले. विवाहकार्य संपूर्णपणे समाप्त झाल्यावर विजयकुमार एकदा येथे उपस्थित झाले. त्यांचे चित्त परमार्थ-विषयात विशेष रूपाने विभोर होते. म्हणूनच ते सांसारिक कुशलक्षेम आदींच्या गोष्टी न करता काहीसे उदास होऊन बसले आहेत. त्यांना अशाप्रकारे उदास बसलेले पाहून ब्रजनाथ म्हणाले, मामा! आपले चित्त आजकाल स्थिर दिसत नाही, असे का? आपल्या आज्ञेनेच मी संसार श्रृंखलेत बांधला गेलो आहे. आता आपला स्वतःविषयी काय विचार आहे?

विजयकुमार म्हणाले–मी आता श्रीपुरुषोत्तम (श्रीजगन्नाथदेव) यांच्या दर्शनाकरिता श्रीधामपुरी जाण्याचा निश्चय केला आहे. काही दिवसांतच यात्रीगण पुरीला जातील, मीसुद्धा त्यांच्यासोबत जाईन. चल, श्रीगुरुदेवांकडून याकरिता आज्ञा घेऊ.

भोजनानंतर तिसऱ्या प्रहरी ब्रजनाथ आणि विजयकुमार मायापुरी उपस्थित झाले; आणि त्यांनी श्रीरघुनाथदास बाबाजींच्या चरणी प्रणाम करून पुरीयात्रेकरिता त्यांच्याकडून आज्ञा मागितली.

त्यांच्या पुरीयात्रेसंबंधी ऐकून बाबाजी मोठे आनंदित झाले आणि स्नेहाने आर्द्र होऊन म्हणाले–तुम्ही लोक श्रीजगन्नाथांचे दर्शन करण्याकरिता पुरीला चाललात, खूप चांगली गोष्ट आहे. पुरीमध्ये काशीमित्रभवनात श्रीमन् महाप्रभूंची गादी आहे. तेथे आजकाल श्रीवक्रेश्वर पंडितांचे शिष्य श्रीगोपाल गुरुगोस्वामी विराजमान आहेत. तुम्ही त्यांचे अवश्य दर्शन करा आणि त्यांच्या उपदेशांस

भक्तीपूर्वक श्रवण करा. श्रीस्वरूप गोस्वामींची शिकवण आजकाल याच महात्म्यांच्या कंठात संपूर्णपणे विराजमान आहे.

श्रीगुरुदेवांची आज्ञा घेऊन ते दोघे मोठ्या आनंदाने घरी परतले. रस्त्यात ब्रजनाथाने विजयकुमारांस अनुरोध केला की त्यांनादेखील आपल्यासोबत पुरीस घेऊन जावे. विजयकुमार त्यांच्याशी सहमत झाले. दोघांनीही घरी पोहोचून पुरीयात्रेसंबंधी घरच्यांना सांगितले. ब्रजनाथची पितामहीदेखील त्यांच्यासोबत पुरी जाण्याकरिता तयार झाली. शेवटी असे ठरले की या तिघांनीही पुरीस जायचे.

पुरीमध्ये आषाढ महिन्यात श्रीजगन्नाथ, श्रीबलदेव आणि श्रीसुभद्रादेवींची प्रसिद्ध रथयात्रा होते. त्यावेळेस भारताच्या कानाकोपऱ्यातून धर्मप्राण जनसमूह पुरीमध्ये जमतो. म्हणूनच दूरदूरचे प्रवासी योग्यवेळी उपस्थित होण्याकरिता बरेच दिवस आधीपासूनच घरातून बाहेर पडतात. ज्येष्ठाचा महिना लागताच हे लोकदेखील प्रवाशांसोबत पुरीला रवाना झाले. काही दिवस चालल्यानंतर हे लोक दाँतन पार करून जलेश्वरला पोहोचले. पुनः क्षीरचोरा गोपीनाथाचे दर्शन करून श्रीविरजाक्षेत्री उपस्थित झाले. तेथे नाभिगयेची क्रिया समाप्त करून वैतरणीमध्ये स्नान करून त्यानंतर कटकला पोहोचल्यावर श्रीगोपालांचे दर्शन घेतले. नंतर एकाम्रकाननात श्रीलिङ्गराजाचे दर्शन करून श्रीक्षेत्रा (पुरीधामा) मध्ये उपस्थित झाले. सर्व लोक आपापल्या पंड्यांद्वारे सांगितलेल्या स्थानी थांबले. विजयकुमार, ब्रजनाथ आणि पितामही हरचण्डी साहीमध्ये थांबले. ते नियमानुसार समुद्र-स्नान, श्रीजगन्नाथ-दर्शन आणि तेथील विभिन्न तीर्थस्थळांचे दर्शन, त्यांची परिक्रमा आणि भोग-प्रसादाचे सेवन करू लागले. तीन-चार दिवसांनंतर विजयकुमार आणि ब्रजनाथाने श्रीजगन्नाथदेवाच्या मंदिरात श्रीमन् महाप्रभूंचे श्रीविग्रह, त्यांचे चरण चिन्ह आणि स्तंभामध्ये त्यांच्या बोटांच्या चिन्हांचे दर्शन घेतले. श्रीमन् महाप्रभू श्रीजगन्नाथ देवाचे दर्शन करून प्रेमाने विव्हळ होऊन जात असत. डोळ्यांतून अश्रूंच्या धारांची वर्षा होत असे. त्यावेळी त्यांच्या स्पर्शाने चरणांखालचे पाषाणही द्रवून जात असत, ज्यामुळे त्यांच्यावर प्रभूंच्या श्रीचरणांची चिन्हे अंकित होऊन जात असत. ते ज्यावेळी स्तंभाचा आधार घेऊन उभे राहत, तो गरुड-स्तंभदेखील त्यांच्या प्रेमामुळे द्रवित होऊन जाई आणि त्यावर त्यांच्या बोटांचे ठसे उमटत असत. या चिन्हांचे दर्शन करून ब्रजनाथ आणि विजयकुमार महाप्रेमात विव्हळ झाले. ते त्याच दिवशी काशीमिश्रांच्या भवनात उपस्थित झाले. तेथे दगडांपासून निर्मित प्रकांड भवनात

श्रीगम्भीरा–ज्या वाड्यात श्रीमन् महाप्रभू प्रेमावस्थेत निवास करीत आणि जेथे प्रिय पार्षद श्रीस्वरूप दामोदर आणि रायरामानन्द कृष्णविरहात बुडून जात, श्रीमन् महाप्रभूंस कृष्णकथा सांगून-सांगून सांत्वना देत असत, आणि तेथे विराजित त्यांच्या खडावा आदींचे दर्शन घेतले. येथे एकीकडे श्रीराधाकान्ताचे मंदिर आणि दुसरीकडे गोपाल गुरुगोस्वामींची गादी आहे. विजय आणि ब्रजनाथ प्रेमानंदात विभोर होऊन श्रीगोपाल गुरुगोस्वामींच्या चरणी पडून रडू लागले. गुरुगोस्वामी त्यांचे असे भाव पाहून खूप प्रसन्न झाले आणि त्यांना आलिंगन प्रदान करून आपल्या निकट बसविले. नंतर ते म्हणाले–मी तुमचा परिचय जाणू इच्छितो.

त्यांचा परिचय जाणून घेतल्यावर गुरुगोस्वामींच्या नेत्रांतून प्रेमाश्रू वाहू लागले. श्रीनवद्वीपधामाचे नाव ऐकून ते म्हणाले–"आज श्रीधामवासींचे दर्शन घेऊन मी धन्य झालो. अच्छा, हे तरी सांगा की मायापुरात श्रीरघुनाथदास आणि श्रीगोराचाँददास आदी वैष्णवजन कसे आहेत? त्यांचे कुशलक्षेम तर आहे ना? अहा रघुनाथदासाचे स्मरण होताच माझे शिक्षागुरू श्रीदासगोस्वामींचे स्मरण होते." मध्येच गुरुगोस्वामींनी त्यांचे शिष्य श्रीध्यानचन्द्र यास बोलावून सांगितले की बसलेले हे दोन्ही महात्मे येथेच प्रसाद घेतील. श्रीध्यानचन्द्रांनी त्या दोघांना आपल्या वाड्यात नेऊन श्रीमहाप्रसाद भोजन करविले. तेथे त्या तिघांमध्ये बऱ्याच गप्पागोष्टी झाल्या. विजयकुमारांचे श्रीमद्भागवतातले अगाध पांडित्य पाहून तथा ब्रजनाथास सर्व शास्त्रांमध्ये सुपंडित जाणून ध्यानचन्द्र गोस्वामी खूप आनंदित झाले आणि त्यांनी सर्व गोष्टी गुरुगोस्वामींना ऐकविल्या. गुरुगोस्वामीदेखील त्यांच्या पांडित्याविषयी ऐकून प्रसन्न झाले आणि त्यांना आपल्याजवळ बोलावून म्हणाले– तुम्ही दोघे मला अत्यंत प्रिय आहात, तुम्ही लोक जोपर्यंत श्रीपुरुषोत्तमधामात रहाल, तोपर्यंत मला दर्शन देत रहाल.

विजयकुमार मोठ्या नम्र शब्दांत म्हणाले–प्रभो! श्रीमायापुरच्या श्रीरघुनाथदास बाबाजी महाशयांची आमच्यावर मोठीच कृपा आहे. त्यांनी आम्हांस खूप काही शिकविले आहे आणि आपल्या श्रीचरणी उपदेश ग्रहण करण्याची आज्ञा केली आहे.

गुरुगोस्वामी म्हणाले–रघुनाथदास बाबाजी परम पंडित आहेत. तुम्ही लोक त्यांच्या उपदेशांचे यथायोग्य पालन करा. जर तुम्हाला आणखी काही जाणायचे

असेल तर उद्या दुपारनंतर येथे येऊन जिज्ञासा करा. हो. तुम्ही दोघांनी उद्या येथेच प्रसाद सेवा करावी. अशा प्रकारे आणखी काही वेळ गप्पागोष्टी झाल्यावर गुरुगोस्वामींची आज्ञा घेऊन ते हरचण्डीसाहीला परतले.

दुसऱ्या दिवशी निर्धारित वेळी विजयकुमार आणि ब्रजनाथ श्रीराधाकान्त मठामध्ये उपस्थित झाले आणि प्रसाद-सेवा झाल्यानंतर श्रीगुरुगोस्वामींच्या जवळ येऊन त्यांना प्रणाम करून म्हणाले–प्रभो! आम्ही रसतत्त्वासंबंधी जाणू इच्छितो. आम्ही आपल्या मुखातून कृष्णभक्ती रसाचे श्रवण करून कृतार्थ होऊन जाऊ. आपण निमानन्द-संप्रदायाचे प्रधान गुरू आहात आणि श्रीमन् महाप्रभूंच्या स्थानी श्रीस्वरूप गोस्वामींच्या गादीवर जगद्गुरूच्या रूपात विराजमान आहात. आमची इच्छा आहे, आपल्या मुखातून रसतत्त्वाचे श्रवण करून आमचे पांडित्य जे आमच्यात आहे, ते सफल व्हावे. श्रीगोपाल गुरुगोस्वामी निर्जनात (एकांतात) उपयुक्त शिष्यांस प्राप्त करून मोठे आनंदित झाले आणि अशाप्रकारे बोलू लागले–

जे श्रीनवद्वीप-मायापुरात आविर्भूत होऊन श्रीगौडमंडळ, क्षेत्रमंडळ आणि ब्रजमंडळातील भक्तांचे प्राण आहेत, ते शचीनन्दन निमाई पंडित आमच्या आनंदाचे विधान करोत. जे मधुररसाच्या सेवेद्वारे श्रीमहाप्रभूंस सदा-सर्वदा प्रसन्न ठेवतात, त्यांना आनंद प्रदान करतात, ते श्रीस्वरूपगोस्वामी आमच्या अंतःकरणात स्फुरित होवोत. निमाई पंडित ज्यांच्या नृत्यावर नितांत वशीभूत होत असत आणि ज्यांनी कृपा करून देवानन्द पंडितांचे शोधन करून त्यांस भगवद्-भक्त बनविले, ते वक्रेश्वर पंडित तुम्हा लोकांचे कल्याण करोत.

रस एक अतुलनीय तत्त्व आहे. यास साक्षात परब्रह्म श्रीकृष्णाचा लीला-विकासरूप चंद्रोदय म्हणता येईल. ज्यावेळी कृष्णभक्ती अत्यंत शुद्ध झाल्यावर क्रियाकारता प्राप्त करते, त्यावेळी तिला भक्तिरस म्हटले जाते.

ब्रजनाथ–रस म्हणजे कुठले पूर्वसिद्ध तत्त्व आहे का?

गोस्वामी–या प्रश्नाचे उत्तर मी केवळ 'होय' किंवा 'नाही' अशा एकाच शब्दात देऊ शकत नाही. थोडे विस्तारपूर्वक सांगतो, तुम्ही समजून घ्या. तुम्ही तुमच्या गुरुदेवांनिकट जो कृष्णरतीचा विषय श्रवण केला आहे, त्या रतीलाच

स्थायीभाव म्हणतात. स्थायीभावाच्याही वर सामग्रीचा संयोग झाल्यावर कृष्णभक्तिरस होतो.

ब्रजनाथ–स्थायीभाव आणि सामग्रीसंबंधी आम्हांस थोडे विस्तारपूर्वक समजावण्याची कृपा करावी. भाव काय वस्तू आहे–हे आम्ही गुरुदेवांकडून ऐकले आहे, परंतु हे भावसमूह मिळून कशाप्रकारे रसास उत्पन्न करतात, हे ऐकलेले नाही.

गोस्वामी–हो, साधारणतः भावरूपा भक्तीच कृष्णरती आहे, जी भक्तजनांच्या पूर्व आणि आधुनिक संस्काराद्वारे हृदयात उदित होऊन स्वयं आनंदरूपा होऊनही रसावस्थेस प्राप्त करते. सामग्री चार प्रकारची असते–(१) विभाव, (२) अनुभाव, (३) सात्त्विक आणि (४) व्यभिचारी किंवा संचारी. या सामग्रींची व्याख्या मी आधी करतो. रती आस्वादन हेतू-स्वरूप विभाव दोन प्रकारचे असतात–आलम्बन आणि उद्दीपन. आलम्बन दोन प्रकारचे असते–विषय और आश्रय. ज्यांचात रती होते, ते रतीचे आश्रय आहेत. ज्यांच्याप्रती रती क्रियावती होते, ते रतीचे विषय आहेत. रती कृष्णभक्तांच्या हृदयात राहते, म्हणूनच कृष्णभक्त रतीचे आश्रय आहेत आणि रती कृष्णाच्या प्रती क्रियावती होते, म्हणूनच कृष्ण रतीचे विषय आहेत.

ब्रजनाथ–आम्ही येथपर्यंत समजलो की विभाव दोन भागांमध्ये विभक्त आहे–आलंबन आणि उद्दीपन. पुनः आलंबनसुद्दा दोन भागांत विभागलेले आहे–आश्रय आणि विषय. कृष्ण विषय आहेत आणि भक्तजन आश्रय आहेत. आता हे जाणण्याची इच्छा होते की कृष्णसुद्धा कधी रतीचे आश्रय होतात का?

गोस्वामी–हो, होतात. भक्तजन कृष्णाप्रती जी रती करतात, त्यात कृष्ण विषय आणि भक्त आलंबन होतात, पुन्हा जेव्हा कृष्ण भक्ताप्रती जी रती करतात, त्यात कृष्ण आश्रय आणि भक्तजन विषय असतात.

ब्रजनाथ–आम्ही श्रीकृष्णाच्या ६४ गुणांच्या संबंधी श्रीगुरुदेवांच्या निकट श्रवण केले आहे. याव्यतिरिक्त कृष्णाच्या संबंधी जर काही सांगण्याजोगे असेल तर कृपा करून सांगावे.

गोस्वामी–श्रीकृष्णात निखिल गुणावली पूर्णतम रूपात विराजमान असूनही त्यांचे द्वारकेत पूर्ण, मथुरेत पूर्णतर आणि गोकुळात पूर्णतम–असे तारतम्य गुण

प्रकाशाच्या तारतम्याने साधित होतात. एकच कृष्णलीलेच्या भेदाने चार प्रकारचे नायक असतात–(१) धीरोदात्त, (२) धीरललित, (३) धीरशांत आणि (४) धीरोद्धत.

ब्रजनाथ–धीरोदात्ताची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–गंभीर, विनयी, क्षमाशील, करुण, आत्मश्लाघारहित आणि अप्रकाशित गर्व–ही धीरोदात्त नायक कृष्णाची लक्षणे आहेत.

ब्रजनाथ–धीरललित कशास म्हणतात?

गोस्वामी–रसिकता, नवयौवन, परिहासचातुरी आणि निश्चिंतता–या गुणांद्वारे कृष्ण प्रेयसींद्वारे वशीभूत होऊन जातात, म्हणूनच कृष्ण धीरललित नायक आहेत.

ब्रजनाथ–धीरशांत कशास म्हणतात?

गोस्वामी–शांत-स्वभाव, कष्ट-सहिष्णुता, विवेचकता आणि विनय गुणांनी युक्त असल्याने कृष्ण धीरशांत नायक आहेत.

ब्रजनाथ–धीरोद्धत कशास म्हणतात?

गोस्वामी–काही-काही वेळेस लीलाभेदाने कृष्ण मात्सर्ययुक्त अहंकारी, मायावी (कपट करणारे), चंचल आणि आत्मप्रशंसकसुद्धा दिसून येतात, म्हणूनच ते धीरोद्धत नायकदेखील आहेत.

ब्रजनाथ–आपण ज्या गुणांचे वर्णन केले आहे, त्यात बरेचसे परस्पर विरोधी गुणसुद्धा आहेत. म्हणून मग ते एकाच वेळेस एकाच कृष्णात कसे काय संभव आहेत?

गोस्वामी–कृष्ण स्वभावतः सर्वतंत्र-स्वतंत्र, परम निरंकुश, ऐश्वर्यवान आहेत. म्हणून त्यांच्या अचिंत्यशक्तीच्या प्रभावाने उपरोक्त विरोधी गुणसुद्धा कृष्णात एकत्रितपणे निवास करतात. जसे–

कूर्मपुराणात–

**अस्थूलश्चानणुश्चैव स्थूलोऽणुश्चैव सर्वतः।**
**अवर्णः सर्वतः प्रोक्तः श्यामो रक्तान्तलोचनः॥**

**ऐश्वर्ययोगाद् भगवान् विरुद्धार्थोऽभिधीयते।**
**तथापि दोषो परमे नैवाहार्या कथञ्चन॥**
**गुणाविरुद्धा अप्येते समाहार्याः समन्ततः॥**[१]

महावराहपुराणात–

**सर्वे नित्याः शाश्वताश्च देहास्तस्य परात्मनः।**
**हानोपादानरहिता नैव प्रकृतिजाः क्वचित्॥**

**परमानन्दसन्दोहा ज्ञानमात्राश्च सर्वतः।**
**सर्वे सर्वगुणैः पूर्णाः सर्वदोषविवर्जिताः॥**[२]

वैष्णव तंत्रामध्ये–

**अष्टादशमहादोषैः रहिता भगवत्तनुः।**
**सर्वैश्वर्यमयी सत्यविज्ञानानन्दरूपिणी॥**[३]

अठरा महादोष असे आहेत–

---

(१) भगवंतात विरोधी गुणसमूह एकाच वेळी अत्यंत सुंदर रूपात विराजित आहेत. ते अस्थूल आणि अणू असूनही सर्वप्रकारे स्थूल आणि अणू आहेत. ते प्राकृत वर्ण रहित असूनही अप्राकृत श्यामवर्ण आणि रक्तान्त नेत्राचे आहेत–असे शास्त्रांमध्ये वर्णिलेले आहे. ऐश्वर्य योगामुळे भगवान विरुद्धार्थ देखील म्हणविले जातात. तथापि परमेश्वरासंबंधी कुठल्याही प्रकारचा दोषारोप करता येत नाही. हे गुणसमूह परस्पर विरोधी प्रतीत होऊनही भगवंतात सर्व प्रकारे गुणच म्हणविले जातात.

(२) त्या परमात्म्याचे सर्व शरीरच नित्य (प्राकृत शरीराप्रमाणे परिवर्तनशील नाही), शाश्वत (कधी नष्ट न होणारे), 'हान' अर्थात त्याग, 'उपादान' अर्थात ग्रहण–या दोन्ही प्रकारच्या क्रियांपासून रहित अर्थात प्राकृत शरीराप्रमाणे (फाटलेल्या वस्त्राप्रमाणे) भगवंत आपल्या शरीरास सोडत नाहीत. भगवंताचे शरीरसमूह प्रकृतीतून निर्माण होत नाहीत–ते शरीरसमूह संपूर्णपणे परमानन्द स्वरूप आणि चिन्मय असतात. त्यांचे सर्व अंग-प्रत्यंग सर्वविध गुणांनी परिपूर्ण आणि सर्व प्रकारच्या दोषांनी रहित असतात.

(३) भगवंताचे शरीर अठरा प्रकारच्या महादोषांपासून रहित असते. ते सर्व प्रकारच्या ऐश्वर्यांनी युक्त, सत्यविज्ञान आणि आनन्दरूपी असते.

**मोहस्तन्द्रा भ्रमो रुक्षरसता काम उल्वणः।**
**लोलता मदमात्सर्यै हिंसा खेदपरिश्रमौ॥**

**असत्यं क्रोध आकांक्षा आशंका विश्वविभ्रमः।**
**विषमत्वं परापेक्षा दोषा अष्टादशोदिता॥**(४)

(विष्णुयामल)

अवतार-मूर्तींमध्ये हे सर्व सिद्ध आहेत तथा अवतारी कृष्णामध्ये परम सिद्ध आहेत. या व्यतिरिक्त कृष्णात आणखीदेखील आठ गुण आहेत, जे त्यांच्या पुरुषत्वाचे सूचक आहेत. ते गुण आहेत–शोभा, विलास, माधुर्य, मांगल्य, स्थिरता, तेज, ललित आणि औदार्य. लहानांप्रती दया, समकक्षांच्या प्रती स्पर्धा, शूरता, उत्साह, दक्षता आणि सत्यप्रकाशाच्या जागी शोभा परिलक्षित होते. गंभीरगती, धीर चितवन (कटाक्ष) आणि सहास्य वचनांद्वारे विलास लक्षित होतो. जेथे कृती आदींची कमनीयता प्रकाशित होते आहे, तेथे माधुर्य लक्षित होते आहे. संपूर्ण जगाचे विश्वास-स्थळच मांगल्य आहे. कुठल्याही कार्याने विचलित न होणे म्हणजेच स्थिरता होय. सर्वांच्या चित्तास आपल्याकडे आकर्षित करणे म्हणजेच तेज आहे. ज्यांच्यात प्रचुर श्रृंगारकृती आहे, ते ललित आहेत. आत्मसमर्पण-कार्याचे नावच औदार्य आहे. श्रीकृष्ण नायक-शिरोमणी आहेत, म्हणूनच त्यांच्या साधारण लीलेमध्ये गर्ग आदी ऋषी धर्माविषयी आणि युयुधान आदी क्षत्रियसमूह युद्धामध्ये तथा उद्धव आदी मंत्रणेसंबंधी सहाय्यकाच्या रूपात वर्णित झाले आहेत.

ब्रजनाथ–कृष्णाच्या रस-नायकत्वासंबंधी पूर्णपणे समजलो. आता रसोपयोगी विभावाच्या अंतर्गत कृष्णाच्या भक्तांसंबंधी सांगावे.

गोस्वामी–ज्यांचे अंतःकरण कृष्णभावाने विभावित असते, तेच रसतत्त्वामध्ये कृष्णभक्त आहेत. खरे बोलण्यापासून लज्जायुक्त (सत्यवाक्पासून ते ह्रीमान) पर्यंतचे जे २९ गुण कृष्णासंबंधी सांगितलेले आहेत, ते सर्व कृष्णभक्तात दिसून येतात.

---

(४) मोह, आलस्य, भ्रम, निरसता, कामोग्रता, चांचल्य, मद, मात्सर्य, हिंसा, खेद, थकावट, आराम, असत्य, क्रोध, आकांक्षा, भय, जगद्-भ्रम, विषमत्व आणि दुसऱ्यावर अवलंबून राहण्याची वृत्ती हे १८ महादोष आहेत.

ब्रजनाथ–रसोपयोगी कृष्णभक्त किती प्रकारचे असतात?
गोस्वामी–दोन प्रकारचे असतात–साधक आणि सिद्ध.

ब्रजनाथ–साधक कोण आहेत?

गोस्वामी–कृष्णाविषयी ज्यांची रुची तर निर्माण झाली आहे, परंतु अजून संपूर्णपणे विघ्न-बाधा दूर झालेल्या नाहीत, अशा लक्षणांनी युक्त भक्त कृष्णसाक्षात्काराची योग्यता प्राप्त करून साधक म्हणविले जातात. **ईश्वरे तदधीनेषु** (५) (श्रीमद्भा. ११/२/४६) मध्ये सांगितलेल्या लक्षणांनी युक्त मध्यम भक्तजन साधकश्रेणीच्या अंतर्गत आहेत.

ब्रजनाथ–प्रभो! **अर्चायामेव हरये**(६) (श्रीमद्भा. ११/२/४७) श्लोकात वर्णित भक्त रसयोग्य नसू शकतात का?

गोस्वामी–ते जोपर्यंत शुद्ध भक्तांच्या कृपेने शुद्धभक्त होत नाहीत, तोपर्यंत साधक नसतात. बिल्वमंगल आदींसारख्या व्यक्तीच यथार्थ साधक आहेत.

ब्रजनाथ–सिद्ध भक्त कोण आहेत?

गोस्वामी–ज्यांना कुठलेच दुःख आदींचा अनुभव होत नाही, ज्यांच्या सर्व क्रिया श्रीकृष्णाच्या आश्रित असतात, जे सर्वदा प्रेम-सुखाचे आस्वादन करतात, अशा भक्तजनांस सिद्धभक्त म्हणतात. सिद्धभक्त दोन प्रकारचे असतात. अर्थात संप्राप्त सिद्ध आणि नित्यसिद्ध.

ब्रजनाथ–संप्राप्त सिद्ध कोण आहेत?

गोस्वामी–संप्राप्त सिद्ध दोन प्रकारचे असतात–साधनसिद्ध आणि कृपासिद्ध.

ब्रजनाथ–नित्यसिद्ध कोण आहेत?

गोस्वामी–श्रीरूप गोस्वामी म्हणतात–

---

(५) 164 पानावर पाहा.

(६) 162 पानावर पाहा.

**आत्मकोटिगुणं कृष्णे प्रेमानं परमं गताः।**
**नित्यानन्दगुणाः सर्वे नित्यसिद्धा मुकुन्दवत्॥**(७)

पद्मोत्तर खंडात–

**यथा सौमित्रिभरतौ यथा संकर्षणादयः।**
**तथा तेनैव जायन्ते निजलोकाद्यदृच्छया॥**

**पुनस्तेनैव गच्छन्ति तत् पदं शाश्वतं परं।**
**न कर्मबन्धनं जन्म वैष्णवानाञ्च विद्यते॥**(८)

ब्रजनाथ–प्रभो! विभावांतर्गत आलंबन तर समजलो, आता कृपया उद्दीपन कशास म्हणतात ते सांगावे.

गोस्वामी–जे भावांस उद्दीपन करवितात, त्यांस उद्दीपन म्हणतात. कृष्णाचे गुण, त्यांच्या कृती, हास्य, अंगसौरभ, वंशी, श्रृंग, नूपुर (पैंजण), शंख, पदचिन्ह, क्षेत्र, तुळशी, भक्त आणि हरिवासर (एकादशी) आदी काळ–हे सर्व उद्दीपन आहेत. कृष्णाचे गुण तीन प्रकारचे असतात–कायिक, मानसिक आणि वाचिक. कायिक गुणांमध्ये वय एक प्रधान गुण आहे. कौमार, पौगंड आणि कैशोर–हे तीन वय आहेत–

---

(७) मुकुन्दाप्रमाणे ज्यांचे गुण नित्य आणि आनंद-स्वरूप आहेत, ते नित्यसिद्ध आहेत. त्यांचे प्रधान लक्षण असे आहे की आपल्यापेक्षादेखील कृष्णाप्रती कोटीगुण अधिक प्रेमयुक्त असतात.

(८) ज्या प्रकारे सुमित्रानन्दन लक्ष्मण आणि भरत भगवान श्रीरामचन्द्रांकडे आणि ज्या प्रकारे बलराम आदी भगवान श्रीकृष्णांसोबत भगवंताच्या इच्छेने प्रपंचात (संसारात) आविर्भूत होतात आणि पुनः भगवंताच्या बरोबरच नित्य परमधामात चालले जातात, त्याच प्रकारे यादवगणसुद्धा भगवंताच्या प्रकट लीलेमध्ये आविर्भूत होतात आणि अप्रकट लीलेच्या वेळी भगवंताच्या सोबतच परमधामात चालले जातात, म्हणूनच वैष्णवांचे प्राकृत मनुष्याप्रमाणे कर्मबंधन अथवा जन्म होत नाही.

**कौमारं पञ्चमाब्दान्तं पौगण्डं दशमावधि।**
**आषोडशाच्च कैशोरं यौवनं स्यात्ततः परम्॥**[९]

(भ. र. सिं. २/१/३०९)

कैशोरावस्थेतही तीन भेद आहेत–आद्य, मध्य आणि शेष. कायिक गुणांमध्ये सौंदर्याचा विचार प्रधान असतो. अंगांच्या यथोचित सन्निवेशास सौंदर्य म्हणतात–वस्त्र, सज्जा आणि नटण्याच्या वस्तूंस (मंडनादी) 'प्रसाधन' म्हणतात. कृष्णाची वंशी तीन प्रकारची असते–वंशी, वेणू आणि मुरली. वेणू–बारा बोटे लांब आणि अंगठ्याइतकी जाड असते, त्यात सहा छिद्रे असतात. मुरली दोन हात लांब असते, मुखात रंध्र असते, तथा यांत चार छिद्रे असतात. वंशीमध्ये अर्ध्या अर्ध्या बोटांच्या अंतरावर आठ छिद्रे, दुसऱ्या टोकाला अर्धे बोट सोडून मुखरंध्र असते. शिरोभाग चार बोटे, पुच्छ तीन बोटे, असे सगळे मिळून (रंध्रे मिळून) नऊ छिद्रे आणि सतरा बोटे लांब असते. कृष्णाच्या हातात जो दक्षिणावर्त-शंख विराजमान असतो, त्याचे नाव 'पांचजन्य' आहे. या उद्दीपनांद्वारे भक्ताची रती उद्दीप्त होऊन तदीय विषय श्रीकृष्णाच्या प्रती क्रियावती होऊन आस्वादनरूप होऊन जाते. रतीच स्थायीभाव आहे, तोच रस असतो. उद्या तुम्ही याचेवळी येथे उपस्थित रहा, मी अनुभाव आदींची व्याख्या करीन.

गोस्वामीचरणांचा निरोप होऊन रसाविषयी चिंतन करता-करता विजय आणि ब्रजनाथ सिद्धबकुळाचे दर्शन करून तेथून श्रीजगन्नाथदेवांचे दर्शन करीत आपल्या मुक्कामी परतले.

**॥ सव्वीसावा अध्याय समाप्त ॥**



---

(९) पाच वर्षे वयापर्यंत कौमार, दहा वर्षेपर्यंत पौगंड आणि सोळाव्या वर्षाच्या अवस्थेपर्यंत किशोरावस्था आणि त्यानंतर यौवन काळ आहे.

# सत्तावीसावा अध्याय (रस-विचार)

दुसऱ्या दिवशी प्रसाद-सेवन करून दुपारनंतर विजयकुमार आणि ब्रजनाथ श्रीराधाकान्त मठात उपस्थित झाले. गोपालगुरुगोस्वामी महाप्रसाद सेवा करून त्यांची प्रतीक्षा करीत होते. श्रीध्यानचन्द्र गोस्वामी त्यांच्या जवळ बसून उपासना-पद्धती लिहित होते. त्यावेळी गुरुगोस्वामींचे दर्शन अतीव अपूर्व होते. संन्यास वेष, ललाटावर उर्द्धपुण्ड्र तिलक, सर्व अंगांवर हरिनामाक्षर, गळ्यात जाड-जाड तुळशीच्या चार माळा, हातात जपमाळ, दोन्ही नेत्र ध्यानाच्या आवेशात अर्द्धमुद्रित, अधूनमधून नेत्र-प्रांतापासून वक्षःस्थळापर्यंत लांबच लांब अश्रुधारा, मधून-मधून "हा गौरांग!" "हा नित्यानन्द!"–असे उच्चारण करून उसासे भरीत रोदन, काहीसे स्थूल शरीर, उज्ज्वल श्याम वर्ण, कदलीच्या वल्कलासनावर बसलेले, काही दूरवर दोन खडावा तथा जवळच जलपूर्ण कमंडलू. हे सर्व पाहून विजय आणि ब्रजनाथाच्या हृदयात एक अभूतपूर्व श्रद्धाभाव निर्माण झाला. त्या दोघांनीही साष्टांग प्रणाम केला आणि खूप वेळपर्यंत जमिनीवर तसेच पडून राहिले. विजय आणि ब्रजनाथाची विद्वत्ता, अनेकानेक शास्त्रांची पारदर्शिता, वैष्णवता पाहून तथा श्रीनवद्वीपधामवासी जाणून मठातील सर्व लोक या दोघांचा आदर करीत असत. आज त्यांचा वैष्णवोचित भाव पाहून गुरुगोस्वामींनी त्यांना उठवून प्रेमाने आलिंगन करीत त्यांना समीप बसविले. वेळ पाहून ब्रजनाथाने विनयपूर्वक रसप्रसंग उपस्थित केला. गोस्वामींनी प्रेमपूर्वक म्हटले–आज मी तुम्हांस अनुभाव आदी समजावून रसतत्त्वात प्रवेश करवितो. विभाव, अनुभाव, सात्त्विक आणि व्यभिचारी–या चार प्रकारच्या सामग्रींपैकी मी विभावतत्त्वास काल सांगितले आहे. आज सर्वप्रथम अनुभावाची व्याख्या करीत आहे; सावधानतेने ऐका. ज्यात आणि ज्याद्वारे रती विभावित (उद्दीप्त) होते, त्यास विभाव म्हटले आहे. आता ज्याद्वारे त्या रतीचा बोध करविणाऱ्या चित्तातील भावांची अनुभूती होते, त्या उद्भास्वरनामा लक्षणांस अनुभाव म्हणतात. दुसऱ्या शब्दात चित्ताच्या भावांस प्रकाशित करणारे कटाक्ष, रोमांच आदी कृतींस अनुभाव म्हणतात. ते बाह्य विकारांप्रमाणे प्रकाशित झाल्यावरही चित्ताच्या भावांस प्रकाशित करणारे असतात. नृत्य, विलुंठन (पृथ्वीवर पडून गडाबडा लोळणे), गाणे, जोरजोरात रडणे, शरीर वेडेवाकडे करणे, हुंकार भरणे, जांभई देणे, दीर्घश्वास, लोकापेक्षेचा त्याग (लोक काय म्हणतील–याची पर्वा न करणे), लाळ टपकणे,

अट्टहास (जोरात हसणे), घूर्णा (चक्कर येणे) आणि उचकी–या बाह्य विकारांद्वारे भावसमूह प्रकाशित होतात.

ब्रजनाथ–हे बाह्य विकार आंतरिक स्थायीभावाच्या रसास्वादनाची कशाप्रकारे पुष्टी करतात? दुसरे म्हणजे आतून रसास्वादन झाल्यावर हे अनुभावसमूह शरीरात बाहेरून प्रकाशित होतात–म्हणून हे स्वयं पृथक सामग्री कशी काय झाले?

गोस्वामी–बाबा, तू यथार्थच न्यायशास्त्र पंडित आहेस. तुझ्याप्रमाणे सूक्ष्म प्रश्न विचारणारा मी आजतागायत पाहिला नाही. जेव्हा मी श्रीपण्डित गोस्वामींकडे रसशास्त्राचे अध्ययन करीत होतो, तेव्हा माझ्यात सुद्धा ठीक असेच वितर्क उत्पन्न झाले होते; परंतु श्रीगुरुदेवांच्या कृपेने हा संदेह शीघ्रच दूर झाला. याचे गूढ तात्पर्य असे आहे की जिवाच्या शुद्धसत्त्वात, जी चित्ताची क्रिया आहे, ती जेव्हा विभावित (उद्दीप्त) होऊन क्रियेची सहाय्यता करते, तेव्हा त्यात एक असे स्वाभाविक वैचित्र्य उत्पन्न होते, जे चित्तास विभिन्न प्रकारे प्रफुल्लित करते. चित्त प्रफुल्लित झाल्यावर बाह्यशरीरावर देखील त्याचे काही विकार प्रकाशित होतात, या बाह्य विकारांनाच उद्भास्वर म्हणतात. हे विकारसमूह (नृत्यादी) अनेक प्रकारचे असतात–चित्ताच्या नृत्य करण्यासोबतच शरीरदेखील नृत्य करू लागते, चित्त गाऊ लागल्यावर जिव्हादेखील गाऊ लागते, अशा प्रकारे दुसऱ्या विकारासंबधीसुद्धा जाणायला हवे. परंतु उद्भास्वर क्रियाच मूळ क्रिया नाही आहे, उलट चित्ताच्या विभावास पोषक जो अनुभाव उत्पन्न होतो, तोच उद्भास्वराच्या रूपात शरीरात व्याप्त होतो. चित्तात स्थायीभाव विभावाद्वारे भावित झाल्याबरोबर चित्ताची द्वितीय क्रिया अनुभावाच्या रूपाने कार्यरत होते. म्हणून अनुभाव एक पृथक सामग्री आहे, जेव्हा ती गीत आदींद्वारे प्रकाशित होते, तेव्हा ती 'शीत' म्हणविली जाते आणि जेव्हा ती नृत्य आदींद्वारे प्रकाशित होते, तेव्हा तिला 'क्षेपण' म्हणतात. शरीराची प्रफुल्लिता रक्तोद्गम, अस्थिसंधिवियोग (हाडांचे परस्पर विलग होणे) संधिकर्षण (हाडांमधल्या ग्रंथी संकुचित पावणे) आदी आणखीही अनेक प्रकारची अनुभाव लक्षणे आहेत. परंतु ही अनुभाव लक्षणे क्वचितच पाहिली जातात. म्हणूनच त्यांच्याविषयी विस्तारपूर्वक सांगितलेले नाही. प्राणेश्वर श्रीचैतन्य महाप्रभूंच्या शरीरात कूर्माकार आदी जे अत्यंत आश्चर्यपूर्ण अनुभाव लक्षित झाले आहेत, ते साधक भक्तांमध्ये संभव नाहीत.

गुरुगोस्वामींच्या या गूढ उपदेशांस ऐकून विजय आणि ब्रजनाथ काही

वेळपर्यंत बिलकुल मौन राहिले. मग म्हणाले–प्रभो! सात्त्विकभाव कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्णासंबंधी कुठल्या भावाद्वारे जेव्हा चित्त साक्षात रूपात अथवा काही व्यवधानासोबत विभावित होते, तेव्हा त्या चित्तास ’सत्त्व’ म्हणतात. या सत्त्वाने जे भावसमूह निर्माण होतात–त्यांना सात्त्विकभाव म्हणतात, सात्त्विकभाव तीन प्रकारचे–स्निग्ध, दिग्ध आणि रुक्ष.

ब्रजनाथ–स्निग्ध सात्त्विकभाव कशास म्हणतात?

गोस्वामी–स्निग्ध सात्त्विकभाव मुख्य आणि गौण भेदाने दोन प्रकारचे असतात. जेव्हा साक्षात कृष्ण संबंधी मुख्य रती चित्तावर आक्रमण करते, तेव्हा मुख्य स्निग्ध सात्त्विकभाव होतो, स्तंभ-स्वेदादी मुख्य सात्त्विकभावांतर्गत येतात. जेव्हा कृष्णसंबंधी रती काही व्यवधानासोबत गौण रूपात चित्तावर आक्रमण करते, त्यावेळी गौणस्निग्ध सात्त्विकभाव होतो, वैवर्ण आणि स्वरभेद, हे दोन गौण सात्त्विकभाव आहेत. मुख्य आणि गौण रतीच्या क्रियेच्या अतिरिक्त इतर दुसरा भाव चित्तावर आक्रमण केल्यावर अनुगामी दिग्ध सात्त्विकभाव उदित होतो, कंपच दिग्ध सात्त्विकभाव आहे. जेव्हा रतिशून्य भक्तसदृश कुणी व्यक्ती कृष्णाच्या अतीव आश्चर्यजनक मधुर भावांविषयी ऐकून अत्यंत विस्मित होते आणि त्यावेळी तिच्याठायी जो आनंद निर्माण होतो, त्यास सात्त्विकभाव म्हणतात, रोमांचच ‘रुक्ष’ सात्त्विकभाव आहे.

ब्रजनाथ–सात्त्विकभाव कसा उदित होतो?

गोस्वामी–जेव्हा साधकाचे चित्त सत्त्व भावासोबत एक होऊन स्वतःस प्राणाजवळ समर्पित करते, तेव्हा प्राण विकारयुक्त होऊन शरीरात प्रचुर क्षोभ निर्माण होतो, त्याचवेळी स्तंभ आदी विकार उत्पन्न होतात.

ब्रजनाथ–सात्त्विक विकार किती प्रकारचे असतात?

गोस्वामी–स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभेद, वेपथू (कंप), वैवर्ण (विषाद), (भय आणि क्रोध आदींद्वारे शरीरावर जो वर्ण विकार होतो जसे–मलिनता, कृशता आदी) अश्रू आणि प्रलय–हे आठ सात्त्विक विकार आहेत. प्राण एखाद्या अवस्थेत दुसऱ्या चार भूतांसोबत (भूमी, जल, तेज आणि आकाश) पंचम भूताच्या रूपात अवस्थित

राहतात आणि कधी-कधी स्वप्रधान होऊन अर्थात वायू प्रधान होऊन जिवाच्या शरीरात विचरण करतात. ज्यावेळी ते भूमिस्थ असतात, त्यावेळी स्तंभ (जडता) लक्षित होते, जलाश्रित झाल्यावर अश्रू, तेजस्थ झाल्यावर वैवर्ण आणि स्वेद किंवा घाम लक्षित होतो. जेव्हा तो आकाशाश्रित होतो तेव्हा प्रलय अथवा मूर्च्छा होते तथा जेव्हा तो स्वप्रधान(वायूचा आश्रित) असतो, तेव्हा मंद, मध्य, तीव्र भेदाने रोमांच, कंप आणि स्वरभेद विकारसमूह प्रकाशित होतात. हे आठही विकार बाहेर आणि आत दोन्हीकडे क्रियाशील राहिल्याने कधी भावदेखील म्हटले जातात, तर कधी अनुभावदेखील म्हटले जातात. अनुभावसमूह केवळ बाहेरील शरीरावर क्रियाशील राहिल्याने सात्त्विकभाव म्हणविले जात नाहीत, जसे–नृत्य आदींमध्ये सत्त्वामुळे उत्पन्न भाव साक्षात क्रिया करीत नाहीत, तर बुद्धीद्वारे उत्तेजित क्रिया करतात. परंतु स्तंभ आदींमध्ये बुद्धीची अपेक्षा न करता सात्त्विकभाव साक्षात क्रिया करतो. म्हणूनच अनुभाव आणि सात्त्विकभावास वेगवेगळे मानले गेले आहे.

ब्रजनाथ–स्तंभ आदी अष्ट सात्त्विक विकारांचा हेतू जाणू इच्छितो.

गोस्वामी–हर्ष, भय, आश्चर्य, विषाद आणि अमर्ष (खेद, क्रोध, ग्लानी) यांमुळे वाक् आदी रहित जडतेस स्तंभ म्हटले जाते. हर्ष, भय आणि क्रोधादींमुळे शरीराच्या आर्द्रतेस अर्थात घामास 'स्वेद' म्हटले जाते. आश्चर्य, हर्ष, उत्साह आणि भयाने शरीरावर जी रोमावली उभी राहते, तिला रोमांच म्हणतात. विषाद, विस्मय, क्रोध, हर्ष आणि भयाने वाणीचे गद्गद होणे आदींमुळे स्वरभेद उदित होतो. भय, क्रोध आणि हर्ष आदींमुळे जे थरथर कापणे होते, त्यास 'वेपथू' म्हणतात. विषाद, रोष आणि भय आदींमुळे शरीरात जो वर्ण विकार उत्पन्न होतो, त्यास वैवर्ण म्हणतात. हर्ष, रोष आणि विषाद आदींद्वारे डोळ्यांतून जे जल निघते, त्यास अश्रू म्हणतात, आनंदाचे अश्रू शीतल असतात आणि क्रोधादींचे अश्रू गरम असतात. सुख आणि दुःखाद्वारे चेष्टाशून्यता, ज्ञानशून्यता, जडता आणि जमिनीवर पडणे आदींस प्रलय म्हणतात. सात्त्विकभाव सत्त्वाच्या तारतम्यानुसार उत्तरोत्तर धूमायित, ज्वलित, दीप्त आणि प्रदीप्त अशा चार प्रकारचे असतात. रुक्षसात्त्विक भावसमूह साधारणतः धूमायित असतात. स्निग्धभावसमूह क्रमशः उच्च अवस्था प्राप्त करतात. रतीच सर्वानंद चमत्काराचा हेतू आहे, रतीच्या अभावी रुक्ष आदींमध्ये चमत्कारिता नसते.

ब्रजनाथ–प्रभो! मोठ्या सौभाग्याने सात्त्विकभावसमूह उदित होतात. परंतु नाटकात आणि संसारात आपल्या कार्याच्या सिद्धीकरिता बरेच लोक या भावांस दर्शवितात, त्या लोकांच्या भावांस काय म्हणावे?

गोस्वामी–सरळ आणि शुद्धभक्तीचे साधन करता-करता स्वभावतः जे सात्त्विकभाव प्रकाशित होतात, ते वैष्णवभाव आहेत. या व्यतिरिक्त जे सर्व भाव दिसून येतात, त्यांना चार भागात विभक्त करावे. चार विभाग असे आहेत–रत्याभास, सत्त्वाभास, निःसत्त्व आणि प्रतीप.

ब्रजनाथ–रत्याभास कशास म्हणतात?

गोस्वामी–मुक्तिकामी पुरुषांना रत्याभास म्हणतात. शांकर-संन्यासींमध्ये कृष्णाच्या लीला श्रवण करून जो भाव उत्पन्न होतो, त्यास रत्याभास म्हणतात.

ब्रजनाथ–सत्वाभास कशास म्हणतात?

गोस्वामी–स्वभावतः शिथिल हृदयात कृष्णकथेस श्रवण करून आनंद आणि विस्मय आदींचा आभास उदित झाल्यावर सत्वाभासाचा उदय होतो. जरन्मीमांसक आणि साधारण स्त्रियांत कृष्णकथा ऐकून जो भाव उदित होतो, त्यास सत्वाभास म्हणतात.

ब्रजनाथ–निःसत्त्व-भावाभास कशास म्हणतात?

गोस्वामी–निसर्गवशतः पिच्छिल (ओले आणि गिळगिळीत अथवा घसरण्याजोगे) अंतःकरण आणि नाट्य-अभिनय तथा कार्य-सिद्धीकरिता जे लोक अभ्यास करतात, त्यांच्यात जे पुलकाश्रू आदी उदित होतात, त्यांना निःसत्त्व म्हणतात. जे लोक वस्तुतः कठीण हृदयाचे आहेत, परंतु अभ्यासाद्वारे रडण्याचा असा काही अभ्यास करतात की बोलताबोलता असे काही रडू लागतात जसे काही ते स्वाभाविकपणेच रडत आहेत. परंतु त्यांचे रडणे संपूर्णपणे दिखाऊ असते. अशी माणसे निसर्गतःच पिच्छिलांतःकरणाची असतात.

ब्रजनाथ–प्रतीप कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्णाप्रती प्रतिकूल कृतीतून उत्पन्न क्रोध, भय आदींद्वारे जे भावाभास आदी प्रकाशित होतात, ते प्रतीप-भावाभास म्हणविले जातात. याचे उदाहरण सहज आहे.

ब्रजनाथ–प्रभो! विभाव, अनुभाव आणि सात्त्विक भावांस समजलो, त्याबरोबरच सात्त्विकभाव आणि अनुभावातील भेदही समजलो. आता व्यभिचारी भावांचे वर्णन करावे.

गोस्वामी–व्यभिचारी भाव ३३ आहेत. स्थायी भावाप्रती विशेष रूपाने अभिमुखी होऊन हे ३३ भाव विचरण करतात, म्हणूनच त्यांना व्यभिचारी म्हणतात. ते वाणी, अंग आणि सत्त्वाद्वारे सूचित होऊन संचारित होतात, अतः यांना संचारीभाव म्हटले जाते. हे स्थायीभावरूपी अमृतसागरात लाटांप्रमाणे उठून समुद्राला उंच करून पुन्हा त्यातच मग्न होतात. ३३ संचारीभाव असे आहेत–निर्वेद (खेद वा उदासीनता), विषाद, दैन्य, ग्लानी, श्रम, मद, गर्व, शंका, त्रास (भय), आवेग (उद्वेग), उन्माद, अपस्मृती, व्याधी, मोह, मृत्यू, आलस्य, जाड्य, पीडा, अवहित्था (भाव-गोपन), स्मृती, वितर्क, चिंता, मती, धृती, हर्ष, उत्सुकता, उग्रता, अमर्ष, असूया, चापल्य, निद्रा, सुप्ती आणि बोध. काही संचारी भाव स्वतन्त्र आहेत आणि काही परतन्त्र आहेत. परतन्त्र संचारीभाव वर आणि अवर भेदाने दोन प्रकारचे आहेत. स्वतन्त्र संचारीभावसमूह रतिशून्य, रत्यानुस्पर्श आणि रतिगंध भेदाने तीन प्रकारचे असतात. हे समस्त भाव विपक्षीच्या प्रयुक्त झाल्यावर प्रातिकूल्य आणि अनौचित्य भेदाने दोन प्रकारचे असतात. या सर्व भावांच्या चार दशा असतात– उत्पत्ती, संधी, शावल्य आणि शांती.

ब्रजनाथ–भावोत्पत्ती सहजच समजून घेता येते. भावसंधी कशास म्हणतात?

गोस्वामी–जेव्हा एक समान अथवा भिन्न-भिन्न प्रकारचे दोन भाव परस्पर मिलित होतात तेव्हा त्या मिलनास भावसंधी म्हणतात. इष्टजात जडता आणि अनिष्टजात जडता एकाचवेळी उदित झाल्यावर ते दोन भिन्न प्रकारच्या भावांचे संधि-स्थळ असते.

ब्रजनाथ–भावशाबल्य कशास म्हणतात?

गोस्वामी–बऱ्याचशा भावांच्या परस्पर सम्मर्द्दास (ठेला-ठेली, संघर्ष, एकमेकांस दाबून ठेवीत प्रकाशित होणे) भावशाबल्य म्हणतात. कृष्णासंबंधी ऐकून कंसास क्रोध आणि भय होतो, हे भावशाबल्याचे उदाहरण आहे.

ब्रजनाथ–भावशांती कशास म्हणतात?

गोस्वामी–अत्यंत प्रबळतेस प्राप्त झालेल्या भावाचे विलीन होणेच भावशांती म्हणविले जाते. कृष्णास आसपास न पाहून ब्रजवासी मोठे चिंतित झाले, अगदी त्याचवेळी कृष्णाची वंशीध्वनी ऐकून त्यांची चिंता शांत झाली अर्थात दूर झाली–ही विषादाची शांती दशा आहे.

ब्रजनाथ–याविषयी जर आणखी काही गोष्टी जाणण्यायोग्य असतील तर कृपया सांगाव्यात.

गोस्वामी–हे ३३ व्यभिचारी भाव, एक मुख्य स्थायीभाव आणि सात गौण स्थायीभाव (जे नंतर सांगेन)–असे एकूण ४१ भावच शरीर आणि इंद्रियांस विकारयुक्त करतात. म्हणून या भावजनक चित्त-वृत्ती आहेत अर्थात या भावांच्या जनक–त्यांस उत्पन्न करणाऱ्या आहेत.

ब्रजनाथ–हे कोणकोणत्या भावांचे जनक आहेत.

गोस्वामी–हे अष्टसात्त्विकभाव तथा विभावांतर्गत अनुभावांचे जनक आहेत.

ब्रजनाथ–हे सर्व स्वाभाविक आहेत का?

गोस्वामी–यापैकी काही भाव स्वाभाविक आहेत आणि काही आगंतुक. ज्या भक्ताचा जसा स्थायीभाव असतो, तोच त्याचा स्वाभाविक भाव आहे. व्यभिचारी भावसमूह साधारणपणे आगंतुक असतात.

ब्रजनाथ–सर्व भक्तांचे भाव समान असतात का?

गोस्वामी–नाही, भक्त विविध प्रकारचे असतात. म्हणून त्यांचे मनोभावदेखील विविध प्रकारचे असतात. जसे मन असते, त्यानुसार भावोदयाचेसुद्धा तारतम्य असते. मनाच्या गरिष्ठ, लघिष्ठ आणि गंभीर या तीन भेदांनुसार भावोदय तीन प्रकारचे असतात. परंतु अमृत स्वभावतः सदैव द्रवीभूत असते, कृष्णभक्तांचे

चित्त स्वभावतः अमृतासमान असते. आज येथेच समाप्त करतो. उद्या स्थायीभावाची व्याख्या करीन.

विजय आणि ब्रजनाथ साष्टांग प्रणाम करून श्रीगुरुगोस्वामींची आज्ञा घेऊन आपल्या स्थानी परतले.

**॥ सत्तावीसावा अध्याय समाप्त ॥**



# अठ्ठाविसावा अध्याय (रस-विचार)

दुसऱ्या दिवशी विजयकुमार आणि ब्रजनाथ दोघेही नियमित वेळी श्रीगोपालगुरुगोस्वामींच्या चरणी उपस्थित झाले आणि साष्टांग दंडवत प्रणाम करून आदल्या दिवशी स्थिर केलेल्या विषयासंबंधी जिज्ञासा करू लागले. ब्रजनाथाने विचारले–प्रभो! विभाव, अनुभाव, सात्त्विक आणि व्यभिचारी–या सर्वांसंबंधी आपण जे काही सांगितले आहे त्यावरून असे वाटते की हे सर्व भावच आहेत. मग यांच्यात स्थायीभाव कोठे आहे?

गोस्वामी–हे सर्व भाव आहेत–हे बरोबर आहे, परंतु यांच्यात जो भाव हास्य आदी अविरुद्ध आणि क्रोध आदी विरुद्ध–दोन प्रकारच्या भावांस आपल्या अधीन करून आणि स्वयं प्रधान बनून अन्यान्य भावांच्या सम्राट रूपात विराजमान राहतो, त्याचे नावच स्थायीभाव आहे. भक्ताच्या हृदयात आश्रयगत कृष्णरतीच तो स्थायीभाव आहे. पाहा, सामग्री वर्णनाच्या प्रसंगात त्या आश्रयाची गणना विभावांतर्गत आलंबनामध्ये केली गेलेली आहे. तेच भाव दुसऱ्या भावांस आपल्या अधीन करून त्यांतून काहींना रसाच्या हेतू रूपात आणि काहींना रसाच्या सहाय्यक रूपात ग्रहण करून स्वयं आस्वादन रूप होऊनही आस्वाद्य भाव धारण करतो. अत्यंत गूढ रूपात अनुशीलनाद्वारे स्थायीभावास दुसऱ्या भावांपासून वेगळे करून विचार करा. स्थायीभावरूप रती मुख्य आणि गौण भेदाने दोन प्रकारची असते–मुख्यरती आणि गौणरती.

ब्रजनाथ–मुख्यरती कशास म्हणतात?

गोस्वामी–भावभक्तीच्या प्रसंगी ज्या शुद्धसत्त्व विशेष स्वरूप रतीची गोष्ट सांगितली आहे, तीच रती मुख्य आहे.

ब्रजनाथ–आपण जेव्हा साधारण अलंकारशास्त्र वाचत होतो, त्यावेळी रतीसंबंधी जी माझी धारणा झाली होती, ती आज आपले विशुद्ध विचार ऐकून दूर झाली आहे. आज मी हे यथायोग्य समजलो की, जिवाचे शुद्धस्वरूप जी आत्मगत मनोवृत्ती आहे, त्यावरच भावगत रस उदित होतो. साधारण आलंकारिकांनी ज्या रतीचा उल्लेख केला आहे अथवा ते ज्या रतीचा उल्लेख करतात, ती केवळ

बद्धजिवाच्या जड शरीर आणि लिंग (सूक्ष्म) शरीरगत मन आणि चित्ताचा आश्रय करून आस्वादित होते. आता मी हेदेखील समजलो की आपण ज्या रसाची व्याख्या करीत आहात, तोच रस शुद्धजिवाचे सर्वस्व धन आहे आणि बद्धजीव त्या रसास ल्हादिनीच्या कृपेने किंचितमात्रेत अनुभव करतो. आता कृपया हे सांगावे, की शुद्धरती अर्थात मुख्यरती किती प्रकारची असते?

ब्रजनाथाचा तत्त्वबोध पाहून गुरुगोस्वामींच्या नयनांतून आनंदाश्रूंच्या धारा बरसू लागल्या. ते ब्रजनाथाचे आलिंगन करून म्हणाले तुझ्यासारखा शिष्य प्राप्त करून आज मी धन्य झालो. ऐक, मुख्यरती दोन प्रकारची असते–स्वार्थी मुख्यरती आणि परार्थी मुख्यरती.

ब्रजनाथ–स्वार्थी मुख्यरती कशास म्हणतात?

गोस्वामी–स्वार्थी रती अविरुद्ध भावसमूहाद्वारे स्वतःस पुष्ट करते आणि विरुद्ध भावाद्वारे तिच्यात ग्लानी (खेद वा अनुत्साह) उत्पन्न होते.

ब्रजनाथ–परार्थी मुख्यरती कशास म्हणतात?

गोस्वामी–जी रती स्वयं संकुचित भावाने अविरुद्ध आणि विरुद्ध दोन्ही प्रकारच्या भावांना ग्रहण करते, तिला परार्थी मुख्यरती म्हणतात. मुख्यरतीचा आणखी एक प्रकारचा विभाग आहे.

ब्रजनाथ–कुठला?

गोस्वामी–मुख्यरती पाच विभागांत विभक्त आहे–शुद्ध, दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर. ज्याप्रकारे एकच सूर्य स्फटिक आदी भिन्न-भिन्न पात्रांवर प्रतिबिंबित झाल्यावर भिन्न-भिन्न प्रकारे पाहता येतो, त्याच प्रकारे स्थायीभावाचा रति-पात्रांच्या भेदाने वैशिष्ट्य लक्षित होते.

ब्रजनाथ–शुद्धरतीची व्याख्या करावी.

गोस्वामी–शुद्धरती तीन प्रकारची असते–सामान्य, स्वच्छ आणि शांत. साधारण लोकांची आणि बालिकांची कृष्णाप्रती जी रती असते, तिला सामान्यरती म्हणतात. नानाविध भक्तांसंबंधी त्यांच्या आपल्या मतानुसार वेगवेगळ्या साधनांद्वारे

विविधतेस प्राप्त साधकांची रती 'स्वच्छरती' म्हणविली जाते. साधकास ज्या प्रकारच्या भक्तांचा संग प्राप्त होतो, साधकाची रती स्फटिक मण्याप्रमाणे त्याच प्रकारचा भाव धारण करते. म्हणूनच याचे नाव स्वच्छरती आहे. या रतीस प्राप्त झालेली व्यक्ती कधी कृष्णास 'प्रभू' संबोधून स्तव करते, कधी 'मित्र' संबोधून परिहास करते, कधी 'पुत्र' मानून पालन-पोषण करते, कधी 'कांत' संबोधून उल्हसित होते आणि कधी 'परमात्म्या'ची भावना देखील करते. समगुणयुक्त होऊन आपल्याच मनाने विषय-वासनांस काढून टाकल्यावर जो मनास आनंद होतो, त्यास सम स्वभाव म्हणतात. अशा समस्वभावी पुरुषांची परमात्म ज्ञानाने कृष्णाप्रती जी रती होते, तिला शांतरती म्हणतात. दास्य, सख्य, वात्सल्यादी रतींमध्ये राहणाऱ्या स्वादांचा या रतीशी संपर्क न झाल्यानेच या रतीस शुद्धरती म्हटले जाते.

या तीन रती (दास्य, सख्य आणि वात्सल्य) केवला आणि संकुला भेदाने दोन प्रकारच्या असतात. जेथे केवळ एक रती कार्य करते–तेथे दुसऱ्या रतीचा गंध नसल्याने तिला केवला म्हणतात. व्रजानुग रसाल आदी भृत्यांमध्ये (सेवकांमध्ये), श्रीदाम आदी सखांमध्ये तथा नन्द आदी गुरुजनांमध्ये केवलारती असते. जेथे दोन अथवा अधिक रती एकत्र मिळतात, तिला संकुला रती म्हणतात. उद्धव, भीम आणि व्रजेश्वरीची धात्री मुखरेची रती संकुला म्हणविली जाते.

ब्रजनाथ–आधी माझी अशी धारणा होती की, व्रजानुग भक्तांमध्ये शांतरती नसते, परंतु आता पाहतो आहे की व्रजामध्ये किंचिन्मात्रेत शांतरतीसुद्धा असते. जड आलंकारिकांनी शांत धर्मात रतीचा अभाव मानला आहे. परंतु परब्रह्म-रतीमध्ये ती अवश्यच लक्षित होते. आता दास्यरतीचे लक्षण सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–"कृष्ण प्रभू आहेत" आणि "मी दास आहे"–या बुद्धीने ज्या आराध्यत्वात्मिक रतीचा उदय होतो, तिला दास्यरती किंवा प्रीती म्हणतात. ज्यांची याच्यात (आराध्याच्या प्रती) आसक्ती होते, त्यांची अन्य वस्तुंमध्ये प्रीती राहत नाही.

ब्रजनाथ–सख्य रतीचे लक्षण काय आहे?

गोस्वामी–जे श्रीकृष्णास आपल्या समान समजून त्यांच्या प्रती दृढ विश्वास करतात, त्यांची रती सख्यरती म्हटली जाते. सख्यरतीमध्ये मोकळेपणाने हास्य-परिहास्य होतो.

ब्रजनाथ–वात्सल्यरतीची लक्षणे सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–कृष्णाच्या गुरुजनांची श्रीकृष्णाप्रती जी अनुग्रहमयी रती असते, तिला वात्सल्यरती म्हणतात. यात लालन-पालन, मांगल्य-क्रिया, आशीर्वाद आणि चिबुक (हनुवटी) स्पर्श आदी क्रिया असतात.

ब्रजनाथ–कृपा करून मधुररतीची लक्षणे सांगावीत.

गोस्वामी–मृगनयनी व्रजांगना आणि श्रीकृष्णाच्या मध्ये ज्या स्मरण-दर्शन आदी अष्टविध संभोगरूपा जी रती होते, तिला मधुररती म्हणतात. यात कटाक्ष, भ्रूक्षेप, प्रियवाणी आणि हास्य आदी कार्य होतात. ही रती शांतपासून मधुरपर्यंत उत्तरोत्तर आस्वादशालिनी आणि उल्हासमयी असते तथा भक्त भेदाने नित्य विराजमान राहते. येथपर्यंत संक्षेपात पाच प्रकारच्या मुख्यरतींचे लक्षण सांगितले.

ब्रजनाथ–आता अप्राकृत रससंबंधिनी गौणी रतीची व्याख्या करा.

गोस्वामी–संकोचमयी रतीद्वारे विभाव अर्थात आलंबनजन्य जे भाव-विशेष स्वयं प्रकाशित होतात, त्यांना गौणी रती म्हणतात. हास्य, विस्मय, उत्साह, शोक, क्रोध, भय आणि जुगुप्सा (निंदा)–हे सात गौण भाव आहेत. प्रथम सहा गौण-भावांमध्ये कृष्णभाव संभव आहे. शुद्धरतीचा उदय झाल्यावर भक्तजनांच्या जड शरीरात तथा शरीराच्या कार्यात जो जुगुप्सेचा अर्थात निंदेचा उदय होतो, रसविचाराने तीच सप्तम रती आहे. शुद्धसत्त्व विशेषरूप (स्वार्थी) रतीमुळे हास्य आदी भाव भिन्न असूनही परार्थी-मुख्यरतीच्या योग हेतू यांच्यात अर्थात हास्य आदींमध्ये देखील रती शब्दाचा प्रयोग होतो. जसे हास्यरती, विस्मयरती इत्यादी. हास्यादी गौणीरती कुठल्या समयी कुठल्या भक्तामध्ये स्थायित्व लाभ करते, परंतु सर्वत्र असे होत नाही. म्हणूनच ही सामायिक आणि अनियत धारा (जी धाराप्रवाह रूपात प्रकाशित होत नाही) या नावाने व्यक्त आहे. काही काही ठिकाणी ही प्रबळ होऊन शुद्ध सहज-रतीचा देखील तिरस्कार करून आपले प्रभुत्व स्थापित करते.

ब्रजनाथ–जडीय अलंकारात श्रृंगार, हास्य, करुण–आदी आठ प्रकारचे भाव सांगितले गेले आहेत. आता मी समजलो की भावाचा असा विभाव केवळ तुच्छ नायक-नायिकांच्या जडीय रसात शोभा प्राप्त करू शकतो. चिन्मय व्रजरसात त्याला स्थान नाही. चिन्मय रसात केवळ शुद्ध आत्म्याचीच क्रिया असते, तेथे मनाची क्रिया

पोहोचू शकत नाही. म्हणूनच महाजन अर्थात भक्त महात्म्यांनी रतीला स्थायीभाव स्थिर करून त्याच्या मुख्य भावास पाच प्रकारच्या मुख्य रसांमध्ये तथा गौण भावांस सात प्रकारच्या गौण रसांमध्ये विभक्त केले आहे–हेच विभाजन योग्य आहे. आता कृपा करून हास्यरतीची लक्षणे सांगावीत.

गोस्वामी–वाक्य, वेष आणि कृती आदींच्या विकृतीने चित्तात विकासकारी हास्यरतीचा उदय होतो. यात नेत्रविकास, नासिका, ओठ आणि डोक्यात स्पंदने आदी होतात.हे हास्य कृष्णसंबंधी चेष्टेतूनच उत्पन्न होते आणि स्वयं संकोचमयी रतीद्वारे अनुगृहीत होऊन हास्यरती म्हणविली जाते.

ब्रजनाथ–विस्मय रतीची लक्षणे सांगा.

गोस्वामी–एखाद्या अलौकिक विषयास पाहून चित्तात जो विकार होतो, त्यास विस्मय म्हणतात. हा विस्मय कृष्णासंबंधी झाल्यावर विस्मयरती म्हणविली जाते. यात डोळे विस्फारून पाहणे, वाह! वाह! आदी साधुवाद आणि पुलक आदी अनुभाव प्रकट होतात.

ब्रजनाथ–उत्साह रतीची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–साधूंच्या द्वारे प्रशंसित कुठल्या मोठ्या कार्यात दृढ मनाची जी शीघ्रातीशीघ्र आसक्ती असते, त्यास उत्साह म्हणतात. यात शीघ्रता, धैर्यत्याग आणि उद्यम आदी लक्षित होतात.

ब्रजनाथ–क्रोधरतीची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–प्रतिकूल भावांद्वारे चित्तात जो दाह निर्माण होते, त्याला क्रोध म्हणतात. यात कठोरता, भ्रुकुटी ताणणे, डोळे लाल होणे आदी विकार अनुभूत होतात.

ब्रजनाथ–भय रतीची काय लक्षणे आहेत?

गोस्वामी–एखादे भयंकर दृश्य पाहून चित्ताची अत्याधिक चंचलता होणे म्हणजेच भय होय. यात आत्मगोपन, हृदय-शुष्कता आणि पळण्याची कृती पाहिली जाते.

ब्रजनाथ–जुगुप्सारतीची लक्षणे सांगा.

गोस्वामी–निंदित विषयांचे दर्शन, श्रवण अथवा स्मरण आदींमुळे जो संकोच (लज्जा) होतो, त्यास जुगुप्सा म्हणतात. यात थू-थू करणे, मुख वेडेवाकडे करणे तसेच छिः-छिः करणे आदी लक्षणे प्रकाशित होतात. ही सर्व लक्षणे कृष्णाच्या अनुकूल झाल्यावरच रती आहेत, अन्यथा हे केवळ मानवी चित्ताचे विकार मात्र आहेत.

ब्रजनाथ–भक्तिरसात एकूण किती भाव आहेत?

गोस्वामी–आठ स्थायीभाव, तेहतीस संचारीभाव आणि आठ सात्त्विकभाव–असे एकूण ४९ भाव आहेत. हे भावसमूह जर प्राकृत असतील, तर ते त्रिगुणोत्पन्न सुख-दुःखमय असतात आणि जर हे श्रीकृष्णस्फुरणमय असतील, तर अप्राकृत आणि त्रिगुणातीत प्रौढानंदमय असतात, आणखी काय तर विषाददेखील कृष्णसंबंधी झाल्यावर परम सुखमय असतो. श्रीरूपगोस्वामींनी म्हटले आहे की कृष्ण आणि कृष्ण-प्रियादी आलंबनाच्या रूपात रतीची कारणे आहेत. स्तंभ आदी रतीची कार्ये आहेत, निर्वेद आदी रतीचे सहाय्यक आहेत. रसोद्बोधनाच्या वेळेस यांची संज्ञा कारण, कार्य आणि सहाय्यक नसून विभाव आदी असते. रती विषय-आस्वादनाची योग्यता विभावित करते अर्थात उत्पन्न करते. म्हणूनच पंडितजन यास 'विभाव' म्हणतात. या विभावित रतीस विस्तृत करून अनुभव (प्रकाश) करविण्यामुळे नृत्य आदींस 'अनुभाव' म्हटले गेले आहे. या विभावित आणि अनुभावित रतीस–जी निर्वेद आदी भावांचा संचार करवून विचित्र बनविते–तिला 'संचारी' भाव म्हणतात. सात्त्विकभावसमूह देखील सत्त्वबोधक कार्य करवितात, म्हणूनच त्यांना 'सात्त्विक' भाव म्हणतात. भगवत्संबंधी काव्य आणि नाट्य आदी शास्त्रांमध्ये पारंगत भक्तजन सेवेलाच विभावाचे आदी कारण सांगतात. वास्तविक हे रतीच्या अंतर्गत असलेले भावसमूह अचिंत्यरूपविशिष्ट महाभक्तिविलासरूप आहेत. महाभारत आदी शास्त्रांमध्ये यांस तर्कांच्याही पलीकडले म्हटले गेले आहे. महाभारतात असा सिद्धांत निश्चित केलेला आहे की जे भावसमूह चिंतेच्या पलीकडचे आहेत, त्यांच्यासंबंधी तर्क करणे योग्य नाही. प्रकृतीच्या पलीकडील तत्त्वच अचिन्त्यतत्त्व आहे. अचिंत्यरसतत्त्व मनोहरा रतीच कृष्णाच्या रूप आदींस विभावित करवून आणि त्या विभाव आदींस सोबत घेऊन स्वतःस पुष्ट करते. माधुर्य आदींचे आश्रयस्वरूप

कृष्णाचे रूप आदींस रती प्रकाशित करते आणि दुसरीकडे कृष्णरूप आदी अनुभूत होऊन रतीस विस्तृत करतात. म्हणून विभाव, अनुभाव, सात्त्विक आणि व्यभिचारी भावसमूह रतीचे सहाय्यक आहेत आणि रतीदेखील त्या भावांची सहायक आहे.

ब्रजनाथ–कृष्णरती आणि विषयरतीमध्ये काय अंतर आहे?

गोस्वामी–विषयरती लौकिकी असते, परंतु कृष्णरती अलौकिकी असते. लौकिकीरती संयोगात सुखमयी आणि वियोगात नितांत दुःखदायी असते. कृष्णरती भगवंताच्या प्रेमी व्यक्तींमध्ये युक्त झाल्यावर रस होते आणि संभोग सुखाचा उदय करविते. वियोगात अर्थात विप्रलंभात तीच रती एक अत्यंत अद्भुत आनंद-विवर्ताचे रूप धारण करते. श्रीमन् महाप्रभू आणि रायरामानन्द-संवादात रायरामानन्दांनी स्वरचित **"पहिलेहि राग नयनभङ्गे भेल।"**[१] या पद्यात वियोगाच्या अद्भुतानन्द 'विवर्ता' ची व्याख्या केली आहे. त्यात आर्तिभावाचा आभासमात्र प्राप्त होतो. परंतु तो परम सुखमय असतो.

ब्रजनाथ–तार्किकजन रसास प्रकाश्य खण्डवस्तू म्हणतात, त्याचे उत्तर काय आहे?

गोस्वामी–जडरस वस्तुतः प्रकाश्य खण्ड वस्तू आहे, कारण सामग्री मिळाल्याने स्थायीभाव रसरूपात व्यक्त होतो, त्याआधी तो अव्यक्त असतो. परंतु अप्राकृत चिन्मयरसाच्या संबंधी असे नाही. सिद्धावस्थेत हा नित्य, अखंड आणि स्वप्रकाश असतो.

साधनावस्थेत तोच रस प्राकृत जगात प्रकाशित रूपात अनुभूत होतो. लौकिक रस वियोगात नसतो. परंतु अलौकिक रस संसार-वियोग दशेमध्ये अधिक शोभा प्राप्त करतो. ल्हादिनी-महाशक्तीच्या विलासरूपात हा रस परमानंदतादात्म्य लाभ करतो, अर्थात परमानंदच स्वयं रस आहे. तो तर्काच्या अतीत आहे, कारण अचिंत्य आहे.

ब्रजनाथ–अप्राकृत तत्त्वात रस किती प्रकारचे असतात?

---

(१) श्रीचैतन्यचरितामृत, मध्यलीला ८/१९३ मध्ये द्रष्टव्य.

गोस्वामी–रती मुख्य रूपाने एक आहे आणि गौण रूपात सात आहेत. म्हणूनच एकूण मिळून रती आठ प्रकारची आहे. त्याचप्रकारे मुख्य रस पाच प्रकारचे असूनही एक आहे आणि गौण रस सात प्रकारचे आहेत. म्हणूनच रसदेखील आठ प्रकारचे आहेत.

ब्रजनाथ–आठींचीही कृपया नावे सांगा. जितके ऐकतो आहे, श्रवण करण्याची इच्छा तितकीच अधिक वाढते आहे.

गोस्वामी–श्रीरूप गोस्वामी भक्तिरसामृतसिन्धू (२/५/११५-११६) मध्ये म्हणतात–

**मुख्यस्तु पञ्चधा शान्तः प्रीतः प्रेयांश्च वत्सलः।**
**मधुरश्चेत्यमी ज्ञेया यथापूर्वमनुत्तमाः॥**
**हास्योऽद्भुतस्तथा वीरः करुणो रौद्र इत्यपि।**
**भयानकः सबीभत्स इति गौणश्च सप्तधा॥**

मुख्य भक्तिरस पाच आहेत–शांत, प्रीत, प्रेय, वत्सल आणि मधुर. या पाचांमध्ये पहिल्यास दुसऱ्यापेक्षा, दुसऱ्यास तिसऱ्यापेक्षा, तिसऱ्यास चौथ्यापेक्षा, चौथ्यास पाचव्यापेक्षा क्रमशः कनिष्ठ समजावे. गौण भक्तिरसदेखील सात प्रकारचे आहेत–हास्य, अद्भुत, वीर, करुण, रौद्र, भयानक आणि बीभत्स.

ब्रजनाथ–चिन्मय रसात भाव शब्दाचा अर्थ काय आहे?

गोस्वामी–चित्-विषयात अनन्य बुद्धियुक्त पंडितगण भावनेविषयी गाढ चित्संस्काराद्वारे आपल्या चित्तात ज्या भावास उदित करवितात, तोच या रस तंत्रात भाव शब्दवाच्य असतो. मी आधीच म्हटले होते की भाग दोन प्रकारचे असतात–चिंत्यभाव आणि अचिंत्यभाव. चिंत्यभावांविषयी तर्क करता येतो, कारण बद्धजिवांच्या बद्ध मनात जे समस्त भाव उदित होतात, ते सर्व जड धर्मप्रसूत असतात. म्हणूनच यांच्याविषयी चिंतन करता येते. ईश्वराच्या विषयीसुद्धा त्यांचे जे जड भाव आहेत–ते चिंत्यभाव आहेत. वास्तविक ईश्वरासंबंधी भाव चिंत्य नसतात, कारण ईश्वरतत्त्व जडाच्या पलीकडील आहे. परंतु ईश्वरतत्त्व जडातीत आहे आणि त्यात चिंत्यभाव नसतो. म्हणूनच ईश्वरतत्त्वात कुठलाच भाव नसतो–असा विचार करणे चुकीचे ठरेल. ईश्वर-संबंधात समस्त भाव आहेत. परंतु जड मनाच्या चिंतेच्या

पलीकडले असल्याने अचिंत्य आहेत. त्या अचिंत्य भावांना हृदयात आणून अनन्यबुद्धीसोबत अनुशीलन करता-करता त्या अचिंत्य भावांपैकी एका भावास स्थायी जाणून अन्यान्य अचिंत्य भावांस सामग्री रूपात स्वीकार करा. असे झाल्याने तुमच्यात नित्यसिद्ध अखंड रसाचा उदय होईल.

ब्रजनाथ–प्रभो! याविषयी गाढ संस्कार कशास म्हणतात?

गोस्वामी–बाबा! सांसारिक विषयांमध्ये आसक्त होऊन जन्मजन्मांतरापर्यंत कर्मचक्रात भटकत-भटकत प्राक्तन (पूर्वकालीन) आणि आधुनिक–यो दोन प्रकारच्या संस्कारांनी तुझे चित्त गठित झाले आहे. तुझ्या विशुद्ध आत्मसत्तेमध्ये जी विशुद्ध चित्तवृत्ती होती, तीच यावेळी विकृत झाली आहे. आता यावेळी तुमच्या पूर्व-पूर्व सुकृतींच्या प्रभावाने प्राप्त सत्संगात भजन प्रक्रियेद्वारे जे संस्कार बनतात, त्याद्वारे तुमचे विकृत संस्कार दूर झाल्यावर तुमचा यथार्थ संस्कार उदित होईल. हा संस्कार जितका प्रगाढ होईल, अचिंत्यतत्त्व तितक्याच अधिक रूपात तुमच्या हृदयात स्फुरित होईल. यालाच प्रगाढ संस्कार म्हणतात.

ब्रजनाथ–मला हे जाणण्याची इच्छा आहे की रसतत्त्वात कुणाचा अधिकार असतो?

गोस्वामी–जे पूर्वोक्त क्रमानुसार प्रगाढ-संस्कारांद्वारे अचिंत्य भावांस आपल्या हृदयात आणू शकतात, केवळ तेच साधक रसतत्त्वाचे अधिकारी आहेत. दुसऱ्यांचा यात अधिकार नाही. श्रीरूप गोस्वामींनी म्हटले आहे–

**व्यतीत्य भावनावर्त्म यश्चमत्कारभारभूः।**
**हृदि सत्त्वोज्ज्वले बाढं स्वदते स रसो मतः॥**[२]

(भ. र. सि. २/५/१३२)

ब्रजनाथ–या रसाचे अनधिकारी कोण आहेत? ज्याप्रकारे अनधिकारीस हरिनाम देणे अपराध आहे, त्याचप्रमाणे अनधिकारी व्यक्तीजवळ रसविषयाची

---

(२) भावना (चिंतन) पथास पार करून परम चमत्काराचा आधारस्वरूप जो स्थायीभाव शुद्धसत्त्व परिमार्जित उज्ज्वल हृदयात आस्वादित होतो, त्यास 'रस' म्हणतात.

व्याख्या करणेसुद्धा अपराध आहे. प्रभो, कृपा करून आम्हा दीनहीनांस यासंबंधी सतर्क करावे.

गोस्वामी–जे वैराग्य शुद्धभक्तीच्या प्रती उदासीन असते, त्यास फल्गू (खोटे) वैराग्य म्हणतात. त्याचप्रकारे जे ज्ञान शुद्धभक्तीच्या प्रती उदासीन असते, त्यास शुष्क ज्ञान म्हटले जाऊ शकते. हे फल्गुवैरागी, शुष्कज्ञानी, जड तर्कनिष्ठ पुरुष, कर्ममीमांसा आणि शुष्कज्ञानपर्ववाले उत्तरमीमांसेचे प्रशंसक पुरुष, भक्तीच्या आस्वादनात बहिर्मुख (उदासीन) पुरुष, केवलाद्वैतवादीरूप जडमीमांसक पुरुष–या सर्व व्यक्ती रस विषयी अनधिकारी आहेत. रसिक भक्तगण या अनधिकारी व्यक्तींपासून कृष्णभक्तिरसाचे ठीक त्याच प्रकारे रक्षण करतील, ज्याप्रकारे चोरांपासून महानिधीचे रक्षण केले जाते.

ब्रजनाथ–आज आम्ही धन्य झालो. आम्ही आपल्या श्रीमुखातील आज्ञा सर्वतोभावेन पाळू.

विजयकुमार–प्रभो! मी सर्वसाधारणपणे श्रीमद्भागवताचा पाठ करतो. त्यातून जे अर्थ उपार्जन होते, त्यातून आपल्या संसाराचा निर्वाह करतो. परंतु श्रीमद्भागवत तर रस-ग्रंथ आहे. अशाप्रकारे सर्वसाधारणपणे पाठ करून धन-संग्रह केल्याने काही अपराध तर होत नाही ना?

गोस्वामी–अहा! श्रीमद्भागवत ग्रंथ सर्वशास्त्र शिरोमणी आणि निगम शास्त्रफलस्वरूप आहे. प्रथम स्कंधाच्या तृतीय श्लोकात जसा निर्देश दिला आहे, तसेच करावयास हवे **"मुहुरहो रसिका भुवि भावुकाः।"** (३) (श्रीमद्भा.१/१/३) या श्लोकात केवळ भावुक वा रसिक भक्तांव्यतिरिक्त कुणासही श्रीमद्-भागवत रस पान करण्याचे अधिकारी मानलेले नाही. बाबा, या व्यवसायास त्वरित सोड. तू रस-पिपासू आहेस. रसाप्रती आता आणखी अपराध करू नकोस. **"रसो वै सः"**–(तै. आ. २/७)–या वेद वाणीमध्ये असे म्हटले आहे की रसच कृष्णस्वरूप आहे. जीविका निर्वाह करण्याकरिता अनेक व्यवसाय आहेत, तू त्यांच्याद्वारे जीविका निर्वाह करावास. सर्वसाधारणपणे श्रीमद्भागवताचा पाठ करून अर्थ-संग्रह आता करू

---

(३) हे भगवत्प्रीतीच्या रसिक भक्तजनांनो! श्रीमद्भागवत नामक वेदकल्पतरूच्या सुपक्व फलाचे आपण लोकांनी मुक्तावस्थेतदेखील पुनः-पुनः पान करीत रहावे.

नकोस. हो, जर कुठे रसिक श्रोता भेटला, तर विना वेतन वा दक्षिणा त्यास परमानंदाने श्रीमद्भागवत श्रवण करवू शकतोस.

विजय–प्रभो! आज एका भयंकर अपराधापासून आपण माझे रक्षण केले आहे. यापुढे मी असे करणार नाही. पण याआधी मी हा जो अपराध केला आहे त्याचे काय होणार?

गोस्वामी–हे अपराध दूर होतील. सरळ हृदयाने रसांच्या शरणागत झाल्यावर, रस तुला अवश्य क्षमा करतील. याकरिता तू चिंता करू नयेस.

विजय–प्रभो! एखाद्या नीच वृत्तीद्वारे आपल्या शरीराचे पोषण करीन, परंतु अनाधिकारीजवळ असे रस-कीर्तन करणार नाही आणि त्यांच्याकडून अर्थोपार्जन करूनही रसकीर्तन करणार नाही.

गोस्वामी–बाबा! तुम्ही लोक धन्य आहात. कृष्णाने तुम्हांस आत्मसात केले आहे. अन्यथा भक्तीच्या विषयी अशी दृढता संभव नाही. तुम्ही नवद्वीपधामवासी आहात. श्रीश्रीगौरहरीने तुम्हांस सर्वशक्ती प्रदान केली आहे.

**॥ अठ्ठाविसावा अध्याय समाप्त ॥**



# एकोणतीसावा अध्याय (रस-विचार)

ब्रजनाथ आणि विजयकुमार दोघांनीही विचारविमर्श करून ठरविले की ते पुरीतच चातुर्मास्य काळ व्यतीत करतील तथा श्रीगोपालगुरूंच्या निकट रसतत्त्वा-संबंधी समस्त प्रकारच्या विचारांस श्रवण करतील. ब्रजनाथची पितामहीदेखील चातुर्मासात पुरीवासाचे माहात्म्य ऐकून दोघांच्याही प्रस्तावास सहमत झाली. मग तर ते प्रतिदिन सकाळी आणि संध्याकाळी श्रीजगन्नाथदेवांचे दर्शन करीत असत, नरेंद्र सरोवरात स्नान करून पुरी आणि आसपासच्या दर्शनीय स्थानांचे नियमित रूपात दर्शन करीत असत. त्याव्यतिरिक्त श्री जगन्नाथांची ज्यावेळी जी सेवा होते तथा ज्यावेळी जो वेष आदी असतात, त्या सर्वांचे भक्तीपूर्वक दर्शन करीत असत. अशा प्रकारे मोठ्या नियमितपणे तथा सुंदर ढंगाने त्यांचा वेळ व्यतीत होऊ लागला. त्यांनी श्रीगोपालगुरूंच्या समीप आपल्या मनीचे भाव व्यक्त केले. श्रीगुरुगोस्वामी त्यांचे बोलणे ऐकून मोठे प्रसन्न झाले. ते म्हणाले–माझ्या हृदयात तुम्हा दोघांप्रती एक प्रकारे वात्सल्यभाव इतका प्रगाढ झाला आहे की मला असे वाटू लागले आहे की तुम्हा लोकांच्या येथून जाण्यानंतर मला खूपच यातना होतील. तुम्ही जितके अधिक येथे थांबाल–मला तितकी अधिक प्रसन्नता होईल. सद्गुरू सहजासहजी प्राप्त करता येतात; परंतु सच्चे शिष्य सहजासहजी भेटत नाहीत.

ब्रजनाथाने अत्यंत विनम्र होऊन विचारले–कृपा करून भिन्न-भिन्न रसांचे विभाव आदींस सांगून रसतत्त्वाची अशी व्याख्या करा, जी आम्ही सहजच समजू शकू.

गोस्वामी–मोठाच सुंदर विषय आहे. श्रीगौरसुन्दर जे काही माझ्या मुखातून वदवतील, ते सर्वकाही सांगेन; तुम्ही सावधानतेने श्रवण करा. सर्वप्रथम शांतरस येतो. शांतरसात शांतिरतीच स्थायीभाव आहे. निर्विशेष ब्रह्मानंदामध्ये तथा योगींच्या आत्मानंदात जो आनंद आहे, तो अत्यंत सीमित आणि शिथिल आनंद आहे. ईशमय आनंद याहीपेक्षा मोठा असतो. ईश-स्वरूपानुभवच त्या सुखाचे कारण असते. शांतरसाचे आलंबन चतुर्भुज नारायण मूर्ती आहेत. त्या मूर्तीत विभुता, ऐश्वर्य आदी गुण असतात. शांत पुरुषच शांत रतीचे आश्रय असतात. आत्मारामगण तथा भगवंताविषयी श्रद्धाळू तपस्वीजनच शांत पुरुष आहेत. सनक, सनन्दन, सनातन

आदी चारही कुमार प्रधान आत्माराम आहेत. हे लोक बालसंन्याशाच्या वेशात विचरण करतात. सर्वप्रथम यांची रुची निर्विशेष ब्रह्मात होती. परंतु नंतर भगवंताच्या रूपमाधुरीप्रती आकृष्ट झाल्यावर ते चिद्घन मूर्तींची उपासना करू लागले. त्यांच्या युक्त वैराग्याद्वारे सारी विघ्ने दूर झालेली आहेत, विषयासक्तीसुद्धा दूर झालेली आहे, परंतु मुक्तीची अभिलाषा विद्यमान आहे, असे तापसजन शांतरसात प्रवेश करतात. प्रधान-प्रधान उपनिषदांचे श्रवण, निर्जनी वास, तत्त्वांचे विवेचन, विद्याशक्तीची प्रधानता स्थापन, विश्वरूपाप्रती आदर, ज्ञानमिश्र भक्तांचा संग, समान विद्वानांसोबत उपनिषदांतील तत्त्वांवर विचारविमर्श करणे–हे सर्व या रसाचे उद्दीपन आहेत. पुनः भगवंताच्या चरणकमळी अर्पित तुळशीचा सौरभ, शंख-ध्वनी, पवित्र पर्वत, पवित्र वन, सिद्ध क्षेत्र, गंगा, विषय क्षय करण्याची प्रवृत्ती अर्थात पाप दूर करण्याची अभिलाषा, काळच सर्वांचा विनाश करतो–अशी धारणा–हेसुद्धा उद्दीपन आहे. हा शांतरसाचा विभाव आहे.

ब्रजनाथ–या रसाचा अनुभाव कसा असतो?

गोस्वामी–नासिकेच्या अग्रभागावर दृष्टी, अवधूताप्रमाणे कृती, चार हात पुढचे स्थान पाहून पावले उचलणे, ज्ञानमुद्रा दाखविणे अर्थात तर्जनी आणि अंगठ्यास मिळवून जी मुद्रा होते ती दाखविणे, भगवद्विद्वेषींच्या प्रती द्वेषरहित असणे, भगवंताच्या प्रेमी भक्तांच्या प्रती भक्तीची कमी, संसार ध्वंस आणि जीवनमुक्ती प्रती आदरभाव, निरपेक्षता, निर्ममता (ममता नसणे), निरहंकार आणि मौन आदी शांत रतीच्या असाधारण क्रिया–हे शांतरतीचे अनुभाव आहेत. जृंभा (जांभई येणे), अंग मोडणे, भक्ति-उपदेश, हरिप्रती नमस्कार आणि स्तव आदी शांतभाव रूप साधारण क्रिया आहेत.

ब्रजनाथ–शांतरसात सात्त्विक विकार कसा असतो?

गोस्वामी–प्रलय अर्थात मूर्च्छित होऊन पृथ्वीवर पडणे या व्यतिरिक्त रोमांच, स्वेद, स्तंभ आदी सात्त्विक विकारसमूह या रसात अधिक परिमाणात लक्षित होतात. यात दीप्त-लक्षण सात्त्विक विकार नाहीत.

ब्रजनाथ–या रसात संचारीभाव कोणकोणते आहेत?

गोस्वामी–निर्वेद (खेद, वैराग्य), धैर्य, हर्ष, मती, स्मृती, विषाद, उत्कंठा, आवेग आणि वितर्क–हे संचारीभावसमूह साधारणतः शांतरसात दिसून येतात.

ब्रजनाथ–शांतिरती किती प्रकारची असते?

गोस्वामी–शांतरसात शांतिरती स्थायीभाव आहे. शांतिरती समा आणि सांद्रा भेदाने दोन प्रकारची असते. असंप्रज्ञात समाधी[१] मध्ये भगवत्-स्फूर्तिजन्य शरीरात हर्ष, काम, रोमांच प्रकाशित झाल्यावर समा शांतिरती होते. संपूर्णपणे अविद्येचा ध्वंस झाल्याने निर्विकल्प समाधीमध्ये भगवत्-साक्षात्कार झाल्यावर जो अत्यंत घनानन्द होतो, त्यास सांद्रानंद म्हणतात, सांद्रा शांतिरतीमध्ये हाच सांद्रानंद प्रकाशित होतो. परोक्ष आणि साक्षात्कार भेदाने शांतरस दोन प्रकारचे असतात. शुकदेव आणि बिल्वमंगलांनी ज्ञानाद्वारे प्राप्त होणाऱ्या ब्रह्मानंदाचा परित्याग करून भक्तिरस आनंदसमुद्रात सूर मारला होता. प्रख्यात विद्वान श्रीसार्वभौम भट्टाचार्य यांचीदेखील तीच अवस्था झाली होती.

ब्रजनाथ–जड अलंकारात शांतरसास का नाही ग्रहण केले गेले?

गोस्वामी–जडीय व्यापारात शांती आल्यानेच विचित्रता दूर होते, म्हणून जड अलंकारिकांनी शांतरतीस घेतले नाही, परंतु चित्-व्यापारात शांतरसाच्या आविर्भावाने अप्राकृत रसाचा उत्तरोत्तर उदय होतो. भगवंत म्हणतात की त्यांच्यात (भगवंतात) निष्ठायुक्त बुद्धीस 'शम' म्हणतात. आता पहा, शांतिरतीशिवाय भगवंतात बुद्धीची निष्ठा असणे असंभव आहे, म्हणूनच चित्-तत्त्वात शांतरसास अवश्यच स्वीकारावे लागेल.

ब्रजनाथ–शांत भक्तिरसास यथोचित समजलो. आता कृपया दास्यरसाची विभाव आदींसोबत व्याख्या करावी.

गोस्वामी–दास्यरसास पंडितगण प्रीतरस म्हणतात. अनुग्राह्य पात्र दास भावयुक्त तथा पाल्य भावयुक्त अशा दोन प्रकारचे असल्याने हा प्रीतरसदेखील दोन प्रकारचा असतो–संभ्रम प्रीतरस आणि गौरव प्रीतरस.

---

(१) योगामध्ये ती समाधी ज्यात आत्मा आपल्या स्वरूपाच्या बोधाप्रत पोहोचलेला नसतो.

ब्रजनाथ–संभ्रम प्रीतरस कशास म्हणतात?

गोस्वामी–"मी कृष्णाचा दास आहे"–असा अभिमान असणाऱ्या व्यक्तींची ब्रजेन्द्रनन्दन कृष्णाप्रती संभ्रम प्रीती उत्पन्न होते. तीच प्रीती उत्तरोत्तर अधिक पुष्ट झाल्यावर 'संभ्रम प्रीत' म्हणविली जाते. या रसात कृष्ण आणि कृष्णदासगण आलंबन असतात.

ब्रजनाथ–या रसात कृष्णाचे स्वरूप काय असते?

गोस्वामी–गोकुलात संभ्रम प्रीतरसात कृष्ण द्विभुज रूपात आलंबन असतात. दुसऱ्या ठिकाणी कधी-कधी द्विभुज आणि कधी-कधी चतुर्भुज रूपातसुद्धा आलंबन होतात. गोकुळात नवजलधर कांतियुक्त प्रभू श्रीकृष्ण करयुगुलांत मुरली, कटिप्रदेशात स्वर्णासही मात करणारे पीतवसन, डोक्यावर मोरपंखांचा चूडा (मुकूट) धारण करून गोपवेशात आलंबन आहेत.

अन्यत्र द्विभुज झाल्यावरही हातात शंख-चक्र आणि समस्त अंगांमध्ये मणि-मुक्तांचे आभूषण धारण करून ऐश्वर्य वेशात आलंबन होतात. श्रीरूप गोस्वामी भक्तिरसामृतसिन्धू (३/२/११-१५) मध्ये लिहितात–

**ब्रह्माण्डकोटिधामैकरोमकूपः कृपाम्बुधिः।**
**अविचिन्त्यमहाशक्तिः सर्वसिद्धिनिषे वितः॥**

**अवतारावलीबीजं सदात्मारामहृद्गुणः।**
**ईश्वरः परमाराध्यः सर्वज्ञः सुदृढव्रतः॥**

**समृद्धिमान् क्षमाशीलः शरणागतपालकः।**
**दक्षिणः सत्यवचनो दक्षः सर्वशुभङ्करः॥**

**प्रतापी धार्मिकः शास्त्रचक्षुर्भक्तसुहृत्तमः।**
**वदान्यस्तेजसायुक्तः कृतज्ञः कीर्तिसंश्रयः॥**

**वरीयान् बलवान् प्रेमवश्य इत्यादिभिर्गुणैः।**
**युतश्चतुर्विधेष्वेष दासेष्वालम्बनो हरिः॥**(२)

ब्रजनाथ–चार प्रकारचे दास कोणकोणते आहेत?

गोस्वामी–प्रश्रित (सदा खाली दृष्टी असणारे दास), आज्ञाकारी, विश्वासी आणि कृष्णास प्रभू जाणून नम्रबुद्धीने युक्त–असे चार प्रकारचे दास दास्यरतीचे आश्रयरूप आलंबन आहेत. त्यांची तात्त्विक नावे ही आहेत–(१) अधिकृत दास, (२) आश्रित दास, (३) पारिषद् दास, आणि (४) अनुगत दास.

ब्रजनाथ–अधिकृत दास कोण आहेत?

गोस्वामी–ब्रह्म, शिव आणि इंद्र आदी देवी-देवता अधिकृत दासदासी आहेत, ते जगासंबंधी कार्यांत अधिकार प्राप्त करून भगवंताची सेवा करतात.

ब्रजनाथ–आश्रित दास कोण आहेत?

गोस्वामी–शरणागत, ज्ञानी आणि सेवानिष्ठ–हे तीन प्रकारचे आश्रित दास आहेत. कालियनाग, जरासन्धाद्वारे कारागृहात बंद नृपसमूह शरणागत दासाच्या श्रेणीमध्ये येतात. शौनक आदी ऋषिगण मुक्तीची अभिलाषा सोडून श्रीहरीचा आश्रय केल्यामुळे ज्ञाननिष्ठ दास आहेत. प्रारंभापासूनच भगवत्-भजनात आसक्त चन्द्रध्वज,

---

(२) ज्यांच्या एका-एका रोमकुपात (त्वचेवरील रंध्रात) करोडो ब्रह्मांड स्थित आहेत, जे करुणेचे समुद्र आहेत, ज्यांच्या महाशक्तींस समजणे जिवाच्या बुद्धी पलीकडील गोष्ट आहे, अर्थात जे अचिंत्यशक्तिसंपन्न आहेत, जे सर्वप्रकारच्या सिद्धींद्वारे परिसेवित गुणावतार, लीलावतार आणि शक्त्यावेशावतार आदी अवतारांचे मूळ कारण आहेत, आत्माराम (शुकदेव आदींसारख्या) योगींच्या मनाचे हरण करणारे, जे सर्वनियंता आहेत, समस्त जीव आणि देवतांचेदेखील परामाराध्य आहेत, सर्वज्ञ आहेत, सुदृढव्रत आहेत, समृद्धिमान आहेत, क्षमाशील आहेत, शरणागतजनांचे रक्षक आहेत, परम उदार आहेत, सत्यवाक् आहेत, दक्ष आहेत, सर्वांचे कल्याण करणारे आहेत, प्रतापशाली आणि धार्मिक आहेत, जे शास्त्रचक्षू आहेत, भक्तजनांचे परमबंधू आहेत, वदान्य, तेजोयुक्त आणि कृतज्ञ आहेत, कीर्तिमान आहेत, वरीयान आहेत, बलवान आहेत आणि प्रेमवश्य आहेत. अशा अनेकानेक गुणांनी युक्त हरी (कृष्ण) चार प्रकारच्या दास भक्तांचे आलम्बनस्वरूप आहेत.

हरिहर, बहुलाश्व, इक्ष्वाकू आणि पुण्डरीक आदी सेवानिष्ठ शरणागतदास आहेत.

ब्रजनाथ–पारिषद् दास कोण आहेत?

गोस्वामी–उद्धव, दारुक, सात्यकी, श्रुतदेव, शत्रुजित, नन्द, उपनन्द, भद्र–हे पारिषद् दास आहेत. हे लोक मंत्रणा आदी कार्यांमध्ये नियुक्त राहूनही वेळेनुसार परिचर्या करतात. भीष्म, परीक्षित, विदुरही पारिषद् आहेत; त्यांच्यात प्रेमीदास उद्धवच श्रेष्ठ आहेत.

ब्रजनाथ–अनुगतदास कोण आहेत?

गोस्वामी–सेवाकार्यात सदैव आसक्त चित्त असणारेच अनुगतदास म्हणविले जातात. ते दोन प्रकारचे असतात–एक ब्रजात राहणारे, दुसरे द्वारिकापुरीमध्ये राहणारे. सुचन्द्र, मण्डल, स्तंभ, सुतम्ब आदी द्वारिकापुरीचे अनुगतदास आहेत. रक्तक, पत्रक, पत्री, मधुकण्ठ, मधुव्रत, रसाल, सुविलास, प्रेमकन्ध, मकरन्दक, आनन्द, चन्द्रहास, पायोद, वकुल, रसद आणि सारद–हे ब्रजातील अनुगतदास आहेत. ब्रजातील अनुगत दासांमध्ये रक्तक सर्वांत प्रधान आहेत. धूर्य, धीर आणि वीर भेदाने पारिषद् आणि अनुगतदास तीन प्रकारचे असतात. जे भक्त कृष्णाच्या प्रती, कृष्ण-प्रेयसींच्या प्रती तथा कृष्णाच्या सेवकांच्याप्रती यथायोग्य प्रीती राखतात, ते धूर्य पारिषद् आहेत; जे कृष्णप्रेयसीचे (सत्यभामादीचे) आश्रित आहेत, कृष्णसेवेत विशेष रूपाने नियुक्त होत नाहीत, ते धीर पारिषद् आहेत तथा जे भक्त केवळमात्र कृष्णाच्या कृपेचे आश्रित आहेत, दुसऱ्यांची चिंता करीत नाहीत, त्यांना वीर पारिषद् म्हणतात. श्रीकृष्णाचे पूर्वोक्त आश्रित, पारिषद् आणि अनुग–हे तीन प्रकारचे दासगण नित्यसिद्ध, सिद्ध आणि साधक भेदाने तीन प्रकारचे असतात.

ब्रजनाथ–दास्यरसाचे उद्दीपन कोण कोण आहेत, सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–मुरलीध्वनी, श्रृंगध्वनी, हास्ययुक्तदृष्टी, गुण-श्रवण, कमल, पदचिन्ह, नवीन मेघ आणि अंगांतून निघालेला सौरभ–ही दास्यरसाची उद्दीपने आहेत.

ब्रजनाथ–या रसाचे अनुभाव कोणकोणते आहेत?

गोस्वामी–आपल्या निर्दिष्ट कार्यात पूर्णपणे रममाण होणे, भगवंताच्या आज्ञेचे पालन करणे, भगवंताच्या सेवेत ईर्ष्या-द्वेषरहित होणे, कृष्णदासांशी मित्रता आणि कृष्णाप्रती निष्ठा–हे दास्यरसाचे असाधारण अनुभाव आहेत. नृत्य आदी उद्भास्वर, कृष्णाच्या प्रियजनांप्रती आदर आणि अन्यत्र वैराग्य–हे साधारण अनुभाव आहेत.

ब्रजनाथ–प्रीतरस आदी तिन्ही रसांमध्ये सात्त्विक विकार कशाप्रकारे होतात?

गोस्वामी–या रसांमध्ये स्तंभ आदी सर्व सात्त्विकभाव प्रकाशित होतात.

ब्रजनाथ–या रसांमध्ये व्यभिचारी भाव कोण-कोणते आहेत?

गोस्वामी–हर्ष, गर्व, धैर्य, निर्वेद, विषाद, दैन्य, चिंता, स्मृती, शंका, मती, उत्सुकता, चापल्य, वितर्क, आवेग, लज्जा, जडता, मोह, उन्माद, उचकी, बोध, स्वप्न, क्लम, व्याधी आणि मृती–हे २४ व्यभिचारीभाव या रसामध्ये आहेत. मद, श्रम,भय, अपस्मार (मूर्च्छित होऊन पडणे), आलस्य, उग्रता, क्रोध, असूया (द्वेष) आणि निद्रा–यांचा विशेष उदय होत नाही. संयोग झाल्यावर हर्ष, गर्व आणि धैर्य तथा वियोगात ग्लानी, व्याधी आणि मृती भाव प्रकाशित होतात. निर्वेद आदी अठरा भाव संयोग आणि वियोग दोन्ही दशांमध्ये दिसून येतात.

ब्रजनाथ–या प्रीतरसातील स्थायीभाव जाणू इच्छितो.

गोस्वामी–संभ्रम आणि प्रभुबुद्धीने चित्तामध्ये कंप आणि आदरासोबत जी प्रीती मिळून एकीभावास प्राप्त होते, तीच प्रीती या रसाचा स्थायीभाव आहे. शांतरसात रतिमात्रच स्थायीभाव आहे. या रसात रती ममतायुक्त भावाने प्रीती होऊन स्थायीभाव होतो. ही संभ्रम प्रीती उत्तरोत्तर वाढून प्रेम, स्नेह आणि रागावस्थेपर्यंत विस्तृत होत जाते. संभ्रम प्रीती शंका आणि भयरहित झाल्यावर प्रेमाचे रूप धारण करते. जेव्हा प्रेम गाढ रूपात चित्तद्रवतेस उपस्थित करते, तेव्हा ते स्नेह या नावाने परिचित होते. स्नेहामध्ये क्षणभराचा वियोगदेखील असहनीय असतो. जेव्हा स्नेहामध्ये दुःखदेखील सुखाप्रमाणे भासते, तेव्हा त्या स्नेहास राग म्हणतात. अशा दशेत कृष्णाच्या वियोगात प्राणांस त्यागण्याची इच्छा होते. अधिकृत आणि आश्रित दास प्रेमापर्यंत प्राप्ती करतात, पुढे सरकत नाहीत. पारिषदांमध्ये स्नेहापर्यंतची दशा

आढळते. परीक्षित, दारुक, उद्धव आणि व्रजाच्या अनुगत दासांमध्ये रागापर्यंत उदय होतो. राग उदित झाल्यावर सख्यभाव आंशिक रूपाने उदित होतो. पंडितजन या रसामध्ये कृष्णासोबत मिलनास योग आणि विच्छेदास अयोग म्हणतात. अयोग दोन प्रकारचा असतो–उत्कंठित आणि वियोग. योग तीन प्रकारचा असतो–सिद्धी, तुष्टी आणि स्थिती. उत्कंठित दशेमध्ये कृष्णास पाहू शकण्याचे नाम सिद्धी आहे, विच्छेदानंतर कृष्ण-मिलनास तुष्टी म्हणतात. कृष्णासोबत निवास करण्यास स्थिती म्हणतात.

ब्रजनाथ–संभ्रम प्रीती समजलो, आता गौरव प्रीतीची व्याख्या करा.

गोस्वामी–ज्यांचा लाल्य अभिमान असतो अर्थात कृष्ण माझे लालन-पालन करणारे आहेत–असा ज्यांना अभिमान असतो, त्यांची प्रीती गौरवमयी असते. तीच प्रीती विभाव आदींद्वारे पुष्ट झाल्यावर गौरव प्रीती होते. भगवान श्रीकृष्ण आणि त्यांचे लाल्य दासगण या रसाचे आलंबन आहेत. गौरव प्रीतीमध्ये महागुरू, महाकीर्ती, महाबुद्धी, महाबल, रक्षक आणि लालकाच्या रूपात श्रीकृष्ण विषयरूप आलंबन आहेत. लाल्यगण कनिष्ठत्व आणि पुत्रत्व अभिमानाच्या भेदाने दोन प्रकारचे असतात. सारण, गद आणि सुभद्र आदी कनिष्ठत्व अभिमान बाळगणारे आहेत. प्रद्युम्न, चारुदेष्ण आणि साम्ब आदी पुत्रत्व अभिमान बाळगणारे आहेत. श्रीकृष्णाचे वात्सल्य आणि ईषत् हास्य (स्मितहास्य) आदी या रसामध्ये उद्दीपन आहेत. लाल्यगणांचे खाली आसनावर बसणे, पूज्यजनांच्या मार्गावर चालणे, स्वेच्छाचाराचा परित्याग हे सर्व अनुभाव आहेत. संचारी आणि व्यभिचारी भावांस आधीप्रमाणेच जाणावे.

ब्रजनाथ–गौरव शब्दाचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–शरीराच्या संबंधाने कृष्ण माझे पिता आहेत, गुरू आहेत–अशा बुद्धीस गौरव म्हणतात. लालन-पालन करणाऱ्या कृष्णाप्रती तन्मयी प्रीतीस गौरवप्रीती म्हणतात. हाच या रसाचा स्थायीभाव आहे.

ब्रजनाथ–प्रभो! प्रीतिरस समजलो, आता प्रेय भक्तिरस किंवा सख्यरसाचे वर्णन करावे.

गोस्वामी–या रसामध्ये कृष्ण आणि कृष्णाचे वयस्क सखा हेच आलंबन आहेत. द्विभुज मुरलीधर व्रजेन्द्रनन्दन श्रीकृष्ण विषय-आलंबन आहेत आणि सखा आश्रय-आलंबन आहेत.

व्रजनाथ–कृष्णाच्या वयस्कांची (सखांची) लक्षणे आणि भेद जाणू इच्छितो.

गोस्वामी–वयस्कांचे रूप, गुण आणि वेष दासांप्रमाणे असतात, परंतु हे लोक दासांप्रमाणे संभ्रम भावयुक्त नसतात, यांच्यात विश्रम्भभाव असतो. हे पुर आणि व्रज संबधाच्या भेदाने दोन प्रकारचे असतात. अर्जुन, भीम, द्रौपदी, श्रीदाम विप्र–हे पुर-संबंधी सखा आहेत. यांत अर्जुन श्रेष्ठ आहे. व्रजवासी सखागण सर्वदा कृष्णासोबत राहू इच्छितात, त्यांना सदैव कृष्ण-दर्शनाची लालसा असते तथा कृष्णच त्यांचे जीवन वा प्राण आहेत. म्हणून हेच प्रधान सखा आहेत. व्रजचे सखा चार प्रकारचे असतात–(१) सुहृद, (२) सखा, (३) प्रियसखा आणि (४) प्रियनर्म सखा. सुहृद सखांमध्ये काही काही वात्सल्यभाव मिलित असतो. हे सखागण वयाने कृष्णापेक्षा थोडे मोठे असतात. हे लोक अस्त्र धारण करून दुष्टांपासून कृष्णाचे सर्वदा रक्षण करतात. सुभद्र, मण्डलीभद्र, भद्रवर्द्धन, गोभट, यक्ष, इन्द्रभट, भद्रांग, वीरभद्र, महागुण, विजय आणि बलभद्र–हे सुहृद् सखा आहेत. यांत मण्डलीभद्र आणि बलभद्र सर्वप्रधान आहेत. वयाने कृष्णापेक्षा लहान काही-काहीसे दास्यभावयुक्त सख्यरस बाळगणाऱ्या वयस्कांस सखा म्हणतात. विशाल, वृषभ, ओजस्वी, देवप्रस्थ, वरुथप, मरन्द, कुसुमापीड, मणिबद्ध, करन्धम–हे सखा आहेत, यांत देवप्रस्थ सर्वप्रधान आहेत. वयाने समान आणि केवळ सख्यभावयुक्त श्रीदाम, सुदाम, दाम, वसुदाम, किंकिनी, स्तोककृष्ण, अंशू, भद्रसेन, विलासी, पुण्डरीक, विटंक, कलबिंक आदी कृष्णाचे प्रिय सखा आहेत. सुहृद, सखा आणि प्रियसखा–या तिघांपेक्षा श्रेष्ठ अत्यंत रहस्यपूर्ण कार्यामध्ये निपुण सुबल, अर्जुन, गंधर्व, वसंत आणि उज्ज्वल आदी श्रीकृष्णाचे प्रियनर्म सखा आहेत. उज्ज्वल सर्वदा नर्मोक्ती (परिहासपूर्ण बोलणे) करतात. सखांमध्ये कुणीकुणी नित्यप्रिय आहेत, कुणी-कुणी देवता आणि कुणी-कुणी साधक असतात. हे लोक सख्य सेवेत नाना प्रकारच्या भावभंगिमा आदींद्वारे विचित्रता संपादित करून कृष्णास प्रसन्न करतात.

व्रजनाथ–या रसाची उद्दीपने काय आहेत?

गोस्वामी–कृष्णवयस, रूप, श्रृंग, वेणू, शंख, विनोद, परिहास, पराक्रम आणि लीलाकृती–ही सर्व सख्यरसाची उद्दीपने आहेत. गोष्ठात कुमार आणि गोकुळात कैशोर उद्दीपन आहेत.

ब्रजनाथ–साधारण सखांच्या अनुभावांस जाणू इच्छितो.

गोस्वामी–बाहु-युद्ध, चेंडू खेळणे, एकमेकांच्या खांद्यावर चढण्याचा खेळ, काठीने खेळणे, पर्यंक, आसन आणि झोपाळ्यावर एकत्र शयन, उपवेशन आणि परिहास, जल-विहार, माकडांसोबत खेळणे, कृष्णास प्रसन्न करण्याच्या कृती, नृत्य, गायन–हे सर्व साधारण सखांचे अनुभाव आहेत. सदुपदेश देणे आणि सर्व कार्यांमध्ये अग्रेसर होणे ही सुहृदांची कार्ये आहेत. तांबूल अर्पण, तिलक रचना तथा चन्दनलेपन आदी सखांचे विशेष कार्ये आहेत. युद्धात पराजय करणे, ओढणे-खेचणे, कृष्णाद्वारे अलंकृत होणे, प्रिय सखांची विशेष कार्ये आहेत. मधुरलीलेत सहाय्यता करणे प्रियनर्म सखांची विशेष-कार्ये आहेत. हे दासांप्रमाणे वनातील पुष्पांनी कृष्णास सजवितात. कृष्णास पंखा आदीद्वारा व्यजनकार्य करतात.

ब्रजनाथ–या रसात सात्त्विक आणि संचारी भावांचा विचार काय आहे?

गोस्वामी–दास्यरसाप्रमाणेच काही अधिक रूपात असतात.

ब्रजनाथ–या रसातील स्थायीभाव कसा असतो?

गोस्वामी–श्रीरूपगोस्वामींनी भक्तिरसामृतसिन्धू (३/३/१०५) मध्ये लिहिले आहे–

**विमुक्तसंभ्रमा या स्याद् विश्रम्भात्मा रतिर्द्वयोः।**
**प्रायः समानयोरत्र सा सख्यं स्थायिशब्दभाक्॥**

अर्थात साधारणतः दोन समान व्यक्तींमध्ये परस्पर जी संभ्रमरहित विश्रंभात्मक रती असते, तिला सख्य असे म्हणतात–हाच 'स्थायी' शब्द वाच्य आहे.

ब्रजनाथ–विश्रम्भ कशास म्हणतात?

गोस्वामी–“**विश्रम्भो गाढविश्वासविशेषो यन्त्रणोज्झितः।**” (भ. र. सि. ३/३/१०६) अर्थात सर्वप्रकारे परस्पर अभेद प्रतीतिरूप गाढ विश्वासाचे नाव विश्रम्भ आहे.

ब्रजनाथ–कृपया याच्या क्रम–विकासासंबंधी सांगा.

गोस्वामी–हा सख्यरस रती, प्रेम, स्नेह आणि रागास क्रोडीभूत करून प्रणयापर्यंत पोहोचतो.

ब्रजनाथ–प्रणयाचे लक्षण काय आहे?

गोस्वामी–संभ्रमाची योग्यता विद्यमान असल्यावरही संभ्रम गंधशून्य रतीसच ‘प्रणय’ म्हणतात. सख्य रस मोठाच अपूर्व असतो. प्रीती आणि वत्सल रसात कृष्ण आणि कृष्णभक्ताचे भाव दुसऱ्यांपेक्षा भिन्न-जातीय आहेत. सर्व रसांमध्ये प्रेमरस अर्थात सख्यरसच प्रिय आहे, कारण कृष्ण आणि कृष्णभक्तांचा समजातीय माधुर्यभाव या रसामध्ये लक्षित होतो.

**॥ एकोणतीसावा अध्याय समाप्त ॥**



# तिसावा अध्याय (रस-विचार)

विजय आणि ब्रजनाथाने एके दिवशी भगवत्-प्रसाद घेतल्यावर श्रीहरिदास ठाकुरांच्या समाधीचे दर्शन घेतले. त्यानंतर ते श्रीगोपीनाथ टोटामध्ये (बागेमध्ये) श्रीगोपीनाथांचे दर्शन घेऊन श्रीराधाकान्त मठात उपस्थित झाले आणि श्रीगुरुगोस्वामींच्या चरणी दंडवत प्रणाम करून बसले. श्रीध्यानचन्द्र गोस्वामींसोबत त्यांच्या नाना प्रकारच्या गप्पा होऊ लागल्या. त्याच दरम्यान श्रीगुरुगोस्वामी प्रसाद-सेवा करून आपल्या गादीवर येऊन विराजमान झाले. ब्रजनाथाने मोठ्या नम्रतेने वत्सल-भक्तिरसासंबंधी विचारले. श्रीगुरुगोस्वामी उत्तरादाखल सांगू लागले–वत्सल (वात्सल्य) रसात श्रीकृष्ण विषय-आलंबन आहेत आणि त्यांचे गुरुजन आश्रय-आलंबन आहेत. कृष्ण-सुन्दर श्यामांग, सर्वसुलक्षणांनी युक्त, मृदू, मधुरभाषी, सरल, लज्जावान, विनयी, गुरुजनांचा मान ठेवणारे आणि दाता आहेत. व्रजेश्वरी यशोदा, व्रजेश्वर नन्दमहाराज, रोहिणी, पूजनीया गोपी, देवकी, कुन्ती, वसुदेव, सान्दीपनी आदी गुरुजनांमध्ये नन्द आणि यशोदा सर्वप्रधान आहेत. या रसात कौमार आदी वयःकाल, रूप, वेष, शैशव, चापल्य, जल्पना, हास्य आणि लीला आदी उद्दीपने आहेत.

ब्रजनाथ–या रसाच्या अनुभावांविषयी सांगावे.

गोस्वामी–माथ्याचा वास घेणे, हातांनी अंगांचे मार्जन करणे, आशीर्वाद, आज्ञा देणे, लालनपालन करणे, हितोपदेश देणे–हे सर्व अनुभाव आहेत. चुंबन, आलिंगन, नाव घेऊन बोलावणे, उपयुक्त वेळी ओरडणे, धाक दाखविणे–या सर्व या रसाच्या साधारण गोष्टी आहेत.

ब्रजनाथ–या रसात कोणकोणते सात्त्विक विकार उत्पन्न होतात?

गोस्वामी–अश्रू, कंप, स्वेद, स्तंभ आदी आठ आणि स्तनांतून दुधाच्या धारा वाहणे, असे एकूण नऊ सात्त्विक विकार या रसात होतात.

ब्रजनाथ–व्यभिचारी भावांसही सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–वत्सलरसात आणि प्रीतिरसात सांगितले गेलेले समस्त

व्यभिचारीभाव तथा अपस्मार (मूर्च्छा) प्रकाशित करतात.

ब्रजनाथ–या रसात स्थायीभाव कसा असतो?

गोस्वामी–अनुकंपाकारीच्या अनुकंपेच्या पात्राप्रती जी संभ्रमशून्य रती असते, तीच यात स्थायीभाव आहे. यशोदा आदींची वात्सल्यरती स्वभावतः प्रौढा आहे. प्रेम, स्नेह आणि रागापर्यंत या रसाच्या स्थायीभावाची गती होते. बलदेवाचा भाव प्रीती आणि वात्सल्य मिश्रित आहे. युधिष्ठिराचा भाव वात्सल्य, प्रीती आणि सख्यतेचे संमिश्रण आहे. उग्रसेनाची प्रीती वात्सल्य आणि सख्यरस मिश्रित आहे. नकुल, सहदेव आणि नारद आदींचे भाव सख्य आणि दासरस मिश्रित आहेत. रुद्र, गरुड आणि उद्धव आदींचे भाव दास्य आणि सख्यरस मिश्रित आहेत.

ब्रजनाथ–प्रभो! वात्सल्यरस समजलो. आता कृपा करून चरम रस स्वरूप मधुर रसाची व्याख्या करावी, ज्यास ऐकून आम्ही धन्य होऊ.

गोस्वामी–मधुर भक्तिरसास मुख्य भक्तिरस म्हटलेले आहे. जडरसाश्रित जिवाची बुद्धी ईश्वरपरायण झाल्यावर निवृत्ती धर्मास प्राप्त होते. पुनः जोपर्यंत चित्-रसाचा अधिकारी होत नाही, तोपर्यंत त्याची प्रवृत्ती मधुररसामध्ये संभव नसते. अशा लोकांची या रसामध्ये उपयोगिता नसते. मधुररस स्वभावतःच दुरूह (समजायला कठीण) आहे; याचे अधिकारी अत्यंत दुर्लभ आहेत. म्हणूनच हा रस अत्यंत गोपनीय आहे. म्हणूनच मधुररस स्वभावतः विस्तृत झाल्यावरही येथे याचे संक्षिप्त स्वरूपातच वर्णन करीन.

ब्रजनाथ–प्रभो! मी सुबलचा अनुगत आहे. मला मधुररस श्रवणाचा किती अधिकार आहे–त्याचा विचार करून मला या विषयासंबंधी श्रवण करवावे.

गोस्वामी–प्रियनर्म सखांचा श्रृंगाररसात काही सीमेपर्यंत अधिकार आहे. येथे मी तुझ्या अधिकारास लक्षात ठेवून तुझ्या उपयोगीच गोष्टी सांगेन, तुझ्याकरिता अनुपयोगी गोष्टी सांगणार नाही.

ब्रजनाथ–या रसाचे आलंबन कोण-कोण आहेत?

गोस्वामी–श्रीकृष्ण या रसात विषय आलंबन आहेत, ते असमानोर्ध्द (ज्यांच्या समान अथवा ज्यांच्यापेक्षा श्रेष्ठ दुसरे कुणीही नाही) सुंदर नागरलीला

रसिकतेचे परमाश्रय आहेत. व्रजगोपिका या रसाच्या आश्रय आलंबन आहेत. समस्त प्रेयसींमध्ये श्रीमती राधाच श्रेष्ठ आहेत. मुरली-ध्वनी या रसाचे उद्दीपन आहे. नेत्रांच्या कटाक्षांनी पाहणे आणि हसणे हे या रसाचे अनुभाव आहेत. समस्त सात्त्विकभाव या रसात परिपूर्ण प्रकाशित होत असतात. आलस्य आणि उग्रतेस सोडून समस्त व्यभिचारी रससमूह या रसामध्ये लक्षित होतात.

ब्रजनाथ–या रसाचा स्थायीभाव कसा आहे?

गोस्वामी–मधुररती आत्मोचित विभाव आदीद्वारे पुष्ट होऊन मधुर भक्तिरस होतो. ही राधामाधवाची रती कुठल्याही प्रकारे स्वजातीय अथवा विजातीय भावांद्वारे विच्छेद दशेस प्राप्त होत नाही.

ब्रजनाथ–मधुररस किती प्रकारचे असतात?

गोस्वामी–विप्रलंभ आणि संभोग भेदाने मधुररस दोन प्रकारचे असतात.

ब्रजनाथ–विप्रलंभ कशास म्हणतात?

गोस्वामी–पूर्वराग, मान आणि प्रवास आदी भेदाने विप्रलंभ अनेक प्रकारचे असतात.

ब्रजनाथ–पूर्वराग कशास म्हणतात?

गोस्वामी–मिलनापूर्वी जो भाव असतो, त्यास पूर्वराग म्हणतात.

ब्रजनाथ–मान आणि प्रवास कसे असतात?

गोस्वामी–मान तर स्पष्ट आहे, प्रवासाचा अर्थ आहे ताटातूट अथवा विरह.

ब्रजनाथ–संभोग कशास म्हणतात?

गोस्वामी–दोघांचेही मिलन झाल्यावर जो भोग (आनंद) असतो, त्यास संभोग म्हणतात. मधुररसासंबंधी आणि जास्त सांगत नाही. मधुररसाचे अधिकारी साधक या विषयाचे रहस्य श्रीउज्ज्वलनीलमणी ग्रंथाचे अनुशीलन करून जाणून घेतील.

ब्रजनाथ–गौणभक्तिरसांच्या स्थितीसंबंधी काही सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–गौणरस सात आहेत–हास्य, अद्भुत, वीर, करुण, रौद्र, भयानक आणि वीभत्स. जेव्हा हे प्रबल होऊन मुख्य रसाचे स्थान स्वयं ग्रहण करतात, तेव्हा ते वेगवेगळ्या रसाच्या रूपात लक्षित होतात. जेव्हा हे स्वाधीन रसाच्या रूपात कार्य करतात, तेव्हा ते स्थायीभाव होऊन स्वतःकरिता उचित विभाव आदींद्वारे पुष्ट होऊन रस होतात. वास्तविक शांत, दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर–हे पाचही रस आहेत. हास्य आदी सात गौण रस साधारणतः व्यभिचारी भावांच्यात अंतर्भूत होतात.

ब्रजनाथ–मी अलंकार शास्त्रात रस-विचाराचे जे अध्ययन केले आहे, त्यामुळे हास्य आदीसंबंधी पूर्णपणे परिचित आहे. आता हे सांगावे की मुख्य रसांसोबत यांचा काय संबंध आहे?

गोस्वामी–आता मी शांत आदी रसांची परस्पर मित्रता आणि शत्रुतेसंबंधी सांगतो आहे. दास्य, वीभत्स, धर्मवीर आणि अद्भुत रस–हे शांतरसाचे मित्र आहेत. पुनः अद्भुत रस–दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर रसांचे मित्र आहेत. शांतरसाचे शत्रू आहेत–मधुर, युद्धवीर, रौद्र आणि भयानक रससमूह. वीभत्स, शांत, धर्मवीर आणि दानवीर रस–हे दास्यरसाचे मित्र आहेत. त्याचे शत्रू आहेत–मधुर, युद्धवीर आणि रौद्ररस. सख्याचे मित्र मधुर, हास्य आणि युद्धवीर आहेत तथा शत्रू आहेत–वात्सल्य, वीभत्स, रौद्र आणि भयानक रस. हास्य, करुण आणि भयानक हे वात्सल्याचे मित्र आहेत तथा मधुर, युद्धवीर,दास्य आणि रौद्र रस याचे शत्रू आहेत. हास्य आणि सख्यरस–मधुररसाचे मित्र आहेत, वात्सल्य, वीभत्स, शांत, रौद्र आणि भयानक त्याचे शत्रू आहेत. वीभत्स, मधुर आणि वात्सल्य रस–हे हास्यरसाचे मित्र आहेत. करुण आणि भयानक त्याचे शत्रू आहेत. वीर, शांत, दास्य, सख्य, वात्सल्य आणि मधुर–हे अद्भुताचे मित्र आहेत तथा हास्य, सख्य, दास्य, रौद्र आणि वीभत्स शत्रू आहेत. वीररसाचे मित्र अद्भुतरस आहेत तथा शत्रू आहेत–भयानकरस. कुणाकुणाच्या मते शांतही वीर रसाचा शत्रू आहे. रौद्र आणि वात्सल्य–हे करुणरसाचे मित्र आहेत तथा वीररस, हास्यरस, संभोग नामक श्रृंगाररस आणि अद्भुतरस हे करुणरसाचे शत्रू आहेत. करुणरस आणि वीररस–हे रौद्ररसाचे मित्र आहेत, तथा हास्य, श्रृंगार आणि भयानक रस त्याचे शत्रू आहेत. वीभत्स आणि

करुण रस–हे भयानकरसाचे मित्र आहेत आणि वीर, श्रृंगार, हास्य आणि रौद्र रस–हे भयानकाचे शत्रू आहेत. शांतरस, हास्यरस आणि दास्यरस–हे वीभत्साचे मित्र आहेत तथा श्रृंगार आणि सख्य रस त्याचे शत्रू आहेत. आणि बाकी सर्व परस्पर तटस्थ आहेत.

ब्रजनाथ–परस्पर मिलनाचे फळ वर्णन करावे.

गोस्वामी–मित्र रसांच्या एकत्रीकरणामुळे रसास्वादन आणखीनच वाढते. अंग आणि अंगीच्या रूपात रसांचे मिळणे चांगले असते. मुख्य असो अथवा गौण असो, मित्र रसाचे अंगी रसाचा मित्र बनणे उचित आहे.

ब्रजनाथ–अंग आणि अंगीचा भेद सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–मुख्य अथवा गौण कुठलाही रस असो किंवा नसो, जेव्हा तो रसांस दाबून स्वयं प्रधान रूपात प्रकाशित होतो, तेव्हा तो अंगी असतो. आणि जो रस अंगी रसाची पुष्टी करतो, तो अंगाच्या रूपात संचारीभावाचे स्थान ग्रहण करतो, विष्णुधर्मोत्तरात म्हटले गेले आहे–

**रसानां समवेतानां यस्य रूपं भवेद्बहु।**
**स मन्तव्यो रसः स्थायी शेषाः संचारिणो मताः॥**

अर्थात रसांच्या एकत्रित येण्याने ज्यांच्यात ज्या रसाचे स्वरूप अधिक असते–त्या रसास ‘स्थायी’ रस आणि दुसऱ्या–दुसऱ्या रसांस संचारीभाव समजायला हवे.

ब्रजनाथ–गौणरस कशा प्रकारे अंगी होऊ शकतो?

गोस्वामी–श्रीरूप गोस्वामींनी म्हटले आहे–

**प्रौद्यन्विभावनोत्कर्षात्पुष्टिं मुख्येन लम्भितः।**
**कुञ्चता निजनाथेन गौणोऽप्यङ्गित्वमश्नुते॥**
**मुख्यस्त्वङ्गत्वमासाद्य पुष्णन्निन्द्रमुपेन्द्रवत्।**
**गौणमेवाङ्गिनं कृत्वा निगूढनिजवैभवः॥**
**अनादिवासनोद्भासवासिते भक्तचेतसि।**

**भात्येव न तु लीनः स्यादेष संचारिगौणवत्॥**
**अङ्गी मुख्यः स्वमत्राङ्गैर्भावैस्तैरभिवर्द्धयन्।**

**सजातीयैर्विजातीयैः स्वतन्त्रः सन् विराजते॥**
**यस्य मुख्यस्य यो भक्तो भवेन्नित्यनिजाश्रयः।**
**अङ्गी स एव तत्र स्यान्मुख्योऽप्यन्योऽङ्गतां व्रजेत्॥**

(भ. र. सि. ४/८/४६-५०)

अर्थात, कधी-कधी गौणरससुद्धा संकोचभाव (गौणभाव) प्राप्त करीत आपले प्रभु मुख्यरसाद्वारे पुष्ट होऊन आणि विभावाच्या अधिकतेने उदित होऊन अंगत्वास प्राप्त होतो. त्यावेळी मुख्यरस अंगत्वास प्राप्त होऊन आपल्या वैभवास लपवून अंगीभाव प्राप्त गौणरसास पुष्ट करतो, ठीक त्याचप्रकारे ज्याप्रकारे उपेन्द्र अर्थात भगवान वामनदेव देवराज इन्द्राचे पोषण करतात. भक्ताच्या अनादी अप्राकृत सेवा वासनेच्या पवित्रगंधयुक्त चित्त-भूमीवर हा मुख्यरस गौण संचारीभावांप्रमाणे लीन होत नाही अर्थात ज्या प्रकारे गौणरस व्यभिचारिता प्राप्त मुख्यरसात लीन होऊन जातात, त्याचप्रकारे मुख्यरस लीन होत नाही, परंतु प्रकाशित राहतो. मुख्य अंगीरस अंगस्वरूप स्वजातीय भावसमूहांद्वारे स्वतःस पुष्ट करून स्वतन्त्र रूपात प्रकाशित होतात. जे ज्या मुख्य रसाचे रसिक असतात, ते आपल्या त्याच रसाचेच नित्य आश्रित असतात. तोच रस त्यांच्या संबंधात अंगीरसाच्या रूपात प्रकाशमान राहतो. दुसरे रससमूह मुख्य असूनही पूर्व कथित अंगीरसाची अंगता प्राप्त करतात अर्थात अंगाच्या रूपात कार्य करतात.

आणखीही पाहा, जर अंगरस अंगीरसासोबत मिळून रसास्वादनास अधिक वाढवितो, तेव्हा तो अंगरस मानला जाईल, अन्यथा त्याचे मिलन व्यर्थच आहे.

ब्रजनाथ–रसासोबत शत्रू रस मिळाल्याने काय होते?

गोस्वामी–ज्याप्रकारे एखाद्या अत्यंत गोड रसात अम्ल (आंबट), लवण (खारट) किंवा कटू आदींच्या मिलनाने विरसता उत्पन्न होते, त्याच प्रकारे एका रसात शत्रुरस मिळविण्याने विरसता उत्पन्न होते. अशा रस-विरोधास रसाभास दोष म्हणता येईल.

ब्रजनाथ–श्रीरूप गोस्वामींनी भक्तिरसामृतसिन्धूमध्ये म्हटले आहे-

**द्वयोरेकतरस्येह बाध्यत्वेनोपवर्णने।**
**स्मर्यमाणतयाप्युक्तौ साम्येन वचनेऽपि च॥**

**रसान्तरेण व्यवधौ तटस्थेन प्रियेण वा।**
**विषयाश्रयभेदे च गौणेन द्विषता सह।**
**इत्यादिषु न वैरस्यं वैरिणो जनयेद्युतिः॥**[१]

(भ. र. सि. ४/८/६३-६४)

आणखीही पाहा, युधिष्ठिर आदींमध्ये दास्य आणि वात्सल्य पृथक पृथक समयी प्रकाशित होतात. परस्पर शत्रू रस एकाच वेळेस एकत्रच उदित होत नाही. परंतु अधिरूढ महाभावात विरुद्ध भावसमूह जर एकाच समयी एकत्रितपणे उदित होतात तर तेथे ते विरुद्ध नसतात. श्रीरूप गोस्वामी म्हणतात–

**क्वाप्यचिन्त्यमहाशक्तौ महापुरुषशेखरे।**
**रसावलिसमावेशः स्वादायैवोपजायते॥**

(भ. र. सि. ४/८/८३)

अर्थात काही काही ठिकाणी अचिंत्य महाशक्तीने युक्त महापुरुष शिरोमणींमध्ये एकाच वेळी अनेक विरुद्ध रसांचा जो समावेश होत असतो, तो आस्वादनाच्या चमत्कारितेकरिताच होतो.

ब्रजनाथ–मी विद्वान रसिक वैष्णवांकडून ऐकले आहे की श्रीमन् महाप्रभू रसाभासास मोठ्या वाईट दृष्टीने पाहत असत, इतकेच काय तर ज्या गीतांमध्ये, कीर्तनांमध्ये आणि पदांमध्ये रसाभास होतो, त्यांना कदापि ऐकतही नसत. आज मी रसाभास दोषास यथायोग्य समजलो. आता कृपा करून आपण हे सांगावे की रसाभास किती प्रकारचे असतात?

---

(१) दोन विरोधी रसांच्या मध्ये एका विरोधी रसाच्या बाध्यतेने वर्णन केल्याने अर्थात युक्तिसंगत वाक्यांद्वारे एकाचा उत्कर्ष वर्णित केल्याने दुसऱ्याचे निकृष्टत्व निरूपित झाल्यावर, स्मरण विषयक वर्णन केल्यावर, समानतेने प्रतिपादन केल्यावर, तटस्थ वा प्रिय रसाद्वारे व्यवधान झाल्यावर, विरोधी गौणरसासोबत विषय किंवा आश्रयाचा भेद केल्यावर–इत्यादी स्थळांमध्ये दोन विरोधी रसांचा संयोग विरसता उत्पन्न करीत नाही.

गोस्वामी–रस अंगहीन झाल्यावर त्यास रसाभास म्हणतात. उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ भेदाने रसाभासास उपरस, अनुरस आणि अपरस म्हणता येऊ शकते.

ब्रजनाथ–उपरस कशास म्हणतात?

गोस्वामी–विरूपतेस प्राप्त स्थायी, विभाव आणि अनुभावादींनी युक्त बारा शांत आदी रसच उपरस होऊ शकतात. स्थायीवैरूप्य, विभाववैरूप्य, अनुभाववैरूप्य उपरसाचे हेतू आहेत.

ब्रजनाथ–अनुरस कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्णसंबंधवर्जित हास्य आदी रससमूह अनुरस म्हणविले जातात. तटस्थ व्यक्तींमध्ये जे वीर आदी रस उदित होतात, तेदेखील अनुरस आहेत.

ब्रजनाथ–ज्यात कृष्णसंबंध नाही, ते रसच नाहीत, त्यांना तर जड रसच म्हणता येईल, मग अनुरसाचे असे लक्षण का सांगितले गेले आहे?

गोस्वामी–साक्षात रूपाने कृष्ण संबंधरहित रसच अनुरस आहेत. जसे–कक्खटी (श्रीमती राधेची पाळलेल्या माकडी) चा नाच पाहून गोपिकांचे हसणे, भाण्डीरवनात एका वृक्षाच्या फांदीवर बसलेल्या शुकपक्षांचे परस्पर वेदान्तावर विचारविमर्श करणे आणि ते पाहून देवर्षी नारदांच्या हृदयात अद्भुतरस उदित होणे. येथे कृष्णाचा, उक्त हसणे किंवा नारदाच्या हृदयात उदित रसांसोबत कुठलाही सरळ अथवा साक्षात संबंध नाही, काही प्रकारे दूरचा कृष्णसंबंध पाहिला जातो. म्हणूनच येथे दोन्ही स्थळे अनुरसाची आहेत.

ब्रजनाथ–अपरस कशास म्हणतात?

गोस्वामी–जेव्हा कृष्ण हास्यादी रसांचे विषय आणि त्यांचे विरोधी त्या रसाचे आश्रय होतात, तेव्हा ते हास्य आदी अपरस म्हटले जातात. कृष्णास पळताना पाहून जरासन्धाचे वारंवार हसणे–हा अपरस आहे. श्रीरूप गोस्वामींनी भक्तिरसामृतसिन्धूमध्ये लिहिले आहे–

**भावाः सर्वे तदाभासा रसाभासाश्च केचन।**
**अमी प्रोक्ता रसाभिज्ञैः सर्वेऽपि रसनाद्रसाः॥**

अर्थात भावांस कुणी-कुणी तदाभास आणि कुणी-कुणी रसाभास म्हणतात, परंतु रसभिज्ञ पंडित अप्राकृत आनंदप्रद भावांसच रस म्हणतात.

रसतत्त्वाचे असे सुंदर, सरस आणि मर्मस्पर्शी विवेचन श्रवण करून विजयकुमार आणि ब्रजनाथांचे डोळे ओलावले. ते रडतरडत गद्‌गद् वचनांनी श्रीगुरुगोस्वामींच्या चरणकमळी पडून म्हणाले–

**अज्ञानतिमिरान्धस्य ज्ञानाञ्जन शलाकया।**
**चक्षुरुन्मीलितं येन तस्मै श्रीगुरवे नमः॥**

ज्यांनी दिव्यज्ञान रूप अंजन-शलाकेद्वारे (१) स्वरूपाची अज्ञानता, (२) जडशरीरात आत्म-बुद्धी, (३) जडविषयांत ममत्वाची बुद्धी अर्थात भोक्ताभिमान, (४) भेद् अथवा द्वितीयाभिनिवेश अर्थात कृष्णाव्यतिरिक्त दुसऱ्या वस्तूंमध्ये आसक्ती, (५) भय आणि विरूप ग्रहण–या पाच प्रकारचे अज्ञान आणि त्यातून उत्पन्न धर्म, अर्थ, काम आणि मोक्षाच्या कामनारूप अज्ञानांधकार राशीस दूर करून दिव्य हरिसेवोन्मुख नेत्र उघडले आहेत, त्या श्रीगुरुदेवांस नमस्कार आहे.

श्रीगुरुगोस्वामींनी मोठ्या प्रेमाने दोघांना उठवून आलिंगन केले आणि आशीर्वाद दिला–तुमच्या हृदयात रसतत्त्वाचे स्फुरण होवो.

विजय आणि ब्रजनाथ प्रतिदिनी श्रीध्यानचन्द्र गोस्वामींबरोबर परमार्थाची चर्चा करीत आणि श्रीगुरुगोस्वामींचे चरणामृत आणि अधरामृत (प्रसाद) ग्रहण करीत असत. ते कधी भजनकुटीत, कधी श्रीहरिदासांच्या समाधीवर, कधी श्रीगोपीनाथांच्या मंदिरात आणि कधी सिद्धबकुळी अनेक शुद्ध वैष्णवांची भजनमुद्रा पाहून आपापल्या भजनात अनुकूल भावांमध्ये मग्न होऊन जात. 'स्तवावली' आणि 'स्तवमाला' ग्रंथामध्ये लिहिल्या गेलेल्या श्रीमन् महाप्रभूंच्या भावावेशाच्या स्थानांचे दर्शन करीत असत. ज्या स्थानांमध्ये शुद्धवैष्णव कीर्तन करीत तेथे नामकीर्तनात सम्मिलित होत. अशा प्रकारे दोघांच्या भजनात क्रमशः उन्नती होऊ लागली. विजयकुमारने मनोमन विचार केला की श्रीगुरुगोस्वामींनी आपल्याला संक्षेपातच मधुररसाची शिकवण दिली आहे. ब्रजनाथ सख्यरसातच निमग्न राहिले आहेत. मी वेळेनुसार एकट्यानेच येऊन श्रीगुरुगोस्वामींजवळ मधुररसाचे सांगोपांग विवेचन श्रवण करीन.–असा विचार करून त्यांनी श्रीध्यानचन्द्र गोस्वामींच्या कृपेने

'श्रीउज्ज्वलनीलमणी' ग्रंथाचा संग्रह केला आणि ते त्याचे अध्ययन करू लागले. मध्येच काही संदेह उपस्थित होताच श्रीगुरुगोस्वामींना विचारून संदेह दूर करवून घेत असत.

एकदा विजय आणि ब्रजनाथ फिरता-फिरता समुद्र-तीरी उपस्थित झाले. संध्याकाळची वेळ होती. ते लोक एका जागी तीरावर बसून समुद्राच्या लाटांकडे पाहू लागले. लाटांचा कधीही अंत होत नाही, त्या निरंतर येतच राहतात. ते पाहून त्यांच्या मनात भाव उत्पन्न झाला की हे जीवनदेखील लाटांनी परिपूर्ण आहे. कधी काय होईल सांगता येत नाही. म्हणूनच आपल्याला रागमार्गाची भजन-पद्धती शीघ्रच शिकून घ्यायला हवी. ब्रजनाथ म्हणाले–श्रीध्यानचन्द्र गोस्वामी यांनी जी पद्धती लिहिली आहे, ती मी पाहिली आहे. मला तर असे वाटते की गुरूपदेश मिळाल्याने त्यायोगे सुंदर फळ प्राप्त करता येऊ शकते. मी त्या पद्धतीस लिहून घेईन. असा विचार करून त्यांनी श्रीध्यानचन्द्र गोस्वामींकडे उक्त पद्धतीचा ग्रंथ उतरवून घेण्याकरिता मागितला, परंतु श्रीध्यानचन्द्रांनी श्रीगुरुगोस्वामींच्या आज्ञेशिवाय तो देणे अस्वीकार केले.

श्रीध्यानचन्द्र गोस्वामींचे बोलणे ऐकून ते दोघेही श्रीगुरुगोस्वामींकडे पोहोचले आणि उक्त भजन-पद्धती देवविण्याची प्रार्थना केली. श्रीगुरुगोस्वामींनी अनुमती दिली. विजय आणि ब्रजनाथाने पद्धती-ग्रंथास प्राप्त करून वेगवेगळ्या रूपात लिहून घेतले आणि निश्चय केला की फुरसतीच्या वेळी श्रीगुरुगोस्वामींच्या जवळ या पद्धतीस यथायोग्य समजून घेणे आवश्यक आहे.

श्रीध्यानचन्द्र गोस्वामी समस्त शास्त्रांचे पारदर्शी पंडित होते. विशेषतः हरिभजन-तंत्रात त्यांच्यासमान कुणीही पारदर्शी पंडित नव्हते. श्रीगोपालगुरूंच्या शिष्यांत ते सर्वप्रधान होते. विजय आणि ब्रजनाथास भजनासंबंधी योग्य अधिकारी जाणून त्यांनी त्या दोघांना यथायोग्य शिकवण दिली. विजय आणि ब्रजनाथ अधूनमधून श्रीगुरुगोस्वामींच्या चरणी उपस्थित होऊन भजनासंबंधी समस्त प्रकारच्या शंका दूर करून घेत. हळू-हळू ते श्रीमन् महाप्रभूंचे दैनंदिन चरित्र आणि श्रीकृष्णाच्या दैनंदिन लीलांचा संबंध समजून घेऊन अष्टकालीन भजनात प्रवृत्त झाले.

**॥ तिसावा अध्याय समाप्त ॥**

# एकतीसावा अध्याय (मधुररस–विचार)

शरदकाळची मोठी सुंदर वेळ आहे. रात्रीचे दहा वाजले आहेत. शीतल आणि स्निग्ध ज्योत्स्नेची साडी नेसून पृथ्वीचे रूप अधिकच आकर्षक होत आहे. विजयकुमार 'उज्ज्वलनीलमणी' वाचत आहेत आणि अधूनमधून गंभीर चिंतन करीत आहेत. त्याचवेळी सहसा त्यांची दृष्टी शुभ्र-ज्योत्स्नेवर पडली. त्यांचे हृदय एका अवर्णनीय आनंदाने भरून गेले. त्यांनी विचार केला की–मोठी सुंदर वेळ आहे, याचवेळी जाऊन सुन्दराचलाचे दर्शन का न करावे? असे म्हणतात की श्रीचैतन्य महाप्रभू जेव्हा जेव्हा सुन्दराचलाचे दर्शन करीत, तेव्हा तेव्हा त्यांना व्रजधामाची स्फूर्ती होत असे. असा विचार करून ते एकटेच सुन्दराचलाकडे चालू लागले. विजयकुमार शुद्ध मधुररसाने भजन करण्याची शिकवण घेत होते. त्यांना कृष्णाच्या व्रजलीलांशिवाय दुसरे काहीही आवडत नाही. त्यातही व्रजलीलांतर्गत गोपींसोबत श्रीकृष्णांच्या लीलांच्या चिंतनातच ते सर्वदा मग्न राहतात. ते बलगण्डीस पार करून श्रद्धाबलीकडे जाऊ लागले. दोन्हीकडच्या उपवनांना पाहून त्यांना वृन्दावनाची स्फूर्ती होऊ लागली. ते प्रेमविभोर होऊन म्हणू लागले–अहा! माझे किती सौभाग्य आहे. मी ब्रह्मा आदी देवतांकरिता देखील परम दुर्लभ व्रजभूमीचे दर्शन करीत आहे. किती सुंदर आहेत–हे कुंजसमूह. हे पहा कुंजवन! अरे! हे काय पाहतो आहे! मालती लतेपासून निर्मित या माधवी मंडपामध्ये आमचे प्राणेश्वर श्रीकृष्ण गोपींसोबत बसून परिहास करीत आहेत! भय आणि संभ्रम सोडून विजयकुमार व्याकूळ होऊन त्वरेने त्या दिशेने धावू लागले. त्यांना आपल्या तनमनाचीसुद्धा शुद्ध राहिली नाही. थोडे दूर जाऊन ते मूर्च्छित होऊन पडले. मंद-मंद समीर त्यांची सेवा करू लागला. थोड्या वेळानंतर त्यांना शुद्ध आली आणि ते इकडे-तिकडे चहूकडे पाहू लागले. परंतु आता ते पूर्व दृश्य दिसत नव्हते. काही वेळानंतर ते घरी परतले आणि कोणाशीही काहीही न बोलता गुपचूप बिछान्यावर पडून राहिले.

व्रजलीलेची स्फूर्ती झाल्याने विजय मोठे प्रसन्न झाले. त्यांनी मनोमन विचार केला की आज रात्री मी ज्या रहस्यास पाहिले आहे, त्यास उद्या श्रीगुरुदेवांच्या चरणी निवेदन करीन. परंतु काही वेळानंतरच ही गोष्ट त्यांना आठवली की सौभाग्याने अप्राकृत लीलेचे रहस्य दिसल्यावर त्यास दुसऱ्यांना सांगू नये. अशा प्रकारे विचार

करता करता त्यांना झोप आली.

दुसऱ्या दिवशी प्रसाद घेऊन काशीमिश्रांच्या घरी पोहोचले आणि श्रीगुरुदेवांस साष्टांग प्रणाम करून त्यांच्याजवळ बसले. श्रीगुरुदेवांनी त्यांना स्नेहपूर्वक आलिंगन करून कुशलक्षेम विचारले. विजयकुमार श्रीगुरुदेवांचे दर्शन करून मोठे प्रसन्न झाले आणि काहीसे स्थिर झाल्यावर म्हणाले–प्रभो! आपल्या असीम अनुकंपेने माझे मनुष्यजीवन सार्थक झाले. यावेळी मी श्रीउज्ज्वलरसासंबंधी काही निगूढ तत्त्वांस जाणू इच्छितो. उज्ज्वलनीलणीचा पाठ करीत आहे. पाठ करताकरता अशा काही जागा सापडल्या आहेत ज्यांचे तात्पर्य समजू शकलो नाही. जर आज्ञा असेल तर जिज्ञासा करीन.

गोस्वामी–विजय! तू माझा प्रिय शिष्य आहेस. तू जी काही जिज्ञासा करू इच्छितोस, मोठ्या आनंदाने कर. जेवढे होऊ शकेल, उत्तर देण्याचा प्रयत्न करीन.

विजयकुमार म्हणाले–प्रभो! मुख्यरसांत मधुररसास अतिशय रहस्योत्पादक रस म्हटले गेले आहे. आणि तसे असूही का नये? जेव्हा शांत, दास्य, सख्य आणि वात्सल्य या चारही रसांचे गुण मधुररसात नित्य विद्यमान आहेत आणि या रसांमध्ये जो काही चमत्कारितेचा अभाव आहे, तो देखील मधुररसात सुंदर रूपाने पूर्णपणे प्रतिष्ठित आहे, तेव्हा मधुररसच सर्वश्रेष्ठ आहे, यात थोडादेखील संदेह नाही. निवृत्तिपथावलंबी व्यक्तींचे हृदय शुष्क (नीरस) असते, तेव्हा त्यांच्याकरिता मधुररस नितांत अनुपयोगी असतो. दुसरीकडे मधुररस जडधर्मापेक्षा सर्वथा विलक्षण असल्याने जड प्रवृत्तीच्या व्यक्तींकरिता दुरापास्तदेखील असतो. व्रजचा मधुररस जेव्हा जडीय श्रृंगाररसापेक्षा सर्वथा विलक्षण आहे, तेव्हा तर तो सहजच साध्य नसतो. अशा प्रकारे हा अप्राकृत मधुररस सांसारिक स्त्री-पुरुषगत अत्यंत नीच जडरसाप्रमाणेच का दिसून येतो?

गोस्वामी–विजय! तू हे यथायोग्य जाणतोस की जड जगाच्या सर्व विचित्रता चित्तत्त्वाच्या विचित्रतेचेच प्रतिफलन आहे. जडजगतसुद्धा चित्-जगाचे प्रतिफलन (सावली) आहे. त्यात एक गूढ रहस्य आहे की प्रतिफलित प्रतीती स्वभावतः विपरीत धर्मयुक्त असते. आदर्शा (काये) मध्ये जी वस्तू सर्वोत्तम असते, प्रतिफलनात तीच वस्तू सर्वाधम असते. आदर्शामध्ये जी निम्नस्थ दिसते, तीच प्रतिफलनात उच्चस्थ दिसून येते. दर्पणात कायेचे जे प्रतिफलन होते, त्याचे अंग-प्रत्यंग विपरीत रूपात

दिसून येतात. त्याचप्रकारे परम वस्तू आपल्या अचिंत्यशक्तीच्या प्रभावाने त्याच शक्तीच्या छायेमध्ये प्रतिफलित होऊन जडीय सत्तेत विपरीत रूपात विस्तृत झाली आहे. म्हणूनच परम वस्तूचे धर्मसमूह जडीय सत्तेमध्ये विपरीत रूपात दिसून येतात. परम वस्तुगत रससुद्धा अशा प्रकारे या जडजगात जडीय हेय (हीन) रसाच्या रूपात प्रतिफलित झाला आहे. जडीय रस-चिन्मय रसाचे विपरीत प्रतिफलन आहे. परम वस्तूमध्ये जे अपूर्व अद्भुत विचित्रगत सुख आहे, तोच परम वस्तूतील रस आहे. तोच रस जडामध्ये प्रतिफलित झाल्यावर जडबद्धजिवाच्या चिंतनाद्वारे एक औपाधिक तत्त्व कल्पित होते. अशा दशेत तो निवृत्त निर्विशेष धर्मालाच परमवस्तू मानतो आणि निर्विशेष तत्त्वात विचित्रतेचा निषेध असल्याकारणाने समस्त प्रकारच्या विचित्रतांनाच जडधर्म असल्याची कल्पना करतो. अशाप्रकारे तो निरुपाधिक सत्ता आणि सत्ताधर्मास जाणू शकत नाही. जे लोक युक्तीचा आधार घेतात, त्यांची अशीच गती होते.

वास्तविक परमवस्तू रसरूप तत्त्व आहे, म्हणून त्यात अद्भुत विचित्रता आहेत. जड रसातही त्या विचित्रता प्रतिफलित राहिल्याने जड रसाच्या विचित्रतेचे अवलंबन केल्याने अतींद्रिय रसाचा अनुभव (अनुमान) होतो. चिद्वस्तूमध्ये जी रस-विचित्रता आहे ती अशाप्रकारे आहे. चित्-जगात शांत धर्मगत शांतरस सर्वात नीच स्थित आहे. त्यावर दास्य, दास्याच्यावर सख्यरस, सख्याच्यावर वात्सल्यरस आणि सर्वांत वर मधुररस विराजमान होत असतो. जडजगात मधुररस विपर्यस्त होऊन सर्वात नीच अवस्थित होतो. त्यावर वात्सल्य, वात्सल्यावर सख्य आणि सर्वांत वर शांतरस अवस्थित आहे. जे लोक जडधर्माच्या स्वभावाचे अवलंबन करून रसतत्त्वाचा विचार करतात–ते तसाच सिद्धांत करून मधुर रसास हीन (घृणायोग्य) समजतात. मधुररसाची स्थिती आणि क्रिया जेव्हा जडजगात प्रतिफलित होते, तेव्हा ती प्रतिफलित स्थिती आणि क्रिया अतिशय तुच्छ आणि लज्जास्पद असते. चित्-जगात त्या सर्वथा शुद्ध, निर्मळ आणि अद्भुत रूपात माधुर्यपूर्ण असतात. चित्-जगात कृष्ण आणि त्यांच्या नाना प्रकारच्या शक्तींचे पुरुष-प्रकृती रूपात जे मिलन होते, ते अत्यंत पवित्र आणि तत्त्वमूलक असते. जडजगात जो जडप्रत्ययित व्यवहार आहे अर्थात स्त्री-पुरुषाचा जो जडीय व्यवहार आहे तोच लज्जास्पद आहे. चित्-जगात कृष्णच एकमात्र पुरुष आहेत आणि चित्-तत्त्वसमूह या रसात प्रकृती आहेत, म्हणूनच कुठलाही धर्म-विरोध नाही. जडजगात एखादा जीव भोक्ता बनतो, एखादा

जीव भोग्य तथा एकमेकांस भोगण्याची इच्छा करतो, हाच व्यापार मूळ तत्त्वाच्या विरोधी असल्याने घृणा आणि लज्जेचा विषय होतो आहे. तत्त्वतः एक जीव दुसऱ्या जिवाचा भोक्ता नाही. सर्व जीव भोग्य आहेत आणि श्रीकृष्णच एकमात्र भोक्ता आहेत. अशा स्थितीत जिवाचे भोक्ता बनणे नित्यधर्माच्या विरुद्ध व्यापार आहे आणि ही वास्तविक मोठीच लज्जेची आणि घृणेची बाब आहे, यात जरादेखील संशय नाही. पाहा, आदर्श प्रतिफलनाच्या विचाराने जडीय स्त्री-पुरुषाचा व्यवहार तथा निर्मळ कृष्णलीला–दोहोंतही सौसादृश्य अवश्यंभावी आहे, तथापि एक अत्यंत तुच्छ आणि दुसरा नितांत उपादेय आहे.

विजय–प्रभो! या अपूर्व विचारास ऐकून अत्यंत कृतार्थ झालो. माझा संशय दूर झाला. आता या सिद्धांताने माझा स्वतःसिद्ध विश्वास दृढ झाला. मी चित्-जगतातील मधुररसाची स्थिती समजलो. अहा! 'मधुररस' हा शब्द जसा मधुर आहे, त्याचा अप्राकृत भावही तसाच परमानंदजनक आहे. असा मधुर रस असतानाही लोक शांतरसात सुख प्राप्त करतात, त्यांच्यासमान अभागी आणि कोण असेल? मी निगूढ मधुररसासंबंधी विस्तृत विचारांचे श्रवण करू इच्छितो.

गोस्वामी–बाबा! ऐका! कृष्णच मधुररसाचे विषय आहेत आणि त्यांच्या वल्लभागण (गोपी) या रसाच्या आश्रय आहेत. हे दोघेही मिळून या रसाचे आलंबन आहेत.

विजय–मधुररसाचे विषय–कृष्णाचे रूप काय आहे?

गोस्वामी–अहा! मोठाच मधुर प्रश्न आहे. नवजलधर वर्ण, सुरम्य, मधुर, सर्वलक्षणांनी युक्त, बलवान, नवयौवनयुक्त, सुवक्ता, प्रियभाषी, बुद्धिमान, प्रतिभावान, धीर, विदग्ध, चतुर, सुखी, कृतज्ञ, दक्षिण, प्रेमवश्य, गंभीर, श्रेष्ठ, कीर्तिमान, रमणीजनमनोहारी, नित्यनवीन, अतुल्यकेली, सौंदर्यशाली, प्रियतम, वंशी वाजविणारे–या गुणांनी युक्त पुरुषच कृष्ण आहेत. त्यांच्या चरणयुगुलांचे सौंदर्य निखिल कंदर्पाच्या गर्वासही चूर्ण-विचूर्ण करते. त्यांची कटाक्षपूर्ण चितवन (नजर) सर्वांच्या चित्तास विमोहित करते. ते लीलेचे निधिस्वरूप आहेत.

विजय–अप्राकृत रूप आणि गुणसंपन्न श्रीकृष्णच अप्राकृत परम विचित्र मधुररसाचे एकमात्र नायक आहेत–याचा मी संपूर्णपणे अनुभव केलेला आहे. आधी

भिन्न-भिन्न शास्त्रांचे अध्ययन करून युक्ती आणि तर्काच्या आधारे कृष्णरूपाची भावना करूनही त्यात माझा सुदृढ विश्वास नव्हता. परंतु आपल्या कृपेने माझ्या हृदयात जेव्हापासून रुचिमूला भक्ती उत्पन्न झाली आहे, तेव्हापासून मी आपल्या भक्तीद्वारे पवित्र झालेल्या हृदयात दिवसरात्र निरंतर कृष्ण स्फूर्तीचा अनुभव करीत आहे. मी सोडून देऊनही कृष्ण माझ्या हृदयास सोडत नाहीत. अहो! त्यांची किती कृपा आहे! आता मी यथायोग्य समजलो आहे–

**सर्वथैव दुरूहोऽयमभक्तैर्भगवद्रसः।**
**तत्पादाम्बुजसर्वस्वैर्भक्तैरेवानुरस्यते॥**
**व्यतीत्य भावनावर्त्म यश्चमत्कारभारभूः।**
**हृदि सत्त्वोज्ज्वले बाढं स्वदते स रसो मतः॥**

(भ. र. सि. २/५/१३१-१३२)

जे श्रीकृष्णाच्या श्रीचरणकमलांनाच आपले सर्वस्व समजतात, ते शुद्धभक्तजनच या रसाचा अनुभव करू शकतात. ज्यांच्या हृदयात भक्तिगंध नाही अर्थात थोडीदेखील भक्ती नाही, ज्यांचे हृदय जडोदित भावांनी परिपूर्ण आहे तथा स्वभावानेच जे आपल्या संस्कारांच्या अनुरूप तर्कप्रिय आहेत, ते कदापि या रसाचा अनुभव करू शकत नाहीत. प्रभो! मी असा अनुभव घेतला आहे की जेव्हा मनुष्याच्या भावना-पथाची सीमा पार करून एखादा चमत्कार भाव शुद्धसत्त्वाद्वारे उज्ज्वल झालेल्या हृदयात उदित होतो, तेव्हा त्या परम विशुद्ध आणि चमत्कारपूर्ण भावास रस म्हणतात. रस जडजगात नसतो–ती चित्-जगताची वस्तू आहे. तो चित्-कण जिवाच्या सत्तेवर प्रकाशित होतो. भक्ति-समाधीत हा रस लक्षित होतो. शुद्धसत्त्व आणि मिश्रसत्त्वाचा भेद ज्यांच्या हृदयात श्रीगुरुदेवांच्या कृपेने उदित होतो, त्यांना कुठल्याही प्रकारचा संशय होत नाही.

गोस्वामी–अगदी बरोबर बोललास. चांगली गोष्ट आहे. तुझ्या अनेक संशयास दूर करण्याकरिता प्रश्न करतो, तू त्याचे उत्तर दे, त्या उत्तरानेच एका परमतत्त्वाचा अनुभव करशील. बोल, शुद्धसत्त्व आणि मिश्रसत्त्वात काय अंतर आहे?

श्रीगुरुदेवांच्या चरणी दंडवत-प्रणाम करून विजयकुमार नम्रतापूर्वक म्हणाले–प्रभो! मी आपल्या कृपेने यथासाध्य सांगतो आहे. जर काही चूक झाली तर कृपा करून संशोधन करावे. ज्यांचे अस्तित्व लक्षित आहे, त्यांना सत्ता म्हटले जाते.

स्थितिसत्ता, रूपसत्ता, गुणसत्ता आणि क्रियासत्तायुक्त वस्तूसच सत्त्व म्हणता येऊ शकते. जे सत्त्व–अनादी आणि अनंत आहे, नित्यनवीन रूपात वर्तमान आहे तथा जे भूत-भविष्यरूप खण्डकाळाद्वारे दूषित होत नाही आणि सर्वदा चमत्कारितापूर्ण राहते–तेच शुद्धसत्त्व म्हणविले जाते. शुद्ध चित्-शक्तीतून उत्पन्न होणाऱ्या समस्त सत्ता शुद्धसत्त्व आहेत. चित्-शक्तीच्या छायारूपा मायेमध्ये काळाचे भूत-भविष्यरूप विकार असतात. या मायेमध्ये जी सर्व सत्त्वे दिसून येतात, त्या सर्वांचा आदी आहे, म्हणूनच त्यांच्यात रज:धर्म देखील आहे. त्या सर्वांचा अंत आहे, म्हणूनच त्यांच्यात तम:धर्म देखील आहे. अशा आदी आणि अंतयुक्त मायिक सत्त्वास मिश्रसत्त्व म्हणतात. शुद्धजीवदेखील–शुद्धसत्त्व आहेत. त्यांचे रूप, गुण आणि क्रिया सर्व काही शुद्धसत्त्वमय आहे. जेव्हापासून शुद्धजीव बद्ध झाला आहे, तेव्हापासून मायेचे रजोगुण आणि तमोगुण–हे दोन्ही त्याच्या सत्त्वात मिश्रित झाले आहेत. म्हणूनच बद्धजीवास मिश्रसत्त्व म्हणतात.

गोस्वामी–बाबा, तू तर अत्यंत सूक्ष्म सिद्धांत सांगितलास. आता हे सांग की जिवाचे हृदय शुद्धसत्वाद्वारे कशाप्रकारे उज्ज्वल होते?

विजय–जीव जोपर्यंत जडजगात बद्ध आहे, तोपर्यंत त्याचे शुद्धसत्त्व स्पष्टपणे (शुद्ध रूपात) उदित होत नाही. ज्या परिमाणात जिवाचे शुद्धसत्त्व उदित होते, त्याच परिमाणात त्याचे स्व-स्वरूपसुद्धा उपलब्ध होते. हे फळ कुठल्याही ज्ञान वा कर्मसाधनेद्वारे प्राप्त होत नाही. शरीराला मळ लागल्यावर त्याला दुसऱ्या कुठल्या मळाद्वारे दूर करता येऊ शकत नाही. जड कर्म स्वयं मळ आहे, तो जिवावरील मायेच्या मळास कशाप्रकारे हटवू शकतो? ज्ञान अग्निसमान आहे, ते मळासोबत मूळ सत्त्वासही जाळून राख करून टाकते. त्याच्याद्वारे मळ साफ होण्याचे सुख कसे काय प्राप्त करता येऊ शकते? म्हणून गुरू, कृष्ण आणि वैष्णवांच्या कृपामूलक भक्तीनेच शुद्धसत्त्व उदित होते. भक्ती उदित झाल्यावर शुद्धसत्त्वच हृदयास उज्ज्वल करते.

गोस्वामी–बाबा तुझ्यासारख्या अधिकाऱ्यास उपदेश प्रदान करण्यात सुख वाटते. आता तू आणखी काय जिज्ञासा करू इच्छितोस?

विजय–आपण आधी सांगितले की नायक चार प्रकारचे असतात–धीरोदात्त, धीरललित धीरप्रशांत आणि धीरोद्धत. कृष्ण यापैकी कोणते नायक आहेत?

गोस्वामी–कृष्णात उक्त चारही प्रकारचे नायकत्व आहे. चार प्रकारच्या नायकांमध्ये परस्पर जे सर्व विरुद्धभाव दिसून येतात, ते सर्व कृष्णरूप नायकात त्यांच्या अचिंत्यशक्तिमत्ता आणि निखिल रसांस एकाच वेळी धारण करण्याच्या शक्तीमुळे वर्तमान आहेत आणि कृष्णाच्या इच्छेनुसार कार्य करतात. या चार प्रकारचे नायक धर्मांनी युक्त श्रीकृष्णात आणिक एक गूढ विचित्रता आहे. ही विचित्रता केवळ असाधारण अधिकाऱ्यांकरिताच जाणण्यायोग्य आहे.

विजय–जर आपण माझ्यावर इतकी मोठी कृपा केली आहे, तेव्हा कृपा करून या तत्त्वासही सांगावे. असे म्हणता-म्हणता विजयकुमारचे डोळे सजल झाले आणि ते गोस्वामींच्या चरणी पडले. गोस्वामींनी त्यांना उठवून हृदयास लावले आणि स्वयंसुद्धा अश्रुपूर्ण नेत्रांनी गद्गद वाणीने म्हणाले–'बाबा' ते रहस्य हे आहे की मधुररसात कृष्ण पती आणि उपपती भेदाने दोन प्रकारचे नायक होतात.

विजय–प्रभो! कृष्ण तर आमचे नित्य पती आहेत, त्यांना पतीच म्हणायला हवे, मग उपपतीचा संबंध का?

गोस्वामी–मोठे गूढ रहस्य आहे. एक तर चित्-व्यापारच एक रहस्यमणी आहे, मग परकीया मधुररस तशा मण्यांमध्ये कौस्तुभ मणींच्या समान आहे.

विजय–मधुरसाश्रित भक्तजन कृष्णाचे पतिभावाने भजन करतात. कृष्णास उपपती मानण्याचे गूढ तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–परतत्त्वात निर्विशेष भावाचा योग केल्याने कुठला रसच राहत नाही, तथा **"रसो वै सः"** (छा. उ. ८/१३/१) इत्यादी वेदवाक्य व्यर्थ होतात. त्यात सुखाचा नितांत अभाव असल्याने निर्विशेष भाव अनुपादेय असतात. दुसरीकडे, सविशेष भाव जितक्या प्रकारचे असतात, त्याच मात्रात रसाचा विकासही मानावा लागतो. रसासच मुख्य तत्त्व समजावे. निर्विशेष भावाने काही मात्रेत ईश्वरभाव नामक सविशेष भाव श्रेष्ठ आहे. शांतरसाच्या ईश्वरभावापेक्षा दास्यरसाचा प्रभुभाव उंच आहे. सख्यभाव, दास्यभावापेक्षा उन्नत आहे. वात्सल्य त्याहीपेक्षा श्रेष्ठ आहे आणि मधुररस सर्वश्रेष्ठ आहे. ज्याप्रकारे हे भावसमूह क्रमशः एकमेकांपेक्षा श्रेष्ठ आहेत, त्याचप्रकारे स्वकीयापेक्षा परकीय मधुररस उत्कृष्ट आहे. आत्म आणि पर–ही दोन तत्त्वे आहेत. आत्मनिष्ठधर्म आत्मारामतेस म्हणतात. त्यात रसाचे वेगळे असे काहीच सहाय्य

नसते. श्रीकृष्णाचा आत्मारामता-धर्म नित्य असूनही त्यांच्यात परारामता धर्म सुद्धा त्याच प्रकारे नित्य आहे. विरुद्ध धर्मसमूह परमपुरुष कृष्णात एकाच वेळी एकत्रितपणे अवस्थित असतात, हा परतत्त्वाचा स्वाभाविक धर्म आहे. कृष्णलीलेच्या एका केंद्रस्थानी आत्मारामता अवस्थित आहे आणि त्याच्या विपरीत केंद्रात परारामता आपल्या पूर्ण पराकाष्ठेत विराजमान आहे. परारामतेची ही पराकाष्ठाच परकीय भाव आहे. नायक आणि नायिका परस्पर 'पर'[१] असूनही जेव्हा रागाद्वारे ते मिलित होतात, तेव्हा जो अद्भुत रस होतो, त्यास परकीय रस म्हणतात.

आत्मारामतेपासून परकीय मधुररसापर्यंतची रसाची विस्तृत सीमा आहे. रसास आत्मारामतेकडे खेचल्याने रसाची क्रमशः शुष्कता होते. परकीयाकडे त्याला जितके खेचावे, तो (रस) तितकाच प्रफुल्लतेस प्राप्त होतो. कृष्णच जेथे नायक आहेत, तेथे परकीयता कदापि घृणास्पद होऊ शकत नाही. जेथे एखादा साधारण जीव नायक बनतो, तेथे धर्म आणि अधर्माचा विचार निर्माण होतो, म्हणूनच तेथे परकीय भाव नितांत हेय आहे. म्हणूनच परकीय पुरुष आणि परोढा स्त्रीच्या संभोगास कवींनी अत्यंत तुच्छ मानले आहे. श्रीरूप गोस्वामींनी म्हटले आहे की साधारण अलंकारशास्त्रात उपपतीत जी हेयता स्थिर केली आहे, ती केवळ प्राकृत (जड) नायकांसंबधीच सांगितली गेली आहे. ही गोष्ट साक्षात अप्राकृत अवतारी श्रीकृष्णासंबंधी लागू होत नाही.

विजय–कृपया पती आणि उपपतीची वेगवेगळी लक्षणे सांगा.

गोस्वामी–जे कन्येचा हात पकडून विवाह करतात, ते पती आहेत.

विजय–उपपती आणि परकीयाची लक्षणे सांगा.

गोस्वामी–तदीय प्रेमसर्वस्वस्वरूप परकीया रमणी संग्रहाच्या इच्छेने जे रागाद्वारे धर्माचे उल्लंघन करतात, ते उपपती आहेत. जी स्त्री या लोक आणि परलोक (स्वर्ग आदी लोक) यांच्या धर्माची उपेक्षा करून विवाह-विधीचे उल्लंघन करून परक्या पुरुषाकडे आत्मसमर्पण करते, ती परकीया आहे. कन्या आणि प्रौढाच्या भेदाने परकीया दोन प्रकारच्या असतात.

---

(१) नायक-नायिकेत परस्पर वैवाहिक संबंध नसणे–'पर' भाव आहे.

विजय–स्वकीयेची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–पाणिग्रहण विधीद्वारे विवाहित, पतीच्या आदेशांचे पालन करण्यात तत्पर पतिव्रता स्त्रीस स्वकीया म्हणतात.

विजय–श्रीकृष्णाकरिता स्वकीया कोण आणि परकीया कोण?

गोस्वामी–द्वारकापुरीच्या विवाहित स्त्रिया स्वकीया आहेत आणि व्रजवनितांमधील अधिकांश परकीयाच आहेत.

विजय–या दोन्ही प्रकारच्या स्त्रियांची अप्रकट लीलेमध्ये काय स्थिती होते?

गोस्वामी–मोठीच गूढ गोष्ट आहे. तू जाणतोस की विभूती चार पादांची असते. त्यापैकी तीन पाद विभूती चित्-जगात आणि एक पाद विभूती जडजगात आहे. एक पाद विभूतीमध्ये चौदा भुवनात्मक संपूर्ण मायिक जगत स्थित आहे. मायिक जगत आणि चित्-जगाच्या मध्ये विरजा नदी आहे. विरजेच्या या बाजूला मायिक जगत आणि त्या बाजूला चित्-जगत आहे. चित्-जगास चारही बाजूंनी घेरणाऱ्या चार भिंती म्हणजेच ज्योतिर्मय ब्रह्मधाम आहे. त्यास भेदून पुढे गेल्यावर परव्योम संव्योमरूप वैकुण्ठ दिसू लागते. वैकुंठात ऐश्वर्य प्रबळ असते. तेथे नारायणच राजराजेश्वराच्या रूपात अनंत चिद्विभूतींद्वारे परिसेवित होऊन विराजमान राहतात. वैकुंठात भगवंताचा स्वकीय रस आहे. तेथे श्री, भू आणि नीला शक्ती स्वकीय स्त्रीच्या रूपात त्यांची सेवा करतात. वैकुण्ठाच्या वर गोलोक आहे. वैकुण्ठात स्वकीया पुरातल्या वनिता यथास्थान सेवेत तत्पर राहतात. गोलोकात व्रजच्या वनिता आपल्या रसामध्ये श्रीकृष्णाची सेवा करतात.

विजय–जर गोलोक कृष्णाचे सर्वोच्च धाम आहे, तर व्रजाचे इतके अद्भुत माहात्म्य का सांगितले गेले आहे?

गोस्वामी–व्रज, गोकुळ आणि वृन्दावन आदी स्थान श्रीमाथुरमण्डळाच्या आत आहेत. माथुरमण्डळ आणि गोलोक अभेद तत्त्व आहेत. एकच वस्तू चित्-जगाच्या सर्वोच्च स्थानी स्थित होऊन गोलोक आणि प्रपंचाच्या आत प्रकाशित झाल्यावर माथुरमण्डळ–युगपत् या दोन स्वरूपांत प्रसिद्ध आहे.

विजय–हे कसे काय संभव आहे? ही गोष्ट समजत नाही.

गोस्वामी–कृष्णाच्या अचिंत्यशक्तीद्वारे असे संभव आहे. अचिंत्यशक्तीचे विषयसमूह चिंतन आणि युक्तीच्या पलीकडले आहेत. ज्यास गोलोक म्हणता येते, तेच प्रकट लीलेमध्ये प्रपंचाच्या आत मथुराधाम आहे, अप्रकट लीलेमध्ये तेच गोलोक आहे. गोलोक नित्यजगात नित्य प्रकाशित आहे. कृष्णाची चिन्मयी लीला नित्य आहे. ज्यांना शुद्ध चिन्मय वस्तू दर्शन करण्याचा अधिकार मिळाला आहे, ते लोक गोलोक दर्शन करतात. इतकेच नाही, तर ते गोकुळातही गोलोकाचे दर्शन करतात. परंतु मायिक बुद्धीचे जीव गोलोकाचे दर्शन करू शकत नाहीत. गोकुळच गोलोक आहे, तरीही जड बुद्धीचे जीव गोकुळात प्रापंचिक विश्वाचे दर्शन करतात, अर्थात गोकुळास सांसारिक स्थळाच्या रूपात पाहतात.

विजय–गोलोक दर्शनाचा अधिकार काय आहे?

गोस्वामी–श्रीशुकदेव गोस्वामींनी म्हटले आहे–

**इति संचिन्त्य भगवान् महाकारुणिको विभुः।**
**दर्शयामास स्वं लोकं गोपानां तमसः परम्॥**

**सत्यं ज्ञानमनन्तं यद्ब्रह्मज्योतिः सनातनम्।**
**यद्धि पश्यन्ति मुनयो गुणापाये समाहिताः॥**[२]

(श्रीमद्भा . १०/२८/१४-१५)

बाबा! कृष्णाच्या कृपेशिवाय गोलोकाचे दर्शन होत नाही. कृष्णने कृपा करून व्रजवासींना गोलोकाचे दर्शन करविले होते. ते गोलोक प्रकृतीच्याही

(२) (गोपगण नित्यसिद्ध आहेत, परंतु ते कृष्णलीलेच्या सहाय्यक रूपात या प्रपंचात अवतीर्ण होतात. त्या नित्यसिद्ध गोपांच्या अनुगत साधनसिद्ध गोप असतात. हे साधनसिद्ध गोप असे समजतात की या लोकांना जीव अज्ञानवश शरीरामध्ये आत्मबुद्धी ठेवून नाना प्रकारच्या कामना करतात आणि त्यांच्या पूर्तीकरिता नाना प्रकारची कर्मे करून उच्च-नीच योनींमध्ये भटकत फिरत राहतात– आपणही तेच करीत आहोत.)–असा विचार करून अचिंत्यवैभवयुक्त महाकारुणिक भगवान श्रीकृष्णांनी त्या गोपांस मायेच्या अंधःकाराच्या पलिकडील आपले परमधाम–गोलोकाचे दर्शन करविले. ते धाम नित्य सत्य आणि सनातन आहे, अपरिच्छिन्न जड संबंधरहित, सर्वव्यापक आणि स्वप्रकाश आहेत. गुणातीत अवस्थेमध्ये समाधीद्वारे मुनिगण-भक्तजन त्या धामाचे दर्शन करतात.

पलीकडील विशेष परमधाम आहे. त्या लोकाच्या विचित्रता नित्य सत्यस्वरूप आहेत, अनंत चिद्विलास आहेत. चिन्मय ज्योति-ब्रह्म सनातन रूपात तेथे प्रभेच्या (अंगज्योती) रूपात वर्तमान आहे. जडातून निवृत्त झालेले भक्तजन जडीय संबंधरहित झाल्यावर त्या विशेष तत्त्वाचे दर्शन करतात.

विजय–सर्वच सर्व मुक्तपुरुष गोलोकाचे दर्शन करू शकतात का?

गोस्वामी–करोडो मुक्त पुरुषांपैकी एखादा विरळाच भगवद्भक्त असतो. अष्टांगयोग आणि ब्रह्मज्ञानाची साधना करून मुक्त होणारे जीव ब्रह्मधामातच आत्म-विस्मृती भोग करतात अर्थात जसे सुषुप्ती अवस्थेत मनुष्य अनुभवशक्ती, ज्ञानशक्ती और इच्छाशक्ती आदीने रहित होऊन निश्चेष्ट पडून राहतो, त्याचप्रकारे ब्रह्मधामास प्राप्त जीव आत्म विस्मृत होऊन जड पिंडाप्रमाणे पडून राहतात. यांची तर गोष्ट सोडाच, पण ऐश्वर्यपर भक्तदेखील गोलोकास पाहू शकत नाहीत. ऐश्वर्यभावयुक्त भक्त वैकुंठात आपापल्या भावानुरूप ऐश्वर्य मूर्तीची सेवा करतात. जे व्रजरसाद्वारे कृष्णाचे भजन करतात, त्यांपैकी ज्यांच्यावर कृपा करून कृष्ण अशेष मायाबंधनातून मुक्त करतात, ते महाभाग जीव गोलोकाचे दर्शन करू शकतात.

विजय–चांगली गोष्ट आहे. जर अशाप्रकारे मुक्त भक्तांशिवाय दुसरे कोणीही गोलोकास पाहू शकत नाहीत, तर श्रीब्रह्मसंहिता, हरिवंश, पद्मपुराण आदी शास्त्रांत गोलोकाचे वर्णन का गेले आहे? जर व्रजभजनानेच कृष्णाची कृपा होते, तर गोलोकाचा उल्लेख करण्याचे प्रयोजनच काय होते?

गोस्वामी–ज्या व्रजरसाच्या रसिक भक्तांस कृष्ण या प्रपंचातून उठवून गोलोकी घेऊन जातात, ते गोलोकास संपूर्णपणे पाहू शकतात. मग विशुद्ध व्रजभक्तजनसुद्धा थोडे-थोडे गोलोक दर्शन करतात. भक्त दोन प्रकारचे असतात–साधक आणि सिद्ध. साधकांस गोलोक दर्शनाचा अधिकार नाही. सिद्ध भक्त दोन प्रकारचे आहेत अर्थात वस्तुसिद्ध भक्त आणि स्वरूपसिद्ध भक्त. जे कृष्णाच्या कृपेने साक्षात गोलोकात आणले गेलेले आहेत, ते वस्तुसिद्ध भक्त आहेत. जे गोलोकाचे स्वरूप तर पाहत आहेत, परंतु स्वयं अजूनही प्रपंचात अवस्थित आहेत, साक्षात गोलोकात उपस्थित नाहीत. कृष्णाच्या कृपेने त्यांचे भक्तिनेत्र क्रमशः उघडत आहेत, म्हणून त्यांचे अधिकार अनेक प्रकारचे आहेत. काही थोडेच पाहू शकतात, तर काही थोडे अधिक पाहू शकतात, आणि काही काही आणखीच अधिक पाहतात. ज्यांच्या

प्रती कृष्णाची जितकी अधिक कृपा होते, ते तितकेच अधिक मात्रेत गोलोकाचे दर्शन करतात. जेथपर्यंत भक्तीची साधनावस्था आहे, तेथपर्यंत गोकुळात जे काही दर्शन होते, ते काहीकाहीसे मायिक भावाने उदित होते. साधनावस्थेस पार करून भावावस्थेमध्ये पोहचल्यावर काही-काही शुद्ध रूपात दर्शन होते आणि प्रेमावस्थेत पोहोचल्यावर तर प्रचुर परिमाणात दर्शन होऊ लागते.

विजय–प्रभो! गोलोक आणि व्रजात कोणकोणत्या विषयांत भेद आहे?

गोस्वामी–व्रजात आपण जे काही पाहतो ते सर्व काही गोलोकात आहे. दर्शकांच्या निष्ठेच्या भेदाने त्या त्या विषयात काही काही भिन्न दर्शन होते. वास्तविक गोलोक आणि वृन्दावनात भेद नाही. दर्शकांच्या दृष्टिभेदाने दृश्याचा भेद असतो. अत्यंत तमोगुणी व्यक्ती व्रजामध्ये सर्व काही जडमय पाहतो. रजोगुणी व्यक्ती आधीपेक्षा काही शुभ दर्शन करतात आणि सत्त्वानुगामी व्यक्ती आपल्या दृष्टिशक्तीच्या अधिकारानुसार अर्थात जितक्या दूरपर्यंत दृष्टी आहे, तितक्या दूरपर्यंत शुद्धसत्वाचे दर्शन करतात. प्रत्येक मनुष्याचा अधिकार पृथक आहे. म्हणूनच त्याला होणारे दर्शनदेखील वेगवेगळे असते.

विजय–प्रभो! काही काही अनुभव तर होतो आहे. परंतु एक उदाहरण देऊन या विषयास आणखी स्पष्ट करण्याची कृपा करावी. यद्यपि जडजगताचे विषय चित्-जगताच्या विषयांकरिता संपूर्ण उदाहरण म्हणून बसत नाहीत. तरीही एकदेशीय संकेत मिळाल्यावरही सर्वदेशीय अनुभूती उदित होते.

गोस्वामी–मोठी कठीण समस्या आहे. आपल्या रहस्यानुभुतीस इतरांसमोर प्रकट करण्यास निषेध आहे. तुलादेखील कृष्णकृपेने एखादी रहस्यानुभूती झाल्यावर तिला सदैव गोपनीय ठेव. याविषयी आपल्या पूर्वाचार्यांनी जितकी तथ्ये प्रकाशित केली आहेत, मीसुद्धा तुम्हाला तेथपर्यंतच सांगेन. त्यापेक्षा अधिक जे काही आहे, ते तुम्ही भगवंताच्या कृपेने स्वतःच पाहू शकाल. गोलोकात शुद्ध चित्-प्रतीती आहे. तेथे जडप्रतीती नावाची कुठलीही गोष्ट नाही. चित्-शक्तीने रसाच्या पुष्टीकरिता त्या विचित्र भावांस प्रस्फुटित केले आहे, त्यापैंकी अनेक स्थळी अभिमान नावाची एक सत्ता आहे. गोलोकात कृष्ण अनादी आणि जन्मरहित आहेत. तथापि तेथे नन्द आणि यशोदारूप लीला सहाय्यक सत्त्वसमूह पितृत्व अभिमानाद्वारे वात्सल्यरसाला मूर्तिमान करीत आहेत. श्रृंगाररसात विप्रलंभ आणि संभोग आदी विचित्रता

अभिमानाच्या रूपात वर्तमान आहेत. तेथे परकीया भावात शुद्ध स्वकीयत्व असल्यावरही परकीय अभिमान आणि औपपत्य अभिमान नित्य वर्तमान आहेत. पाहा, व्रजात ते सर्व अभिमान माया-प्रत्ययित स्थूल रूपात दिसून येतात. यशोदेचे प्रसवणे, कृष्णाचे सूतिकागृह, अभिमन्यू, गोवर्धन आदींसोबत नित्यसिद्धा गोपींचा विवाहमूलक परकीय अभिमान–हे सर्वकाही अत्यंत स्थूल रूपात दिसून येते. हे सर्वकाही योगमायेद्वारे संपादित झाले आहे तथा अत्यंत सूक्ष्म मूलतत्त्वाने संयोजित आहे. यात थोडेदेखील असत्य नाही आणि गोलोकाच्या सर्वथा अनुरूप आहे. केवळ द्रष्ट्याच्या (पहाणाऱ्याच्या) च्या प्रपंच-बाधेनुसार दर्शन-भेद मात्र आहे.

विजय–मग काय अष्टकालीन लीलांमध्ये यथायोग्य शोधन करून विषयांची भावना करावयास हवी?

गोस्वामी–नाही, तसे नाही. ज्या ज्या रूपात व्रजलीलेचे दर्शन होते, ते त्याच रूपात अष्टकालीन लीलेचे स्मरण करतील. भजनाच्या बळाने साधकाच्या हृदयात कृष्णकृपेद्वारे आपोआप लीला स्फुरित होते. आपल्या प्रयत्नांनी लीलेच्या भावांमध्ये संशोधन करण्याची आवश्यकता नाही.

विजय–"यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी" या न्यायानुसार साधनकाळात जसे ध्यान होते, त्याच्या अनुरूप सिद्धी होते. म्हणूनच संशोधित निर्मळ गोलोकाच्या ध्यानाची आवश्यकता आहे–असे प्रतीत होते.

गोस्वामी–तू बरोबर बोलतो आहेस. व्रजामध्ये ज्या सर्व प्रतीती आहेत, त्या सर्व शुद्ध तत्त्वमूलक आहेत, त्यापैकी एकही शुद्ध तत्त्वाच्या विपरीत नाही. जर त्या विपरीत असत्या, तर दोष झाला असता. साधन शुद्ध असल्याने सिद्धी होते. साधन ध्यान जितके शोधित असते, तितकीच शीघ्र सिद्धी प्राप्त होते. साधन कार्य ज्यामुळे सुंदर रितीने संपन्न होऊ शकेल, त्याकरिता प्रयत्न करावेत. परंतु शोधन करणे तुमच्या शक्तीच्या पलीकडील गोष्ट आहे. अचिंत्यशक्तिमय कृष्णच तसे करू शकतात. स्वयं तसे करण्याची कृती केल्याने तुम्ही ज्ञानरूपी काटेदार झुडुपांमध्ये अडकून जाल आणि जर कृष्ण कृपा करतील तर तसे वाईट फळ मिळणार नाही.

विजय–आज मी धन्य झालो, आणखी एक गोष्ट विचारू इच्छितो. पुरातल्या स्त्रियांचे आश्रयस्थळ वैकुण्ठच आहे अथवा गोलोकातही त्यांना आश्रय आहे?

गोस्वामी–चित्-जगाच्या वैकुंठात अशेष आनंदाची प्राप्ती होते. वैकुंठापेक्षा उन्नत आणखी दुसरी प्राप्ती नाही. तेथेच द्वारका आदी पुरी आहेत. पुरवनिता पुरस्थित आपापल्या महालांत कृष्णाची सेवा करतात. व्रजरमणींव्यतिरिक्त मधुररसात आणखी दुसऱ्या कुणासही गोलोकात स्थान नाही. व्रजामध्ये ज्या-ज्या लीला आहेत, गोलोकात त्या सर्व प्रकारच्या लीला आहेत. गोलोकांतर्गत माथुरपूर लीलेमध्ये रुक्मिणींची स्वकीय रसामध्ये स्थिती आहे–असा उल्लेख गोपालतापनीत आहे.

विजय–प्रभो! मी व्रजामध्ये ज्या प्रकारचा व्यापार पाहतो आहे, गोलोकातही ठीक तशाच प्रकारचे सर्वकाही आहे का?

गोस्वामी–ठीक अशाच प्रकारे आहे, परंतु केवळ माया-प्रत्ययित अंश नाही. तसे नसल्यानेसुद्धा त्या प्रत्ययांचे एक-एक चिन्मय विशुद्ध मूळ आहे. मी ते सांगू शकत नाही. तू ते भजनबळाने जाणू शकशील.

विजय–प्रपंचजगत संपूर्ण रूपाने महाप्रलयात अंतर्हित होऊन जाते; म्हणूनच व्रजलीलेचा सांप्रतभाव नित्य कसा आहे?

गोस्वामी–व्रजलीला दोनही प्रकारांनी नित्य आहे, सांप्रतप्रतीती अनंत ब्रह्मांडात चक्राप्रमाणे फिरत वर्तमान आहे. एखाद्या ब्रह्मांडात जी लीला आता होत आहे, तीच दुसऱ्या क्षणी दुसऱ्या ब्रह्मांडात पोहोचते. अशा प्रकारे ही लीला प्रथम ब्रह्मांडात अप्रकट लीला आहे, परंतु तीच दुसऱ्या ब्रह्मांडात प्रकट लीलेच्या रूपात वर्तमान आहे. अशा प्रकारे समस्त प्रकारच्या प्रकट लीलांची नित्यता आहे. अप्रकट अवस्थेतही समस्त लीला नित्य वर्तमान आहेत.

विजय–जर सर्व ब्रह्मांडात प्रकट लीला होतात, तर प्रत्येक ब्रह्मांडात एक-एक व्रजधाम आहे काय?

गोस्वामी–हो, आहे! गोलोक स्वप्रकाश वस्तू आहे. तो प्रत्येक ब्रह्मांडात लीलाधाम रूपात वर्तमान आहे. पुनः सर्व भक्तांच्या हृदयातही गोलोक प्रकटित आहे.

विजय–ज्या ब्रह्मांडात लीला अप्रकट आहे, तेथे माथुरमंडळ का प्रकटित राहते?

गोस्वामी–तेथे अप्रकट लीला नित्य वर्तमान राहते. तिथल्या भक्तांप्रती कृपा

करीत धाम वर्तमान राहते.

त्यादिवशी येथपर्यंतच संवाद झाला. विजयकुमार अष्टाकालीय सेवेची चिंता करीत करीत वासस्थानी परतले.

**॥ एकतीसावा अध्याय समाप्त ॥**



# बत्तीसावा अध्याय (मधुररस-विचार)

रात्रीची वेळ होती. ब्रजनाथ आपले भजन संपवून हरिनामाची माळ ठेवून झोपले. विजयकुमार प्रसाद सेवा करून बिछान्यावर पडले होते. झोप येत नव्हती. काही विचार करीत होते. आधी त्यांची धारणा होती की गोलोक एक वेगळे स्थान आहे. परंतु आता ते या निष्कर्षाप्रत पोहोचलेत की गोलोक आणि गोकुळ अभिन्न आहेत. गोलोकातही परकीय रसाचे मूळ आहे, परंतु कृष्ण उपपती कसे असू शकतात?–ही गोष्ट त्यांना समजेना. त्यांनी विचार केला–कृष्ण परम पदार्थ आहेत, शक्ती आणि शक्तिमान अभेद आहेत. जर शक्तीस शक्तिमानापासून वेगळे केले गेले तर शक्तीस परोढा आणि कृष्णास उपपती कसे म्हणता येईल? एकदा विचार केला, उद्या श्रीगुरुदेवांकडे प्रश्न विचारून या शंकेस दूर करीन. मग विचार केला, गोलोकासंबंधी श्रीगुरुदेवांकडे काहीही विचारणे योग्य नाही. तरीही संशय दूर करणे तर आवश्यक आहे. अशा प्रकारे त्यांना विचार करता-करता झोप आली. झोपेत त्यांनी स्वप्न पाहिले की, त्यांचे गुरुदेव त्यांच्यासमोर आहेत आणि विजयकुमार आपली शंका निरसन करण्याकरिता त्यांना तोच प्रश्न विचारीत आहेत, ज्याचे ते पडल्या-पडल्या काही क्षण पूर्ण चिंतन करीत होते. गुरुदेव स्वप्नातच उत्तर देत होते– बाबा विजय! कृष्ण सर्वतन्त्र स्वतन्त्र आहेत. त्यांची इच्छा निरंकुश आहे. त्यांची नित्य इच्छा हीच आहे की स्वकीय ऐश्वर्यास झाकून माधुर्याचा प्रकाश व्हावा. अशा दशेत कृष्ण आपल्या शक्तीस आपल्यापासून वेगळी सत्ता प्रदान करतात. त्यामुळेच भगवंताची ती पराशक्ती कोटी ललनांचे रूप धारण करून कृष्णाची सेवा करण्याचा प्रयत्न करते. पुनः कृष्ण शक्तीच्या ऐश्वर्य प्रधान सेवेने पूर्णपणे संतुष्ट नसल्याने त्याच शक्तीच्या कोणत्यातरी विचित्र प्रभावाद्वारे त्या ललनांस वेगवेगळ्या गृहस्थाचा अभिमान प्रदान करतात अर्थात त्या ललना त्या शक्तीच्या प्रभावाने स्वतःस दुसऱ्याची स्त्री मानू लागतात. कृष्णही त्याचप्रकारे उपपतिसंबंध धारण करतात. ते परकीय रसाच्या लोभाने आपल्या आत्माराम धर्माचे उल्लंघन करून त्या परोढा मानिनीं (गोप-ललनां) सोबत रास आदी विचित्र लीला करतात. वंशी या कार्यात प्रिय सखी असते. या लक्षणांद्वारे गोलोकात नित्य परकीय भाव सिद्ध होतो. म्हणून गोलोकातील लीला-वनसमूह आणि केलिवृन्दावन आदी नित्य वर्तमान राहतात. व्रजामध्ये जे रासमंडप, यमुना नदी, गिरिगोवर्धन आदी लीलेचे स्थानसमूह आहेत, ते

सर्वच्या सर्व गोलोकात आहेत. गोलोकात स्वकीयत्व आणि दांपत्य भाव अशाच रूपात वर्तमान आहे. शुद्धस्वकीयत्व वैकुंठात विराजमान आहे. स्वकीयत्व-परकीयत्व अचिंत्यभेदाभेद रूपात लक्षित असतात. मग पाहा ना, आश्चर्याचा विषय तर हा आहे की व्रजामध्ये परकीय भाव (जो गोलोकात केवळ अभिमान स्वरूपात आहे) परक्या स्त्रीच्या घटनेप्रमाणे दिसल्यावरही त्यात परदारत्व नाही. त्याचे कारण हे आहे की त्या ललना कृष्णाची आपली शक्ती आहेत. अनादीकाळापासून त्यांचा कृष्णाशी संयोग असल्याने स्वकीयत्व आणि दांपत्यच सिद्ध आहे. अभिमन्यू गोपसमूह गोलोकाच्या तत्तदभिमानाचे अवतार विशेष आहेत. त्यांनी कृष्णाच्या लीलेच्या पुष्टीकरिता पती बनून कृष्णास उपपती भावात व्रजरंगाचा नेता केले आहे. प्रपंचाच्या पलीकडील गोलोकात केवळ अभिमानमात्रानेच रसाची पूर्णपणे पुष्टी होऊन जाते. प्रपंचांतर्गत गोकुळात विवाहधर्म आणि दांपत्यधर्म-लंघन प्रतितीकरिता योगमायेद्वारे गोकुळगत अभिमानसमूह पृथक सत्त्वाच्या रूपात (शरीर धारण करून) प्रकटित आहेत अर्थात हे सर्वकाही योगमायेद्वारे सिद्ध आहे.

स्वप्नात श्रीगुरुदेवांच्या निकट स्वकीय आणि परकीय तत्त्वास ऐकून विजयकुमारची शंका दूर झाली. प्रपंचातीत गोलोकच भौमगोकुळ आहे–असा विश्वास दृढ झाला. व्रजरसाची परमानंदमयी तादात्म्यस्वरूपता त्यांच्या हृदयात उदित झाली. त्याचबरोबर अष्टकालीय व्रजाच्या नित्यलीलांमध्ये दृढता उत्पन्न झाली. सकाळी उठून त्यांनी विचार केला की श्रीगुरुदेवांची माझ्यावर असीम कृपा आहे. आता रसाच्या उपकरणांस त्यांच्या निकट श्रवण करून भजनात निष्ठा प्राप्त करीन.

विजयकुमार प्रसाद सेवा करून योग्य वेळी श्रीगुरुगोस्वामींच्या जवळ उपस्थित झाले आणि त्यांना प्रेमाने रडत-रडत प्रणाम केला. गुरुदेवांनीही मोठ्या प्रेमाने त्यांना आलिंगन दिले आणि म्हणाले–बाबा, तुझ्यावर कृष्णाची यथार्थ कृपा झाली आहे. मी तुला पाहून धन्य होऊन जातो.,अशा प्रकारे बोलता बोलता ते प्रेमाने अधीर होऊन गेले.

काही वेळाने जेव्हा त्यांना बाह्य स्फूर्ती झाली तेव्हा विजयकुमार त्यांना साष्टांग प्रणाम करीत म्हणाले–प्रभो! मी कृष्णाच्या कृपेस जाणत नाही, मी तर आपल्या कृपेलाच सर्वकाही समजतो. आता मी गोकुळाची अनुभूती प्राप्त करण्याची कृती सोडून व्रजानुभूती प्राप्त करण्याच्या प्रयत्नातच पूर्ण संतुष्ट आहे. मी व्रजाच्या

रसवैचित्र्यास यथायोग्य समजू इच्छितो. कृपया हे सांगावे की गोकुळात ज्या कन्यांनी कृष्णाप्रती पतिभाव ठेवला होता, त्यांना स्वकीय म्हटले जाऊ शकते अथवा नाही?

गोस्वामी–त्या गोकुळ-कन्यांमध्ये पतिभाव-निष्ठा असल्याने तात्कालिक स्वकीयत्व झाले होते. परंतु त्या स्वरूपतः परकीया आहेत. त्यांचा स्वकीयत्व स्वभाव नसूनही गंधर्वविवाह-रितीने कृष्णाद्वारे स्वीकृत असल्याने त्यांचे सांप्रत अवस्थेमध्ये अर्थात गोकुळ लीलेमध्ये स्वकीयत्व सिद्ध आहे.

विजय–प्रभो, मी हळू हळू आणखी बरीच जिज्ञासा करीन. श्रीउज्ज्वलनीलमणीच्या क्रमानुसार सर्व गोष्टी समजण्याचा प्रयत्न करीन. आधी नायकासंबंधी सर्व गोष्टी समजावून घेतो. नायक चार प्रकारचे आहेत–अनुकूल, दक्षिण, शठ आणि धृष्ट. यापैंकी अनुकुलासंबंधी सांगावे.

गोस्वामी–जे अन्य ललनांची स्पृहा (इच्छा) सोडून केवळ एका नायिकेप्रती अत्याधिक आसक्त असतात, ते अनुकूल नायक आहेत. श्रीसीतादेवीच्या प्रती श्रीरामचन्द्रांचा आणि श्रीमती राधिकेप्रती श्रीकृष्णाचा भाव अनुकूल नायकाचा आहे.

विजय–धीरोदात्त आदी चार प्रकारच्या नायकांच्या वेगवेगळ्या अनुकूल आदी भावांचा परिचय जाणू इच्छितो. कृपा करून धीरोदात्त-अनुकूल नायकाची लक्षणे सांगावीत.

गोस्वामी–धीरोदात्त-अनुकूल नायक गंभीर, विनयी, क्षमाशील, करुण, दृढव्रत, आत्मश्लाघाशून्य, गूढ-गर्व आणि परम उदार असूनही त्या-त्या गुणांचा परित्याग करून आपल्या नायिकेकरिता अभिसार करतात.

विजय–धीरललित-अनुकूल नायकाची लक्षणे सांगावीत.

गोस्वामी–रसिकता, नवयौवन, परिहासपटुता आणि निश्चिंतता आदी धीरललिताचे गुण आहेत. त्यात अविच्छेद विहार-लक्षणाचा संयोग झाल्याने धीरललित-अनुकूल नायक ठरतो.

विजय–धीरशांत-अनुकूल नायक कसा असतो?

गोस्वामी–शांत-स्वभाव, सहिष्णू, बुद्धिमान आणि विवेक आदी गुणांनी युक्त नायकच धीरशांत-अनुकूल आहे.

विजय–धीरोद्धतानुकूल नायकाचे लक्षण सांगावे.

गोस्वामी–मत्सर, अहंकारी,मायावी, क्रोधी आणि आत्मप्रशंसक नायक अनुकूल असूनही धीरोद्धतानुकूल नायक असतात.

विजय–नायक कशाप्रकारे दक्षिण असतात?

गोस्वामी–दक्षिण शब्दाचा अर्थ आहे–सरल. पूर्व नायिकेप्रती गौरव, भय, प्रेम दाक्षिण्यास सोडल्याशिवायही अन्य नायिकांप्रती जे आपल्या चित्तास लावतात, ते दक्षिण नायक आहेत. अनेक नायिकांमध्ये समभाव ठेवणारा नायकच दक्षिण नायक असतो.

विजय–शठ नायकाची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–जो नायक समोरासमोर प्रिय आचरण करतो, परंतु पाठ फिरल्यावर अप्रिय आचरण करून निगूढ अपराध करतो, तो शठ नायक आहे.

विजय–धृष्टाची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–अन्य नायिकेची भोगचिन्हे व्यक्त होऊनही जो निर्भय होऊन खोटे बोलण्यात दक्ष आहे, तो धृष्ट आहे.

विजय–प्रभो! एकूण किती प्रकारचे नायक आहेत?

गोस्वामी–आमच्याकरिता तर कृष्णाशिवाय दुसरा कुणी नायकच नाही. ते एकच कृष्ण द्वारकेत पूर्ण आहेत, मथुरेत पूर्णतर आहेत आणि व्रजात पूर्णतम आहेत. ते पती आणि उपपतीच्या भेदाने दोन प्रकारचे असल्याने ३ x २=६ प्रकारचे असतात. पुनः धीरोदात्त आदी चार प्रकारच्या भेदांमुळे ६ x ४=२४ प्रकारचे आहेत. मग अनुकूल,दक्षिण, शठ आणि धृष्ट या भेदांनी २४ x ४ = ९६ प्रकारचे नायक आहेत. आता असे समजावे लागेल की स्वकीय रसात चोवीस प्रकारचे नायक आहेत आणि परकीय रसातपण चोवीस प्रकारचे नायक आहेत. व्रजलीलेत स्वकीय रसाचा संकोच भाव असतो आणि परकीय रसाची प्रधानता असते, म्हणूनच येथे श्रीकृष्णात परकीय रसाचे २४ प्रकारचे नायकत्व नित्य विराजमान असते. लीलेच्या ज्या अंशात आणि ज्या विभागात ज्या प्रकारच्या नायकाची आवश्यकता असते, श्रीकृष्ण त्याच प्रकारच्या नायकाच्या रूपात अनुभूत होतात.

विजय–प्रभो! मी नायक आणि नायिकेच्या गुणविचित्रतांचा अनुभव करीत आहे. आता मी हे जाणू इच्छितो की नायकाचे सहाय्यक किती प्रकारचे असतात?

गोस्वामी–नायकाचे सहाय्यक पाच प्रकारचे असतात–चेट, विट, विदूषक, पीठमर्द आणि प्रियनर्मसखा. हे सर्व नर्म (मधुर) वाक्य प्रयोगात निपुण, सदा गाढ अनुरागी, देश आणि काळाचे ज्ञाता, दक्ष, रुष्ट गोपींस प्रसन्न करण्यात चतुर तथा रहस्यपूर्ण मंत्रणा देणारे असतात. पाच प्रकारच्या सहाय्यकांमध्ये हे गुणसमूह आढळतात.

विजय–चेट कोणास म्हणतात?

गोस्वामी–कोणत्या गोष्टीचा थांगपत्ता लावण्यात चतुर, गूढ कर्म करणारे तथा प्रगल्भबुद्धियुक्त भंगुर आणि भृंगार आदी गोकुळात कृष्णाचे चेट कार्य करतात.

विजय–विट कोणास म्हणतात?

गोस्वामी–वेष-रचना आदी कार्यांमध्ये दक्ष, धूर्त, संवादात चतुर, वशीकरण आदी क्रियांमध्ये पटू (कुशल) कडार आणि भारतीबन्ध आदी कृष्णाचे विट आहेत.

विजय–विदूषक कशास म्हणतात?

गोस्वामी–भोजनप्रिय, कलहप्रिय, अंगभंगी आणि वाक्-चातुरी तथा वेषाद्वारे हसविणारे वसन्त आणि गोप तथा मधुमंगल आदी कृष्णाचे विदूषक आहेत.

विजय–पीठमर्द कोण आहेत?

गोस्वामी–नायकसारखेच गुणवान असूनही नायकाच्या आज्ञेनुसार चालणारे श्रीदामच कृष्णाचे पीठमर्द आहेत.

विजय–प्रियनर्म सखाचे लक्षण काय आहे?

गोस्वामी–आत्यंतिक रहस्यज्ञ, सखीभावाश्रित, सुबल आणि अर्जुन आदी कृष्णाचे प्रियनर्म सखा आहेत. म्हणून ते इतर सर्व सखांपेक्षा श्रेष्ठ आहेत. चेट, विट, विदूषक, पीठमर्द आणि प्रियनर्म सखा–या पाचांमध्ये चेटांचे दास्य, पीठमर्दांचा वीर रस आणि बाकी सर्वांचा सख्यरस आहे. चेटगण किंकर आहेत आणि शेष चार सखा आहेत.

विजय–सहकार्‍यांमध्ये स्त्रिया नाहीत का?

गोस्वामी–हो आहेत, त्यांना दूती म्हणतात.

विजय–दूती किती प्रकारच्या असतात?

विजय–दोन प्रकारच्या असतात–स्वयंदूती आणि आप्तदूती. कटाक्ष आणि वंशीध्वनी स्वयंदूती आहेत.

विजय–अहा! आप्तदूती कोण आहेत?

गोस्वामी–प्रगल्भ वचन बोलण्यात प्रवीण 'वीरा' आणि चाटुवाक्य बोलण्यात चतुर 'वृन्दा', या दोघीही श्रीकृष्णाच्या आप्तदूती आहेत. स्वयंदूती आणि आप्तदूती या असाधारण दूती आहेत. यांच्या व्यतिरिक्त लिंगिनी, दैवज्ञा आणि शिल्पकारिणी आदी आणखीही अनेक साधारण दूती आहेत. नायिका दूती-विचाराच्या प्रसंगामध्ये यांचे विस्तारपूर्वक वर्णन केले जाईल.

विजय–मी श्रीकृष्णरूप नायकाचे भाव आणि गुणांचा अनुभव घेतला आहे तथा हे देखील समजलो आहे की पती आणि उपपती दोन्ही भावांमध्ये श्रीकृष्ण नित्य लीला करतात. ते द्वारिकेत पतिभावात तथा व्रजपुरीत उपपती भावात लीला करतात. आपले कृष्ण उपपती आहेत, म्हणून व्रजरमणींच्या संबंधी आम्ही जाणून घेणे आवश्यक आहे.

गोस्वामी–व्रजेन्द्रनन्दन श्यामसुन्दराच्या ज्या सर्व व्रजललना आहेत, त्यांत अधिकांश परकीया आहेत. याचे कारण हे आहे की परकीयाशिवाय मधुर रसाचा पूर्णतया विकास होत नाही. विवाह-संबंधाने पुराच्या वनितांचा रस सीमित राहतो. शुद्ध कामाने युक्त व्रजवासियांचा रस असीम (अकुंठ) राहतो आणि या रसाने कृष्णास सर्वाधिक सुख प्राप्त होते.

विजय–याचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–श्रृंगार रसाचे परम रसज्ञ रुद्र म्हणतात की–स्त्रियांची वामता (वक्रता) आणि दुर्लभता (निषेध) आदी ज्या बाधा आहेत, तेच कंदर्पाचे (कामदेवाचे) परम आयुध-स्वरूप आहे. विष्णुगुप्ताने सांगितले आहेत, की जेथे निषेधरूप विशेषता असते आणि मृगनयनी ललना दुर्लभ होऊन जाते, त्याच स्थानी नायकाचे हृदय

अधिक रूपात आसक्त होते. पाहा, रासलीलेच्या समयी कृष्णाने आत्माराम असूनही जितक्या गोपी होत्या, तितक्याच स्वरूपांमध्ये प्रकट होऊन त्यांच्यासोबत लीला केली होती. साधक मात्राने रासलीलेच्या अनुगत असावे. यात विशेष उपदेश हा आहे की जर साधक कल्याणाची इच्छा ठेवतात, तर त्यांनीदेखील भक्ताप्रमाणे त्या लीलेत प्रवेश करावयास हवा. त्यांनी कृष्णाप्रमाणे आचरण कदापि करू नये. तात्पर्य हे आहे की त्यांनी गोपीभावाने गोपींच्या अनुगत होऊनच त्या लीलांमध्ये प्रवेश करावयास हवा.

विजय–कृपया गोपाभावास थोडे अधिक स्पष्ट करण्याची कृपा करावी.

गोस्वामी–नन्दनन्दन कृष्ण–गोप आहेत. ते गोपींच्या अतिरिक्त कुठल्याही दुसऱ्या रमणीसोबत रमण करीत नाहीत. श्रृंगाररसाचे अधिकारी साधकपण ठीक त्याच भावाने कृष्णभजन करतील जशी; गोपींनी श्रीकृष्णाची भजन-सेवा केली आहे. साधक स्वतःस भावनामार्गात व्रजगोपी भावना करून कुण्या सौभाग्यवती व्रजवासिनीची परिचारिका मानून तिच्या निर्देशानुसार राधाकृष्णाची सेवा करतील. स्वतःस 'परोढा' मानल्याशिवाय रसोदय होणे असंभव आहे. हा परोढा अभिमानच व्रजगोपीत्व धर्म आहे. श्रीरूपगोस्वामींनी लिहिले आहे–

**मायाकलिततादृक्--स्त्रीशीलनेनानुसूयिभिः।**
**न जातु व्रजदेवीनां पतिभिः सह संगमः॥**

(उ.नी. ३/३२)

अर्थात परोढा अभिमानयुक्ता व्रजदेवींचा योगमाया-कल्पित त्यांच्या विवाहित पतींसोबत कधी संगम झालाच नाही. अभिसार आदीच्या वेळी योगमाया-कल्पित अगदी तशीच गोपीमूर्ती घरात पाहून गोपगण असे समजत की आपल्या पत्नी घरातच आहेत. म्हणून तशा अवस्थेत त्यांना कृष्णाप्रती ईर्ष्या-द्वेष करण्याचा अवकाशच मिळत नसे.

मायाकल्पित विवाहित पतींसोबत व्रजदेवींचा कधीच संगम झाला नाही; व्रजगोपींचे पतिसमूह केवळ त्या-त्या (गोलोकगत) भावांचे मायावतार मात्र आहेत. त्यांचा विवाहसुद्धा मायिक प्रत्यय (मायिक विश्वास) मात्र आहे–परदारत्व नाही. तथापि परोढात्व अभिमान नित्य वर्तमान असतो. असे न झाल्याने वामता, दुर्लभता,

प्रतिबंधकता, निषेध आणि भय आदींनी उत्पन्न अपूर्व रसोदय कदापि स्वभावतः संभव नाही. तसा अभिमान न राहिल्याने व्रजरसाचा नायिकाभाव प्राप्त केला जाऊ शकत नाही; याचे उदाहरण वैकुण्ठातली लक्ष्मी आहे.

विजय–स्वतःला परोढा जाणण्याचा काय भाव आहे?

गोस्वामी–मी व्रजातल्या एखाद्या गोपगृहात जन्मलेली बालिका आहे. नवयौवन प्राप्त होताच माझा विवाह एखाद्या गोप युवकासोबत झाला आहे, असा विश्वास असल्यानेच कृष्ण-संभोगाची लालसा बलवती होते. अशा प्रकारे स्वतःतच अप्रसूतिका गोपनारीभावाचा आरोप करणेच गोपीभाव आहे.

विजय–जर साधक पुरुष असेल, तर पूर्वोक्त गोपीभावाचा आरोप कसा सिद्ध होऊ शकतो?

गोस्वामी–मायिक स्वभावाच्या पराधीन असल्याने लोक स्वतःस पुरुष समजतात. शुद्ध चित्स्वभावात कृष्णाच्या पुरुष परिकरांस सोडून अन्य सर्व स्त्री आहेत. चिद्गठनात वस्तुतः स्त्री-पुरुष चिन्ह नसल्यावरही स्वभाव आणि दृढ अभिमानवश जे कुणीही व्रजवासिनी असल्याचा अधिकार प्राप्त करू शकतात. ज्यांची मधुररसात रुची होते, तेच केवळ व्रजवासिनी होण्याचे अधिकारी आहेत.

विजय–परोढेचे माहात्म्य काय आहे?

गोस्वामी–जेव्हा परोढा व्रजगोपींच्या हृदयात कृष्ण-संभोगाची लालसा उत्पन्न होते, तेव्हा त्या स्वभावतः सर्वातिशायिनी शोभा आणि सद्गुण-वैभवाची खाण होऊन जातात तथा प्रेमसौंदर्याने मंडित होतात. लक्ष्मी आदी शक्तींपेक्षाही उच्च असे त्यांचे रसमाधुर्य अधिक असते.

विजय–त्या व्रजसुंदरी किती प्रकारच्या असतात?

गोस्वामी–त्या तीन प्रकारच्या असतात–साधनापरा, देवी आणि नित्यप्रिया.

विजय–साधनापरा व्रजसुंदरींमध्येसुद्धा काही भेद असतो का?

गोस्वामी–हो, साधनापरा सुंदरी दोन प्रकारच्या असतात–यौथिकी आणि अयौथिकी.

विजय–यौथिकी कोण आहेत?

गोस्वामी–ज्या व्रजरसाच्या साधनात तत्पर होऊन यूथच्या यूथ (झुंडीच्या झुंडी) व्रजामध्ये जन्म घेतात, त्या यौथिकी अर्थात यूथयुक्त असतात. यौथिकी दोन प्रकारच्या असतात, एक मुनिगण आणि दुसऱ्या उपनिषद्‌गण.

विजय–कोणकोणत्या मुनींनी व्रजामध्ये गोपीजन्म ग्रहण केला होता?

गोस्वामी–जे मुनी गोपालाचे उपासक होते, परंतु सिद्धी प्राप्त करू शकले नव्हते, त्यांनी त्रेतायुगात रामचन्द्राचे सौंदर्य दर्शन करून आपल्या अभीष्ट साधनाचा प्रयत्न केला होता–तेच गोपीभाव ग्रहण करून व्रजामध्ये गोपींच्या रूपात जन्मले. याचा उल्लेख पद्मपुराणात प्राप्त होतो. बृहद्वामन पुराणानुसार त्यांपैकी कुणीकुणी रासाच्या प्रारंभी सिद्धी प्राप्त केली होती.

विजय–उपनिषदांनी कशाप्रकारे व्रजामध्ये गोपी-जन्म प्राप्त केला होता?

गोस्वामी–अतिशय सूक्ष्मदर्शी महोपनिषद्‌गण गोपींचे सौभाग्य दर्शन करून मोठे विस्मित झाले होते. त्यांनी श्रद्धापूर्वक कठोर तपाच्या फलस्वरूप व्रजामध्ये गोपीजन्म प्राप्त केला होता.

विजय–अयौथिकी कोण आहे?

गोस्वामी–जे गोपीभावाप्रती अत्यंत आसक्त होऊन उत्कंठापूर्वक आपल्या स्वाभाविक अनुरागाद्वारे साधन करतात, ते प्राचीना आणि नवीना भेदाने दोन प्रकारच्या अयौथिकी नावाने प्रसिद्ध आहेत. कुणीकुणी एकट्या आणि कुणीकुणी दोन वा तीन अथवा आणखीही अधिक एकत्रित जन्म घेतात. प्राचीना अयौथिकी नित्यप्रिया गोपींसोबत खूप दिवस आधीपासूनच सालोक्य प्राप्त करून असतात. देव-मानव आदी योनींतून नवीनागण व्रजामध्ये येऊन जन्म घेतात आणि क्रमशः प्राचीना होऊन पूर्वोक्त रूपात सालोक्य प्राप्त करतात.

विजय–मी साधनपरासंबंधी समजलो. आता देवींच्या संबंधी सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–जेव्हा कृष्ण स्वर्गात आपल्या अंशाने देवयोनीमध्ये अवतरण करतात, तेव्हा त्यांच्या परितुष्टीकरिता नित्यकांतांचे अंशही तेथे देवींच्या रूपात

प्रकटित होतात. त्या देवीच कृष्णलीलेमध्ये गोपकन्यांच्या रूपात जन्म घेऊन आपल्या अंशिनी नित्यप्रियांच्या प्राण-सख्या होतात.

विजय–प्रभो! कृष्ण कुठल्यावेळी देवयोनीत आपल्या अंशाने जन्म घेतात?

गोस्वामी–कृष्ण स्वांश रूपाने आदितीच्या गर्भात वामनाच्या रूपाने जन्म घेतात आणि विभिन्नांशांनी देवता होतात. शिव आणि ब्रह्माचा मातृगर्भातून जन्म होत नाही. ब्रह्मा आणि शिव त्या साधारण जिवांच्या श्रेणीमध्ये येत नाहीत, ज्यांच्यात पन्नास गुण बिंदू बिंदू रूपात असतात, तरीही ते विभिन्नांशच आहेत. ते पन्नास गुण ब्रह्मा आणि शिवात काही अधिक परिमाणात तर असतातच, अधिकंतु त्यांच्यात आंशिक रूपात पाच गुण आणखी असतात, जे साधारण जीवांमध्ये नसतात. म्हणून या दोहोंस प्रधान देवता म्हटले गेले आहे. गणेश आणि सूर्यसुद्धा त्याच प्रकारे असल्याने ब्रह्मकोटीमध्ये उपासित होतात. दुसरे समस्त देवगण जिवाच्या श्रेणीमध्ये येतात. सर्व देवता कृष्णाचे विभिन्नांश आहेत. त्यांच्या स्त्रिया–देवीसुद्धा चित्-शक्तीचे विभिन्नांश आहेत. ब्रह्माने त्या देवींना कृष्णाच्या आविर्भावाच्या पूर्वीच कृष्णाच्या परितुष्टीकरिता जन्म घेण्याची आज्ञा दिली होती. त्यांच्या आज्ञेनुसार आपल्या रुची आणि साधन भेदाने त्यांच्यातील काही व्रजात आणि काही पुरात (द्वारकेत) जन्म घेतात. व्रजामध्ये जन्म घेतलेल्या देवीच कृष्ण प्राप्तीच्या उत्कंठा हेतू नित्यप्रियांच्या प्राणसखी असतात.

विजय–प्रभो! उपनिषदांनी तर गोपी जन्म प्राप्त केला होता, परंतु कृपया हे सांगा की वेदांची कुठली दुसरी अधिष्ठात्री देवीसुद्धा व्रजामध्ये जन्म ग्रहण करते?

गोस्वामी–पद्मपुराणाच्या सृष्टिखंडामध्ये असे लिहिले आहे की वेदमाता गायत्रीनेही गोपी जन्म घेऊन श्रीकृष्णाचा संग प्राप्त केला होता. त्याचवेळेपासून त्यांनी कामगायत्रीचे रूप धारण केले आहे.

विजय–कामगायत्री अनादी नाही काय?

गोस्वामी–कामगायत्री निश्चितच अनादी आहेत. त्या अनादी गायत्री आधी वेदमाता गायत्रीच्या रूपात प्रकटित होत्या. नंतर साधन प्रभावाने तथा अन्यान्य उपनिषदांचे सौभाग्य पाहून गोपालोपनिषदासोबत व्रजामध्ये जन्म घेतला. कामगायत्रीच्या रूपात नित्य असूनही वेदमाता गायत्रीच्या रूपात नित्य पृथक

विराजमान आहेत.

विजय–उपनिषद् आदी सर्वांनी व्रजामध्ये जन्म घेऊन स्वतःस गोपकन्येचा अभिमान केला आणि कृष्णास गोपनायकाच्या अभिमानाने आपला पती स्वीकारले. कृष्ण गान्धर्व-विवाहाच्या रितीने त्यांचे तात्कालिक पती झाले–या गोष्टीसही समजलो, परंतु कृष्णाच्या नित्य प्रियागण अनादी काळापासूनच कृष्णाच्या संगिनी आहेत, मग कृष्ण त्यांचे जे उपपती होतात, तो संबंध काय केवळ मायाकल्पितच असतो का?

गोस्वामी–एका प्रकाराने मायाकल्पितच आहे, परंतु जडमायाकल्पित नाही. जडमाया कृष्णलीलेस स्पर्शही करू शकत नाही. व्रजलीला प्रपंचाच्या आत असूनही ती संपूर्ण रूपाने जडमायातीत आहे. चित्-शक्तीचे दुसरे नाव–योगमाया आहे. ती योगमायाच कृष्णलीलेमध्ये एक असा व्यापार प्रकट करते की जडमायाग्रस्त द्रष्टा कृष्णलीलेचे दुसऱ्या रूपात दर्शन करतो. तीच गोलोकस्थित परोढा अभिमानास नित्य प्रियागणांसोबत व्रजात आणून त्यास पृथक सत्त्बाचे रूप देते. मग त्या सत्त्वांसोबत (गोलोकाचे अभिमानसमूह जे अभिमन्यू आदींच्या रूपात व्रजात स्थूल मूर्तीत प्रकटित आहेत) नित्य प्रियांचा विवाह संपन्न करवून कृष्णास उपपती बनविते. सर्वज्ञ पुरुष आणि सर्वज्ञ शक्ती आपापल्या रसाच्या आवेशात उपरोक्त भावांस स्वीकार करतात. यामुळे रसाचा उत्कर्ष आणि स्वेच्छामयाच्या इच्छाशक्तीची परमोत्कर्षता लक्षित होते, वैकुण्ठ आणि द्वारकेत तसा उत्कर्ष नसतो. प्राणसखींना नित्यप्रियांसोबत सालोक्य प्राप्त झाल्यावर त्यांचा कृष्णाप्रती संकुचित पतिभाव उदार होऊन उपपतिभाव होऊन जातो. तोच त्यांचा परम लाभ आहे.

विजय–खूपच अपूर्व सिद्धांत आहे. हृदय शीतल झाले. आता कृपा करून नित्य प्रियांसंबंधी सांगावे.

गोस्वामी–तुझ्यासारखा अधिकारी श्रोता मिळाला नसता तर श्रीगौरचन्द्रांनी माझ्या मुखातून इतकी गूढ तत्त्वे प्रकाशित करविली असती का? पाहा, श्रीजीवगोस्वामींनी याविषयी ठिकठिकाणी मोठ्या रहस्यपूर्ण पद्धतीने विचार केला आहे. त्यांच्या टीका तथा कृष्णसन्दर्भ आदी ग्रंथांस वाचल्याने जाणू शकतो. अनधिकारी व्यक्ती या परम गूढतम तत्त्वांस जाणून नंतर विकृत धर्माचा आश्रय घेतील, या भीतीने श्रीजीव गोस्वामी सर्वकाळ चिंतित राहात असत. आजकाल

रसविकृती आणि रसाभास आदी दोषसमूह ज्यास वैष्णवप्राय लोकांमध्ये पाहिले जातात, त्याची श्रीजीव गोस्वामींना त्याचवेळी आशंका आली होती. इतके सावधान होऊनही ते त्या अनिष्टापासून रक्षण करू शकले नाहीत. तू या सिद्धांतास उपयुक्त पात्राच्या अतिरिक्त दुसऱ्यांसमोर कधीच सांगू नकोस. आता नित्य प्रियांसंबंधी सांगतो.

विजय–नित्यप्रिया कोण आहेत? यद्यपि मी अनेक शास्त्रांचे अध्ययन केले आहे, तरीही श्रीगुरुदेवांच्या मुखारविंदातूनच (मुखकमलातूनच) या सुधेचे पान करू इच्छितो.

गोस्वामी–नित्य प्रियागण व्रजामध्ये कृष्णाप्रमाणे सौंदर्य विदग्ध आदी गुणांचा आश्रय घेतात. यांत राधा आणि चन्द्रावली मुख्य आहेत. ब्रह्मसंहितेमध्ये यासंबधी लिहिले आहे–

**आनन्दचिन्मयरसप्रतिभाविताभिस्ताभिर्य एव निजरूपतयाकलाभिः।**
**गोलोक एव निवसत्यखिलात्मभूतो गोविन्दमादि पुरुषं तमहं भजामि॥**

(ब्र. सं. ५/३७)

सच्चिदानंदरूप परतत्त्वाचा आनंदांश जेव्हा चित्-अंशास क्षोभित करतो तेव्हा त्यापासून वेगळ्या झालेल्या ल्हादिनी प्रतिभेद्वारे भावित होऊन श्रीमती राधिका आदी ज्या समस्त ललना प्रकट होतात, त्यांच्यासोबत आणि आपले रूप अर्थात चित्-स्वरूपाद्वारे सिद्ध चौसष्ट कला, सर्वांसोबत आखिलात्मभूत होऊनही जे नित्य गोलोकधामात निवास करतात, मी त्या गोविन्दाचे भजन करतो. वेदांच्या सार स्वरूप या ब्रह्मवाक्यात नित्य प्रियांचा उल्लेख मात्र आहे. त्या नित्य आहेत अर्थात देश आणि कालातीत अशा चित्-शक्तीचा प्रकाश आहेत–हे सत्य आहे. चौसष्ट कलांच त्यांची नित्यलीला आहे. "कलाभिः स्वांशरूपाभिः शक्तिभिः" या टीकेद्वारे दुसऱ्या प्रकारचा अर्थ होऊनही मी श्रीस्वरूप दामोदर गोस्वामीकृत अर्थच सांगितला आहे. हाच त्यांचा नितांत गूढार्थ आहे आणि श्रीरूप-सनातन तथा श्रीजीवाच्या हृदय-संपुटात लपलेले गुप्त धन आहे.

विजय–नित्य प्रियांच्या नावांस वेगवेगळे ऐकण्याची मोठी उत्कंठा होते आहे.

गोस्वामी–स्कन्दपुराण तथा प्रल्हादसंहिता आदी शास्त्रांमध्ये राधा, चन्द्रावली, विशाखा, ललिता, श्यामा, पद्मा, शैब्या, भद्रिका, तारा, विचित्रा, गोपाली, धनिष्ठा, पाली आदींच्या नावांचा उल्लेख आहे. चन्द्रावलीचे दुसरे नाव सोमाता आहे तथा श्रीमती राधिकेचे दुसरे नाव गान्धर्वा आहे. खंजनाक्षी, मनोरमा, मंगला, विमला, लीला, कृष्णा, शारी, विशारदा, तारावली, चकोराक्षी, शंकरी आणि कुंकुमा आदी व्रजांगनासुद्धा लोकप्रसिद्ध आहेत.

विजय–यांचा परस्पर संबंध काय आहे?

गोस्वामी–या गोपी यूथेश्वरी आहेत. यूथ एक दोन नाहीत तर शेकडो आहेत. या युथांमध्ये वरांगनाची संख्यासुद्धा लाखोंनी आहे. श्रीमती राधेपासून ते कुंकुमेपर्यंत सर्वच्या सर्वच यूथाधिपती म्हणविल्या जातात. विशाखा, ललिता, पद्मा आणि शैव्या यांचे प्रोह्य भावाने (अधिकतेने) वर्णन केले गेलेले आहे. या यूथेश्वरींमध्ये राधा आदी आठ गोपी अधिक सौभाग्यवती असल्याने 'प्रधान' म्हणविल्या जातात.

विजय–विशाखा, ललिता,पद्मा आणि शैव्या–या प्रधान गोपी आहेत आणि कृष्णाच्या लीलापुष्टीमध्ये विशेष पटू आहेत, यांना स्पष्टपणे यूथेश्वरी का म्हटलेले नाही?

गोस्वामी–या जशा गुणवती आहेत, त्यामुळे त्यांना यूथेश्वरी म्हणणे योग्य होते, परंतु श्रीमती राधिकेच्या परमानंदमय भावाप्रती ललिता आणि विशाखा इतक्या मुग्ध राहतात की त्या स्वतःस स्वतन्त्र यूथेश्वरी म्हणवू इच्छित नाहीत. यापैंकी कुणी-कुणी श्रीमती राधेच्या अनुगत असतात आणि कुणी कुणी चन्द्रावलीच्या.

विजय–मी ऐकले आहे की ललितेचा गण आहे, तो कशा प्रकारचा आहे?

गोस्वामी–श्रीमती राधा समस्त यूथेश्वरींमध्ये प्रधान आहेत. त्यांच्या अधीन यूथातील काही गोपी श्रीललितेच्या एखाद्या विशेष भावाप्रती आकृष्ट होऊन स्वतःस ललितेचा गण म्हणवितात आणि त्याचप्रकारे काही गोपी स्वतःस विशाखा आदींचा गण म्हणवितात. ललिता, विशाखा आदी अष्टसख्या श्रीमती राधिकेच्या वेगवेगळ्या गणनायिका आहेत. मोठ्या भाग्याने श्रीमती ललितेच्या गणामध्ये प्रवेशाधिकार प्राप्त होतो.

विजय–या गोपींची नावे कोणकोणत्या शास्त्रांमध्ये दिसून येतात?

गोस्वामी–पद्मपुराण, स्कन्दपुराण, भविष्योत्तर आदी शास्त्रांमध्ये यांची नावे प्राप्त होतात. सात्त्वततंत्रातही अनेक नावे प्राप्त होतात.

विजय–'श्रीमद्भागवत' जगात शास्त्र-शिरोमणी आहे. जर श्रीमद्भागवतात यांच्या नावांचा उल्लेख असता तर मोठ्या आनंदाची गोष्ट असती.

गोस्वामी–श्रीमद्भागवत तत्त्वशास्त्र असूनही रसाचा समुद्र आहे. रसिक लोकांच्या विचार-दृष्टीने श्रीमद्भागवतात रसतत्त्वाचा संपूर्ण विचार घागरीत सागराप्रमाणे भरून ठेवलेला आहे. यात श्रीराधेचे नाव आणि समस्त गोपींचे भाव तथा परिचयाचे वर्णन मोठ्याच गूढ रूपात केलेले आहे. जर तू दशमस्कंधाच्या पद्यांचा यथायोग्य विचार करशील, तर त्यात सर्वकाही प्राप्त करू शकतोस. श्रीशुकदेव गोस्वामींनी अनधिकारी व्यक्तींस दूर ठेवण्याकरिता गूढ रूपाने या विषयाचे वर्णन केलेले आहे. विजय! एक नामाची माळ आणि दोन-चार आलंकारिक सजविलेल्या गोष्टी ज्याला त्याला देण्याचे काय फळ आहे? पाठक जितक्या उन्नत विचारांचा असतो, तो तितक्याच गूढ गोष्टी समजू शकतो. म्हणूनच जो विषय सर्वांसमोर प्रकट करण्याच्या योग्य नाही त्यास गूढपणे प्रकट करणेच पांडित्य आहे. अधिकारी व्यक्ती आपल्या अधिकारानुसार तितक्यातूनच पूर्णपणे सार ग्रहण करू शकतात. श्रीगुरूपरंपरेशिवाय वस्तुतत्त्वाचे ज्ञान होत नाही. येनकेन प्रकारे ते जाणूनही त्यातून काहीच साध्य होत नाही. उज्ज्वलनीलमणीस यथायोग्य समजल्याने श्रीमद्भागवतातच संपूर्ण रस प्राप्त करू शकशील.

अशा प्रकारे खूपवेळपर्यंत जिज्ञासा आणि उत्तरानंतर त्यादिवशीचा इष्ट वार्तालाप समाप्त झाला. विजय श्रवण केलेल्या विषयाचे चिंतन करीतकरीत वासस्थानी परतले. नायक-नायिकेसंबंधी विचारसमूह त्यांच्या मानसक्षेत्री उदित होऊन त्यांना परमानंदाने विभोर करीत होते. वंशी आणि स्वंयदूतीची गोष्ट स्मरण करून त्यांच्या नेत्रांतून अश्रुधारा प्रवाहित होत होत्या. आदल्या रात्री सुन्दराचली जाता जाता त्यांनी उपवनात जी लीला पाहिली होती, ती लीला यावेळी त्यांच्या चित्तपटलावर स्पष्टपणे उदित झाली होती.

**॥ बत्तीसावा अध्याय समाप्त ॥**



# तेहेतीसावा अध्याय (मधुररस-विचार)

आज विजयकुमार आणि ब्रजनाथाने इन्द्रद्युम्न सरोवरात स्नान करून घरी परतल्यानंतर सोबतच प्रसाद् घेतला. भोजनानंतर ब्रजनाथ श्रीहरिदास ठाकूरांच्या समाधीचे दर्शन करण्याकरिता निघून गेले. विजयकुमार श्रीराधाकान्त मठात श्रीगुरुदेवांच्या चरणी उपस्थित झाले आणि वेळ पाहून त्यांच्याकडे श्रीमती राधिकेच्या कथेची जिज्ञासा केली. विजयने विचारले–प्रभो! श्रीवृषभानुनन्दिनीच आम्हा सर्वांची प्राण स्वरूपा आहे. सांगू शकत नाही, न जाणो का श्रीराधिका नाम ऐकल्याने माझे हृदय द्रवित होऊन जाते. यद्यपि श्रीकृष्णच आपली एकमात्र गती आहे तथापि श्रीराधिकेसोबत त्यांचा जो लीला-विलास असतो, त्याचेच आस्वादन करणे मला फार आवडते. ज्या कृष्ण-कथेत श्रीमती राधिकेचे नाम नसते, राधिकेच्या लीलाकथा नसतात, त्या कथाच ऐकण्याची इच्छा होत नाही. प्रभो! काय सांगू, मला विजयकुमार भट्टाचार्य नावाने आपला परिचय देणे आता जरादेखील आवडत नाही. मला तर आता स्वतःस श्रीराधिकेची पाल्यदासी म्हणविण्यातच आनंद् वाटतो. एक आणखी विचित्र गोष्ट ही आहे की आता मला कृष्ण-बहिर्मुख लोकांकडे ब्रजाची लीलाकथा सांगण्याची इच्छा होत नाही. अरसिक मनुष्य जेथे श्रीराधाकृष्णाचे माहात्म्य वर्णन करतात, त्या लोकांतून उठून निघून जाण्याची इच्छा होते.

गोस्वामी–तू धन्य आहेस! स्वतःस जोपर्यंत संपूर्ण रूपाने ब्रजरमणी होण्याचा विश्वास होत नाही, तोपर्यंत श्रीराधाकृष्णाच्या लीला-विलास कथांमध्ये अधिकार होत नाही. पुरुषांची तर गोष्टच काय, कुठल्या देवीचाही श्रीराधाकृष्णाच्या कथांमध्ये अधिकार नाही. विजय! मी तुझ्याकडे ज्या कृष्णाच्या प्रियांच्या संबंधी चर्चा केली, त्यात राधा आणि चन्द्रावली सर्वांत प्रधान आहेत. या दोहोंचे कोटींच्या संख्येने नवयुवतींचे यूथ (समूह) आहेत. महारासाच्या वेळी शत-कोटी ललनांनी रासमंडळात योगदान करून रासमंडळाची शोभा वाढविली होती.

विजय–प्रभो! चन्द्रावलीचे कोट्यवधी यूथ आहेत, ते असोत. मला तर आपण कृपा करून श्रीमती राधेचे माहात्म्य श्रवण करवून माझ्या दूषित कानांस शुद्ध आणि रसपूर्ण करावे. मी आपल्याला शरण आलो आहे.

गोस्वामी–अहा विजय, राधा आणि चन्द्रावलीमध्ये श्रीराधा महाभावस्वरूपा आहेत, म्हणूनच त्या सर्व गुणांमध्ये आणि सर्व विषयांमध्ये चन्द्रावलीपेक्षा श्रेष्ठ सरस आहेत. पाहा, तापनी श्रुतींमध्ये त्यांना 'गान्धर्वा ' असे म्हटले गेलेले आहे. ऋक्च्या परिशिष्टात राधेसोबत माधवाच्या अतिशय उज्ज्वलतेचे वर्णन आहे. पद्मपुराणातही नारद म्हणतात–श्रीमती राधा ज्याप्रमाणे कृष्णास अत्यंत प्रिय आहेत, त्यांचे कुंडही कृष्णास तितकेच प्रिय आहे. साऱ्या गोपींपेक्षाही श्रीराधाराणी कृष्णास अधिक प्रिय आहेत. का नसाव्यात? राधातत्त्व किती अपूर्व चमत्कारपूर्ण तत्त्व आहे? भगवंताच्या समस्त प्रकारच्या शक्तींमध्ये 'ल्हादिनी' नामक जी सर्वश्रेष्ठ महाशक्ती आहे, राधिका त्या ल्हादिनीचेही सार-स्वरूप महाभावस्वरूपा आहेत.

विजय–अपूर्व तत्त्व! आता राधेचे स्वरूप सांगा.

गोस्वामी–श्रीमती सर्वदा सुष्ठुकांत स्वरूपा, सोळा श्रृंगार धारण करणारी आणि बारा आभरणांनी विभूषित आहेत अर्थात–राधा सोळा श्रृंगार आणि द्वादश आभूषणांच्या शोभेने सुशोभित परम सुंदरी आहेत.

विजय–सुष्ठुकांतस्वरूपा कोणास म्हणतात?

गोस्वामी–स्वरूपाची सुंदरता इतकी अधिक असते की त्या सुंदरतेमध्ये श्रृंगार अलंकारांची आवश्यकता नसते. संकुचित केश-कलाप, चंचल वदनकमल, मोठमोठे नेत्र आणि वक्षदेशी सुंदर कुचद्वय अपूर्व शोभेचा विस्तार करतात. बारीक कंबर, थोडेसे झुकलेले दोन सुंदर खांदे आणि नखरूपी रत्नांनी सुशोभित करपल्लव स्वरूपाच्या सुंदरतेत आणखीच भर घालतात. त्रिजगतात या रूपाची तुलना कुणासोबतही होणे अशक्य.

विजय–सोळा श्रृंगार कोणकोणते आहेत?

गोस्वामी–स्नान, नासिकेच्या अग्रभागी रत्नाची उज्ज्वलता, नील वसन धारण, कटिप्रदेशात नीवी (कमरबंध, मेखला), वेणी, कानांमध्ये उत्तंस (डूल), अंगांना चंदन-लेपन, केसांमध्ये पुष्पविन्यास, गळ्यात माळा, हातात लीलाकमळ, मुखात तांबूल, चिबुकावर (हनुवटीवर) कस्तुरीबिंदू, नेत्रांमध्ये काजळ, गुलाबी गालांवर मृगमदाद्वारे रचित चित्र, चरणांमध्ये अलक्त (अलता) आणि ललाटावर

तिलक–हे सोळा श्रृंगार आहेत. श्रीमती राधिका या सोळा श्रृगांरांनी सर्वदा सुशोभित राहतात.

विजय–बारा आभरण कोणकोणते आहेत?

गोस्वामी–अंबाड्यात माळलेले अपूर्व उज्ज्वल रत्न (शीषफूल), कानांमध्ये स्वर्णकुंडल, नितंबावर स्वर्ण निर्मित कंबरपट्टा, गळ्यात सोन्याचा हार, कानात वेली आणि स्वर्ण-शलाका, हातात कंकण, कंठात कंठभूषा, बोटांमध्ये अंगठ्या, गळ्यात ताराहार, भुजांमध्ये बाजूबंद, चरणांमध्ये रत्नांचे नूपुर आणि पायाच्या बोटांमध्ये जोडवी–ही द्वादश आभरणे श्रीराधेच्या अंगावर सुशोभित असतात.

विजय–श्रीराधेच्या प्रमुख गुणांस सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–श्रीकृष्णाप्रमाणे श्रीमती राधेचेही असंख्य गुण आहेत. यांत २५ गुण मुख्य आहेत–

(१) त्या मधुरा अर्थात दिसण्यास अनुपम सुंदरी आहेत.
(२) नवयुवती अर्थात किशोरवयीन आहेत.
(३) चंचल दृष्टी किंवा चंचल कटाक्ष असणाऱ्या आहेत.
(४) उज्ज्वल मृदुमधुर हास्यकारिणी आहेत.
(५) सुंदर सौभाग्यास सूचित करणाऱ्या रेखांनी युक्त आहेत.
(६) आपल्या अंग-गंधानी कृष्णासही उन्मत्त करणाऱ्या आहेत.
(७) संगीत विद्येमध्ये पारदर्शिनी आहेत.
(८) रम्यवाक् अर्थात मधुरवाणी बोलणाऱ्या आहेत.
(९) नर्मपंडिता अर्थात परिहास करण्यात कुशल आहेत.
(१०) विनीता आहेत.
(११) करुणापूर्ण अर्थात दयाळू आहेत.
(१२) विदग्धा अर्थात चतुरा आहेत.
(१३) सर्व कार्यांमध्ये चातुरीयुक्ता आहेत.
(१४) लज्जाशीला आहेत.
(१५) सुमर्यादा अर्थात साधुमार्गावर अटळ राहणाऱ्या आहेत.
(१६) धैर्यशालिनी आहेत.

(१७) गंभीर आहेत.

(१८) सुविलासा अर्थात सुविलास प्रिय आहेत.

(१९) महाभावाच्या परमोत्कर्षास प्रकट करण्यात परम व्यग्रा आहेत.

(२०) गोकुल-प्रेमवसति अर्थात त्यांना पाहताच गोकुळवासियांच्या हृदयात प्रेम उत्पन्न होते.

(२१) अखिल ब्रह्मांडात त्यांची कीर्ती व्याप्त आहे.

(२२) गुरुजनांच्या स्नेहास पात्र आहेत.

(२३) सखींच्या प्रणयाधीन आहेत.

(२४) कृष्णाच्या सर्व सखींमध्ये प्रधान आहेत.

(२५) केशव सर्वदा त्यांच्या आज्ञेच्या अधीन राहतात.

विजय–चारुसौभाग्य–रेखांस विस्तारपूर्वक जाणू इच्छितो.

गोस्वामी–वराहसंहिता, ज्योतिषशास्त्र, काशीखण्ड आणि मत्स्य, गरुडादी पुराणांनुसार सौभाग्याच्या या रेखा असतात–

(१) वाम (डाव्या) चरणाच्या अंगठ्याच्या मुळाशी जव-रेखा, (२) त्याखाली चक्र, (३) मध्यमेखाली कमळ. (४) कमळाखाली ध्वजा, (५) तेथेच पताका, (६) मध्यमेच्या दक्षिणेपासून मध्यचरणापर्यंत उर्ध्वरेखा, (७) कनिष्ठेखाली अंकुश.

पुनः (१) दक्षिण (उजव्या) चरणाच्या अंगठ्याच्या मुळाशी शंख, (२) टाचेवर मत्स्य (मासा), (३) कनिष्ठेखाली वेदी, (४) मत्स्याच्या वरती रथ, (५) पर्वत, (६) कुंडल, (७) गदा, (८) शक्तिचिन्ह.

डाव्या हातावर–(१) तर्जनी आणि मध्यमेच्या संधिस्थानापासून कनिष्ठेच्या खालपर्यंत परमायू रेखा, (२) त्याच्याखाली हातापासून आरंभ होऊन तर्जनी आणि अंगठ्याच्या मध्यदेशामध्ये दुसरी रेषा, (३) अंगठ्याखाली मणिबंधापासून निघून वक्रगतीने मध्यरेषेस मिळून तर्जनी आणि अंगठ्याच्या मध्यभागाच्या अन्यरेखा (४-८) बोटांच्या पुढच्या भागात नंद्यावर्तरूप अर्थात पाच वक्राकार चिन्ह, एकूण आठ झाले (९) अनामिकेखाली कुंजर (हत्ती), (१०) परमायू रेषेखाली अश्व (घोडा), (११) मध्यरेषेखाली वृष (बैल), (१२) कनिष्ठेखाली अंकुश, (१३) पंखा, (१४) श्रीवृक्ष, (१५) यूप (जय-स्तंभ), (१६) बाण, (१७) तोमर (भाला), (१८) माला.

उजव्या हातात डाव्या हाताप्रमाणे परमायू आदी तीन रेषा, बोटांच्या पुढच्या भागात पाच शंख, एकूण आठ, (९) तर्जनीखाली चामर, (१०) कनिष्ठेखाली अंकुश, (११) प्रासाद, (१२) दुंदुभी, (१३) वज्र, (१४) दोन शकट, (१५) धनुष्य, (१६) तलवार, (१७) भृंगार (पाणी पिण्याचे पात्र.)

डाव्या पायात सात, उजव्या पायात आठ, डाव्या हातात अठरा आणि उजव्या हातात सतरा, अशी एकूण पन्नास चिन्हे सौभाग्य-रेषांची आहेत.

विजय–काय हे गुण दुसऱ्यांमध्ये संभव नाहीत?

गोस्वामी–जिवात हे गुण बिंदू बिंदू रूपात आहेत. श्रीराधिकेमध्ये हे गुणसमूह पूर्ण रूपात आहेत. देवींमध्ये अन्य जीवांपेक्षा काही अधिक परिमाणात असतात. श्रीराधिकेचे सारे गुण अप्राकृत आहेत, कारण प्राकृत जगात कोणातही हे गुणसमूह विशुद्ध आणि पूर्ण रूपात नाहीत. गौरी आदींमध्येही या गुणांची स्थिती शुद्ध आणि पूर्ण रूपात नसते.

विजय–अहा! श्रीमती राधिकेचे गुण अचिंत्य आहेत. त्यांच्या कृपेनेच या गुणांचा अनुभव केला जाऊ शकतो.

गोस्वामी–त्यांच्या गुणांचा महिमा काय सांगू, स्वयं कृष्णसुद्धा ज्या रूपास आणि गुणास पाहून सर्वदा मोहित होतात, त्याची तुलना कुठे आहे?

विजय–प्रभो! कृपया आता श्रीमती राधिकेच्या सखींसंबधी सांगावे.

गोस्वामी–श्रीमती राधिकेचा यूथच सर्वश्रेष्ठ आहे. या यूथातील सगळ्या ललना समस्त सद्गुणांनी विभूषित असतात. त्या आपल्या गुणांनी–विलासविभ्रमाने साक्षात कृष्णासही आकर्षित करतात.

विजय–श्रीमती राधेच्या सख्या किती प्रकारच्या आहेत?

गोस्वामी–पाच प्रकारच्या असतात–(१) सखी, (२) नित्यसखी, (३) प्राणसखी, (४) प्रियसखी, (५) परमश्रेष्ठसखी.

विजय–सखी कोण आहेत?

गोस्वामी–कुसुमिका, वृन्दा, धनिष्ठा–या सखी आहेत.

विजय–नित्यसखी कोण आहेत?

गोस्वामी–कस्तूरी, मणिमंजरी आदी नित्यसखी आहेत.

विजय–प्राणसखी कोणकोण आहेत?

गोस्वामी–शशिमुखी, वासन्ती, लासिका आदी प्राणसखी आहेत. त्याना साधारणतः वृन्दावनेश्वरीची स्वरूपता प्राप्त असते.

विजय–प्रियसखी कोण आहेत?

गोस्वामी–कुरंगाक्षी, सुमध्या, मदनालसा, कमला, माधुरी, मंजुकेशी, कन्दर्पसुन्दरी, माधवी, मालती, कामलता, शशिकला आदी प्रियसखी आहेत.

विजय–परमश्रेष्ठसखी कोण-कोण आहेत?

गोस्वामी–ललिता, विशाखा, चित्रा, चम्पकलता, तुंगविद्या, इन्दुलेखा, रंगदेवी, सुदेवी–या आठ प्रधान आणि परमश्रेष्ठसखी आहेत, या राधाकृष्णाच्या प्रेमाच्या पराकाष्ठायुक्त असतात. कधी कृष्णाच्या प्रती आणि कधी राधेच्या प्रती अधिक प्रेम प्रदर्शन करून राधाकृष्णास संतुष्ट करतात.

विजय–यूथास समजलो. आता गणासंबधी सांगावे.

गोस्वामी–प्रत्येक युथामध्ये पुनः अनेक विभाग असतात, त्या विभागांस गण म्हणतात. जसे–श्रीमतीच्या यूथामध्ये ललितेच्या अनुगत सख्या ललितेचे गण आहेत.

विजय–व्रजांगनांचा परोढाभाव एक महत् गुण आहे, परंतु हा परोढाभाव कुठल्या स्थानी इष्ट बाधक होत नाही?

गोस्वामी–या जडजगात जे स्त्रीत्व आणि पुरुषत्व आहे, ते औपाधिक आहे. मायिक कर्मफलानुसार कुणी अजूनही स्त्री आहे, कुणी पुरुष आहे. मायेमध्ये अनेक अधर्म आणि तुच्छ स्पृहा असतात. म्हणून ऋषींनी शास्त्रविधीने विवाहित स्त्रीस सोडून दुसऱ्या स्त्रियांचा संग करण्यास निषेध केला आहे. यास धर्मसंगत

समजाविण्याकरिता कवींनी जडालंकारामध्ये परोढास सोडले आहे. चिद्विलास रसच नित्यरस आहे. त्या नित्यरसाचे क्षुद्र-प्रतिफलनच मायिक स्त्री-पुरुषगत श्रृंगाररस आहे. म्हणूनच जडीय श्रृंगाररस अत्यंत सीमित आणि विधीच्या अधीन असतो. म्हणून प्राकृत क्षुद्र नायिकेसंबंधी परोढा-भावास सोडले आहे, परंतु जेथे सच्चिदानन्द श्रीकृष्णच एकमात्र पुरुष अर्थात नायक आहेत, तेथे रस-पुष्टीकरिता जे परोढा-मिलन होते, तो निंदेचा विषय नसतो. या तत्त्वात अत्यंत क्षुद्र मायिक उपाधिस्वरूप विवाह विधीचे स्थान नाही. ते गोलोकविहारी जेव्हा आपल्या परम पारकीय रसास प्रपंचात गोकुळासोबत प्रकाशित करतात, तेव्हा गोकुळाच्या ललनांच्या विषयी जड अलंकारगत परोढानिंदा लागू होत नाही.

विजय–गोकुळाच्या ललनांमध्ये जे कृष्णप्रेम असते, त्यात कोणकोणती उत्कृष्ट चिन्हे प्रकाशित होतात?

गोस्वामी–गोकुळाच्या ललनांचे कृष्णात केवळ नन्दनन्दनत्वच स्फुरित होते, अर्थात त्या कृष्णास केवळ नन्दनन्दनाच्या रूपात ग्रहण करतात. त्या निष्ठेने जे सर्व भाव आणि मुद्रा उदित होतात, त्या अभक्त तार्किक लोकांची गोष्टच काय, तर भक्तांकरितासुद्धा दुर्गम असतात. नन्दनन्दनात ऐश्वर्यभावाचा अभाव नसतो, परंतु माधुर्याच्या अधिकतेमुळे सर्वसाधारणपणे लपलेला असतो. ज्यावेळी परिहास करताना कृष्णाने विरह-व्याकूळ गोपींसमोर आपले द्विभुज रूप लपवून आपल्या चतुर्भुज रूपास प्रकाशित केले, तेव्हा गोपींनी त्या चतुर्भुज रूपाचा आदर केला नाही. मग ते चतुर्भुज रूप श्रीराधिकेच्या समोर येताच लुप्त झाले आणि द्विभुजरूप प्रकट झाले. हे सर्व श्रीराधेच्या निगूढ पारकीय रसभावाचेच फळ आहे.

विजय–धन्य झालो! प्रभो! आता नायिकेचे भेद सांगावेत.

गोस्वामी–नायिका तीन प्रकारच्या असतात–स्वकीया, परकीया आणि सामान्या. चित्-रसाच्या स्वकीया आणि परकीयांसंबंधी आधीच सांगितले आहे. यावेळी सामान्यांसंबंधी सांगतो आहे. जडालंकारिक पंडितांनी निश्चय केला की सामान्या नायिका वेश्या असतात, त्या केवळ अर्थलोभी असतात. गुणहीन नायकाचा द्वेष आणि गुणी नायकावर त्या प्रेम करत नाहीत, त्यांना केवळ अर्थच प्रिय असतो. म्हणून त्यांचा श्रृंगार केवळमात्र श्रृंगाराचा आभास असतो–वास्तविक श्रृंगार नसतो. परंतु मथुरेची सैरंध्री कुब्जा सामान्या नायिका असल्याने तिच्यात कृष्णासंबंधी

श्रृंगाररसाचा अभाव असूनही एखाद्या प्रकारची भावयोग्यता असल्याने तिला आपण पारकीयाच्या अंतर्गतच मानतो.

विजय–ती भावयोग्यता काय आहे?

गोस्वामी–कुब्जा जोपर्यंत कुरूप होती, तोपर्यंत तिची अन्यत्र कुठेही रती नव्हती. कृष्णाच्या रूपाने दर्शन करून तिच्या हृदयात जी कृष्णाच्या अंगास चंदन लावण्याची स्पृहा निर्माण झाली, तोच तिचा प्रियत्व भाव आहे. त्यामुळे तिला परकीया म्हटले जाऊ शकते. परंतु पट्ट-महिषींसारखी कृष्णास सुख प्रदान करण्याची कामना कुब्जेमध्ये उदित झाली नव्हती. म्हणूनच तिची रती महिषींच्या रतीपेक्षा न्यून जातीय आहे, म्हणून तिने कृष्णाच्या उत्तरीय वस्त्रास खेचत त्यांच्याकडे रतीची प्रार्थना केली होती. प्रियत्व भावासोबत स्वार्थभावनेचे संमिश्रण असल्याने तिची रती साधारणी होती.

विजय–चित्-रसामध्ये स्वकीया आणि परकीया नायिका-भेद झाले. आता यांपैकी आणखी कुठल्या प्रकारचा भेद असेल तर कृपया सांगावे.

गोस्वामी–चित्-रसामध्ये स्वकीया आणि परकीया दोन्ही प्रकारच्या नायिकाच मुग्धा, मध्या आणि प्रगल्भा अशा तीन-तीन प्रकारच्या असतात.

विजय–प्रभो! आपल्या कृपेने आता चित्-रसाची स्फूर्ती झाल्यावर मला असे वाटते की आपण व्रजांगना आहात, मग मायिक पुरुष भाव न जाणो कुठे निघून जातो, त्याची मला जरासुद्धा जाणीव होत नाही. आता मला नायिकांचे भाव-भेद जाणण्याची अत्यंत उत्सुकता होत आहे. कारण रमणी-भाव प्राप्त करूनही मी उपयुक्त क्रियावान होऊ शकत नाही. म्हणून आपल्यात तीच भावना अंकित करून कृष्णसेवा करण्याकरिता आपल्या चरणकमळी जिज्ञासा करतो आहे. सांगावे की मुग्धा कोण आहे?

गोस्वामी–मुग्धाची लक्षणे ही आहेत–ती नवयौवना, कामिनी, रतिदानात वामा, सख्यांच्या वशीभूता, रतिचेष्टेमध्ये अतिशय लज्जायुक्ता, आणि तसेच गोपन रूपात (दुसऱ्यांच्या दृष्टीपासून लपून) सुंदर रूपात यत्नशील असते. नायक अपराधी असल्यावर ती सजल नयनांनी नायकास पाहतात, प्रिय-अप्रिय काहीही बोलत नाहीत, मानही करीत नाहीत.

विजय–मध्या कशी असते?

गोस्वामी–मध्येची लक्षणे ही आहेत की–तिच्यात मदन आणि लज्जा दोन्ही समानपणे असतात. ती नवयौवना असते, तिच्या बोलण्यात थोडी-थोडी प्रगल्भता असते. सुरत क्रियेमध्ये (संभोगामध्ये) मोह अर्थात मुर्च्छासुद्धा अनुभव होते, मानसमयी कधी मृदू आणि कधी कर्कशा होते. मानसमयी मध्या नायिका तीन प्रकारची असू शकते–धीरा, अधीरा आणि धीराधीरा. जी नायिका अपराधी प्रिय नायकासोबत परिहास करीत वक्रोक्ती करते, ती धीरा मध्या आहे. जी नायिका क्रोधपूर्वक आपल्या प्रिय वल्लभाचा कर्कश वाणीने निषेध करते, ती अधीरा मध्या आहे आणि जी नायिका अश्रुपूर्ण नयनांनी प्रिय वल्लभाप्रती वक्रोक्तीचा प्रयोग करते, ती धीराधीरा मध्या आहे. मध्या नायिकेमध्ये मुग्धा आणि प्रगल्भाचे संमिश्रण असल्याने मध्यामध्येच सर्व रसोत्कर्ष लक्षित होतो.

विजय–प्रगल्भाची लक्षणे आदी सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–जी नायिका पूर्णयौवन, मदांध आणि रतिविषयी अत्यंत उत्सुक असते, ती प्रगल्भा आहे. ती आपल्या भावांस प्रचुरपणे प्रकट करण्यात पटू असते. ती प्रेमरसाद्वारे प्रियतमावर आक्रमण करण्यास समर्थ असते. तिच्या उक्ती आणि कृती अतिशय गंभीर आणि प्रौढा असतात. मानाच्या क्रियेमध्ये अत्यंत कर्कशा असते. मानसमयी ती तीन प्रकारच्या असते–धीरा, अधीरा आणि धीराधीरा. धीर-प्रगल्भा संभोगाविषयी अतिशय उदासीन, भावांस गोपन करणारी आणि आदरकारिणी असते. अधीरा प्रगल्भा निष्ठुर होऊन कांतास धमकावत ताडन करते–धाक-दडपशाहीने दण्ड देते. धीराधीरा प्रगल्भा, धीराधीरा नायिकेसमान गुणशीला असते. ज्येष्ठा आणि कनिष्ठा भेदाने मध्या आणि प्रगल्भा दोघीही दोन प्रकारच्या असतात–ज्येष्ठमध्या आणि कनिष्ठमध्या, ज्येष्ठप्रगल्भा आणि कनिष्ठ प्रगल्भा. नायकाच्या प्रणयानुसारच ज्येष्ठ आणि कनिष्ठभेद उदित होतो.

विजय–प्रभो! सर्व मिळून किती प्रकारच्या नायिका असतात?

गोस्वामी–नायिका पंधरा प्रकारच्या असतात. कन्या–केवळ मुग्धा असते, म्हणून ती एकच प्रकारच्या असते. मुग्धा, मध्या आणि प्रगल्भा भेदाने नायिका तीन प्रकारच्या असतात. मध्या आणि प्रगल्भा वेगवेगळ्या धीरा, अधीरा आणि धीराधीरा

भेदाने तीन-तीन प्रकारच्या असतात. एकूण सात प्रकारच्या स्वकीया नायिका असतात. त्याचप्रमाणे परकीयासुद्धा सात प्रकारच्या असतात. आता एकूण ७+७+१=१५ प्रकारच्या नायिका असतात.

विजय–नायिकांच्या अवस्था किती प्रकारच्या असतात?

गोस्वामी–अभिसारिका, वासकसज्जा, उत्कण्ठिता, खण्डिता, विप्रलब्धा, कलहान्तरिता, प्रोषितभर्तृका आणि स्वाधीनभर्तृका–या आठ अवस्था आहेत. पूर्वोक्त पंधरा प्रकारच्या नायिकांमध्ये या आठही अवस्था असतात.

विजय–अभिसारिका कोण आहे?

गोस्वामी–जी कांतास अभिसार करविते तथा स्वयं अभिसार करते, ती अभिसारिका आहे. जी शुक्ल पक्षात शुभ्र वस्त्रे परिधान करून अभिसाराकरिता गमन करते–ती ज्योत्स्नाभिसारिका म्हणविली जाते आणि जी कृष्णपक्षामध्ये काळ्या रंगाचे कपडे घालून यात्रा करते, ती तमोभिसारिका म्हणविली जाते. अभिसारात गमन करताना ती अगदी निःशब्द, नखशिखांत अलंकृत, लज्जेने जणू आपले अंग चोरणारी तथा एका स्निग्ध सखीसोबत असते.

विजय–वासकसज्जेसंबंधी सांगावे.

गोस्वामी–आपल्या सवडीनुसार कांत येतील–या आशेने जी नायिका आपली देह-सज्जा आणि गृह-सज्जा प्रस्तुत ठेवते, ती 'वासकसज्जा' म्हणविली जाते. स्मर-क्रीडासंकल्प, कांताची वाट पाहणे, सखीसोबत कांताची लीलाकथा श्रवण-कीर्तन, वारंवार दूतीची प्रतीक्षा करणे–या सर्व वासकसज्जेच्या कृती आहेत.

विजय–उत्कंठितेसंबंधी सांगावे.

गोस्वामी–निरपराध नायकाच्या येण्यास विलंब झाल्यावर जी नायिका अत्यंत उत्कंठित आणि उत्सुक होते, ती उत्कण्ठिता नायिका असते. हृदयात ताप, शरीरात कंप, मनात (कांत का नाही आले–असा विचार करून) वितर्क, प्रत्येक कार्यात विरक्ती, वाष्पमोचन आणि आपल्या दशेचे वर्णन करणे–या सर्व उत्कंठितेच्या कृती आहेत. वासकसज्जा दशादेखील शेवटी उत्कंठेच्या रूपात बदलते, ज्या समयी वासकसज्जा नायकाची ठरलेल्या वेळापर्यंत प्रतीक्षा करूनही त्याने न आलेला पाहून

मान करण्याऐवजी असा विचार करते की तो दुसऱ्या नायिकेच्या वशीभूत झाला असेल. म्हणूनच कदाचित येऊ शकला नाही. या दशेत प्रियतमच्या संगाअभावी ती अतिशय उत्कंठित आणि उत्सुक होऊन जाते. तेव्हा ती उत्कण्ठिता-नायिका म्हणविली जाते.

विजय–खंडिता कोण आहे?

गोस्वामी–ठरलेली वेळ निघून गेल्यानंतर शेवटच्या प्रहरी ज्यावेळी नायक दुसऱ्या नायिकेच्या भोगचिन्हांस धारण करून उपस्थित होतो, त्यावेळी जी नायिका क्रोधामुळे दीर्घ निःश्वास घेते आणि नायकास काहीच बोलत नाही तथा त्याच्याकडून तोंड फिरवून घेते, ती खंडिता नायिका म्हणविली जाते.

विजय–विप्रलब्धा कोण आहे?

गोस्वामी–येण्याचा संकेत देऊनही दैवयोगाने जेव्हा प्राणवल्लभ येत नाहीत–तेव्हा नायिका विरह व्यथेने व्याकूळ होते–अशा नायिकेलाच विप्रलब्धा नायिका म्हणतात. निर्वेद, चिंता, खेद, अश्रू, मूर्च्छा, दीर्घनिःश्वास आदी अनेक प्रकारच्या तिच्या कृती असतात.

विजय–कलहांतरिता कोण आहे?

गोस्वामी–सखींच्यासमोर आपल्या पायावर डोके ठेवणाऱ्या प्राणवल्लभास पाहूनही जी नायिका त्यास बरे-वाईट म्हणते तथा निषेध करते, तिला कलहांतरिता नायिका म्हणतात. तिच्यात प्रलाप, संताप, ग्लानी, दीर्घ निःश्वास आदी कृती लक्षित झाल्याने तिला कलहांतरिता म्हणतात.

विजय–प्रोषितभर्तृका कोण आहे?

गोस्वामी–कांतच्या दूर देशात निघून गेल्यावर नायिका प्रोषितभर्तृका म्हणविली जाते. प्रियतमचे गुणगान, दैन्य, कृशता, जागरण, मलीनता, जडता आणि चिंता आदी त्यांच्या अनेक प्रकारच्या कृती होतात.

विजय–स्वाधीनभर्तृका कोण आहेत?

गोस्वामी–प्रियतम जिच्या अधीन होऊन सर्वदा तिच्या निकट राहतात,

तिला स्वाधीनभर्तृका म्हणतात. वनलीला, जलक्रीडा, पुष्पचयन आदी तिच्या विविध प्रकारच्या कृती आहेत.

विजय–मग तर स्वाधीभर्तृकेची दशा अत्यंत आनंदजनकच असते.

गोस्वामी–ज्या स्वाधीनभर्तृका नायिकेच्या प्रेमात वश होऊन नायक एका क्षणाकरितासुद्धा तिला त्यागण्यास समर्थ होत नाही, त्या स्वाधीनभर्तृका नायिकेसच 'माधवी' म्हटले जाते. आठ प्रकारच्या नायिकांमध्ये स्वाधीनभर्तृका, वासकसज्जा आणि अभिसारिका–या तीन प्रकारच्या नायिका प्रसन्नचित्ताने अलंकार आदी धारण करतात. खंडिता, विप्रलब्धा, उत्कंठिता, प्रोषितभर्तृका आणि कलहांतरिता–या पाचही अलंकार आदी रहित असतात तथा डाव्या गालावर हात ठेवून खेद करतात. चिंतेने त्यांचे हृदय संतप्त होते.

विजय–कृष्णप्रेमात संताप कसला? याचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–कृष्णप्रेम चिन्मय असते. म्हणूनच परमानंदरूप संताप आदीदेखील परमानंदाच्याच विचित्रता आहेत. जडजगताचा संताप वास्तविक मोठाच दुःखदायी असतो. परंतु चित्-जगात तो आनंदाच्या विकाररूपात असतो. आस्वादनसमयी चिन्मय रस रूपात अत्यंत सुखजनक असतो, परंतु वाणीद्वारे व्यक्त करता येत नाही.

विजय–या नायिकांमध्ये प्रेमाचे तारतम्य कसे असते?

गोस्वामी–व्रजेन्द्रनन्दनाप्रती नायिकेच्या प्रेमाच्या तारतम्यानुसार उत्तमा, मध्यमा आणि कनिष्ठा भेदाने नायिका तीन प्रकारच्या असतात. ज्या नायिकेचा कृष्णाप्रती ज्या परिमाणात भाव असतो, कृष्णाचादेखील त्या नायिकेच्या प्रती त्या परिमाणामध्ये भाव असतो.

विजय–उत्तमेची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–उत्तमा नायिका आपल्या प्रियतम नायकाच्या क्षणभराच्या सुखाकरिता अखिल कर्मांचा तृणासमान परित्याग करते. जर नायक या कोटीच्या नायिकेस दुःख जरी देतात, तरीही या नायिकेच्या हृदयात असूया (ईर्ष्या) उत्पन्न होत नाही. जर कुणी खोटेखोटेदेखील नायकाच्या दुःखाची चर्चा अशा नायिकेसमोर

करते, तरी तिचे हृदय फाटू लागते.

विजय–मध्यमेची लक्षणे सांगा.

गोस्वामी–नायकाचे दुःख ऐकून तिचे चित्त खिन्नमात्र होते.

विजय–कनिष्ठेची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–जी नायिका कृष्ण-मिलनाकरिता लोकलज्जा आदी बाधांना घाबरते, ती कनिष्ठा म्हणविली जाते.

विजय–नायिकांची एकूण संख्या किती आहे?

गोस्वामी–एकूण ३६० प्रकारच्या नायिका आहेत. जशा पहिल्या पंधरा प्रकारच्या नायिका, मग त्या सर्व आठ-आठ प्रकारच्या असतात अर्थात १५X८=१२० प्रकारच्या असतात. पुन्हा कनिष्ठा, मध्यमा आणि उत्तमा भेदाने १२०X ३=३६० प्रकारच्या असतात.

विजय–नायिकांचा वृत्तांत ऐकला. आता यूथेश्वरींमध्ये परस्पर काय भेद आहे, जाणण्याची उत्कंठा होत आहे, त्यास सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–यूथेश्वरींमध्ये स्वपक्ष, विपक्ष आणि तटस्थाचा भेद आहे. पुनः सौभाग्याच्या तारतम्याने त्या अधिका, समा और लघ्वी भेदाने तीन प्रकारच्या असतात. पुनः प्रखरा, मध्या आणि मृद्वी भेदाने आणखीही तीन भागांमध्ये विभक्त आहेत. प्रगल्भ वचनांची नायिका–जी बोलता-बोलताच आपले दुःख आणि क्रोध प्रकट करते–प्रखरा म्हणविली जाते. मधुर वाणींची नायिका मृद्वी म्हटली जाते तथा ह्या दोघांच्या मधली मध्या नायिका आहे. आत्यंतिकी आणि आपेक्षिकी भेदाने अधिका-नायिका दोन भागांमध्ये विभक्त होते. ज्यांच्या बरोबरीचेही कुणी नाही आणि समानही कुणी नाही–त्या श्रीमती राधाजीच मध्या आहे. त्यांच्या समान व्रजात कुणीही नाही.

विजय–आपेक्षिक-अधिका कोण आहेत?

गोस्वामी–यूथेश्वरींमध्ये ज्या नायिका एक अथवा काही यूथेश्वरींपेक्षा श्रेष्ठ असतात, त्यांना आपेक्षिक-अधिका म्हटले जाते.

विजय–आत्यंतिकी लघू कोण आहेत?

गोस्वामी–ज्या नायिकेपेक्षा दुसऱ्या सर्व नायिका श्रेष्ठ असतात, ती आत्यंतिकी लघू आहे. आत्यंतिकी लघूस सोडून सर्व यूथेश्वरी अधिका आहेत. म्हणूनच आत्यंतिकी अधिका यूथेश्वरीमध्ये समत्वाचीही संभावना नसते आणि लघुत्वाचीही नसते. त्याचबरोबर आत्यंतिकी लघूमध्ये अधिकत्वाचीही संभावना नसते. समालघू एकच प्रकारची असते. मध्या यूथेश्वरी अधिका-प्रखरा आदी भेदांनी नऊ प्रकारची असते. म्हणूनच यूथेश्वरींचे बारा भेद आहेत–

(१) आत्यंतिकाधिका, (२) समालघू, (३) अधिकमध्या, (४) सममध्या, (५) लघुमध्या, (६) अधिकप्रखरा, (७) समप्रखरा, (८) लघुप्रखरा, (९) अधिकमृद्वी, (१०) सममृद्वी, (११) लघुमुद्वी आणि (१२) आत्यंतिकी लघू.

विजय–आता-दूतीभेद जाणू इच्छितो.

गोस्वामी–कृष्ण-संगमाकरिता उत्कंठित नायिकांच्या सहाय्यतेकरिता दूतीची आवश्यकता असते. दूती दोन प्रकारच्या असतात–स्वयंदूती आणि आप्तदूती.

विजय–स्वयंदूती कोण आहे?

गोस्वामी–अत्यंत उत्सुकतेमुळे लज्जा दूर होते. अनुरागाने मोहित झालेली जी नायिका लज्जारहित होऊन स्वतःच नायकाप्रती आपला भाव प्रकाशित करते, तिला स्वयंदूती म्हणतात. हा अभियोग प्रकाश तीन प्रकारचा असतो–कायिक, वाचिक आणि चाक्षुष (डोळ्यांचा).

विजय–वाचिक अभियोग कशास म्हणतात?

गोस्वामी–व्यंगच वाचिक अभियोग आहे. व्यंगे दोन प्रकारची असतात–शब्द व्यंग आणि आणि अर्थ व्यंग. व्यंग कधी कृष्णास विषय बनवून तर कधी समोरच्या एखाद्या वस्तूस विषय बनवून कार्य करते.

विजय–कृष्णविषयक व्यंग कसे असते?

गोस्वामी–कृष्णास साक्षात आणि व्यपदेश रूपात विषय बनविणारी व्यंगे दोन प्रकारची आहेत.

विजय–साक्षात कसे असते?

गोस्वामी–गर्व, आक्षेप आणि याञ्चा (मागणे) या भेदाने व्यंगरूप अभियोग अनेक प्रकारचा असतो.

विजय–आक्षेप-व्यंग कशास म्हणतात?

गोस्वामी–आक्षेपाद्वारे शब्दोत्थ व्यंग एक प्रकारचे असते तथा अर्थोत्थ-व्यंग दुसऱ्या प्रकारचे असते. तुम्ही लोक स्वतः आलंकारिक आहात, म्हणून उदाहरण देण्याची आवश्यकता वाटत नाही.

विजय–ठीक आहे. याचनेद्वारे व्यंग कसे असते?

गोस्वामी–स्वार्थ आणि परमार्थ भेदाने याचना व्यंग दोन प्रकारचे असते. मग दोघांमध्ये वेगवेगळे शब्दव्यंग आणि अर्थव्यंग होतात. या शब्दांमध्ये भाव संयुक्त करून सांकेतिक याचना होते. स्वार्थ याचनेचे तात्पर्य स्वतःस स्वतःची गोष्ट सांगणे असे आहे. परार्थ याचनेचे तात्पर्य आहे–दुसऱ्यांची गोष्ट दुसऱ्यांद्वारे सांगितली जाणे.

विजय–साक्षात व्यंग समजलो. कृष्णाप्रती नायिकांच्या बोलण्यात जी साक्षात अभियोग वाक्ये असतात, त्यात शब्दव्यंग आणि अर्थव्यंग असते. नाटक आणि नाटिकांमध्ये त्यांचा प्रयोग पाहिला जातो. कवी त्यांस शब्दचातुर्याद्वारे प्रकाशित करतात. कृपया आता व्यपदेश कसा असतो हे सांगावे.

गोस्वामी–अलंकार शास्त्राच्या ‘अपदेश’ शब्दानेच पारिभाषिकी संज्ञेच्या रूपात ‘व्यपदेश’ शब्द आहे. व्यपदेश शब्दाचा अर्थ व्याज आहे अर्थात एका गोष्टीच्या बहाण्याने एखाद्या दुसऱ्या गूढ तात्पर्यास व्यक्त करणे. तात्पर्य हे आहे की कृष्णास एखादी गोष्ट सांगणे की त्याचा स्पष्ट अर्थ एक प्रकारचा असतो, परंतु व्यंगाच्या रूपात त्याद्वारे गूढ रूपात सेवेची याचना समजली जावी. अशा गोष्टीचे नावच ‘व्यपदेश’ आहे. हा व्यपदेश दूतीचे काम करतो.

विजय–व्यपदेश एका प्रकारे कपट वाक्यास म्हटले जाते. याचना याचा गूढ अर्थ असतो. आता पुढे सांगावे.

गोस्वामी–कृष्ण समोर राहून ऐकत तर आहेत, तरीही ते ऐकत नाहीत–

असा विचार करून समोरच्या एखाद्या पशूस अथवा पक्षास पाहून जी जल्पना होते; ती पुरुष-विषयगत व्यंग आहे. हेसुद्धा शब्दोत्थ आणि अर्थोत्थ भेदाने दोन प्रकारचे असते.

विजय–आपल्या कृपेने हे समजलो. आता आंगिक अभियोग कशास म्हणतात, हे सांगावे.

गोस्वामी–बोटांनी चुटकी वाजविणे, बहाणा बनवून शीघ्रतेने उठणे, भय आणि लज्जेने आपल्या अंगांस झाकणे, पायाने भूमीवर लिहिणे, कान खाजविणे, तिलक रचना, वेष धारण करणे, भुवया नाचविणे, सखीस आलिंगन देणे, सखीला दटावणे, ओठ दातांखाली दाबणे, हार गुंफणे, अलंकार वाजविणे, बाहुमूल (काख) उघडणे, कृष्णनाम लिहिणे, वृक्षाचा लतांशी संयोग घडविणे–अशा क्रिया कृष्णासमोर केल्याने त्यास आंगिक अभियोग म्हणतात.

विजय–चाक्षुष अभियोगासंबंधी सांगावे.

गोस्वामी–नेत्रांचे रहस्य, डोळ्यांचे अर्धेमुर्धे उघडणे, डोळे नाचविणे, तिरक्या नजरेने पाहणे, डोळ्यांमधला संकोच, डाव्या डोळ्याने पाहणे, कटाक्षपात–हे सर्वकाही चाक्षुष अभियोग आहेत.

विजय–स्वयंदूती समजलो. संकेत मात्र दिला गेला आहे. त्या असंख्य प्रकारच्या असू शकतात. आता आप्तदूतीसबंधी सांगावे.

गोस्वामी–जी दूती प्राण गेल्यावरही विश्वास भंग करीत नाही अर्थात गोपनीय गोष्टींचा भांडाफोड करीत नाही, ज्या स्नेहवती आणि बोलण्यात परम चतुरा असतात, अशा सर्वगुणसंपन्न युवतीच व्रजसुंदरींच्या दूती असतात.

विजय–आप्तदूती किती प्रकारच्या असतात?

गोस्वामी–अमितार्था, निसृष्टार्था आणि पत्रहारी–या तीन प्रकारच्या आप्तदूती असतात. इंगित समजून मिलन संयोग करविणाऱ्या दूती अमितार्था म्हणविल्या जातात. युक्तीद्वारे मिलन करणाऱ्या दूती निसृष्टार्था म्हणविल्या जातात तथा ज्या केवळ संदेश घेवून जातात, त्या पत्रहारी म्हणविल्या जातात.

विजय–याव्यतिरिक्त आणखीही कुणी आप्तदूती आहेत का?

गोस्वामी–शिल्पकारिणी, दैवज्ञा, लिंगिनी, परिचारिका, धात्रेयी, वनदेवी आणि सख्यादेखील दूतींच्या अंतर्गत येतात. चित्रकारिणी आदी शिल्पकारी चित्राद्वारे मिलन करवितात. दैवज्ञादूती राशिफल आदी सांगून मिलन करवितात. पौर्णमासीसारख्या तपस्विनी वेषधारिणी लिंगिनी दूती आहेत. लवंगमंजरी, भानुमती आदी कतिपय सख्या परिचारिका दूती, श्रीमती राधिकेच्या 'धात्रेयी' सुद्धा दूती आहेत. वनदेवी वृन्दावनाची अधिष्ठात्री देवी आहे. पूर्वोक्त सख्यादेखील दूती आहेत. त्या वाच्य-दूत्य अर्थात स्पष्ट वचनांनी तथा व्यंग वचनांनी दूतीचे कार्य करतात, त्या कार्यात व्यपदेश, शब्दमूल, अर्थमूल, प्रशंसा आणि आक्षेप आदी सर्व प्रकारचे अभियोग लक्षित असतात

येथपर्यंत श्रवण करून विजयकुमारने श्रीगुरुगोस्वामींच्या चरणी दंडवत प्रणाम करून त्यांचा निरोप घेतला आणि ऐकलेल्या गोष्टींचे मार्गात चिंतन करीत आपल्या वासस्थानी परतले.

**॥ तेहेतीसावा अध्याय समाप्त ॥**



# चौतीसावा अध्याय (मधुररस-विचार)

आज विजयकुमार थोडे आधीच प्रसाद सेवा करून समुद्राच्या किनाऱ्या-किनाऱ्यानेच भ्रमण करीत काशीमिश्रांच्या भवनाकडे चालू लागले. समुद्राच्या लाटा पाहून त्यांच्या हृदयात रससमुद्राचे भाव उदित होऊ लागले, ते भावविभोर होऊन मनोमन म्हणाले–अहा! हा समुद्रच माझ्या भावास उदित करीत आहे. जडवस्तू असूनही हा समुद्र माझ्या अती गुप्त चित्-भावांना प्रकट करीत आहे. प्रभू मला ज्या रससमुद्राविषयी सांगत आहेत, तोदेखील अशाच प्रकारचा आहे. माझी स्थूल आणि सूक्ष्म शरीरे दूर झाल्यावर मी रससमुद्राच्या तटावर आपल्या मंजरी-स्वरूपात बसून रसास्वादन करीत आहे. नवजलधर कांतियुक्त कृष्णच आमचे एकमात्र प्राणनाथ आहेत. त्यांच्याजवळ विराजमान वृषभानुनन्दिनी श्रीमती राधिका आमची ईश्वरी अर्थात जीवितेश्वरी आहे. राधा-कृष्णाचा प्रणयविकारच हा समुद्र आहे. रसाचे भिन्न-भिन्न प्रकारचे भावसमूहच या तरंगमाला आहेत. तेव्हा जे भाव उठतात, तेच या रससमुद्राच्या विचित्र लाटा आहेत, ज्या तटस्थिता माझ्यासारख्या सखीस प्रेमरसात बुडवून टाकतात. रससमुद्रच कृष्ण आहेत, म्हणूनच समुद्राचा वर्णसुद्धा ठीक कृष्णाच्या वर्णासारखा आहे. त्यातील प्रेमतरंग श्रीमती राधा आहेत; म्हणूनच या समुद्राच्या तरंगांचा वर्ण गौरवर्ण आहे. मोठमोठ्या लहरी सख्या आहेत, तर छोट्याछोट्या लहरी सख्यांच्या परिचारिका आहेत. मी त्यातील दूर तटावर पडलेली एक अणुपरिचारिका आहे. या सुंदर भावनेद्वारे विजयकुमार मोठे प्रसन्न झाले. थोड्या वेळाने त्यांना बाह्य ज्ञान झाले. आता ते हळूहळू श्रीगुरुदेवांच्या जवळ पोहोचले आणि त्यांना साष्टांग प्रणाम करून त्यांच्याजवळ अत्यंत दीनतापूर्वक बसले.

विजयकुमार बसल्यावर श्रीगुरुगोस्वामींनी मोठ्याच प्रेमपूर्वक म्हटले–विजय! तुमचे सर्व प्रकारे कुशल तर आहे ना?

विजय–प्रभो! आपली कृपाच आमच्या संपूर्ण मंगलाचे मूळ आहे. मी सख्यांच्या अनुगत होण्याकरिता सख्यांचा भेद यथायोग्यपणे जाणू इच्छितो.

गोस्वामी–विजय! सख्यांच्या महिमेचे वर्णन करणे जिवाच्या सामर्थ्याबाहेरील गोष्ट आहे. तरीही आम्ही श्रीरूप यांच्या अनुगत होऊन याचा

अनुभव घेतला आहे. व्रजसुंदरी सख्याच प्रेमलीलांच्या ठीक-ठीक विस्तारकारिणी आहेत. त्याच व्रजयुगुलाच्या विश्वासाच्या भंडारस्वरूप आहेत. सौभाग्यवान व्यक्तीच त्यासंबंधात योग्यप्रकारे विचारांस जाणू इच्छितो. यूथानुरक्त सख्यांमध्येही आधी सांगितल्याप्रमाणे अधिका, समा, लघू तथा प्रखरा, मध्या आणि मृद्वी भेद आहेत. या सर्व भेदांविषयी मी कालच तुला सांगितले होते. यांच्यासंबंधी श्रीरूप गोस्वामींचे प्रमाण वचन सर्वदा स्मरणात ठेवण्याजोगे आहेत–

**प्रेमसौभाग्य साद्गुण्याद्याधिक्यादधिका सखी।**
**समा तत्साम्यतो ज्ञेया तल्लघुत्वात्तथा लघुः॥**

**दुर्लङ्घ्यवाक्यप्रखरा प्रख्याता गौरवोचिता।**
**तदूनत्वे भवेन्मृद्वी मध्या तत्साम्यमागता॥**
**आत्यन्तिकाधिकत्वादिभेदः पूर्ववदत्र सः।**
**स्वयूथे यूथनाथैव स्यादत्रात्यन्तिकाधिका।**
**सा क्वापि प्रखरा यूथे क्वापि मध्या मृदुः क्वचित्॥**[(१)]

(उ. नी. ८/३-५)

विजय–आत्यंतिकाधिका यूथेश्वरी आपल्या यूथामध्ये सर्वांत प्रधान असतात. या स्वभावाच्या भेदाने तीन प्रकारच्या असतात–आत्यंतिकाधिका प्रखरा, आत्यंतिकाधिका मध्या आणि आत्यंतिकाधिका मृद्वी. आपण यांचे वर्णन आधीच केले आहे. आता कृपा करून त्यांच्याविषयी विस्तारपूर्वक सांगावे.

गोस्वामी–केवळ यूथेश्वरीच आत्यंतिकाधिका असतात. यूथातल्या सर्व सख्या आपेक्षिकाधिका, आपेक्षिकसमा आणि आपेक्षिक लघ्वी भेदाने तीन-तीन

---

(१) प्रेम-सौभाग्य आणि सद्गुणांच्या अधिकतेने सख्यांपैकी कुणी 'अधिका' म्हणविली जाते, कुणी त्या गुणांच्या समानतेमुळे 'समा' तथा कुणी कुणी त्या गुणांमध्ये लघू असल्याने लघू नामाने प्रसिद्ध आहेत. ज्या सखीच्या बोलण्यास सहजच टाळता येत नाही ती सखी 'प्रखरा' नावाने प्रख्यात आहे. प्रखरा सखी गौरवयुक्ता असते. गौरवाच्या न्यूनतेने 'मृद्वी' आणि समानतेने 'मध्या'च्या नावाने जाणली जाते. या सख्यांमध्ये आत्यन्तिकाधिकत्व आदी भेद सुद्धा समजून घ्यायला हवा. या ठिकाणी आपल्या यूथात यूथेश्वरीच 'आत्यंतिकाधिका' असते तर तीच काही यूथांमध्ये प्रखरा वा मृदू सुद्धा असते.

प्रकारच्या असतात अर्थात नऊ प्रकारच्या असतात, जसे–(१) आपेक्षिकाधिका प्रखरा, (२) आपेक्षिकाधिका मध्या, (३) आपेक्षिकाधिका मृद्वी, (४) आपेक्षिकसमा प्रखरा, (५) आपेक्षिसमा मध्या, (६) आपेक्षिकसमा मृद्वी, (७) आपेक्षिक-लघु-प्रखरा, (८) आपेक्षिक-लघु-मध्या, (९) आपेक्षिक-लघु-मृद्वी.

आत्यंतिका-लघूही दोन प्रकारच्या आहेत–आत्यंतिक लघू आणि समा-लघू. नऊ आणि दोन मिळून अकरा झाल्या. यूथेश्वरीस मिळून बारा प्रकारच्या नायिका एकेका यूथात असतात.

विजय–प्रभो! प्रसिद्ध-प्रसिद्ध सख्यांचे यूथ सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–ललिता आदी सख्या श्रीमती राधेच्या यूथामध्ये आपेक्षिकाधिक प्रखरा श्रेणीच्या आत आहेत. त्या यूथामध्ये विशाखा आदी सख्या आपेक्षिकाधिक मध्याच्या श्रेणीमध्ये आहेत. चित्रा आणि मधुरिका आदी त्याच यूथात आपेक्षिकाधिक-मृद्वी श्रेणीत आहेत. श्रीमती राधिकेच्या तुलनेत श्रीललिता आदी अष्ट सख्याच लघू आहेत.

विजय–या आपेक्षिक-लघु-प्रखरा सख्यांचे किती भेद आहेत?

गोस्वामी–लघु-प्रखरा-वामा आणि दक्षिणेच्या भेदाने दोन प्रकारच्या असतात.

विजय–वामाची लक्षणे काय आहेत?

गोस्वामी–मान ग्रहण करण्यात सर्वदा उत्सुक, मानाच्या शिथिलतेमध्ये क्रोधित तथा सहजच नायकाच्या वशीभूत न होणाऱ्या नायिका 'वामा' म्हणविल्या जातात. राधिकेच्या यूथामध्ये ललिता आदी सख्या वामा प्रखरा म्हणविल्या जातात.

विजय–दक्षिणेची लक्षणे सांगावीत.

गोस्वामी–जी नायिका मान करीत नाही, नायकाप्रती मुक्त वाक्याचा प्रयोग करते तथा जी नायकाच्या गोड-गोड बोलण्यास वशीभूत होते, ती 'दक्षिणा' म्हणविली जाते. श्रीमती राधिकेच्या यूथात तुंगविद्या आदी दक्षिणा प्रखरा म्हणवतात.

विजय–आत्यंतिक लघू कोण आहेत?

गोस्वामी–सर्वथा मृदू आणि सर्वात नितांत लघू असल्याने कुसुमिका आदी सखींस आत्यंतिक लघू म्हटले जाऊ शकते.

विजय–सखींचे दौत्यकार्य कशास म्हणतात?

गोस्वामी–दूरवर्ती नायक आणि नायिकेस परस्पर भेटविण्याकरिता अभिसार करविणेच सखींचे दौत्यकार्य आहे.

विजय–सख्यामंध्ये नायिकात्व आहे काय?

गोस्वामी–यूथेश्वरी नित्यनायिका आहेत. आपेक्षिकाधिका प्रखरा, आपेक्षिकाधिकामध्या आणि आपेक्षिकाधिका मृद्वी–यांच्यात नायिकात्व आणि सखीत्व दोन्हीही धर्म असतात. आपल्यापेक्षा लघूच्या संबंधी नायिकात्व आणि आपल्यापेक्षा अधिकासंबंधी सखीत्व असल्याकारणाने त्यांना नायिकाप्राय म्हणता येऊ शकते. आपेक्षिकसमा प्रखरा, मध्या आणि मृद्वीगण द्विसमा आहेत अर्थात अधिकाच्या संबंधाने सखी आणि लघूच्या संबंधाने नायिका आहेत. आपेक्षिकी लघू, प्रखरा, मध्या आणि मृद्वी या अधिकांश सख्या आहेत. आत्यंतिकी लघू यूथेश्वरी आहेत आणि उपरोक्त तीन प्रकारच्या सख्यांच्या गणनेनुसार पाचव्या श्रेणीत असतात. त्या नित्यसखी आहेत. यूथेश्वरीसंबंधी आपेक्षिकी सख्या सखी आणि दूती असतात, नायिका नाही. आत्यंतिकी लघू अर्थात नित्यसखीकरिता सर्व नायिका आहेत, दूती नाहीत.

विजय–सख्यांपैकी दूती कोण आहेत?

गोस्वामी–यूथेश्वरी नित्य नायिका आहेत. सर्वांच्या आदराच्या पात्र असल्याकारणाने त्यांचे मुख्य रूपात दूतीचे कार्य नाही. आपल्या यूथामध्ये जी सखी आपल्या यूथेश्वरीस अधिक प्रिय असते, यूथेश्वरी तिला दूतीच्या कार्यात नियुक्त करते. कधी-कधी यूथेश्वरीसुद्धा त्या सखीच्या प्रणयामुळे गौण रूपात दूतीचे कार्य करते. दूरच्या स्थानी येणे-जाणे सोडून जे दौत्यकार्य होते–ते गौण आहे. ते कृष्णाच्या समक्ष आणि परोक्ष-भेदाने दोन प्रकारचे असते.

विजय–कृष्णासमोर दौत्य किती प्रकारचे असते?

गोस्वामी–सांकेतिक आणि वाचिक भेदाने ते दौत्यकार्य दोन प्रकारचे असते.

विजय–सांकेतिक कसे असते?

गोस्वामी–कोपरखळी, भुवया, दुसऱ्या इशाऱ्यांनी कृष्णाला सखीकडे पाठविणेच 'सांकेतिक' दौत्य आहे.

विजय–वाचिक कशा प्रकारचे असते?

गोस्वामी–समोरासमोर वा मागून परस्पर संवादातून जे दूत्य केले जाते; त्यास 'वाचिक' दूत्य म्हटले जाते.

विजय–परोक्ष दूत्य कसे असते?

गोस्वामी–सखीद्वारे कृष्णानिकट दुसऱ्या सखीस अर्पण केले जाणे अथवा कृष्णाकडे सखीस पाठविणे–हे सर्व परोक्ष दौत्याचे कार्य आहे.

विजय–नायिका-प्राया दूत्य कसे असते?

गोस्वामी–आपेक्षिकाधिका प्रखरा, मध्या आणि मृद्वी–या तीन प्रकारच्या सख्या आपल्यापेक्षा लघू सखींकरिता जेव्हा दूतीचे कार्य करतात तेव्हा त्यांना 'नायिका-प्राया' दूत्य म्हटले जाते. त्यापैकी समा आणि मध्या या दोन्ही सख्यांमध्ये अत्यंतच मधुर आणि अभेद सौहार्द असते. प्रेम-विशेषज्ञ व्यक्तीच त्यास समजू शकतात.

विजय–सखीप्राय दूत्य कसे असते?

गोस्वामी–लघुप्रखरा, लघुमध्या आणि लघुमृद्वी–या अधिकांश रूपात दूतीचे कार्य करतात. म्हणून त्यांच्या दूत्यास 'सखीप्राय' दूत्य म्हणतात.

विजय–मग नित्यसखी कशी असते?

गोस्वामी–नायिकात्वाची अपेक्षा न करता सखीत्वामध्येच ज्यांची प्रीती असते, त्यांना नित्यसखी म्हणतात. नित्यसखी दोन प्रकारच्या असतात–आत्यंतिकी लघू आणि आपेक्षिकी लघू.

विजय–प्रखरा आदी स्वभाव एखाद्या विशेष सखीचा नित्य स्वभाव आहे का?

गोस्वामी–स्वभाव असूनही देश-कालानुसार त्याचे परिवर्तनही होऊन जाते. जसे–राधिकेच्या मानभंगसमयी ललितेचे प्रयत्न.

विजय–असे प्रतीत होते की श्रीमती राधिकेच्या प्रयत्नाने सखींचा कृष्णाशी सर्वकाळी संगम होत असतो.

गोस्वामी–यात एक रहस्य आहे. जेव्हा सखी दूतीकार्यात नियुक्त होऊन एखाद्या निर्जन स्थानी कृष्णाशी भेटते आणि त्यावेळी कृष्ण तिच्याकडे संगमाची जरी प्रार्थनासुद्धा करतात, तरी सखी त्यांच्यासी सहमत होत नाही, सहमत झाल्याने प्रियसखीचा त्या सखीवरचा दूत्यविश्वास उडून जातो.

विजय–सखींच्या क्रिया कशा असतात?

गोस्वामी–सखींच्या सोळा प्रकारच्या क्रिया असतात–(१) नायकाने नायिकेकडे तथा नायिकेने नायकाकडे एकमेकांचे गुणवर्णन करणे, (२) एकमेकांविषयीची आसक्ती वाढविणे, (३) त्यांचा परस्पर अभिसार करविणे, (४) कृष्णाच्या निकट सखीस समर्पण करणे, (५) परिहास, (६) आश्वासन प्रदान करणे, (७) वेष-रचना करणे, (८) दोघांच्याही मनोगत भावांस एकमेकांसमोर प्रकट करण्याची कुशलता, (९) दोष लपविण्याची कुशलता, (१०) पती आदींची वंचना करण्याची शिकवण देणे, (११) योग्यवेळी नायक व नायिकेचे मिलन घडविणे, (१२) चामव्यजनाने सेवा करणे, (१३) विशेष स्थळी नायक आणि नायिकेचा तिरस्कार करणे, (१४) संदेश पाठविणे, (१५) नायिकेच्या प्राणांचे रक्षण करणे आणि (१६) सर्व विषयांमध्ये प्रयत्न करणे. या सर्वांची जी उदाहरणे आहेत, ती अतीव चमत्कारपूर्ण आहेत.

विजय–प्रभो! संकेत मिळाला; त्या उदाहरणांस उज्ज्वलनीलमणी ग्रंथात पाहीन. आता बरेच काही लक्षात येत आहे. प्रभो, आज मी कृष्ण आणि सख्यांमध्ये जी परस्पर प्रेमनिष्ठा असते, तिला जाणू इच्छितो.

गोस्वामी–स्वपक्ष-सख्या कृष्णात तथा आपल्या यूथेश्वरीमध्ये असम आणि समस्नेह ठेवण्याची कारणे दोन प्रकारची आहेत.

विजय–'असम स्नेह' सख्या कोण आहेत?

गोस्वामी–'असम स्नेह' सख्या दोन प्रकारच्या असतात. कुणी-कुणी आपल्या यूथेश्वरीस कृष्णापेक्षा अधिक स्नेह करतात. ज्या "मी हरिदासी आहे"–असे समजून दुसऱ्या यूथात मिलित न होऊन केवळ यूथेश्वरीप्रती पूर्ण स्नेहवती राहूनही त्याहीपेक्षा अधिक कृष्णास स्नेह करतात, त्या हरीमध्ये अधिक स्नेहवती म्हणविल्या जातात. ज्या "मी सखीदासी आहे"–असे मानून कृष्णापेक्षाही अधिक आपल्या सखीस स्नेह करतात, त्या सखींमध्ये अधिक स्नेहयुक्त म्हणविल्या जातात.

विजय–त्या कोण आहेत?

गोस्वामी–पाच प्रकारच्या सख्यांमध्ये ज्यांना केवळ सखी म्हटले गेले आहे, त्या कृष्णस्नेहाधिका सखी आहेत आणि या पाचांमध्ये प्राणसखी आणि नित्यसखी–या दोन्ही प्रकारच्या सख्याही सखी स्नेहाधिका आहेत.

विजय–समस्नेह सख्या कोण आहेत?

गोस्वामी–ज्यांचा कृष्ण आणि यूथेश्वरी दोघांप्रती समान स्नेह असतो, त्या समस्नेहा आहेत.

विजय–सख्यांमध्ये सर्वश्रेष्ठ कोण आहे?

गोस्वामी–ज्या सख्या श्रीमती राधा आणि कृष्ण दोघांप्रती समान प्रेम राखीतही स्वतःस श्रीराधेचे निजजन (प्रियपात्री) समजतात, त्या सर्वश्रेष्ठ आहेत आणि त्यांस प्रियसखी आणि परमश्रेष्ठसखी म्हटले जाते.

विजय–प्रभो! सखींमध्ये पक्ष आणि प्रतिपक्षाचा भेद कसा काय असतो?

गोस्वामी–समस्त व्रजसुंदऱ्या स्वपक्ष, सुहृद-पक्ष, तटस्थ आणि प्रतिपक्ष भेदाने चार प्रकारच्या असतात. सुहृद-पक्ष आणि तटस्थ हे प्रासंगिक आहेत. स्वपक्ष आणि प्रतिपक्ष भेदच रसप्रद आहेत.

विजय–स्वपक्ष-प्रतिपक्षाचे विशेष रूपाने वर्णन करावे.

गोस्वामी–स्वपक्षासंबंधी साधारणतः मी सर्व गोष्टी सांगितल्या आहेत. आता सुहृद-पक्ष आदी भेदांस सांगेन. इष्ट साधक आणि अनिष्ट साधक भेदाने सुहृद-पक्ष दोन

प्रकारचे असतात. ज्या विपक्षाच्या सुहृद्-पक्ष असतात, त्या तटस्थ म्हणविल्या जातात.

विजय–आता विपक्षासंबंधी सांगावे.

गोस्वामी–ज्या इष्टहानी आणि अनिष्ट करीत विरुद्ध आचरण करतात, त्या परस्पर विद्वेषवशतः विपक्ष म्हणविल्या जातात. कपट, ईर्ष्या, चपलता, असूया, मत्सरता, दुःख आणि गर्व आदी भावसमूह विपक्ष सखींमध्ये प्रकाशित होतात.

विजय–गर्व कसा व्यक्त होतो?

गोस्वामी–अहंकार, अभिमान, दर्प, उद्धसित, मद आणि औधत्य भेदाने गर्व सहा प्रकारचे व्यक्त होतात.

विजय–येथे अहंकार कसा होतो?

गोस्वामी–आपल्या पक्षाच्या गुणवर्णनाच्या समयी दुसऱ्या पक्षाच्या प्रती जो आक्षेप होतो, त्यास अहंकार म्हटले आहे.

विजय–येथे अभिमानाचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–भाव-भंगीमेद्वारे स्वपक्षाच्या प्रेमोत्कर्षतेस व्यक्त करणेच 'अभिमान' आहे.

विजय–दर्प कशास म्हणतात?

गोस्वामी–विहारोत्कर्षसूचक गर्वच 'दर्प' म्हणवला जातो.

विजय–उद्धसित कशास म्हणतात?

गोस्वामी–विपक्षाप्रती जो साक्षात उपहास असतो, त्यास 'उद्धसित' म्हणतात.

विजय–मद कशास म्हणतात?

गोस्वामी–जो गर्व सेवा आदीच्या उत्कर्षतेस साधतो, त्यास येथे 'मद' म्हटले गेले आहे.

विजय–औद्धत्य काय आहे?

गोस्वामी–स्पष्टपणे आपल्या उत्कर्षांचे वर्णन करणेच औद्धत्य आहे. सख्यांची श्लिष्ट उक्ती आणि निंदा गर्व असतो.

विजय–यूथेश्वरीसुद्धा साक्षातपणे ईर्ष्या प्रकाशित करतात का?

गोस्वामी–नाही, यूथेश्वरी मोठ्या गंभीर असतात. त्या विपक्षाप्रती साक्षात रूपाने ईर्ष्या प्रकाशित करीत नाहीत, इतकेच काय तर सख्या प्रखरा असूनही त्या विपक्षाच्या यूथेश्वरींसमोर छोट्या गोष्टी बोलत नाहीत.

विजय–प्रभो! व्रजलीलेत यूथेश्वरी नित्यसिद्ध भगवच्छक्ती आहेत. त्यांच्यात अशाप्रकारे द्वेष आदी भाव असण्याचे तात्पर्य काय आहे? हे सर्व पाहून तार्किक लोक व्रजलीलेच्या परमतत्त्वाप्रती अवज्ञा करतात, त्याची खिल्ली उडवितात. ते म्हणतात की जर परमतत्त्वामध्येसुद्धा असे ईर्ष्या आदी भाव राहिले, तर या सांसारिक कार्यांमध्ये ईर्ष्या आदींस वाईट दृष्टीने का पाहिले जाते? त्यांच्यात वैराग्याचे काय कारण आहे? प्रभो! आम्ही श्रीधाम नवद्वीपामध्ये निवास करतो, तेथे श्रीकृष्णचैतन्यदेवांच्या इच्छेने सर्व प्रकारचे बहिर्मुख लोक दिसून येतात, कुणी नितांत कर्मकांडी असतात, कोणी वन्ध्या तर्कप्रिय असते, कोणी ज्ञानकांडी असते आणि अधिकांश तर निंदक असतात. ते लोक कृष्णलीलेमध्ये दोष काढतात तथा त्या अपूर्व आणि चिन्मयी लीलांस मायिक समजून तिची अवहेलना करतात. कृपा करून आपण या विषयास स्पष्टपणे समजाविण्याची कृपा करावी, ज्यामुळे माझे चित्त दृढ होऊ शकेल.

गोस्वामी–जे नितांत अरसिक आहेत, तेच असे म्हणू शकतात की हरिप्रियजनांमध्ये द्वेष आदींचा प्रयोग करणे अनुचित आहे. याविषयी गूढपणे विचार केल्यावर असे पाहिले जाते की कोटी कामदेवांनासुद्धा मोहित करणाऱ्या अघनाशक कृष्णाचे प्रियनर्म सखा श्रृंगाररस व्रजात मूर्तिमान होऊन विराजमान आहेत. तेच विजातीय भावमय पक्षांसंबधी परस्पर सपरिवार ईर्ष्या आदींना मिलनाच्या वेळी कृष्णाच्या परितुष्टीकरिता नियुक्त करीत असतात, परंतु वास्तविक त्यांच्यात परस्पर ईर्ष्या नसते. त्यांची ईर्ष्या आदी स्नेहाचेच रूपांतरमात्र आहे.

विजय–प्रभो! आम्ही लोक क्षुद्र जीव आहोत, इतका गूढ विषय आमच्या हृदयात सहसा उदित होत नाही. आपण कृपा करून या विषयास अशा प्रकारे स्पष्टपणे सांगावे जेणेकरून आम्ही त्यास सहजच समजू शकू आणि आमचे मंगल होईल.

गोस्वामी–प्रेमरस दुधाच्या समुद्रासमान आहे. त्यात वितर्करूप गोमूत्र मिळविल्याने वैरस्य होते. याविषयी तत्त्वविचार करणे चांगले नसते. कारण अत्यंत सुकृतीच्या फलस्वरूप भक्तिदेवी ज्यांच्या हृदयात चिदाल्हादिनीचा प्रकाश प्रदान करते, ते तर्काविनाच सार सिद्धांतास प्राप्त करतात. दुसरीकडे, जे लोक मायिक तर्क-वितर्क आणि जडीय पांडित्याच्या बलावर या सिद्धांतास हृदयंगम करू इच्छितात, त्यांच्या हृदयात ते अचिंत्य सिद्धांतसमूह उदित होत नाहीत, उलट कुतर्काच्या बदल्यात कुतर्कच उत्पन्न होतात. परंतु तू परम सौभाग्यशाली जीव आहेस. भक्तीच्या कृपेने सर्वकाही समजून घेतले आहेस, तरीही सिद्धांताच्या दृढतेकरिता मला विचारीत आहेस. मी तुला अवश्य सांगेन. तू तार्किकही नाहीस आणि कर्मकांडीही नाहीस व ज्ञानकांडीही नाहीस. तू संयमी अथवा नितांत वैधीभक्तीचा उपासकही नाहीस. मला तुला कुठलाही सिद्धांत सांगण्यास आपत्ती नाही. जिज्ञासू दोन प्रकारचे असतात–एक प्रकारचे जिज्ञासू केवळ शुष्क युक्ती अवलंबन करून जिज्ञासा करतात, दुसऱ्या प्रकारचे जिज्ञासू भक्तीच्या सत्तेवर विश्वास ठेवून स्वतःसिद्ध प्रत्यय ज्यामुळे संतुष्ट होऊ शकेल, त्याच प्रकारचा विचार करतात. शुष्क युक्तिवादींच्या जिज्ञासेस कधीही उत्तर देऊ नये, कारण ते लोक यथार्थ सत्य गोष्टीवर कदापि विश्वास करणार नाहीत. त्यांची युक्ती मायाबद्ध असते, म्हणून अचिंत्य भावांच्या संबधात पंगू असते, बरीच उठाठेव करूनही त्यांची बुद्धी अचिंत्य विषयात जरासुद्धा प्रवेश करू शकत नाही. परमेश्वराचा त्यांचा उरला-सुरला विश्वासही संपून जातो–हेच वितर्काचे चरमफल आहे. भक्तिपक्षाचे विचारकगण आपापल्या अधिकार भेदाने अनेक प्रकारचे असतात. श्रृंगाररसात ज्यांचा अधिकार उत्पन्न झालेला आहे, केवळ तेच सद्गुरूची प्राप्ती झाल्यानंतर या गूढ तत्त्वांस समजू शकतात. विजय! वृन्दावन लीलारस किती अपूर्व रस आहे! जडजगाच्या श्रृंगाररसाप्रमाणे दिसून येणारे तत्त्व असूनही हा त्याहून सर्वथा विलक्षण आहे. रासपंचाध्यायी (श्रीमद्भा. १०/३३/३०) मध्ये असे म्हटले गेले आहे की जे या लीलेचे पूर्ण चिंतन करतात, त्यांचा हृद्रोग मुळासकट दूर होतो. बद्धजिवाचा हृद्रोग काय आहे? जडीय काम. रक्त, मांस आदी सप्तधातुमय जे स्त्री-

पुरुषाभिमानी शरीर आणि मन, बुद्धी व अंहकारगत वासनामय अभिमानरूप लिंगशरीरास आश्रय करून जो काम राहतो. त्यास सहजच दूर करण्याची कुणाचीही शक्ती नाही. तो काम केवळ व्रजलीलेच्या अनुशीलनानेच दूर करता येऊ शकतो. या सिद्धांतामध्ये तू वृन्दावनलीलेच्या श्रृंगाररसाची एक परम चमत्कारिता बघू शकतोस. तू असाही अनुभव करशील की हा अप्राकृत श्रृंगाररस आत्माराम-लक्षण निर्विशेष ब्रह्मास अत्यंत दूर फेकून–तुच्छ प्रतिपादित करून स्वयं नित्य विराजमान आहे. इतकेच नाही तर हा श्रृंगाररस ऐश्वर्यमय चित्-जगत अर्थात परव्योम वैकुण्ठाच्या रसास अत्यंत लघू करीत नित्य दैदीप्यमान आहे. या रसाची महिमा सर्वात जास्त आहे. यात सांद्रानंद आहे. शुष्कानंद, जडानंद, संकुचितानंद–हे सर्व काहीही नाही. हा पूर्णानंद स्वरूप आहे. या पूर्णानंदात जे अनंत विचित्र भाव आहेत, ते रसाची पूर्णता साधण्याकरिता अनेक ठिकाणी परस्पर विजातीय भावापन्न आहेत. ते विजातीय भावसमूह कुठे कुठे स्नेहात्मक असतात आणि कुठे कुठे द्वेष आदी भावात्मक असतात. परंतु जडीय द्वेष आदी भाव ज्याप्रकारे हेय (हीन) आणि दोषपूर्ण असतात, अप्राकृत रसाचे हे भावसमूह तसे नसतात. हे तर परमानंदाचेच विकारवैचित्र्य मात्र आहेत. रससमुद्राच्या लहरींप्रमाणे उठून समुद्रास लहरवित असतात. असो, श्रीरूप गोस्वामींचा सिद्धांत हा आहे की भाव–विचित्र आहेत. जे भावसमूह सर्वप्रकारे सजातीय आहेत, ते स्वपक्षगत भाव आहेत. जेथे थोडीशी विजातीयता परंतु अधिक स्वजातीयता आहे, ते सुहृद्-पक्षगत भाव आहेत. जेथे विजातीयता अधिक आणि सजातीयता अल्प असते, ते भाव तटस्थ भाव म्हणविले जातात. आणि जेथे संपूर्णपणे विजातीयता असते तेथे ते भावसमूह विपक्षगत भाव असतात. एक गोष्ट आणखी आहे, ज्यावेळी भाव विजातीय असतात, त्यावेळी परस्पर रूचिप्रद नसतात, म्हणूनच ते परमानन्द रसामध्ये ईर्ष्या आदींसारख्या भावांस निर्माण करतात.

विजय–पक्ष आणि विपक्ष भावांची आवश्यकता का असते?

गोस्वामी–दोन नायिकांचे भाव ज्यावेळी परस्पर एकसमान असतात, त्यावेळी पक्ष आणि विपक्ष भावांचा उदय होतो. म्हणून मैत्र-भाव आणि विद्वेष-भाव रस-विकाराच्या रूपात कार्य करतात. तेसुद्धा अखंड श्रृंगाररसाच्या परम माधुर्याच्या समृद्धीकरिताच असतात, असे समजावे.

विजय–श्रीमती राधा आणि श्रीमती चन्द्रावली–या दोघीही तत्त्व-दृष्टीने समान शक्ती आहेत काय?

गोस्वामी–नाही, नाही, श्रीमती राधाच महाभावमयी, ल्हादिनी-सारस्वरूपा आहे, चन्द्रावली श्रीराधेची कायव्यूह आहे तथा श्रीराधेपेक्षा अनंत अंशांनी लघू आहे. तथापि श्रृंगाररसात श्रीराधेच्या प्रेमरसाच्या पुष्टीकरिता चन्द्रावलीमध्ये राधेच्या साम्यतेचा एक भाव देऊन विपक्षता उत्पन्न केली आहे. मग पहा, दोन्ही यूथेश्वरींमध्ये भावाची संपूर्ण सजातीयताही नाही होऊ शकत. जर कुण्या अंशामध्ये असे झाले तरी ते केवळ वाळवीद्वारे कुरतडलेल्या अक्षरासमान योगायोगाने असते. वास्तविक रसाच्या स्वाभाविक रूपातही स्वपक्ष-विपक्ष भावांचा उदय होतो.

विजय–प्रभो, माझे जे थोडे-फार संशय होते, तेदेखील दूर झालेत. आपले मधुर उपदेश माझ्या कानांच्या मार्गे हृदयात प्रवेश करून तेथील सगळी कटुता ध्वंस करीत आहेत. मी मधुररसाच्या विभावगत आलंबनास संपूर्णपणे समजलो. सच्चिदानंद कृष्णच एकमात्र नायक आहेत. मी त्यांचे गुण, रूप आणि क्रियांचे ध्यान करतो आहे. धीरोदात्त, धीरललित, धीरशांत आणि धीरोद्धत स्वभावाचे तेच नायक, पती आणि उपपती रूपात रसामध्ये नित्यलीलामय आहेत. त्याचप्रकारे ते अनुकूल, दक्षिण, शठ आणि धृष्टदेखील आहेत. चेट, विट, विदूषक, पीठमर्दक आणि प्रियनर्मसखाद्वारे सदा सेवित आहेत, वंशी वाजविणे त्यांना प्रिय आहे. आज मधुररसाचे विषयरूप कृष्ण माझ्या हृदयात उदित झाले आहेत. सोबतच मधुररसाचा आश्रय असणाऱ्या व्रजललनांचे तत्त्वदेखील समजलो. या ललनाच नायिका आहेत. स्वकीया आणि परकीया भेदाने नायिका दोन प्रकारच्या असतात. व्रजामध्ये परकीया नायिकाच श्रृंगाररसाच्या आश्रय आहेत. त्या साधनापरा, देवी आणि नित्यप्रिया भेदाने तीन प्रकारच्या असतात. व्रजललना यूथांमध्ये विभक्त होऊन कृष्णाची सेवा करतात. कोट्यवधी व्रजललना अनेक यूथेश्वरींच्या अधीन असतात. सर्व यूथेश्वरींमध्ये श्रीराधा आणि चन्द्रावली प्रधान आहेत. सखी, नित्यसखी, प्राणसखी, प्रियसखी आणि परमश्रेष्ठसखी–हे पाच प्रकारचे भेद श्रीराधेच्या यूथामध्ये आहेत. ललिता आदी अष्टसख्या परमश्रेष्ठ सख्या आहेत. ललिता, आदी यूथेश्वरी होण्यायोग्य असूनही त्या श्रीराधेच्या अनुगत सखी राहण्याच्या इच्छेमुळे वेगळ्या यूथास निर्माण करीत नाहीत. त्यांच्या अनुगत सख्या त्यांचा गण म्हणविल्या जातात–जसे ललितागण, विशाखागण इत्यादी. नायिका मुग्धा, मध्या आणि प्रगल्भा भेदाने तीन प्रकारच्या

असतात. आणि या तिघांमधून मध्या आणि प्रगल्भा वेगवेगळ्या धीरा, अधीरा आणि धीराधीरा भेदाने सहा प्रकारच्या असतात. या सहांमध्ये मुग्धेस मिळवून सात प्रकारच्या असतात. या सातही स्वकीया आणि परकीया भेदाने चौदा प्रकारच्या आहेत. यात एका कन्या मिळून पंधरा प्रकारच्या नायिका असतात. नायिकांच्या अभिसारिका आदी आठ अवस्था असतात. पुनः उत्तमा, मध्यमा आणि कनिष्ठाच्या भेदाने सर्व मिळून एकूण १५ X ८ X ३=३६० प्रकारच्या नायिका असतात. यूथेश्वरींचे सुहृद् आदी व्यवहार आणि त्यांची तात्पर्येसुद्धा हृदयात उदित झाली. मी दूत्यकार्य आणि सखीकार्य या दोहोंसही समजलो. रसाचे विषय आणि आश्रय यांना एकत्रित केल्याने विभावांतर्गत आलंबनतत्त्वसुद्धा समजले. उद्या उद्दीपनाविषयी जाणून घेईन. कृष्णाची मजवर अपार करुणा आहे की आपल्यासारख्या सद्गुरूंचा संग प्राप्त करू शकलो. मी आपल्या मुखविगलित अमृताचे पान करूनच पुष्ट होऊन जाईन.

गोस्वामींनी विजयला उराशी कवटाळीत म्हटले–बेटा! तुझ्यासारखा शिष्य मिळाल्याने मीसुद्धा कृतकृत्य झालो आहे. तू जितकी अधिक जिज्ञासा करतोस, श्रीनित्यानन्द माझ्या मुखातून त्या सर्व प्रश्नांची उत्तरे देत आहेत. दोघांच्याही नेत्रांतून प्रेमाश्रू वाहू लागले.

विजयचे सौभाग्य पाहून श्रीध्यानचन्द्र आदी महात्मावर्ग परमानंदात मग्न झाले. त्याचवेळी राधाकान्त मठात बाहेरून काही शुद्ध वैष्णव पोहोचले आणि चण्डीदासाचे निम्नलिखित पद गाऊ लागले–

**सइ (सखी)! केवा शुनाइले श्याम नाम ?**
**कानेर भितर दिया, मरमे पशिल गो,**
**आकुल करिल मोर प्राण॥**
**ना जानि कतेक मधु, श्यामनामे आछे गो,**
**वदन छाड़िते नाहि पारे।**
**जपिते-जपिते नाम, अवश करिल गो,**
**केमने पाइबो सइ तारे॥**
**नाम परतापे जार, ऐछन करिल गो,**
**अङ्गेर परशे किवा हय।**
**जेखाने वसति तार, नयने देखिया गो,**

**युवति धरम कैछे रय॥**
**पाशरिते करि मने, पाशरा ना जाय गो,**
**कि करिब कि हबे उपाय।**
**कहे द्विज चण्डीदासे, कुलवती कुलनाशे,**
**आपनार यौवन जाचाय॥**

मृदंग आणि टाळांच्या गजरात दीड तास उपरोक्त कीर्तन करीत करीत सगळेजण प्रेममग्न झाले. त्यांचा आवेश काही कमी झाल्यावर विजयकुमार सर्व वैष्णवांस यथायोग्य सन्मान देऊन आणि श्रीगुरुगोस्वामींस साष्टांग दंडवत प्रणाम करून हरचण्डीसाहीला निघाले.

**॥ चौतीसावा अध्याय समाप्त ॥**



# पस्तीसावा अध्याय (मधुररस-विचार)

दुसऱ्या दिवशी भोजनानंतर विजयकुमार योग्य वेळी श्रीगुरुगोस्वामींच्या चरणी उपस्थित झाले आणि साष्टांग दंडवत प्रणाम करून त्यांच्या चरणी गडाबडा लोळू लागले. गोस्वामींनी त्यांना उठवून हृदयाशी घट्ट कवटाळिले आणि अत्यंत प्रेमाने आपल्या जवळ बसविले. सुयोग पाहून विजयकुमारने विचारले–प्रभो! मी मधुररसाच्या उद्दीपनांस समजू इच्छितो. आपण कृपा करून सांगावे.

विजयकुमारचे बोलणे ऐकून श्रीगुरुगोस्वामी म्हणाले–मधुररसामध्ये कृष्ण आणि कृष्णवल्लभागणांचे गुण, नाम, चरित्र, मंडनसंबंधी आणि तटस्थ–हे सर्व विषय उद्दीपन-विभाव आहेत.

विजय–आधी गुणांविषयी सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–गुण तीन प्रकारचे असतात–मानस, वाचिक आणि कायिक.

विजय–या रसांमध्ये मानस गुण किती प्रकारचे असतात?

गोस्वामी–कृतज्ञता, क्षमा आणि करुणादी अनेक प्रकारचे मानस गुण आहेत.

विजय–वाचिक गुण किती प्रकारचे आहेत?

गोस्वामी–कानांना आनन्द देणारे वचनच वाचिक गुण आहेत.

विजय–कायिक गुण किती प्रकारचे आहेत?

विजय–वयस, रूप, लावण्य, सौंदर्य, अभिरूपता, माधुर्य, मार्दव आदी कायिक गुण आहेत. या रसामध्ये वयःसंधी, नव्यवयस, व्यक्तवयस आणि पूर्णवयस–हे चार प्रकारचे मधुररसाश्रित वयस आहेत.

विजय–वयःसंधी कशास म्हणतात?

गोस्वामी–बाल्य आणि यौवनाच्या संधीस वयःसंधी म्हणतात. त्याचेच नाव

प्रथम कैशोर आहे. संपूर्ण किशोरावस्था वयःसंधीच्या अंतर्गत असते. पौंगडास बाल्य म्हटले जाऊ शकते. कृष्ण आणि प्रियांची वयःसंधि-माधुर्यच–उद्दीपन आहे.

विजय–नव्यवयस कशास म्हणतात?

गोस्वामी–नवयौवन, काहीसे उन्नत स्तन, नेत्रांमध्ये चंचलता, मंदहास्य आणि मनाची थोडी-थोडी विक्रिया होणे आदी नव्यवयसाची लक्षणे आहेत.

विजय–व्यक्तवयस कसे असते?

या प्रश्नाच्या मध्येच एक वैष्णव आणि एक शंकरमठाचे पंडित संन्यासी देवदर्शनाकरिता उपस्थित झाले. वैष्णवास स्वतःमध्ये पुरुषरूप दासाभिमान होता आणि शंकर संन्यासी शुष्क ब्रह्म-चिंतेमध्ये मग्न होते. म्हणूनच त्यापैंकी कुणातच व्रजगोपी अभिमान नव्हता. पुरुषाभिमानी व्यक्तीजवळ रस-कथेचे परीक्षण करण्यास निषेध असल्याने गोस्वामी आणि विजय दोघेही गप्प झाले आणि आगंतुक वैष्णव व एकदंड सन्यांशासोबत अवांतर साधारण गप्पा करू लागले. काही वेळानंतर जेव्हा ते दोघे सिद्धबकुळाकडे गेले, तेव्हा विजयने थोडेसे हसून पुनः आपल्या प्रश्नास विचारले.

गोस्वामी–व्यक्तवयसामध्ये स्तन स्पष्टपणे उभारून आलेले असतात, मध्यदेशी त्रिवली पडलेली असते तथा संपूर्ण अंगांची उज्ज्वल कांती झळाळू लागते.

विजय–पूर्णवयस कसे असते?

गोस्वामी–ज्या वयामध्ये नितंब (कमरेच्या मागचा उभरलेला फुगीर भाग) उंच होतात, मध्यदेश क्षीण होतो, समस्त अंग उज्जवल कांतीने युक्त होते, स्तन स्थूलाकार होतात, जांघा कर्दळी वृक्षाप्रमाणे होतात, त्या वयसास पूर्णवयस म्हणतात. कुण्या-कुण्या व्रजसुंदरींच्या अल्पतारुण्य अवस्थेमध्येसुद्धा पूर्णयौवन दिसून येते.

विजय–वयसाविषयी अवगत झालो. आता रूपासंबंधी सांगावे.

गोस्वामी–आभूषणरहित झाल्यावरही भूषिताप्रमाणे सुंदर दिसण्यास ‘रूप’ म्हणतात. सुंदर रूपात अवयव न्यस्त झाल्यावरच सुंदर रूप दिसते.

विजय–लावण्य कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्याप्रमाणे मोत्यातून एक छटा निघते, त्याचप्रमाणे अंगांतून जी छटा बाहेर पडते, त्यास लावण्य म्हणतात.

विजय–सौंदर्य कशास म्हणतात?

गोस्वामी–अंग प्रत्यंगांचा यथोचित रूपे सन्निवेश असावा आणि त्यांच्या संधींची स्थाने सुंदर असावीत–असे झाल्यास सौंदर्य दिसून येते.

विजय–अभिरूपता कशास म्हणतात?

गोस्वामी–आपल्या आश्चर्यजनक गुणांद्वारे आपल्या निकट स्थित दुसऱ्या वस्तूंस सुद्धा आपले सारूप्य (आपल्या समान रूप) प्राप्त करविण्याचे नाव–अभिरूपता आहे.

विजय–माधुर्य कशास म्हणतात?

गोस्वामी–शरीराच्या एखाद्या अनिर्वचनीय रूपास माधुर्य म्हणतात.

विजय–मार्दव कशास म्हणतात?

गोस्वामी–कोमल वस्तूंचा स्पर्शसुद्धा सहन न होणे म्हणजेच मार्दव होय. मार्दव तीन प्रकारचे असते–उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ.

विजय–प्रभो! गुणांस समजलो. आता नामाच्या संबंधी सांगावे.

गोस्वामी–रसभावगर्भ अर्थात परम रहस्यमय गूढ रसांनी पूर्ण राधा-कृष्ण आदी नामेच नामे आहेत.

विजय–आता चरिताच्या संबंधी सांगावे.

गोस्वामी–चरित दोन प्रकारची असतात–अनुभाव आणि लीला. विभाव समाप्त झाल्यावर अनुभावासंबंधी सांगेन.

विजय–मग आता लीलांच्या संबंधीही सांगावे.

गोस्वामी–सुंदर क्रीडा, नृत्य, वेणु-वादन, गोदोहन, पर्वतावरून गायींना बोलाविणे आणि त्यांची गणना करणे–यांना लीला म्हणतात.

विजय–सुंदर क्रीडा कशास म्हणतात?

गोस्वामी–रासलीला, चेंडू खेळणे, पशु-पक्ष्यांची बोली बोलणे आदी अनंत क्रीडा आहेत.

विजय–मंडन कशास म्हणतात?

गोस्वामी–वस्त्र, आभूषण, माला आणि अनुलेपन–ही चार प्रकारची मंडने आहेत.

विजय–संबंधी कोणास म्हणतात?

गोस्वामी–लग्न अर्थात संयुक्त आणि सन्निहित भेदाने संबंधी-द्रव्ये दोन प्रकारची असतात.

विजय–लग्न कशास म्हणतात?

गोस्वामी–वंशी-रव, श्रृंग-ध्वनी, गीत, सौरभ, भूषणांचा झंकार, चरण-चिन्ह, वीणा स्वर, शिल्प कौशल्य आदी 'लग्न संबंधी' म्हणविले जातात.

विजय–वंशी-रव कसा असतो?

गोस्वामी–कृष्णाच्या ओठांतून जे मुरली-नादामृत निघते ते समस्त प्रकारच्या उद्दीपनांमध्ये प्रधान आहे.

विजय–आता कृपा करून सन्निहित-संबंधीचे वर्णन करावे.

गोस्वामी–निर्माल्य, मयूर-पुच्छ, पर्वतातून उत्पन्न गैरिक आदी धातू, गाई, लाठी, वेणू, श्रृंगी, कृष्णाच्या प्रिय व्यक्तींचे दर्शन, गोधुली, वृन्दावन, वृन्दावनाश्रित वस्तू, गोवर्धन, यमुना आणि रासस्थळ आदींना 'सन्निहित संबंधी' म्हणतात.

विजय–वृन्दावनाश्रिताचे काय तात्पर्य आहे?

गोस्वामी–मृग आदी पशू, मयूर आदी पक्षी, भ्रमर, कुंज, लता, तुळशी, पुष्प, कदंब आदी हे सर्व वृन्दावनाश्रित आहेत.

विजय–'तटस्था' कशास म्हणतात?

गोस्वामी–चंद्रिका अर्थात ज्योत्स्ना, मेघ, विद्युत, वसंत, शरद, पूर्णचंद्र, वायू आणि मयूर आदी पक्षी–हे सर्व तटस्थ आहेत.

उद्दीपन भावांस यथायोग्य ऐकल्यानंतर विजयकुमार क्षणभर गप्प राहिले. आलंबनासोबत उद्दीपन भाव मिळाल्याने त्यांच्या हृदयात एका परम भावाचा उदय झाला. त्याचबरोबर त्यांच्या शरीरात अनुभावही प्रकाशित होऊ लागले. ते गद्गद स्वरात म्हणाले–प्रभो! आता कृपा करून अनुभावांचे विस्तारपूर्वक वर्णन करावे. आपण कृष्णचरित्राच्या एका आंशिक लीलेचा विषय सांगितला आहे. अनुभाव जाणल्यावर कृष्ण चरित्रास संपूर्णपणे जाणू शकेन.

गोस्वामी–अनुभाव तीन प्रकारचे असतात–अलंकार, उद्भास्वर आणि वाचिक.

विजय–अलंकार कशास म्हणतात?

गोस्वामी–व्रजललनांच्या यौवनकाळात वीस प्रकारचे अलंकार सत्त्वज म्हटले गेले आहेत. कांताच्या प्रती अत्यधिक अभिनिवेशजन्य हे अद्भुतपणे उदित होतात. या २० प्रकारच्या अलंकारांस तीन श्रेणींमध्ये विभक्त केले आहे–

(१) अंगज, (२) अयत्मज आणि (३) स्वभावज.

अंगज–(१) भाव, (२) हाव, (३) हेला.

अयत्मज–(४) शोभा, (५) कांती, (६) दीप्ती, (७) माधुर्य, (८) प्रगल्भता, (९) औदार्य, (१०) धैर्य.

स्वभावज–(११) लीला, (१२) विलास, (१३) विच्छित्ती, (१४) विभ्रम, (१५) किलकिंचित, (१६) मोट्टायित, (१७) कुट्टमित, (१८) विव्वोक, (१९) ललित, (२०) विकृत.

विजय–येथे भावाचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–उज्ज्वलरसात निर्विकार चित्तावर रती नामक बीजस्थानीय भाव उदित झाल्यावर जो सर्वप्रथम विकार होतो, त्यास 'भाव' म्हणतात. चित्ताची अविकृत अवस्था म्हणजे 'सत्त्व' आहे. विकृतीचे कारण उपस्थित झाल्यावर बिजाच्या आदी विकाराप्रमाणे जो आदी विकार होतो–त्यास 'भाव' म्हणतात.

विजय–हाव कशास म्हणतात?

गोस्वामी–मान तिरकी करून भुवई आणि नेत्र आदी विकासासोबत भावाच्या अधिकतर प्रकाशशील अवस्थेस 'हाव' म्हणतात.

विजय–हेला कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्यावेळी हाव स्पष्ट रूपात श्रृङ्गारसूचक होतो, तेव्हा त्यास 'हेला' म्हणतात.

विजय–शोभा कशास म्हणतात?

गोस्वामी–'रूप' संभोग आणि तारुण्य आदींद्वारे अंगांचे विभूषणच 'शोभा' आहे.

विजय–कांती कशास म्हणतात?

गोस्वामी–मन्मथतर्पणाद्वारे (कामतृप्ती विधानात) जी उज्ज्वल शोभा होते, तीच कांती आहे.

विजय–दीप्ती कशास म्हणतात?

गोस्वामी–वयस, भोग, देश, काल, गुण, रूप आणि वेष आदींद्वारे उदीप्त होऊन ज्यावेळी कांती विस्तृत होते, त्यावेळी त्यास 'दीप्ती' म्हणतात.

विजय–माधुर्य कशास म्हणतात?

गोस्वामी–कृतिसमुहाच्या सर्व अवस्थांमध्ये जी चारुता असते, तेच येथे माधुर्य आहे.

विजय–प्रगल्भता कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रयोगाच्या वेळच्या निडरतेस प्रगल्भता म्हणतात. कांताच्या अवयवांवर आपले अवयव ठेवणेच येथे 'प्रयोगा'चे तात्पर्य आहे.

विजय–औदार्य कशास म्हणतात?

गोस्वामी–सर्वावस्थागत विनयास 'औदार्य' म्हणतात.

विजय–धैर्य कसे असते?

गोस्वामी–चित्तवृत्तीचा स्थिर भावच धैर्य आहे.

विजय–येथे लीला कशास म्हटले गेले आहे?

गोस्वामी–परम रमणीय वेष आणि क्रिया आदींद्वारे प्रियतमाचे अनुकरण करणेच 'लीला' आहे.

विजय–विलास कशास म्हणतात?

गोस्वामी–गमन, स्थिती, आसन, मुख आणि नेत्र आदींचे प्रियतमासोबत संगमाकरिता जी तात्कालिक वैशिष्ट्ये असतात तीच विलास आहेत.

विजय–विच्छित्ती कशास म्हणतात?

गोस्वामी–अल्पवेष रचनेनेच जर कांतीची पोषकता होत असेल, तर त्या वेष-रचनेस विच्छित्ती म्हणतात. काही-काही रसज्ञांच्या मतानुसार अपराधी कांताचे आगमन झाल्यावर जेव्हा नायिकेच्या मनात असा भाव उठतो की तिने आपल्या सखींच्या आग्रहाखातरच आभूषणे धारण केलेली आहेत (भाव हा की तिला आभूषणे भार स्वरूप वाटतात)–अशा प्रकारे ईर्ष्या-अवज्ञावती स्त्रीच्या भावासही विच्छित्ती म्हणतात.

विजय–विभ्रम कशास म्हणतात?

गोस्वामी–आपल्या प्रियतमासोबत मिलनसमयी प्रबळ मदनवेगामुळे हार आणि माला आदी भूषणांस जेथे धारण करावयास हवे, तेथे धारण न करता दुसऱ्याच ठिकाणी धारण करण्यास 'विभ्रम' म्हणतात.

विजय–किलकिंचित कशास म्हणतात?

गोस्वामी–हर्षाकरिता गर्व, अभिलाष, रोदन, हास्य, असूया, भय आणि क्रोध–या सर्वांसोबत एकत्र येऊन मिळण्यास 'किलकिंचित' म्हणतात.

विजय–मोट्टायित कशास म्हणतात?

गोस्वामी–कांताचे स्मरण आणि त्याची वार्ता मिळाल्यावर नायिकेच्या हृदयात जो भाव होतो, त्या भावामुळे जी अभिलाषा उत्पन्न होते–त्यास 'मोट्टायित' म्हणतात.

विजय–कुट्टमित कशास म्हणतात?

गोस्वामी–स्तन वा अधर आदी ग्रहण करतेवेळी नायिकेच्या हृदयात प्रीती (आनंद) झाल्यावरही संभ्रमा (गौरव, लज्जा आदी) मुळे बाहेरून क्रोधासारखा जो भाव उदित होतो, त्यास 'कुट्टमित' म्हणतात.

विजय–विव्वोक कशास म्हणतात?

गोस्वामी–गर्व आणि मानामुळे आपली प्रिय वस्तू अर्थात कांताप्रती जो अनादर होतो, त्यास विव्वोक म्हणतात.

विजय–ललित कशास म्हणतात?

गोस्वामी–अंग-प्रत्यंगांची विन्यास भंगी आणि भ्रुविलासाची मनोहारिता यामुळे जे सौकुमार्य प्रकाशित होते, त्यास ललित म्हणतात.

विजय–विकृत कशास म्हणतात?

गोस्वामी–लज्जा, मान आणि ईर्ष्या आदींद्वारे आपल्या मनीच्या भावांस वाणीद्वारे प्रकट न करून चेष्टेद्वारे प्रकट करण्यास 'विकृत' म्हणतात. हे वीस प्रकारचे आंगिक आणि चित्तज अलंकार आहेत. त्यांच्या अतिरिक्त रसिकजन मौग्ध्य आणि चकित नामक दोन आणखी अलंकार स्वीकारतात.

विजय–मौग्ध्य कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रियतमाच्याजवळ ज्ञात विषयाच्या संबंधीदेखील अज्ञाताप्रमाणे जिज्ञासा करणे म्हणजेच 'मौग्ध्य' अलंकार आहे.

विजय–आता 'चकित' सांगावे.

गोस्वामी–भयाचे कारण नसतानाही प्रियतमानिकट महाभय प्रकट करण्यास 'चकित' म्हणतात.

विजय–प्रभो! अलंकार समजलो, आता उद्भास्वराच्या संबंधी उपदेश करावा.

गोस्वामी–हृदयातील भाव शरीरावर उद्भासित (प्रकटित) झाल्यावर त्यास 'उद्भास्वर' म्हणतात. मधुररसात नीवी (कमरबंध, मेखला), उत्तरीय वसन, धम्मिल अर्थात केश-बंधन आदींचे स्खलित होणे अथवा सरकणे, अंग मोडणे, जांभई येणे, नासिका प्रफुल्लित होणे, निःश्वास सोडणे, गडबडा लोळणे, गीत, आक्रोशन (स्वतःस कोसणे) आदी–हे सर्व उद्भास्वर आहेत.

विजय–आपण आत्ताच ज्यांना उद्भास्वर म्हटले आहे, त्या सर्वांस मोट्टायित आणि विलासांतर्गत मानणेदेखील चालू शकले असते?

गोस्वामी–तथापि त्यांच्याद्वारे कुण्या विशेष शोभेची पोषकता होते. म्हणून पृथक रूपातच त्यांचे वर्णन केले गेलेले आहे.

विजय–प्रभो! आता वाचिक अनुभावांची व्याख्या करण्याची कृपा करावी.

गोस्वामी–वाचिक अनुभव बारा प्रकारचे आहेत–आलाप, विलाप, संलाप, प्रलाप, अनुलाप, अपलाप, संदेश, अतिदेश, अपदेश, उपदेश, निर्देश आणि व्यपदेश.

विजय–आलाप कशास म्हणतात?

गोस्वामी–चाटुप्रिय उक्तीचे नाव 'आलाप' आहे.

विजय–विलाप कशास म्हणतात?

गोस्वामी–दुःखजनित वाक् प्रयोगाचे नाव 'विलाप' आहे.

विजय–संलाप कशास म्हणतात?

गोस्वामी–उक्ती आणि प्रत्युक्तीयुक्त वार्तालापास 'संलाप' म्हणतात.

विजय–प्रलाप कशास म्हणतात?

गोस्वामी–व्यर्थ आलापास ‘प्रलाप’ म्हणतात.

विजय–अनुलाप कशास म्हणतात?

गोस्वामी–वारंवार एकाच गोष्टीचा आलाप करणेच ‘अनुलाप’ आहे.

विजय–अपलाप कशास म्हणतात?

गोस्वामी–पूर्वोक्त वाक्याचा अर्थ अन्य प्रकारे करण्याचे नाव ‘अपलाप’ आहे.

विजय–संदेश कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रोषितकांताकडे (कुण्या अन्य स्थानी गेलेला कांताकडे) आपला संवाद पाठविणेच ‘संदेश’ आहे.

विजय–अतिदेश कशास म्हणतात?

गोस्वामी–‘‘तिची उक्तीच माझी उक्ती आहे’’, अशा प्रकारचे वाक्यच ‘अतिदेश’ आहे.

विजय–अपदेश कशास म्हणतात?

गोस्वामी–आपल्या वक्तव्य विषयास सरळ न सांगता दुसऱ्या वाक्यांद्वारा व्यक्त करण्याचे नाव ‘अपदेश’ आहे.

विजय–उपदेश कशास म्हणतात?

गोस्वामी–शिकवणपूर्ण वाक्यांस ‘उपदेश’ म्हणतात.

विजय–निर्देश कशास म्हणतात?

गोस्वामी–”मी तीच व्यक्ती आहे”–अशा गोष्टीस निर्देश म्हणतात.

विजय–व्यपदेश कशास म्हणतात?

गोस्वामी–कपट करून (फसवून, कोण्या बहाण्याने) आपली अभिलाषा प्रकट करण्याचे नाव व्यपदेश आहे. हे सर्व अनुभाव सर्व रसांमध्ये आहेत. परंतु

अधिक माधुर्यपोषक असल्यामुळे उज्ज्वलरसामध्येसुद्धा त्यांचे वर्णन केले गेलेले आहे.

विजय–प्रभो! रस-विषयात अनुभवास वेगळ्या रूपात वर्णन करण्याची काय आवश्यकता आहे?

गोस्वामी–आलंबन आणि उद्दीपनाच्या संयोगाने हृदयात जे भाव उदित होतात, ते अवयवांवर प्रकटित झाल्यावर 'अनुभाव' म्हणविले जातात. त्यांना वेगळ्या रूपात न सांगितल्याने विषय स्पष्ट होत नाही.

विजय–मधुररसामध्ये सात्त्विक भावाची व्याख्या करण्याची कृपा करा.

गोस्वामी–स्तंभ, स्वेद आदी अष्ट सात्त्विकभावच, ज्यांस मी प्रथम साधारण रसतत्त्वाच्या विचारामध्ये सांगितले आहे–या रसाचे सात्त्विक भाव आहेत. या रसात त्या भावांची उदाहरणे वेगवेगळ्या रूपात आहेत.

विजय–ती कशी?

गोस्वामी–व्रजलीलेत अशाप्रकारे पाहशील–हर्ष, भय, आश्चर्य, विषाद, अमर्ष–यामुळे स्तंभ-भावाचा उदय होतो. हर्ष, भय, क्रोधामुळे स्वेद अर्थात घाम यांचा उदय होतो. आश्चर्य, हर्ष, भय–यांमुळे रोमांच निर्माण होतात. विषाद, विस्मय, अमर्ष आणि भयाने स्वर-भंग होतो. भय, हर्ष आणि अमर्षाने वेपथू (कंप) होतो. विषाद, क्रोध आणि भयाने वैवर्ण्य (रंग-परिवर्तन) होते. हर्ष, रोष आणि विषादाने अश्रू येतात. सुख आणि दुःखाने प्रलय होतो.

विजय–सात्त्विक विकारांचे काही जातीभेद या रसामध्ये आहेत की नाही?

गोस्वामी–हो, आहेत. मी साधारण रस-विचारात सात्त्विकभावांस धूमायित, ज्वलित, दीप्त आणि उदीप्त म्हटले आहे. या रसात सुदीप्त भाव उदीप्ताचाच एक प्रकारचा भेद आहे.

विजय–प्रभो, माझ्यावर आपली असीम अनुकंपा आहे. आता आपण कृपा करून हे सांगावे की या रसामध्ये व्यभिचारी भावांची स्थिती कशाप्रकारे असते?

गोस्वामी–निर्वेद आदी ज्या तेहतीस (३३) संचारी वा व्यभिचारी भावांविषयी

मी तुला आधी सांगितले आहे, ते सर्व या रसात आहे. उग्रता आणि आलस्य–हे दोन या रसात नसतात. मधुर रसाच्या संचारी भावामध्ये कतिपय विचित्र गोष्टी आहेत.

विजय–त्या विचित्र गोष्टी काय आहेत?

गोस्वामी–पहिली विचित्र गोष्ट ही आहे की सख्य आदी रसांमध्ये सखा आणि गुरुजनांचे जे कृष्णप्रेम असते, तेसुद्धा या मधुररसात संचारीभाव प्राप्त करते, अर्थात त्या रसांमध्ये जे स्थायीभाव असतात, तेच या रसात संचारी वा व्यभिचारी भावात कार्य करतात.

विजय–दुसरी आश्चर्याची गोष्ट काय आहे?

गोस्वामी–दुसरी आश्चर्याची गोष्ट ही आहे की या रसात व्यभिचारी-भावसमूह रसाचे साक्षात अंग मानता येत नाहीत. म्हणून त्यांच्या अंतर्गत मरणादीपण रसाचे अंग नाहीत. त्यांची गणना या युक्तीद्वारे या रसात गुणांच्या अंतर्गत केली जाते. रसच गुणी आहेत आणि तेदेखील गुण आहेत–हा एक सिद्धांत आहे.

विजय–संचारीभाव कसे उत्पन्न होतात?

गोस्वामी–आर्ती, विप्रिय, ईर्ष्या, विषाद, विपत्ती आणि अपराधाने निर्वेद–उत्पन्न होतो.

विजय–दैन्य कसे उत्पन्न होते?

गोस्वामी–दुःख, भय आणि अपराधाने 'दैन्य' होते.

विजय–ग्लानी कशी उत्पन्न होते?

गोस्वामी–श्रम, 'आधी' (मनोव्यथा) आणि रतीने 'ग्लानी' निर्माण होते.

विजय–श्रम कशामुळे उत्पन्न होतो?

गोस्वामी–अधिक भ्रमण केल्याने, नृत्याने आणि रतीने 'श्रम' होतो.

विजय–मद कसा निर्माण उत्पन्न होतो?

गोस्वामी–मधुपानाने 'मद' निर्माण होतो.

विजय–गर्व कसा होतो?

गोस्वामी–सौभाग्य, रूप, गुण, सर्वश्रेष्ठाचा आश्रय तथा इष्टवस्तू लाभाने 'गर्व' होतो.

विजय–शंका कशी उत्पन्न होते?

गोस्वामी–चोरी, अपराध, क्रूरकर्म, विद्युत, भयंकर जनावर आणि भितीदायक शब्दांनी 'शंका' होते.

विजय–आवेग कसा उत्पन्न होतो?

गोस्वामी–प्रियदर्शन, प्रियश्रवण,अप्रियदर्शन आणि अप्रियश्रवणाने आवेग अर्थात किंकर्तव्य-विमूढता उत्पन्न होते.

विजय–उन्माद कसा निर्माण होतो?

गोस्वामी–प्रौढानन्द (महानन्द) आणि विरहाने 'उन्माद' होतो.

विजय–अपस्मार कसा उत्पन्न होतो?

गोस्वामी–दुःखाच्या अधिकतेने उत्पन्न चित्तविप्लवताच अपस्मार आहे. (यात नायिका थरथर कापून पृथ्वीवर मूर्च्छित होऊन पडते.)

विजय–व्याधी कशी होते?

गोस्वामी–ज्वर आदींसारखे विकारच 'व्याधी' आहेत, ज्या चिंता आणि उद्वेग आदींमुळे होतात.

विजय–मोह कशास म्हणतात?

गोस्वामी–हृदयाच्या मुढतेसच 'मोह' म्हणतात, जो हर्ष, विश्लेष आणि विषादाने उत्पन्न होतो.

विजय–मृती (मृत्यू) कशास म्हणतात?

गोस्वामी–या रसात मृत्यू होत नाही. मृत्यूचा प्रयत्नमात्र असतो.

विजय–आलस्य कसे असते?

गोस्वामी–शक्ती असूनही अशक्त असल्याचे ढोंग करणेच 'आलस्य' म्हणविले जाते. या रसामध्ये आलस्य नसते. कृष्ण सेवेमध्ये आलस्यास जरादेखील स्थान नाही. हो, गौण रूपात प्रतिपक्षात ते जरूर दिसून येते.

विजय–जाड्य कसे उत्पन्न होते?

गोस्वामी–आपल्या इष्ट वस्तूच्या दर्शनाने, त्याच्यासंबंधी श्रवण केल्याने, अनिष्टाच्या दर्शनाने तथा विरहाने जाड्य उत्पन्न होते.

विजय–व्रीडा अर्थात लज्जा का होते?

गोस्वामी–नवीन संगम (मिलनादी), अकार्य, स्तव, अवज्ञा आदींनी 'व्रीडा' अर्थात लज्जा उत्पन्न होते.

विजय–अवहित्था कशामुळे उत्पन्न होते?

गोस्वामी–अवहित्था किंवा आकार लपविणे, कपटता, लज्जा, दाक्षिण्य, भय आणि गौरवामुळे होते.

विजय–स्मृती कशामुळे होते?

गोस्वामी–तुल्य वस्तूच्या दर्शनाने आणि दृढ अभ्यासाने 'स्मृती ' होते.

विजय–वितर्क कसा उत्पन्न होतो?

गोस्वामी–विमर्श आणि संशयाने 'वितर्क' जन्मतो.

विजय–चिंता कशास म्हणतात?

गोस्वामी–इष्टाची अप्राप्ती आणि अनिष्टाची आशंका यामुळे 'चिंता' होते.

विजय–मती कशास म्हणतात?

गोस्वामी–विचारोदित अर्थ निर्धारणच 'मती' आहे.

विजय–धृती कशास म्हणतात?

गोस्वामी–मनाची स्थिरताच धृती आहे, जी दुःखाच्या अभावाने आणि आभिलाषेच्या पूर्तीने होते.

विजय–हर्ष कशास म्हणतात?

गोस्वामी–अभीष्ट दर्शन आणि अभीष्ट-प्राप्तीने जी प्रसन्नता होते, तोच 'हर्ष' असतो.

विजय–औत्स्युक्य कशास म्हणतात?

गोस्वामी–इष्ट दर्शनाची लालसा आणि इष्ट प्राप्तीची जी तीव्र उत्कंठा असते, त्यास 'औत्स्युक्य' म्हणतात.

विजय–उग्रता कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रचंडतेचे नावच 'उग्रता' आहे, मधुर रसामध्ये उग्रतेचे स्थान नसते.

विजय–अमर्ष कशास म्हणतात?

गोस्वामी–निंदा आणि अपमानामुळे जी असहिष्णुता होते, त्यास 'अमर्ष' म्हणतात.

विजय–असूया कशास म्हणतात?

गोस्वामी–दुसऱ्याच्या सौभाग्याप्रती विद्वेषच 'असूया' आहे. ही सौभाग्य आणि गुणाने होते.

विजय–चापल कशामुळे उत्पन्न होते?

गोस्वामी–चित्तलाघवास 'चापल' म्हणतात. हे राग आणि द्वेषाने उत्पन्न होते.

विजय–निद्रा कशी येते?

गोस्वामी–क्लम अर्थात थकल्यामुळे निद्रा येते.

विजय–सुप्ती कशास म्हणतात?

गोस्वामी–स्वप्न म्हणजेच ‘सुप्ती’ होय.

विजय–बोध कशास म्हणतात?

गोस्वामी–निद्रा दूर होण्यास ‘बोध’ म्हणतात.

बाबा विजय, या व्यभिचारी भावांव्यतिरिक्त उत्पत्ती, संधी, शावल्य आणि शांती–या चार दशा आहेत. भावसंभवच ‘भावोत्पत्ती’ आहे. दोन भावांचे एकत्र मिळणेच ‘भावसंधी’ आहे. एक प्रकारच्या दोन स्वरूपांच्या संधीचे नाव ‘स्वरूप-संधी’ आहे. वेगवेगळ्या स्वरूपांच्या संधीस भिन्न-संधी म्हणतात. अनेक भाव एकत्र आल्यावर ‘भावशावल्य’ होते. भावांची शांती अर्थात त्यांचे लय होणेच ‘भावशांती’ म्हणविले जाते.

विजय आता मधुररसाचे विभाव, सात्त्विक भाव आणि व्यभिचारी भाव–या सर्वांची व्याख्या ऐकून रसाची सामग्री संपूर्णपणे समजले. त्यांचे चित्त प्रेमविभोर झाले. प्रेम अस्फुट असते. हे यथायोग्य जाणून ते गुरुदेवांच्या चरणी पडून रडतरडत म्हणाले–प्रभो! आपण कृपा करून मला हे सांगा की माझ्या हृदयात प्रेम अजूनही अस्फुट आहे का?

श्रीगुरुगोस्वामींनी विजयला आलिंगन करीत म्हटले–तू उद्या प्रेमतत्त्व समजू शकशील. तू प्रेम सामग्री तर जाणून घेतली आहेस, परंतु अजूनही तुझ्या हृदयात प्रेम स्पष्टपणे उदित होऊ शकलेले नाही. स्थायीभावच प्रेम आहे. स्थायीभावासंबंधी तू आधी साधारणपणे श्रवण केले आहेस, परंतु आता उज्ज्वलरसात त्यासंबंधात विशेष रूपाने श्रवण केल्यावर तुझी सर्वसिद्धी होईल. आज खूप उशीर झाला आहे, यापुढे आता उद्या सांगेन.

विजयच्या डोळ्यांतून पुनः अश्रूंचे थेंब टपकू लागले. ते साष्टांग नमस्कार करून श्रुत-विषयाचे चिंतन करता-करता वासस्थानी परतले.

**॥ पस्तीसावा अध्याय समाप्त ॥**

# छत्तीसावा अध्याय (मधुररस-विचार)

आज ठीक समयी विजयकुमार गुरुदेवांच्या चरणी उपस्थित झाले आणि त्यांना साष्टांग दंडवत प्रणाम करून आपल्या स्थानी बसले. श्रीगोपाल गुरुगोस्वामी विजयचे स्थायीभाव जाणण्याचे औत्स्युक्य लक्ष्य करून म्हणाले, 'मधुरा' रतीच मधुररसाचा स्थायीभाव आहे.

विजय–रतीच्या आविर्भावाचा हेतू काय आहे?

गोस्वामी–अभियोग, विषय, संबंध, अभिमान, तदीय विशेष,उपमा आणि स्वभावाने रती उदित होते. उक्त हेतुसमूह उत्तरोत्तर श्रेष्ठ झाल्यामुळे स्वभावाने जी रती उदित होते, तीच रती सर्वश्रेष्ठ रती आहे.

विजय–अभियोग कशास म्हणतात?

गोस्वामी–भाव प्रकाशाचे नावच अभियोग आहे. अभियोग दोन प्रकारचे असतात–स्वकर्तृक आणि परकर्तृक.

विजय–विषय कशास म्हणतात?

गोस्वामी–शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध–हे पाच विषय आहेत.

विजय–संबंध कशास म्हणतात?

गोस्वामी–कुल, रूप, गुण आणि लीला–या चार प्रकारच्या सामग्रींच्या गौरवास संबंध म्हणतात.

विजय–अभिमान कशास म्हणतात?

गोस्वामी-अनेक सुंदर वस्तू असल्यावरही एखाद्या खास वस्तूसच घेण्याच्या निश्चित निर्णयास अभिमान म्हणतात. जसे कृष्ण मथुरेस निघून गेले आहेत, त्यावेळी कृष्णाप्रती जातरती असलेली एखादी व्रजबाला, जी अजूनपर्यंत अपूर्ण यौवनामुळे श्रीकृष्णसंग प्राप्त करू शकली नाही, तिची वय-सुषमा पाहून तिची एक सखी निर्जनात तिची परीक्षा घेण्यासाठी म्हणते–सखी, श्रीकृष्ण तर व्रज सोडून निघून

गेलेत आणि तुझे नवयौवन आदी अशाप्रकारे विकसित होत आहे. म्हणूनच या व्रजामध्ये आणखीही परम सुंदर आणि गुणी युवक आहेत, जर तू त्यांच्यापैकी कुण्या एकाशी विवाह करू इच्छित असशील, तर मला गुपचूप सांग, मी तुझ्या मातेस सांगून तशीच व्यवस्था करवून देईन. सखीचे बोलणे ऐकून व्रजबालेने दृढतापूर्वक उत्तर दिले–"हे सखी! पृथ्वीवर एकापेक्षा एक सुंदर आणि माधुर्य तंरगवाही असे अनेक विदग्धशाली तरूण असतील–असू देत, गुणशालिनी युवती त्यांची निवड करोत. परंतु ज्याच्या शिरावर मोरमुकुट नाही, ज्याच्या अधरांवर मुरली विराजित नाही आणि ज्याच्या शरीरावर गैरिक आदी धातूंचे तिलकादी सुशोभित नाही, मी त्याची तृणासमानही इच्छा करत नाही." हेच अभिमानाचे उदाहरण आहे.

विजय–अभिमान समजलो, तदीय-विशेष कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्णाचे पद-चिन्ह, गोष्ठ अर्थात वृन्दावनाश्रित गोष्ठ आणि त्यांचे प्रियजनच 'तदीय विशेष' म्हणविले जातात. कृष्णाप्रती राग, अनुराग आणि महाभावयुक्त जनच प्रियजन आहेत.

विजय–उपमा कशास म्हणतात?

गोस्वामी–जेव्हा एक वस्तू दुसऱ्या वस्तूशी काही अंशांमध्ये सादृश्य लाभ करते तेव्हा त्यास उपमा म्हणतात. येथे श्रीकृष्णाचे काही सादृश्यच उपमा म्हणविले जाते.

विजय–स्वभाव कशास म्हणतात?

गोस्वामी–जो धर्म कुण्या इतर कारणांची अपेक्षा न करता स्वतः प्रकाशित होतो, त्यास 'स्वभाव' म्हणतात. स्वभाव दोन प्रकारचे असतात–निसर्ग आणि स्वरूप.

विजय–निसर्ग कशास म्हणतात?

गोस्वामी–सुदृढ अभ्यासजन्य वासना वा संस्कारास 'निसर्ग' म्हणतात. गुण आणि रूप श्रवण आदी त्याच्या उद्बोधनाचे ईषत् हेतू मात्र आहेत. तात्पर्य हे आहे की जिवाचे अनेक जन्मसिद्ध सुदृढ रत्याभ्यासाने जे संस्कार होतात, तेच निसर्ग म्हणविले जातात. कृष्णाचे गुण-रूप इत्यादी श्रवण करून त्याचा अकस्मात उद्बोध होतो. येथे

गुण आणि रूप श्रवण त्याचे संपूर्ण कारण नाही.

विजय–स्वरूपाच्या संबंधी सांगा.

गोस्वामी–अजन्य (जो कधी जन्मला नाही), अनादी, स्वतःसिद्ध भावास स्वरूप म्हटले जाऊ शकते. स्वरूप तीन प्रकारचे असतात–कृष्णनिष्ठ, ललनानिष्ठ आणि उभयनिष्ठ. कृष्णनिष्ठ स्वरूप दानव स्वभावाच्या व्यक्तींकरिता अप्राप्य आहे. म्हणूनच अदैत्य अर्थात देवस्वभावाच्या मनुष्यांकरिता सुलभ आहे. ललनानिष्ठ स्वरूप स्वयं उद्बुद्ध (प्रकाशित) असते तथा श्रीकृष्णाच्या रूप गुणांचे निष्ठ आणि गोपललनानिष्ठ ही दोन्ही स्वरूपेच ज्या स्वभावात प्रकाशित होतात, त्यास उभयनिष्ठ स्वरूप म्हणतात.

विजय–अभियोग, विषय, संबंध, अभिमान, तदीय-विशेष, उपमा आणि स्वभाव–या सात हेतूंनी सर्व प्रकारची मधुररती उदित होते का?

गोस्वामी–गोकुळ-ललनांची कृष्णरती स्वभावज अर्थात स्वरूप-सिद्ध असते, जी अभियोग आदींद्वारे उदित होत नाही. परंतु अनेक विलासांमध्ये हे हेतू पण कार्य करतात. साधन-सिद्ध आणि निसर्ग-सिद्ध साधकांची रती अभियोग आदींद्वारे उद्बुद्ध होते.

विजय–या विषयास यथायोग्य समजू शकलो नाही, एक-दोन उदाहरणे देऊन समजाविण्याची कृपा करावी.

गोस्वामी–ज्या रतीविषयी सांगितले जात आहे, ती रती केवळ रागानुगाभक्तीमुळेच उदित होते. वैधीभक्ती जोपर्यंत भावमयी होत नाही, तोपर्यंत उपरोक्त रती तिच्यापासून खूप लांब राहते. साधनदशेत व्रजललनांच्या कृष्णसेवेच्या भावकृती पाहून, ज्यांना त्याप्रती लोभ होतो, ते स्वभावाच्या अतिरिक्त अन्य सहा कारणांनी विशेषतः प्रियजनांशी क्रमशः रती लाभ करतात. साधन-सिद्ध झाल्यावर त्यांना ललनानिष्ठ स्वरूपाची स्फूर्ती प्राप्त होते.

विजय–रती किती प्रकारच्या असतात?

गोस्वामी–रती तीन प्रकारच्या असतात–साधारणी, समंजसा आणि समर्था. कुब्जेची रती साधारणी रतीचे उदाहरण आहे. साधारणी रतीच्या मुळाशी संभोगाची

इच्छा असल्याने तिचा तिरस्कार केला गेला आहे. महिषींची (द्वारकेच्या महिषींची) रती–समंजसा म्हणविली जाते; कारण त्यांच्यात लोकधर्मांची अपेक्षा असते तथा ती विवाह विधीद्वारे उद्बुद्ध होते. अर्थात मी यांची पत्नी आहे, हे माझे पती आहेत–या भावाने रती सीमित असते. गोकुळवासींची रती समर्था असते; कारण अशी रती लोकमर्यादा आणि धर्मांच्या सीमादेखील पार करून विराजमान होते. समर्था रती असमंजसा नसते, उलट परम पारमार्थिक विचाराने समर्था रतीच अती समंजसा असते. साधारणी रती मणीप्रमाणे असते, समंजसा रती चिंतामणीसारखी आहे तथा समर्था रती कौस्तुभमण्याप्रमाणे परम दुर्लभ आहे.

विजयचे डोळे सजल झाले. ते रडत-रडत म्हणाले–आज मी अत्यंत भाग्यशाली आहे की अशा अपूर्व विषयास श्रवण करीत आहे. प्रभो! कृपा करून आता साधारणी रतीची लक्षणे सांगा.

गोस्वामी–कृष्णाचे समोर दर्शन करून मोहित होऊन संभोगाच्या इच्छेने जी रती आविर्भूत होते–ती रती गाढ नसते–ती साधारणी रती म्हणविली जाते. ही रती गाढ किंवा स्थायी नसते. संभोगाची इच्छा ऱ्हास पावल्यावर रतीदेखील ऱ्हास पावते. ही रती निम्नकोटीची असते.

विजय–समंजसा रती कशी असते?

गोस्वामी–रूप आणि गुण आदींच्या श्रवणाने उत्पन्न–मी त्यांची पत्नी हे, ते माझे पती आहेत–या भावाने परिपूर्ण गाढ रतीच समंजसा रती म्हणविली जाते.

कधी कधी यात संभोगाची इच्छासुद्धा उदित होते. जेव्हा समंजसा रतीमुळे पृथकपणे संभोगाची इच्छा होते त्यावेळी संभोग-इच्छेमुळे उत्पन्न हाव,भाव आणि हेला आदींद्वारे अथवा स्वाभियोग प्रकाशनाद्वारे श्रीकृष्णास वशीभूत करणे असंभव असते.

विजय–समर्था रती कशी असते?

गोस्वामी–प्रत्येक प्रकारच्या रतीमध्ये संभोगाची इच्छा विद्यमान असते. साधारणी आणि समंजसा रतीमध्ये संभोगाची इच्छा स्वार्थपरा असते. तशा स्वार्थपरा संभोगेच्छेपासून निःस्वार्थ लक्षण असलेल्या एखाद्या विशेष भावास प्राप्त

संभोगेच्छेसोबत तादात्म्य अर्थात एकाच भावास प्राप्त रतीच 'समर्था' रती म्हणविली जाते.

विजय–तो विशेष भाव कसा असतो? यास जरा स्पष्ट करण्याची कृपा करावी.

गोस्वामी–संभोगेच्छा दोन प्रकारची असते–(१) आपल्या इंद्रिय तृप्तीकरिता–सुखाकरिता, प्रियतमद्वारे संभोगाची इच्छा आणि (२) आपल्याद्वारे प्रियतमच्या इंद्रियतर्पण-सुख-भावनामयी संभोगाची इच्छा. प्रथम प्रकारच्या इच्छेस 'काम' म्हंटले जाऊ शकते, कारण त्यात स्वतःच्या सुखाची कामना असते. दुसऱ्या प्रकारच्या इच्छेमध्ये एकमात्र आपल्या प्रियतमाचे सुखच निहीत असते, म्हणून त्यास 'प्रेम' म्हटले गेले आहे. साधारणी रतीमध्ये प्रथम प्रकारच्या इच्छा अर्थात कामच प्रबळ असतो, समंजसेमध्ये तशी इच्छा प्रबळ नसते. शेषोक्त लक्षण अर्थात प्रियतमच्या सुखाची इच्छाच समर्था रतीच्या संभोग-इच्छेचा विशेष धर्म आहे.

विजय–संभोगात प्रियतमचे स्पर्शसुख अवश्यच उपलब्ध होते. या सुखाची इच्छासुद्धा समर्था रतीमध्ये नसते काय?

गोस्वामी–अवश्यपणे अशा इच्छेने संपूर्णपणे रहित होणे खूपच कठीण आहे, तरीही समर्थाच्या हृदयात तशी इच्छा अत्यंत क्षीण असते. या विशेषाच्या आधारे रतीच बलवती होऊन तशा विशिष्ट संभोगेच्छेस क्रोडीभूत आणि संभोगेच्छेसोबत एकात्मता प्राप्त होते. तशी रतीच सर्वश्रेष्ठ सामर्थ्ययुक्त असल्याने 'समर्था' नावाने प्रसिद्ध आहे.

विजय–समर्था रतीचे विशेष माहात्म्य काय आहे?

गोस्वामी–पूर्वोक्त अभियोग आदीमध्ये अन्वय अर्थात संबंध अथवा तदीयाने होवो अथवा रतीच्या स्वाभाविक स्वरूपाने का न होवो, ही समर्था रती उत्पन्न झाल्याबरोबरच कूळ, धर्म, धैर्य आणि लज्जा आदी समस्त प्रकारच्या विघ्न-बाधांचे विस्मरण होते आणि तशी रती अत्यंत प्रगाढ होते.

विजय–संभोगेच्छा शुद्धरतीसोबत मिळून कशाप्रकारे एकात्मता प्राप्त करेल?

गोस्वामी–व्रजललनांची समर्था रती केवळ कृष्णाच्या सुखाकरिता असते.

त्यांचे संभोगातले जे स्वतःचे सुख असते, ते देखील कृष्णाच्या अनुकूलच असते. म्हणूनच संभोगेच्छा आणि कृष्णमयी रती सर्वांपेक्षा अधिक विलासोर्मी (विलास-लहरी) चमत्कारी शोभा धारण करून आपल्या संभोगेच्छेस पृथक रूपात राहू देत नाही. ही रती कधी-कधी समंजसेमध्ये स्वयं पर्यवसित होऊ शकते.

विजय–अहा! किती अपूर्व रती आहे ही! तिचे चरम माहात्म्य ऐकू इच्छितो.

गोस्वामी–ही रती प्रौढा-भाव प्राप्त करून महाभाव दशेस प्राप्त करते. समस्त विमुक्त पुरुष या रतीचे अन्वेषण करतात आणि पाच प्रकारचे भक्त, ज्यांचे जितके साध्य (सामर्थ्य) असते, तितके प्राप्त करतात.

विजय–प्रभो! मी रतीची क्रमोन्नत्ती जाणू इच्छितो.

गोस्वामी–

**स्याद्दृढेयं रतिः प्रेमा प्रोद्यन्स्नेहः क्रमादयम्।**
**स्यान्मानः प्रणयो रागोऽनुरागो भाव इत्यपि॥**

(उ. नी. १४/५९)

तात्पर्य हे आहे की, ही मधुररती विरुद्धभावाद्वारे अभेद्यपणे दृढ होते. तेव्हा तिचे नाव 'प्रेम' असते. तेच प्रेम क्रमशः आपले माधुर्य प्रकाशित करून स्नेह, मान, प्रणय, राग, अनुराग आणि भावाच्या रूपात प्रकाशित होते.

विजय–प्रभो! याचे एक उदाहरण देऊन समजाविण्याची कृपा करावी.

गोस्वामी–जसे उसाचे बीज क्रमशः ऊस, रस, गूळ, खण्ड, शर्करा, सिता आणि सितोत्पल बनते, त्याचप्रमाणे रती, प्रेम, स्नेह, मान, प्रणय, राग, अनुराग आणि भाव–हे सर्व एकाच वस्तूची क्रमोन्नत्ती असतात. येथे 'भावा'चे तात्पर्य महाभाव आहे.

विजय–या भिन्न-भिन्न नावांच्या असतानाही एका 'प्रेम' शब्दानेच समस्त भावांस का व्यक्त केले जाते?

गोस्वामी–उपरोक्त स्नेहादी सहा प्रेमाचे विलास क्रम आहेत. म्हणूनच

पंडितगण 'प्रेम' शब्दाने त्या सर्वांस उद्देश्य करीत असतात. ज्यांचे जे जातीय कृष्णप्रेम उदित झाले आहे, त्यांच्या प्रती श्रीकृष्णाचेदेखील तेच जातीय प्रेम उदित होते.

विजय–प्रेमाचे लक्षण काय आहे?

गोस्वामी–मधुररसात युवक-युवतींमध्ये ध्वसांचे कारण असूनही, त्यांच्यात परस्पर जे ध्वंसरहित भावबंधन असते, तेच प्रेम आहे.

विजय–प्रेमाचे भेद किती आहेत?

गोस्वामी–तीन–प्रौढ, मध्य आणि मंद.

विजय–प्रौढ प्रेम कसे असते?

गोस्वामी–ज्या प्रेम मिलनात विलंब होऊनही प्रियतमच्या हृदयात जे कष्ट होतात, ते दूर करण्याकरिता प्रेमी व्यक्तीच्या अंतःकरणात जी तडफड होते, त्यास 'प्रौढप्रेम' म्हणतात.

विजय–मध्यप्रेम कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्या प्रेमात प्रेमी व्यक्ती आपल्या प्रियतमच्या क्लेशानुभवास सहन करते, तेच मध्यप्रेम आहे.

विजय–मंदप्रेम कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्या प्रेमाची एखाद्या विशेष काळी आणि स्थानी विस्मृती होते अथवा सर्वकाळ घनिष्ठ परिचय असल्याने तथा एकत्र राहिल्याने ज्या प्रेमात त्याग वा आदर आदी काहीच नसतो–त्यास 'मंदप्रेम' म्हणतात. प्रेम मंद असूनही त्यात अनादर किंवा उपेक्षा नसते.

विजय–याविषयी आणखी काही जाणण्यायोग्य गोष्टी असतील तर कृपया सांगा.

गोस्वामी–प्रौढ, मध्य आणि मंदजातीय प्रेमास एका दुसऱ्या प्रकारच्या लक्षणाद्वारेसुद्धा सहजच समजता येऊ शकते. ज्यात विच्छेदाची असहिष्णुता

प्रकाशित होते, ते प्रौढ-प्रेम आहे. ज्यात विरह दुःख कष्ट सहन केले जाऊ शकते, ते मध्य-प्रेम आहे आणि ज्या प्रेमाचे एखाद्या विशेष स्थितीमध्ये विस्मरण होते, त्यास मंदप्रेम म्हणतात.

विजय–प्रेम समजलो, आता स्नेहाचे लक्षण सांगावे.

गोस्वामी–जे प्रेम चरम सीमेस प्राप्त होऊन चित्तरूप प्रदीपास प्रकाशित करून हृदयासही द्रवीभूत करते, त्यास स्नेह म्हणतात. चित्त शब्दाचे तात्पर्य प्रेमरूप विषयाच्या उपलब्धीशी आहे. स्नेहाचे तटस्थ लक्षण हे आहे की प्रिय विषयाचे वारंवार दर्शन करूनही तृप्ती होत नाही.

विजय–स्नेहाच्या परिमाणानुसार यातही उत्तम आणि कनिष्ठ आदी भेद आहेत का?

गोस्वामी–हो, स्नेहाच्या तारतम्यानुसार यातही तीन भेद आहेत–उत्तम, मध्य आणि कनिष्ठ. कनिष्ठ स्नेहीचे मन प्रिय व्यक्तीच्या अंग स्पर्शाने द्रवित होते. मध्यम स्नेहीस प्रिय व्यक्तीच्या दर्शनानेच द्रवता होते आणि उत्तम स्नेहीचे प्रिय व्यक्ती (प्रियतम) संबंधी काही श्रवण केल्याने चित्त द्रवित होऊन जाते.

विजय–स्नेह किती प्रकारचे आहेत?

गोस्वामी–स्नेह स्वरूपतः दोन प्रकारचे असतात–घृतस्नेह आणि मधुस्नेह.

विजय–घृतस्नेह कशास म्हणतात?

गोस्वामी–अत्यंत आदरमय स्नेहच 'घृतस्नेह' म्हणविला जातो. घृत (तूप) ज्याप्रमाणे साखर आदींसोबत मिळूनच अत्यंत सुस्वादू होते, मधाप्रमाणे स्वयं मधुर नसते, त्याचप्रमाणे घृतस्नेहदेखील गर्वासूया आदी भावांसोबत मिलित होऊन परम आस्वादनीय अवस्थेस प्राप्त होते, मधुस्नेहाप्रमाणे हा स्वयं माधुर्यवाही नसतो. घृतस्नेह निसर्गतः शीतल असतो. म्हणून पारस्परिक आदराने घनीभूत होऊन प्रगाढ आदरमय बनतो. अर्थात तूप ज्याप्रमाणे सहज शीतल पदार्थांच्या संगाने घनीभूत होते, त्याचप्रमाणे घृतस्नेहसुद्धा नायक-नायिकेच्या परस्पर आदर संयोगास प्राप्त करून घन बनतो. तुपाचे लक्षण असल्याने त्यास घृतस्नेह म्हणतात.

विजय–आपण आधी आदराचा उल्लेख केला, तो आदर काय आहे?

गोस्वामी–गौरवामुळे आदर होतो. म्हणून आदर आणि गौरव परस्पर अन्योन्याश्रित आहेत. रती आदींमध्ये राहूनही स्नेहामध्ये तो सुव्यक्त होतो.

विजय–गौरव कशास म्हणतात?

गोस्वामी–हे गुरुजन आहेत–या बुद्धीचे नावच 'गौरव' आहे. बुद्धीने जो भाव उदित होतो, त्यास 'संभ्रम' म्हणतात. आदर आणि गौरव परस्पर आश्रित आहेत. म्हणून आदर करण्यातच गौरव आहे, असे समजावयास हवे.

विजय–मधुस्नेह कसा असतो?

गोस्वामी–प्रिय व्यक्तीप्रती "हे माझे आहेत"–अशा अतिशय मदीयत्वयुक्त स्नेहास मधुस्नेह म्हणतात. हा दुसऱ्या भावांची अपेक्षा न करता स्वयं माधुर्य प्रकट करतो. हा स्नेह स्वयं माधुर्यमय असतो तथा त्यात नाना रसांचे मिलन असते. यात उन्मादकता धर्मवशतः उष्णतासुद्धा आहे, म्हणूनच मधासारखे लक्षण असल्याकारणाने यास मधुस्नेह म्हटले गेले आहे.

विजय–मदीयत्व कशास म्हणतात?

गोस्वामी–रतीमध्ये दोन भावना कार्य करतात. "मी त्यांची आहे"–ही एक प्रकारची भावनामयी रती आहे. "ते माझे आहेत"–ही दुसऱ्या प्रकारची भावनामयी रती आहे. घृत स्नेहात "मी त्यांची आहे" भाव बलवान असतो. मधुस्नेहात "ते माझे आहेत "–हा भाव प्रबळ असतो. चन्द्रावलीमध्ये घृतस्नेह आहे आणि श्रीमती राधिकेत मधुस्नेह आहे. हे दोन्ही भावच मदीयत्व आहेत.

या दोन्ही प्रकारच्या भावांस श्रवण करून विजय रोमांचित झाले. ते प्रेमाने गद्गद होऊन श्रीगुरुगोस्वामींस दंडवत प्रणाम करीत म्हणाले–आज मी धन्य झालो! माझा मनुष्य जन्म सफल झाला. आपल्या उपदेशामृताचे पान करून श्रवणाची पिपासा तृप्त होत नाही. आता अनुग्रहपूर्वक मानासंबंधी सांगावे.

गोस्वामी–जो स्नेह उत्कर्ष प्राप्तिपूर्वक युगुलास (नायक-नायिकेस) नूतन माधुर्य अनुभव करवून स्वतः बाहेरून कुटिल वा वक्र भाव धारण करतो–त्यास मान

म्हणतात.

विजय–मान किती प्रकारचा असतो?

गोस्वामी–उदात्त आणि ललित भेदाने दोन प्रकारचा मान असतो.

विजय–उदात्तमान कशास म्हणतात?

गोस्वामी–उदात्तमानही दोन प्रकारचा असतो–एकतर बाहेरून दाक्षिण्य आणि आतून वाम्यभाव घेऊन होतो. आणि दुसरा सदुर्बोध्य परिपाटी लाभून मनाच्या भावांस गोपनीय ठेवून वाम्यगंधयुक्त आणि गांभीर्य लक्षणयुक्त असतो. घृतस्नेहच उदात्तमान असतो.

विजय–ललितमान कशास म्हणतात? न जाणो का यात माझी अधिक रुची होत आहे, सांगू शकत नाही.

गोस्वामी–मधुस्नेह स्नेहोद्रेक स्वभावाने उथळून निरर्गलतावशतः अतिमधुर वक्रता आणि नर्मविशेष वहन करून ललित मान होतो. हा देखील कौटिल्य आणि नर्म भेदाने दोन प्रकारे होतो. स्वतन्त्र रूपात हृदयगत कौटिल्य धारणपूर्वक जो मान असतो, त्यास कौटिल्यललित मान म्हणतात. नर्मयुक्त मानच नर्मललितामान म्हणविला जातो. दोन्ही प्रकारचे ललितामानच मधुस्नेहाने उदित होतात.

विजय–प्रणय कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रियतमसोबत अभेद् मननरूप विश्रम्भयुक्त मानच प्रणय म्हणविला जातो.

विजय–येथे विश्रम्भाचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–प्रणयाचे रूपच विश्रम्भ आहे. मैत्र आणि सख्याच्या भेदाने विश्रम्भ दोन प्रकारचा असतो. दृढ विश्वासास विश्रम्भ म्हणतात. विश्रम्भ प्रणयाचे काहीच निमित्त कारण नसते–उपादान कारण असते.

विजय–मैत्र विश्रम्भ कशास म्हणतात?

गोस्वामी–विनययुक्त विश्रम्भच 'मैत्र विश्रम्भ' म्हणविला जातो.

विजय–सख्य विश्रम्भ कशास म्हणतात?

गोस्वामी–सर्व प्रकारच्या भयाने मुक्त स्वाधीनता-प्रचुर विश्रम्भच सख्य विश्रम्भ म्हणविला जातो.

विजय–प्रणय, स्नेह आणि मान–यांच्या पारस्पारिक संबंधाविषयी काही स्पष्टपणे सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–एखाद्या ठिकाणी स्नेहातून प्रणय उत्पन्न होऊन मान धर्मास प्राप्त होतो. कधी-कधी स्नेहातून मान होऊन प्रणयास प्राप्त होतो. म्हणूनच मान आणि प्रणयाची अन्यान्य कार्यकारणता आहे. विश्रम्भाचे म्हणूनच वेगळ्या रूपात वर्णन केले जाते. उदार आणि ललित भेदाने मैत्र आणि सख्य सुसंगत असते. मग सुमैत्र आणि सुसख्य असल्याने त्यांचा प्रणयातही विचार होतो.

विजय–आता रागाचे लक्षण सांगावे.

गोस्वामी–प्रणयाच्या उत्कर्षावस्थेत जेव्हा अतिशय दुःखही सुखाप्रमाणे प्रतीत होते, तेव्हा तशा प्रकारच्या प्रणयास ‘राग’ म्हणतात.

विजय–राग किती प्रकारचा असतो?

गोस्वामी–राग दोन प्रकारचा असतो–नीलिमा-राग आणि रक्तिमा-राग.

विजय–नीलिमा-राग किती प्रकारचा असतो?

गोस्वामी–नीली-राग आणि श्याम-रागाच्या भेदाने नीलिमा-राग दोन प्रकारचा असतो.

विजय–नीली-राग कसा असतो?

गोस्वामी–ज्या रागाची मंद पडण्याची संभावना नसते आणि बाहेरून जो अधिक प्रकाशमान होऊन आपल्याशी संलग्न अशा दुसऱ्या भावांस झाकून घेतो, त्यांस नीली-राग म्हणतात. हा राग चन्द्रावली आणि कृष्णात लक्षित होतो.

विजय–श्याम-राग कशास म्हणतात?

गोस्वामी–नीली-रागाने भीरुतारूप आणि औषधसेकादीद्वारा काही अधिक प्रकाशशील आणि विलंब साध्य जो राग असतो, तो श्याम-राग आहे.

विजय–रक्तिमा-राग किती प्रकारचा असतो?

गोस्वामी–दोन प्रकारचा असतो–कुसुंभ-राग आणि मंजिष्ठासंभव-राग.

विजय–कुसुंभ-राग कशास म्हणतात?

गोस्वामी–जो राग चित्तामध्ये शीघ्रातीशीघ्र संचारित होतो तथा दुसऱ्या रागांच्या कांतीस प्रकाशित करून स्वयंसुद्धा आवश्यकतेनुसार शोभित होत असतो, त्यास कुसुंभ-राग म्हणतात. आधार-विशेषात कुसुंभ-राग स्थिर असतो, परंतु कृष्णाच्या प्रियांमध्ये मंजिष्ठेचे मिश्रण झाल्यावर तो कधी-कधी म्लानसुद्धा होतो.

विजय–मंजिष्ठा-राग कशास म्हणतात?

गोस्वामी–जो राग कधीही नष्ट होत नाही, सदा स्थिर राहतो अर्थात नीलीकुसुंभ आदींप्रमाणे मलीन होत नाही–दुसऱ्यांच्या अपेक्षेने रहित अर्थात स्वतःसिद्ध असतो, श्रीमती राधा कृष्णाच्या अशा रागास मंजिष्ठा-राग म्हणतात. सिद्धांत असा आहे की घृत-स्नेह, उदात्त, मैत्र, सुमैत्र, नीलिमा आदी आधी सांगितलेले भावसमूह चन्द्रावली आणि रुक्मिणी आदी महिषींमध्ये लक्षित होतात. मधु-स्नेह, ललित, सख्य, सुसख्य आणि रक्तिमा आदी उत्तरोत्तर भावसमूह श्रीराधिकेत परिलक्षित होतात. हे भावसमूह कधी-कधी सत्यभामा आणि एखाद्या समय-विशेषी लक्ष्मणेतही प्रकाशित होतात. अशा प्रकारच्या भावभेदाने गोकुळ देवींमध्ये स्वपक्ष आदी जो भेद असतो, त्याचा विचार आलंबन-विभावाप्रसंगी आधीच केला गेलेला आहे. भक्तिरसामृतसिन्धूमध्ये सांगितल्या गेलेल्या अन्य-अन्य ४१ मुख्य भावांसबंधीने (त्यांच्या परस्पर मिलनाने) जे विविध प्रकारचे भेद होऊ शकतात आणि दुसऱ्या समस्त प्रकारच्या भेदांस पंडित व्यक्ती प्रज्ञेच्या बळावर–पारमार्थिक बुद्धीच्या आधारे समजून घेतात. येथे यांची वेगळ्या रूपात व्याख्या केलेली नाही.

विजय–'भावांतर ' शब्दाने कोणकोणत्या भावांस समजावे?

गोस्वामी–स्थायी मधुर भाव, तेहेतीस व्यभिचारीभाव आणि हास्य आदी सात–अशा एकूण ४१ भावांस भावांतर म्हटले गेले आहे.

विजय–रागांविषयी समजलो. आता अनुरागाची व्याख्या करावी.

गोस्वामी–जो राग स्वयं नित्य-नवीन भावांमध्ये सदा अनुभूत प्रियास प्रतिक्षण नवीन करतो, त्यास अनुराग म्हणतात.

विजय–हा अनुराग आणखी काय-काय विचित्रता प्रकाशित करतो?

गोस्वामी–परस्पर वशीभाव, प्रेमवैचित्य आणि अप्राणींमध्ये (वृक्षादी) देखील जन्म ग्रहण करण्याची लालसा आदी रूपात अनुराग प्रकाशित होतो तथा विप्रलंभाच्या समयी कृष्णाची स्फूर्ती करवितो.

विजय–परस्पर वशीभाव आणि अप्राणींमध्ये जन्म ग्रहण करण्याची लालसा तर सहजपणे समजलो, कृपया प्रेम-वैचित्यासंबंधी उपदेश करावा.

गोस्वामी–विप्रलंभासच प्रेम-वैचित्य म्हणतात. यासंबंधी नंतर सांगेन.

विजय–ठीक आहे, मग महाभावासंबंधी सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–वत्स! व्रजरसाविषयी माझी माहिती अतिशय क्षुद्र आहे. कुठे मी आणि कुठे परमोन्नत महाभावाचे वर्णन! तरीही श्रीरूप गोस्वामी आणि पंडित गोस्वामींच्या कृपाशिक्षणाच्या बळावर तथा श्रीरूप गोस्वामींच्या निर्देशानुसार मी जे काही सांगतो आहे, त्यास त्यांच्या कृपेनेच अनुभव कर. यावदाश्रयवृत्ती रूपात अनुराग स्वयंवेद्यदशेस प्राप्त होऊन प्रकाशित झाल्यावर तोच भाव वा महाभाव होतो.

विजय–प्रभो! मी अतिशय दीनहीन आणि मूर्ख जिज्ञासू आहे. मला समजेल अशा योग्य भाषेत सरल आणि सहजपणे महाभावाची लक्षणे सांगाल तर खूप कृपा होईल.

गोस्वामी–श्रीराधिका अनुरागाचे आश्रयस्थान आहे आणि कृष्ण त्याचे विषय आहे. श्रीनन्दनन्दन श्रृंगार रूपात विषय-तत्त्वाची सीमा आहे आणि श्रीराधा आश्रय-तत्त्वाची सीमा आहे. तात्पर्य हे आहे की, श्रीकृष्णच सर्वश्रेष्ठ अनुरागाचे विषय आहे आणि श्रीराधा त्याची सर्वश्रेष्ठ आश्रय आहे. त्यांचा अनुरागच स्थायीभाव आहे. तोच अनुराग आपल्या चरम सीमेपर्यंत पोहोचून यावदाश्रयवृत्ती होतो आणि त्याच अवस्थेमध्ये स्वयंवेद्यदशा अर्थात तत्प्रेयसीजन विशेषाच्या संवेद्यदशेस प्राप्त होऊन

यथा समयी सुदीप्त आदींद्वारे प्रकाशमान होतो.

विजय–अहो! महाभाव! महाभाव कशास म्हणतात–आज मी थोडे-थोडे समजलो. समस्त भावांची चरम सीमाच महाभाव आहे. या महाभावाचे उदाहरण ऐकण्याची मोठी उत्कंठा होत आहे, कृपया ऐकवून माझ्या कानांस तृप्त करावे

गोस्वामी–

**राधया भवतश्च चित्तजतुनी स्वेदैर्विलाप्य क्रमाद्-**
**युञ्जन्नद्रिनिकुञ्जकुञ्जरपते निर्धूतभेदभ्रमम्।**
**चित्राय स्वयमम्बरं जयदिह ब्रह्माण्डहर्म्योदरे,**
**भूयोभिर्नवरागहिङ्गुलभरैः श्रृङ्गारकारुः कृती॥**

(उ. नी. १४/१५५)

हा श्लोकच महाभावाचे उदाहरण आहे. निकुंजांमध्ये विहरणशील श्रीराधाकृष्णाच्या अनुराग पराकाष्ठेस अनुभव करीत वृन्दादेवी कृष्णास म्हणते–

हे शैलकुंजांमध्ये विहार करणाऱ्या मत्त गजराजा! श्रृंगाररूप सुनिपुण शिल्पीने भावोष्मारूप अग्नितापाद्वारे राधा आणि तुमच्या दोघांच्याही चित्तरूप लाक्षेस (लाखेस) द्रवीभूत करून (वितळवून) हळूहळू दोघांस एकत्र करून भेदभ्रमास दूर केले आहे (अर्थात भेदरहित केले आहे) आणि या ब्रह्मांड रूप देवगृहात त्याच व्यापाराचे चित्र अंकन करण्याकरिता नवरागरूप हिंगुलसमुहाचा प्रयोग करून स्वतःच अनुरंजित (रक्तवर्ण) केले आहे (दोघांच्या चित्तांस अनुरक्त केले आहे) येथे 'भेदभाव-दूरीकरण'च स्वसंवेद्यदशेस प्राप्त होणे आहे. ब्रह्मांडरूप 'अट्टालिका समुहात' आदींद्वारे यावदाश्रयवृत्तीचा बोध होतो आणि 'अनुरंजित केले आहे' यामुळे प्रकाशितत्त्वाची सूचना होते.

विजय–या महाभावाची स्थिती काय आहे?

गोस्वामी–हा महाभाव रुक्मिणी आदी महिषींमध्येसुद्धा अती दुर्लभ आहे, केवळमात्र श्रीराधा आदी व्रजदेवींनाच अनुभवगम्य आहे.

विजय–याचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–जेथे नायिका नायकासोबत विवाह-विधीने बांधली गेली आहे. तेथे स्वकीयाभाव होतो. स्वकीयाभावात रती समंजसा असते. अर्थात ही महाभाव आदी परमोच्च अवस्थेस प्राप्त होण्यास समर्थ नसते. व्रजामध्येसुद्धा कुणा-कुणात स्वकीयभाव असतो, परंतु येथे परकीयाभावच प्रबळ असतो. येथे रती समर्था असल्याने चरम सीमेस प्राप्त होऊन महाभाव अवस्थेपर्यंत प्राप्त होते.

विजय–महाभावाचे भेद् किती आहेत?

गोस्वामी–परम अमृतस्वरूप श्रीमहाभाव चित्तास (मनास) आकर्षित करून स्व-स्वरूपतेस प्राप्त करवितो. महाभाव दोन प्रकारचा असतो–रूढ आणि अधिरूढ.

विजय–रूढ महाभाव कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्याच्यात सात्त्विकभावसमूह उदीप्त असेल, त्यास रूढ महाभाव म्हणतात.

विजय–रूढ महाभावाच्या अनुभावांसंबंधी सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–क्षणभराचा वेळही असह्य होणे, उपस्थित जनसमुदायाचे हृदयविलोडन, कल्प-क्षणत्व (एका कल्पाचा अवधीसुद्धा क्षणभरासमान प्रतीत होणे), श्रीकृष्ण सुखी राहूनही त्यांना कष्ट होईल या आशंकेने खिन्न होणे, मोहरहित असूनही आत्मा आदी सर्वांचे विस्मरण होणे तथा क्षणभराचा वेळही कल्पासमान प्रतीत होणे– या अनुभावांपैकी काही संभोगामध्ये आणि काही विप्रलंभामध्ये अनुभूत होतात.

विजय–क्षणभराचा वेळही असह्य होणे–हे उदाहरणासहित समजाविण्याची कृपा करावी

गोस्वामी–हा भाव वैचित्र्य-विप्रलंभ आहे. संयोगातही वियोगाचे भान होते. यात क्षणभराचा वियोगही असहनीय होतो. कुरुक्षेत्रात गोपींनी खूप दिवसांनंतर कृष्णाचे दर्शन करून आपल्या नेत्रांवरील पापण्यांचे निर्माता ब्रह्मदेवास शाप दिला होता. कारण डोळ्यांच्या पापण्या त्यांच्या कृष्ण-दर्शनात बाधक ठरत होत्या–पापण्या मिटण्याचा वेळही त्यांना असह्य होत होता.

विजय–उपस्थित जनसमुदायाचे 'हृदय विलोडन' कशास म्हणतात?

गोस्वामी–कुरुक्षेत्रात कृष्ण-दर्शनास आलेल्या गोपींच्या अलौकिक अनुरागास पाहून तेथे उपस्थित रुक्मिणी आदी महिषींचे आणि युधिष्ठिर आदी राजांचे चित्त ज्याप्रकारे विलोडित (मथित) झालेले होते, तसेच होणे.

विजय–कल्पक्षणत्व म्हणजे काय?

गोस्वामी–रासाची रात्र ब्रह्मदेवाच्या एक रात्री समान मोठी असते, तरीही गोपींना ती ब्रह्मरात्र क्षणभराच्या वेळेपेक्षाही अल्प वाटत होती, अशा भावास कल्पक्षणत्व म्हणतात.

विजय–श्रीकृष्ण सुखी असूनही त्यांच्या कष्टाच्या आशंकेने खिन्न होण्याचे उदाहरण देऊन समजावून सांगावे.

गोस्वामी–**"यत्ते सुजातचरणाम्बुरुह "** श्लोकात गोपी जसे श्रीकृष्णाच्या चरणकमलांस आपल्या स्तनांवर धारण करूनही, त्या हा विचार करून मोठ्या दुःखी झाल्या होत्या की आमचे स्तन तर कठोर आहेत, तेव्हा कृष्णाच्या अतीव कोमल चरणकमलांना त्यांच्यावर ठेवल्याने कष्ट होत असतील, असा खेद प्रकट करण्यास "सुखातही आर्ततेच्या शंकेने खिन्नत्व" येणे म्हणतात.

विजय–मोहाच्या अभावातही सर्व विस्मरण कसे काय होते?

गोस्वामी–हृदयात कृष्णाची स्फूर्ती झाल्याने सर्व प्रकारचे मोह दूर होऊन जातात. मोहाचा अभाव होतो–अशी अवस्था ज्यात कृष्ण-स्फूर्ती तर राहते, परंतु देह आदी समस्त जगाची शुद्ध हरपून जाते.

विजय–क्षण-कल्पता कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्ण उद्धवाकडे गोपींच्या विरह दशेचे वर्णन करतात–उद्धवा! जेव्हा मी व्रजवासींसोबत वृन्दावनात होतो, त्यावेळी माझ्यासोबत त्यांच्या रात्री एका क्षणाप्रमाणे व्यतीत होत असत. माझ्या वियोगात त्याच रात्री त्यांना व्यतीत करूनही व्यतीत होत नव्हत्या–एका कल्पाच्या समयाहूनही अधिक मोठ्या भासू लागत. त्याचप्रमाणे एक क्षणही त्यांना कल्पासमान प्रतीत होतो.

विजय–रूढ महाभाव समजलो, आता अधिरूढ भावाची व्याख्या करावी.

गोस्वामी–जेव्हा अनुभावसमूह दृढ महाभावात व्यक्त झालेल्या अनुभावांपेक्षाही अधिक आश्चर्य विशेषतेस प्राप्त होतात, तोच अधिरूढ महाभाव आहे.

विजय–अधिरूढ किती प्रकारचा असतो?

गोस्वामी–दोन प्रकारचा असतो–मोदन आणि मादन.

विजय–मोदन कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्या अधिरूढ महाभावात नायक आणि नायिका यांच्यात सात्त्विक भावसमूह अत्यंत अधिकपणे उदीप्त होतात, त्यास मोदन म्हणतात. त्या मोदन भावात कृष्ण आणि राधेस विक्षोभ आणि भयासारखे होते आणि प्रेमरूप महासंपत्तीविषयी सुप्रसिद्धा श्रीगौरी आदी नारींपेक्षाही अधिक प्रेम प्रकाशित होते.

विजय–मोदन स्थळाचे वर्णन करावे.

गोस्वामी–श्रीराधिकेच्या यूथाशिवाय मोदन अन्य कोठेही प्रकाशित होत नाही. मोदन एकमात्र ल्हादिनी शक्तीचा प्रियवर सुविलास आहे. एखाद्या विशिष्ट दशेत (विशेष विरहात) मोदनच मोहन होऊन जातो. विशेष विवशतेमुळे त्या दशेत सुदीप्त सात्त्विक भावसमूह उदित होतात.

विजय–मोहन अवस्थेच्या अनुभावांचे वर्णन करावे.

गोस्वामी–अन्य कांतेद्वारे आलिंगन केल्या गेलेल्या कृष्णाची मूर्च्छा (द्वारकेत रुक्मिणीद्वारे आलिंगन केल्यावर यमुनातीरवर्ती वृन्दावनस्थित निकुंजांमध्ये राधेसोबत केलेल्या विनोद आदींचे स्मरण करून कृष्णाचे मूर्च्छित होणे), स्वयं असह्य दुःख स्वीकार करूनही कृष्ण-सुखाची अभिलाषा होणे, ब्रह्मांडक्षोभकारिता, पशुपक्षी आदींचे रुदन, मरण स्वीकारूनही आपल्या शरीराच्या पंचमहाभूतांद्वारे (माती आदींद्वारे) श्रीकृष्णसंगाची प्रबळ तृष्णा आणि दिव्योन्माद आदी अनेक अनुभाव उदित होतात. श्रीवृन्दावनेश्वरीमध्ये हा मोहन भाव उदित होतो. संचारीभावगत मोहापेक्षाही या मोहन भावाचा सर्वतोभावेन विलक्षण महाचमत्कारी महाभाव श्रीराधिकेमध्ये प्रकाशित होतो.

विजय–प्रभो! जर योग्य वाटले तर दिव्योन्मादाचे लक्षण सांगण्याची कृपा

करावी.

गोस्वामी–एखाद्या अनिर्वचनीय वृत्तिविशेषास प्राप्त अर्थात एखाद्या विशिष्ट दशेत मोहन भाव भ्रमासारख्या कुण्या विचित्र दशेस प्राप्त झाल्यावर दिव्योन्माद होतो, यात उद्घूर्णा आणि चित्रजल्पादी अनेक भेद आहेत.

विजय–उद्घूर्णा कशास म्हणतात?

गोस्वामी–दिव्योन्मादात अनेक प्रकारच्या अद्भुत विवशतारूप कृती प्रकाशित होणे म्हणजेच उद्घूर्णा होय. कृष्ण मथुरेला गेल्यावर राधिकेस उद्घूर्णा झाली होती. त्यावेळी राधा कृष्ण-विरहामुळे विस्मृती प्राप्त झाल्याप्रमाणे होऊन कृष्ण आता येत आहेत–असे मानून कुंजभवनात शैय्या सजविते, कधी खंडिता रूपात नीलमेघास धमकाविते आणि कधी रात्री गहन अंधःकारात शीघ्रतापूर्वक अभिसारिणी होऊन फिरते.

विजय–चित्रजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–आपल्या प्रियकराच्या एखाद्या सुहृद (बंधू) सोबत भेट झाल्यावर गूढ रहस्यपूर्ण गर्व, असूया, ईर्ष्या, चापल्य आणि उत्सुक्यादी भावाने तथा तीव्र-उत्कंठापूर्वक जो आलाप (संवाद) होतो, त्यास चित्रजल्प म्हणतात.

विजय–चित्रजल्पाची किती अंगे आहेत?

गोस्वामी–प्रजल्प, परिजल्पित, विजल्प, उज्जल्प, संजल्प, अवजल्प, अभिजल्प, आजल्प, अतिजल्प आणि सज्जल्पाच्या भेदाने चित्रजल्पाची दहा अंगे आहेत. श्रीमद्भागवताच्या दहाव्या स्कंधाच्या भ्रमरगीतामध्ये याचे वर्णन प्राप्त होते.[१]

विजय–प्रजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–असूया, ईर्ष्या आणि मदयुक्त अवज्ञेच्या भावभंगीमेने प्रिय व्यक्तीचे अकौशल (अविचक्षणता) अर्थात अनिपुणता प्रकाशित करण्यास 'प्रजल्प'

---

(१) श्रीमद्भागवताचा दहावा स्कंध, ४७ वा अध्याय आणि वैष्णव-तोषणी द्रष्टव्य आहे. सोबतच श्रीचैतन्यचरितामृत अन्त्यलीला १९ वा अध्याय आणि अनुभाष्यपण आलोच्य आहे.

म्हणतात.

विजय–परिजल्पित कशास म्हणतात?

गोस्वामी–प्राणनाथाची निर्दयता, शठता आणि चपलता आदी दोषांचे प्रतिपादन करीत भंगीमेद्वारे आपली निपुणता प्रकाशित करण्यास परिजल्पित म्हणतात.

विजय–विजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–हृदयात गूढ मान मुद्रा आहे, परंतु वरून कृष्णाप्रती असूयायुक्त (द्वेषासारख्या) कटाक्षोक्तीस 'विजल्प ' म्हणतात.

विजय–उज्जल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–गर्वमूलक ईर्ष्येद्वारे कृष्णाची शठता, कपटता आदींना सांगणे. असूयेसोबत सदा आक्षेपसुद्धा असतो, यालाच उज्जल्प म्हणतात.

विजय–संजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–कुठल्याही अनिर्वाच्य दुर्गम सोल्लुंठ अर्थात गूढ परिहास आक्षेप वा भंगीमाद्वारे कृष्णाची अकृतज्ञता, कठिणता आणि शठता आदी स्थापन करण्यास संजल्प म्हणतात.

विजय–अवजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्णाप्रती काठिण्य, कामित्व आणि धूर्ततेचा दोष लावून आपल्या आसक्तीच्या विवशतेस ईर्ष्यायुक्त भयासोबत व्यक्त करण्यास अवजल्प म्हणतात.

विजय–अभिजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्ण जर पक्ष्यांनाही खेद (विरह-दुःख) प्रदान करतात, तर त्यांच्याप्रती आसक्ती व्यर्थ आहे–अशाप्रकारे भंगीमाद्वारे अनुताप वचनांस अभिजल्प म्हणतात.

विजय–आजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–निर्वेदवशतः कृष्णाची कपटता, दुःखदायकत्वास व्यक्त करणे आणि कृष्णाच्या लीलाकथांचा त्याग करून दुसऱ्या कथांस सुखदायक सांगणेच 'आजल्प' आहे.

विजय–प्रतिजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–कृष्णाचा मिथुनीभाव दस्युभाव आहे. म्हणूनच अन्य रमणींसोबत वर्तमान अवस्थेत आम्ही त्यांना भेटण्याकरिता तेथे जाणे अयुक्तिसंगत आहे–अशाप्रकारे म्हणणे आणि प्रेरित दुताच्या प्रती सन्मानाचा भाव दाखविण्यास प्रतिजल्प म्हणतात.

विजय–सुजल्प कशास म्हणतात?

गोस्वामी–जेव्हा सरलतेमुळे गांभीर्य, दैन्य, चापल्य आणि उत्कंठेसोबत कृष्णाविषयी प्रश्न होतो, तेव्हा त्यास 'सुजल्प' म्हणतात.

विजय–प्रभो! मी मादनाचे लक्षण जाणण्यायोग्य आहे का?

गोस्वामी–ल्हादिनीचे सारस्वरूप प्रेम जेव्हा महाभावापेक्षाही श्रेष्ठ अशा अतिशय उन्नत अवस्थेस प्राप्त होते, तथा सर्व प्रकारच्या भावांच्या प्रकाशाद्वारे उल्हासयुक्त असते, तेव्हा तो परात्परभावरूप 'मादन' म्हटला जातो. हा मादन केवळ श्रीराधातच नित्यकाळ विराजमान असतो. ललिता आदींमध्येदेखील हा उदित होत नाही.

विजय–मादन भावात ईर्ष्या होते का?

गोस्वामी–मादन भावात ईर्ष्याभाव अत्यंत प्रबळ असतो. ईर्ष्येच्या अयोग्य चेतनाशून्य वस्तूच्या प्रतिदेखील ईर्ष्या पाहिली जाते आणि सदा संयोगात राहूनही कृष्ण संबंधीचा गंध ज्या पात्रांमध्ये राहतो, त्यांचे स्तव आदी करणेसुद्धा प्रसिद्ध आहे. जसे श्रीमती राधेची कृष्णाच्या वनमालेप्रती ईर्ष्या तथा त्यांचे पार्वतीय रमणी–पुलिंदींप्रती स्तवच याचे उदाहरण आहे.

विजय–कुठल्या दशेत मादन उदय होतो?

गोस्वामी–मादनरूप विचित्रभाव केवळ मिलनातच उदित होतो. या

मादनाची विलासरूप नित्यलीला अगणित रूपात होते.

विजय–प्रभो! कुण्या मुनीच्या वाणीत अशा प्रकारच्या मादनाचे वर्णन पहावयास मिळते?

गोस्वामी–मादन रस अनंत आहे. म्हणूनच त्याची संपूर्ण गती अप्राकृत मदनरूप श्रीकृष्णाकरितादेखील दुर्गम आहे. म्हणून श्रीशुकमुनीसुद्धा याचे सम्यक वर्णन करू शकलेले नाहीत, मग रस-विचारक भरतमुनी आदींविषयी काय बोलावे?

विजय–मोठी आश्चर्याची गोष्ट आपण सांगितलीत. रस-स्वरूप आणि रसाचे भोक्तृस्वरूप स्वयं कृष्णसुद्धा संपूर्णपणे मादनाची गती जाणत नाहीत, हे कसे काय संभव आहे?

गोस्वामी–कृष्णच रस आहेत. ते अनंत, सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान आहेत. त्यांच्यापासून कधीही काहीच लपून राहिलेले नाही अथवा त्यांच्याकरिता काहीही अप्राप्य वा अघटनीय नाही. ते अचिंत्य भेदाभेद-धर्मवशतः नित्यच एक रस आणि अनेक रसही आहेत. एका रसाने ते सर्वकाही आत्मसात करून आत्माराम आहेत. या दशेत त्यांच्यापासून पृथक रूपात काहीही रसरूपात राहत नाही. पुनः ते युगपत् (त्याचवेळी) अनेक रसही आहेत. म्हणून आत्मगत रसांव्यतिरिक्त त्या दशेत परगतरस आणि आत्मपर मिश्रित विचित्र रस असतो. शेषोक्त दोन प्रकारच्या रसांचा अनुभव ही त्यांचे लीला सुख आहे. परगत रसच चरम विस्तार लाभ केल्यावर पारकीय रस होतो. वृन्दावनात ही चरम विस्तृती अत्यंत प्रस्फुटित आहे. म्हणूनच तो आत्मगत रसाकरिता अपरिज्ञात परम सुखविशिष्ट पारकीय रसच मादनाची सीमा आहे. हा विशुद्ध रूपात अप्रकट लीलेच्या वेळी गोलोकात वर्तमान असतो. किंचित रूपात तो प्रत्यायित अवस्थेत व्रजातही वर्तमान असतो.

विजय–प्रभो! माझ्याप्रती आपली असीम कृपा आहे. आता कृपा करून संक्षेपात समस्त प्रकारच्या मधुररसांचे सार सांगावे, जे मी सहजच समजू शकेन.

गोस्वामी–व्रजदेवींमध्ये उदित होणारे भावसमूह सर्वथा अलौकिक आणि तर्कापलीकडील असतात. म्हणून विचारपूर्वक या भावांस सांगणे कठीणच नाही, तर असंभव आहे. शास्त्रांमध्ये असे म्हटले गेले आहे की श्रीराधिकेचा राग पूर्वरागातून प्रकट झाला आहे. तोच राग एखाद्या विशिष्ट दशेत अनुराग आणि मग अनुरागातून

स्नेह बनतो. पुनः मान आणि प्रणयाच्या रूपात प्रकाशित होतो. या सर्व गोष्टी स्थिर नसतात; परंतु हे निश्चित आहे की साधारणी रतीमध्ये धूमायित अवस्थाच सीमा आहे. स्नेह, मान, प्रणय, राग, अनुरागापर्यंत संमजसेची गती असते. त्यात ज्वलितारूपात दिप्तारती होते. रूढमध्ये उदीप्ता रती होते, तथा मोदन आदींमध्ये सुदीप्ता रती होते. यालाही प्रायिक (कधी-कधी असे होते) समजावे. कारण देश, काल, आणि पात्र आदींच्या भेदाने या विधींमध्ये उलटफेरही होतो. साधारणी रती प्रेमापर्यंत जाते. समंजसा रतीची सीमा अनुरागापर्यंत आहे तथा समर्था रतीची सीमा महाभावापर्यंत आहे.

विजय–सख्यरसात रतीची गती कोठपर्यंत असते?

गोस्वामी–नर्मवयस्यांची रती अनुरागापर्यंत पोहोचते, परंतु त्यात सुबल आदींची रती महाभावाच्या सीमेस प्राप्त होते.

विजय–स्थायीभावाचे लक्षण, ज्यास आपण आधी सांगितले होते, त्या लक्षणाला महाभावपर्यंत पाहतो. स्थायीभाव तर खालून वरपर्यंत एकच तत्त्व आहे, मग रसभेद का पाहिला जातो?

विजय–स्थायीभावाच्या जातिभेदाने रसभेद होतो. स्थायी भावात गूढ व्यापार लक्षित होत नाही. जेव्हा त्याच्यासोबत सामग्रीचा संयोग होतो, तेव्हाच जातिभेद लक्षित होतो. स्थायीभाव आपल्या गूढ जातिनुसार तदुपयोगी सामग्री संग्रहपूर्वक त्याच्या अनुरूप रसतेस प्राप्त होतो.

गोस्वामी–मधुररतीमध्ये स्वकीया आणि परकीया जातिभेद नित्य आहेत का?

विजय–हो, त्यात नित्य स्वकीया आणि परकीया असा जातिभेद आहे. तसा भेद औपाधिक नाही. जर त्या भेदास औपाधिक मानले जाते, तर मधुर आदी रसांसही औपाधिक मानावयास हवे. ज्याचा जो नित्य स्वाभाविक रस आहे, तोच त्याचा नित्य जातिगत रस आहे. त्याच्या अनुरूप त्याची रुची होते, तसेच भजन होते तथा त्याची प्राप्तीदेखील तशीच होते. व्रजातही स्वकीय रस आहे. ज्या कृष्णामध्ये पतिभावना ठेवतात, त्यांची रुची, साधन, भजन आणि प्राप्ती तदनुरूप असते. द्वारकेची स्वकीयता वैकुण्ठगत तत्त्व आहे; परंतु व्रजाची स्वकीयता गोलोकगत तत्त्व आहे. दोघांमध्ये भेद

आहे अथवा व्रजनाथाच्या अंतःस्थित वासुदेव संबंधित ते स्वकीय-तत्त्व आपल्या चरम अवस्थेमध्ये वैकुंठासच जाते–असे समजावे.

इतके ऐकून विजय गुरुदेवांस प्रणाम करून महाप्रेमात विभोर होत घरी परतले.

**॥ छत्तीसावा अध्याय समाप्त ॥**



# सदतीसावा अध्याय (श्रृंगाररस-विचार)

आज विजयकुमार काल श्रवण केलेल्या भावांचे आस्वादन करीत-करीत श्रीगुरुदेवांच्या चरणी उपस्थित झाले तथा त्यांना प्रणाम करीत म्हणाले–प्रभो! मी विभाव, अनुभाव, सात्त्विकभाव तथा व्यभिचारीभाव या सर्वांस समजलो. स्थायीभावाचे स्वरूपही समजलो, या पूर्वोक्त चार प्रकारच्या सामग्रींचा स्थायीभावाशी संयोग करूनही रसाचा उदय मी करवू शकत नाही. याचे कारण काय असावे?

गोस्वामी–विजय! श्रृंगार नामक रसाचे स्वरूप जाणल्यानंतरच स्थायीभावात रसोदय करवू शकशील.

विजय–श्रृंगार कशास म्हणतात?

गोस्वामी–अतिशय शोभामय मधुररसाचे नावच 'श्रृंगार' आहे. तो दोन प्रकारचा आहे–विप्रलंभ आणि संभोग.

विजय–विप्रलंभाचे लक्षण जाणू इच्छितो.

गोस्वामी–मिलन अथवा वियोग या कुठल्याही अवस्थेत नायक आणि नायिका जेव्हा परस्पर आलिंगन आणि चुंबन आदी करू शकत नाहीत, जे त्यांना हवे असते, तेव्हा त्याअभावी जो भाव सुंदर रूपात प्रकटित होतो, तो संभोगाकरिता पुष्टिकारक विप्रलंभ भाव म्हणविला जातो. विप्रलंभाचा अर्थ आहे–विरह वा वियोग.

विजय–विप्रलंभ कशाप्रकारे संभोगाची पुष्टी करतो?

गोस्वामी–ज्याप्रकारे रंगविलेल्या वस्त्रास पुन्हा त्याच रंगात रंगविले गेले तर त्याची उत्तरोत्तर उज्ज्वलताच वाढते, त्याचप्रकारे वियोग अथवा विरहाद्वारे संभोगाचा रसोत्कर्ष होतो. विप्रलंभाशिवाय संभोगाची पुष्टी होत नाही.

विजय–विप्रलंभ किती प्रकारचा असतो?

गोस्वामी–पूर्वराग, मान, प्रेमवैचित्र्य आणि प्रवास भेदाने विप्रलंभ चार प्रकारचा असतो.

विजय–पूर्वराग कशास म्हणतात?

गोस्वामी–नायक आणि नायिकेच्या भेटण्याच्या पूर्वी दर्शन आणि श्रवण आदींपासून जी रती उत्पन्न होते, त्यास पूर्वराग म्हटले आहे.

विजय–दर्शनाचे येथे काय तात्पर्य आहे?

गोस्वामी–कृष्णाचे साक्षात दर्शन करणे, चित्रपटात त्यांचे रूप पाहणे आणि स्वप्नात त्यांचे दर्शन करणे–हे सर्व 'दर्शन' आहे.

विजय–श्रवण कशास म्हणतात?

गोस्वामी–स्तुतिपाठक (वंदी), दूती आणि सखी–यांच्या मुखातून तथा गीत आदींद्वारे जे ऐकले जाते, त्यास श्रवण म्हणतात.

विजय–या रतीचा उदय होण्याचे कारण काय आहे? ही कशी उत्पन्न होते?

गोस्वामी–प्रथम स्थायीभाव प्रकरणात अभियोग, विषय, संबंध आणि अभिमान आदींना रतीच्या आविर्भावाचा हेतू म्हटला गेला आहे, या पूर्वरागातपण त्यांनाच हेतू म्हटले जाऊ शकते.

विजय–व्रजनायक आणि व्रजनायिका–यापैकी प्रथम कोणास पूर्वराग होतो?

गोस्वामी–यात अनेक प्रकारचे विचार आहेत–साधारण स्त्री आणि पुरुष, या दोघांपैकी स्त्रीमध्ये लज्जा आदी अधिक असते, म्हणून पुरुषच प्रथम स्त्रीस शोधतो; परंतु स्त्रियांमध्ये प्रेम अधिक असल्याने मृगनयनींमध्ये पूर्वराग आधी होतो. भक्तिशास्त्रात असे म्हटले गेले आहे की भक्तामध्ये पूर्वराग आधी जन्मतो. भगवंताचा राग नंतर उदित होतो. व्रजदेवी भक्तांची चरम सीमा असल्याने त्यांच्यात पूर्वराग अधिक सुष्ठुरूपात आधी असतो. याविषयी प्राचीन उक्ती आहे–सर्वप्रथम नारी अनुरक्त होते, तिच्याच इशाऱ्यावरून नंतर पुरुष अनुरक्त होतो. जर दोघांचेही समान प्रेम असले तर या क्रमाचा उलटफेर झाल्यावरही काहीच दोष होत नाही.

विजय–पूर्वरागात संचारीभाव सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–व्याधी, शंका, असूया, श्रम, क्लम, निर्वेद, औत्स्युक्य, दैन्य, चिंता, निद्रा, प्रबोधन, विषाद, जडता, उन्माद, मोह आणि मृत्यू आदी त्याचे व्याभिचारभाव आहेत.

विजय–पूर्वराग किती प्रकारचा असतो?

गोस्वामी–पूर्वराग तीन प्रकारचा असतो–प्रौढ, समंजस आणि साधारण.

विजय–प्रौढ पूर्वराग कशास म्हणतात?

गोस्वामी–समर्था रतिरूप पूर्वरागच प्रौढ-पूर्वराग आहे. या रागात लालसेपासून मरणापर्यंत दहा दशाही असू शकतात. पूर्व रागाच्या प्रौढतेमुळे यात उदित दशा प्रौढा आहेत.

विजय–दहा दशा कोणकोणत्या आहेत?

गोस्वामी–

**लालसोद्वेगजागर्यास्तानवंजडिमात्र तु।**
**वैयग्र्यं व्याधिरुन्मादो मोहो मृत्युर्दशा दश॥**

(उ. नी. १५/२९)

अर्थात लालसा, उद्वेग, जागरण, तानव, जडता, व्यग्रता, व्याधी, उन्माद, मोह आणि मृत्यू–या दहा दशा आहेत.

विजय–लालसा कशी होते?

गोस्वामी–अभीष्ट प्राप्तीच्या तीव्र आकांक्षेस 'लालसा' म्हणतात. ज्यात उत्सुकता, चपलता, घूर्णा आणि श्वासादी लक्षित होतात.

विजय–उद्वेग कशास म्हणतात?

गोस्वामी–मनाची चंचलताच 'उद्वेग' आहे. यात दीर्घनिःश्वास, चपलता, चिंता, अश्रू, वैवर्ण्य आणि स्वेद आदी उदित होतात.

विजय–जागरण कशास म्हणतात?

गोस्वामी–जागरणाचे तात्पर्य निद्रा न येण्याशी आहे. यात स्तंभ, शोष आदी राग उत्पन्न होतात.

विजय–तानव कशास म्हणतात?

गोस्वामी–शरीराचे दुबळे-बारीक होणे म्हणजेच 'तानव' होय. यात दुर्बलता आणि मस्तिष्क भ्रम आदी उदित होतात. कुणी-कुणी तानवाच्या स्थानी 'विलाप' पाठ सांगतात.

विजय–जडता कशास म्हणतात?

गोस्वामी–चांगल्या-वाईटाच्या ज्ञानाचा अभाव, प्रश्न केल्यावर अनुत्तर तथा दर्शन आणि श्रवणशक्तीचा अभाव झाल्याने 'जडता' वा 'जडिमा' होते.

विजय–व्यग्रता कशास म्हणतात?

गोस्वामी–भावविकारसमूह बाहेरून प्रकाशित न झाल्यास गांभीर्य होते, त्यामध्ये जो विक्षोभ आणि असहिष्णुता होतो, त्यास 'व्यग्रता' म्हणतात. यात अविवेक, निर्वेद, खेद आणि असूया होते.

विजय–व्याधी कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्यात अभीष्ट वस्तूच्या अप्राप्तीने शरीर पिवळे पडणे आणि महातापरूप चिन्हे प्रकटित होतात, त्यास 'व्याधी' म्हणतात. यात शीत, स्पृहा, मोह, दीर्घ-निःश्वास आणि पतन (पडणे) आदी अनुभाव प्रकाशित होतात.

विजय–उन्माद कशास म्हणतात?

गोस्वामी–निर्वेद, विषाद आणि दैन्य आदी भावांद्वारे आक्रांत झालेल्या चित्तामध्ये आपल्या सर्व अवस्थांमध्ये सर्वकाळी आणि सर्व ठिकाणी तन्मनस्क झाल्याने (अभीष्ट वस्तूच्या चिंतनामध्ये तन्मय झाल्याने) दुसऱ्या वस्तूमध्ये इष्ट वस्तूचे भान (जसे तमाल वृक्षास कृष्ण समजून आलिंगन करणे) रूप भ्रमच 'उन्माद'

म्हणविला जातो. यात इष्टाच्या प्रती द्वेष, दीर्घनिःश्वास, निमेष आणि विरह आदी अनुभाव प्रकाशित होतात.

विजय–मोह कशास म्हणतात?

गोस्वामी–चेतनाशून्य अवस्थाच 'मोह' आहे. यात निश्चलता आणि पतन (मूर्च्छित होऊन पडणे) आदी अनुभाव प्रकट होतात.

विजय–मृत्यू कशास म्हणतात?

गोस्वामी–पत्र-प्रेरण आणि सखीद्वारे संवाद-प्रेरण आदी उपायांस अवलंबन केल्यावरही जर कांतासोबत समागम होत नाही, तेव्हा अशा दशेत काम-बाणाच्या पीडेने मरण उद्यम होते. मृत्यूमध्ये स्वतःच्या प्रिय वस्तूंचे सखींकडे समर्पित करणे, भृंग (भ्रमर), मंद-पवन, ज्योत्स्ना, कदंब, मेघ, विद्युत आणि मयूर आदी अनेक उद्दीपन विभाव प्रकट होतात.

विजय–आता समंजस पूर्वराग कशास म्हणतात–सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–समंजस पूर्वराग समंजसा रतीचे स्वरूप आहे. अर्थात संगमाआधी जो पूर्वराग निर्माण होतो. यात अभिलाष, चिंता, स्मृती, गुणकीर्तन, उद्वेग, विलाप, उन्माद, व्याधी आणि मृत्यू–या दहा दशा क्रमशः प्रकट होऊ शकतात.

विजय–येथे अभिलाषेचे रूप काय आहे?

गोस्वामी–प्रिय व्यक्तीस भेटण्याकरिता जी कृती होते, त्यास अभिलाषा म्हणतात. आपल्या शरीरास अलंकृत करणे, एखाद्या बहाण्याने प्रियतमनिकट जाणे आणि त्याच्याप्रती आपला अनुराग प्रकट करणे–हे अनुभाव प्रकट होतात.

विजय–येथे चिंतेचे स्वरूप कसे असते?

गोस्वामी–अभीष्ट वस्तूच्या प्राप्ती-विषयक उपायांचे (विप्राद्वारे प्रियतमेजवळ आपली व्यथा सांगणे अथवा पत्र पाठविणे आदी विषयात) ध्यानच 'चिंता' आहे. या दशेत शय्येवर इकडे-तिकडे वारंवार कूस बदलणे, दीर्घ निःश्वास सोडणे, एकटक पाहत राहणे आदी लक्षणे प्रकाशित होतात.

विजय–येथे स्मृती कशास म्हटले आहे?

गोस्वामी–दर्शन आणि श्रवण द्वारा उपलब्ध झालेले प्रियतम, त्यांचे भूषण, त्यांच्या लीला आणि विनोद् आदींचे चिंतनच 'स्मृती' आहे. यात कंप, अंगांचे विवश होणे, अंगाचे वैवर्ण्य, बाष्प, त्याग आणि दीर्घनिःश्वास आदी अनुभाव लक्षित होणे.

विजय–गुणकीर्तन कशास म्हणतात?

गोस्वामी–सौंदर्य आदी गुणांची प्रशंसा करण्यास 'गुणकीर्तन' म्हणतात. यात कंप, रोमांच आणि गद्गद आदी अनुभाव प्रकट होतात. उद्वेग, विलापासोबत उन्माद, व्याधी, जडता आणि मृती (मृत्यू) हे सहा, समंजसा रतीमध्ये जेथपर्यंत प्रकाशित होतात, समंजसा-पूर्वरागातही ते तितकेच प्रकाशित होतात.

विजय–आता साधारण-पूर्वरागाची लक्षणे सांगावीत.

गोस्वामी–जशी साधारणी रती असते, ठीक त्याच प्रकारे साधारण समंजस रागही असतो. यात विलापापर्यंत सहा दशा अतिशय कोमल रूपात उदित होतात. त्यांची उदाहरणे अत्यंत सहज आहेत, म्हणून त्यांना सांगण्याची आवश्यकता समजत नाही. पूर्वरागात परस्पर वयस्कांच्या हाती कामलेखपत्र आणि माल्यादी पाठविले जातात.

विजय–कामलेख कसा असतो?

गोस्वामी–प्रेम प्रकाशक लेख व पत्र कामलेख म्हणविला जातो. हा दोन प्रकारचा असतो–साक्षर आणि निरक्षर.

विजय–निरक्षर कामलेख कशास म्हणतात?

गोस्वामी–असा लेख ज्यावर एखाद्या लाल रंगाच्या पानावर नखाद्वारे अंकित अर्धचन्द्राचे चिन्ह आहे, त्यावर कुठलेही अक्षर आदी अंकित नसावे–त्याला निरक्षर कामलेख म्हणतात.

विजय–साक्षर कामलेख कशास म्हणतात?

गोस्वामी–प्राकृत भाषेमध्ये आपल्या हातांनी आपल्या अवस्थेचे वर्णन करीत जे पत्र नायक आणि नायिका परस्पर पाठवितात–त्यास साक्षर कामलेख म्हणतात. गैरिक शिलेतून उत्पन्न किंवा अतिशय लाल रंगाच्या पुष्पांस कुस्करून काढलेल्या रंगास शाईच्या जागी प्रयोग करून कामलेख लिहिला जातो. यात मोठमोठ्या पुष्पदलास पत्र (कागदाच्या जागी) बनविले जाते. कुंकुम-द्रवाद्वारे अक्षरे लिहिली जातात तथा हा कमळाच्या देठापासून काढलेल्या सूत्राने बांधलेला असतो.

विजय–पूर्वरागाचा क्रम कशाप्रकारे असतो?

गोस्वामी–काही-काहींचे म्हणणे आहे की सर्वप्रथम नयन-प्रीती होते. त्यानंतर क्रमशः चिन्ता, आसक्ती, संकल्प, झोप न येणे, कृशता, विषय निवृत्ती, लज्जानाश, उन्माद, मूर्च्छा आणि मृत्यू–अशा प्रकारे कामदशा असते. नायक आणि नायिका दोघांमध्येही पूर्वराग होतो. आधी नायिकेमध्ये आणि नंतर नायक कृष्णामध्ये पूर्वराग उदित होतो.

विजय–मान कशास म्हणतात?

गोस्वामी–परस्पर अनुरक्त दंपती वा नायक-नायिकेच्या एका ठिकाणी राहिल्यानंतरही त्यांच्या अभीष्ट (इच्छित) आलिंगन, दर्शन, चुंबन आणि प्रियभाषण आदींच्या प्रतिबंधक (बाधा निर्माण करणाऱ्या) भावास 'मान' म्हणतात.

विजय–मानाचे आश्रयस्थान काय आहे?

गोस्वामी–मानाचा आश्रय प्रणय आहे. प्रणयाआधी 'मान' नामक रस नसतो. असल्यावर संकोच होतो. मान दोन प्रकारचा असतो–सहेतू आणि निर्हेतू.

विजय–सहेतू मान कशास म्हणतात?

गोस्वामी–जेव्हा नायक एखाद्या विपक्ष वा तटस्थ नायिकेप्रती विशेष प्रीतीचा व्यवहार करतो, तेव्हा त्यास पाहून वा ऐकून नायिकेच्या हृदयात जी ईर्ष्येची भावना होते, ती ईर्ष्या प्रणय-प्रधान झाल्यावर सहेतुमान होते. या विषयात प्राचीन मत हे आहे की स्नेहाच्या विना भय होत नाही. प्रणयाशिवाय ईर्ष्या होत नाही. म्हणून प्रत्येक प्रकारचा मान–नायक-नायिकेचा प्रेम प्रकाशक असतो. ज्या नायिकेच्या हृदयात सुसख्य आदी भाव विराजमान होतात, तीच नायिका आपल्याप्रती अनुरक्त नायकास

दुसऱ्या कुण्या युवतीसोबत प्रीती करतांना पाहून बेचैन होऊन जाते. द्वारकेत एकदा श्रीकृष्णाने श्रीरुक्मिणीस एक पारिजात पुष्प दिले. ते ऐकूनही सत्याभामेखेरीज अन्य कुठल्याही महिषीच्या हृदयात 'मान' उत्पन्न झाला नाही. येथे विपक्षवैशिष्ट्य अनुमान करून सत्यभामेस मान झाला होता.

विजय–विपक्ष वैशिष्ट्य-अनुभव किती प्रकारचे असतात?

गोस्वामी–श्रुत, अनुमित आणि दृष्ट या भेदांनी तीन प्रकारचे असतात.

विजय–श्रुत कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रिय सखी अथवा शुकपक्षाच्या मुखातून ऐकण्यास श्रुत-विपक्षवैशिष्ट्य म्हणतात.

विजय–अनुमित-विपक्षवैशिष्ट्य कशास म्हणतात?

गोस्वामी–भोगांक (अन्य नायिकेचे संभोग चिन्ह), गोत्रस्खलन (विपक्ष नायिकेच्या नामाचे उच्चारण) आणि स्वप्न दर्शनाने जो अनुमान होतो, त्यास अनुमित-विपक्षवैशिष्ट्य म्हणतात. प्रिय व्यक्ती तथा विपक्षाच्या शरीरावर जी संभोग चिन्ह पाहिले जाते, तोच 'भोगांक' आहे. विपक्षाच्या नायिकेच्या नामाचे उच्चारण करून नायिकेस बोलावण्याचे नाव 'गोत्रस्खलन' आहे. यामुळे नायिकेस मरणाहूनही जास्त दुःख होते.

विजय–गोत्रस्खलनाचे उदाहरण ऐकू इच्छितो.

गोस्वामी–एकदा श्रीकृष्ण श्रीमती राधिकेसोबत विहार केल्यानंतर आपल्या घरी परतत होते. अकस्मात रस्त्यात चन्द्रावलीशी भेट झाली. श्रीकृष्णाने चन्द्रावलीस समोर पाहून विचारले–हे राधे! तू कुशल तर आहेस ना? कृष्णाचे बोलणे ऐकून चन्द्रावलीनेही म्हटले–अहे कंस! तुम्ही कुशल तर आहात ना? कृष्णाने विस्मित होऊन म्हटले–सुंदरी! तुला अशा प्रकारे विपरीत ज्ञान का झाले? (अथवा हे मूढमती! येथे तू कंसाला पाहिलेस तरी कोठे म्हणून कंसाचे कुशल विचारते आहेस?) चन्द्रावलीने फटकळपणे उत्तर दिले–मग तुम्हीही येथे राधेस कोठे पाहिले? तेव्हा कृष्ण समजले की ही तर चन्द्रावली आहे, मी भ्रमवशतः हिलाच राधेच्या नावाने संबोधिले. अशाप्रकारे आपला भ्रम जाणून ते अत्यंत लज्जित झाले आणि आपले मुख

अवनत केले; सोबतच चन्द्रावलीच्या तत्कालीन इर्ष्योत्थ वाक्चातुर्यास पाहून मंद मंद हसू लागले—असे हरी (सर्वक्लेशहारी) तुमचे रक्षण करोत.

विजय—स्वप्नदृष्ट विपक्षवैशिष्ट्य कशास म्हणतात?

गोस्वामी—कृष्ण आणि विदूषकाचे स्वप्नाचरणच स्वप्नदृष्ट विपक्ष-वैशिष्ट्याचे उदाहरण आहे. कृष्णाचे स्वप्न—एकदा क्रीडाकुंजात चन्द्रावलीसोबत विहारानंतर श्रीकृष्ण चन्द्रावलीसोबत एकाच शय्येवर झोपताना म्हणाले—" हे राधे! मी शपथपूर्वक सांगतो की तूच माझी प्रियतमा आहेस, तूच माझ्या हृदयात आहेस, बाहेरही आहे. तू माझ्या पुढेही आहेस आणि मागेही आहेस. आणखी काय सांगू? तूच माझ्या गृहात तथा गोवर्धन आदी शैलतटाच्या वनांमध्ये विराजित आहेस." रात्री कृष्णाच्या मुखातून अशा स्वप्न वाक्यास ऐकून चन्द्रावली मानिनी होऊन शय्येतून उठून उभी राहिली. विदूषकाचे स्वप्न—क्रीडाकुंजामध्ये चन्द्रावली आणि कृष्ण सुखपूर्वक विहार करीत आहेत, त्याच कुंजाबाहेर एका वेदीवर झोपलेल्या मधुमंगलाच्या स्वप्न वाक्यांस ऐकून व्यथित चन्द्रावलीस लक्ष्य करून दुसऱ्या कुंजामध्ये पद्मा आणि शैब्या संवाद साधत होत्या. पद्मा म्हणाली—सखी! पाहा! बाहेर झोपलेल्या मधुमंगलाच्या स्वप्न वाक्यांस ऐकून चन्द्रावलीचे मुख कसे मलिन झाले आहे, त्या मुख खाली करून संतापाने संतप्त होत आहेत. मधुमंगलाचे स्वप्न वाक्य—हे माधवी! कृष्ण चाटुकारीद्वारे पद्मेची सखी चन्द्रावलीची वंचना करीत आहेत. तेव्हा तू शीघ्र राधेस येथे अभिसार करवण्याचा प्रयत्न कर, काही चिंता करू नकोस.

विजय—दर्शन कशास म्हणतात?

गोस्वामी—दुसऱ्या नायिकेसोबत नायकास क्रीडारत पाहण्यास 'दर्शन' म्हणतात.

विजय—निर्हेतुक मान कशास म्हणतात?

गोस्वामी—नायक आणि नायिकेमध्ये वस्तुतः कुठलेच कारण नसल्याने देखील, कशाही प्रकारच्या कारण-आभासास आश्रय करून हा प्रणयच वृद्धी प्राप्त करून निर्हेतूक मान अवस्थेस प्राप्त होतो. म्हणूनच पंडितजन मानास प्रणयाचा परिणाम म्हणतात आणि निर्हेतुक मानास प्रणयाचेच विलासोदित वैभव म्हणतात. निर्हेतुक मानासच ते प्रणयमान म्हणतात. प्राचीन पंडित हे देखील म्हणतात की

सर्पाच्या स्वभावसिद्ध कुटिला गतीप्रमाणेच प्रेमाची गतीसुद्धा वक्र (वाकडी) असते. म्हणूनच अहेतू आणि सहेतू (कारण असो वा नसो, दोन्ही अवस्थांमध्ये) असे दोन प्रकारचे मान नायक-नायिकांमध्ये उदित होतात. अवहित्था (भाव लपविणे) हाच या रसाचा व्यभिचारी भाव आहे.

विजय–निर्हेतुक मान कशाप्रकारे शांत होतो?

गोस्वामी–निर्हेतुक मान आपोआपच शांत होतो, त्याला कुठल्याही उपाय आदींची आवश्यकता नसते. आपोआपच हास्योदयासोबत शांत होतो. परंतु सहेतुक मान साम, भेद, क्रिया, दान, नती, उपेक्षा आणि रसान्तर आदी यथायोग्य अवलंबित झाल्यावर शांत होतो. वाष्पमोक्षन (अश्रू पुसले जाणे) तथा हास्य आदीच मान शांत होण्याची लक्षणे आहेत.

विजय–साम कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रिय वाक्यरचना अर्थात प्रियेस मनविण्याकरिता गोड-गोड बोलणे म्हणजेच 'साम' होय.

विजय–भेद कशास म्हणतात?

गोस्वामी–भेद दोन प्रकारचे असतात अर्थात भावभंगीमाद्वारे आपले माहात्म्य प्रकाशित करणे आणि सखींद्वारे उपालम्भ अर्थात तिरस्कार प्रयोग.

विजय–दान कशास म्हणतात?

गोस्वामी–कपटतापूर्वक भूषण आदी देण्यास 'दान' म्हणतात.

विजय–नती कशास म्हणतात?

गोस्वामी–दीनतापूर्वक पायांशी पतित होण्यास 'नती' म्हणतात.

विजय–उपेक्षा कशास म्हणतात?

गोस्वामी–साम आदी उपायांद्वारे मानभंग होत नाही हे पाहून जी अवज्ञा होते (असा भाव की सोडा, पाहूया कुठपर्यंत मान करते आदी) त्यास उपेक्षा म्हणतात. अन्यार्थसूचक वचनांनी प्रसन्न करण्यासही काहीजण उपेक्षा म्हणतात.

विजय–आपण ज्या रसान्तर शब्दाचा प्रयोग केला आहे, त्याचा अर्थ काय आहे?

गोस्वामी–अचानक एखादी भय उत्पन्न करणारी गोष्ट किंवा दृश्य उपस्थित करण्याचे नाव 'रसान्तर' आहे. हे रसान्तर दोन प्रकारचे असते–स्वंय घटित आणि बुद्धिपूर्वक नायकाद्वारे रचित. जे आपोआप घटित होते त्यास 'स्वयं घटित' म्हणतात आणि प्रखर बुद्धीद्वारे जे केले जाते त्यास बुद्धिपूर्वक म्हटले जाते. स्वयं घटित–एके दिवशी कृष्णाद्वारे खूप प्रकारे मनवूनही मानिनी भद्रेचा मान काही केल्या भंग होईना. अचानक त्याचवेळी भीषण मेघ-गर्जना ऐकून भद्रा खूप घाबरली आणि समोर बसलेल्या कृष्णाच्या गळ्यात पडली. बुद्धिपूर्वक–एके समयी महामानिनी राधेस मनविण्याकरिता दुसरा काहीच उपाय न सापडल्यामुळे परम कौतुकी कृष्णाने मोठीच सुंदर कपटता केली. त्यांनी आपल्या हातांनी फुलांचा एक सुंदर हार गुंफून तो श्रीमतींच्या गळ्यात टाकला. श्रीमतींनी क्रोधाने त्या माळेस आपल्या गळ्यातून काढून दूर फेकले, दैववश ती माळ कृष्णावर जाऊन पडली. त्यावेळी कृष्णाने डोळे किलकिले करून मुखावर असा काही भाव आणला जसे त्यांना खूप मोठी जखम झाली असावी आणि मुख उदास करून ते एका ठिकाणी बसले. असे पाहून राधा घाबरली आणि व्यग्र होऊन आपल्या दोन्ही हातांनी कृष्णाच्या खांद्यांना पकडले. कृष्णानेही हसून राधेस गाढ आलिंगनपाशात आबद्ध केले.

विजय–कुठल्या दुसऱ्या उपायांनी देखील मानभंग होतो का?

गोस्वामी–विशेष देश, विशेष काळ आणि मुरली-ध्वनीद्वारे साम आदी उपायांशिवायही व्रजललनांचा मान भंग होतो. लघू मान अल्प प्रयासांनी सुद्धा शांत होतो. मध्य मान मोठ्या प्रयासांनी शांत होतो. दुर्जयमानास उपायांद्वारे शांत करणे कठीण असते. मानाच्या दशेमध्ये गोपी कृष्णाकरिता या शब्दांचा प्रयोग करतात– वाम, दुर्लील-शिरोमणी, कितवराज, खल-श्रेष्ठ, महाधूर्त, कठोर, निर्लज्ज, अतिदुर्ललित, गोपीकामुक, रमणीचोर, गोपीधर्म-नाशक, गोपसाध्वी-विडम्बक, कामुकेश्वर, गाढतिमिर, श्याम, वस्त्रचोर, गोवर्धन उपत्यका-तस्कर.

विजय–प्रेम-वैचित्य कशास म्हणतात?

गोस्वामी–प्रियतमाच्या निकट राहूनही प्रेम-उत्कर्षतावशतः विरहोत्थ जी आर्ती होते, त्यास प्रेम-वैचित्य म्हणतात, प्रेम उत्कर्षाद्वारे एका प्रकारची घूर्णा (चित्ताची विवशता वा विव्हळता) उदित होते, तीच भ्रांती रूपात कृष्ण-वियोगाची बुद्धी उत्पन्न करविते. चित्ताचा अस्वाभाविक भावच वैचित्य आहे.

विजय–प्रवास कशास म्हणतात?

गोस्वामी–मिलनानंतर नायक आणि नायिकेच्या दरम्यान देशान्तर, ग्रामान्तर, रसान्तर आणि स्थानान्तररूप व्यवधान बाधेस 'प्रवास' म्हणतात. या प्रवास रूप विप्रलंभात हर्ष, गर्व, मद् आणि व्रीडेस सोडून श्रृंगार-रसोपयोगी समस्त व्याभिचारभाव असतात. बुद्धिपूर्वक प्रवास आणि अबुद्धिपूर्वक प्रवास–असे दोन प्रकारचे प्रवास होतात.

विजय–बुद्धिपूर्वक प्रवास कसा असतो?

गोस्वामी–कार्यवश कुठे दूर जाण्यालाच बुद्धिपूर्वक प्रवास म्हणतात. आपल्या भक्तांस (वृन्दावनातील स्थावर-जंगम, पाण्डव, श्रुतदेव आणि मैथिल आदी सगळ्यांस) सुखदान, सदुपदेशदान आणि त्यांच्या कामनांची पूर्ती आदीच कृष्णाची कार्ये आहेत. काही दूर आणि सुदूर गमन भेदाने प्रवास दोन प्रकारचा असतो. सुदूर प्रवास तीन प्रकारचा असतो–भूत, भविष्यत आणि वर्तमान. सुदूर प्रवासात परस्पर संवादाचे आदान-प्रदान होते.

विजय–अबुद्धिपूर्वक प्रवास कसा असतो?

गोस्वामी–पराधीनतावश जो सुदूर प्रवास होतो त्यास अबुद्धिपूर्वक प्रवास म्हणतात. दिव्य, अदिव्य आणि दिव्यादिव्य भेदाने हे पारतंत्र्य अनेक प्रकारचे असते. प्रवासात दहा दशा (अवस्था) उदित होतात–चिन्ता, जागर, उद्वेग, तानव, मलिनांगता, प्रलाप, व्याधी, उन्माद, मोह आणि मृत्यू. प्रवास विप्रलंभाच्या अवस्थेत कृष्णामध्येही या दशा उपलक्षण रूपात उदित होतात. विजय! नाना प्रकारच्या प्रेमभेदामुळे उदित दशांचे नाना प्रकारत्व अवश्य स्वीकृत झाल्यावरही येथे त्यांचा उल्लेख केलेला नाही. परंतु स्नेह, मान, प्रणय, अनुराग, भाव आणि महाभावापर्यंत या प्रेम पर्यायाच्या कार्य-रूपात या सर्व दशा अधिकांशच साधारण रूपात समुदित होऊ शकतात. अधिकन्तु मोहन दशेत श्रीराधेत असाधारण दशा प्रकटित होते–याचे वर्णन

आधीसुद्धा केलेले आहे. कुण्या-कुण्या रसशास्त्रकाराने करुणेस एक पृथक विप्रलंभ मानले आहे, परंतु करुणा विषयक विप्रलंभ प्रवासाचाच प्रकार-भेद असल्याने येथे पृथक रूपात त्याचे वर्णन केलेले नाही.

श्रीगुरुगोस्वामींच्या विप्रलंभ विषयक उपदेशांवर विचार करीत करीत विजयकुमार मनोमन म्हणू लागले–विप्रलंभरस स्वतःसिद्ध रस नाही, तो केवळ संभोगरसाची पुष्टी करतो, यद्यपि जडबद्ध जीवाकरिता विप्रलंभरस विशेष रूपाने उदित होऊन शेवटी संभोग रसाच्या अनुकूल होतो, तथापि नित्यरसात थोडा-थोडा विप्रलंभ राहतोच, अन्यथा विचित्रलीला संभव होत नाही.

**॥ सदतीसावा अध्याय समाप्त ॥**



# अडतीसावा अध्याय (श्रृंगाररस-विचार)

हात जोडून विजयकुमाराद्वारे संभोगरसाविषयी जिज्ञासा केल्यावर श्रीगुरुदेवांनी प्रेमपूर्वक अशाप्रकारे सांगण्यास आरंभ केला–कृष्णलीला प्रकट आणि अप्रकट भेदाने दोन प्रकारची असते. विप्रलंभरसामध्ये ज्या विरहावस्थेचे वर्णन झाले आहे, ती प्रकट लीलेनुसार आहे. परंतु वृन्दावनात सदा-सर्वदा रासादी विविध लीला-विनोदामध्ये विहारपरायण श्रीहरीसोबत व्रजदेवींचा कधीही वियोग होत नाही. मथुरा-माहात्म्यामध्ये असे लिहिले आहे की गोपगोपींसोबत कृष्ण तेथे क्रीडा करतात. 'क्रीडति'–या वर्तमानकालीन क्रियेच्या प्रयोगाने हे समजावे की कृष्ण-क्रीडा नित्य आहे. म्हणून गोलोक वा वृन्दावनाच्या अप्रकट लीलांमध्ये कृष्णलीलेचे दूर प्रवासगत विरहत्व नाही. तेथे संभोगच नित्य आहे. नायक-नायिका (परस्पर विषय आणि आश्रयाचे) दर्शन, संभाषण आणि स्पर्शादीचे जे परस्पर सुखतात्पयपूर्वक निषेवण (सेवन) होते, त्याद्वारे उल्हास प्राप्त विचित्र भावच संभोग आहे. संभोग मुख्य आणि गौण भेदाने दोन प्रकारचा असतो.

विजय–मुख्य संभोग कसा असतो?

गोस्वामी–जागृत दशेमध्ये जो संभोग असतो, त्यास संभोग म्हणतात. हा मुख्य संभोग चार प्रकारचा असतो–(१) पूर्वरागाच्या पश्चात जो संभोग होतो, तो संक्षिप्त संभोग आहे. (२) मानानंतर जो संभोग होतो, त्याला संकीर्ण संभोग म्हणतात, (३) थोडा दूर प्रवास केल्यानंतर जो संभोग होतो, त्यास संपन्न संभोग म्हणतात, आणि (४) सुदूर प्रवासानंतर होणाऱ्या संभोगास समृद्धिमान संभोग म्हणतात.

विजय–संक्षिप्त संभोग कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्या स्थळी नायक आणि नायिका संभ्रम आणि लज्जा हेतू संक्षिप्त चुंबन-आलिंगन आदी उपचाराची सेवा करतात, त्यालाच संक्षिप्त संभोग म्हणतात.

विजय–संकीर्ण संभोग कशास म्हणतात?

गोस्वामी–ज्या संभोगात नायकाद्वारे केल्या गेलेल्या वंचनेच्या स्मरणाने आणि कधी नायकाच्या अंगावर रतिचिन्हें आदींचे दर्शन आणि श्रवणाने सौरतचेष्टा

विषयक (रतिक्रीडा संबंधी) उपचारसमूह मिश्रित होऊन तप्त इक्षूची (गरम ऊसाची) युगपत् उष्णता आणि मधुरता दोघांच्याही अनुभवाप्रमाणे आस्वाद प्रदान करतो, त्यास संकीर्ण संभोग म्हणतात.

विजय–संपन्न संभोग कशास म्हणतात?

गोस्वामी–थोड्या लांबच्या प्रवासाहून परतलेल्या नायकासोबत नायिकेच्या मिलनास 'संपन्न-संभोग' म्हणतात. हा दोन प्रकारचा असतो–आगती आणि प्रादुर्भाव. लौकिक व्यवहारात जे आगमन होते, त्यास 'आगती' म्हणतात. जसे, संध्यासमयी गोचारण करून परतलेल्या कृष्णाचे गोपिका दर्शन करतात. प्रादुर्भाव–प्रेम विव्हळ गोपींसमोर अकस्मात कृष्णाच्या आगमनास प्रादुर्भाव म्हणतात, जसे–रासलीलेच्या वेळी कृष्ण अंतर्धान झाल्यानंतर त्यांच्या विरहात विलाप करणाऱ्या गोपींसमोर श्रीकृष्णाचा अकस्मात प्रादुर्भावच 'प्रादुर्भाव' म्हणविला जातो. प्रादुर्भावात सर्वाभीष्ट-सुखोत्सव असतो.

विजय–समृद्धिमान संभोग कशास म्हणतात?

गोस्वामी–नायक आणि नायिकांमध्ये परस्पर दर्शन वा मिलन दुर्लभ असते, पराधीनतेमुळे त्यांच्यात मिलन सर्वदा संभव नसते. त्या पराधीनतेपासून मुक्त झाल्यावर जेव्हा अकस्मात मिलन होते, त्यास 'समृद्धिमान संभोग' म्हणतात. संभोग रस छन्न (लपलेला) आणि प्रकाश भेदाने दोन प्रकारचा असतो. यावेळी त्यांच्यासंबंधी काही सांगण्याची आवश्यकता नाही.

विजय–गौण संभोग कसा असतो?

गोस्वामी–श्रीकृष्णाची विशेष लीला–जिला स्वप्नात प्राप्त करता येते, त्यास 'गौण' संभोग म्हणतात. ती स्वप्ने दोन प्रकारची असते–'सामान्य' आणि 'विशेष'. सामान्य स्वप्नाचे वर्णन व्यभिचारी प्रकरणात आधीच केलेले आहे. विशेष स्वप्न संभोग जागृत दशेच्या व्यापारतुल्य परमाश्चर्यजनक आणि स्थायी-संचारीभावांनीयुक्त असतो, अर्थात हा जागृत संभोगाप्रमाणे असतो. मुख्य संभोगाप्रमाणे हा गौण-संभोगसुद्धा चार प्रकारचा असतो–संक्षिप्त, संकीर्ण, संपन्न आणि समृद्धिमान.

विजय–स्वप्नात तर वस्तुतः काही घटनाच होत नसते, मग त्यात समृद्धिमान

संभोग कसा संभव आहे?

गोस्वामी–जागर आणि स्वप्नाचे स्वरूप एकाच प्रकारचे असते. याविषयी उदाहरणादाखल अनिरुद्ध आणि उषा यांची नावे घेता येतील. ज्यावेळी उषा शोणितपुरात बाण राजाच्या अंतःपुरात स्वप्नामध्ये अनिरुद्धासोबत संप्रयोगानल (मिलनाचे सुख) अनुभवीत होती, त्याचवेळी अनिरुद्धही द्वारकापुरीच्या अंतःपुरात झोपल्या-झोपल्या उषेसोबत विलासानंदाचे आस्वादन करीत होते. हा व्यापार प्राकृत लोकांच्या बाबतीत घडत नाही. याविषयी प्रत्यक्ष प्रमाण देऊन दृढतापूर्वक म्हणतात–स्वप्न सत्य असल्यानेच तर सिद्ध भक्तांच्या परमाश्चर्यजनक स्वप्नातून प्राप्त अलंकार आदी त्यांच्या जागृत दशेतही दिसून येतात. अशा प्रकारे कृष्ण आणि कृष्णकांतांचीसुद्धा अबाधित स्वप्ने असतात. स्वप्ने दोन प्रकारची असतात–जागरायमान स्वप्न आणि स्वप्नायमान जागर. समाधिरूप चतुर्थ अवस्थेस पार केल्यावर प्रेममयी पंचमावस्थेस प्राप्त गोपींची जी स्वप्ने असतात, ती रजोगुणजनित स्वप्नाप्रमाणे खोटी नसतात अर्थात गोपींची स्वप्ने अप्राकृत, निर्गुण आणि परमसत्य असतात. म्हणूनच अशा अप्राकृत परम अद्भुत स्वप्न-विलासात कृष्ण आणि कृष्णप्रियांचा समृद्धिमान संभोग संभव होतो.

विजय–संभोगाच्या अनुभावांस सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–संभोगाचे अनुभाव आहेत–सन्दर्शन, जल्पन, स्पर्शन, मार्ग रोखणे, रास, वृन्दावन-क्रीडा, यमुनाजळी केली, नौका-विलास, पुष्प चोरण्याची लीला, दानलीला, कुंजांमध्ये लपाछपी खेळणे, मधुपान, कृष्णाचे स्त्री-वेष धारण, कपट-निद्रा, द्युतक्रीडा, वस्त्राकर्षण, चुंबन, आलिंगन, नखार्पण, बिम्बाधर-सुधापान आणि निधुवन-रमण-सम्प्रयोग.

विजय–प्रभो! लीला-विलास एक प्रकारचा असतो आणि सम्प्रयोग दुसऱ्या प्रकारचा. या दोघांपैकी अधिक सुख कशात असते?

गोस्वामी–सम्प्रयोगापेक्षा लीला-विलासात अधिक सुख असते

विजय–श्रीकृष्णाप्रती प्रेयसींचे प्रणय संबोधन कसे असते?

गोस्वामी–सख्या कृष्णास मोठ्या प्रेमाने असे म्हणत पुकारतात–हे

गोकुलानन्द, हे गोविन्द, हे गोष्ठेन्द्र कुलचन्द्र, हे प्राणेश्वर, हे सुन्दरोत्तम, हे नागर शिरोमणी, हे वृन्दावनचन्द्र, हो गोकुलराज, हे मनोहर, इत्यादी.

विजय–प्रभो! कृष्णलीला प्रकट आणि अप्रकट भेदाने दोन प्रकारची असूनही एकच तत्त्व आहे. कृपया हे सांगावे की प्रकट व्रजलीला किती प्रकारची असते?

गोस्वामी–प्रकट व्रजलीला नित्य आणि नैमित्तिक भेदाने दोन प्रकारची असते. व्रजाची अष्टकालीय लीलाच नित्य आहे. पूतनावध आणि दूर प्रवास आदी लीला नैमित्तिक आहेत.

विजय–प्रभो, नित्य लीलेसंबंधी निर्देश देण्याची कृपा करावी.

गोस्वामी–याविषयी दोन प्रकारची वर्णने प्राप्त होतात. एक ऋषींद्वारे केलेले वर्णन, दुसरे श्रीमद् गोस्वामींद्वारे केलेले वर्णन. तू या दोघांपैकी कुठले ऐकू इच्छितोस?

विजय–मी ऋषींद्वारे रचित श्लोकांमध्ये जे वर्णन आहे, ते ऐकू इच्छितो.

गोस्वामी–

**निशान्तः प्रातःपूर्वाह्णो मध्याह्नश्चापराह्णकः।**
**सायं प्रदोषरात्रिश्च कालाष्टौ च यथाक्रमम्॥**
**मध्याह्नो यामिनी चोभौ यन्मुहूर्त्तमितो स्मृतौ।**
**त्रिमुहूर्त्तमिता ज्ञेया निशान्तप्रमुखाः परे॥**

अर्थात निशान्त, प्रातः, पूर्वान्ह, मध्यान्ह (दुपार), अपरान्ह (तृतीय प्रहर), सायं (सायंकालीन), प्रदोष आणि रात्री लीला भेदाने लीला अष्टकालीन असते. रात्रिलीला तथा मध्यान्हलीला प्रत्येकी सहा सहा मुहूर्तांच्या असतात. दोन दंडांचा एक मुहूर्त(१) असतो. सनत्कुमार-संहितेमध्ये(२) सदाशिवाने या अष्टकालीय लीलेनुसार ज्यावेळेकरिताच ज्या सेवेला निर्दिष्ट केले आहे, त्यावेळी त्याच लीलेचे स्मरण

(१) २४ मिनिटांचा एक दण्ड असतो, दोन दण्ड अर्थात ४८ मिनिटांचा एक मुहूर्त असतो.

(२) सात्त्वत-पंचरात्रांतर्गत एक तन्त्र. पद्मपुराण पातालखण्ड ५२ वा अध्याय काही पाठभेदाने आलोचनीय आहे.

करावयास हवे.

विजय–प्रभो! मी जगद्गुरू सदाशिवांच्या वचनांस ऐकू शकतो का?

गोस्वामी–ऐक–

**(३) सदाशिव उवाच–**
**परकीयाभिमानिन्यस्तथास्य च प्रियाः जनाः।**
**प्रचुरेणैव भावेन रमयन्ति निजप्रियम्॥**
**आत्मानं चिन्तयेत्तत्र तासां मध्ये मनोरमाम्।**
**रूपयौवनसम्पन्नां किशोरीं प्रमदाकृतिम्॥**
**नानाशिल्पकलाभिज्ञां कृष्णभोगानुरूपिणीम्।**
**प्रार्थितामपि कृष्णेन ततो भोगपराङ्मुखीम्॥**
**राधिकानुचरीं नित्यं तत्सेवनपरायणाम्।**
**कृष्णादप्यधिकं प्रेम राधिकायां प्रकुर्वतीम्॥**
**प्रीत्यऽनुदिवसं यत्नात्तयोः संगमकारिणीम्।**
**तत् सेवनसुखाह्लादभावेनातिसुनिर्वृताम्॥**

---

(३) सदाशिव म्हणाले–श्रीहरीची प्रियपात्री परकीयाभिमानिनी रमणीगण प्रचुर अप्राकृत भावांद्वारे आपल्या प्रिय वल्लभास आनंद प्रदान करतात. हे नारद! त्याच अप्राकृत वृन्दावन धामामध्ये त्याच परकीयाभिमानिनी कृष्णप्रियांमध्ये तू स्वरूपाची अशी भावना करावीस–मी अतिशय सुंदर रूपयौवनसम्पन्ना आनंदरूपिणी, किशोर अवस्थेतीत रमणी आहे, कृष्णास आल्हादित करणाऱ्या विविध प्रकारच्या शिल्प कलांची विशेषज्ञ आहे, श्रीमती राधेची नित्य अनुचरी आहे, श्रीकृष्णाची परमप्रिय वल्लभा श्रीमती राधिकेस श्रीकृष्णासोबत संगम करवून मी सदा सुखी होईन. म्हणून संभोगाकरिता कृष्णाद्वारे प्रार्थना केल्यावरही मी असा विचार करून त्या संभोगापासून दूर राहीन की वास्तविक हा संभोग कृष्णेन्द्रिय प्रीतिकर नसून आत्मेन्द्रिय प्रीतिकर (स्वतःच्या सुखाकरिता)च असेल. म्हणूनच कृष्ण-प्रियतमा श्रीमती राधिकेची अनुचरी आणि सदैव सेवापरायण राहून मी कृष्णापेक्षाही श्रीमतीच्या प्रती अधिक प्रेम राखणारी असावी, मी प्रतिदिन प्रीती आणि यत्नपूर्वक श्रीराधा आणि श्रीकृष्णाचे परस्पर मिलन करविण्यास तत्पर तथा त्या मिलनाद्वारे दोघांच्या सुखवर्धनरूप सेवानंदात निमग्न होईन. अशा प्रकारे विशेष रूपाने स्वतःच्या स्वरूपाची भावना करीत अप्राकृत वृन्दावनात ब्राह्म मुहुर्तापासून जोपर्यंत महानिशा उपस्थित होत नाही तोपर्यंत सुष्ठुरूपाने मानस सेवा करावयास हवी.

**इत्यात्मानं विचिन्त्यैव तत्र सेवां समाचरेत्।**
**ब्राह्ममूहूर्त्तमारभ्य यावत्तुस्यान्महानिशि॥**

विजय–निशांतलीला कशी असते?

गोस्वामी–

(४) **श्रीवृन्दा उवाच-**
**मध्ये वृन्दावने रम्ये पंचाशत्कुंजमण्डिते।**
**कल्पवृक्षनिकुंजेसु दिव्यरत्नमये गृहे॥**
**निद्रितौ तिष्ठतस्तल्पे निविडालिंगितौ मिथः।**
**मदाज्ञाकारिभिः पश्चात् पक्षिभिर्बोधितावपि॥**
**गाढालिङ्गननिर्भेदमाप्तौ तद्भंगकातरौ।**
**नो मतिं कुर्वतस्तल्पात् समुत्थातुं मनागपि॥**
**ततश्च शारिकाशब्दैः शुक शब्दैश्च तौ मुहुः।**
**बोधितौ विविधैर्वाक्यैः स्वतल्पादुदतिष्ठताम्॥**
**उपविष्टौ ततो दृष्ट्वा सख्यस्तल्पे मुदान्वितौ।**
**प्रविश्य कुर्वन्ति सेवां तत्कालस्योचितां तयोः॥**
**पुनश्च शारिकावाक्यैरुत्थाय तौ स्वतल्पतः।**
**आगतौ स्वस्वभवनं भीत्युत्कंठाकुलौ मिथः॥**

---

(४) वृन्दादेवी म्हणाली–श्रीमती राधा आणि कृष्ण वृन्दावनाच्या मधोमध चारही बाजूंनी पन्नास कुंजांद्वारे सुशोभित परम रमणीय अशा एका कल्पतरूच्या निकुंजामध्ये अप्राकृत रत्नमय गृहामध्ये परस्पर गाढ आलिंगनपूर्वक एकाच शय्येवर निद्रिस्त आहेत. ते दोघही आलिंगन सुखात अशा प्रकारे एक झाले आहेत की त्यांची निद्रा पूर्ण होऊनही माझ्या आज्ञेचे पालन करणाऱ्या पक्षांच्या सुमधुर कलरवाद्वारे त्यांना जागवूनही गाढ-आलिंगनाद्वारे प्राप्त सुख कुठे हरवू नये–या भीतीने ते शय्येवरून उठू सुद्धा इच्छित नाही. तदनंतर सारिकांसोबत शुकादी पक्ष्यांच्या विविध वचनांद्वारे वारंवार जागविले गेल्यावर ते शय्येवर उठून बसतात. त्यानंतर श्रीमती राधा आणि कृष्णास शय्येवर सुखपूर्वक बसलेले पाहून सख्या त्यांच्याजवळ जाऊन त्यांची तत्कालोचित सेवा करू लागतात. मग ते दोघे ही सारिकेच्या गोष्टी ऐकत ऐकत शय्येवरून उठून परस्पर अप्राकृत भय आणि उत्कंठा रसाने व्याकूळ होऊन आपापल्या घरी परतले.

विजय–प्रातःकालीन लीला कशी असते?

गोस्वामी–

**(५) प्रातश्च बोधितो मात्रा तल्पादुत्थाय सत्वरः।**
**कृत्वा कृष्णो दन्तकाष्ठं बलदेवसमन्वितः॥**
**मात्रानुमोदितो याति गोशालां दोहनोत्सुकः।**

---

(५) प्रातःकाळी माता यशोदेने जागविल्यावर श्रीकृष्ण शय्येवरून उठून शीघ्रतापूर्वक दंतधावन करतात. मग मातेची अनुमती घेऊन बलदेवासोबत गोदोहनाकरिता उत्सुक होऊन गोशाळेत गमन करतात. हे विप्रवर नारद! तिकडे प्रातःकाळी सख्यांद्वारे जागवली गेल्यावर राधा आपल्या शय्येवरून उठते तथा दंतधावन करून शरीरास तेल मर्दन करते. तदनंतर ललितादी सख्या त्यांना स्नानवेदीवर नेऊन स्नान करवितात आणि मग विविध प्रकारच्या आभूषणांद्वारे, दिव्य गंध-द्रव्यांच्या अनुलेपन तथा माळांद्वारे त्यांना विभूषित करतात. त्यानंतर श्रीमती राधिका आपल्या सखींद्वारे यत्नपूर्वक शुश्रूषा प्राप्त करून माता यशोदेद्वारे उत्तम प्रकारचा स्वयंपाक करण्याकरिता बोलाविल्या जातात.

(इतके ऐकून) नारद मुनींनी विचारले–देवी! श्रीमती रोहिणीसारखी उच्च कोटीची पाचिका (पाककलातज्ञ) वर्तमान असूनही यशोमतीने श्रीमती राधिकेस का बोलाविले. वृन्दा म्हणाली–नारद, मी पूर्वी भगवती कात्यायनीच्या मुखातून असे ऐकले आहे की दुर्वासाऋषींनी राधिकेस असा वर दिला होता की हे देवी, आपण जेदेखील अन्न शिजवाल, ते माझ्या वरामुळे आयुवर्धक होईल. म्हणून पुत्रवत्सला यशोमतीने हा विचार केला की राधिकेच्या हाताने स्वयंपाक केलेल्या अन्नाचे भोजन करून माझा पुत्र दीर्घजीवी होईल–श्रीमती राधेस प्रतिदिन आपल्या घरी स्वयंपाक बनविण्यास बोलावून घेते. श्रीमती राधासुद्धा आपल्या सासूची अनुमती घेऊन सखींसोबत आनंदपूर्वक नन्दालयात उपस्थित होऊन स्वयंपाक करीत असे. तिकडे कृष्णसुद्धा पिता नन्दमहाराजांच्या आदेशाने दुसऱ्यांद्वारे गोदोहन करवून सखांसोबत घरी परतत. ते घरी परतल्यावर सेवकगण त्यांच्या शरीरास तेल-मर्दन करून स्नान करवितात; मग धुतलेली कोरडी वस्त्रे धारण करवितात तथा त्यांच्या शरीरावर चंदनादीचा सुंदर लेप करून मालांनी भूषित करवितात. ते दोन वस्त्रे धारण करतात, त्यांचा केशकलाप, त्यांच्या मानेवर आणि कपाळावर पसरून अपूर्व शोभा विस्तारित करतो. त्यांचे सेवक चन्द्राच्या समान परम सुंदर कपाळावर त्यांच्या तिलकाची रचना करतात. पश्चात कृष्ण आपल्या हातांमध्ये कंकण आणि रत्नकेयूर, वक्षस्थळावर मुक्ताचे (मोत्यांचे) हार आणि कानांमध्ये मकराकृती कुंडले धारण करतात. त्यानंतर माता यशोमतीने पुन्हा-पुन्हा बोलविल्यानंतर बलदेवांच्या मागे-मागे सखांचे हात धरून

राधाऽपि बोधिता विप्र! वयस्याभिः स्वतल्पतः॥
उत्थाय दन्तकाष्ठादि कृत्वाऽभ्यङ्गं समाचरेत्।
स्नानवेदीं ततो गत्वा स्नापिता ललितादिभिः॥
भूषागृहं व्रजेत्तत्र वयस्या भूषयन्त्यपि।
भूषणैर्विविधैर्दिव्यैर्गन्धमाल्यानुलेपनैः॥
ततश्च स्वजनैस्तस्याः शुश्रूषां प्राप्य यत्नतः।
पक्तुमाहूयते स्वन्नं ससखी सा यशोदया॥
नारद उवाच–
कथमाहूयते देवि पाकार्थं सा यशोदया।
सतीषु पाककर्त्रीषु रोहिणी प्रमुखास्वपि॥
श्रीवृन्दा उवाच-
दुर्वाससा स्वयं दत्तो वरस्तस्यै मुदा मुनेः।
इति कात्यायनीवक्त्रात् श्रुतमासीन्मया पुरा॥
त्वया यत् पच्यते देवि तदन्नं मदनुग्रहात्।
मिष्टं स्वाद्वमृतस्पर्द्धिभोक्तुरायुस्करं तथा॥
इत्याह्वयति तां नित्यं यशोदा पुत्रवत्सला।
आयुष्मान् मे भवेत् पुत्रः स्वादुलोभात्तथा सति॥
श्वश्रानुमोदिता सापि हृष्टा नन्दालयं व्रजेत्।
स्वसखीप्रकरा तत्र गत्वा पाकं करोति च॥
कृष्णोऽपि दुग्ध्वा गाः काश्चित् दोहयित्वा जनैः परा।
आगच्छति पितुर्वाक्यात् स्वगृहं सखिभिर्वृतः॥
अभ्यङ्गमर्दनं कृत्वा दासैः संस्नापितो मुदा।
धौतवस्त्रधरः स्रग्वी चन्दनाक्तकलेवरः॥
द्विफालवद्धचिकुरैर्ग्रीवाभालोपरिस्फुरन्।

---

भोजनगृहात प्रवेश करतात. तेथे भ्राता बलदेव आणि सखांसोबत बसून नाना प्रकारचे अन्नव्यंजन आदी भोजन करतात तथा सखांना वेगवेगळ्या परिहासांद्वारे हसवून स्वयं सुद्धा हसतात. अशाप्रकारे भोजन समाप्त झाल्यावर आचमन करतात आणि सेवकांद्वारे दिलेल्या तांबुलाच्या विड्यांना सखांमध्ये वाटून टाकतात. अशाप्रकारे तांबूल चर्वण करता करता काही काळपर्यंत दिव्य पलंगावर विश्राम करतात.

**चन्द्राकार स्फुरद्भालस्तिलकालोक रञ्जितः ॥**
**कङ्कनाङ्गद केयूररत्नमुद्रालसत्करः ।**
**मुक्ताहारस्फुरद्वक्षः मकराकृतिकुण्डलः ॥**
**मुहुराकारितो मात्रा प्रविशेद्भोजनालयम् ।**
**अवलम्ब्य करं सख्युर्बलदेवमनुव्रतः ॥**
**भुङ्क्तेऽपि विविधान्नानि मात्रा च सखिभिर्वृतः ।**
**हासयन् विविधैर्हास्यैः सखींस्तैर्हसति स्वयम् ॥**
**इत्थं भुक्त्वा तथाचम्य दिव्यखट्टोपरि क्षणम् ।**
**विश्रमेत् सेवकैर्दत्तं ताम्बूलं विभजन्नदन् ॥**

विजय–पूर्वान्ह लीलेचे वर्णन करावे.

गोस्वामी–

**(६) गोपवेशधरः कृष्णो धेनुवृन्दपुरःसरः ।**
**व्रजवासिजनैः प्रीत्या सर्वैरनुगतः पथि ॥**
**पितरं मातरं नत्वा नेत्रान्तेन प्रियागणम् ।**
**यथायोग्यं तथा चान्यन् स निवर्त्त्य वनं व्रजेत् ॥**
**वनं प्रविश्य सखिभिः क्रीडयित्वा क्षणं ततः ।**
**विहारैर्विविधैस्तत्र वने विक्रीडतो मुदा ॥**
**वञ्चयित्वा च तान् सर्वान् द्वित्रैः प्रियसखैर्वृतः ।**
**साङ्केतकं व्रजेद्धर्षात् प्रिया सन्दर्शनोत्सुकः ॥**

विजय–मध्यान्ह लीलेचे वर्णन करावे.

---

(६) गोपवेषधारी कृष्ण गायींना घेऊन पुराबाहेर गोचारणाकरिता निघतात. त्याचवेळेस सर्व व्रजवासी प्रीतिवश कृष्णासोबत काही दूरपर्यंत जातात. श्रीकृष्ण माता-पित्यास प्रणाम करून तथा प्रियांना नजरेच्या कोपऱ्यातून प्रीतीपूर्वक पाहून तथा दुसऱ्या दुसऱ्या अनुगमनकारींस यथायोग्य संभाषणाद्वारे निरोप देऊन वयस्यांनी परिवेष्टित होऊन वनाकडे गमन करतात. पश्चात वनात प्रवेश करून काही वेळपर्यंत सखांसोबत क्रीडा करतात; मग ते सगळ्या सखांना छल-चातुर्याद्वारे गोचरणादीमध्ये लावून स्वयं केवळ दोन वा तीन प्रिय सखांसोबत प्रियांच्या दर्शनाकरिता उत्सुक होऊन आनंदपूर्वक संकेतस्थानी गमन करतात.)

गोस्वामी–

(७) **सापि कृष्णे वनं याते द्रष्टुं तं वनमागता।**
**सूर्यादिपूजाव्याजेन कुसुमाद्याहृतिच्छलात्॥**
**वंचयित्वा गुरुन् याति प्रियसङ्गेच्छया वनम्।**
**इत्थं तौ बहुयत्नेन मिलित्वा सगणं ततः॥**

---

(७) इकडे श्रीकृष्ण प्रेयसी श्रीमती राधिकादेखील श्रीकृष्णाच्या वनात गमनाच्या पश्चात् श्रीकृष्णाच्या दर्शनाकरिता त्याच वनात आगमन करतात. सूर्य आदींची पूजा किंवा पुष्प-चयनाच्या बहाण्याने गुरूवर्गास वंचित करून प्रियतमास भेटण्याकरिता श्रीमती वनात गमन करतात. अशाप्रकारे राधाकृष्ण दोघेही वनात अनेक प्रयत्नांनी भेटल्यावर परमानंदाने नाना प्रकारे विहार आदींद्वारे क्रीडा करतात–सखागणसुद्धा त्यांच्यासोबतच राहतात.

कधी-कधी राधाकृष्ण झोक्यावर येतात आणि सख्या त्यांना झुलवितात. कधी-कधी तर असेही होते की श्रीमती राधिका श्रीकृष्णाची बासरी चोरतात. कृष्ण त्यावेळी हे निश्चित करू न शकल्याने की मी बासरी कोठे ठेवली आहे–चोहीकडे शोधू लागतात. परंतु श्रीमती आपल्या प्रिय सखींसोबत मिळून षड्यंत्र रचून त्या वेणूस अशाप्रकारे लपवून ठेवतात की कृष्ण अनेकप्रकारे शोधूनही तो त्यांना सापडत नाही (ते हरतात). अशा दशेत प्रियागण कपट तिरस्कारपूर्वक हसत-हसत वंचित कृष्णाच्या करकमली वेणू अर्पण करतात. कृष्णसुद्धा अशाच प्रकारे प्रियांसोबत नाना प्रकारे हास-परिहास करीत विराजमान होतात. ते कधी-कधी श्रीमतीच्या सोबत वसंतऋतू सेवित वनखंडात प्रवेश करीत पिचकारीद्वारे चंदन, कुंकू आदींच्या जलाने एकमेकांस भिजवितात, कधी-कधी ते एकमेकांच्या अंगाला चंदन आणि कुंकू आदी माखतात. त्यांच्या सख्यादेखील अशाच प्रकारे राधाकृष्णाच्या आणि स्वतःच्या अंगांस परस्पर उक्त चंदन आणि कुंकू जलाने सिंचन करतात. हे द्विज, ते वसंत-वायुसेवित वनात सखा आणि सखींसोबत तत्कालोचित नाना प्रकारे विहार करतात. हे मुनिश्रेष्ठ! अशाप्रकारे विहार करता-करता थकल्यावर राधा व कृष्ण एखाद्या वृक्षाखाली दिव्य आसनावर बसतात आणि मधुपान करतात. त्यानंतर मधुपानाने उन्मत्त होऊन काही वेळपर्यंत दोघेही निद्रेच्या आवेशात डोळे बंद करतात, मग दोघे कामबाणाद्वारे प्रकृष्टपणे जर्जरित (आर्द्र) होऊन रमणाच्या अभिलाषेने एकमेकांचा हात पकडून कामाप्लुत चित्ताने स्खलित वाणीत बोलत कुंजात प्रवेश करतात. कुंजात प्रविष्ट झाल्यावर ते हस्तिनी आणि हस्तिराजाप्रमाणे क्रीडा करतात. सख्यादेखील मधुपानाने मत्त होऊन आळसावलेल्या नेत्रांनी त्याच कुंजाच्या चारही बाजूंना प्रस्थान करतात. श्रीकृष्णसुद्धा आपल्या अचिंत्य शक्तीच्या प्रभावाने प्रस्थानाकरिता प्रस्तुत प्रत्येक सखी समीप एकेका शरीराने एकाचवेळी वेगवेगळ्या रूपांनी गमन करतात. ज्याप्रकारे

**विहारैर्विविधैस्तत्र वने विक्रीडतो मुदा।**
**हिन्दोलिका समारुढौ सखिभिर्दोलितौ क्वचित्॥**
**क्वचिद्वेणुं करस्त्रस्तं प्रिययापहृतं हरिः।**
**अन्वेषयन्नुपालब्धो विप्रलब्धो प्रियागणैः॥**
**हासितो बहुधा ताभिर्हर्सत्य इव तिष्ठति।**
**वसन्त ऋतुना जुष्टं वनखण्डं क्वचिन्मुदा॥**
**प्रविश्य चन्दनाम्भोभिः कुङ्कुमादिजलैरपि।**

---

मत्त गजराज अनेक हत्तीणींसोबत थकल्याविना विहार करतो, त्याचप्रकारे श्रीकृष्णसुद्धा प्रियांसोबत विहार करून प्रियतमा श्रीमती राधिका आणि अन्यान्य सख्यांसोबत जलकेलीकरिता सरोवरात गमन करतात.

श्री नारद म्हणाले–हे वृन्दे, श्रीनन्दनन्दनाच्या माधुर्यक्रीडेमध्ये ऐश्वर्याचा प्रकाश कसा काय संभव झाला–माझ्या या संशयाचे छेदन करावे.

श्रीवृन्दा म्हणाली–नारद! श्रीहरीमध्ये परिपूर्ण माधुर्यसुद्धा विद्यमान आहे, तीच त्यांची लीलाशक्ती आहे, श्रीहरी त्या माधुर्य शक्तीद्वारेच वेगवेगळ्या रूपात गोप-गोपिकांसोबत क्रीडा करतात. सरोवरात गमन केल्यावर श्रीकृष्ण आणि राधा परस्पर पाणी उडविण्याची क्रीडा करतात. त्यानंतर सुंदर वस्त्रे, माल्य-चंदन आणि दिव्य आभरणांनी विभूषित श्रीराधा आणि कृष्ण त्याच सरोवराच्या तीरावर स्थित मणिमय दिव्यगृहात माझ्याद्वारे संग्रहित फळमुळादींचे भोजन करतात. श्रीमती राधिकाद्वारा परिसेवित होऊन श्रीकृष्णच पहिले भोजन करतात, त्या नंतर श्रीकृष्ण पुष्प-रचित शय्येवर गमन करतात. त्यावेळी केवळ दोन-तीन सख्याच पानाच्या पंख्याने हवा घालणे आणि पाद-सम्वाहन आदींद्वारे कृष्णाची सेवा करतात. श्रीकृष्णसुद्धा प्रेयसी राधिकेचे स्मरण करीत सखींद्वारे सेवित होऊन आनंदपूर्वक विश्राम करतात. श्रीहरी झोपल्यावर श्रीमती राधिकासुद्धा सखींसोबत खूप आनंदित होतात. तदनंतर मोठ्या प्रेमाने कान्तप्रदत्त उच्छिष्ट भोजन करतात. थोडेसे भोजन केल्यावर चकोरी ज्याप्रमाणे चन्द्राचे मुखपद्म दर्शन करण्यासाठी व्याकूळ होते, श्रीमती राधिकासुद्धा ठीक त्याचप्रकारे आपले प्राणवल्लभ श्रीकृष्णाचे मुखकमल दर्शन करण्यास व्याकूळ होऊन शय्यागृहात गमन करतात. श्रीमती राधिका तेथे पोहोचून सखींद्वारे निवेदित तांबुलरागाद्वारे रंजित प्राणवल्लभाचे मुखपद्म एकटक निरखू लागतात आणि प्रियसखींमध्ये विभागून स्वयं पानाचा विडा खाऊ लागतात. श्रीकृष्ण सखींमध्ये स्वच्छंदपणे होणाऱ्या संवादास ऐकण्याकरिता उत्सुक होऊन आपल्या संपूर्ण शरीरास वस्त्राने झाकून घेतात आणि वास्तविक जागे असूनही जणू काही गंभीर निद्रेत आहेत असे भासवितात. कृष्ण आता झोपलेत–असे जाणून सखी क्षणभर प्राणवल्लभाच्या गोष्टींचा आश्रय करून परस्पर विश्रम्भभावाने (मोकळेपणाने) हास्य-

**विषिञ्चतो यन्त्रमुक्तैस्तत्पङ्कैर्लिम्पतो मिथः ॥**
**सख्योऽप्येवं विषिञ्चन्ति ताश्च तौ सिंचतः पुनः ।**
**वसन्तवायु जुष्टेषु वनखण्डेषु सर्वतः ॥**
**तत्तत्कालोचितैर्नानाविहारैः सगणो द्विज।**
**श्रान्तौ क्वचिद्वृक्षमूलमासाद्य मुनिसत्तम ॥**
**उपविश्यासने दिव्ये मधुपानं प्रचक्रतुः ।**

---

परिहास करीत राहतात. परंतु अचानक हे जाणून की कृष्ण वास्तविक कपट-निद्रेमध्ये झोपले आहेत–लज्जेने जीभ चावून परस्पर एकमेकींकडे एकटकशा पाहत आश्चर्यचकित होऊन जातात; काहीवेळापर्यंत त्या काही बोलूही शकत नाहीत. क्षणभरानंतरच त्या कृष्णाच्या अंगावरील चादर ओढून घेतात आणि "चांगली झोप चालली आहे"–असे म्हणून कृष्णास हसवितात आणि स्वतःदेखील हसू लागतात. हे मुनिश्रेष्ठ, अशाप्रकारे राधाकृष्ण सखींसोबत नाना प्रकारे हास्य-परिहासपूर्व क्रीडा करून काहीवेळाकरिता निद्रासुख भोग करतात. त्यानंतर सखींसोबत विस्तृत दिव्य आसनावर प्रसन्नचित्त होऊन बसतात तथा परस्पर हार, परिच्छेद, चुंबन आणि आलिंगनाची बाजी ठेवून प्रेमपूर्ण परिहास-आलाप करता-करता पाशा क्रीडा (सारीपाट क्रीडा) करू लागतात. कृष्ण क्रीडेमध्ये पराजित झाल्यावरही "मीच जिंकलो आहे"–असे म्हणून प्रियांचा हार आदींस ग्रहण करण्याकरिता तयार झाल्यावर प्रियांद्वारे ताडित होतात. हे नारद, श्रीमती राधिकेद्वारे ताडित झाल्यावर कृष्ण उदास होऊन त्या स्थानाहून निघून जात आहे असे भासवीत म्हणतात–हे देवी, जर खरेच तू जिंकली आहेस, तर हरल्यावर मी तुला चुंबन आदी प्रदान करीन, अशाप्रकारे जे मी आधीच पैजेवर ठेवले आहे, ते तू ग्रहण करावेस, असे म्हणून श्रीकृष्ण श्रीमती राधिकेचे चुंबन आदी करतात. भ्रू-भंगीमा-दर्शन आणि श्रीकृष्णाप्रती श्रीमतींच्या भर्त्सनापूर्ण वाक्यावली ऐकण्याकरिता तेथे शुक-सारिका उपस्थित होऊन परस्पर वाक्-युद्ध प्रारंभ करू लागतात. श्रीराधा-कृष्ण शुकसारिकेचे परस्पर वाक्-युद्ध श्रवण करून घरी परतण्याकरिता तेथून बहिर्गत होतात. श्रीकृष्ण प्राणवल्लभा श्रीमतींची अनुमती घेऊन गायींकडे जाऊ लागतात. श्रीमती राधिकादेखील सखींसोबत सूर्य-पुजेकरिता सूर्य-मंदिरात निघून जातात. श्रीकृष्ण थोडेच लांब जाऊन परत फिरून येतात आणि पुजारी ब्राह्मणाचा वेष घेऊन सूर्य-मंदिरात उपस्थित होतात. श्रीमतींच्या सख्या श्रीकृष्णास पुजारी समजून सूर्य-पूजा करण्याचा आग्रह करतात. कृष्णपण परिहासपूर्ण कल्पित वेदमंत्रांद्वारा सूर्याची पूजा करू लागतात. बुद्धिमती सख्या कल्पित वेदमंत्रांना ऐकून लगेचच समजून जातात की हे दुसरे-तिसरे कुणी नसून हे तर राधिका-विरहव्यथित कान्त–श्रीकृष्णच आहेत. असे जाणल्यावर त्या प्रेमानन्द सागरात निमज्जित होऊन जातात. त्यावेळी त्यांना आपल्या-परक्याची जाणीव नसते. मुने! अशाप्रकारे विविध प्रकारच्या विहारात अडीच

**ततो मधुमदोन्मत्तौ निद्रया मिलितेक्षणौ॥**
**मिथः पाणि समालम्ब्य कामबाणप्रसङ्गतौ।**
**रिरंसुर्विशतः कुञ्जे स्खलत्पादाब्जकौ पथि॥**
**विक्रीडतुस्तत्र तत्र करिण्यो यूथपौ यथा।**
**सख्योऽपि मधुभिर्मत्ता निद्रया पीडितेक्षणाः॥**
**अभितो मुंजकुंजेषु सर्वा एवापि शिष्यिरे।**
**पृथगेकेन वपुषा कृष्णोऽपि युगपद्विभुः॥**
**सर्वासां सन्निधिं गच्छेत् प्रियया प्रेरितो मुहुः।**
**रमयित्वा च ताः सर्वाः करिणीर्गजराडिव॥**
**प्रियया च तथा ताभिः क्रीडार्थञ्च सरोऽव्रजेत्।**
**श्रीनारद उवाच-**
**वृन्दे श्रीनन्दपुत्रस्य माधुर्यक्रीडने कथम्।**
**ऐश्वर्यस्य प्रकाशोऽभूत इति मे छिन्दि संशयम्॥**
**श्रीवृन्दा उवाच-**
**मुने! माधुर्यमप्यस्ति लीलाशक्तिः हरेस्तु सा।**
**तया पृथक क्रीडद्गोपगोपिकाभिः समं हरिः॥**
**राधया सह रूपेण निजेन रमते स्वयम्।**
**इति माधुर्यलीलायाः शक्तिर्नत्वाशता हरेः॥**
**जलसेकैर्मिथस्तत्र क्रीडित्वा स्वगणैस्ततः।**
**वासः स्त्रकचन्दनैर्दिव्यैर्भूषणैरपि भूषितौ॥**
**तत्रैव सरस्तीरे दिव्यमणिमये गृहे।**
**अश्नतः फलमूलानि कल्पितानि मयैरपि॥**
**हरिस्तु प्रथमं भुक्त्वा कान्तया परिसेवितम्।**
**द्वित्राभिः सेवितो गच्छेच्छय्यां पुष्पविनिर्मितान्॥**
**ताम्बूलैर्व्यंजनैस्तत्र पादसम्वाहनादिभिः।**
**सेव्यमानो हसंस्ताभिर्मोदते प्रेयसीं स्मरन्॥**
**श्रीराधापि हरौ सुप्ते सगणा मुदितान्तरा।**

---

प्रहराचा वेळ व्यतीत करून सख्या आपापल्या घरी परततात. कृष्णदेखील व्रजामध्ये गायींकडे परततात.

कान्तदत्तं प्रीतिमना उच्छिष्टं बुभुजे ततः ॥
किंचिदेव ततो भुक्त्वा व्रजेत् शय्यां निकेतनम्।
द्रष्टुं कान्तमुखाम्भोजं चकोरीव निशाकरम्॥
ताम्बूलचर्वितं तस्य तत्रत्याभिर्निवेदितम्॥
ताम्बूलान्यपि चाश्नाति विभजन्ती प्रियालिषु।
कृष्णोऽपि तासां शुश्रूषुः स्वछन्दभाषितं मिथः॥
प्राप्तनिद्र इवाभाति विनिद्रोऽपि पटावृतः।
ताश्च केलीक्षणं कृत्वा मिथःकान्तकथाश्रयाः॥
व्याजनिद्रां हरेर्ज्ञात्वा कुतश्चिदमनुमानतः।
व्युदस्य रसनां दद्भिः पश्यन्त्योऽन्योन्यमाननम्॥
लीना इव लज्जया स्यु क्षणमुचुर्न किञ्चन।
क्षणादेव ततो वस्त्रं दुरीकृत्य तदङ्गतः॥
साधुनिद्रां गतोऽसीति हासयन्ती हसन्ति च।
एवं तौ विविधैर्हास्यै रममानौ गणैः सह॥
अनुभूयः क्षणं निद्रासुखञ्च मुनिसत्तम।
उपविश्यासने दिव्ये सगणौ विस्तृते मुदा॥
पणीकृत्य मिथो हारं चुम्बाश्लेषपरिच्छदान्।
अक्षैर्विक्रीडितं प्रेम्ना नर्मालापपुरःसरम्॥
पराजितोऽपि प्रियया जितोऽहमिति वै ब्रुवन्।
हारादिग्रहणे तस्याः प्रवृत्तस्ताड्यते तथा॥
तथैवं ताडितः कृष्णः करोत्पलसरोरुहे।
विषण्णमानसो भूत्वा गन्तुं च कुरुते मतिम्॥
जितोऽस्मि चेत्त्वया देवि गृह्यतां मत्पणीकृतम्।
चुम्बनादि मया दत्तमित्युक्त्वा च तथाचरेत्॥
कौटिल्यं तद्भ्रुवोर्द्रष्टुं श्रोतुं तद्भर्त्सनम् वचः।
ततः सारी शुकानाञ्च श्रुत्वा बागाहवं मिथः॥
निर्गच्छतस्ततः स्थानाद्गन्तुकामौ गृहं प्रति।
कृष्णः कान्तामनुज्ञाप्य गवामभिमुखं व्रजेत्॥
सा तु सूर्यगृहं गच्छेत् सखीमंडलसंवृता।
कियद्दूरं ततो गत्वा परावृत्य हरिः पुनः॥

**विप्रवेषं समास्थाय याति सूर्यगृहं प्रति।**
**सूर्यञ्च पूजयेत्तत्र प्रार्थितस्तत्सखीजनैः॥**
**तदैव कल्पितैर्वेदैः परिहासविशारदैः।**
**ततस्ता व्यथितं कान्तं परिज्ञाय विचक्षणाः॥**
**आनन्दसागरे लीना न विदुः स्वं न चापरम्।**
**विहारैर्विविधैरेवं सार्द्धयामद्वयं मुने॥**
**नीत्वा गृहं व्रजेयुस्ताः स च कृष्णो गवां व्रजेत्।**

विजय–अपरान्ह लीला कशी असते?

गोस्वामी–

**(८) संगम्य स्वसखीन् कृष्णो गृहीत्वा गाः समन्ततः।**
**आगच्छति व्रजं कर्षन् तत्रत्यान् मुरली रवैः॥**
**ततो नन्दादयः सर्वे श्रुत्वा वेणुरवं हरेः।**

---

(८) हे नारद! कृष्ण सखांसोबत मिलित होऊन चारही बाजूंनी गायींना एकत्रित करून तथा व्रजवासींस मुरलीध्वनीद्वारे आकर्षित करून व्रजामध्ये परततात. तदनंतर नन्द आदी सर्व व्रजवासी श्रीहरीची वेणुध्वनी ऐकून तथा आकाशपथामध्ये गोधुली परिव्याप्त झालेली पाहून समजून जातात की कृष्ण गोचारणाहून परतत आहेत.

असे समजल्यावर ते कृष्णास पाहण्याकरिता मोठ्या उत्सुकतेने गमन करतात. श्रीमती राधिकासुद्धा इकडे घरी परतून स्नान आणि श्रृंगार करतात; आणि प्राणवल्लभाकरिता विविध प्रकारच्या भोजन सामग्री प्रस्तुत करून सखींसोबत उत्कंठित चित्ताने प्राणेश्वराच्या दर्शनाकरिता निघतात. कृष्णसुद्धा गोचरणाहून परतताना राजपथावर व्रजद्वारी त्या व्रजवासींच्या समीप जाऊन कोणास पाहतात, कोणास आपल्या अंगाच्या स्पर्शाद्वारे, कोणास मधुर वार्तालापाद्वारे, तर कोणास मधुर-मधुर स्नेहमयी नजरेद्वारे, गोपवृद्धांस कायिक आणि वाचिक नमस्काराद्वारे; श्रीनन्द, यशोदा आणि रोहिणीस साष्टांग दण्डवत प्रणामाद्वारे आणि प्रियांस मधुर कटाक्षसूचित विनयाद्वारे सन्मान आनंद प्रदान करतात. अशाप्रकारे ते देखील बदल्यात व्रजवासींद्वारे यथायोग्य आशीर्वाद, संभाषण आणि पूजादी प्राप्त करून गोष्ठात (गोशाळेत) गायींना पोहोचवितात. तत्पश्चात श्रीकृष्ण पिता-मातेच्या आज्ञेने दाऊसोबत आपल्या गृही गमन करतात आणि तेथे मातेच्या अनुरोधाने स्नान आणि थोडे भोजन करून गोदोहनाकरिता उत्सुक होऊन मग गोठ्यात जातात.

**गोधूलिपटलव्याप्तं दृष्ट्वा वापि नभस्थलम् ॥**
**कृष्णस्याभिमुखं यान्ति तद्दर्शनसमुत्सुकाः ।**
**राधिकापि समागत्य गृहे स्नात्वा विभूषिता ॥**
**सम्पाद्य कान्तभोगार्थं भक्ष्याणि विविधानि च ।**
**सखीसंघयुता याति कान्तं द्रष्टुं समुत्सुकाः ॥**
**राजमार्गे व्रजद्वारि यत्र सर्वव्रजौकसः ।**
**कृष्णोऽपि तान् समागम्य यथावदनुपूर्वशः ॥**
**दर्शनैः स्पर्शनैर्वाचा स्मितपूर्वावलोकनैः ।**
**गोपवृद्धान् नमस्कारैः कायिकैर्वाचिकैरपि ॥**
**साष्टाङ्गपातैः पितरौ रोहिणीमपि नारद ।**
**नेत्रान्तसूचितेनैव विनयेन प्रियां तथा ॥**
**एवं तैश्च यथायोग्यं व्रजौकोभिः प्रपूजितः ।**
**गवालयं तथा गाश्च संप्रविश्य समन्ततः ॥**
**पितृभ्यामर्थितो याति भ्रात्रा सह निजालयम् ।**
**स्नात्वा भुक्त्वा किञ्चदत्र पित्रा मात्रानुमोदितः ॥**
**गवालयं पुनर्याति दोग्धुकामो गवां पयः ।**

विजय–सायंलीला कशी असते?

गोस्वामी–

(९) **ताश्च दुग्ध्वा पुनः कृष्णः दोहयित्वा च काश्चन ।**
**पित्रा सार्द्धं गृहं याति पयोभारशतानुगः ॥**
**तत्रापि मातृवृन्दैश्च तत् पुत्रैश्च बलेन च ।**
**संभुक्ते विविधान्नानि चर्व्यचोष्यादिकानि च ॥**

---

(९) गोशाळेमध्ये पोहोचून कृष्ण काही गायींचे स्वतःच दोहन करतात, आणि बाकी गायींना दुसऱ्यांकडून दोहवून शेकडो दुग्ध-भारवाहींच्या पुढे-पुढे पित्यासोबत चालतात आणि पुन्हा घरी परततात. तेथे माता, त्यांचे पुत्र आणि बलरामासोबत बसून चर्व्य, चोष्य, लेह्य आणि पेय आदी नाना प्रकारच्या स्वादिष्ट पदार्थांचे भोजन करतात.

विजय–प्रदोषलीला कशी असते?

गोस्वामी–

**(१०) तन्मातुः प्रार्थनात् पूर्वं राधयापि तदैव हि।**
**प्रस्थप्यन्ते सखीद्वारा पक्वान्नानि तदालयम्॥**
**श्लाघयंश्च हरिस्तानि भुक्त्वा वित्रादिभिः सह।**
**सभागृहं व्रजेत्तैश्च जुष्टं बन्धुजनादिभिः॥**
**पक्वान्नानि गृहीत्वा ताः सख्यस्तत्र समागताः।**
**बहुन्येव पुनस्तानि प्रदत्तानि यशोदया॥**
**सख्या तत्र तया दत्तं कृष्णोच्छिष्टं तथा रहः।**
**सर्वं ताभिः समानीय राधिकायै निवेद्यते॥**
**सापि भुक्त्वा सखीवर्गयुता तदननुपूर्वशः।**
**सखिभिर्मण्डिता तिष्ठेदभिसर्त्तुं समुद्यता॥**

विजय–प्रभो, रात्रलीला श्रवण करण्याची लालसा होत आहे.

गोस्वामी–

**(११) वृन्दा वदति-**
**प्रस्थाप्यते मया काचिदतएव ततः सखी।**
**तथाभिसारिताभिश्च यमुनायाः समीपतः॥**
**कल्पवृक्षे निकुंजेऽस्मिन् दिव्यरत्नमये गृहे।**
**सितकृष्णनिशायोग्या वेशयित्वा सखीयुता॥**
**कृष्णोऽपि विविधस्तत्र दृष्ट्वा कौतूहलं ततः।**

---

(१०) श्री राधिकादेखील आपल्या सासूची आज्ञा घेऊन आधीच सखींद्वारे नाना प्रकारची पक्वान्ने आणि व्यंजनादी कृष्णाच्या भवनात पाठवून देत असते. श्रीकृष्ण पिता आदींसोबत बसून राधिकेद्वारे बनविलेल्या विविध प्रकारच्या अन्नाची आणि व्यंजनांची प्रशंसा करतात आणि त्यानंतर पिता आदींसोबत वंदी (भक्तीने वंदन करणारे) आणि भाटांनी सेवित सभाकक्षात गमन करतात. इकडे सख्या कृष्णाचे उच्छिष्ट घेऊन राधिकेस प्रदान करतात. श्रीमती राधिका त्या कृष्ण उच्छिष्टास सख्यांमध्ये वाटून स्वतःदेखील परमानंदाने भोजन करतात. त्यानंतर सखींद्वारे विभूषित होऊन अभिसाराकरिता प्रस्तुत होतात.

**कात्यायन्या मनोज्ञानि श्रुत्वापि गीतकान्यपि।**
**धनधान्यादिभिस्तांश्च प्रीणयित्वा विधानतः।**
**जनैराराधितो मात्रा याति शय्यानिकेतनम्॥**
**मातरि प्रस्थितायान्तु बहिर्गत्वा ततो गृहात्।**
**सांकेतितं कान्तयात्र समागच्छेदलक्षितः॥**
**मिलित्वा तावुभावत्र क्रीडतो वनराजिषु।**
**विहारैर्विविधै रासलास्यगीतपुरःसरैः॥**
**सार्द्धं यामद्वयं नीत्वा रात्रावेव विधानतः।**
**विश्ये सुषुपतुः कुंजे पक्षिभिस्तावलक्षितौ॥**
**एकान्ते कुसुमैः क्लिप्ते केलितल्पे मनोहरे।**
**सुप्तावतिष्ठतां तत्र सेव्यमानौ निजालिभिः॥**

विजय! हीच अष्टकालीय लीला आहे. यात सर्व प्रकारच्या रसांच्या सामग्री विद्यमान आहेत. मी आधी जितक्या प्रकारच्या रसांचा उल्लेख केला आहे, ते समस्त या लीलेमध्ये आहेत. यथास्थान, यथाकाल, यथादेश आणि यथासंबंध–हे सर्व समजून घेऊन तू आपले सेवाकार्य करीत राहा.

श्रीगुरुगोस्वामींच्या श्रीमुखातून येथपर्यंत श्रवण करून विजयकुमार

---

(११) वृन्दादेवी म्हणाली–त्याचवेळी त्या स्थानाहून एखाद्या सखीस राधिकेकडे पाठविते. त्या सखीच्या संकेतानुसार श्रीमती राधिका त्यादिवशी शुक्ल वा कृष्ण जो कुठला पक्ष असेल, त्यानुसार पांढरी वा काळी वस्त्रे परिधान करून सखीसोबत यमुनेच्या निकट कल्पवृक्षयुक्त निकुंजाच्या आत दिव्य रत्नमय गृहात येतात. इकडे श्रीकृष्ण सभेत बसून नाना प्रकारच्या कौतुकांचे दर्शन करतात. तथा मनोमोहनकारी कात्यायनी-संगीत श्रवण करतात. त्यानंतर गायकांस धनधान्य आदींद्वारे संतुष्ट करून प्रजावर्गाची पूजा प्राप्त करतात आणि मातेसोबत शयन कक्षात येतात. यशोदा कृष्णास झोपवून जेव्हा निघून जाते, तेव्हा कृष्ण गुपचूप घराबाहेर गमन करतात आणि सर्वांच्या नजरेतून लपत छपत संकेत गृहामध्ये कांतेस भेटतात. तेथे दोघांचे मिलन होऊन वन-श्रेणीमध्ये क्रीडा करतात. सखींच्या नृत्यगीत आदी विविध विहारांद्वारे रासलीलेमध्ये साधारणतः अडीच प्रहर रात्र व्यतीत झाल्यावर दोघेही झोपण्याकरिता अलक्षितपणे कुंजात प्रवेश करतात. राधा आणि कृष्ण कुंजात प्रवेश करून निर्जनात पुष्प निर्मित मनोहर केलिशय्येवर शयन करतात. अंतरंग सख्या त्यांची सेवा करतात.

भावविभोर झाले. त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या धारा प्रवाहित होऊ लागल्या, शरीरावर रोमांच उभे राहिले. ते सद्गदित स्वरात एकदोन गोष्टी बोलून श्रीगोपाल गुरुगोस्वामींच्या चरणी अचेतन होऊन पडले. काही वेळानंतर चेतनता प्राप्त झाल्यावर श्रीगुरुगोस्वामींनी त्यांना हृदयाशी घट्ट धरले आणि प्रेमाने त्यांच्या डोक्यावरून हात फिरवला. त्यानंतर खूपच रात्र झाल्याचे लक्षात आल्यावर श्रीगुरुगोस्वामींच्या श्रीचरणी दंडवत-प्रणाम करून हळूहळू वासस्थानी परतले. आता त्यांच्या हृदयात दिवा-रात्र रस-कथा उदित होऊ लागली.

**॥ अडतीसावा अध्याय समाप्त ॥**



# एकोणचाळीसावा अध्याय (लीलाप्रवेश-विचार)

विजयकुमार आता मोठे व्याकूळ झाले. कुठलीच गोष्ट त्यांना आवडेनाशी झाली. श्रीमंदिरात जगन्नाथ-दर्शन करून चित्तास स्थिर करू शकत नव्हते. साधारण रसतत्त्वास तर ते खूप आधीच समजले होते, मधुररसाच्या स्थायीभाव, विभाव, अनुभाव, सात्त्विक भाव आणि व्यभिचारीभाव–या सर्व भावांस येथे आल्यावर आता समजले. त्यांच्या हृदयात एकेका वेळी एकेक भाव निर्माण होत आहे. काही वेळापर्यंत एक भाव त्यांना आनंदात निमग्न करीत असतानांच एक दुसरा नवीन भाव त्यांच्या हृदयावर आक्रमण करतो. अशाप्रकारे त्यांचे दिवस व्यतीत होत होते. ते स्वतः कुठल्याही प्रकारे भावोदय, त्याची क्रिया आणि दुसऱ्या रूपात त्याचे बदलणे–आदींचे नियमन न करू शकल्याने एकदा सजल नेत्रांनी श्रीगुरुगोस्वामींच्या चरणी उपस्थित झाले आणि म्हणाले–प्रभो! आपल्या अपार करुणेने सर्वकाही जाणूनही मी स्वतःवर प्रभुत्व प्राप्त करू शकत नाही. आणि कृष्ण-लीलेमध्ये स्थिर होऊ शकत नाही. अशा दशेत मला जो उपदेश देणे योग्य समजाल, तो देण्याची कृपा करावी.

श्रीगुरुगोस्वामी त्यांचे भाव पाहून मोठे प्रसन्न झाले. त्यांनी मनोमन विचार केला–"अहा! कृष्णप्रेम किती अद्भुत आहे! ते सुखास दुःखाप्रमाणे आणि दुःखास सुखाप्रमाणे करवून टाकते." मग प्रकट रूपात म्हणाले–बेटा! आता तुला कृष्णलीलेमध्ये प्रवेश करविणाऱ्या उपायांचा अवलंब करावयास हवा.

विजय–प्रवेशाचा उपाय काय आहे?

गोस्वामी–श्रीदास गोस्वामींनी निम्न श्लोकात लीला-प्रवेशाचा उपाय सांगितला आहे–

**न धर्मं नाधर्मं श्रुतिगणनिरुक्तं किल कुरु**
**व्रजे राधाकृष्णप्रचुरपरिचर्यामिह तनु।**
**शचीसूनुं नन्दीश्वरपतिसुतत्वे गुरुवरं**
**मुकुन्दप्रेष्ठत्वे स्मर परमजस्रं ननु मनः॥**

(मनःशिक्षा २)

पाहा, शास्त्रोक्त धर्माधर्मांचा विचार करीत व्यर्थ वेळ घालवू नका. तात्पर्य हे की शास्त्रीय युक्तींस सोडून आपल्या लोभाने रागानुगा भक्तीचे साधन करा, व्रजामध्ये राधाकृष्णाची प्रचुर परिचर्या-सेवा करा, व्रजरसाचे भजन करा, जर विचाराल की व्रजरस भजनाचे उद्देश्य कोण सांगेल? याचे उत्तर हे आहे की व्रजलीलेनंतर प्रच्छन्न वृन्दावन–श्रीनवद्वीपधामात श्रीशचीदेवींच्या गर्भातून जे उदित झाले होते, त्या प्राणनाथ श्रीनिमानन्दास साक्षात नन्दीश्वरपती–श्रीनन्द महाराजांचा पुत्र समजावे–कृष्णापेक्षा कुठल्याही प्रकारे श्रीचैतन्य महाप्रभूंस तत्त्वाने छोटे समजू नका. त्यांनी नवद्वीपात अवतीर्ण होऊन एक पृथक भजनलीला दाखविली आहे, म्हणून त्यांना नवद्वीप-नागर मानून व्रजभजनाचा परित्याग करू नका. ते साक्षात कृष्ण आहेत, म्हणून अर्चन मार्गात जे लोक श्रीचैतन्यमहाप्रभूंचे कृष्णापासून वेगळे ध्यान करतात, तथा त्यांच्या पृथक मंत्रादींचा आश्रय ग्रहण करतात, त्यांना तसे करण्यात बाधा आणू नका. परंतु रसमार्गात ते श्रीराधावल्लभाच्या रूपातच एकमात्र भजनीय आहेत तथा शचीनन्दनाच्या रूपात ते व्रजरसाच्या एकमात्र गुरू रूपात उदित झाले आहेत. म्हणूनच त्या श्रीशचीनन्दनाचे कृष्ण-प्रेष्ठ–गुरूच्या रूपात भजन करावे. अष्टकालीय कृष्णलीलांचे उद्बोधक भाव स्वरूप गौरलीलेचे स्मरण सर्व लीलांच्या आधी करावे आणि भजन गुरुदेवांस व्रज यूथेश्वरी वा सखी अतिरिक्त दुसरे काही समजू नये. अशाप्रकारे भजन करीत व्रजलीलेत प्रवेश करावा.

विजय–प्रभो! आता तर माझी अशी इच्छा होत आहे की इतर सगळ्या शास्त्र युक्तींस आणि दुसऱ्या समस्त प्रकारच्या मार्गांस सोडून श्रीगौरांगदेवांद्वारे प्रकटित अष्टकालीय कृष्णलीलेमध्ये आपल्या गुरुरूपा सखीच्या अनुगत होऊन योग्य सेवा करावी. कृपा करून हे सांगावे की हे करण्यासाठी याविषयी मनास स्थिर कसे करता येईल?

गोस्वामी–याकरिता दोन विषयांच्या परिष्कृतीची आवश्यकता आहे–उपासक-परिष्कृती आणि उपास्य-परिष्कृती. तू रसतत्त्व जाणले आहेस, तेव्हा तुझी उपास्य परिष्कृती झाली आहे. उपासक परिष्कृतिसंबंधी अकरा प्रकारचे भाव आहेत, ज्यापैकी तू जवळजवळ सर्वांस प्राप्त केले आहेस. केवळ त्यात थोड्या स्थितीची आवश्यकता आहे.

विजय–त्या अकरा भावांस पुन्हा एकदा यथायोग्य सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–अकरा प्रकारचे भाव असे आहेत–(१) संबंध, (२) वयः, (३) नाम, (४) रूप, (५) यूथ, (६) वेष, (७) आज्ञा, (८) वास, (९) सेवा, (१०) पराकाष्ठा-श्वास आणि (११) पाल्यदासीभाव.

विजय–संबंध कशास म्हणतात?

गोस्वामी–संबंध भावच याविषयी भित्ती स्थापन–पाया घालणे आहे. संबंध काळात कृष्णाप्रती ज्याचा जो भाव असतो, त्यानुरूप त्याची सिद्धी होते. कृष्णास प्रभू मानून संबंध स्थापन केल्याने दास, सखा मानून संबंध स्थापित केल्याने सखा आणि पुत्र मानून संबंध स्थापित केल्याने पिता-माता होता येते. स्वकीय पती मानून संबंध स्थापित केल्याने पुरच्या वनिता होता येते. व्रजामध्ये शांत नाही. तेथे दास्यसुद्धा संकुचित आहे. उपासकाच्या स्वाभाविक रुचीनुसार संबंध स्थापित होतो. तू स्त्री स्वभावाचा आहेस, तुझी रूचीदेखील परकीय रसामध्ये आहे, म्हणून तू व्रजवनेश्वरीच्या अनुगत हो. तुझा संबंध हा आहे की "मी राधिकेच्या परिचारिकेच्या परिचारिका-सेविकेची सेविका आहे. श्रीराधिका माझी जीवितेश्वरी आहेत; कृष्ण त्यांचे जीवितेश्वर आहेत, म्हणून श्रीराधावल्लभ श्रीकृष्णच माझे प्राणेश्वर आहेत."

विजय–असे ऐकले आहे की, आपले आचार्य श्रीजीवगोस्वामी स्वकीया भावाच्या संबंधास उचित समजत होते, हे खरे आहे का?

गोस्वामी–श्रीमन् महाप्रभूंचा कुठलाही अनुचर असा नाही, जो शुद्ध परकीया भावरहित आहे. श्रीस्वरूप गोस्वामींव्यतिरिक्त या रसाचा आणखी कोण गुरू असू शकतो? त्यांनी शुद्ध परकीया भावाची शिकवण दिली आहे. श्रीजीव गोस्वामींचेही तेच मत आहे, श्रीरूप आणि श्रीसनातन यांचेही तेच मत आहे. श्रीजीव यांचे स्वतःचे असे कुठल्या वेगळ्या प्रकारचे स्वकीया भजन नाही, तेव्हा एक गोष्ट अशी आहे की, त्यांनी पाहिले की व्रजामध्ये काही उपासकांमध्ये स्वकीया भावाचा गंध होता. समर्थारती जेथे समंजसा रतीच्या गंधास प्राप्त होते, तेथे व्रजाचा स्वकीया भाव आहे. त्याच भावाने ज्यांची कृष्ण संबंध स्थापन काळात थोडीशी स्वकीयत्व-बुद्धी होते, तेच स्वकीया उपासक आहेत. श्रीजीव गोस्वामींचे दोन्ही प्रकारचे अर्थात शुद्ध परकीया उपासक आणि स्वकीया मिश्रित भावाचे उपासक शिष्य होते. म्हणूनच आपल्या नाना प्रकारच्या रुची असलेल्या शिष्यांच्या प्रती वेगवेगळे उपदेश मागे ठेवले होते. "**स्वेच्छया लिखितं किञ्चित्**" इत्यादी लोचनरोचनी-गत त्यांच्या

श्लोकांमध्ये ही गोष्ट स्पष्टपणे स्वीकृत आहे.

विजय–ठीक आहे, मी हे समजलो की आपल्या विशुद्ध गौडीय मतामध्ये विशुद्ध परकीय भजनच स्वीकृत आहे. आता मी संबंध समजलो, कृपया वयविषयीची माहिती सांगावी.

गोस्वामी–कृष्णासोबत तुझा जो संबंध झाला आहे, त्यायोगे तुझे एक अपूर्व स्वरूपही उदित झाले आहे–ते स्वरूप व्रजललना स्वरूप आहे. म्हणूनच त्यात सेवेकरिता उपयुक्त वयाचे अवश्य प्रयोजन आहे. कैशोर वयच ते उपयुक्त वय आहे. दहा वर्षांपासून ते सोळा वर्षांची अवस्थाच कैशोर आहेच. यालाच वयःसंधी असेसुद्धा म्हणतात. तुझे वय दहापासून वाढत वाढत सोळापर्यंत जाईल. बाल्य, पौगंड आणि वृद्ध वयस–या तीन अवस्था व्रजललनांच्या नाहीत. स्वतःस नित्य किशोरीच समजण्याचा अभिमान ठेव.

विजय–नामासंबंधी सांगण्याची कृपा करावी. यद्यपि आधीच नाम आदी प्राप्त झाले आहे, तथापि त्याविषयी दृढ शिकवण प्रदान करावी.

गोस्वामी–विभिन्न व्रजललनांची वर्णने ऐकून त्यांच्यात तुझ्या रुचिगत सेवेच्या अनुरूप तू राधिका सखीची एक परिचारिका आहेस, तिचे नावच तुझे नाव आहे. तुझ्या रुचीची परीक्षा घेऊन तुझ्या गुरुदेवांनी जे नाव दिले आहे, त्या नावासच तू आपले नित्यनाम समजावेस. व्रजललनांमध्ये तू नावाद्वारे मनोरमा होशील.

विजय–प्रभो! आता रूपासंबंधी सांगावे.

गोस्वामी–तू जेव्हा रूप यौवनसंपन्न किशोरी आहेस, तेव्हा तुझे सिद्ध रूप रुची अनुसारच श्रीगुरुदेवांनी निर्णित केलेले आहे. अचिंत्य-चिन्मय-रूप संपन्न नसल्याने श्रीमती राधिकेची परिचारिका कोण होऊ शकते?

विजय–यूथाच्या विषयी दृढता प्रदान करण्याची कृपा करावी.

गोस्वामी–श्रीमती राधिकाच यूथेश्वरी आहेत. श्रीमती राधिकेच्या अष्टसखींपैकी कुणाच्याही गणामध्ये रहावयास लागेल. तुझ्या गुरुदेवांनी तुला श्रीमती राधिकेच्या गणामध्ये ठेवले आहे. श्रीललितेच्या आज्ञेनुसार श्रीयूथेश्वरीसोबत लीलामय श्रीकृष्णाची सेवा करशील.

विजय–प्रभो, कशा प्रकारचे साधक श्रीचन्द्रावली आदी यूथेश्वरींच्या अनुगत असतात?

गोस्वामी–जन्म-जन्मांतरीच्या सौभाग्याने यूथेश्वरींच्या अनुगत होण्याची वासना उत्पन्न होते. म्हणून श्रीराधिकेच्या यूथामध्ये अत्यंत सौभाग्यशाली साधकच प्रवेश करतात. श्रीचन्द्रावली आदी यूथेश्वरीसुद्धा श्रीराधामाधवाच्या पुष्टीकरिता यत्नवती आहेत. त्यांनी रस-पुष्टीकरिताच विपक्षाचा भाव ग्रहण केला आहे. वास्तविक श्रीमती राधिकाच एकमात्र यूथेश्वरी आहेत, श्रीकृष्णाची विचित्रलीला–अभिमानमयी आहे. ज्यांची जी सेवा आहे, त्यांचा त्यातच अभिमान आहे.

विजय–आता गुणाविषयी दृढ होऊ इच्छितो.

गोस्वामी–तू जी सेवा करशील, त्या सेवेकरिता उपयोगी नाना प्रकारच्या शिल्पकलांमध्ये तू निपुण आहेस, त्याकरिता उपयुक्त गुण आणि वेष हवेत, त्यास तुझ्या गुरुदेवांनी निर्दिष्ट केले आहे.

विजय–आता आज्ञेच्या संबंधी सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–आज्ञा दोन प्रकारची असते–नित्य आणि नैमित्तिक. करुणामयी सखीने तुझ्याप्रती ज्या सेवेची आज्ञा देऊन ठेवली आहे, तू निरपेक्ष होऊन अष्टप्रहारामध्ये जेव्हा ज्या सेवेचे कर्तव्य असेल ती करीत राहा. अधूनमधून आवश्यकतेनुसार जर एखादी सेवा उपस्थित झाली, तर त्याकरिता जी आज्ञा होईल, तिला नैमित्तिक आज्ञा म्हणतात. तशा आज्ञांचेदेखील यत्नपूर्वक पालन करीत रहायला हवे.

विजय–'वास' कशास म्हणतात?

गोस्वामी–व्रजामध्ये नित्यनिवास करणेच 'वास' आहे. ब्रजच्या एखाद्या गावात कुण्या गोपाच्या घरी जन्मलेली तू एक गोपी आहेस. कुण्या दुसऱ्या गावी कुण्या गोपासोबत तुझा विवाह झालेला आहे. परंतु तरीही कृष्णाच्या मुरलीध्वनीने आकृष्ट होऊन तू सखीच्या अनुगत होऊन त्यांच्या राधाकुण्ड-स्थित कुंजातील एका सुंदर कुटीमध्ये निवास करीत आहेस–हा अभिमान-सिद्ध वासच तुझा वास आहे. तुझा परकीया भावच नित्यसिद्ध भाव आहे.

विजय–आता सेवेचा निर्णय करावा.

गोस्वामी–तू श्रीमती राधिकेची सेविका आहेस. त्यांची सेवाच तुझी सेवा आहे–एखाद्या वेळी जर आवश्यकतावश त्या तुला एकांतात श्रीकृष्णाकडे पाठवतील आणि त्यावेळी निर्जनात श्रीकृष्ण तुझ्याप्रती रती प्रकाशित करतील, तर ती तू स्वीकारू नयेस. तू राधिकेची दासी आहेस, राधिकेच्या अनुमतीशिवाय स्वतन्त्र होऊन कृष्णाची सेवा करू नयेस. राधा आणि कृष्णात एक समान स्नेह ठेवूनही राधिकेच्या दास्य प्रेमामध्ये कृष्णाच्या दास्य-प्रेमापेक्षा अधिकतर आग्रह ठेवावास–याचेच नाव सेवा आहे. श्रीराधेची अष्टकालीय सेवाच तुझी सेवा आहे. श्रीस्वरूप दामोदरांच्या कडच्यानुसार श्रीदास गोस्वामींनी विलाप कुसुमांजली या ग्रंथात तुझ्या सेवेची रूपरेखा प्रस्तुत केली आहे.

विजय–पराकाष्ठाश्वासाचे निरूपण कसे असते?

गोस्वामी–श्रीदास गोस्वामींच्या या दोन श्लोकांमध्ये पराकाष्ठेचे वर्णन आहे–

**आशाभरैरमृतसिन्धुमयैः कथञ्चित् कालो मयातिगमितः किल साम्प्रतं हि।**
**त्वञ्चेत् कृपां मयि विधास्यसि नैव किं मे प्रानैर्व्रजेन च वरोरु वकारिणापि॥**
**हा नाथ गोकुलसुधाकर सुप्रसन्नवक्रारविन्दमधुरस्मित हे कृपार्द्र !**
**यत्र त्वया विहरते प्रणयैः प्रियारात्तत्रैव मामपि नय प्रियसेवनाय॥**

(विलापकुसुमांजली १०२, १००)

अर्थात हे वरोरू राधे, माझी आशा अमृत समुद्रास प्राप्त करण्यासारखी अत्यंत कठीण आहे. मी ती प्राप्त करण्याच्या आशेत मोठ्या कष्टाने दिवस कंठित आहे. आता तू मज दुःखीवर दया करावीस. तुझ्या कृपेशिवाय माझे जीवन, माझा व्रजवास आणि कृष्णदास्य हे सर्व व्यर्थ आहेत. हा गोकुलचन्द्र! हा मधुरस्मित सुसंपन्न मुखारविंद! हा कृपार्द्र! तुम्ही प्रणयपूर्वक श्रीराधेस घेऊन जेथे नित्यविहार करता, मलादेखील प्रियसेवसाठी तेथेच घेऊन चला.

विजय–आता कृपा करून पाल्यदासीचा स्वभाव सांगावा.

गोस्वामी–व्रजविलास स्तोत्रात श्रीदास गोस्वामींनी पाल्यदासीचा भाव अशाप्रकारे सांगितला आहे–

**सान्द्रप्रेमरसैः प्लुता प्रियतया प्रागल्भ्यमाप्ता तयोः**
**प्राणप्रेष्ठवयस्ययोरनुदिनंलीलाभिसारं क्रमैः।**
**वैदग्ध्येन तथा सखीं प्रति सदा मानस्य शिक्षां रसै-**
**र्येयं कारयतीह हन्त ललिता गृह्णातु सा मां गणैः॥**

(व्रजविलास-स्तव, २९ वा श्लोक)

अर्थात जी अत्यंत गाढ प्रेमरसामध्ये निमग्न होऊन प्रियतेद्वारे प्रगल्भतेस प्राप्त होऊन प्रतिदिन प्राणश्रेष्ठ श्रीराधाकृष्णाचा लीलाभिसार करवित असते आणि वैदग्ध्याद्वारे आपली सखी श्रीराधिकेस रसाबरोबर मानाचीही शिकवण प्रदान करते, त्या ललितेने मला आपल्या गणामध्ये स्वीकारावे अर्थात मला आपल्या पाल्यदासीरूपात ग्रहण करावे.

विजय–श्रीललितेच्या अन्य सहचरींप्रती पाल्यदासीचा व्यवहार कसा असावा?

गोस्वामी–श्रीदास गोस्वामींचे समस्त रस ग्रंथच श्रीस्वरूप गोस्वामींची शिकवण आहे. ते लिहितात–

**ताम्बूलार्पणपादमर्दनपयोदानाभिसारादिभि–**
**र्वृन्दारण्यमहेश्वरीं प्रियतया यास्तोषयन्ति प्रियाः।**
**प्राणप्रेष्ठसखीकुलादपि किलासङ्कोचिता भूमिकाः**
**केलीभूमिषु रूपमञ्जरिमुखास्तादासिकाः संश्रये॥**

(व्रजविलास-स्तव, ३८ वा श्लोक)

अर्थात ज्या तांबूल प्रदान करणे, पाय दाबणे, जल देणे आणि अभिसार करणे आदी कार्यांद्वारे प्रेमपूर्वक श्रीमती राधिकेस नित्य संतुष्ट ठेवतात, त्या प्राणप्रेष्ठ सखींपेक्षा सेवाकार्यामध्ये असंकोच भावास प्राप्त झालेल्या श्रीमती राधिकेच्या रूपमञ्जरी आदी प्रमुख सेविकांचा मी आश्रय ग्रहण करते.

विजय–अन्य प्रधान सखींप्रती कसा भाव ठेवणे योग्य ठरेल?

गोस्वामी–याविषयीचे संकेत दास गोस्वामींनी या श्लोकात दिले आहेत–

**प्रणयललितनर्मस्फारभूमिस्तयोर्या**
**व्रजपुरनवयूनोर्या च कण्ठान् पिकानाम्।**
**नयति परमधस्ताद्दिव्यगानेन तुष्ट्या**
**प्रथयतु मम दीक्षां हन्त सेयं विशाखा॥**

(व्रजविलास-स्तव, ३० श्लोक)

ज्या राधाकृष्णाच्या प्रणय-ललित-कौतुकाची पात्री आहेत तथा ज्या सुदिव्य संगीताद्वारे कोकिळेच्या स्वरासही पराभूत करतात, त्या विशाखा कृपा करून मला संगीताची शिकवण देवोत. अन्यान्य सखींप्रती तुझा भाव असाच असावा.

विजय–विपक्षाप्रती कसा भाव असेल?

गोस्वामी–श्रीदास गोस्वामी याविषयी अशाप्रकारे म्हणतात–

**सापत्नयोच्चयरज्यदुज्ज्वलरसस्योच्चैः समुद्वृद्धये**
**सौभाग्योद्भटगर्वविभ्रमभृतः श्रीराधिकायाः स्फुटम्।**
**गोविन्दः स्मर फुल्लवल्लव वधूवर्गेण येन क्षणं**
**क्रीडत्येष तमत्र विस्तृत महापुण्यञ्च वन्दामहे॥**

(व्रजविलास-स्तव, ४१ श्लोक)

अर्थात राधिकेच्या श्रृंगार-पुष्टीकरिता सापत्न्य भावात स्थित सौभाग्य, उद्भट, गर्व, विभ्रम आदी गुणांनी संपन्न ज्या गुणवतींसोबत श्रीकृष्ण क्षणभरपर्यंत क्रीडा करतात, त्या सौभाग्यवती चन्द्रावली प्रमुख व्रजरमणींची मी वारंवार वंदना करीत आहे. विपक्ष-पक्षाप्रती असा भाव हृदयात असेल, तथापि सेवेच्या समयी यथोचित रूपाने पात्र विशेषाच्या सोबत रसपरिहास करू शकशील. भाव हा आहे की विलापकुसुमांजलीमध्ये सेवेची जशी व्यवस्था दाखविली गेली आहे, त्याचप्रकारे सेवा करावीस आणि व्रजविलास-स्तवामध्ये जसा व्यवहार लिहिला आहे, त्याचप्रकारे परस्पर व्यवहार करावा, विशाखानन्दादी-स्तोत्रामध्ये ज्या प्रकारे 'लीलादी' चे वर्णन आहे, त्याचप्रकारे लीलाकृती अष्टकालीय लीलेचे अंतर्गत दर्शन करावे, मनःशिक्षेच्या पद्धतीनुसार चित्तास कृष्ण लीलेमध्ये मग्न करावे, स्वनियमामध्ये प्रदर्शित भावांप्रमाणे नियमांची दृढता ठेवावी, श्रीरूप गोस्वामींनी रसतत्त्वाचा विस्तार केला आहे. श्रीचैतन्य महाप्रभूंनी त्यांच्यावर हाच भार सोपविला होता, म्हणून त्यांनी हे लिहिले

नव्हते की उपासनेमध्ये त्या रसाची कुठल्या रूपात क्रिया होईल. श्रीदास गोस्वामींनी श्रीस्वरूप दामोदर प्रभूंच्या कडचाच्या अनुसार हे कार्य पूर्ण केले आहे. श्रीमन् महाप्रभूंनी ज्यांना जो भार सोपविला होता, त्यांनी तेच केले आहे.

विजय–कृपया मला हे सांगावे की श्रीमन् महाप्रभूंनी कुणावर कोणता भार सोपविला होता?

गोस्वामी–श्रीमन् महाप्रभूंनी स्वरूप दामोदरांस रसमयी उपासनेचा प्रचार करण्याची आज्ञा दिली होती; या आज्ञेचे पालन करण्याकरिता स्वरूप दामोदर प्रभूंनी दोन भागांमध्ये कडचाची रचना केली होती–एका भागामध्ये रसमयी उपासनेच्या अंतःपंथाचे वर्णन आहे तथा दुसऱ्यात रसोपासनेच्या बाह्यपंथाचे. त्यांनी अंतःपंथ श्रीदास गोस्वामींच्या कंठात अर्पण केला आहे अर्थात दास गोस्वामींस दिला आहे, तो दास गोस्वामींच्या ग्रंथामध्ये सुरक्षित आहे. बाह्यपंथ–श्रीवक्रेश्वर गोस्वामींस अर्पण केला–जो आजही या गादीचे विशेष धन आहे, या पंथास मी श्रीमन् ध्यानचन्द्रांना दिले आहे, त्यांनी जी पद्धती लिहिली आहे, त्यास तुम्ही प्राप्त केले आहे. श्रीमन् महाप्रभूंनी श्रीनित्यानन्द प्रभू आणि श्रीअद्वैतप्रभूंस श्रीनाम-माहात्म्य प्रचार करण्याची आज्ञा आणि शक्ती दिली होती, श्रीरूपगोस्वामींस रसतत्त्व प्रकाश करण्याची आज्ञा आणि शक्ती दिली होती, श्रीसनातन गोस्वामींस वैधीभक्ती तथा रागभक्तीच्या पारस्पारिक संबंधाचा प्रचार करण्याची आज्ञा दिली होती. याव्यतिरिक्त त्यांनी सनातन गोस्वामींस गोकुळाच्या प्रकटाप्रकट संबंधाचा निर्णय करण्याकरिता देखील आज्ञा दिली होती. श्रीनित्यानन्द प्रभू आणि श्रीसनातन गोस्वामींद्वारे श्रीजीव गोस्वामींस संबंध-अभिधेय-प्रयोजन तत्त्वाचा निर्णय करण्याची शक्ती दिली होती. ज्यांना जी आज्ञा दिली आहे, त्यांनी केवळ त्याच आज्ञेचे पालन केले आहे.

विजय–प्रभो! श्रीरायरामानन्दांवर कोणता भार होता?

गोस्वामी–श्रीमन् महाप्रभूंनी रायरामानन्दांवर रसतत्त्व विस्तार करण्याचा भार सोपविला होता. त्यांनी ते कार्य श्रीरूप द्वारा पूर्ण करविले आहे.

विजय–प्रभो! श्रीसार्वभौमांस कोणता भार दिला गेला होता.

गोस्वामी–त्यांच्यावरती तत्त्व-प्रचाराचा भार होता. त्यांनी त्या कार्याचा भार आपल्या कोण्या शिष्याद्वारा श्रीजीवावर सोपवला होता.

विजय–गौडीय महंतांवर कोणता भार होता?

गोस्वामी–गौरतत्त्व प्रकाशित करून जीवांस श्रीगौरोदित कृष्णरसात श्रद्धा उत्पन्न करण्याचा भार गौडीय महंतांवर होता. कतिपय महात्म्यांवर रसकीर्तन पद्धतीचे सृजन करून तिचा प्रचार करण्याचा भार होता.

विजय–श्रीरघुनाथ भट्टांवर कुठला भार होता?

गोस्वामी–श्रीमद्भागवत-माहात्म्याचा प्रचार करण्याचा भार त्यांच्यावर होता.

विजय–श्रीगोपालभट्ट गोस्वामींप्रती कोणता भार दिला गेला होता?

गोस्वामी–शुद्ध-श्रृंगाररसास कुणी विकृत करू शकू नये तथा वैधीभक्तीप्रती कुणी विनाकारणच अश्रद्धेचा भाव ठेवू नये–याची समुचित व्यवस्था करण्याचा भार त्यांच्यावर श्रीमन् महाप्रभूंनी सोपविला होता.

विजय–श्रीगोपालभट्ट गोस्वामींचे गुरू आणि काका श्रीप्रबोधानन्द गोस्वामींवर कोणता भार सोपविला गेला होता?

गोस्वामी–व्रजरसाचा अनुराग मार्गच सर्वश्रेष्ठ आहे–ही गोष्ट जगास समजवण्याचा भार श्रीसरस्वती गोस्वामींवर होता.

हे सर्व ऐकून विजयकुमार मोठे प्रसन्न झाले आणि स्वतःस धन्य मानू लागले.

**॥ एकोणचाळीसावा अध्याय समाप्त ॥**



# चाळीसावा अध्याय (सम्पत्ति-विचार)

विजयने विचार केला की व्रजलीला श्रवण करून त्याप्रती लोभ निर्माण झाल्यावर क्रमशः संपत्ति-दशा प्राप्त होते, म्हणून याविषयी जाणून घेणे आवश्यक आहे. असा विचार करून त्यांनी श्रीगुरुगोस्वामींकडे जिज्ञासा केली–प्रभो! श्रवणकाळापासून संपत्ति-दशा प्राप्त होईपर्यंत भक्ताच्या कोणकोणत्या दशा असतात, त्या जाणू इच्छितो.

गोस्वामी–या दोहोंमध्ये पाच दशा असतात–(१) श्रवण-दशा, (२) वरण-दशा, (३) स्मरण-दशा, (४) भावापन्न-दशा आणि (५) आणि प्रेम-संपत्ति-दशा.

विजय–श्रवण-दशेचे वर्णन करावे.

गोस्वामी–कृष्णाच्या लीलाकथांप्रती रुची झाल्यानेच हे समजावे की त्या जिवाची बहिर्मुख-दशा दूर झाली आहे. त्यावेळी त्याच्यात कृष्णकथा श्रवण करण्याची लालसा जागृत झाली आहे. आपल्यापेक्षा श्रेष्ठ कुणा भक्तानिकटच कृष्णकथेचे श्रवण होते.

श्रीमद्भागवतात म्हटले आहे–

**तस्मिन्महन्मुखरिता मधुभिच्चरित्र-**
**पीयूषशेषसरितः परितः स्रवन्ति।**
**ता ये पिबन्त्यवितृषो नृप गाढकर्णै-**
**स्तान्नस्पृशन्त्यशनतृड् भयशोकमोहाः॥**

(श्रीमद्भा. ४/२९/४०)

अर्थात त्या साधु-समाजामध्ये महापुरुषांच्या मुखातून निघालेल्या श्रीकृष्णाच्या चरित्र रूप शुद्ध अमृताच्या अनेक नद्या वाहत राहतात. जे लोक अतृप्त चित्ताने श्रवणात तत्पर आपल्या कर्ण-कुहरांद्वारे त्या अमृताचे आनंदाने पान करतात, त्यांना तहान-भूक, भय, शोक आणि मोह आदी अनर्थ कधीच कुठलीही बाधा पोहोचवू शकत नाहीत.

विजय–बहिर्मुख लोक कधी-कधी जे कृष्णकथेचे श्रवण करतात, ते श्रवण कसे असते?

गोस्वामी–बहिर्मुख दशेचे कृष्णकथा श्रवण आणि अंतर्मुख दशेचे कृष्णकथा श्रवण–या दोघांमध्ये खूप अंतर आहे. बहिर्मुख लोकांचे कृष्णकथा श्रवण एखाद्या घटनाचक्रामुळे होते, श्रद्धेद्वारे नाही. तर श्रवणाने भक्ति-मुखी सुकृती अर्जित होते, ती जन्मजन्मांतरी श्रद्धा उत्पन्न करते. मग तीच श्रद्धा उत्पन्न झाल्यावर जी कृष्णकथा महापुरुषांच्या मुखातून ऐकली जाते, तिला 'श्रवण-दशा' म्हणतात. श्रवण-दशा देखील दोन प्रकारची असते–(१) क्रमहीन श्रवण-दशा आणि (२) क्रमशुद्ध श्रवण-दशा.

विजय–क्रमहीन श्रवण-दशा कशी असते?

गोस्वामी–असंलग्नपणे कृष्णलीलेचे श्रवण करणेच 'क्रमहीन' श्रवण-दशा आहे. अव्यवसायी बुद्धीने कृष्णलीलेचे श्रवण करण्याने असंलग्न श्रवण होते–अशा श्रवणाने लीलांचा पारस्पारिक संबंध उदित होत नाही, म्हणूनच रसोदय होत नाही.

विजय–क्रमशुद्ध श्रवण-दशेचे वर्णन करावे.

गोस्वामी–व्यवसायात्मिका बुद्धीबरोबर जेव्हा संलग्न रूपाने कृष्णलीलेचे श्रवण होते, तेव्हा रसोदय होतो. अष्टकालीय नित्यलीला आणि जन्मादी नैमित्तिक लीला वेगवेगळ्या ऐकल्यावर क्रमशुद्ध श्रवण होते. भजनपर्वात या प्रकारचे क्रमशुद्ध श्रवणच प्रयोजनीय सांगितले गेले आहे. क्रमशुद्ध लीलेचे श्रवण करता-करता लीलेचे माधुर्य प्रकटित होते आणि श्रोत्याच्या हृदयात रागानुगा-प्रकृती उदित होते. त्यावेळी श्रोता मनोमन असा विचार करतो–अहा! सुबलचा किती आश्चर्यजनक सख्यभाव आहे. मीसुद्धा त्याचप्रमाणे सख्यरसात कृष्णसेवा करीन–या प्रवृत्तीचे नाव 'लोभ' आहे. लोभासोबत व्रजवासीच्या भावानुगत होऊन कृष्णभजन करण्यासच रागानुगा भक्ती म्हटले आहे. मी येथे सख्यरसाचे उदाहरण दिलेले आहे. दास्य आदी चार प्रकारच्या रसांमध्येसुद्धा अशा प्रकारची रागानुगाभक्ती असते. तू माझे प्राणेश्वर निमानन्दांच्या कृपेने श्रृंगाररसाचा अधिकारी आहेस. म्हणून व्रज-सुंदरींची कृष्ण-सेवा पाहून त्यांच्याप्रमाणेच कृष्ण-सेवा करण्याचा लोभ तुमच्या हृदयात उत्पन्न झाला होता, त्या लोभाने तुला ती सेवा प्राप्त करण्याचा मार्ग प्रदान केला आहे. वास्तविक

गुरूशिष्य संवादच या पर्वाची श्रवण-दशा आहे.

विजय–श्रवण-दशा काय असल्याने पूर्ण होते?

गोस्वामी–कृष्णलीलेचे नित्यत्व अनुभव झाल्यावर श्रवण-दशा पूर्ण होते, ती शुद्ध अप्राकृत असल्याने मनोहर असते, त्यात प्रवेश करण्याकरिता व्याकुळता निर्माण होते. गुरुदेव शिष्यास साधकगत पूर्वोल्लिखित अकरा भाव दाखवितात. शिष्याचा मनोभाव आणि लीलेची रंजकता–यांचा संयोग झाल्यावरच श्रवण-दशा पूर्ण झाली–असे समजावे. तेव्हा शिष्य व्याकूळ होऊन वरण-दशा प्राप्त करतो.

विजय–प्रभो! वरण-दशा कशी असते?

गोस्वामी–चित्ताचा राग पूर्वोक्त अकरा प्रकारच्या भावरूप श्रृंखलेद्वारे लीलेमध्ये बांधला गेला आहे, शिष्य रडत-रडत श्रीगुरुदेवांच्या चरणकमळी पडतो, त्यावेळी गुरुदेव सखीच्या रूपात प्रकट होतात आणि शिष्य त्यांच्या परिचारिकेच्या रूपात. गोपवधुगण कृष्णाच्या सेवेकरिता मोठ्या व्याकूळ असतात, गुरुदेव त्या सेवेची पराकाष्ठालब्धा व्रजललना आहेत, त्यावेळी शिष्याच्या मुखातून अशाप्रकारे भावध्वनी निघतो–

**त्वां नत्वा याचते धृत्वा तृणं दन्तैरयं जनः।**
**स्वदास्यामृतसेकेन जीवयामुं सुदुःखितम॥**

**न मुञ्चेच्छरणायातमपि दुष्टं दयामयः।**
**अतो राधालिके! हा हा मुञ्चैनं नैव तादृशम्॥**

(प्रेमाम्भोजमरन्दाख्य स्तवराजः ११-१२ श्लोक)

अर्थात हे राधिके, मी अधम, दातांखाली तृण धारण करून (दीनतापूर्वक) प्रणतिपूर्वक प्रार्थना करतो की आपण कृपा करून माझ्यासारख्या दुःखित व्यक्तीस आपले दासता रूप अमृत प्रदान करून जीवित करावे. जेव्हा दयाळू व्यक्ती शरण आलेल्या दुष्टजनांचासुद्धा परित्याग करीत नाहीत, तेव्हा आपणही या आश्रित दुष्ट व्यक्तीचा त्याग करू नये. मी आपल्या चरणानुगत होऊन व्रजयुगुलाची सेवा करण्याकरिता अतिशय व्याकूळ आहे. यालाच 'वरण-दशा' म्हणतात. अशा दशेमध्ये गुरुरूपा सखी त्यास व्रजामध्ये वास करून कृष्ण नाम आश्रयपूर्वक लीला-स्मरण

करण्याची आज्ञा देते आणि त्यास आश्वासन प्रदान करते की तुझी मनोकामना शीघ्रच सिद्ध होईल.

विजय–स्मरण-दशा कशी असते?

गोस्वामी–श्रीरूप गोस्वामींनी म्हटले आहे–

**कृष्णं स्मरन् जनं चास्य प्रेष्ठं निजसमीहितम्।**
**तत्तत्कथारतश्चासौ कुर्याद्वासं व्रजे सदा॥**

**सेवा साधकरूपेण सिद्धरूपेण चात्र हि।**
**तद्भावलिप्सुना कार्या व्रजलोकानुसारतः॥**

**श्रवणोत्कीर्तनादीनि वैधभक्त्युदितानि तु।**
**यान्यङ्गानि च तान्यत्र विज्ञेयानि मनीषिभिः॥**(१)

(भ. र. सि. १/२/२९४-२९६)

या दोन्ही श्लोकांचा अर्थ सांगण्याआधीच विजयकुमार मध्येच म्हणाले–**“कुर्याद्वासं व्रजे सदा”** याचा अर्थ काय आहे?

गोस्वामी–श्रीजीव गोस्वामींनी म्हटले आहे–या शरीराने व्रजमंडळात अर्थात लीलामंडळात निवास करावयास हवा. देहाने व्रजवास संभव नसल्यास मनोमन व्रजवास करावा. मनोमन व्रजवासाचे फळही शरीराने व्रजवास करण्यासमानच असते. जो ज्या सखीच्या अनुगत आहे, तो व्रजात स्वतःस त्याच सखीची कुंज-सेविका मानून कृष्ण आणि आपले भाव असणाऱ्या सखीचे सर्वदा स्मरण करतो. साधक रूपात या स्थूल देहाने श्रवण-कीर्तन आदी वैधी भक्तीचे अनुष्ठान करतात आणि प्राप्त केलेल्या अकरा भावांपैकी सिद्ध-व्रजगोपी देहामध्ये

(१) कृष्ण आणि स्वतःचे प्रियजन यांचे सदा स्मरणपूर्वक त्यांच्या कथांमध्ये निरत होऊन सर्वदा व्रजामध्ये वास करावयास हवा. शरीराने व्रजवास केल्याने असमर्थ असल्यास मनोमन व्रजवास करावा. रागात्मिकाभक्तिप्रती ज्यांना लोभ होतो, ते व्रजजनांच्या कार्यानुसार साधक रूपात बाहेरून आणि सिद्धरूपात अंतरंगातून सेवा करतील. वैधीभक्तीमध्ये श्रवण आणि उच्च कीर्तन आदी जी सर्व भक्तीची अंगे आहेत, रागानुगाभक्तीमध्येसुद्धा त्या सर्व अंगांची उपयोगिता आहे– असे तत्त्वविद् व्यक्ती जाणतात.

कार्यानुरोधाने लीलेचे ध्यान आणि निर्दिष्ट सेवा करतात. विधिपूर्वक जीवन व्यतीत करावे तथा सिद्धदेहाची पुष्टी भावांच्या अनुसार करावी–असे झाल्याने व्रजातून इतर विषयांच्या प्रती विरक्ती होईल.

विजय–या प्रणालीस थोडे आणखी स्पष्ट करून सांगावे.

गोस्वामी–अप्राकृत भावांसोबत निर्जन-वासच व्रजवास आहे. संख्यापूर्वक हरिनाम करीत अष्टकालीय सेवा करावी. समस्त देह यात्रा भजन-विरोधी होऊ नये, असा विचार करून आपल्या समस्त क्रियांस अशा प्रकारे करावयास हवे की या क्रिया अशा प्रकारच्या असाव्यात की आपल्या शरीर-यात्रेचा निर्वाहसुद्धा होऊन जाईल तथा त्या भगवद्भजनाच्या अनुकूलही असाव्यात.

विजयने काहीसे गंभीरतापूर्वक अनुभवीत म्हटले–प्रभो! ही गोष्ट तर समजलो, परंतु मनास कसे स्थिर करावे?

गोस्वामी–रागानुगाभक्ती लाभ करतानाच चित्त स्थिर होते, कारण जर चित्त रागासोबत व्रजाकडे जाते तर त्याची विषयांप्रती गती होत नाही. याचे कारण हे आहे की विषयांप्रती रागामुळेच चित्त विषयांकडे धावते. ज्यावेळी तोच राग व्रजाकडे जातो, त्यावेळी विषय-रागाच्या अभावी चित्त स्थिर होऊन जाते. तरीही जर उत्पात–विघ्न-बाधेची भीती असेल तर पूर्व क्रमाचा अवलंब करणेच लाभदायक आहे. चित्त स्थिर झाल्यावर उत्पात काहीच करू शकत नाहीत.

विजय–क्रमाचे तात्पर्य काय आहे?

गोस्वामी–प्रतिदिन नियमितपणे काही वेळपर्यंत निर्जनस्थानी बसून विषयरूपी उत्पातांस दूर हटवून भावासोबत संख्यापूर्वक नाम करावे. हळूहळू या कार्याची वेळ क्रमशः वाढवीत रहावी. शेवटी सर्वकाळीच एक अद्भुत भाव उदित होईल. त्यावेळी उत्पात (वाईट चिंतन) जवळ येण्यासही घाबरतील.

विजय–अशाप्रकारे किती दिवस नियमपूर्वक करावयास हवे?

गोस्वामी–जोपर्यंत उत्पातरहित अथवा उत्पाताच्या पलीकडील अवस्था उदित होण्याची शक्यता होत नाही, तोपर्यंत पूर्वोक्त क्रमाचे पालन करायला हवे.

विजय–भावासोबत नाम-स्मरण कसे असते? कृपया हे स्पष्ट करून सांगण्याची कृपा करावी.

गोस्वामी–आधी चित्ताच्या उल्लासासोबत नामजप करावा, मग उल्हासात ममतेचा संयोग घडवावा, मग ममतेमध्ये विश्रंभाचा संयोग करावा. असे झाल्यावर क्रमशः शुद्धभाव उदित झाल्यावर भावापन-दशा उपस्थित होते. स्मरणकाळी भावाचा आरोपमात्र होतो. भावापनकाळात शुद्धभावाचा उदय होतो. यालाच 'प्रेम' म्हणतात. हाच उपासकाचा निष्ठाक्रम आहे. या व्यापारात उपास्यनिष्ठेचाही एक क्रम आहे.

विजय–उपास्य-निष्ठा-क्रम कशास म्हणतात?

गोस्वामी–जर तू असंकुचित (विकसित) प्रेमदशा लाभू इच्छितोस तर श्रीदास गोस्वामींचा उपदेश ग्रहण करावास–

**यदीच्छेरावासं व्रजभुवि सरागं प्रतिजनु-**
**र्युवद्वन्द्वं तच्चेत् परिचरितुमारादभिलषेः।**
**स्वरूपं श्रीरूपं सगणमिह तस्याग्रजमपि**
**स्फुटं प्रेम्णा नित्यं स्मर नम तदा त्वं शृणु मनः॥**

(मनःशिक्षा ३)

अर्थात जर रागासोबत व्रजामध्ये निवास करण्याची इच्छा असेल आणि जर जन्मजन्मांतरी व्रजयुगुलाची साक्षात विवाह-विधी रूप बंधनाने रहित पारकीय परिचर्या करण्याची अभिलाषा ठेवत असाल, तर श्रीस्वरूप गोस्वामी तथा गणांसोबत श्रीरूप आणि श्रीसनातन गोस्वामींचे स्पष्ट प्रेमासहित नित्य स्मरण करावे आणि त्यांना गुरुरूपा सखी मानून प्रणती करावी. भाव हा आहे की स्वकीय रसानुसार साधन केल्याने समंजस-रस होतो, ज्यात युगुल सेवेचा भाव संकुचित असतो. म्हणूनच श्रीस्वरूप, श्रीरूप आणि श्रीसनातनांच्या मतानुसार शुद्ध पारकीय अभिमानाने भजन करावे. आरोप काळातही केवळ शुद्ध परकीय भावाचेच अवलंबन करावे. परकीय आरोपाने परकीय रती प्रकाशित होते आणि परकीय रतीने परकीय-रस. तोच व्रजामध्ये अप्रकट लीलेचा नित्य रस आहे.

विजय–अष्टकालीय लीलेमध्ये काय शुद्धिक्रम आहे?

गोस्वामी–अष्टकालीय लीलेमध्ये सर्व प्रकारच्या रस वैचित्र्याचे वर्णन करून श्रीरूप गोस्वामी म्हणतात–

**अतलत्वादपारत्वादाप्तोऽसौदुर्विगाहताम्।**
**स्पृष्टः परं तटस्थेन रसाब्धिर्मधुरो मया॥**

(उ. नी. १५/२५९)

अर्थात कृष्णलीला संपूर्ण चिन्मयी असते, म्हणूनच अतल आणि अपार आदी-अंतरहित असते. कारण प्रपंचास भेदून शुद्ध अप्राकृत तत्त्वात प्रवेश करणे दुष्कर आहे. अप्राकृत रस इतका विचित्र आणि सर्वव्यापी आहे की त्याच्या पलीकडे जाता येत नाही. पुनः जर कुणी अप्राकृत भावास प्राप्त होऊनही अर्थात सिद्धतत्त्वामध्ये राहूनही त्याचे वर्णन केले तरीही ते वर्णन शब्दमलामुळे विशुद्ध आणि संपूर्ण नसते. इतकेच काय तर, स्वयं भगवानही जेव्हा त्याचे वर्णन करतात, तेव्हा श्रोता आणि वाचकांच्या प्रपंच-दोषा(मायेच्या दोषा)समीप (श्रोता आणि वाचकांसमीप) त्या अप्राकृत रसाचे वर्णन दोषयुक्त प्रतीत होते. अशा अवस्थेत रस-समुद्रात सूर मारणे दुष्कर आहे. हो! तटस्थ होऊन त्याच्या एका कणमात्रास प्रकाशित केले जाऊ शकते.

विजय–तर मग कुठल्या उपायांनी आम्हांस अप्राकृत-रसाची प्राप्ती संभव होईल?

गोस्वामी–'मधुररस' अपार-अतुलनीय आणि दुर्विगाह आहे. कृष्णलीलाच तशी आहे, परंतु आपल्या कृष्णामध्ये दोन असीम गुण आहेत. हे दोन्ही गुणच आमच्या भरवशाची स्थळे आहेत–ते सर्वशक्तिमान आणि इच्छामय आहेत. म्हणून जे अतल, अपार आणि दुर्विगाह आहे, त्यासही ते संकीर्ण प्रापंचिक जगात अनायासेच प्रकाशित करू शकतात. प्रपंच अत्यंत तुच्छ (हीन) असूनही ते आपल्या सर्वोत्तम भावास प्रपंचात आणण्याची इच्छा करतात, त्यांच्या कृपेने त्यांची अप्राकृत नित्य-मधुर रसमयी लीला या प्रपंचात अवतीर्ण झाली आहे. प्रपंचापलीकडील अप्राकृत श्रीमथुराधाम या प्रपंचात कसे अवतीर्ण झाले अथवा कशाप्रकारे आले आणि कशाप्रकारे वर्तमान आहे–असा प्रश्न उठू शकत नाही, कारण भगवंताच्या अचिंत्य शक्तीच्या क्रियेस मनुष्य वा देवतांची सीमित बुद्धी समजण्यास कदापि समर्थ नसते. व्रजलीला प्रपंचापलीकडील सर्वोच्च लीलेचा प्रकट भाव आहे–तिला आपण

प्राप्त केले आहे, अतः आपल्याकरिता कसलीच चिंता नाही.

विजय–जर प्रकटलीला आणि अप्रकटलीला–दोन्हीं एकच आहेत, तेव्हा त्यांची क्रमोन्नती कशी संभव आहे?

गोस्वामी–दोन्ही एकच वस्तू आहेत–यात कुठलाच संशय नाही. जे येथे प्रकट आहे, ते संपूर्णपणे प्रपंचातीत राज्यात विराजमान आहे. परंतु ती लीला बद्धजिवांच्या दृष्टीने प्रारंभिक साधनावस्थेमध्ये जशी दिसून येते, काहीशा उन्नत अवस्थेत ती थोडी अधिक उन्नत रूपात प्रतीत होते, जसजसा साधक उन्नत अवस्थेत पोहोचतो, त्याची अनुभूतीही तशीच क्रमशः अधिक निर्मळ होत जाते–भावापन-अवस्थेची अनुभूती पूर्णपणे निर्मळ असते.

विजय! तू या विषयास श्रवण करण्याचा अधिकारी आहेस. म्हणूनच तुला सांगण्यास काहीच संकोच वाटत नाही. स्मरण-दशेमध्ये अनेक प्रकारे साधन केल्यावर आणि त्या साधन काळात भावापन-योग्य कृती केल्याने स्मरण-दशेमध्ये भावापन-अवस्था होते. स्मरण-अवस्थेमध्ये जो अनुभवगत प्रापंचिक दुष्ट भाव असतो, तो संपूर्ण रूपाने दूर झाल्यावर 'आपन-दशा' उपस्थित होते. स्मरण-दशेमध्ये शुद्ध भक्तीचे जितक्या सुयोग्य रूपात साधन होते, शुद्ध भक्ती कृपा करून साधकाच्या चित्तामध्ये तितकीच अधिक उदित होते. भक्तीच एकमात्र कृष्णाकर्षणी आहे. म्हणून कृष्णकृपेने स्मरण-दशेमध्ये चिंतागत मल क्रमशः दूर होत जातो. श्रीमद्भागवतामध्ये म्हटले आहे–

**यथा यथात्मा परिमृज्यतेऽसौ मत्पुण्यगाथाश्रवणाभिधानैः।**
**तथा तथा पश्यति वस्तु सूक्ष्मं चक्षुर्यथैवाञ्जनसम्प्रयुक्तम्॥**

(श्रीमद्भा. ११/१४/२६)

अर्थात ज्याप्रकारे नेत्र अंजनाच्या संयोगाने अत्यंत सूक्ष्म वस्तूदेखील पाहू शकतात, त्याचप्रकारे जीव माझ्या परम पवित्र लीलाकथांच्या श्रवण-कीर्तनाद्वारे परिशुद्ध होऊन अतिसूक्ष्म तत्त्वाचे (माझे स्वरूप तथा माझ्या लीलांची यथार्थता) दर्शन करतो.

कृष्णाच्या लीलाकथांच्या श्रवण, कीर्तन आणि स्मरणाद्वारे त्या अप्राकृत वस्तूच्या संस्पर्श प्रभावाने आत्मा जितका शुद्ध होत जातो, तितक्याच अधिक रूपात

दृश्यरूप कृष्णलीलेचे अप्राकृत स्वरूप दिसू लागते. ठीक तसेच ज्याप्रकारे अंजनाच्या संयोगाने डोळे दृश्य वस्तू योग्य रितीने पाहू शकतात.

**प्रेमाञ्जनच्छुरितभक्तिविलोचनेनसन्तः सदैव हृदयेषु विलो कयन्ति।**
**यं श्यामसुन्दरमचिन्त्यगुणस्वरूपं गोविन्दमादिपुरुषं तमहं भजामि॥**

अर्थात प्रेमरूपी अंजनाद्वारे रंजित भक्तिनेत्र असणारे साधुगण आपल्या हृदयात ज्या अचिंत्यगुणविशिष्ट श्यामसुन्दर कृष्णास पाहतात, त्या आदी पुरुष गोविन्दाचे मी भजन करतो. भावापन दशेमध्ये अप्राकृत दृष्टि-शक्ती उदित होते, त्यावेळी भक्त आपली सखी आणि यूथेश्वरीचे दर्शन प्राप्त करतात. गोलोकनाथ श्रीकृष्णास पाहूनही जोपर्यंत साधकाच्या लिंग आणि सूक्ष्म शरीराची ध्वंसरूप संपत्ति-दशा उपस्थित होत नाही, तोपर्यंत अनुभाव सर्वकाळी स्थायी नसतो. भावापन दशेमध्ये जडीय स्थूलदेह आणि लिंगदेहावर शुद्ध जिवाचे अधिपत्य होऊन जाते, परंतु कृष्णकृपा पूर्ण झाल्यावर जी अवस्था होते, त्याचे अवांतर फळ हे असते की जिवासोबत या प्रापंचिक जगाचा संबंध संपूर्णपणे छिन्न होऊन जातो. भावापन-दशेचे नाव ‘स्वरूपसिद्धी’ आहे आणि संपत्ति-दशा झाल्यावर ‘वस्तुसिद्धी ’ होते.

विजय–वस्तुसिद्धी झाल्यावर कृष्णनाम, रूप, गुण, लीला आणि धाम कशा रूपात दिसतात?

गोस्वामी–या प्रश्नाचे उत्तर देण्यास मी असमर्थ आहे–जेव्हा माझी वस्तुसिद्धी होईल, तेव्हा ते सर्व पाहू शकेन आणि सांगू शकेन. जेव्हा तुझी संपत्ति-दशा उपस्थित होईल, त्यावेळी तू ते समजू शकशील–मग तुला ते समजण्याची आवश्यकता पण राहणार नाही, कारण जे तू प्रत्यक्षपणे पाहशील, त्यासंबधी तुझी कुठली जिज्ञासाच राहणार नाही. आणखी पाहा, स्वरूपसिद्धी अर्थात भावापन दशेस प्राप्त भक्त जे काही पाहतो, ते व्यक्त करण्यानेही फारसा लाभ होत नाही, कारण व्यक्त करूनही कुठलाच श्रोता त्याचा अनुभव घेऊ शकत नाही. श्रीरूप गोस्वामींनी स्वरूपसिद्ध महापुरुषाचे लक्षण अशाप्रकारे लिहिले आहे–

**जने चेज्ज्ञातभावेऽपि वैगुण्यमिव दृश्यते।**
**कार्या तथाऽपि नासूया कृतार्थः सर्वथैव सः॥**

**धन्यस्यायं नवः प्रेमा यस्योन्मीलति चेतसि।**
**अन्तर्वाणिभिरप्यस्य मुद्रा सुष्ठु सुदुर्गमा॥**(२)

(भ. र. सि. १/३/५९, १/४/१७)

विजय–जर असे आहे, तर श्रीब्रह्मसंहिता आदी ग्रंथांमध्ये गोलोकाविषयी वर्णन करण्याचा प्रयत्न का केला गेला आहे?

गोस्वामी–स्वरूपसिद्धी समयी महाजनगण आणि कृपा दर्शनाच्या वेळी ब्रह्मा आदी देवतागण कधी-कधी दर्शनानुसार स्तव-स्तुतींमध्ये वर्णन करतात, परंतु त्यांचे हे वर्णन (अप्राकृत भावांच्या अभिव्यक्तीकरिता या जगामध्ये अनुरूप शब्दांच्या उणीवेमुळे) संक्षिप्त असते तथा निम्नाधिकारींकरिता अस्फुट प्रकाश प्राप्त करते. त्या विचारांशी भक्तांचे काहीच प्रयोजन नसते. कृष्णाने कृपा करून ज्या प्रकट लीलेस उदित केले आहे, तिचे अवलंबन करून भजन करावे. त्यायोगेच सर्वसिद्धी होईल. थोड्याच वेळात निष्ठायुक्त भजन करणाऱ्याच्या हृदयात गोकुळातच गोलोकाची स्फूर्ती होईल. गोकुळात जे काही आहे, गोलोकातही तेच आहे. कारण गोकुळ आणि गोलोक भिन्न तत्त्वे नाहीत. प्रापंचिक दृष्टी असणाऱ्या व्यक्तीच्या नेत्रांमध्ये जो माया-प्रत्ययित व्यापार उदित होतो, तो स्वरूप सिद्धीच्या वेळी नसतो. ज्या अधिकारात जसे दर्शन मिळेल त्यानेच संतुष्ट राहून भजन करीत चला–हीच कृष्णाची आज्ञा आहे. त्यांच्या आज्ञेचे पालन केल्याने ते कृपा करून क्रमशः निर्मळ दर्शन करवतील.

आता विजयकुमार समस्त विषयांमध्ये संशयरहित झाले होते. आपल्या अकरा भावांस कृष्णलीलेमध्ये सुंदर रितीने संयोग करून धीरभावात समुद्राच्या तटी भजन कुटीमध्ये बसून निरंतर प्रेमास्वादन करू लागले. त्याच दरम्यान ब्रजनाथाच्या मातेस धामप्राप्ती झाली. ब्रजनाथ आपल्या पितामहीस घेऊन स्वदेशी परतले.

---

(२) भावावस्थेस प्राप्त झालेल्या भक्तांमध्ये बाह्य दृष्टीने जर दुराचारासारखे काही (वैगुण्य) दिसून जरी आले तरी त्यांच्याप्रती असूया (दोष बुद्धी) करणे कर्तव्य नाही, कारण कृष्णेतर विषयांमध्ये ते अनासक्त असतात. म्हणूनच ते सर्वतोभावेन कृतार्थ झालेले असतात. ज्यांच्या चित्तात हे नवप्रेम उदित होते, ते धन्य आहेत. त्यांची क्रियामुद्रा शास्त्रविदांकरितासुद्धा अतिशय दुर्बोध आहे. सौभाग्यशाली व्यक्तींच्या चित्तामध्येच हे नवीन प्रेम उदित होते, शास्त्रविद् व्यक्तींस हे नवीन प्रेम समजणे मोठे कठीण असते.

ब्रजनाथाच्या निर्मळ हृदयात सख्यप्रेम उदित झाले. ते नवद्वीपधामात भगवती गंगातटी अनेक सुवैष्णांसोबत राहून आनंदपूर्वक भजन करू लागले.

इकडे विजयने काही दिवसांनंतर गृहस्थ वेष परित्यागून कौपीन बर्हिवास धारण केला आणि श्रीमहाप्रसाद माधुकरीद्वारे आपले उदर-भरणपोषण करीत निरंतर भजनात निमग्न राहू लागले. आठही प्रहरात फक्त श्रीराधाकृष्णाच्या निद्रेसमयी थोडेसे शयन करीत, त्यांच्या भोजनानंतर प्रसाद सेवन करीत आणि त्यांच्या जागरण-समयी यथायोग्य कालोचित सेवा करीत असत. सदासर्वकाळ हरिनामाची माळ त्यांच्या हाती असे. कधी नाचत, कधी जोरजोरात रडत आणि कधी समुद्राच्या लाटांकडे पाहून हसू लागत. त्यांच्या भजन-मुद्रेस–त्यांच्या हृदयगत भावांस त्यांच्याशिवाय दुसरे कोण समजू शकते? त्यांचे नाव निमाईदास बाबाजी झाले. ते अत्यंत नम्र, विमल-चरित्र आणि दृढ भजनपरायण होते. जर कुणी त्यांच्याकरिता महाप्रसाद अथवा कौपीन-बहिर्वास आणीत, तर ते आवश्यकतेनुसारच ग्रहण करीत असत. आवश्यकतेपेक्षा अधिक काहीच घेत नसत. हरिनाम करतांना डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहत असत. त्यांचा गळा रुद्ध होत असे. आणि शरीर पुलकित होऊन जात असे. काही दिवसांतच त्यांचे भजन सिद्ध झाले. श्रीकृष्णाने कृपा करून आपल्या अप्रकट लीलेमध्ये त्यांना अधिकार प्रदान केला. ब्रह्म हरिदासाप्रमाणे त्यांचा भजन-देहदेखील समुद्राच्या वाळूत पुरला गेला.

**॥ चाळीसावा अध्याय समाप्त ॥**



**॥ बोलो, भगवान श्रीकृष्णचन्द्रकी जय॥**

**गुरु-कृष्ण वैष्णवेर कृपाबल धरि।**
**भकति विनोद दीन बहु यत्न करि॥ १॥**

**विरचिल जैवधर्म गौड़ीय भाषाय।**
**सम्पूर्ण हइल ग्रन्थ माघी–पूर्णिमाय॥ २॥**

**चैतन्याब्द चारिशत दशे नवद्वीपे।**
**गोद्रुम–सुरभिकुञ्जे, जान्हवी–समीपे॥ ३॥**

श्रीगुरु-वैष्णव आणि भगवान श्रीकृष्णाच्या कृपारूपी बळास धारण करून या दीनहीन भक्तिविनोदाने मोठ्या यत्नाने 'जैवधर्म' या ग्रंथाची बंगाली भाषेत रचना केली. चैतन्याब्द चारशे दहा (इ.स. १८९६) च्या माघी-पौर्णिमेच्या दिवशी श्रीनवद्वीपामध्ये जान्हवी निकट स्थित श्रीगोद्रुमद्वीपाच्या सुरभिकुंजामध्ये ग्रंथ संपूर्ण झाला. ॥ १-३ ॥

**श्रीकलिपावन गोरापदे जार आश।**
**ए ग्रन्थ पढ़ेन तिनि करिया विश्वास॥ ४॥**

कलियुग पावनावतारी श्री गौरहरींच्या चरणकमलांस प्राप्त करण्याची ज्यांची अभिलाषा आहे, ते दृढ विश्वासासोबत या ग्रंथाचा पाठ करतील. ॥ ४॥

**गौराङ्गे जाँहार ना जन्मिल श्रद्धा लेश।**
**ए ग्रन्थ पढ़िते ताँरे शपथ विशेष॥ ५॥**

ज्यांच्यामध्ये श्रीगौरांग महाप्रभूंप्रती लेशमात्रदेखील श्रद्धा उत्पन्न झालेली नाही, मी त्यांना हा ग्रंथ न वाचण्याची शपथ घालतो॥ ५॥

**शुष्क मुक्तिवादे कृष्ण कभु नाहि पाय।**
**श्रद्धावाने व्रजलीला शुद्धरूपे भाय॥ ६॥**

कारण, शुष्क मुक्तिवादाद्वारे कुणीही कृष्णास प्राप्त करू शकत नाही, परंतु श्रद्धावान व्यक्तींना शुद्ध रूपात वर्णिलेली व्रजलीला फार आवडते. ॥ ६ ॥

# फलश्रुती

**पृथिवीते यत कथा धर्म नामे चले।**
**भागवत कहे सब परिपूर्ण छले॥ १ ॥**

पृथ्वीवर धर्मांच्या नावाखाली ज्या सर्व गोष्टी सांगितल्या जातात, भागवत त्या सर्वांस संपूर्ण कपट म्हणून प्रचार करते.॥ १ ॥

**छलधर्म छाडि कर सत्यधर्मे मति।**
**चतुर्वर्ग त्यजि धर नित्य प्रेमगति॥ २ ॥**

म्हणूनच हे वाचकगणहो! त्या सर्व कपट धर्मांस सोडून सत्य धर्मातच आपल्या चित्तास लावा. दुसऱ्या शब्दांमध्ये, धर्म, अर्थ, काम आणि मोक्षरूपी चतुर्वर्गास त्यागून नित्य प्रेमास प्राप्त करणाऱ्या मार्गाचे अवलंबन करा॥ २ ॥

**आमित्व मीमांसा भ्रमे निजे जड बुद्धि।**
**निर्विशेष ब्रह्मज्ञाने नहे चित्त शुद्धि॥ ३ ॥**

आमित्व मीमांसा अर्थात स्वतःस शरीर मानण्याच्या भ्रमामुळे स्वतःप्रती ही जडबुद्धी उत्पन्न होते तथा निर्विशेष ब्रह्मज्ञानानेसुद्धा चित्तशुद्धी अर्थात अशी जडबुद्धी दूर होऊ शकत नाही.॥ ३ ॥

**विचित्रता हीन हले निर्विशेष हय।**
**काल सीमातुल्य सेह अप्राकृत नय॥ ४॥**

नाम, रूप, गुण आणि लीला आदींची विचित्रता न राहिल्यावर भगवत् तत्त्व निर्विशेष ब्रह्म होऊन जाते. जी वस्तू काळ आणि सीमेच्या अंतर्गत असते, ती अप्राकृत होऊ शकत नाही.॥ ४॥

**खण्ड ज्ञाने हेय धर्म आछे सुनिश्चित।**
**प्राकृत हइले कभु अप्राकृत नय॥ ५॥**

इंद्रियांतून उत्पन्न होणारे प्राकृत ज्ञान खण्ड ज्ञान आहे, म्हणून त्यात तुच्छ

धर्म अर्थात भ्रम, प्रमाद आदी दोषांचे असणे निश्चित आहे. जी वस्तू प्राकृत असते, ती कधीही अप्राकृत होऊ शकत नाही.॥५॥

**जडे द्वैतज्ञान हेय चिते उपादेय।**
**कृष्ण भक्ति चिरदिन उपाय–उपेय॥६॥**

जड-जगतामध्ये द्वैतज्ञान तुच्छ आहे, परंतु चित् जगतामध्ये उपादेय आहे. कृष्णभक्ती सर्वदाच उपाय आणि उपेय (उपायाने प्राप्त) स्वरूप आहे.॥६॥

**जीव कभु जड नय, हरि कभु नय।**
**हरि सह जीवाचिन्त्य-भेदाभेदमय॥७॥**

जीव कधी जड (अचेतन) असू शकत नाही, तथा कधी हरीही असू शकत नाही. जिवाचा भगवान श्रीहरीशी अचिंत्यभेदाभेद संबंध आहे.

**देह कभु जीव नय, धरा भोग्य नय।**
**दास्य भोग्य जीव, कृष्ण प्रभु भोक्ता हय॥८॥**

शरीरास कधीही जीव म्हणता येऊ शकत नाही आणि हे जगतही जिवाचे भोग्य नाही. भोग्य जीव दास तथा भोक्ता श्रीकृष्ण प्रभू आहेत.॥८॥

**जैवधर्मे नाहि आछे देहधर्म कथा।**
**नाहि आछे जीव ज्ञाने मायावाद-प्रथा॥९॥**

जैवधर्मात देह धर्माविषयी काहीही सांगितले गेले नाही, आणि त्यात "ब्रह्म सत्य आहे, जग (विश्व) खोटे आहे तथा जीवच ब्रह्म आहे–अशा मायावादा"चे वर्णनही केले गेलेले नाही.॥९॥

**जीव-नित्यधर्म-भक्ति ताहे जड नाई।**
**शुद्ध जीव 'प्रेम' सेवा फले पाय ताई॥१०॥**

जिवाचा नित्यधर्म–भक्ती काही जडधर्म नाही, सेवेच्या फळस्वरूपात शुद्ध जीव आपल्या नित्य स्वरूपात अवस्थित झाल्यावर प्रेम प्राप्त करतो॥१०॥

**'जैवधर्म' पाठे सेइ शुद्धभक्ति हय।**
**'जैवधर्म' ना पढिले कभु भक्ति नय॥ ११॥**

जैवधर्माच्या पठणाने त्या शुद्धभक्तीची प्राप्ती होते. जैवधर्माचे पठण न केल्याने कधीच भक्ती मिळत नाही.॥ ११॥

**रूपानुग अभिमान पाठे दृढ हय।**
**जैवधर्म विमुखके धर्महीन कय॥ १२॥**

याचे पठण केल्याने रूपानुग होण्याचा अभिमान दृढ होतो. जैवधर्मापासून विमुख (पाठ फिरविलेली) व्यक्ती वास्तविक धर्महीन आहे.॥ १२॥

**यावत्, जीवन जेइ पढे जैवधर्म।**
**भक्तिमान सेइ जाने वृथा ज्ञान-कर्म॥ १३॥**

**कृष्णेर अमल सेवा लभि सेह नर।**
**सेवामुखे मग्न रहे सदा कृष्णपर॥ १४॥**

आजीवन या जैवधर्माचा पाठ करणाऱ्या भक्तिमान व्यक्तीस श्रीकृष्णाच्या चरणकमलांची विशुद्ध सेवाप्राप्ती होते तथा ती ज्ञान आणि कर्मास वृथा (व्यर्थ) जाणून सदैव श्रीकृष्णाच्या सेवारूपी सुखामध्ये निमग्न राहते॥ १३-१४॥

**समाप्त**



# संस्कृत श्लोक आणि गद्यांची अनुक्रमणिका

# पद्यांशांची अनुक्रमणिका

(श)



(स)



(ह)